॥ श्रीहरिः ॥

# विषय-सूची

| सर्ग | विषय | पृष्ठ |
|---|---|---|

## सुंदरकाण्ड



## युद्धकाण्ड



| सर्ग | विषय | पृष्ठ |
|---|---|---|



## उत्तरकाण्ड

ॐ

# अध्यात्मरामायण

## माहात्म्य

रामं विश्वमयं वन्दे रामं वन्दे रघूद्वहम् । रामं विप्रवरं वन्दे रामं श्यामाग्रजं भजे ॥
यस्य वागंशुतश्च्यूतं रम्यं रामायणामृतम् । शैलजासेवितं वन्दे तं शिवं सोमरूपिणम् ॥
सच्चिदानन्दसंदोहं भक्तिभूतिविभूषणम् । पूर्णानन्दमहं वन्दे सद्गुरुं शङ्करं स्वयम् ॥
अज्ञानध्वान्तसंहर्त्री ज्ञानालोकविलासिनी । चन्द्रचूडवचश्चन्द्रचन्द्रिकेयं विराजते ॥

जयति रघुवंशतिलकः कौसल्यानन्दिवर्धनो रामः ।
दशवदननिधनकारी दाशरथिः पुण्डरीकाक्षः ॥१॥

रघुवंशाचे भूषण, रावणवध करणारे, कमलासारखे नेत्र असणारे, कौसल्येच्या आनंदाची वृद्धी करणारे कमलनयन दशरथपुत्र श्रीराम यांचा जयजयकार असो. (१)

अप्रमेयत्रयातीतनिर्मलज्ञानमूर्तये ।
मनोगिरां विदूराय दक्षिणामूर्तये नमः ॥

जे प्रत्यक्ष इत्यादी प्रमाणांच्या पलीकडे आहेत, जे त्रिगुणांच्या पलीकडील आहेत, जे मलरहित, ज्ञानस्वरूप आणि मन, वाणी इत्यादींचा विषय होऊ शकत नाहीत, अशा त्या दक्षिणामूर्ती भगवान सदाशिवांना नमस्कार असो.

*सूत उवाच*

कदाचिन्नारदो योगी परानुग्रहवाञ्छया ।
पर्यटन्सकलाँल्लोकान् सत्यलोकमुपागमत् ॥२॥

**सूत म्हणाले** – एकदा योगिराज नारद दुसऱ्यांवर कृपा करण्यासाठी सर्व लोकांत फिरत असताना, सत्यलोकात येऊन पोहोचले. (२)

तत्र दृष्ट्वा मूर्तिमद्भिश्छन्दोभिः परिवेष्टितम् ।
बालार्कप्रभया सम्यग्भासयन्तं सभागृहम् ॥३॥

मार्कण्डेयादिमुनिभिः स्तूयमानं मुहुर्मुहुः ।
सर्वार्थगोचरज्ञानं सरस्वत्या समन्वितम् ॥४॥

चतुर्मुखं जगन्नाथं भक्ताभीष्टफलप्रदम् ।
प्रणम्य दण्डवद्भक्त्या तुष्टाव मुनिपुङ्गवः ॥५॥

तेथे मूर्तिमंत वेदांसमवेत, बालसूर्याप्रमाणे असणाऱ्या आपल्या प्रभेने सभा-भवनाला संपूर्णपणे देदीप्यमान करणारे, मार्कंडेय इत्यादी मुनिजनांकडून वारंवार स्तुती केले जाणारे, सर्व पदार्थांचे ज्ञान असणारे, भक्तांना इष्ट फळ देणारे, सरस्वती-सहित असणारे, असे जगत्पती चतुर्मुख ब्रह्मदेव होते, त्यांना पाहून, मुनिश्रेष्ठ नारदांनी साष्टांग प्रणाम केला आणि त्यांची भक्तिभावाने स्तुती केली. (३-५)

सन्तुष्टस्तं मुनिं प्राह स्वयम्भूर्वैष्णवोत्तमम् ।
किं प्रष्टुकामस्त्वमसि तद्वदिष्यामि ते मुने ॥६॥

तेव्हा स्वयंभू ब्रह्मदेवांनी प्रसन्न होऊन, वैष्णवांचे अग्रणी असलेल्या श्रीनारद मुनींना म्हटले, "अहो मुनी, तुम्हांला काय विचारावयाचे आहे ? ते सर्व काही मी तुम्हांला सांगतो." (६)

इत्याकर्ण्य वचस्तस्य मुनिर्ब्रह्माणमब्रवीत् ।
त्वत्तः श्रुतं मया सर्वं पूर्वमेव शुभाशुभम् ॥७॥

इदानीमेकमेवास्ति श्रोतव्यं सुरसत्तम ।
तद्रहस्यमपि ब्रूहि यदि तेऽनुग्रहो मयि ॥८॥

ब्रह्मदेवांचे हे वचन ऐकल्यावर नारदांनी ब्रह्मदेवांना म्हटले, "हे देवश्रेष्ठा, शुभ आणि अशुभ कर्मांचे वर्णन हे मी अगोदरच तुमच्याकडून ऐकलेले आहे. आता मला आणखी एकच गोष्ट ऐकावयाची आहे. जर तुमची माझ्यावर कृपा असेल, तर ती गोष्ट जरी गोपनीय असली तरीसुद्धा मला सांगा. (७-८)

प्राप्ते कलियुगे घोरे नराः पुण्यविवर्जिताः ।
दुराचाररताः सर्वे सत्यवार्तापराङ्मुखाः ॥ ९ ॥

भयंकर असे कलियुग आल्यावर, माणसे पुण्य कर्मे करण्याचे सोडून देतील आणि सत्य वचनांकडे पाठ फिरवून दुराचार करण्यास प्रवृत्त होतील. (९)

परापवादनिरताः परद्रव्याभिलाषिणः ।
परस्त्रीसक्तमनसः परहिंसापरायणाः ॥ १० ॥

ते लोक दुसऱ्यांची निंदा करण्यात तत्पर राहतील, इतरांच्या धनाची इच्छा करतील, परस्त्रियांच्या ठिकाणी त्यांचे मन जडेल आणि दुसऱ्यांची हिंसा करण्यास ते तत्पर होतील. (१०)

देहात्मदृष्टयो मूढा नास्तिकाः पशुबुद्धयः ।
मातापितृकृतद्वेषाः स्त्रीदेवाः कामकिङ्कराः ॥ ११ ॥

ते मूढ लोक देहाच्या ठिकाणी आत्मबुद्धी असणारे आणि नास्तिक बनतील. त्यांची बुद्धी पशूप्रमाणे होईल. आणि ते कामाचे गुलाम होऊन स्त्रियांचे भक्त होतील व आपल्या मातापित्यांचा द्वेष करतील. (११)

विप्रा लोभग्रहग्रस्ता वेदविक्रयजीविनः ।
धनार्जनार्थमभ्यस्तविद्या मदविमोहिताः ॥ १२ ॥

ब्राह्मण लोभाने ग्रस्त होतील आणि वेद विकून आपला उदरनिर्वाह करू लागतील; धन मिळविण्यासाठीच ते विद्याभ्यास करतील, आणि (विद्या तसेच आपले ब्राह्मणत्व यांच्या) मदाने ते उन्मत्त होतील. (१२)

त्यक्तस्वजातिकर्माणः प्रायशः परवञ्चकाः ।
क्षत्रियाश्च तथा वैश्याः स्वधर्मत्यागशीलिनः ॥ १३ ॥

तसेच क्षत्रिय आणि वैश्य हेसुद्धा स्वधर्माचा त्याग करणारे बनतील आणि आपली जाति-कर्मे सोडून देऊन, प्रायः दुसऱ्यांना फसविणारेच होतील. (१३)

तद्वच्छूद्राश्च ये केचिद्ब्राह्मणाचारतत्पराः ।
स्त्रियश्च प्रायशो भ्रष्टा भर्त्रवज्ञाननिर्भयाः ॥ १४ ॥

याच प्रमाणे जे शूद्र असतील तेसुद्धा ब्राह्मणांचा आचार करण्यात तत्पर होतील; तसेच स्त्रिया भ्रष्ट आचाराच्या बनतील आणि आपल्या पतीचा अपमान करण्यात त्यांना संकोच वाटणार नाही. (१४)

श्वशुरद्रोहकारिण्यो भविष्यन्ति न संशयः ।
एतेषां नष्टबुद्धीनां परलोकः कथं भवेत् ॥ १५ ॥

त्या आपल्या सासू-सासऱ्यांचा द्वेष करतील, यात शंका नाही. अशा या बुद्धीभ्रष्ट लोकांना कोणत्या प्रकाराने परलोक प्राप्त होईल बरे? (१५)

इति चिन्ताकुलं चित्तं जायते मम सन्ततम् ।
लघूपायेन येनैषां परलोकगतिर्भवेत् ।
तमुपायमुपाख्याहि सर्वं वेत्ति यतो भवान् ॥ १६ ॥

या चिंतेने माझे चित्त निरंतर व्याकूळ होऊन जात आहे. (तेव्हा) ज्या सुलभ उपायाने या लोकांना परलोक प्राप्त होणे शक्य होईल, तो उपाय आपण मला सांगावा. कारण आपण सर्व काही जाणता." (१६)

इत्यृषेर्वाक्यमाकर्ण्य प्रत्युवाचाम्बुजासनः ।
साधु पृष्टं त्वया साधो वक्ष्ये तच्छृणु सादरम् ॥ १७ ॥

देवर्षी नारदांचे हे भाषण ऐकल्यावर कमलासन ब्रह्मदेव म्हणाले, "हे साधू नारदा, तू फार चांगली गोष्ट मला विचारलीस. मी तुला सांगतो, ते तू श्रद्धापूर्वक ऐक. (१७)

पुरा त्रिपुरहन्तारं पार्वती भक्तवत्सला ।
श्रीरामतत्त्वं जिज्ञासुः पप्रच्छ विनयान्विता ॥ १८ ॥

पूर्वी एकदा भक्तवत्सल अशा पार्वतीने श्रीरामांचे तत्त्व जाणण्याच्या इच्छेने त्रिपुराचा नाश करणाऱ्या भगवान शंकरांना विनयपूर्वक प्रश्न केला होता. (१८)

प्रियायै गिरिशस्तस्यै गूढं व्याख्यातवान् स्वयम् ।
पुराणोत्तममध्यात्मरामायणमिति स्मृतम् ॥ १९ ॥

त्या वेळी आपल्या प्रिय पत्नीसाठी श्रीमहादेवांनी स्वतः ज्या रहस्याचे विवेचन केले होते, तेच उत्तम पुराण **अध्यात्म रामायण** या नावाने प्रसिद्ध झाले. (१९)

तत्पार्वती जगद्धात्री पूजयित्वा दिवानिशम् ।
आलोचयन्ती स्वानन्दमग्ना तिष्ठति साम्प्रतम् ॥ २० ॥

प्रचरिष्यति तल्लोके प्राण्यदृष्टवशाद्यदा ।
तस्याध्ययनमात्रेण जना यास्यन्ति सद्गतिम् ॥ २१ ॥

तावद्विजृम्भते पापं ब्रह्महत्यापुरःसरम् ।
यावज्जगति नाध्यात्मरामायणमुदेष्यति ॥ २२ ॥

तावत्कलिमहोत्साहो निःशङ्कं सम्प्रवर्तते ।
यावज्जगति नाध्यात्मरामायणमुदेष्यति ॥ २३ ॥

तावद्यमभटाः शूराः सञ्चरिष्यन्ति निर्भयाः ।
यावज्जगति नाध्यात्मरामायणमुदेष्यति ॥ २४ ॥

तावत्सर्वाणि शास्त्राणि विवदन्ते परस्परम् ॥ २५ ॥

तावत्स्वरूपं रामस्य दुर्बोधं महतामपि ।
यावज्जगति नाध्यात्मरामायणमुदेष्यति ॥ २६ ॥

अध्यात्मरामायणसङ्कीर्तनश्रवणादिजम् ।
फलं वक्तुं न शक्नोमि कार्त्स्न्येन मुनिसत्तम ॥ २७ ॥

तथापि तस्य माहात्म्यं वक्ष्ये किञ्चित्तवानघ ।
शृणु चित्तं समाधाय शिवेनोक्तं पुरा मम ॥ २८ ॥

अध्यात्मरामायणतः श्लोकं श्लोकार्धमेव वा ।
यः पठेद्भक्तिसंयुक्तः स पापान्मुच्यते क्षणात् ॥ २९ ॥

यस्तु प्रत्यहमध्यात्मरामायणमनन्यधीः ।
यथाशक्ति वदेद्भक्त्या स जीवन्मुक्त उच्यते ॥ ३० ॥

यो भक्त्यार्चयतेऽध्यात्मरामायणमतन्द्रितः ।
दिने दिनेऽश्वमेधस्य फलं तस्य भवेन्मुने ॥ ३१ ॥

यदृच्छयापि योऽध्यात्मरामायणमनादरात् ।
अन्यतः शृणुयान्मर्त्यःसोऽपि मुच्येत पातकात् ॥ ३२ ॥

तेव्हापासून त्या अध्यात्मरामायणाचे आदरपूर्वक रात्रंदिवस मनन करीत, जगज्जननी पार्वती आत्मानंदामध्ये नित्य निमग्न राहाते. (२०)

ज्या वेळी प्राण्यांच्या सुदैवाने त्या ग्रंथाचा लोकांमध्ये प्रचार होईल, त्या वेळी त्या ग्रंथाच्या केवळ अध्ययनाने लोकांना शुभगती प्राप्त होईल. (२१)

जोपर्यंत अध्यात्मरामायणाचा प्रादुर्भाव होणार नाही, तोपर्यंतच जगात ब्रह्महत्यादी पापे होत राहतील. (२२)

जोपर्यंत जगात अध्यात्म-रामायणाचा उदय होणार नाही, तोपर्यंत कलियुगाचा महान दुष्प्रभाव निःशंकपणे वाढतच राहील. (२३)

जोपर्यंत जगात अध्यात्मरामायण प्रकट होणार नाही, तोपर्यंत यमराजाचे शूर दूत या जगात निर्भयपणे संचार करीत राहतील. (२४)

आणि जोपर्यंत या जगात अध्यात्मरामायणाचा प्रकाश पडणार नाही, तोपर्यंत सर्व शास्त्रांमध्ये परस्पर वाद-विवाद चालू राहतील आणि तोपर्यंत महापुरुषांनासुद्धा भगवान श्रीरामांचे स्वरूप दुर्बोध राहील. (२५-२६)

हे मुनिश्रेष्ठ नारदा, अध्यात्मरामायणाचे कीर्तन आणि श्रवण इत्यादींमुळे प्राप्त होणाऱ्या फळाचे संपूर्ण वर्णन मी करू शकत नाही. तथापि, हे निष्पाप नारदा, मी तुला त्याचे थोडेसे माहात्म्य ऐकवितो. ते मला पूर्वी शिवांनी सांगितले होते. तू सावधान होऊन ऐक. (२७-२८)

जो पुरुष अध्यात्मरामायणाचा एक किंवा अर्धा श्लोकसुद्धा भक्तिपूर्वक वाचतो तो तत्क्षणी पापातून मुक्त होऊन जातो. (२९)

जो माणूस हे अध्यात्मरामायण दररोज अनन्य बुद्धीने भक्तिपूर्वक आपल्या शक्तीनुसार इतरांना ऐकवतो, तो जीवन्मुक्त म्हटला जातो. (३०)

हे नारद मुनी, आळस टाकून देऊन जो मनुष्य भक्तिभावाने प्रत्येक दिवशी अध्यात्मरामायणाचे पूजन करतो, त्याला अश्वमेध यज्ञाचे फळ मिळते. (३१)

एखादा माणूस योगायोगाने अध्यात्मरामायणाच्या पठनाच्या जागी पोचला व त्याला त्याविषयी आदर नसूनही त्याने ते दुसऱ्याकडून ऐकले तरी तोही पातकांतून मुक्त होऊन जातो. (३२)

नमस्करोति योऽध्यात्मरामायणमदूरतः ।
सर्वदेवार्चनफलं स प्राप्नोति न संशयः ॥ ३३ ॥

लिखित्वा पुस्तकेऽध्यात्मरामायणमशेषतः ।
यो दद्याद्रामभक्तेभ्यस्तस्य पुण्यफलं शृणु ॥ ३४ ॥

अधीतेषु च वेदेषु शास्त्रेषु व्याकृतेषु च ।
यत्फलं दुर्लभं लोके तत्फलं तस्य सम्भवेत् ॥ ३५ ॥

एकादशीदिनेऽध्यात्मरामायणमुपोषितः ।
यो रामभक्तः सदसि व्याकरोति नरोत्तमः ॥ ३६ ॥

तस्य पुण्यफलं वक्ष्ये शृणु वैष्णवसत्तम ।
प्रत्यक्षरं तु गायत्रीपुरश्चर्याफलं भवेत् ॥ ३७ ॥

उपवासव्रतं कृत्वा श्रीरामनवमीदिने ।
रात्रौ जागरितोऽध्यात्मरामायणमनन्यधीः ।
यः पठेच्छृणुयाद्वापि तस्य पुण्यं वदाम्यहम् ॥ ३८ ॥

कुरुक्षेत्रादिनिखिलपुण्यतीर्थेष्वनेकशः ।
आत्मतुल्यं धनं सूर्यग्रहणे सर्वतोमुखे ॥ ३९ ॥

विप्रेभ्यो व्याससतुल्येभ्यो दत्त्वा यत्फलमश्नुते ।
तत्फलं सम्भवेत्तस्य सत्यं सत्यं न संशयः ॥ ४० ॥

यो गायते मुदाध्यात्मरामायणमहर्निशम् ।
आज्ञां तस्य प्रतीक्षन्ते देवा इन्द्रपुरोगमाः ॥ ४१ ॥

पठन्प्रत्यहमध्यात्मरामायणमनुव्रतः ।
यद्यत्करोति तत्कर्म ततः कोटिगुणं भवेत् ॥ ४२ ॥

तत्र श्रीरामहृदयं यः पठेत्सुसमाहितः ।
स ब्रह्मघ्नोऽपि पूतात्मा त्रिभिरेव दिनैर्भवेत् ॥ ४३ ॥

श्रीरामहृदयं यस्तु हनूमत्प्रतिमान्तिके ।
त्रिःपठेत्प्रत्यहं मौनी स सर्वेप्सितभाग्भवेत् ॥ ४४ ॥

जो कोणी अध्यात्मरामायणाच्या जवळ जाऊन त्याला नमस्कार करतो, त्याला सर्व देवतांची पूजा केल्याचे फळ मिळते, यात शंका नाही. (३३)

जो पुरुष अध्यात्म-रामायणाचे संपूर्ण पुस्तक लिहून काढून ते रामभक्तांना देतो, त्याला जे पुण्य प्राप्त होते, त्याचे फळ ऐक. (३४)

त्या माणसाला असे फळ मिळते की ते वेदांच्या अध्ययनाने आणि शास्त्रांचे विवेचन करण्यानेसुद्धा या जगात दुर्लभ आहे. (३५)

हे वैष्णवश्रेष्ठा, जो रामभक्त नरश्रेष्ठ एकादशीचे दिवशी उपवास करून, सभेमध्ये अध्यात्मरामायणाचे विवेचन करतो, त्याच्या पुण्याचे फळ मी तुला सांगतो, ते ऐक. अध्यात्म-रामायणातील एकेक अक्षर वाचल्यामुळे त्याला गायत्री-पुरश्चरण केल्याचे फळ मिळते. (३६- ३७)

श्रीरामनवमीच्या दिवशी निराहार राहून आणि रात्री जागरण करून, जो पुरुष अनन्य बुद्धीने अध्यात्म रामायण वाचतो अथवा ऐकतो, त्याचे पुण्य आता मी तुला सांगतो. (३८)

कुरुक्षेत्र इत्यादी सर्व पवित्र तीर्थांचे ठिकाणी, सूर्याच्या खग्रास ग्रहणाचे वेळी, व्यासांसारख्या ब्राह्मणांना अनेकदा एखाद्या पुरुषाने आपल्या अत्यंत प्रिय वस्तू व यथाशक्ती धन दान देण्यामुळे जे फळ मिळते तेच फळ त्याला मिळते, यात मुळीच संशय नाही हे संपूर्णपणे सत्य आहे. (३९-४०)

जो मनुष्य रात्रंदिवस प्रसन्न चित्ताने अध्यात्म-रामायणाचे गायन करतो, त्याच्या आज्ञेची प्रतीक्षा इंद्र इत्यादी देवसमूहही करीत राहतात. (४१)

दररोज नियमपूर्वक अध्यात्मरामायणाचे पठण करीत एखादा माणूस जे काही पुण्यकर्म करतो, ते कोटीपट होते. (४२)

या अध्यात्मरामायणातील श्रीरामहृदयाचेपठन जो कोणी मनुष्य चांगल्याप्रकारे एकाग्र होऊन करतो, तो जरी ब्रह्महत्या करणारा असला तरीसुद्धा तीन दिवसांत पवित्र होऊन जातो. (४३)

हनुमानांच्या प्रतिमेजवळ जो पुरुष प्रतिदिवशी मौन धारण करून तीन वेळा श्रीरामहृदयाचे पठन करतो, तो सर्व इच्छित फळ प्राप्त करून घेतो. (४४)

पठन् श्रीरामहृदयं तुलस्यश्वत्थयोर्यदि ।
प्रत्यक्षरं प्रकुर्वीत ब्रह्महत्यानिवर्तनम् ॥ ४५ ॥

तसेच तुळशीच्या किंवा पिंपळ वृक्षाच्याजवळ जर एखादा मनुष्य श्रीरामहृदयाचे पठन करील तर तो प्रत्येक अक्षराबरोबर ब्रह्महत्येसारखी आपली पापे दूर करील. (४५)

श्रीरामगीतामाहात्म्यं कृत्स्नं जानाति शङ्करः ।
तदर्धं गिरिजा वेत्ति तदर्धं वेद्म्यहं मुने ॥ ४६ ॥

हे नारद मुनी, (अध्यात्म रामायणातील) श्रीराम गीतेचे महत्त्व फक्त महादेवच पूर्णपणे जाणतात; त्याच्या अर्धे माहात्म्य पार्वती जाणते आणि त्याच्याही अर्धे माहात्म्य मी जाणतो. (४६)

तत्ते किञ्चित्प्रवक्ष्यामि कृत्स्नं वक्तुं न शक्यते ।
यज्ज्ञात्वा तत्क्षणाल्लोकश्चित्तशुद्धिमवाप्नुयात् ॥ ४७ ॥

ते माहात्म्यही पूर्णपणे मला सांगता येणे शक्य नाही. म्हणून मी जाणतो त्यातील थोडेसे माहात्म्य मी तुला सांगतो. ते जाणल्यामुळे त्याच क्षणी माणसाचे चित्त शुद्ध होऊन जाते. (४७)

श्रीरामगीता यत्पापं न नाशयति नारद ।
तन्न नश्यति तीर्थादौ लोके क्वापि कदाचन ।
तन्न पश्याम्यहं लोके मार्गमाणोऽपि सर्वदा ॥ ४८ ॥

हे नारदा, या श्रीरामगीतेचे पठन केल्यामुळे जे पाप नाहीसे होत नाही, ते या जगात कोणत्याही तीर्थक्षेत्रादिकांमध्ये नष्ट होऊ शकत नाही. श्रीरामगीतापठनाने नाहीसे न होणारे पाप मला शोधूनही आढळले नाही. (४८)

रामेणोपनिषत्सिन्धुमुन्मथ्योत्पादितां मुदा ।
लक्ष्मणायार्पितां गीतासुधां पीत्वामरो भवेत् ॥ ४९ ॥

भगवान श्रीरामांनी उपनिषद-सागराचे मंथन करून जे गीतामृत काढून मोठ्या प्रसन्नतेने लक्ष्मणाला दिले, त्याचे पान करून माणूस अमर होतो. (४९)

जमदग्निसुतः पूर्वं कार्तवीर्यवधेच्छया ।
धनुर्विद्यामभ्यसितुं महेशस्यान्तिके वसन् ॥ ५० ॥

पूर्वी सहस्त्रार्जुनाच्या वधाच्या इच्छेने जमदग्नि-नंदन परशुराम हा धनुर्विद्येचा अभ्यास करण्यासाठी श्रीमहादेवांच्या जवळ राहात होता. (५०)

अधीयमानां पार्वत्या रामगीतां प्रयत्नतः ।
श्रुत्वा गृहीत्वाशु पठन्नारायणकलामगात् ॥ ५१ ॥

त्यावेळी रामगीतेचे अध्ययन करणाऱ्या पार्वतीकडून ही रामगीता श्रद्धेने प्रयत्नपूर्वक ऐकून व ती लगेचच ग्रहण करून, तिचे पठन करता करता तो श्रीनारायणांचा अंशरूप अवतार झाला. (५१)

ब्रह्महत्यादिपापानां निष्कृतिं यदि वाञ्छति ।
रामगीतां मासमात्रं पठित्वा मुच्यते नरः ॥ ५२ ॥

जर कुणी पुरुष ब्रह्महत्या इत्यादी घोर पापांतून सुटका व्हावी अशी इच्छा करीत असेल, तर केवळ एक महिनाभर रामगीतेचे पठन करून तो त्या पापातून सुटू शकतो. (५२)

दुष्प्रतिग्रहदुर्भोज्यदुरालापादिसम्भवम् ।
पापं यत्तत्कीर्तनेन रामगीता विनाशयेत् ॥ ५३ ॥

निषिद्ध दान घेणे, निषिद्ध भोजन करणे आणि खोटे भाषण करणे इत्यादींमुळे जे पाप निर्माण होते, ते रामगीता पठनाने नष्ट करून टाकते. (५३)

शालग्रामशिलाग्रे च तुलस्यश्वत्थसन्निधौ ।
यतीनां पुरतस्तद्वद्रामगीतां पठेत्तु यः ॥ ५४ ॥

स तत्फलमवाप्नोति यद्वाचोऽपि न गोचरम् ॥ ५५ ॥

शालिग्राम शिलेपुढे, तुळस किंवा अश्वत्थ यांच्या सांनिध्यात अथवा यती लोकांच्या पुढे जो कोणी माणूस रामगीतेचे पठन करतो, त्याला वाणीने वर्णनही करता येणार नाही, असे फळ मिळते. (५४-५५)

रामगीतां पठन्भक्त्या यः श्राद्धे भोजयेद् द्विजान् ।
तस्य ते पितरः सर्वे यान्ति विष्णोः परं पदम् ॥ ५६ ॥

श्राद्धामध्ये भक्तिपूर्वक रामगीतेचे पठन करून जो माणूस ब्राह्मणांना भोजन घालतो, त्याचे सर्व पितर भगवान विष्णूंच्या परम धामाप्रत जातात. (५६)

ॐ

# अध्यात्मरामायण

## बालकाण्ड

## प्रथम सर्ग

### श्रीरामहृदय

यः पृथ्वीभरवारणाय दिविजैः
संप्रार्थितश्चिन्मयः
संजातः पृथिवीतले रविकुले
मायामनुष्योऽव्ययः ।
निश्चक्रं हतराक्षसः पुनरगाद्
ब्रह्मत्वमाद्यं स्थिरां
कीर्तिं पापहरां विधाय जगतां
तं जानकीशं भजे ॥ १ ॥
विश्वोद्भवस्थितिलयादिषु हेतुमेकं
मायाश्रयं विगतमायमचिन्त्यमूर्तिम् ।
आनन्दसान्द्रममलं निजबोधरूपं
सीतापतिं विदिततत्त्वमहं नमामि ॥ २ ॥
पठन्ति ये नित्यमनन्यचेतसः
शृण्वन्ति चाध्यात्मिकसंज्ञितं शुभम् ।
रामायणं सर्वपुराणसंमतं
निर्धूतपापा हरिमेव यान्ति ते ॥ ३ ॥
अध्यात्मरामायणमेव नित्यं
पठेद्यदीच्छेद्भवबन्धमुक्तिम् ।
गवां सहस्त्रायुतकोटिदानात्
फलं लभेद्यः शृणुयात्स नित्यम् ॥ ४ ॥

पुरारिगिरिसंभूता श्रीरामार्णवसङ्गता ।
अध्यात्मरामगङ्गेयं पुनाति भुवनत्रयम् ॥ ५ ॥

देवतांच्या प्रार्थनेनुसार पृथ्वीचा भार दूर करण्यासाठी, ज्या चिन्मय अविनाशी प्रभूंनी पृथ्वीतलावर सूर्यवंशामध्ये माया-मानव-रूपाने अवतार घेतला आणि ज्यांनी सर्व राक्षसांना मारून जगातील पापे नाहीशी करणारी व सुस्थिर अशी आपली कीर्ती प्रस्थापित केली, आणि मग जे आपल्या आद्य ब्रह्मस्वरूपात लीन होऊन गेले, त्या श्रीजानकीनाथांचे मी भजन करतो. (१)

विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय इत्यादींचे जे एकमात्र कारण आहेत, ते मायापती आहेत, म्हणून माया त्यांच्या आश्रयाला आहे. जे स्वतः मायातीत आहेत, अचिंत्य-स्वरूप आहेत, आनंदघन आहेत, जे निर्मळ आहेत, जे रागादी दोषांनी रहित आहेत, तसेच जे स्वतः ज्ञानस्वरूप आहेत, त्या तत्त्व जाणणाऱ्या सीतापती श्रीरामांना मी नमस्कार करतो. (२)

सर्व पुराणांना मान्य, पवित्र आणि **अध्यात्म** हे नाव असणाऱ्या रामायणाचे म्हणजे **अध्यात्मरामायणाचे** नित्य पठन जे कोणी एकाग्र मनाने करतात किंवा त्याचे श्रवण करतात, ते लोक पाप-रहित होऊन श्रीहरीलाच प्राप्त होतात. (३)

जर कुणाला संसाराच्या बंधनातून सुटून जाण्याची इच्छा असेल तर त्याने अध्यात्म-रामायणाचेच पठन नित्य करावे. जो कुणी मनुष्य या अध्यात्मरामायणाचे नित्य श्रवण करतो, त्याला लक्षावधी गाई दान केल्याचे फळ प्राप्त होते . (४)

श्रीशंकररूपी पर्वतात उगम पावलेली, श्रीरामरूप समुद्राला मिळणारी ही अध्यात्म-रामायणरूपी गंगा तिन्ही लोकांना पवित्र करणारी आहे. (५)

एकादश्यां निराहारो नियतो द्वादशीदिने ।
स्थित्वागस्त्यतरोर्मूले रामगीतां पठेत्तु यः ।
स एव राघवः साक्षात्सर्वदेवैश्च पूज्यते ॥ ५७॥

एकादशीच्या दिवशी निराहार आणि जितेंद्रिय राहून जो कोणी पुरुष द्वादशीच्या दिवशी अगस्त्य वृक्षाच्या खाली बसून रामगीतेचे पठन करतो, तो साक्षात रामरूपच होय. सर्व देवही त्याची पूजा करतात. (५७)

विना दानं विना ध्यानं विना तीर्थावगाहनम् ।
रामगीतां नरोऽधीत्य तदनन्तफलं लभेत् ॥ ५८॥

दान न देता, ध्यान न करता किंवा तीर्थस्नान न करताही जर एखाद्या माणसाने रामगीतेचे अध्ययन केले तर त्याला त्याचे अनंतपटीने फळ मिळते. (५८)

बहुना किमिहोक्तेन शृणु नारद तत्त्वतः ।
श्रुतिस्मृतिपुराणेतिहासागमशतानि च ।
अर्हन्ति नाल्पमध्यात्मरामायणकलामपि ॥ ५९॥

हे नारदा, या बाबतीत आणखी जास्त काय सांगावे? खरे पाहता, श्रुती, स्मृती, पुराणे, इतिहास इत्यादी शेकडो शास्त्रे ही अध्यात्म-रामायणाच्या एखाद्या अल्प अंशाचीही बरोबरी करू शकत नाहीत." (५९)

अध्यात्मरामचरितस्य मुनीश्वराय
माहात्म्यमेतदुदितं कमलासनेन ।
यः श्रद्धया पठति वा शृणुयात्स मर्त्यः
प्राप्नोति विष्णुपदवीं सुरपूज्यमानः ॥ ६०॥

अध्यात्मरामायणाचे हे माहात्म्य ब्रह्मदेवांनी मुनिराज नारदाला सांगितले आहे. जो माणूस हे श्रद्धापूर्वक वाचतो अथवा ऐकतो, तो देवांकडून पूजिला जाऊन, श्रीविष्णूंचे पद प्राप्त करून घेतो. (६०)

इति श्रीब्रह्माण्डपुराणे उत्तरखण्डेऽध्यात्मरामायणमाहात्म्यं संपूर्णम् ॥

कैलासाग्रे कदाचिद्रविशतविमले
मन्दिरे रत्नपीठे
संविष्टं ध्याननिष्ठं त्रिनयनमभयं
सेवितं सिद्धसंघैः ।
देवी वामाङ्कसंस्था गिरिवरतनया
पार्वती भक्तिनम्रा
प्राहेदं देवमीशं सकलमलहरं
वाक्यमानन्दकन्दम् ॥ ६ ॥

एकदा कैलास पर्वताच्या शिखरावरील, शेकडो सूर्याप्रमाणे प्रकाशमान व शुभ्र अशा मंदिरात, रत्नाच्या सिंहासनावर ध्याननिष्ठ होऊन बसलेल्या, सिद्धांच्या समूहाने सेविलेल्या, निर्भय, सर्व पापांचे हरण करणाऱ्या, आनंदकंद असणाऱ्या, अशा जगन्नियंत्या देवाधिदेव भगवान त्रिनयन शंकरांना, त्यांच्याच डाव्या मांडीवर विराजमान असणारी गिरिराजकुमारी श्रीपार्वती भक्तिभावाने नम्रतापूर्वक असे म्हणाली. (६)

*श्रीपार्वत्युवाच*

नमोऽस्तु ते देव जगन्निवास
सर्वात्मदृक् त्वं परमेश्वरोऽसि ।
पृच्छामि तत्त्वं पुरुषोत्तमस्य
सनातनं त्वं च सनातनोऽसि ॥ ७ ॥

**श्रीपार्वती म्हणाली** – हे देवा, हे जगन्निवासा, तुम्हांला नमस्कार असो. सर्व अंत:करणांचे साक्षी आणि परमेश्वर तुम्ही आहात. श्रीपुरुषोत्तम भगवंतांचे सनातन तत्त्व मी तुम्हांला विचारू इच्छिते; कारण तुम्हीसुद्धा सनातन आहात. (७)

गोप्यं यदत्यन्तमनन्यवाच्यं
वदन्ति भक्तेषु महानुभावाः ।
तदप्यहोऽहं तव देव भक्ता
प्रियोऽसि मे त्वं वद यत्तु पृष्टम् ॥ ८ ॥

जो विषय अत्यंत गोपनीय असतो आणि जो विषय अन्य कुणालाही सांगण्यास योग्य नसतो, असा विषयसुद्धा महानुभाव लोक आपल्या भक्तांना सांगतात. हे देवा, मीसुद्धा तुमची भक्त आहे आणि तुम्हीसुद्धा मला अत्यंत प्रिय आहात. म्हणून मी जे काही तुम्हांला विचारलेले आहे ते तुम्ही मला वर्णन करून सांगा. (८)

ज्ञानं सविज्ञानमथानुभक्ति-
वैराग्ययुक्तं च मितं विभास्वत् ।
जानाम्यहं योषिदपि त्वदुक्तं
यथा तथा ब्रूहि तरन्ति येन ॥ ९ ॥

ज्या ज्ञानाने या जगातील मनुष्य संसारसागरातून तरून जातात, ते भक्ती आणि वैराग्य यांनी परिपूर्ण असलेले प्रकाशमय विज्ञानासहित आत्मज्ञान तुम्ही मला अशा रीतीने थोडक्यात सांगा की त्यामुळे मी स्त्री असले तरी मला ते सहज कळेल. (९)

पृच्छामि चान्यच्च परं रहस्यं
तदेव चाग्रे वद वारिजाक्ष ।
श्रीरामचन्द्रेऽखिललोकसारे
भक्तिर्दृढा नौर्भवति प्रसिद्धा ॥ १० ॥

हे कमलनयना, आणखी एक परम रहस्य मी तुम्हांला विचारत आहे. तुम्ही ते मला आधी सांगावे. सर्व लोकांचे सारभूत असणाऱ्या अशा श्रीरामचंद्रांच्या ठायी दृढ भक्ती ही संसार- सागर तरून जाण्यासाठी प्रसिद्ध बळकट नौका आहे. (१०)

भक्तिः प्रसिद्धा भवमोक्षणाय
नान्यत्ततः साधनमस्ति किञ्चित् ।
तथापि हृत्संशयबन्धनं मे
विभेत्तुमर्हस्यमलोक्तिभिस्त्वम् ॥ ११ ॥

संसारातून सुटण्यासाठी भक्ती ही प्रसिद्ध असा उपाय आहे. तिच्यापेक्षा श्रेष्ठ असे दुसरे कोणतेही साधन नाही. तरीसुद्धा माझ्या हृदयातील संशयाची गाठ आपण आपल्या विशुद्ध वचनांनी तोडून टाकावी. (११)

वदन्ति रामं परमेकमाद्यं
निरस्तमायागुणसंप्रवाहम् ।
भजन्ति चाहर्निशमप्रमत्ताः
परं पदं यान्ति तथैव सिद्धाः ॥ १२ ॥

श्रीरामचंद्र हे परम, अद्वितीय, सर्वांचे आद्य कारण आणि मायेच्या गुणांच्या प्रवाहाच्या पलीकडे आहेत, असे भक्तीमध्ये दक्ष असणारे सिद्धगण सांगतात. तसेच त्यांचे अहर्निश भजन करून ते परम पदसुद्धा प्राप्त करून घेतात. (१२)

वदन्ति केचित्परमोऽपि रामः
स्वाविद्यया संवृतमात्मसंज्ञम् ।
जानाति नात्मानमतः परेण
सम्बोधितो वेद परात्मतत्त्वम् ॥ १३ ॥
यदि स्म जानाति कुतो विलापः
सीताकृतेऽनेन कृतः परेण ।
जानाति नैवं यदि केन सेव्यः
समो हि सर्वैरपि जीवजातैः ॥ १४ ॥
अत्रोत्तरं किं विदितं भवद्भि-
स्तद्ब्रूत मे संशयभेदि वाक्यम् ॥ १५ ॥

*श्रीमहादेव उवाच*

धन्यासि भक्तासि परात्मनस्त्वं
यज्ज्ञातुमिच्छा तव रामतत्त्वम् ।
पुरा न केनाप्यभिचोदितोऽहं
वक्तुं रहस्यं परमं निगूढम् ॥ १६ ॥
त्वयाद्य भक्त्या परिनोदितोऽहं
वक्ष्ये नमस्कृत्य रघूत्तमं ते ।
रामः परात्मा प्रकृतेरनादि-
रानन्द एकः पुरुषोत्तमो हि ॥ १७ ॥
स्वमायया कृत्स्नमिदं हि सृष्ट्वा
नभोवदन्तर्बहिरास्थितो यः ।
सर्वान्तरस्थोऽपि निगूढ आत्मा
स्वमायया सृष्टमिदं विचष्टे ॥ १८ ॥
जगन्ति नित्यं परितो भ्रमन्ति
यत्सन्निधौ चुम्बकलोहवद्धि ।
एतन्न जानन्ति विमूढचित्ताः
स्वाविद्यया संवृतमानसा ये ॥ १९ ॥
स्वाज्ञानमप्यात्मनि शुद्धबुद्धे
स्वारोपयन्तीह निरस्तमाये ।
संसारमेवानुसरन्ति ते वै
पुत्रादिसक्ताः पुरुकर्मयुक्ताः ॥ २० ॥
जानन्ति नैवं हृदये स्थितं वै
चामीकरं कण्ठगतं यथाऽज्ञाः ।
यथाऽप्रकाशो न तु विद्यते रवौ
ज्योतिःस्वभावे परमेश्वरे तथा ।

तथापि काही लोक असे म्हणतात की जरी राम परमपुरुष असले तरीसुद्धा ते स्वतःच्या मायेने झाकले गेल्यामुळे आत्मस्वरूप जाणत नव्हते. म्हणून वसिष्ठ इत्यादी दुसऱ्यांच्या उपदेशामुळे त्यांना श्रेष्ठ असे आत्मतत्त्व कळले. (१३)

आता माझा प्रश्न असा की जर राम आत्मतत्त्व जाणत होते, तर त्या परमात्म्यांनी सीतेसाठी इतका विलाप का बरे केला ? याउलट जर त्यांना आत्मज्ञान नव्हते असे समजावे तर ते इतर सर्व सामान्य जीवाप्रमाणेच झाले. अशा स्थितीत कुणी कशासाठी त्यांचे भजन करावे? या विषयी तुमचे काय म्हणणे आहे? माझा संशय दूर होईल, अशा रीतीने ते आपण मला सांगा. (१४-१५)

**श्रीमहादेव म्हणाले**– हे देवी, तू धन्य आहेस. तू परमात्म्याची भक्त आहेस. म्हणूनच तुला रामांचे तत्त्व जाणून घेण्याची इच्छा झाली आहे. ते परम निगूढ रहस्य यापूर्वी मला कुणीही विचारले नव्हते. (१६)

आज भक्तिपूर्वक तू मला प्रश्न केला आहेस. म्हणून रघूत्तमांना वंदन करून मी तुला ते रहस्य सांगतो. श्रीरामचंद्र हे निःसंदेहपणे प्रकृतीच्या पलीकडील परमात्मा, अनादी, आनंदघन, अद्वितीय असे पुरुषोत्तम आहेत. (१७)

कारण ते स्वतःच्या मायेनेच हे संपूर्ण जग निर्माण करून, आकाशाप्रमाणे त्या जगाच्या आत व बाहेर व्याप्त आहेत, तसेच तेच आत्मरूपाने सर्वांच्या अंतःकरणात गुप्तरूपाने राहातात, त्यांनी स्वतःच्या मायेने निर्माण केलेले हे जग चालविलेले आहे. (१८)

चुंबक जवळ असताना ज्याप्रमाणे जड लोखंडात गती उत्पन्न होते, त्याचप्रमाणे त्यांच्या केवळ सांनिध्याने सगळीकडे हे सर्व विश्व सदा भ्रमण करीत राहते. स्वतःच्या अज्ञानामुळे ज्यांचे मन झाकले गेले आहे आणि ज्यांचे चित्त मूढ झालेले आहे असे लोक ही गोष्ट जाणू शकत नाहीत. (१९)

या जगात त्या मायातीत, शुद्ध, बुद्ध अशा परमात्म्यावरसुद्धा आपल्या अज्ञानाचा आरोप जे कोणी करतात म्हणजे परमात्म्यालासुद्धा आपल्याप्रमाणे अज्ञानी मानतात, ते अज्ञानी जीव नेहमी पुत्र इत्यादींच्या ठिकाणी आसक्त राहून आणि अनेक कर्मांत गढून जाऊन संसार-चक्रातच अडकून राहतात. (२०)

ज्या प्रमाणे अज्ञानी लोक आपल्या गळ्यातच असणारा कंठा जाणत नाहीत, त्या प्रमाणे ते अज्ञ जन आपल्याच हृदयात असणाऱ्या परमात्म्या रामांना जाणत नाहीत (म्हणूनच ते त्यांच्यावर अज्ञान इत्यादींचा आरोप करतात). वास्तविक पाहता ज्याप्रमाणे ज्योतिःस्वरूप सूर्याचे

विशुद्धविज्ञानघने रघूत्तमे-
ऽविद्या कथं स्यात्परतः परात्मनि ॥ २१ ॥
यथा हि चाक्ष्णा भ्रमता गृहादिकं
विनष्टदृष्टेर्भ्रमतीव दृश्यते ।
तथैव देहेन्द्रियकर्तुरात्मनः
कृतं परेऽध्यस्य जनो विमुह्यति ॥ २२ ॥
नाहो न रात्रिः सवितुर्यथा भवेत्
प्रकाशरूपाव्यभिचारतः क्वचित् ।
ज्ञानं तथाऽज्ञानमिदं द्वयं हरौ
रामे कथं स्थास्यति शुद्धचिद्घने ॥ २३ ॥
तस्मात्परानन्दमये रघूत्तमे
विज्ञानरूपे हि न विद्यते तमः ।
अज्ञानसाक्षिण्यरविन्दलोचने
मायाश्रयत्वान्न हि मोहकारणम् ॥ २४ ॥

अत्र ते कथयिष्यामि रहस्यमपि दुर्लभम् ।
सीतासाममरुत्सूनुसंवादं मोक्षसाधनम् ॥ २५ ॥

पुरा रामायणे रामो रावणं देवकण्टकम् ।
हत्वा रणे रणश्लाघी सपुत्रबलवाहनम् ॥ २६ ॥

सीतया सह सुग्रीवलक्ष्मणाभ्यां समन्वितः ।
अयोध्यामगमद्रामो हनूमत्प्रमुखैर्वृतः ॥ २७ ॥

अभिषिक्तः परिवृतो वसिष्ठाद्यैर्महात्मभिः ।
सिंहासने समासीनः कोटिसूर्यसमप्रभः ॥ २८ ॥

दृष्ट्वा तदा हनूमन्तं प्राञ्जलिं पुरतः स्थितम् ।
कृतकार्यं निराकाङ्क्षं ज्ञानापेक्षं महामतिम् ॥ २९ ॥

रामः सीतामुवाचेदं ब्रूहि तत्त्वं हनूमते ।
निष्कल्मषोऽयं ज्ञानस्य पात्रं नौ नित्यभक्तिमान् ॥ ३० ॥

तथेति जानकी प्राह तत्त्वं रामस्य निश्चितम् ।
हनूमते प्रपन्नाय सीता लोकविमोहिनी ॥ ३१ ॥

ठिकाणी अंधार कधीही असत नाही, त्याप्रमाणे प्रकृती इत्यादींच्या पलीकडे असणाऱ्या, विशुद्ध, विज्ञानघन, ज्योतिःस्वरूप परमेश्वर असणाऱ्या अशा परमात्म्या श्रीरामांचे ठायी अविद्या कशी बरे राहू शकेल? (२१)

ज्या प्रमाणे डोळे गरगर फिरवले असता दृष्टिदोषामुळे घर वगैरे फिरल्यासारखे वाटते, त्याप्रमाणे देह-इंद्रियांच्या द्वारा अंतःकरणाने केलेल्या कर्माचा परमात्म्यावर आरोप करून लोक मोहित होतात. (स्वतःच्या भावनांचा आरोप लोक परमात्म्यावर करतात.) (२२)

सूर्याच्या प्रकाश-रूपाचा नाश कधी होत नसल्याने, ज्या प्रमाणे सूर्याच्या बाबतीत दिवस आणि रात्र असा भेद होत नाही, त्याप्रमाणे शुद्ध, चेतनघन अशा हरिरूप रामांच्या ठिकाणी ज्ञान किंवा अज्ञान या दोन गोष्टी कशा बरे राहू शकतील? (२३)

म्हणून परानंदस्वरूप, विज्ञानरूप व अज्ञानाचा साक्षी असणाऱ्या अशा कमलनयन भगवान रामांच्या ठायी अज्ञानाचा लेशसुद्धा असत नाही. कारण ते मायेचे अधिष्ठान आहेत; म्हणून ती माया श्रीरामांना मोहित करू शकत नाही. (२४)

हे पार्वती, या बाबतीत मी तुला सीता, राम आणि पवनपुत्र हनुमान यांचा मोक्षाचे साधन-स्वरूप असणारा संवाद अत्यंत गोपनीय आणि परम दुर्लभ असला तरी सांगतो. (२५)

पूर्वी रामावताराच्या वेळी, देवांचा शत्रू असणाऱ्या रावणाला त्याची संताने, सैन्ये आणि वाहने यांच्यासह युद्धकुशल श्रीरामांनी युद्धात मारले आणि सीता, सुग्रीव तसेच लक्ष्मण यांच्यासह व हनुमान इत्यादी मुख्य वानरांसह श्रीराम अयोध्या नगरीत परत आले. (२६-२७)

तेथे त्यांच्यावर राज्याभिषेक झाला. नंतर वसिष्ठ इत्यादी महात्म्यांसमवेत कोट्यवधी सूर्यांची प्रभा असणारे श्रीराम सिंहासनावर विराजमान झाले. (२८)

त्या वेळी कृतकृत्य झाल्यामुळे निरपेक्ष असलेल्या व केवळ ज्ञानाची अपेक्षा करणाऱ्या महाबुद्धिवान हनुमंताला हात जोडून पुढे उभा असलेला पाहून, श्रीरामचंद्रांनी सीतेला म्हटले, "सीते, या हनुमानाची आपणा दोघांवर अढळ भक्ती आहे आणि तो पापरहित आहे आणि म्हणूनच तो ज्ञानाचा स्वीकार करण्यास पात्र आहे, म्हणून तू या हनुमानाला माझ्या खऱ्या स्वरूपाचा उपदेश कर." (२९-३०)

तेव्हा लोकांना मोहित करणारी जनककन्या सीता "ठीक आहे," असे म्हणाली. नंतर ती शरणागत हनुमंताला भगवान श्रीरामांचे निश्चित तत्त्व सांगू लागली. (३१)

श्रीसीता उवाच

रामं विद्धि परं ब्रह्म सच्चिदानन्दमद्वयम्।
सर्वोपाधिविनिर्मुक्तं सत्तामात्रमगोचरम् ॥ ३२॥

आनन्दं निर्मलं शान्तं निर्विकारं निरञ्जनम्।
सर्वव्यापिनमात्मानं स्वप्रकाशमकल्मषम् ॥ ३३॥

**श्रीसीता म्हणाली** – "वत्स हनुमाना, राम हे साक्षात अद्वितीय सच्चिदानंदघन परब्रह्म आहेत, असे तू समज. ते सर्व उपाधींनी रहित, केवळ सत्ता हे स्वरूप असणारे, मन व इंद्रिये यांचा विषय नसणारे, आनंदघन, निर्मळ, शांत व विकाररहित, निरंजन, सर्वव्यापक, स्वयंप्रकाशी आणि रागादी दोषरहित परमात्मा आहेत. (३२-३३)

मां विद्धि मूलप्रकृतिं सर्गस्थित्यन्तकारिणीम्।
तस्य सन्निधिमात्रेण सृजामीदमतन्द्रिता ॥ ३४॥

आणि विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि अंत करणारी मूल प्रकृती मी आहे हे तू समजून घे आणि त्या श्रीरामांच्या केवळ सान्निध्यामुळे मी निरलसपणे हे विश्व उत्पन्न करते. (३४)

तत्सान्निध्यान्मया सृष्टं तस्मिन्नारोप्यतेऽबुधैः।
अयोध्यानगरे जन्म रघुवंशेऽतिनिर्मले ॥ ३५॥

विश्वामित्रसहायत्वं मखसंरक्षणं ततः।
अहल्याशापशमनं चापभङ्गो महेशितुः ॥ ३६॥

मत्पाणिग्रहणं पश्चाद्भार्गवस्य मदक्षयः।
अयोध्यानगरे वासो मया द्वादशवार्षिकः ॥ ३७॥

दण्डकारण्यगमनं विराधवध एव च।
मायामारीचमरणं मायासीताहृतिस्तथा ॥ ३८॥

जटायुषो मोक्षलाभः कबन्धस्य तथैव च।
शबर्याः पूजनं पश्चात्सुग्रीवेण समागमः ॥ ३९॥

वालिनश्च वधः पश्चात्सीतान्वेषणमेव च।
सेतुबन्धश्च जलधौ लंकायाश्च निरोधनम् ॥ ४०॥

रावणस्य वधो युद्धे सपुत्रस्य दुरात्मनः।
बिभीषणे राज्यदानं पुष्पकेण मया सह ॥ ४१॥

अयोध्यागमनं पश्चाद्राज्ये रामाभिषेचनम्।
एवमादीनि कर्माणि मयैवाचरितान्यपि।
आरोपयन्ति रामेऽस्मिन्निर्विकारेऽखिलात्मनि ॥ ४२॥

तथापि रामांच्या सान्निध्याने मी निर्माण केलेले हे विश्व अज्ञानी लोक त्या रामांवर आरोपित करतात. अयोध्या नगरीमध्ये अतिशय पवित्र रघुकुळात रामांचा जन्म झाला. त्यानंतर त्यांनी विश्वामित्रांना साहाय्य करणे, त्या विश्वामित्राच्या यज्ञाचे रक्षण करणे, अहल्येला शापातून मुक्त करणे, श्रीमहादेवांचे धनुष्य भंग करणे, नंतर माझे पाणिग्रहण करणे, भार्गव परशुरामांचा गर्व खंडन करणे, माझ्यासह बारा वर्षेपर्यंत अयोध्यानगरीत राहणे, मग दंडकारण्यात जाणे, विराधाचा वध करणे, माया-मृग रूपातील मारीचाचे मरण, मायासीतेचे अपहरण होणे, जटायू तसेच कबंध यांना मोक्षाचा लाभ होणे, शबरीने केलेले रामाचे पूजन, नंतर सुग्रीवाशी मैत्री, वालीचा वध, सीतेचा शोध, समुद्रावर सेतू बांधणे, लंकेला वेढा घालणे, पुत्रांसह दुरात्म्या रावणाचा युद्धामध्ये वध करणे, बिभीषणाला लंकेचे राज्य देणे, पुष्पक विमानातून माझ्याबरोबर अयोध्येला परत येणे, त्यानंतर राज्यावर रामांचा राज्याभिषेक होणे- अशा प्रकारची ही सर्व कर्मे जरी मीच केलेली आहेत, तरीही अज्ञानी लोक ती कर्मे निर्विकार, सर्वांचा आत्मा असे जे राम त्यांच्यावर आरोपित करतात. (३५-४२)

रामो न गच्छति न तिष्ठति नानुशोच-
त्याकाङ्क्षते त्यजति नो न करोति किञ्चित्।
आनन्दमूर्तिरचलः परिणामहीनो
मायागुणाननुगतो हि तथा विभाति ॥ ४३॥

तत्त्वतः श्रीराम सर्वव्यापी असल्याने कुठेही जात नाहीत, कुठेही राहात नाहीत, शोक करीत नाहीत, इच्छा करीत नाहीत, त्याग करीत नाहीत, तसेच अन्य कोणतीही क्रिया ते करीत नाहीत. ते आनंदस्वरूप, अविचल, आणि विकार-रहित आहेत; तथापि मायेच्या गुणांशी संबंध आल्यामुळे ते तसे भासतात." (४३)

श्रीमहादेव उवाच

ततो रामः स्वयं प्राह हनूमन्तमुपस्थितम् ।
शृणु तत्त्वं प्रवक्ष्यामि ह्यात्मानात्मपरात्मनाम् ॥ ४४ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – त्यानंतर सन्मुख उपस्थित असणाऱ्या हनुमंताला राम स्वतः म्हणाले, "आत्मा, अनात्मा आणि परमात्मा यांचे तत्त्व मी तुला सांगतो. ते तू लक्षपूर्वक ऐक. (४४)

आकाशस्य यथा भेदस्त्रिविधो दृश्यते महान् ।
जलाशये महाकाशस्तदवच्छिन्न एव हि ।
प्रतिबिम्बाख्यमपरं दृश्यते त्रिविधं नभः ॥ ४५ ॥

ज्या प्रमाणे आकाशाचे तीन प्रकारचे मोठे भेद स्पष्टपणे दिसून येतात. एक महाकाश[1] दुसरे जलाशयाने मर्यादित झालेले आकाश[2] आणि तिसरे प्रतिबिंब हे नाव असणारे आकाश[3]. अशा प्रकारे तीन प्रकारचे आकाश दिसून येते. (४५)

बुद्ध्यवच्छिन्नचैतन्यमेकं पूर्णमथापरम् ।
आभासस्त्वपरं बिम्बभूतमेवं त्रिधा चितिः ॥ ४६ ॥

त्याप्रमाणेच चैतन्य हेसुद्धा तीन प्रकारचे आहे- एक बुद्धीची मर्यादा असणारे चैतन्य (ते बुद्धीमध्ये व्याप्त असते). दुसरे परिपूर्ण असणारे चैतन्य आणि तिसरे जे बुद्धीमध्ये प्रतिबिंबित झालेले असते; या तिसऱ्या चैतन्याला आभास चैतन्य असे म्हणतात. (४६)

साभासबुद्धेः कर्तृत्वमविच्छिन्नेऽविकारिणि ।
साक्षिण्यारोप्यते भ्रान्त्या जीवत्वं च तथाऽबुधैः ॥ ४७ ॥

यांतील केवळ आभास चैतन्याने युक्त अशा बुद्धीमध्येच कर्तेपण असते म्हणजे चिदाभाससहित असणारी बुद्धी हीच सर्व कार्ये करते; परंतु अज्ञ जन भ्रांतीमुळे अखंड, निर्विकार, साक्षी अशा आत्म्यावर कर्तृत्व आणि जीवत्व यांचा आरोप करतात. म्हणजे ते अज्ञानी लोक त्या आत्म्यालाच कर्ता आणि भोक्ता समजतात. (४७)

आभासस्तु मृषा बुद्धिरविद्याकार्यमुच्यते ।
अविच्छिन्नं तु तद्ब्रह्म विच्छेदस्तु विकल्पतः ॥ ४८ ॥

(ज्याला आम्ही जीव म्हटले आहे) ते आभास चैतन्य हे मिथ्या आहे (कारण सर्वच आभास हे मिथ्याच असतात). बुद्धी ही अविद्येचे कार्य आहे. तथापि तो परब्रह्म परमात्मा हा वास्तविक अखंड आहे; म्हणून त्याचा भाग मानणे ही केवळ कल्पना आहे. (४८)

अवच्छिन्नस्य पूर्णेन एकत्वं प्रतिपाद्यते ।
तत्त्वमस्यादिवाक्यैश्च साभासस्याहमस्तथा ॥ ४९ ॥

अहं (मी) च्या रूपाने प्रत्ययाला येणारे, मर्यादित, साभास (वासनायुक्त) चैतन्य म्हणजेच जीव. 'तत्त्वमसि' (तेच तू आहेस) इत्यादी वाक्यांनी त्याचे पूर्ण चैतन्य परब्रह्माशी एकत्व प्रतिपादन केले जाते. (४९)

ऐक्यज्ञानं यदोत्पन्नं महावाक्येन चात्मनोः ।
तदाऽविद्या स्वकार्यैश्च नश्यत्येव न संशयः ॥ ५० ॥

जेव्हा (गुरूपदिष्ट, तत्त्वमस्यादी) महावाक्यांचे द्वारा जीवात्मा व परमात्मा यांच्या एकतेचे ज्ञान उत्पन्न होते, तेव्हा आपल्या बुद्ध्यादी कार्यांसह अविद्या ही नष्टच होऊन जाते, यात काहीही संदेह नाही. (५०)

एतद्विज्ञाय मद्भक्तो मद्भावायोपपद्यते ।
मद्भक्तिविमुखानां हि शास्त्रगर्तेषु मुह्यताम् ।
न ज्ञानं न च मोक्षः स्यात्तेषां जन्मशतैरपि ॥ ५१ ॥

याचा अनुभव येताच माझा भक्त माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो. परंतु जे लोक माझी भक्ती सोडून देऊन, शास्त्ररूपी खड्ड्यामध्ये पडून भटकत राहतात, त्यांना शेकडो जन्मांपर्यंतसुद्धा ज्ञानही होत नाही आणि मोक्षही प्राप्त होत नाही. (५१)

१. जे सर्वत्र व्याप्त आहे २. जे केवळ जलाशयात मर्यादित होऊन आहे ३. जे पाण्यात प्रतिबिंबित आहे.

इदं रहस्यं हृदयं ममात्मनो
मयैव साक्षात्कथितं तवानघ ।
मद्भक्तिहीनाय शठाय न त्वया
दातव्यमैन्द्रादपि राज्यतोऽधिकम् ॥ ५२ ॥

हे निष्पाप हनुमंता, हे परम रहस्य आत्मस्वरूप अशा माझे हृदय आहे आणि प्रत्यक्ष मीच ते तुला सांगितले आहे. जरी तुला इंद्रलोकातील राज्यापेक्षा अधिक संपत्ती मिळाली, तरीसुद्धा तू हे रहस्य माझी भक्ती न करणाऱ्या कोणत्याही दुष्ट पुरुषाला सांगू नकोस." (५२)

*श्रीमहादेव उवाच*

एतत्तेऽभिहितं देवि श्रीरामहृदयं मया ।
अतिगुह्यतमं हृद्यं पवित्रं पापशोधनम् ॥ ५३ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– " हे देवी, हे अत्यंत गोपनीय, मनोहर, परम पवित्र आणि पापनाशक **श्रीरामहृदय** मी तुला सांगितले आहे. (५३)

साक्षाद्रामेण कथितं सर्ववेदान्तसंग्रहम् ।
य: पठेत्सततं भक्त्या स मुक्तो नात्र संशय: ॥ ५४ ॥

सर्व वेदांतांचे सार साक्षात श्रीरामचंद्रांनी सांगितले आहे. भक्तिपूर्वक जो कोणी याचे सतत पठन करतो, तो नि:संशयपणाने मुक्त होऊन जातो. (५४)

ब्रह्महत्यादिपापानि बहुजन्मार्जितान्यपि ।
नश्यन्त्येव न सन्देहो रामस्य वचनं यथा ॥ ५५ ॥

याच्या पठनाने अनेक जन्मांत संचित झालेली ब्रह्महत्या इत्यादी सर्व पापेसुद्धा नि:संदेहपणे नष्ट होऊन जातात; असे श्रीरामांचेच वचन आहे. (५५)

योऽतिभ्रष्टोऽतिपापी परधनपर-
दारेषु नित्योद्यतो वा
स्तेयी ब्रह्मघ्नमातापितृवधनिरतो
योगिवृन्दापकारी ।
य: संपूज्याभिरामं पठति च हृदयं
रामचन्द्रस्य भक्त्या
योगीन्द्रैरप्यलभ्यं पदमिह लभते
सर्वदेवै: स पूज्यम् ॥ ५६ ॥

जो कुणी अतिशय भ्रष्ट असेल, अतिशय पापी असेल,परधन आणि परस्त्री यांच्या ठिकाणी नित्य प्रवृत्त होणारा असेल, जो चोर असेल, ब्रह्महत्या करणारा असेल, जो मातापित्याचा वध करण्यात गुंतलेला असेल आणि जो योगिजनांच्या समूहाचे अहित करणारा मनुष्य असेल, तोसुद्धा जर श्रीरामचंद्रांचे पूजन करून आणि सुंदर अशा रामहृदयाचे भक्तिपूर्वक पठन करील तर तो पूर्वसंचित पापांतून मुक्त होऊन सर्व देवांना पूज्य आणि श्रेष्ठ योग्यांनासुद्धा परम दुर्लभ असे परम पद प्राप्त करून घेईल." (५६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकाण्डे श्रीरामहृदयं नाम प्रथम: सर्ग: ॥१॥

# द्वितीय सर्ग

## भारपीडित पृथ्वीचे ब्रह्मदेवाजवळ जाणे, तिच्या प्रार्थनेने भगवंतांचे प्रकट होणे व त्यांनी तिला धीर देणे.

*श्रीपार्वत्युवाच*

धन्यास्म्यनुगृहीतास्मि कृतार्थास्मि जगत्प्रभो ।
विच्छिन्नो मेऽतिसन्देहग्रन्थिर्भवदनुग्रहात् ॥ १ ॥

**श्रीपार्वती म्हणाली** – हे जगन्नाथा, आपल्या कृपेने अनुगृहीत होऊन मी धन्य झाले, कृतकृत्य झाले. तसेच माझी संशयग्रंथी पूर्णपणे नाहीशी झाली. (१)

त्वन्मुखाद्गलितं रामतत्त्वामृतरसायनम् ।
पिबन्त्या मे मनो देव न तृप्यति भवापहम् ॥ २ ॥

हे देवा, तुमच्या मुखातून आलेले, संसाराचे भय हरण करणारे, रामतत्त्वरूपी अमृतरसायन पिताना माझे मन तृप्त होत नाही. (२)

श्रीरामस्य कथा त्वत्तः श्रुता संक्षेपतो मया ।
इदानीं श्रोतुमिच्छामि विस्तरेण स्फुटाक्षरम् ॥ ३ ॥

श्रीरामचंद्रांची कथा मी आपल्या मुखातून संक्षेपाने ऐकली. आता तीच कथा विस्तारपूर्वक स्पष्ट शब्दांत ऐकावी, अशी माझी इच्छा आहे. (३)

*श्रीमहादेव उवाच*

शृणु देवि प्रवक्ष्यामि गुह्याद्गुह्यतरं महत् ।
अध्यात्मरामचरितं रामेणोक्तं पुरा मम ॥ ४ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे देवी, ऐक. गुह्यापेक्षा अधिक गुह्य असणारे, महान असे **अध्यात्म रामायण** मी तुला सांगतो. ते पूर्वी रामांनीच मला सांगितले होते. (४)

तदद्य कथयिष्यामि शृणु तापत्रयापहम् ।
यच्छ्रुत्वा मुच्यते जन्तुरज्ञानोत्थमहाभयात् ।
प्राप्नोति परमामृद्धिं दीर्घायुः पुत्रसन्ततिम् ॥ ५ ॥

त्रिविध तापांचे हरण करणारे अध्यात्म-रामायण मी आज तुला सांगतो. ते तू ऐक. ते ऐकल्याने जीव हा अज्ञान-जनित अशा महाभयातून सुटून जातो आणि दीर्घायुषी होऊन तो परम ऐश्वर्य आणि पुत्रपौत्र इत्यादी प्राप्त करून घेतो. (५)

भूमिभरेण मग्ना दशवदनमुखाशेष-
रक्षोगणानां
धृत्वा गोरूपमादौ दिविजमुनिजनैः
साकमब्जासनस्य ।
गत्वा लोकं रुदन्ती व्यसनमुपगतं
ब्रह्मणे प्राह सर्वं
ब्रह्मा ध्यात्वा मुहूर्तं सकलमपि हृदा -
वेदशेषात्मकत्वात् ॥ ६ ॥

रावण इत्यादी राक्षसांच्या भाराने दुःखी झालेली पृथ्वी ही पूर्वी एकदा गाईचे रूप धारण करून, देव आणि मुनी यांच्यासह, ब्रह्मदेवांच्या लोकात गेली. तेथे पोचल्यावर रडत रडत तिने आपल्यावर आलेले सर्व दुःख ब्रह्मदेवांना सांगितले. तेव्हा एक क्षणभर ध्यानस्थ होऊन, तिच्या दुःखनिवृत्तीचा उपाय ब्रह्मदेवांनी मनात जाणून घेतला; कारण ते सर्वांतर्यामी आहेत. (६)

तस्मात्क्षीरसमुद्रतीरमगमद्
ब्रह्माथ देवैर्वृतो
देव्या चाखिललोकहृत्स्थमजरं
सर्वज्ञमीशं हरिम् ।
अस्तौषीच्छ्रुतिसिद्धनिर्मलपदैः
स्तोत्रैः पुराणोद्भवै-
र्भक्त्या गद्गदया गिरातिविमलै-
रानन्दबाष्पैर्वृतः ॥ ७ ॥

त्यानंतर सर्व देवांच्यासह ब्रह्मदेव भूदेवीला बरोबर घेऊन, तेथून निघाले आणि क्षीर-सागराच्या किनाऱ्यावर गेले. तेथे अतिशय निर्मल आनंदाश्रूंनी डोळे भरून ब्रह्मदेवांनी, श्रुतीमध्ये सिद्ध असणाऱ्या निर्मल पदांनी आणि पुराणोक्त स्तोत्रांनी तसेच भक्तीने सद्गदित झालेल्या वाणीने सर्वांचे अंतर्यामी, जरारहित, सर्वज्ञ अशा भगवान श्रीहरींची स्तुती केली. (७)

ततः स्फुरत्सहस्रांशुसहस्रसदृशप्रभः ।
आविरासीद्धरिः प्राच्यां दिशां व्यपनयंस्तमः ॥ ८ ॥

तेव्हा हजारो देदीप्यमान सूर्याप्रमाणे प्रभा असणारे भगवान हरी आपल्या तेजाने सर्व दिशांतील अंधकार दूर करीत पूर्व दिशेला प्रकट झाले. (८)

कथंचिद्दृष्टवान्ब्रह्मा दुर्दर्शमकृतात्मनाम् ।
इन्द्रनीलप्रतीकाशं स्मितास्यं पद्मलोचनम् ॥ ९ ॥

किरीटहारकेयूरकुण्डलैः कटकादिभिः ।
विभ्राजमानं श्रीवत्सकौस्तुभप्रभयान्वितम् ॥ १० ॥

स्तुवद्भिः सनकाद्यैश्च पार्षदैः परिवेष्टितम् ।
शङ्खचक्रगदापद्मवनमालाविराजितम् ॥ ११ ॥

पुण्यरहित पुरुषांना दर्शन मिळण्यास कठीण अशा भगवान हरींना ब्रह्मदेवांनीसुद्धा कसेबसे पाहिले. इंद्रनील मण्याप्रमाणे त्यांचा तेजोमय श्याम वर्ण होता. त्यांच्या मुखावर मधुर स्मितहास्य होते आणि त्यांचे डोळे कमलाप्रमाणे विशाल आणि मनोहर होते . किरीट, हार, केयूर आणि कुंडले तसेच कंकण इत्यादी अलंकारांनी ते सुशोभित होते. तसेच श्रीवत्स आणि कौस्तुभ मणी यांच्या प्रभेने ते युक्त होते. त्या स्तुती करणाऱ्या सनकादिक आणि त्यांच्या इतर पार्षदांसमवेत ते होते. शंख, चक्र, गदा, पद्म आणि वनमाला यांनी ते शोभत होते. सोन्याचे यज्ञोपवीत

स्वर्णयज्ञोपवीतेन स्वर्णवर्णाम्बरेण च ।
श्रिया भूम्या च सहितं गरुडोपरि संस्थितम् ॥ १२॥

हर्षगद्गदया वाचा स्तोतुं समुपचक्रमे ॥ १३॥

आणि सोनेरी पीतांबर त्यांनी धारण केलेले होते. तसेच लक्ष्मीदेवी आणि भूदेवी यांच्यासह गरुडावर ते विराजमान होते. (असे त्यांचे दिव्यरूप पाहून) हर्षाने गद्गद झालेल्या वाणीने पितामह ब्रह्मदेवांनी त्यांची स्तुती करण्यास प्रारंभ केला. (९-१३)

*ब्रह्मोवाच*

नतोऽस्मि ते पदं देव प्राणबुद्धीन्द्रियात्मभिः ।
यच्चिन्त्यते कर्मपाशाद्धृदि नित्यं मुमुक्षुभिः ॥ १४॥

**ब्रह्मदेव म्हणाले** – "हे देवा, कर्माच्या पाशातून सुटण्यासाठी मुमुक्षू लोक आपले प्राण, बुद्धी, इंद्रिये आणि मन यांचे द्वारा ज्यांचे नित्य चिंतन आपल्या मनात करतात, त्या तुमच्या चरणारविंदांना मी नमस्कार करतो. (१४)

मायया गुणमय्या त्वं सृजस्यवसि लुम्पसि ।
जगत्तेन न ते लेप आनन्दानुभवात्मनः ॥ १५॥

आपल्या त्रिगुणमय मायेचा आश्रय घेऊन तुम्ही या जगाची उत्पत्ती, पालन आणि लय करता. परंतु ज्ञान आणि आनंद हे स्वरूप असणारे तुम्ही त्या कर्मांनी लिप्त होत नाही. (१५)

तथा शुद्धिर्न दुष्टानां दानाध्ययनकर्मभिः ।
शुद्धात्मता ते यशसि सदा भक्तिमतां यथा ॥ १६ ॥

हे भगवन्, तुमच्या विमल यशाच्या ठिकाणी सदा प्रेम करणाऱ्या भक्तांच्या अंतःकरणात जशी शुद्धता असते, तशी मलिन अंतःकरण असणाऱ्या दुष्ट पुरुषांना दान, अध्ययन इत्यादी शुभ कर्मे करूनसुद्धा प्राप्त होत नाही. (१६)

अतस्त्वाङ्घ्रिर्मे दृष्टश्चित्तदोषापनुत्तये ।
सद्योऽन्तर्हृदये नित्यं मुनिभिः सात्वतैर्वृतः ॥ १७॥

म्हणून भक्त मुनिजन ज्यांचे निरंतर ध्यान आपल्या हृदयात करतात त्या आपल्या चरणांचे दर्शन माझ्या अंतःकरणातील दोषांचा तत्काळ नाश व्हावा म्हणून मी आज घेतले आहे. (१७)

ब्रह्माद्यैः स्वार्थसिद्ध्यर्थमस्माभिः पूर्वसेवितः ।
अपरोक्षानुभूत्यर्थं ज्ञानिभिर्हृदि भावितः ॥ १८ ॥

आपल्या इष्ट सिद्धीसाठी आम्ही ब्रह्मदेव इत्यादींनी या तुमच्या चरणांचे सेवन पूर्वी केले होते आणि ज्ञानी अशा मुनिजनांनी अपरोक्ष साक्षात्कार होण्यासाठी आपल्या हृदयात तुमच्या चरणांचे ध्यान केलेले आहे. (१८)

तवाङ्घ्रिपूजानिर्माल्यतुलसीमालया विभो ।
स्पर्धते वक्षसि पदं लब्ध्वापि श्रीः सपत्निवत् ॥ १९ ॥

हे विभो, तुमच्या वक्षःस्थलावर स्थान प्राप्त करून घेऊनसुद्धा, तुमच्या चरण-पूजेच्या वेळी वाहिलेल्या व निर्माल्य झालेल्या तुळसी मालेचा श्रीलक्ष्मी ही एखाद्या सवतीप्रमाणे मत्सर करते. (१९)

अतस्त्वत्पादभक्तेषु तव भक्तिः श्रियोऽधिका ।
भक्तिमेवाभिवाञ्छन्ति त्वद्भक्ताः सारवेदिनः ॥ २० ॥

तुमच्या चरणकमलांवर प्रेम करणाऱ्या तुमच्या भक्तांच्या ठायी तुमचे प्रेम हे तुमच्या लक्ष्मीवरील प्रेमापेक्षाही अधिक आहे. म्हणून सार जाणणारे तुमचे भक्तजन हे केवळ तुमच्या भक्तीचीच इच्छा करतात. (२०)

अतस्त्वत्पादकमले भक्तिरेव सदास्तु मे ।
संसारामयतप्तानां भेषजं भक्तिरेव ते ॥ २१॥

म्हणून हे देवा, तुमच्या चरणकमलांच्या ठिकाणीच माझी भक्ती सर्वदा असू दे. कारण संसार-रोगाने ग्रस्त झालेल्या रोग्यांसाठी तुमची भक्ती हेच एकमात्र औषध आहे." (२१)

इति ब्रुवन्तं ब्रह्माणं बभाषे भगवान् हरिः ।
किं करोमीति तं वेधाः प्रत्युवाचातिहर्षितः ॥ २२॥

अशा प्रकारे स्तुती करणाऱ्या ब्रह्मदेवांना भगवान श्रीहरी म्हणाले, "मी तुमचे कोणते कार्य करू ?" तेव्हा अत्यंत आनंदित होऊन ब्रह्मदेवांनी त्यांना प्रत्युत्तर दिले. (२२)

भगवन् रावणो नाम पौलस्त्यतनयो महान् ।
राक्षसानामधिपतिर्मद्दत्तवरदर्पितः ॥ २३ ॥

"हे भगवन, पुलस्त्यपुत्र विश्रवा याचा पुत्र रावण आहे. तो राक्षसांचा महान राजा असून मी दिलेल्या वरामुळे तो अतिशय गर्विष्ठ झाला आहे. (२३)

त्रिलोकीं लोकपालांश्च बाधते विश्वबाधकः ।
मानुषेण मृतिस्तस्य मया कल्याणकल्पिता ।
अतस्त्वं मानुषो भूत्वा जहि देवरिपुं प्रभो ॥ २४ ॥

संपूर्ण विश्वाला पीडा देणारा तो तीन लोक आणि लोकपाल यांना त्रास देत आहे. हे कल्याणरूप विष्णू, त्याचा मृत्यू माणसाच्या हातून होईल, अशी योजना मी केली आहे. म्हणून हे प्रभो, तुम्ही मनुष्यरूप धारण करून, देवांचा शत्रू असणाऱ्या त्या रावणाचा वध करावा." (२४)

*श्रीभगवानुवाच*

कश्यपस्य वरो दत्तस्तपसा तोषितेन मे ॥ २५ ॥

याचितः पुत्रभावाय तथेत्यङ्गीकृतं मया ।
स इदानीं दशरथो भूत्वा तिष्ठति भूतले ॥ २६ ॥

**श्रीभगवान् म्हणाले**– "कश्यपाच्या तपस्येने संतुष्ट होऊन मी एकदा त्याला वर दिला होता. 'तुम्ही पुत्ररूपाने माझ्या घरी जन्मास यावे' अशी प्रार्थना त्याने मला केली होती. तेव्हा 'ठीक आहे' असे म्हणून मी त्याच्या प्रार्थनेचा स्वीकार केला होता. या वेळी तो कश्यप पृथ्वीतलावर या दशरथ नावाने विद्यमान आहे. (२५-२६)

तस्याहं पुत्रतामेत्य कौसल्यायां शुभे दिने।
चतुर्धात्मानमेवाहं सृजामीतरयोः पृथक् ॥ २७ ॥

शुभ दिवशी मी त्याचा पुत्र म्हणून कौसल्या माता व इतर दोन मातांच्या ठिकाणी वेगवेगळ्या चार अंशांनी स्वतःच प्रगट होईन. (२७)

योगमायापि सीतेति जनकस्य गृहे तदा ।
उत्पत्स्यते तया सार्धं सर्वं सम्पादयाम्यहम् ।
इत्युक्त्वान्तर्दधे विष्णुर्ब्रह्मा देवानथाब्रवीत् ॥ २८ ॥

त्याच वेळी माझी योगमायासुद्धा जनकाच्या घरी सीता या नावाने उत्पन्न होईल. तिला बरोबर घेऊन मी तुमचे सर्व कार्य सिद्ध करीन," असे सांगून भगवान विष्णू अंतर्धान पावले. तेव्हा ब्रह्मदेव देवांना म्हणाले . (२८)

*ब्रह्मोवाच*

विष्णुर्मानुषरूपेण भविष्यति रघोः कुले ॥ २९ ॥

यूयं सृजध्वं सर्वेऽपि वानरेष्वंशसम्भवान् ।
विष्णोः सहायं कुरुत यावत्स्थास्यति भूतले ॥ ३० ॥

**ब्रह्मदेव बोलले** – "हे देवांनो, रघूच्या कुळात भगवान विष्णू मनुष्यरूपाने अवतार घेणार आहेत. तेव्हा तुम्ही सर्वजण स्वतःच्या अंशाने वानराच्या वंशात जन्म घ्या. तसेच जोपर्यंत भगवान श्रीविष्णू भूतलावर राहतील तोपर्यंत तुम्ही त्यांना साहाय्य करीत राहा." (२९-३०)

इति देवान्समादिश्य समाश्वास्य च मेदिनीम् ।
ययौ ब्रह्मा स्वभवनं विज्वरः सुखमास्थितः ॥ ३१ ॥

अशा प्रकारे देवांना आज्ञा करून आणि पृथ्वीला आश्वासन देऊन, ब्रह्मदेव आपल्या लोकात निघून गेले, आणि तेथे निश्चिंत होऊन सुखाने राहू लागले. (३१)

देवाश्च सर्वे हरिरूपधारिणः
स्थिताः सहायार्थमितस्ततो हरेः ।
महाबलाः पर्वतवृक्षयोधिनः
प्रतीक्षमाणा भगवन्तमीश्वरम् ॥ ३२ ॥

तेव्हा भगवान हरींना साहाय्य करण्यासाठी सर्व देव पर्वत व वृक्षांच्या आधारे लढणाऱ्या महाबलवान वानरांचे रूप धारण करून भगवंतांच्या येण्याची वाट पाहात इकडे तिकडे राहू लागले. (३२)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकांडे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

# तृतीय सर्ग

## भगवंतांचा जन्म आणि बाललीला

*श्रीमहादेव उवाच*

अथ राजा दशरथः श्रीमान्सत्यपरायणः ।
अयोध्याधिपतिर्वीरः सर्वलोकेषु विश्रुतः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – एकदा सर्व लोकांमध्ये प्रसिद्ध, सत्यपरायण, श्रीमान्, अयोध्येचे अधिपती, वीरवर असे महाराज दशरथ होते. (१)

सोऽनपत्यत्वदुःखेन पीडितो गुरुमेकदा ।
वसिष्ठं स्वकुलाचार्यमभिवाद्येदमब्रवीत् ॥ २ ॥

पुत्र नसल्यामुळे ते अत्यंत दुःखी होते. एकदा त्यांनी गुरुवर वसिष्ठ या आपल्या कुलाच्या आचार्यांना प्रणाम करून असे सांगितले. (२)

स्वामिन्पुत्राः कथं मे स्युः सर्वलक्षणलक्षिताः ।
पुत्रहीनस्य मे राज्यं सर्वं दुःखाय कल्पते ॥ ३ ॥

"अहो स्वामी, सर्व चांगल्या लक्षणांनी युक्त असे पुत्र मला कसे होतील? कारण पुत्र नसल्यामुळे हे संपूर्ण राज्य मला दुःखदायक वाटत आहे." (३)

ततोऽब्रवीद्वसिष्ठस्तं भविष्यन्ति सुतास्तव ।
चत्वारः सत्त्वसम्पन्ना लोकपाला इवापराः ॥ ४ ॥

तेव्हा वसिष्ठ राजांना म्हणाले, "अत्यंत सामर्थ्य-संपन्न आणि जणू साक्षात दुसरे लोकपालच असे चार पुत्र तुम्हांला होतील. (४)

शान्ताभर्तारमानीय ऋष्यशृङ्गं तपोधनम् ।
अस्माभिः सहितः पुत्रकामेष्टिं शीघ्रमाचर ॥ ५ ॥

शांतेचे पती तपोधन ऋष्यशृंग,* यांना बोलावून, आमच्यासह तुम्ही लवकरच पुत्र कामेष्टी यज्ञ करा." (५)

तथेति मुनिमानीय मन्त्रिभिः सहितः शुचिः ।
यज्ञकर्म समारेभे मुनिभिर्वीतकल्मषैः ॥ ६ ॥

'ठीक आहे,' असे म्हणून, पवित्र दशरथ राजांनी मंत्र्यासह मुनिवर ऋष्यशृंगाला बोलावून आणून, पुण्यशील अशा मुनिजनांच्या साहाय्याने यज्ञ सुरू केला. (६)

श्रद्धया हूयमानेऽग्नौ तप्तजाम्बूनदप्रभः ।
पायसं स्वर्णपात्रस्थं गृहीत्वोवाच हव्यवाट् ॥ ७ ॥

अग्नीमध्ये श्रद्धापूर्वक आहुती दिल्या जात असता तप्त सुवर्णाप्रमाणे दीप्तिमान असा हव्यवाहन भगवान अग्नी एका सुवर्णपात्रात पायस घेऊन प्रकट झाला आणि म्हणाला. (७)

गृहाण पायसं दिव्यं पुत्रीयं देवनिर्मितम् ।
लप्स्यसे परमात्मानं पुत्रत्वेन न संशयः ॥ ८ ॥

'हे राजा, देवांनी निर्माण केलेला, पुत्रप्राप्ती करून देणारा, हा दिव्य पायस (खीर) घे. याच्यामुळे तुला साक्षात परमात्मा पुत्र म्हणून लाभेल यात संशय नाही.' (८)

इत्युक्त्वा पायसं दत्त्वा राज्ञे सोऽन्तर्दधेऽनलः ।
ववन्दे मुनिशार्दूलौ राजा लब्धमनोरथः ॥ ९ ॥

असे बोलून आणि ती खीर राजाला देऊन अग्निदेव अंतर्धान पावला. त्यानंतर ज्याचे मनोरथ सफल झाले आहेत अशा त्या राजाने मुनिश्रेष्ठ वसिष्ठ व ऋष्यशृंग यांच्या चरणांना वंदन केले. (९)

---

* ऋष्यशृंग हा मुनिवर विभांडकाचा पुत्र होता. एके काळी विभांडक मुनी एका कुंडात ध्यानस्थ बसले होते. त्या वेळी त्या बाजूने उर्वशी अप्सरा जात होती. तिला पाहून मुनीचे वीर्य स्खलित झाले. ते वीर्य पाण्याबरोबर एक हरिणी प्याली. त्यापासून या ऋष्यशृंगाचा जन्म झाला. आईप्रमाणे त्याच्या डोक्यावर एक शिंगसुद्धा उद्भवले. म्हणून विभांडक पित्याने त्याचे नाव **ऋष्यशृंग** असे ठेवले. एकदा अंग देशात भीषण दुष्काळ पडला. त्या वेळी अंगदेशाच्या रोमपाद नावाच्या राजाला मुनींनी सांगितले, 'जर बालब्रह्मचारी ऋष्यशृंगाला येथे आणता आले तर पर्जन्यवृष्टी होईल.' राजाच्या प्रयत्नाने ऋष्यशृंग अंगदेशात येताच पुष्कळ वृष्टी झाली. त्याचा असा अद्भुत प्रभाव पाहून राजाने त्याला आपली शांता नावाची कन्या दिली. कुठे असेही सांगितले गेले आहे की शांता ही दशरथाची मुलगी होती आणि तिला त्याने रोमपाद या आपल्या मित्राला दत्तक दिली होती.

वसिष्ठऋष्यशृङ्गाभ्यामनुज्ञातो ददौ हविः ।
कौसल्यायै सकैकेय्यै अर्धमर्धं प्रयत्नतः ॥ १० ॥

आणि मग वसिष्ठ आणि ऋष्यशृंग या दोघांच्या आज्ञेनुसार राजा दशरथांनी तो पायस महाराणी कौसल्या आणि कैकेयी या दोघींना अर्धा अर्धा वाटून दिला. (१०)

ततः सुमित्रा संप्राप्ता जगृध्नुः पौत्रिकं चरुम् ।
कौसल्या तु स्वभागार्धं ददौ तस्यै मुदान्विता ॥ ११ ॥

तदनंतर पुत्र प्राप्त करून देणारा तो चरू घेण्यासाठी सुमित्रासुद्धा तेथे येऊन पोचली. तेव्हा कौसल्येने मोठ्या आनंदाने आपल्या भागातील अर्धा भाग तिला दिला. (११)

कैकेयी च स्वभागार्धं ददौ प्रीतिसमन्विता ।
उपभुज्य चरुं सर्वाः स्त्रियो गर्भसमन्विताः ॥ १२ ॥

तसेच कैकेयीनेसुद्धा आपल्या पायसाचा अर्धा भाग प्रेमाने सुमित्रेला दिला. अशा प्रकारे तो पायस खाऊन तिन्ही राण्या गर्भवती झाल्या. (१२)

देवता इव रेजुस्ताः स्वभासा राजमन्दिरे ।
दशमे मासि कौसल्या सुषुवे पुत्रमद्भुतम् ॥ १३ ॥

राजभवनात त्या तिन्ही राण्या स्वतःच्या कांतीने देवतांप्रमाणे शोभू लागल्या. त्यानंतर दहावा महिना लागल्यावर कौसल्येने एका अद्‌भुत बालकाला जन्म दिला. (१३)

मधुमासे सिते पक्षे नवम्यां कर्कटे शुभे ।
पुनर्वस्वृक्षसहिते उच्चस्थे ग्रहपञ्चके ॥ १४ ॥

मेषं पूषणि संप्राप्ते पुष्पवृष्टिसमाकुले ।
आविरासीज्जगन्नाथः परमात्मा सनातनः ॥ १५ ॥

चैत्र महिन्याच्या शुक्ल पक्षातील नवमीच्या दिवशी, शुभ अशा कर्क लग्नात, पुनर्वसू नक्षत्राचे समयी, जेव्हा पाचही ग्रह उच्च स्थानी होते आणि सूर्य हा मेष राशीत आला होता, मध्यान्ह काळी, सनातन परमात्मा असलेले जगन्नाथ आविर्भूत झाले. त्या वेळी दिव्य पुष्पांच्या वर्षावाने आकाश भरून गेले. (१४-१५)

नीलोत्पलदलश्यामः पीतवासाश्चतुर्भुजः ।
जलजारुणनेत्रान्तः स्फुरत्कुण्डलमण्डितः ॥ १६ ॥

त्यांचा नील कमळाच्या पाकळीप्रमाणे श्याम वर्ण होता; त्यांनी पीतांबर परिधान केले होते; ते चतुर्भुज होते; त्यांच्या नेत्रांच्या आतील भाग अरुण कमळाप्रमाणे लालसर होता, चमकणाऱ्या कुंडलांनी ते सुंदर दिसत होते. (१६)

सहस्त्रार्कप्रतीकाशः किरीटी कुञ्चितालकः ।
शङ्खचक्रगदापद्मवनमालाविराजितः ॥ १७ ॥

त्यांचा प्रकाश हजारो सूर्यांप्रमाणे होता, त्यांच्या मस्तकावर प्रकाशमान मुकुट होता; त्यांचे केस कुरळे होते, त्यांच्या हातात शंख, चक्र, गदा, व पद्म आणि गळ्यात वैजयंती माला शोभत होती. (१७)

अनुग्रहाख्यहृत्स्थेन्दुसूचकस्मितचन्द्रिकः ।
करुणारससम्पूर्णविशालोत्पललोचनः ।
श्रीवत्सहारकेयूरनूपुरादिविभूषणः ॥ १८ ॥

हृदयातील अनुग्रहरूपी चंद्राची सूचना देणारे स्मितरूपी चांदणे त्यांच्या मुखकमलावर चमकत होते, करुणा-रसाने भरलेले त्यांचे डोळे कमळाप्रमाणे विशाल होते; श्रीवत्स, हार, केयूर आणि नूपुर इत्यादी अलंकारांनी ते विभूषित होते. (१८)

दृष्ट्वा तं परमात्मानं कौसल्या विस्मयाकुला ।
हर्षाश्रुपूर्णनयना नत्वा प्राञ्जलिरब्रवीत् ॥ १९ ॥

त्या परमात्म्यांना पाहून, कौसल्या विस्मयचकित झाली. आनंदाश्रूंनी भरलेल्या डोळ्यांनी हात जोडून नमस्कार करीत ती म्हणाली. (१९)

*कौसल्योवाच*

देवदेव नमस्तेऽस्तु शङ्खचक्रगदाधर ।
परमात्माच्युतोऽनन्तः पूर्णस्त्वं पुरुषोत्तमः ॥ २० ॥

**कौसल्या म्हणाली** – "हे देवदेवा, तुम्हांला नमस्कार असो. शंख, चक्र, गदा धारण करणाऱ्या हे प्रभो, तुम्ही अच्युत आणि अनंत असे परमात्मा आहात. तुम्ही सर्वत्र परिपूर्ण पुरुषोत्तम आहात. (२०)

वदन्त्यगोचरं वाचां बुद्ध्यादीनामतीन्द्रियम् ।
त्वां वेदवादिनः सत्तामात्रं ज्ञानैकविग्रहम् ॥ २१ ॥

वाणी तसेच मन इत्यादींचे तुम्ही विषय नाही, तुम्ही इंद्रियातीत, केवळ सत्तारूप आणि केवळ ज्ञान हेच स्वरूप असणारे आहात, असे वेदवेत्ते लोक तुमच्याबद्दल म्हणतात. (२१)

त्वमेव मायया विश्वं सृजस्यवसि हंसि च ।
सत्त्वादिगुणसंयुक्तस्तुर्य एवामलः सदा ॥ २२ ॥

करोषीव न कर्ता त्वं गच्छसीव न गच्छसि ।
शृणोषि न शृणोषीव पश्यसीव न पश्यसि ॥ २३ ॥

अप्राणो ह्यमनाः शुद्ध इत्यादि श्रुतिरब्रवीत् ।
समः सर्वेषु भूतेषु तिष्ठन्नपि न लक्ष्यसे ॥ २४ ॥

अज्ञानध्वान्तचित्तानां व्यक्त एव सुमेधसाम् ।
जठरे तव दृश्यन्ते ब्रह्माण्डाः परमाणवः ॥ २५ ॥

त्वं ममोदरसम्भूत इति लोकान्विडम्बसे ।
भक्तेषु पारवश्यं ते दृष्टं मेऽद्य रघूत्तम ॥ २६ ॥

संसारसागरे मग्ना पतिपुत्रधनादिषु ।
भ्रमामि मायया तेऽद्य पादमूलमुपागता ॥ २७ ॥

देव त्वद्रूपमेतन्मे सदा तिष्ठतु मानसे ।
आवृणोतु न मां माया तव विश्वविमोहिनी ॥ २८ ॥

उपसंहर विश्वात्मन्नदो रूपमलौकिकम् ।
दर्शयस्व महानन्दबालभावं सुकोमलम् ।
ललितालिङ्गनालापैस्तरिष्याम्युत्कटं तमः ॥ २९ ॥

श्रीभगवानुवाच
यद्यदिष्टं तवास्त्यम्ब तत्तद्भवतु नान्यथा ॥ ३० ॥

अहं तु ब्रह्मणा पूर्वं भूमेर्भारापनुत्तये ।
प्रार्थितो रावणं हन्तुं मानुषत्वमुपागतः ॥ ३१ ॥

त्वया दशरथेनाहं तपसाराधितः पुरा ।
मत्पुत्रत्वाभिकाङ्क्षिण्या तथा कृतमनिन्दिते ॥ ३२ ॥

तुम्हीच आपल्या मायेने, सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनी युक्त होऊन, हे विश्व उत्पन्न करता, त्याचे पालन करता, आणि त्याचा संहार करता. तथापि खरे पाहता तुम्ही सदा निर्मळ अशा तुरीय स्थितीत असता. (२२)

तुम्ही कर्ता नाही तथापि तुम्ही कर्मे करीत असल्यासारखे वाटते. तुम्ही गमन करीत नाही तरीसुद्धा तुम्ही गमन करीत असल्यासारखे वाटते. तुम्ही ऐकत नाही; परंतु तुम्ही शब्द ऐकल्यासारखे दिसून येते. तुम्ही पाहात नाही, तथापि तुम्ही पाहात असल्यासारखे प्रतीत होते. (२३)

तुम्ही प्राण-रहित, मन-रहित आणि शुद्धस्वरूप आहात असे भगवती श्रुतीसुद्धा सांगते. सर्व प्राण्यांमध्ये तुम्ही समान भावाने स्थित आहात, तथापि ज्यांचे अंतःकरण अज्ञानरूपी अंधकाराने झाकलेले असते अशा लोकांना तुम्ही दिसत नाही. ज्यांची बुद्धी शुद्ध आहे, अशा पुरुषांनाच तुमचा साक्षात्कार होतो. हे भगवान रघूत्तमा, तुमच्या उदरात अनेक ब्रह्मांडे परमाणूप्रमाणे दिसतात. तथापि 'माझ्या उदरातून तुम्ही जन्म घेतलात' असे जे तुम्ही लोकांमध्ये प्रकट करीत आहात, ही तुमची लीला आहे, त्यावरून तुमची भक्त-वत्सलता आज मला दिसून आली. (२४-२६)

हे प्रभो, तुमच्या मायेने मोहित होऊन, संसार-सागरात मग्न झालेली मी पती, पुत्र, धन इत्यादींमध्ये गुंतून जन्म-मृत्यूच्या फेऱ्यांमध्ये भटकत होते. परंतु आज माझ्या परम भाग्याने मी तुमच्या पदकमली शरण आले आहे. (२७)

हे देवा, ही तुमची मनोहर मूर्ती सदा माझ्या हृदयात विराजमान राहो आणि विश्वाला मोहात टाकणाऱ्या तुमच्या मायेने मला मोहात टाकू नये. (२८)

हे विश्वात्मन, तुम्ही हे आपले अलौकिक रूप आता आवरून घ्या आणि परम आनंददायक व अतिशय कोमल असे बालरूप मला दाखवा. मग तुम्हांला सुखदायक आलिंगन देणे, तुमच्याशी संभाषण करणे इत्यादींद्वारा मी अज्ञानरूपी घोर अंधकारातून तरून जाईन." (२९)

**श्रीभगवान् म्हणाले** – "हे माते, तुला जी जी इच्छा असेल ते ते सर्व होवो. दुसरे काही नको. (३०)

भूमीचा भार उतरविण्यासाठी पूर्वी ब्रह्मदेवाने माझी प्रार्थना केली होती. म्हणून रावण इत्यादी निशाचरांना ठार करण्यासाठीच मी मनुष्यरूपाने अवतार घेतला आहे. (३१)

हे पुण्यशील माते, मला पुत्ररूपाने प्राप्त करून घेण्याच्या इच्छेने दशरथांसह तूसुद्धा तपस्येने माझी आराधना केली होतीस. (३२)

रूपमेतत्त्वया दृष्टं प्राक्तनं तपसः फलम् ।
मद्दर्शनं विमोक्षाय कल्पते ह्यन्यदुर्लभम् ॥ ३३ ॥

तू माझे जे हे दिव्य रूप पाहिलेस ते तुझ्या पूर्वीच्या तपस्येचे फळ आहे. माझे दर्शन हे मानवांना मोक्ष देणारे असते. पुण्यरहित लोकांना या रूपाचे दर्शन अत्यंत दुर्लभ आहे. (३३)

संवादमावयोर्यस्तु पठेद्वा शृणुयादपि ।
स याति मम सारूप्यं मरणे मत्स्मृतिं लभेत् ॥ ३४ ॥

आपणा दोघांचा हा संवाद जो कोणी पठन करील अथवा ऐकेल त्याला माझ्या कृपेने मरणसमयी माझी स्मृती राहील आणि नंतर माझी सरूपता मुक्ती प्राप्त होईल." (३४)

इत्युक्त्वा मातरं रामो बालो भूत्वा रुरोद ह ।
बालत्वेऽपीन्द्रनीलाभो विशालाक्षोऽतिसुन्दरः ॥ ३५ ॥

बालारुणप्रतीकाशो लालिताखिललोकपः ।
अथ राजा दशरथः श्रुत्वा पुत्रोद्भवोत्सवम् ।
आनन्दार्णवमग्नोऽसावाययौ गुरुणा सह ॥ ३६ ॥

अशा प्रकारे मातेला सांगून, भगवान राम बालरूप घेऊन रडू लागले. त्यांचे बालरूपसुद्धा इंद्रनील मण्यासारखे कांतिमय, विशाल नेत्र असणारे आणि अतिशय सुंदर होते. प्रभातकालीन बालसूर्याप्रमाणे त्यांची कांती होती. अशा प्रकारे आपल्या अवताराने त्यांनी सर्व लोकपालांना आनंदित केले होते. त्यानंतर पुत्रजन्माचा शुभ समाचार जेव्हा महाराज दशरथांनी ऐकला, तेव्हा ते जणू आनंदसागरात मग्न झाले आणि गुरू वसिष्ठांसह राजभवनात आले. (३५-३६)

रामं राजीवपत्राक्षं दृष्ट्वा हर्षाश्रुसंप्लुतः ।
गुरुणा जातकर्माणि कर्तव्यानि चकार सः ॥ ३७ ॥

तेथे आल्यावर कमल-नयन रामाला पाहून त्यांचे डोळे आनंदाश्रूनी भरून गेले. नंतर गुरुंकडून जात-कर्म इत्यादी आवश्यक संस्कार त्यांनी करवून घेतले. (३७)

कैकेयी चाथ भरतमसूत कमलेक्षणा ।
सुमित्रायां यमौ जातौ पूर्णेन्दुसदृशाननौ ॥ ३८ ॥

त्यानंतर इकडे कमलनयना कैकेयीने भरताला जन्म दिला आणि पूर्णचंद्राप्रमाणे मुख असणारे दोन जुळे पुत्र सुमित्रेला झाले. (३८)

तदा ग्रामसहस्राणि ब्राह्मणेभ्यो मुदा ददौ ।
सुवर्णानि च रत्नानि वासांसि सुरभीः शुभाः ॥ ३९ ॥

त्या वेळी महाराज दशरथांनी मोठ्या आनंदाने हजारो गावे, पुष्कळ सोने, नाना रत्ने, अनेक प्रकारची वस्त्रे आणि शुभ लक्षणांनी युक्त अशा अनेक गाई ब्राह्मणांना दान दिल्या. (३९)

यस्मिन् रमन्ते मुनयो विद्ययाऽज्ञानविप्लवे ।
तं गुरुः प्राह रामेति रमणाद्राम इत्यपि ॥ ४० ॥

ज्ञानाने अज्ञान नष्ट झाल्यावर, मुनिजन ज्यांच्या ठिकाणी रमतात अथवा जे भक्तजनांच्या चित्ताला रमवितात ते राम, असा विचार करून गुरूंनी त्यांचे राम असे नाव ठेवले. (४०)

भरणाद्भरतो नाम लक्ष्मणं लक्षणान्वितम् ।
शत्रुघ्नं शत्रुहन्तारमेवं गुरुरभाषत ॥ ४१ ॥

याच प्रमाणे संसाराचे भरणपोषण करणारा असल्याने दुसऱ्या पुत्राचे नाव भरत, सर्व चांगल्या लक्षणांनी युक्त असल्यामुळे तिसऱ्या पुत्राचे नाव लक्ष्मण, आणि शत्रूचा नाश करणारा असल्याने चौथ्या पुत्राचे नाव शत्रुघ्न, अशी नावे गुरूंनी ठेवली. (४१)

लक्ष्मणो रामचन्द्रेण शत्रुघ्नो भरतेन च ।
द्वन्द्वीभूय चरन्तौ तौ पायसांशानुसारतः ॥ ४२ ॥

कौसल्या आणि कैकेयी यांनी दिलेल्या पायसाच्या भागांनुसार, लक्ष्मण हा रामचंद्रांचा आणि शत्रुघ्न हा भरताचा सहचर होऊन ते जोडीने राहू लागले. (४२)

रामस्तु लक्ष्मणेनाथ विचरन्बाललीलया ।
रमयामास पितरौ चेष्टितैर्मुग्धभाषितैः ॥ ४३ ॥

लक्ष्मणाबरोबर विहार करणारे रामचंद्र आपल्या बाललीला, मधुर अशा गमती आणि बोबडे बोल यांनी आपल्या मातापित्यांना आनंदित करू लागले. (४३)

भाले स्वर्णमयाश्वत्थपर्णमुक्ताफलप्रभम् ।
कण्ठे रत्नमणिव्रातमध्यद्वीपिनखाञ्चितम् ॥ ४४ ॥

श्रीरामांच्या कपाळावर मोत्यांनी सजलेले, देदीप्यमान, सुवर्णमय अश्वत्थ वृक्षाचे पान होते; तसेच त्यांच्या गळ्यात रत्ने आणि मध्ये व्याघ्रनख घालून गुंफलेला रत्नहार शोभत होता. (४४)

कर्णयो: स्वर्णसम्पन्नरत्नार्जुनसटालुकम् ।
शिञ्जानमणिमञ्जीरकटिसूत्राङ्गदैर्वृतम् ॥ ४५ ॥

अर्जुन वृक्षाच्या कच्च्या फळाप्रमाणे शोभणारे रत्नजडित सोन्याचे अलंकार त्यांच्या कानांत शोभत होते. रुणझुण आवाज करणारे मणिमय नूपुर, सुवर्ण मेखला आणि बाजूबंद यांनी ते सुशोभित होते. (४५)

स्मितवक्त्राल्पदशनमिन्द्रनीलमणिप्रभम् ।
अङ्गणे रिङ्गमाणं तं तर्णकाननु सर्वत: ॥ ४६ ॥

दृष्ट्वा दशरथो राजा कौसल्या मुमुदे तदा ।
भोक्ष्यमाणो दशरथो राममेहीति चासकृत् ॥ ४७ ॥

आह्वयत्यतिहर्षेण प्रेम्णा नायाति लीलया ।
आनयेति च कौसल्यामाह सा सस्मिता सुतम् ॥ ४८ ॥

धावत्यपि न शक्नोति स्प्रष्टुं योगिमनोगतिम् ।
प्रहसन्स्वयमायाति कर्दमाङ्कितपाणिना ।
किञ्चिद् गृहीत्वा कवलं पुनरेव पलायते ॥ ४९ ॥

इंद्रनील मण्याप्रमाणे त्यांची प्रभा होती आणि छोट्या छोट्या दातांनी युक्त आणि स्मित करणारे असे त्यांचे मुख होते, अशा श्रीरामांना राजभवनातील अंगणात पाडसांच्या मागे मागे सगळीकडे रांगताना पाहून, महाराज दशरथ आणि कौसल्या त्या वेळी अतिशय आनंदित होत असत. ज्या वेळी महाराज दशरथ भोजन करण्यास बसत असत, त्या वेळी ते 'अरे रामा, ये' असे म्हणत अतिशय हर्षाने आणि प्रेमाने श्रीरामांना वारंवार बोलावीत असत. परंतु खेळात मग्न असल्यामुळे जेव्हा राम येत नसत, तेव्हा दशरथ 'त्याला घेऊन ये,' असे कौसल्येला सांगत. परंतु योगिजनांच्या चित्ताचा एकमात्र आश्रय असणाऱ्या त्या आपल्या पुत्राला, हसत हसत धावणारी कौसल्या पकडू शकत नसे. (मग पळून पळून आई दमली आहे असे पाहून) श्रीराम चिखलाने माखलेल्या हातांनी स्वत:च हसत हसत येत असत आणि मग एखादा घास खाऊन पुन: पळून जात असत. (४६-४९)

कौसल्या जननी तस्य मासि मासि प्रकुर्वती ।
वायनानि विचित्राणि समलङ्कृत्य राघवम् ॥ ५० ॥

प्रत्येक महिन्यात राघवांना चांगल्याप्रकारे वस्त्रे-भूषणे घालून, कौसल्या अनेक प्रकारची वाणे वाटत असे. (५०)

अपूपान्मोदकान्कृत्वा कर्णशष्कुलिकास्तथा ।
कर्णपूरांश्च विविधान् वर्षवृद्धौ च वायनम् ॥ ५१ ॥

आणि वार्षिक वाढदिवसा दिवशीसुद्धा अनरसे, लाडू, जिलबी, कचोरी इत्यादी नानाप्रकारचे पदार्थ बनवून त्यांची वाणे देत असे. (५१)

गृहकृत्यं तया त्यक्तं तस्य चापल्यकारणात् ।
एकदा रघुनाथोऽसौ गतो मातरमन्तिके ॥ ५२ ॥

भोजनं देहि मे मातर्न श्रुतं कार्यसक्तया ।
तत: क्रोधेन भाण्डानि लगुडेनाहनत्तदा ॥ ५३ ॥

श्रीरामांच्या खोड्यांमुळे कौसल्येने घरातील काम करणेसुद्धा सोडून दिले. एकदा रघुनाथ आईच्या जवळ गेले. आणि म्हणाले, 'आई, मला जेवण दे.' कामात गढलेल्या कौसल्येला ते ऐकू आले नाही. तेव्हा श्रीरामांनी काहीशा रागारागाने काठी मारून भांडी फोडून टाकली. (५२-५३)

शिक्यस्थं पातयामास गव्यं च नवनीतकम् ।
लक्ष्मणाय ददौ रामो भरताय यथाक्रमम् ॥ ५४ ॥

शत्रुघ्नाय ददौ पश्चाद्दधि दुग्धं तथैव च ।
सूदेन कथिते मात्रे हास्यं कृत्वा प्रधावति ॥ ५५ ॥

तसेच शिंक्यावर ठेवलेले दही, लोणी खाली पाडले; नंतर दूध, दही, लोणी हेसुद्धा त्यांनी क्रमाने लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न यांना दिले. स्वयंपाक्याने ही गोष्ट कौसल्या मातेला सांगितली. तेव्हा ती हसून त्यांना पकडण्यास धावली. (५४-५५)

आगतां तां विलोक्याथ ततः सर्वैः पलायितम् ।
कौसल्या धावमानापि प्रस्खलन्ती पदे पदे ॥ ५६ ॥

नंतर आई येत आहे हे पाहून ते चौघे पळून गेले. त्यांच्यामागे धावणारी कौसल्यासुद्धा पावलोपावली अडखळू लागली. (५६)

रघुनाथं करे धृत्वा किञ्चिन्नोवाच भामिनी ।
बालभावं समाश्रित्य मन्दं मन्दं रुरोद ह ॥ ५७ ॥

शेवटी तिने रघुनाथांचा हात पकडला. राम बालभावानुसार मुळूमुळू रडू लागले. तेव्हा आई रामांना काहीही बोलली नाही. (५७)

ते सर्वे लालिता मात्रा गाढमालिङ्ग्य यत्नतः ।
एवमानन्दसन्दोहजगदानन्दकारकः ॥ ५८ ॥

मायाबालवपुर्धृत्वा रमयामास दम्पती ।
अथ कालेन ते सर्वे कौमारं प्रतिपेदिरे ॥ ५९ ॥

घट्ट मिठीत घेऊन आईने त्यांना कुरवाळले. अशा प्रकारे आनंदघन आणि जगाला आनंद देणाऱ्या भगवान रामांनी मायामय असे बालरूप धारण करून दशरथ आणि कौसल्या या दांपत्याला आनंदित केले. काही काळ व्यतीत झाल्यावर ते चारही भाऊ कौमार अवस्थेत प्रविष्ट झाले. (५८-५९)

उपनीता वसिष्ठेन सर्वविद्याविशारदाः ।
धनुर्वेदे च निरताः सर्वशास्त्रार्थवेदिनः ॥ ६० ॥

बभूवुर्जगतां नाथा लीलया नररूपिणः ।
लक्ष्मणस्तु सदा राममनुगच्छति सादरम् ॥ ६१ ॥

सेव्यसेवकभावेन शत्रुघ्नो भरतं तथा ।
रामश्चापधरो नित्यं तूणीबाणान्वितः प्रभुः ॥ ६२ ॥

अश्वारूढो वनं याति मृगयायै सलक्ष्मणः ।
हत्वा दुष्टमृगान् सर्वान् पित्रे सर्वं न्यवेदयत् ॥ ६३ ॥

तेव्हा वसिष्ठांनी त्यांचा उपनयन संस्कार केला. लीलेनेच नररूप धारण करणारे आणि सर्व लोकांचे स्वामी असे ते चौघे भाऊ सर्व विद्यांमध्ये विशारद, सर्व शास्त्रांचे मर्म जाणणारे आणि धनुर्वेद इत्यादी सर्व विद्यांमध्ये पारंगत झाले. त्या चौघा भावांपैकी लक्ष्मण हा सेव्य- सेवक भावाने आदरपूर्वक सदा रामचंद्रांच्या बरोबर राहात असे. त्याच प्रमाणे शत्रुघ्न नेहमी भरताच्या सेवेत उपस्थित असे. धनुष्यबाण आणि भाते घेऊन, भगवान राम हे दररोज लक्ष्मणासह घोड्यावर स्वार होऊन, मृगयेसाठी वनात जात आणि तेथे सर्व (सिंह, व्याघ्र इत्यादी) दुष्ट पशूंना मारून, घरी परत आल्यावर, सर्व गोष्टी पित्याला सांगत. (६०-६३)

प्रातरुत्थाय सुस्नातः पितरावभिवाद्य च ।
पौरकार्याणि सर्वाणि करोति विनयान्वितः ॥ ६४ ॥

प्रातःकाळी उठून, स्नान करून, श्रीराम मातापित्यांना प्रणाम करीत आणि नंतर नम्रतापूर्वक ते नगरवासी लोकांची सर्व कामे करीत. (६४)

बन्धुभिः सहितो नित्यं भुक्त्वा मुनिभिरन्वहम् ।
धर्मशास्त्ररहस्यानि शृणोति व्याकरोति च ॥ ६५ ॥

भावांसह भोजन झाल्यावर, ते नेहमी मुनिजनांकडून दररोज धर्मशास्त्रांचे मर्म ऐकत असत आणि स्वतःही त्यांचे स्पष्टीकरण करीत असत. (६५)

एवं परात्मा मनुजावतारो
मनुष्यलोकाननुसृत्य सर्वम् ।
चक्रेऽविकारी परिणामहीनो
विचार्यमाणे न करोति किञ्चित् ॥ ६६ ॥

अशा प्रकारे राग-द्वेष इत्यादी विकारांनी रहित तसेच षड्विकारांनी रहित असे परमात्मा मनुष्यावतार धारण करून, मनुष्य लोकातील आचरणांचे अनुसरण करीत सर्व कार्ये करीत असत. परंतु विचार करून पाहिले तर ते परमात्मा काहीच करीत नसत. (६६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकाण्डे तृतीयः सर्गः ॥३॥

# चतुर्थ सर्ग

## विश्वामित्रांचे आगमन, राम आणि लक्ष्मणाचे त्यांच्याबरोबर जाणे आणि त्राटिकेचा वध करणे

श्रीमहादेव उवाच

कदाचित्कौशिकोऽभ्यागादयोध्यां ज्वलनप्रभः ।
द्रष्टुं रामं परात्मानं जातं ज्ञात्वा स्वमायया ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – स्वत:च्या मायेने परमात्मा रामरूपात प्रकट झाले आहेत, हे जाणून त्यांचे दर्शन घेण्यास, अग्नीप्रमाणे तेजस्वी असणारे महर्षी विश्वामित्र एकदा अयोध्या नगरीत आले. (१)

दृष्ट्वा दशरथो राजा प्रत्युत्थायाचिरेण तु ।
वसिष्ठेन समागम्य पूजयित्वा यथाविधि ॥ २ ॥

अभिवाद्य मुनिं राजा प्राञ्जलिर्भक्तिनम्रधीः ।
कृतार्थोऽस्मि मुनीन्द्राहं त्वदागमनकारणात् ॥ ३ ॥

त्यांना पाहताच महाराज दशरथ झटकन उठून उभे राहिले आणि वसिष्ठांसह पुढे येऊन त्यांनी त्यांचे स्वागत केले. नंतर यथाविधी त्यांचे पूजन आणि अभिवादन करून, भक्तीने नम्र झालेल्या चित्ताने, दशरथ राजाने दोन्ही हात जोडून मुनींना म्हटले, "हे मुनिश्रेष्ठ, तुमचे आगमन झाल्यामुळे आज मी कृतकृत्य झालो आहे. (२-३)

त्वद्विधा यद्गृहं यान्ति तत्रैवायान्ति संपदः ।
यदर्थमागतोऽसि त्वं ब्रूहि सत्यं करोमि तत् ॥ ४ ॥

तुमच्यासारखे महानुभाव लोक ज्या घरी येतात त्या घरात सर्व संपदा आपोआप येतात. आता तुमचे शुभागमन कोणत्या कारणासाठी झाले आहे, ते मला सांगा. मी तुमच्या आज्ञेचे पालन करीन." (४)

विश्वामित्रोऽपि तं प्रीतः प्रत्युवाच महामतिः ।
अहं पर्वणि संप्राप्ते दृष्ट्वा यष्टुं सुरान्पितॄन् ॥ ५ ॥

यदारभे तदा दैत्या विघ्नं कुर्वन्ति नित्यशः ।
मारीचश्च सुबाहुश्चापरे चानुचरास्तयोः ॥ ६ ॥

तेव्हा संतुष्ट झालेले महाबुद्धिमान विश्वामित्र - सुद्धा त्यांना म्हणाले, " पर्वकाळ आला असे पाहून, देवगण आणि पितृगण यांच्यासाठी यज्ञ करण्यास मी जेव्हा जेव्हा प्रारंभ करतो, तेव्हा तेव्हा मारीच, सुबाहू आणि त्या दोघांचे अन्य अनुचर असणारे दैत्य हे नेहमी त्या यज्ञात विघ्ने निर्माण करतात. (५-६)

अतस्तयोर्वधार्थाय ज्येष्ठं रामं प्रयच्छ मे ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा तव श्रेयो भविष्यति ॥ ७ ॥

म्हणून त्या दोघांचा वध करण्यासाठी लक्ष्मणासह तुमचा ज्येष्ठ पुत्र श्रीराम मला द्या. तुमचे कल्याण होईल. (७)

वसिष्ठेन सहामन्त्र्य दीयतां यदि रोचते ।
पप्रच्छ गुरुमेकान्ते राजा चिन्तापरायणः ॥ ८ ॥

याबाबतीत वसिष्ठांचा सल्ला घेऊन, जर तुमची इच्छा असेल तर तुमचे दोन्ही कुमार मला द्या." तेव्हा राजाने चिंताकुल होऊन एकांतात गुरूंना प्रश्न केला. (८)

किं करोमि गुरो रामं त्यक्तुं नोत्सहते मनः ।
बहुवर्षसहस्रान्ते कष्टेनोत्पादिताः सुताः ॥ ९ ॥

चत्वारोऽमरतुल्यास्ते तेषां रामोऽतिवल्लभः ।
रामस्त्वितो गच्छति चेन्न जीवामि कथञ्चन ॥ १० ॥

"हे गुरो, हजारो वर्षे लोटल्यावर, मोठ्या कष्टाने, देवसदृश असे हे चार पुत्र उत्पन्न झाले आहेत. त्यांतील राम हा तर माझा फारच लाडका आहे. त्याला सोडण्यास माझे मन तयार नाही. कारण जर राम येथून निघून गेला तर मी कोणत्याही प्रकारे जिवंत राहू शकणार नाही. (९-१०)

प्रत्याख्यातो यदि मुनिः शापं दास्यत्यसंशयः ।
कथं श्रेयो भवेन्मह्यमसत्यं चापि न स्पृशेत् ॥ ११ ॥

परंतु जर मी मुनींना नकार दिला, तर ते मला शाप देतील, यात संशय नाही. तेव्हा माझे हित होईल आणि असत्य बोलण्यापासून मी वाचेन, असे काहीतरी सांगा." (११)

# पंचम सर्ग

## विश्वामित्रांच्या यज्ञाचे रक्षण, मारीच आणि सुबाहू यांचे दमन आणि अहल्योद्धार

*श्रीमहादेव उवाच*

तत्र कामाश्रमे रम्ये कानने मुनिसङ्कुले ।
उषित्वा रजनीमेकां प्रभाते प्रस्थिताः शनैः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, त्यानंतर मुनिजनांनी गजबजलेल्या त्या अतिशय सुंदर, कामाश्रम नावाच्या वनात एक रात्र राहून, प्रातःकाळ होताच ते तेथून सावकाश निघाले. (१)

सिद्धाश्रमं गताः सर्वे सिद्धचारणसेवितम् ।
विश्वामित्रेण संदिष्टा मुनयस्तन्निवासिनः ॥ २ ॥

पूजां च महतीं चक्रू रामलक्ष्मणयोर्द्रुतम् ।
श्रीरामः कौशिकं प्राह मुने दीक्षां प्रविश्यताम् ॥ ३ ॥

नंतर सकल सिद्ध आणि चारण जेथे राहात होते अशा सिद्धाश्रमात ते सर्वजण पोचले. विश्वामित्रांच्या आज्ञेने तेथे राहणाऱ्या मुनींनी लगबगीने येऊन श्रीराम आणि लक्ष्मण यांचा मोठा सत्कार केला. त्यानंतर श्रीराम विश्वामित्रांना म्हणाले, "हे मुने, आपण यज्ञदीक्षा घ्यावी. (२-३)

दर्शयस्व महाभाग कुतस्तौ राक्षसाधमौ ।
तथेत्युक्त्वा मुनिर्यष्टुमारेभे मुनिभिः सह ॥ ४ ॥

तसेच हे महामुने, ते दोघे अधम राक्षस कोठे आहेत ते आम्हांला दाखवा." तेव्हा 'ठीक आहे' असे म्हणून, अन्य मुनींच्यासह विश्वामित्र मुनींनी यज्ञ करण्यास प्रारंभ केला. (४)

मध्याह्ने ददृशाते तौ राक्षसौ कामरूपिणौ ।
मारीचश्च सुबाहुश्च वर्षन्तौ रुधिरास्थिनी ॥ ५ ॥

मध्याह्नाच्या वेळी मारीच आणि सुबाहू हे दोघे इच्छेप्रमाणे रूप धारण करणारे राक्षस रक्त आणि हाडे यांचा वर्षाव करीत असताना दिसू लागले. (५)

रामोऽपि धनुरादाय द्वौ बाणौ सन्दधे सुधीः ।
आकर्णान्तं समाकृष्य विससर्ज तयोः पृथक् ॥ ६ ॥

बुद्धिमान रामांनीसुद्धा धनुष्य घेऊन त्याला दोन बाण जोडले आणि कानापर्यंत दोरी खेचून, त्या दोन राक्षसांवर सोडले. (६)

तयोरेकस्तु मारीचं भ्रामयञ्छतयोजनम् ।
पातयामास जलधौ तदद्भुतमिवाभवत् ॥ ७ ॥

त्या बाणांतील एका बाणाने मारीचाला आकाशात गरगर फिरवून शेकडो योजने दूर असणाऱ्या समुद्रात पाडले. श्रीरामांचे ते अद्‌भुत कृत्यच झाले. (७)

द्वितीयोऽग्निमयो बाणः सुबाहुमजयत्क्षणात् ।
अपरे लक्ष्मणेनाशु हतास्तदनुयायिनः ॥ ८ ॥

दुसऱ्या अग्निमय बाणाने सुबाहूला क्षणात भस्मसात करून टाकले. तसेच त्यांचे जे इतर अनुयायी होते त्या सर्वांना लक्ष्मणाने एका झटक्यातच ठार केले. (८)

पुष्पौघैराकिरन्देवा राघवं सहलक्ष्मणम् ।
देवदुन्दुभयो नेदुस्तुष्टुवुः सिद्धचारणाः ॥ ९ ॥

तेव्हा श्रीराम व लक्ष्मण यांचा लोकोत्तर प्रभाव पाहून देवांनी पुष्पवर्षाव केला, दुंदुभी इत्यादी देववाद्यांचा घोष केला आणि त्याच वेळी सिद्ध आणि चारण यांचे समूह त्यांची स्तुती करू लागले. (९)

विश्वामित्रस्तु संपूज्य पूजार्हं रघुनन्दनम् ।
अङ्के निवेश्य चालिङ्ग्य भक्त्या बाष्पाकुलेक्षणः ॥ १० ॥

आनंदाश्रूंनी डोळे भरून आलेल्या विश्वामित्रांनी पूजनीय रघुनाथांचे भक्तिभावाने पूजन केले आणि त्यांना आलिंगन देऊन आपल्याजवळ बसविले. (१०)

भोजयित्वा सह भ्रात्रा रामं पक्वफलादिभिः ।
पुराणवाक्यैर्मधुरैर्निनाय दिवसत्रयम् ॥ ११ ॥

नंतर लक्ष्मणासह रामांना पिकलेली फळे इत्यादींचे भोजन देऊन, त्यांना पुराणे आणि इतिहास इत्यादींतील मधुर कथा ऐकवीत, विश्वामित्रांनी तीन दिवस तेथे घालविले. (११)




भूधराकार हनुमान्

The mountainous Hanumān




भगवान् श्रीरामका राज्याभिषेक

The coronation of Lord Rāma




श्रीरामदरबारकी झाँकी

Rāma's Court—A panoramic view

चतुर्थेऽहनि संप्राप्ते कौशिको राममब्रवीत् ।
राम राम महायज्ञं द्रष्टुं गच्छामहे वयम् ॥ १२ ॥

विदेहराजनगरे जनकस्य महात्मनः ।
तत्र माहेश्वरं चापमस्ति न्यस्तं पिनाकिना ॥ १३ ॥

द्रक्ष्यसि त्वं महासत्त्वं पूज्यसे जनकेन च ।
इत्युक्त्वा मुनिभिस्ताभ्यां ययौ गङ्गासमीपगम् ॥ १४ ॥

गौतमस्याश्रमं पुण्यं यत्राहल्यास्थिता तपः ।
दिव्यपुष्पफलोपेतपादपैः परिवेष्टितम् ॥ १५ ॥

मृगपक्षिगणैर्हीनं नानाजन्तुविवर्जितम् ।
दृष्ट्वोवाच मुनिं श्रीमान् रामो राजीवलोचनः ॥ १६ ॥

कस्यैतदाश्रमपदं भाति भास्वच्छुभं महत् ।
पत्रपुष्पफलैर्युक्तं जन्तुभिः परिवर्जितम् ॥ १७ ॥

आह्लादयति मे चेतो भगवन् ब्रूहि तत्त्वतः ॥ १८ ॥

*विश्वामित्र उवाच*

शृणु राम पुरा वृत्तं गौतमो लोकविश्रुतः ।
सर्वधर्मभृतां श्रेष्ठस्तपसाराधयन् हरिम् ॥ १९ ॥

तस्मै ब्रह्मा ददौ कन्यामहल्यां लोकसुन्दरीम् ।
ब्रह्मचर्येण सन्तुष्टः शुश्रूषणपरायणाम् ॥ २० ॥

तया सार्धमिहावात्सीद्गौतमस्तपतां वरः ।
शक्रस्तु तां धर्षयितुमन्तरं प्रेप्सुरन्वहम् ॥ २१ ॥

कदाचिन्मुनिवेषेण गौतमे निर्गते गृहात् ।
धर्षयित्वाथ निरगात्त्वरितं मुनिरप्यगात् ॥ २२ ॥

दृष्ट्वा यान्तं स्वरूपेण मुनिः परमकोपनः ।
पप्रच्छ कस्त्वं दुष्टात्मन्मम रूपधरोऽधमः ॥ २३ ॥

सत्यं ब्रूहि न चेद्भस्म करिष्यामि न संशयः ।
सोऽब्रवीद्देवराजोऽहं पाहि मां कामकिङ्करम् ॥ २४ ॥

चौथ्या दिवशी, विश्वामित्रांनी श्रीरामांना म्हटले, "अरे रामा, महात्म्या जनकाचा फार मोठा यज्ञ पाहण्यास आपण जनक राजाच्या नगरीला जाऊया. तेथे महादेवांनी ठेवलेले एक फार अवजड माहेश्वर धनुष्य आहे. (१२-१३)

ते सुदृढ धनुष्य तू पाहशील आणि महाराज जनक तुझा चांगल्या प्रकारे सत्कार करतील." असे सांगून, विश्वामित्र रामलक्ष्मण आणि अन्य मुनिजन यांच्यासह गंगानदीच्याजवळ असणाऱ्या मुनिश्रेष्ठ गौतमांच्या पवित्र आश्रमात गेले. तो आश्रम दिव्य अशा फुला-फळांनी भरलेल्या वृक्षांनी वेढलेला होता आणि तेथे अहल्या तप करीत राहिली होती. (१४-१५)

मृग, पक्षी किंवा नाना प्रकारच्या प्राण्यांनी रहित असा तो आश्रम पाहिल्यावर, कमलनयन श्रीरामांनी विश्वामित्रांना प्रश्न केला. "पाने, फुले, फळे इत्यादींनी संपन्न तथापि जीवजंतूंनी रहित असा हा रमणीय आणि पवित्र मोठा आश्रम दिसत आहे, तो कुणाचा बरे? हा आश्रम पाहून माझे मन आनंदित होत आहे. हे भगवन्, याचा वृत्तांत आपण मला सांगावा." (१६-१८)

**विश्वामित्र म्हणाले**– "हे रामा, या आश्रमाचा पूर्वीचा वृत्तांत ऐका. पूर्वी येथे जगद्विख्यात, सर्व धार्मिक माणसांत श्रेष्ठ असे मुनिवर गौतम श्रीहरीची आराधना करीत राहात होते. (१९)

त्यांच्या ब्रह्मचर्याने संतुष्ट होऊन भगवान ब्रह्मदेवांनी त्यांना अहल्या नावाची सेवापरायण, जगत्सुंदरी अशी कन्या दिली. (२०)

तापसश्रेष्ठ असे ते गौतम मुनी तिच्यासह येथे राहू लागले. तिला भ्रष्ट करण्याची एखादी संधी इंद्र दररोज पाहू लागला. (२१)

एकदा मुनिश्रेष्ठ गौतम आश्रमातून बाहेर गेले असता, इंद्राने गौतम मुनींचा वेष धारण करून, तिला भ्रष्ट केले. तो झटपट तेथून निघाला. त्याच वेळी गौतम मुनीसुद्धा तेथे परत आले. (२२)

आपले रूप धारण करून तेथून जाणाऱ्या त्या इंद्राला पाहून, गौतम मुनींना अतिशय क्रोध आला आणि त्यांनी त्याला विचारले, "अरे दुष्टात्म्या, अरे अधमा, माझे रूप धारण करणारा तू कोण आहेस? (२३)

खरे बोल. जर खरे सांगितले नाहीस तर मी नक्की तुला भस्म करून टाकीन." तेव्हा तो म्हणाला, "भगवन, कामवश झालेला मी देवराज इंद्र आहे. माझे रक्षण करा. (२४)

कृतं जुगुप्सितं कर्म मया कुत्सितचेतसा ।
गौतमः क्रोधताम्राक्षः शशाप दिविजाधिपम् ॥ २५॥

वाईट मनाने मी अतिशय निंद्य कृत्य केले आहे." तेव्हा क्रोधाने डोळे लाल झालेल्या गौतमांनी देवराज इंद्राला शाप दिला. (२५)

योनिलम्पट दुष्टात्मन्सहस्रभगवान्भव ।
शप्त्वा तं देवराजानं प्रविश्य स्वाश्रमं द्रुतम् ॥ २६॥

दृष्ट्वाहल्यां वेपमानां प्राञ्जलिं गौतमोऽब्रवीत् ।
दुष्टे त्वं तिष्ठ दुर्वृत्ते शिलायामाश्रमे मम ॥ २७॥

"अरे दुष्टात्म्या, तू योनि- लंपट आहेस. म्हणून तुझ्या शरीरावर हजार छिद्रे उत्पन्न होतील." अशा प्रकारे देवराज इंद्राला शाप देऊन मुनींनी त्वरित स्वतःच्या आश्रमात प्रवेश केला. तेव्हा भीतीने कापणारी आणि हात जोडून उभी असणारी अहल्या त्यांना दिसली. तिला पाहून गौतमांनी म्हटले, "हे दुष्टे, हे दुराचारिणी, माझ्या आश्रमातील शिळा होऊन तू राहा. (२६-२७)

निराहारा दिवारात्रं तपः परममास्थिता ।
आतपानिलवर्षादिसहिष्णुः परमेश्वरम् ॥ २८॥

ध्यायन्ती राममेकाग्रमनसा हृदि संस्थितम् ।
नानाजन्तुविहीनोऽयमाश्रमो मे भविष्यति ॥ २९॥

येथे तू निराहार राहून ऊन, वारा, पाऊस इत्यादी सहन करीत, रात्रदिवस कठोर तप कर आणि एकाग्र मनाने आपल्या हृदयात विराजमान असणाऱ्या परमात्म्या श्रीरामांचे ध्यान कर. या क्षणापासून हा माझा आश्रम विविध प्रकारच्या जीवजंतूंनी रहित होईल. (२८-२९)

एवं वर्षसहस्रेषु ह्यनेकेषु गतेषु च ।
रामो दाशरथिः श्रीमानागमिष्यति सानुजः ॥ ३०॥

अशा प्रकारे कित्येक हजार वर्षे निघून गेल्यावर येथे राजा दशरथांचे चिरंजीव पुत्र श्रीमान श्रीराम आपल्या धाकट्या भावासह येथे येतील. (३०)

यदा त्वदाश्रयशिलां पादाभ्यामाक्रमिष्यति ।
तदैव धूतपापा त्वं रामं संपूज्य भक्तितः ॥ ३१॥

परिक्रम्य नमस्कृत्य स्तुत्वा शापाद्विमोक्ष्यसे।
पूर्ववन्मम शुश्रूषां करिष्यसि यथासुखम् ॥ ३२॥

आणि जेव्हा ते तुझा आश्रय असणाऱ्या शिळेवर आपले दोन्ही पाय ठेवतील, त्या वेळीच तू पापमुक्त होशील. नंतर भक्तिपूर्वक श्रीरामचंद्रांचे पूजन करून, त्यांना प्रदक्षिणा करून, नमस्कारपूर्वक त्याची स्तुती करून, तू शापातून सुटशील आणि मग पूर्वीप्रमाणेच आनंदाने माझी सेवा करू लागशील." (३१-३२)

इत्युक्त्वा गौतमः प्रागाद्धिमवन्तं नगोत्तमम् ।
तदाद्यहल्या भूतानामदृश्या स्वाश्रमे शुभे ॥ ३३॥

तव पादरजःस्पर्शं काङ्क्षते पवनाशना ।
आस्तेऽद्यापि रघुश्रेष्ठ तपो दुष्करमास्थिता ॥ ३४॥

असे बोलून महर्षी गौतम पर्वतश्रेष्ठ हिमालयात निघून गेले. हे रघुश्रेष्ठा, त्या दिवसापासून वायुभक्षण करून कठोर तप करणारी अहल्या तुमच्या चरणरजांच्या स्पर्शाची इच्छा करीत, अन्य प्राण्यांना न दिसता, आपल्या पवित्र आश्रमात आजसुद्धा राहात आहे. (३३-३४)

पावयस्व मुनेर्भार्यामहल्यां ब्रह्मणः सुताम् ।
इत्युक्त्वा राघवं हस्ते गृहीत्वा मुनिपुङ्गवः ॥ ३५॥

दर्शयामास चाहल्यामुग्रेण तपसा स्थिताम् ।
रामः शिलां पदा स्पृष्ट्वा तां चापश्यत्तपोधनाम् ॥ ३६॥

हे रामा, आज तुम्ही ब्रह्मदेवाची कन्या आणि गौतम मुनींची पत्नी जी अहल्या हिचा उद्धार करा." असे सांगून रघुनाथाचा हात पकडून, मुनिवर विश्वामित्रांनी, उग्र तपात रत असणारी अहल्या रामांना दाखविली. तेव्हा श्रीरामचंद्रांनी आपल्या पायाने त्या शिळेला स्पर्श करून तपोनिधी अहल्येला पाहिले. (३५-३६)

ननाम राघवोऽहल्यां रामोऽहमिति चाब्रवीत् ।
ततो दृष्ट्वा रघुश्रेष्ठं पीतकौशेयवाससम् ॥ ३७॥

तिला पाहून 'मी राम आहे' असे सांगून भगवान रामांनी तिला प्रणाम केला. तेव्हा रेशमी पीतांबर परिधान केलेल्या श्रीरघुनाथांना अहल्येने (प्रथम विष्णुरूपात) पाहिले. (३७)

चतुर्भुजं शङ्खचक्रगदापङ्कजधारिणम् ।
धनुर्बाणधरं रामं लक्ष्मणेन समन्वितम् ॥ ३८ ॥

त्यांच्या चार हातात शंख, चक्र, गदा आणि पद्म हे शोभत होते. (नंतर रामरूपात पाहिले तेव्हा) त्यांच्या खांद्यावर धनुष्य बाण विराजमान होते. त्यांच्याबरोबर लक्ष्मण होता. (३८)

स्मितवक्त्रं पद्मनेत्रं श्रीवत्साङ्कितवक्षसम् ।
नीलमाणिक्यसङ्काशं द्योतयन्तं दिशो दश ॥ ३९ ॥

त्यांच्या मुखावर स्मित होते. त्यांचे डोळे कमळाप्रमाणे होते. त्यांचे वक्ष:स्थळ हे श्रीवत्सांकाने सुशोभित होते. नील- मण्यासारख्या कांतीने ते दाही दिशा प्रकाशित करीत होते. (३९)

दृष्ट्वा रामं रमानाथं हर्षविस्फारितेक्षणा ।
गौतमस्य वच: स्मृत्वा ज्ञात्वा नारायणं परम् ॥ ४० ॥

संपूज्य विधिवद्राममर्घ्यादिभिरनिन्दिता ।
हर्षाश्रुजलनेत्रान्ता दण्डवत्प्रणिपत्य सा ॥ ४१ ॥

त्या रमानाथ श्रीरामचंद्रांना पाहून अहल्येचे डोळे आनंदाने विस्फारित झाले. तिला मुनिश्रेष्ठ गौतमांच्या वचनांचे स्मरण झाले. तेव्हा ते साक्षात श्रेष्ठ श्रीनारायण आहेत असे जाणून, त्या पुण्यशील अहल्येने अर्घ्य इत्यादींनी श्रीरामांचे विधिवत पूजन केले; त्या वेळी तिचे नेत्र आनंदाश्रूंनी भरले होते. तिने श्रीरामांना दंडवत प्रणाम केला. (४०-४१)

उत्थाय च पुनर्दृष्ट्वा रामं राजीवलोचनम् ।
पुलकाङ्कितसर्वाङ्गा गिरा गद्गदयैलत ॥ ४२ ॥

नंतर उठून उभे राहून आणि पुन: कमलनयन रामांना पाहून तिचे सर्वांग पुलकित झाले आणि ती सद्गदित वाणीने श्रीरामांची स्तुती करू लागली. (४२)

अहल्योवाच

अहो कृतार्थास्मि जगन्निवास ते
पादाब्जसंलग्नरज:कणानहम् ।
स्पृशामि यत्पद्मजशङ्करादिभि-
र्विमृग्यते रन्धितमानसै: सदा ॥ ४३ ॥

**अहल्या म्हणाली** –"हे जगन्निवासा रामा, आज मी कृतार्थ झाले आहे ! तुमच्या ज्या पदरजांचे अनुसंधान ब्रह्मदेव, शंकर इत्यादी देव शुद्ध अंत:करणाने नेहमी करीत असतात, त्या तुमच्या चरणकमलांच्या रज:कणांना मी स्पर्श करीत आहे. (४३)

अहो विचित्रं तव राम चेष्टितं
मनुष्यभावेन विमोहितं जगत् ।
चलस्यजस्रं चरणादिवर्जित:
सम्पूर्ण आनन्दमयोऽतिमायिक: ॥ ४४ ॥

अहो रामा, तुमच्या लीला अनाकलनीय आहेत. तुमच्या मनुष्यरूपामुळे सर्व जग मोहित होत आहे. तुम्ही संपूर्ण, पूर्ण आनंदमय आणि अतिशय मायावी आहात; कारण तुम्ही चरण इत्यादींनी रहित असूनसुद्धा निरंतर चालतच असता. (४४)

यत्पादपङ्कजपरागपवित्रगात्रा
भागीरथी भवविरिञ्चिमुखान्पुनाति ।
साक्षात्स एव मम दृग्विषयो यदास्ते
किं वर्ण्यते मम पुराकृतभागधेयम् ॥ ४५ ॥

ज्यांच्या चरणकमळांच्या परागांनी शरीर पवित्र झालेली भागीरथी नदी शंकर, ब्रह्मदेव इत्यादी जगदीश्वरांनासुद्धा पवित्र करते, तेच तुम्ही आज माझ्यासमोर प्रत्यक्ष उभे आहात. तेव्हा मी माझ्या पूर्व पुण्याईचे किती वर्णन करू? (४५)

मर्त्यावतारे मनुजाकृतिं हरिं
रामाभिधेयं रमणीयदेहिनम् ।
धनुर्धरं पद्मविशाललोचनं
भजामि नित्यं न परान्भजिष्ये ॥ ४६ ॥

परम सुंदर अशा मानव देहात श्रीहरीने या मर्त्यलोकात अवतार घेतला आहे, त्या धनुर्धारी, कमलाप्रमाणे विशाल लोचन असणाऱ्या भगवान रामांना मी नित्य भजते. अन्य दुसऱ्या कोणालाही मी भजू इच्छित नाही. (४६)

यत्पादपङ्कजरज: श्रुतिभिर्विमृग्यं
यन्नाभिपङ्कजभव: कमलासनश्च ।
यन्नामसाररसिको भगवान्पुरारि-
स्तं रामचन्द्रमनिशं हृदि भावयामि ॥ ४७ ॥

ज्यांच्या चरणकमळांचे रज:कण श्रुतींकडून-सुद्धा शोधले जातात, ज्यांच्या नाभीतून उत्पन्न झालेल्या कमळात ब्रह्मदेव प्रकट झाले, तसेच ज्यांच्या नामामृताचे रसिक स्वत: भगवान शंकर आहेत, अशा त्या रामचंद्रांचे मी माझ्या हृदयात अहर्निश ध्यान करते . (४७)

यस्यावतारचरितानि विरिञ्चिलोके
गायन्ति नारदमुखा भवपद्मजाद्याः।
आनन्दजाश्रुपरिषिक्तकुचाग्रसीमा
वागीश्वरी च तमहं शरणं प्रपद्ये ॥ ४८॥

ब्रह्मलोकामध्ये नारद इत्यादी देवर्षिगण, ब्रह्मदेव, शंकर इत्यादी देवेश्वर तसेच आनंदाश्रूंनी जिचे वक्ष भिजले आहेत अशी सरस्वतीसुद्धा ज्यांच्या अवतार-चरित्रांचे निरंतर गायन करते, त्या प्रभूंना मी शरण आले आहे. (४८)

सोऽयं परात्मा पुरुषः पुराण
एकः स्वयंज्योतिरनन्त आद्यः।
मायातनुं लोकविमोहनीयां
धत्ते परानुग्रह एष रामः ॥ ४९॥

ते हे पुराणपुरुष परमात्मा, श्रीराम हे एक, स्वयंप्रकाशी, अनंत आणि सर्वांचे आद्य कारण आहेत. असे असूनही जगाला मोहित करणारे मायामय मानवी रूप लोकांवर परम अनुग्रह करण्यासाठी त्यांनी धारण केले आहे. (४९)

अयं हि विश्वोद्भवसंयमाना-
मेकः स्वमायागुणबिम्बितो यः।
विरिञ्चिविष्ण्वीश्वरनामभेदान्
धत्ते स्वतन्त्रः परिपूर्ण आत्मा ॥ ५०॥

जे एकटेच या विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय करण्यासाठी आपल्या मायेच्या तीन गुणांत प्रतिबिंबित होऊन ब्रह्मदेव, विष्णू आणि महादेव या नावांनी तीन रूपे धारण करतात, तो स्वतंत्र आणि परिपूर्ण असा आत्मा तुम्हीच आहात. (५०)

नमोऽस्तु ते राम तवाङ्घ्रिपङ्कजं
श्रिया धृतं वक्षसि लालितं प्रियात्।
आक्रान्तमेकेन जगत्त्रयं पुरा
ध्येयं मुनीन्द्रैरभिमानवर्जितैः ॥ ५१॥

अहो रामा, तुमची चरणकमळे श्रीलक्ष्मी आपल्या वक्ष:स्थळावर ठेवून प्रेमाने सेवा करते, ज्यांनी पूर्वी (बलिराजाच्या यज्ञामध्ये) एकाच पायाने संपूर्ण त्रैलोक्य व्याप्त केले होते, तसेच अभिमान -रहित अशा मुनिश्रेष्ठांकडून ज्या चरणांचे निरंतर ध्यान केले जाते, त्या तुमच्या चरणकमळांना मी नमस्कार करते. (५१)

जगतामादिभूतस्त्वं जगत्त्वं जगदाश्रयः।
सर्वभूतेष्वसंयुक्त एको भाति भवान्परः ॥ ५२॥

हे प्रभो, तुम्हीच सर्व जगतांचे आदिकारण आहात, तुम्हीच जगद्-रूप आहात, तुम्हीच जगाचे आश्रय आहात. तथापि सर्व चराचराहून तुम्ही अगदी वेगळे आहात आणि अद्वितीय परमात्मरूपाने प्रकाशमान आहात. (५२)

ओंकारवाच्यस्त्वं राम वाचामविषयः पुमान्।
वाच्यवाचकभेदेन भवानेव जगन्मयः ॥ ५३॥

अहो रामा, तुम्ही ॐ कार शब्दाने वाच्य आहात; तसेच वाणीला अगोचर असे परम पुरुष तुम्हीच आहात. हे प्रभो, वाच्य आणि वाचक (=शब्द व अर्थ) या भेदाने तुम्हीच संपूर्ण जगत्- रूप आहात. (५३)

कार्यकारणकर्तृत्वफलसाधनभेदतः।
एको विभासि राम त्वं मायया बहुरूपया ॥ ५४॥

अहो रामा, पुष्कळ रूपे असणाऱ्या मायेच्या आश्रयाने तुम्ही एकटेच कार्य, कारण, कर्तृत्व, फळ आणि साधनांचे भेद यांचे द्वारा अनेक रूपांमध्ये भासमान होता. (५४)

त्वन्मायामोहितधियस्त्वां न जानन्ति तत्त्वतः।
मानुषं त्वाभिमन्यन्ते मायिनं परमेश्वरम् ॥ ५५॥

तुमच्या मायेमुळे ज्यांची बुद्धी मोहित झाली आहे असे लोक तुम्हांला यथार्थपणे जाणत नाहीत. ते मूढ लोक मायापती परमेश्वर अशा तुम्हांला सामान्य माणूस असे समजतात. (५५)

आकाशवत्त्वं सर्वत्र बहिरन्तर्गतोऽमलः।
असङ्गो ह्यचलो नित्यः शुद्धो बुद्धः सदव्ययः ॥ ५६॥

आकाशाप्रमाणे तुम्ही आत-बाहेर, सर्वत्र विराजमान आहात. तुम्ही निर्मळ, असंग, अचल, नित्य, शुद्ध, बुद्ध, सत्-स्वरूप आणि अव्यय आहात. (५६)

योषिन्मूढाहमज्ञा ते तत्त्वं जाने कथं विभो ।
तस्मात्ते शतशो राम नमस्कुर्यामनन्यधीः ॥ ५७॥

मी एक मूढ अज्ञानी स्त्री आहे. अहो विभो, तुमचे सत्य स्वरूप मी कसे बरे जाणू शकेन ? म्हणून अहो रामा, मी अनन्य भावाने तुम्हांला शेकडो वेळा नमस्कार करीत आहे. (५७)

देव मे यत्र कुत्रापि स्थिताया अपि सर्वदा ।
त्वत्पादकमले सक्ता भक्तिरेव सदास्तु मे ॥ ५८॥

अहो देवा, मी जिथे कुठेही असेन, तेथे सर्वत्र सदा तुमच्या पदकमलांचे ठिकाणी माझी अढळ भक्तीच असू दे. (५८)

नमस्ते पुरुषाध्यक्ष नमस्ते भक्तवत्सल ।
नमस्तेऽस्तु हृषीकेश नारायण नमोऽस्तु ते ॥ ५९॥

अहो पुरुषोत्तमा, तुम्हांला नमस्कार असो. अहो भक्तवत्सला, तुम्हांला नमस्कार असो. हे हृषीकेशा, तुम्हांला नमस्कार असो. हे नारायणा, तुम्हांला वारंवार माझा नमस्कार असो. (५९)

भवभयहरमेकं भानुकोटिप्रकाशं
करधृतशरचापं कालमेघावभासम् ।
कनकरुचिरवस्त्रं रत्नवत्कुण्डलाढ्यं
कमलविशदनेत्रं सानुजं राममीडे ॥ ६०॥

जे एक मात्र संसाराचे भय दूर करणारे आहेत, जे कोट्यवधी सूर्यांप्रमाणे प्रकाशमान आहेत, ज्यांनी आपल्या करकमळांत धनुष्य आणि बाण धारण केले आहेत, ज्यांची कांती श्याम मेघाप्रमाणे आहे, ज्यांनी सोन्याप्रमाणे सुंदर असे पीत वस्त्र परिधान केले आहे, जे रत्नाच्या कुंडलांनी सुशोभित आहेत आणि ज्यांचे नेत्र कमलाप्रमाणे विशाल व अतिसुंदर आहेत, अशा लक्ष्मणासह असणाऱ्या श्रीरामांची मी स्तुती करीत आहे." (६०)

स्तुत्वैवं पुरुषं साक्षाद्राघवं पुरतः स्थितम् ।
परिक्रम्य प्रणम्याशु सानुज्ञाता ययौ पतिम् ॥ ६१॥

अशा प्रकारे पुढे असणाऱ्या साक्षात परम पुरुष श्रीरघुनाथांची स्तुती करून, त्यांना प्रदक्षिणा घालून तिने नमस्कार केला, आणि त्यांच्या अनुमतीने ती लगेच पतीकडे निघून गेली. (६१)

अहल्यया कृतं स्तोत्रं यः पठेद्भक्तिसंयुतः ।
स मुच्यतेऽखिलैः पापैः परं ब्रह्माधिगच्छति ॥ ६२॥

अहल्येने केलेले रामाचे हे स्तोत्र जो कोणी भक्तिपूर्वक पठन करील, तो सर्व पापांतून मुक्त होऊन परब्रह्म पदाला प्राप्त होईल. (६२)

पुत्राद्यर्थे पठेद्भक्त्या रामं हृदि निधाय च ।
संवत्सरेण लभते वन्ध्या अपि सुपुत्रकम् ॥ ६३॥

श्रीरामचंद्रांचे हृदयात ध्यान करून पुत्रादींच्या प्राप्तीसाठी जी वंध्या स्त्री या स्तोत्राचे भक्तीने पठन करील, तिला एका वर्षातच चांगला पुत्र प्राप्त होईल. (६३)

सर्वान्कामानवाप्नोति रामचन्द्रप्रसादतः ॥ ६४॥

आणि श्रीरामचंद्रांच्या प्रसादाने तिच्या सर्व इच्छा पूर्ण होतील. (६४)

ब्रह्मघ्नो गुरुतल्पगोऽपि पुरुषः
स्तेयी सुरापोऽपि वा ।
मातृभ्रातृविहिंसकोऽपि सततं
भोगैकबद्धातुरः ।
नित्यं स्तोत्रमिदं जपन् रघुपतिं
भक्त्या हृदिस्थं स्मरन्
ध्यायन्मुक्तिमुपैति किं पुनरसौ
स्वाचारयुक्तो नरः ॥ ६५॥

ब्राह्मणाचा वध करणारा, गुरुपत्नीगमन करणारा, चोरी करणारा, दारू पिणारा, आई-बाप-भाऊ यांची हिंसा करणारा तसेच निरंतर भोगांत रमणारा असा पुरुषसुद्धा जर आपल्या हृदयात विराजमान असणाऱ्या रघुपतींचे भक्तीने नित्य स्मरण करीत आणि ध्यान करीत या स्तोत्राचे नित्य पठन करील, तर त्याला मुक्ती प्राप्त होईल. मग स्वधर्मपरायण अशा पुरुषाबद्दल काय सांगावे? (६५)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकाण्डे अहल्योद्धरणं नाम पंचमः सर्गः ॥ ५॥

# षष्ठ सर्ग

## धनुर्भङ्ग आणि विवाह

*श्रीमहादेव उवाच*

विश्वामित्रोऽथ तं प्राह राघवं सहलक्ष्मणम् ।
गच्छामो वत्स मिथिलां जनकेनाभिपालिताम् ॥ १ ॥

**श्रीभगवान शंकर म्हणाले**– त्यानंतर लक्ष्मण व श्रीरामचंद्रांना विश्वामित्र म्हणाले, "वत्सांनो, महाराज जनकांनी पालन केलेल्या मिथिला नगरीला आता आपण जाऊ या. (१)

दृष्ट्वा क्रतुवरं पश्चादयोध्यां गन्तुमर्हसि ।
इत्युक्त्वा प्रययौ गङ्गामुत्तर्तुं सहराघवः ।
तस्मिन्काले नाविकेन निषिद्धो रघुनन्दनः ॥ २ ॥

तेथील उत्कृष्ट यज्ञोत्सव पाहून मग तुम्ही अयोध्या नगरीला परत जा." असे बोलून ते रघुनाथांना घेऊन, गंगा पार करून जाण्यास गंगेच्या तटावर आले. त्या वेळी नावाड्याने रघुनाथांना नावेत चढण्यास मनाई केली. (२)

*नाविक उवाच*

क्षालयामि तव पादपङ्कजं
नाथ दारुदृषदोः किमन्तरम् ।
मानुषीकरणचूर्णमस्ति ते
पादयोरिति कथा प्रथीयसी ॥ ३ ॥

**नाविक म्हणाला** – "हे नाथा, तुमच्या पायाला मनुष्य बनविणारे चूर्ण आहे, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. (नुकतेच तुम्ही एका शिळेला स्त्री बनविले आहे.) मग शिळा आणि लाकूड यांत फरक तो काय आहे? म्हणून नौकेवर चढण्यापूर्वी मी तुमचे चरणकमल धुतो. (३)

पादाम्बुजं ते विमलं हि कृत्वा
पश्चात्परं तीरमहं नयामि ।
नोचेत्तरी सद्युवती मलेन
स्याच्चेद्विभो विद्धि कुटुम्बहानिः ॥ ४ ॥

अशा प्रकारे तुमचे चरणकमल धुऊन मग मी तुम्हांला श्रीगंगानदीच्या पलीकडल्या तीरावर घेऊन जाईन. नाहीतर हे विभो, तुमच्या चरणधुळीच्या स्पर्शाने जर माझी ही नौका सुंदर तरुणी बनली, तर माझ्या कुटुंबाला उदरनिर्वाहाचे साधन उरणार नाही. " (४)

इत्युक्त्वा क्षालितौ पादौ परं तीरं ततो गताः ।
कौशिको रघुनाथेन सहितो मिथिलां ययौ ॥ ५ ॥

असे म्हणून नावाड्याने श्रीरामांचे चरण धुतले. मग त्याने त्यांना आनंदाने पैलतीराला नेले. तेथून लक्ष्मण व श्रीराम यांच्यासह श्रीविश्वामित्र मिथिला नगरीला गेले. (५)

विदेहस्य पुरं प्रातर्ऋषिवाटं समाविशत् ।
प्राप्तं कौशिकमाकर्ण्य जनकोऽतिमुदान्वितः ॥ ६ ॥

पूजाद्रव्याणि संगृह्य सोपाध्यायः समाययौ ।
दण्डवत्प्रणिपत्याथ पूजयामास कौशिकम् ॥ ७ ॥

प्रात:काळी ते विदेहाच्या नगरात पोचल्यावर ऋषींच्यासाठी असणाऱ्या निवासस्थानी उतरले. विश्वामित्र आल्याचे ऐकून अतिशय आनंदाने जनक राजा पूजेची सामग्री घेऊन, आपले पुरोहित शतानंद यांना बरोबर घेऊन तेथे आले आणि साष्टांग प्रणाम करून त्यांनी विश्वामित्रांची पूजा केली. (६-७)

पप्रच्छ राघवौ दृष्ट्वा सर्वलक्षणसंयुतौ ।
द्योतयन्तौ दिशः सर्वाश्चन्द्रसूर्याविवापरौ ॥ ८ ॥

त्यानंतर सर्व लक्षणांनी संपन्न, जणू दुसऱ्या सूर्य-चंद्राप्रमाणे आपल्या तेजाने सर्व दिशांना देदीप्यमान करणाऱ्या त्या दोघा रघुकुलातील कुमारांना पाहून, जनकांनी विचारले. (८)

कस्यैतौ नरशार्दूलौ पुत्रौ देवसुतोपमौ ।
मनःप्रीतिकरौ मेऽद्य नरनारायणाविव ॥ ९ ॥

"देव-पुत्रांप्रमाणे असणारे हे दोन नरोत्तम कुणाचे पुत्र आहेत? या प्रसंगी हे दोघे नर-नारायणाप्रमाणे माझ्या मनात प्रीती उत्पन्न करीत आहेत." (९)

प्रत्युवाच मुनिः प्रीतो हर्षयन् जनकं तदा ।
पुत्रौ दशरथस्यैतौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ॥ १० ॥

तेव्हा महाराज जनकांना आनंद देत मुनिश्रेष्ठ विश्वामित्र प्रसन्नतापूर्वक म्हणाले, "हे दोन भाऊ राम आणि लक्ष्मण, राजा दशरथांचे पुत्र आहेत. (१०)

मखसंरक्षणार्थाय मयानीतौ पितुः पुरात् ।
आगच्छन् राघवो मार्गे ताटकां विश्वघातिनीम् ॥ ११ ॥

शरेणैकेन हतवान्नोदितो मेऽतिविक्रमः ।
ततो ममाश्रमं गत्वा मम यज्ञविहिंसकान् ॥ १२ ॥

सुबाहुप्रमुखान्हत्वा मारीचं सागरेऽक्षिपत् ।
ततो गङ्गातटे पुण्ये गौतमस्याश्रमं शुभम् ॥ १३ ॥

गत्वा तत्र शिलारूपा गौतमस्य वधूः स्थिता ।
पादपङ्कजसंस्पर्शात्कृता मानुषरूपिणी ॥ १४ ॥

यज्ञाच्या रक्षणासाठी मी त्यांना त्यांच्या पित्याच्या अयोध्या नगरीतून आणले होते. येताना रस्त्यात माझ्या प्रेरणेने या अतिशय पराक्रमी रघुनाथांनी एकाच बाणाने जगाला त्रास देणाऱ्या ताटकेला ठार केले. त्यानंतर माझ्या आश्रमात येऊन माझ्या यज्ञाचा विध्वंस करणाऱ्या सुबाहू इत्यादी राक्षसांना त्यांनी मारून टाकले आणि मारीचाला शेकडो योजने दूर समुद्रात फेकून दिले. नंतर गंगेच्या पावन तीरावरील महर्षी गौतमांच्या पवित्र आश्रमात जाऊन, तेथे त्यांनी शिळारूपात असणाऱ्या गौतमपत्नीला पाहून आपल्या चरण-कमळांच्या स्पर्शाने मनुष्य-रूप दिले. (११-१४)

दृष्ट्वाहल्यां नमस्कृत्य तया सम्यक्प्रपूजितः ।
इदानीं द्रष्टुकामस्ते गृहे माहेश्वरं धनुः ॥ १५ ॥

पूजितं राजभिः सर्वैर्दृष्टमित्यनुशुश्रुवे ।
अतो दर्शय राजेन्द्र शैवं चापमनुत्तमम् ।
दृष्ट्वायोध्यां जिगमिषुः पितरं द्रष्टुमिच्छति ॥ १६ ॥

अहल्येला पाहून रामांनी तिला नमस्कार केला. त्यानंतर तिच्याकडून यथासांग पूजा स्वीकारून आता ते तुमच्या राजभवनात शंकरांचे पूज्य धनुष्य पाहण्यास आले आहेत. आम्ही असे ऐकले आहे की सर्व राजे ते धनुष्य केवळ पाहून गेले आहेत. (परंतु कोणीही त्यावर बाण लावू शकला नाही.) म्हणून हे राजेंद्रा, महादेवांचे ते अतिशय उत्तम धनुष्य तुम्ही त्यांना दाखवा. ते धनुष्य पाहिल्यावर, ते आपल्या मातापित्यांना भेटण्यास लौकरच अयोध्येला जाऊ इच्छितात." (१५-१६)

इत्युक्तो मुनिना राजा पूजार्हाविति पूजया ।
पूजयामास धर्मज्ञो विधिदृष्टेन कर्मणा ॥ १७ ॥

मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांनी असे सांगितल्यावर, धर्मज्ञ जनकांनी राम व लक्ष्मण पूजनीय आहेत, असे जाणून त्यांची विधिपूर्वक पूजा केली. (१७)

ततः सम्प्रेषयामास मन्त्रिणं बुद्धिमत्तरम् ।
शीघ्रमानय विश्वेशचापं रामाय दर्शय ॥ १८ ॥

त्यानंतर राजा जनकांनी आपल्या अतिशय बुद्धिमान मंत्र्यास बोलाविले आणि श्रीविश्वेश्वर शंकराचे धनुष्य त्वरित आणवून ते रामचंद्राला दाखविण्यास सांगितले. (१८)

ततो गते मन्त्रिवरे राजा कौशिकमब्रवीत् ।
यदि रामो धनुर्धृत्वा कोट्यामारोपयेद्गुणम् ॥ १९ ॥

तदा मयात्मजा सीता दीयते राघवाय हि ।
तथेति कौशिकोऽप्याह रामं संवीक्ष्य सस्मितम् ॥ २० ॥

मंत्री निघून गेल्यावर राजा जनक विश्वामित्रांना म्हणाले "ते धनुष्य सज्ज करून जर रामचंद्र त्याला दोरी लावतील तर मी रामांना माझी कन्या सीता देईन." तेव्हा स्मित करीत रामांकडे पाहून विश्वामित्रही म्हणाले, "ठीक आहे. (१९-२०)

शीघ्रं दर्शय चापाग्र्यं रामायामिततेजसे ।
एवं ब्रुवति मौनीश आगताश्चापवाहकाः ॥ २१ ॥

हे राजा, तुम्ही लागलीच ते श्रेष्ठ धनुष्य अत्यंत तेजस्वी रामांना दाखवा." ते मुनिश्रेष्ठ असे बोलत आहेत तोच अतिशय बलवान असे पाच हजार धनुष्य-वाहक धनुष्य घेऊन तेथे आले. त्या धनुष्याला शेकडो घंटा

चापं गृहीत्वा बलिनः पञ्चसाहस्त्रसङ्ख्यकाः।
घण्टाशतसमायुक्तं मणिवज्रादिभूषितम् ॥ २२ ॥

बांधलेल्या होत्या. तसेच हिरे इत्यादी रत्नांनी ते मढविले होते. (२१-२२)

दर्शयामास रामाय मन्त्री मन्त्रयतां वरः ।
दृष्ट्वा रामः प्रहृष्टात्मा बद्ध्वा परिकरं दृढम् ॥ २३ ॥

गृहीत्वा वामहस्तेन लीलया तोलयन् धनुः।
आरोपयामास गुणं पश्यत्स्वखिलराजसु ॥ २४ ॥

तेव्हा त्या मंत्रिश्रेष्ठाने श्रीरामांना ते धनुष्य दाखविले. प्रसन्नचित्त असणाऱ्या श्रीरामांनी ते पाहताच कंबर कसून सहजपणे ते धनुष्य डाव्या हाताने उचलून वर धरले, आणि सर्व राजेलोकांच्या देखत त्यांनी धनुष्यावर दोरी चढविली. (२३-२४)

ईषदाकर्षयामास पाणिना दक्षिणेन सः।
बभञ्जाखिलहृत्सारो दिशः शब्देन पूरयन् ॥ २५ ॥

नंतर सर्वांच्या हृदयात साररूपाने असणाऱ्या भगवान श्रीरामांनी आपल्या उजव्या हाताने ते धनुष्य थोडेसे ओढले तोच ते धनुष्य मोडून पडले आणि त्या आवाजाने दाही दिशा भरून गेल्या. (२५)

दिशश्च विदिशश्चैव स्वर्गं मर्त्यं रसातलम् ।
तदद्भुतमभूत्तत्र देवानां दिवि पश्यताम् ॥ २६ ॥

आच्छादयन्तः कुसुमैर्देवाः स्तुतिभिरीडिरे ।
देवदुन्दुभयो नेदुर्ननृतुश्चाप्सरोगणाः ॥ २७ ॥

दिशा, उपदिशा, स्वर्ग-लोक, मर्त्य लोक आणि रसातळ इत्यादी सर्व लोक त्या आवाजाने दुमदुमून गेले. हे पाहणाऱ्या स्वर्गलोकातील देवांना आश्चर्य वाटले. देवांनी भगवान श्रीरामांवर अमाप पुष्पवर्षाव केला आणि त्यांची स्तुती केली. देव नगारे वाजवू लागले, आणि अप्सरांचे समूह नाचू लागले. (२६-२७)

द्विधा भग्नं धनुर्दृष्ट्वा राजालिङ्ग्य रघूद्वहम् ।
विस्मयं लेभिरे सीतामातरोऽन्तःपुराजिरे ॥ २८ ॥

धनुष्याचे दोन तुकडे झालेले पाहून महाराज जनकांनी रघुनाथांना आलिंगन दिले. इकडे अंत:पुरातील अंगणामध्ये जमलेल्या सीतेच्या माता अत्यंत आश्चर्यचकित झाल्या. (२८)

सीता स्वर्णमयीं मालां गृहीत्वा दक्षिणे करे ।
स्मितवक्त्रा स्वर्णवर्णा सर्वाभरणभूषिता ॥ २९ ॥

त्यानंतर सर्व अलंकारांनी विभूषित, सुहास्य - वदना, सुवर्णाप्रमाणे कांती असणारी सीता आपल्या उजव्या हातात सुवर्ण वरमाला घेऊन तेथे आली. (२९)

मुक्ताहारैः कर्णपत्रैः क्वणच्चरणनूपुरा ।
दुकूलपरिसंवीता वस्त्रान्तर्व्यञ्जितस्तनी ॥ ३० ॥

मोत्यांचे हार, कर्णफुले, आणि रुणझुण आवाज करणारी नूपुरे व सुंदर पैठणी इत्यादी ल्यालेल्या सीतेचे सौंदर्य झळकत होते. (३०)

रामस्योपरि निक्षिप्य स्मयमाना मुदं ययौ ।
ततो मुमुदिरे सर्वे राजदाराः स्वलङ्कृतम् ॥ ३१ ॥

गवाक्षजालरन्ध्रेभ्यो दृष्ट्वा लोकविमोहनम् ।
ततोऽब्रवीन्मुनिं राजा सर्वशास्त्रविशारदः ॥ ३२ ॥

तेव्हा स्मित करीत श्रीरामांच्या गळ्यात वरमाला घालताना तिला परम आनंद झाला. त्या वेळी सकल अलंकारांनी उत्तम प्रकारे विभूषित, भुवन-मोहन रामचंद्रांचे ते रूप गवाक्षांच्या जाळ्यांतून पाहून जनक राजांच्या सर्व राण्या आनंदित झाल्या. मग सर्व शास्त्रांत विशारद असणाऱ्या जनक राजांनी मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना म्हटले. (३१-३२)

भो कौशिक मुनिश्रेष्ठ पत्रं प्रेषय सत्वरम् ।
राजा दशरथः शीघ्रमागच्छतु सपुत्रकः ॥ ३३ ॥

विवाहार्थं कुमाराणां सदारः सहमन्त्रिभिः ।
तथेति प्रेषयामास दूतांस्त्वरितविक्रमान् ॥ ३४ ॥

"हे मुनिश्रेष्ठ विश्वामित्रा, तुम्ही सत्वर महाराज दशरथांना पत्र पाठवा की आपल्या कुमारांच्या विवाहासाठी आपले पुत्र, राण्या आणि मंत्री यांच्यासह त्यांनी येथे या." तेव्हा 'ठीक आहे' असे बोलून विश्वामित्रांनी शीघ्रगामी दूतांना दशरथांकडे पाठविले. (३३-३४)

ते गत्वा राजशार्दूलं रामश्रेयो न्यवेदयन् ।
श्रुत्वा रामकृतं राजा हर्षेण महताप्लुतः ॥ ३५ ॥

अयोध्येला जाऊन, त्या दूतांनी राजश्रेष्ठ दशरथांना श्रीरामांची मंगल कीर्तिवार्ता सांगितली. रामचंद्रांनी केलेल्या त्या अद्भुत कृत्याची हकीकत ऐकून महाराज दशरथ परमानंदात बुडाले. (३५)

मिथिलागमनार्थाय त्वरयामास मन्त्रिणः ।
गच्छन्तु मिथिलां सर्वे गजाश्वरथपत्तयः ॥ ३६ ॥

मिथिला नगरीत जाण्यासाठी दशरथांनी त्वरा करण्यास मंत्र्यांना सांगितले. ते म्हणाले, " हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ सैन्य यांच्यासह सर्व लोक मिथिला पुरीला जाऊ देत. (३६)

रथमानय मे शीघ्रं गच्छाम्यद्यैव मा चिरम् ।
वसिष्ठस्त्वग्रतो यातु सदारः सहितोऽग्निभिः ॥ ३७ ॥

राममातृः समादाय मुनिर्मे भगवान् गुरुः ।
एवं प्रस्थाप्य सकलं राजर्षिर्विपुलं रथम् ॥ ३८ ॥

महत्या सेनया सार्धमारुह्य त्वरितो ययौ ।
आगतं राघवं श्रुत्वा राजा हर्षसमाकुलः ॥ ३९ ॥

प्रत्युज्जगाम जनकः शतानन्दपुरोधसा ।
यथोक्तपूजया पूज्यं पूजयामास सत्कृतम् ॥ ४० ॥

त्वरित माझा रथ आणा. उशीर करू नका. मी आजच मिथिलेस जाण्यास निघेन. अरुंधती पत्नीसह आणि अग्नीसह माझे गुरू मुनिश्रेष्ठ वसिष्ठ हे रामाच्या मातांना बरोबर घेऊन सर्वांच्या पुढे चालू देत." अशा प्रकारे सर्वांना कूच करावयास लावून, आणि विशाल रथावर आरूढ होऊन, राजर्षी दशरथ आपल्या चतुरंग सेनेसह लागलीच मिथिला नगरीकडे निघाले. रघुकुलतिलक दशरथ आले आहेत, हे ऐकून महाराज जनक आनंदविभोर झाला. शतानंद नावाच्या पुरोहितासह जनक राजा दशरथांना सामोरा गेला आणि त्याने पूज्य दशरथांचा यथोचित सत्कार करून त्याची पूजा केली. (३७- ४०)

रामस्तु लक्ष्मणेनाशु ववन्दे चरणौ पितुः ।
ततो हृष्टो दशरथो रामं वचनमब्रवीत् ॥ ४१ ॥

त्यानंतर लक्ष्मणासहित श्रीरामांनी पित्याच्या चरणांना वंदन केले. तेव्हा आनंदित झालेले दशरथ श्रीरामांना म्हणाले. (४१)

दिष्ट्या पश्यामि ते राम मुखं फुल्लाम्बुजोपमम् ।
मुनेरनुग्रहात्सर्वं सम्पन्नं मम शोभनम् ॥ ४२ ॥

"अरे रामा, मोठ्या भाग्याने आज मी प्रफुल्लित कमलाप्रमाणे असणारे तुझे मुख पाहात आहे. मुनिश्रेष्ठांच्या अनुग्रहाने सर्व प्रकारे माझे कल्याण झाले आहे. " (४२)

इत्युक्त्वाघ्राय मूर्धानमालिङ्ग्य च पुनः पुनः ।
हर्षेण महताविष्टो ब्रह्मानन्दं गतो यथा ॥ ४३ ॥

असे बोलून रामांच्या मस्तकाचे अवघ्राण करून आणि पुनः पुनः त्यांना आलिंगन देऊन, अत्यंत आनंदित झालेले दशरथ राजा जणू ब्रह्मानंदात बुडून गेले. (४३)

ततो जनकराजेन मन्दिरे सन्निवेशितः ।
शोभने सर्वभोगाढ्ये सदारः ससुतः सुखी ॥ ४४ ॥

त्यानंतर जनकाने सर्व राजकुमार आणि राण्या यांच्यासह आनंदी दशरथांना, सर्व सोयींनी पूर्ण असणाऱ्या परम सुंदर महालात उतरविले. (४४)

ततः शुभे दिने लग्ने सुमुहूर्ते रघूत्तमम् ।
आनयामास धर्मज्ञो रामं सभ्रातृकं तदा ॥ ४५ ॥

त्यानंतर एका शुभ दिवशी शुभ लग्न असणाऱ्या सुमुहूर्तावर, धर्मज्ञ जनकांनी श्रीरामांना भावांसह बोलावून घेतले. (४५)

रत्नस्तम्भसुविस्तारे सुविताने सुतोरणे ।
मण्डपे सर्वशोभाढ्ये मुक्तापुष्पफलान्विते ॥ ४६ ॥

त्यानंतर रत्नजडित स्तंभ असणाऱ्या, सुंदर छत, मनोहर तोरणे, मोती, फुले, फळे यांनी युक्त तसेच सर्व प्रकारच्या शोभादायक वस्तूंनी संपन्न असा विस्तृत मंडपच घातला होता. तेथे सुवर्ण अलंकारांनी भूषित असे वेदवेत्ते

वेदविद्भिः सुसम्बाधे ब्राह्मणैः स्वर्णभूषितैः ।
सुवासिनीभिः परितो निष्ककण्ठीभिरावृते ॥ ४७ ॥

भेरीदुन्दुभिनिर्घोषैर्गीतनृत्यैः समाकुले ।
दिव्यरत्नाञ्चिते स्वर्णपीठे रामं न्यवेशयत् ॥ ४८ ॥

ब्राह्मण होते. गळ्यात सोन्याचे अलंकार घातलेल्या सुवासिनी स्त्रिया तेथे आजूबाजूला वावरत होत्या. त्या विस्तीर्ण मंडपात जनकांनी श्रीरामचंद्रांना एका दिव्य रत्नजडित सोन्याच्या सिंहासनावर बसविले. त्या वेळी तुताऱ्या, नगारे इत्यादी वाद्यांच्या मंगल ध्वनीने तसेच नृत्य, गायन यांनी मंडप गजबजून गेला होता. (४६-४८)

वसिष्ठं कौशिकं चैव शतानन्दः पुरोहितः ।
यथाक्रमं पूजयित्वा रामस्योभयपार्श्वयोः ॥ ४९ ॥

स्थापयित्वा स तत्राग्निं ज्वालयित्वा यथाविधि ।
सीतामानीय शोभाढ्यां नानारत्नविभूषिताम् ॥ ५० ॥

सभार्यो जनकः प्रायाद्रामं राजीवलोचनम् ।
पादौ प्रक्षाल्य विधिवत्तदपो मूर्ध्न्यधारयत् ॥ ५१ ॥

त्यानंतर वसिष्ठ ऋषी आणि विश्वामित्र यांचे क्रमशः पूजन करून शतानंद पुरोहिताने त्यांना रामचंद्रांच्या दोन्ही बाजूंना बसविले. तेथे त्याने विधिपूर्वक अग्नी प्रज्वलित केला. नंतर नाना रत्नालंकारांनी विभूषित आणि अतिशय सुंदर अशा सीतेला घेऊन, महाराणीसह महाराज जनक कमलनयन रामांजवळ गेले, आणि विधिपूर्वक त्यांचे चरण धुऊन, ते चरणोदक त्यांनी आपल्या मस्तकावर धारण केले. (४९-५१)

या धृता मूर्ध्नि शर्वेण ब्रह्मणा मुनिभिः सदा ।
ततः सीतां करे धृत्वा साक्षतोदकपूर्वकम् ॥ ५२ ॥

रामाय प्रददौ प्रीत्या पाणिग्रहविधानतः ।
सीता कमलपत्राक्षी स्वर्णमुक्तादिभूषिता ॥ ५३ ॥

दीयते मे सुता तुभ्यं प्रीतो भव रघूत्तम ।
इति प्रीतेन मनसा सीतां रामकरेऽर्पयन् ॥ ५४ ॥

मुमोद जनको लक्ष्मीं क्षीराब्धिरिव विष्णवे ।
ऊर्मिलां चौरसीं कन्यां लक्ष्मणाय ददौ मुदा ॥ ५५ ॥

हेच चरणोदक शिव, ब्रह्मदेव आणि इतर मुनिजन नेहमी आपल्या मस्तकांवर धारण करतात. नंतर सीतेचा एक हात धरून, पाणिग्रहणाच्या विधीप्रमाणे, अक्षता व पाणी यांसह जनकांनी आनंदाने श्रीरामांना सीतेचे दान केले, आणि ते म्हणाले, "हे रघुश्रेष्ठा, सुवर्णालंकार, मोती इत्यादींनी विभूषित कमलनयना अशी माझी कन्या सीता मी तुम्हांला देत आहे. याने तुम्ही प्रसन्न व्हा." अशा प्रकारे संतुष्ट मनाने सीतेला श्रीरामचंद्रांच्या करकमळी अर्पण करून, ज्या प्रमाणे भगवान श्रीविष्णूंच्या करकमळी लक्ष्मीला अर्पण केल्यावर क्षीरसागर हा आनंद-मग्न झाला, त्याप्रमाणे जनक आनंदमग्न झाले. त्यानंतर त्यांनी आनंदाने आपली औरस कन्या ऊर्मिला लक्ष्मणाला दिली. (५२-५५)

तथैव श्रुतकीर्तिं च माण्डवीं भ्रातृकन्यके ।
भरताय ददावेकां शत्रुघ्नायापरां ददौ ॥ ५६ ॥

तसेच मांडवी आणि श्रुतकीर्ती यांतील आपल्या भावाची पहिली मुलगी भरताला आणि दुसरी शत्रुघ्नाला दिली. (५६)

चत्वारो दारसम्पन्ना भ्रातरः शुभलक्षणाः ।
विरेजुः प्रभया सर्वे लोकपाला इवापरे ॥ ५७ ॥

अशा प्रकारे शुभ लक्षणांनी संपन्न आणि पत्नींनी युक्त असे ते सर्व चारही भाऊ आपल्या तेजाने साक्षात लोकपालांप्रमाणे शोभू लागले. (५७)

ततोऽब्रवीद्वसिष्ठाय विश्वामित्राय मैथिलः ।
जनकः स्वसुतोदन्तं नारदेनाभिभाषितम् ॥ ५८ ॥

त्यानंतर मिथिलापती जनकांनी आपली मुलगी जानकी हिच्या बाबतीत नारदाने पूर्वी जो वृत्तांत सांगितला होता, तो सर्व वसिष्ठ आणि विश्वामित्र यांना सांगितला. (५८)

यज्ञभूमिविशुद्ध्यर्थं कर्षतो लाङ्गलेन मे ।
सीतामुखात्समुत्पन्ना कन्यका शुभलक्षणा ॥ ५९ ॥

तामद्राक्षमहं प्रीत्या पुत्रिकाभावभाविताम् ।
अर्पिता प्रियभार्यायै शरच्चन्द्रनिभानना ॥ ६० ॥

एकदा नारदोऽभ्यागाद्विविक्ते मयि संस्थिते ।
रणयन्महतीं वीणां गायन्नारायणं विभुम् ॥ ६१ ॥

पूजितः सुखमासीनो मामुवाच सुखान्वितः ।
शृणुष्व वचनं गुह्यं तवाभ्युदयकारणम् ॥ ६२ ॥

परमात्मा हृषीकेशो भक्तानुग्रहकाम्यया ।
देवकार्यार्थसिद्ध्यर्थं रावणस्य वधाय च ॥ ६३ ॥

जातो राम इति ख्यातो मायामानुषवेषधृक् ।
आस्ते दाशरथिर्भूत्वा चतुर्धा परमेश्वरः ॥ ६४ ॥

योगमायापि सीतेति जाता वै तव वेश्मनि ।
अतस्त्वं राघवायैव देहि सीतां प्रयत्नतः ॥ ६५ ॥

नान्येभ्यः पूर्वभार्यैषा रामस्य परमात्मनः ।
इत्युक्त्वा प्रययौ देवगतिं देवमुनिस्तदा ॥ ६६ ॥

तदारभ्य मया सीता विष्णोर्लक्ष्मीर्विभाव्यते ।
कथं मया राघवाय दीयते जानकी शुभा ॥ ६७ ॥

इति चिन्तासमाविष्टः कार्यमेकमचिन्तयम् ।
मत्पितामहगेहे तु न्यासभूतमिदं धनुः ॥ ६८ ॥

ईश्वरेण पुरा क्षिप्तं पुरदाहादनन्तरम् ।
धनुरेतत्पणं कार्यमिति चिन्त्य कृतं तथा ॥ ६९ ॥

सीतापाणिग्रहार्थाय सर्वेषां माननाशनम् ।
त्वत्प्रसादान्मुनिश्रेष्ठ रामो राजीवलोचनः ॥ ७० ॥

आगतोऽत्र धनुर्द्रष्टुं फलितो मे मनोरथः ।
अद्य मे सफलं जन्म राम त्वां सह सीतया ॥ ७१ ॥

जनक म्हणाले- "एकदा यज्ञभूमीच्या शुद्धीसाठी मी जमीन नांगरीत असताना, शुभ लक्षणे असणारी ही चंद्रवदना कन्या सीता नांगराच्या अग्रभागातून उत्पन्न झाली आहे. (५९)

त्या वेळी प्रेमामुळे माझ्या मनात तिच्याविषयी माझी कन्या असा भाव उत्पन्न झाला. तेव्हा शरद् ऋतूतील चंद्राप्रमाणे मुख असणाऱ्या या सीतेला मी माझ्या प्रिय पत्नीच्या स्वाधीन केले. (६०)

एकदा मी जेव्हा एकांत स्थानी बसलो होतो त्या वेळी आपली महती नावाची वीणा वाजवीत आणि मुखाने सर्वव्यापक नारायणाचे गुण गात महर्षी नारद माझ्याजवळ आले. (६१)

आदर-सत्कार झाल्यावर प्रसन्नतेने ते बसले आणि मला म्हणाले, "हे राजा, तुझ्या अभ्युदयाचे कारण असणारे हे परम गुह्य वचन ऐका. (६२)

भक्तांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेने, देवांचे कार्य सिद्ध करण्यासाठी व रावणाचा वध करण्यासाठी परमात्मा हृषीकेश माया-मानव वेष धारण करून जन्माला आले आहेत आणि ते राम या नावाने विख्यात आहेत. ते परमेश्वर आपल्या चार अंशांनी दशरथाचे पुत्र होऊन अयोध्येत राहात आहेत. (६३-६४)

तसेच परमेश्वराची योगमाया हीसुद्धा सीता या रूपाने तुमच्या घरी जन्माला आली आहे. म्हणून तुम्ही प्रयत्नपूर्वक ही सीता श्रीरामांनाच द्या. अन्य कुणालाही देऊ नका. कारण ही सीता पूर्वीपासून परमात्म्या रामांची भार्या आहे." असे सांगून देवर्षी नारद आकाश मार्गाने निघून गेले. (६५-६६)

तेव्हापासून ही सीता म्हणजे भगवान विष्णूंची भार्या लक्ष्मी आहे असेच मी समजत आहे. ही शुभलक्षणा जानकी कशा प्रकारे रघुनाथांना देता येईल या विचारात मी गुंतलो असताना, मी एक युक्ती लढविली. पूर्वी श्रीमहादेवाने त्रिपुरासुराची पुरे जाळल्यावर हे धनुष्य माझ्या आजोबांच्या घरी ठेव म्हणून ठेवले होते. सीतेच्या पाणिग्रहणासाठी, सर्वांचा गर्वहरण करणारे हे धनुष्यच पण म्हणून ठेवावयास हवे, असा विचार मी केला. हे मुनिश्रेष्ठा, तुमच्या कृपेने कमलनयन राम हे धनुष्य पाहण्यास येथे आले; यामुळे माझा मनोरथ सिद्ध झाला. हे रामा, सूर्याप्रमाणे देदीप्यमान अशा तुम्हांला सीतेबरोबर एकाच आसनावर

एकासनस्थं पश्यामि भ्राजमानं रविं यथा ।
त्वत्पादाम्बुधरो ब्रह्मा सृष्टिचक्रप्रवर्तक: ॥ ७२ ॥

विराजमान झालेले पाहून, आज माझा जन्म सफळ झाला. हे रामा, तुमचे चरणोदक मस्तकावर धारण करूनच ब्रह्मदेव हा सृष्टिचक्राचा प्रवर्तक झाला आहे. (६७-७२)

बलिस्त्वत्पादसलिलं धृत्वाभूद्दिविजाधिप: ।
त्वत्पादपांसुसंस्पर्शादहल्या भर्तृशापत: ॥ ७३ ॥

सद्य एव विनिर्मुक्ता कोन्यस्त्वत्तोऽधिरक्षिता ॥ ७४ ॥

तुमच्या चरणोदकाच्या सामर्थ्याने बलीला इंद्रपद प्राप्त झाले आणि तुमच्या चरण-धुळीच्या स्पर्शाने अहल्या तत्काळच पतीच्या शापातून मुक्त झाली, तुमच्यापेक्षा दुसरा असा कोण बरे आमचा रक्षक आहे? (७३-७४)

यत्पादपङ्कजपरागसुरागयोगि-
वृन्दैर्जितं भवभयं जितकालचक्रै: ।
यन्नामकीर्तनपरा जितदु:खशोका
देवास्तमेव शरणं सततं प्रपद्ये ॥ ७५ ॥

कालचक्र जिंकणाऱ्या योग्यांच्या समूहांनी तुमच्या पादकमलांच्या परागावर अतिशय प्रेम करून संसाराचे भय सुद्धा जिंकले आहे, तसेच ज्यांच्या नामकीर्तनात तत्पर होऊन देवांनी दु:ख आणि शोक जिंकले आहेत, अशा त्या तुमच्या चरणी मी निरंतर शरण आलो आहे." (७५)

इति स्तुत्वा नृप: प्रादाद्राघवाय महात्मने ।
दीनाराणां कोटिशतं रथानामयुतं तदा ॥ ७६ ॥

अश्वानां नियुतं प्रादाद्गजानां षट्शतं तथा ।
पत्तीनां लक्षमेकं तु दासीनां त्रिशतं ददौ ॥ ७७ ॥

अशा प्रकारे श्रीरामांची स्तुती करून, शंभर कोटी सुवर्ण मुद्रा, दहा हजार रथ, दहा लक्ष घोडे, सहाशे हत्ती, एक लक्ष पायदळ सैन्य आणि तीनशे दासी जनक महाराजांनी महात्म्या श्रीरामांना दिल्या. (७६-७७)

दिव्याम्बराणि हारांश्च मुक्तारत्नमयोज्ज्वलान् ।
सीतायै जनक: प्रादात्प्रीत्या दुहितृवत्सल: ॥ ७८ ॥

अनेक दिव्य वस्त्रे तसेच मोती व रत्ने घालून तयार केलेले उज्ज्वल हार कन्यावत्सल जनकांनी प्रेमाने सीतेला दिले. (७८)

वसिष्ठादीन्सुसंपूज्य भरतं लक्ष्मणं तथा ।
पूजयित्वा यथान्यायं तथा दशरथं नृपम् ॥ ७९ ॥

प्रस्थापयामास नृपो राजानं रघुसत्तमम् ।
सीतामालिङ्ग्य रुदतीं मातर: साश्रुलोचना: ॥ ८० ॥

त्यानंतर वसिष्ठ इत्यादींची व्यवस्थित पूजा केल्यावर, भरत, लक्ष्मण आणि शत्रुघ्न, तसेच दशरथ राजा यांचा यथोचित सत्कार करून, जनक राजांनी रघुश्रेष्ठ महाराज दशरथाला निरोप दिला. त्या प्रसंगी रुदन करणाऱ्या सीतेला आलिंगन देऊन, डोळ्यांत अश्रू आलेल्या माता सीतेला म्हणाल्या. (७९-८०)

श्वश्रूशुश्रूषणपरा नित्यं राममनुव्रता ।
पातिव्रत्यमुपालम्ब्य तिष्ठ वत्से यथासुखम् ॥ ८१ ॥

"मुली, सासूच्या सेवेत तत्पर होऊन तू सदा रामचंद्रांच्या मनाप्रमाणे वागून, पतिव्रता धर्माचा अवलंब करून आनंदात राहा." (८१)

प्रयाणकाले रघुनन्दनस्य
भेरीमृदङ्गानकतूर्यघोष: ।
स्वर्वासिभेरीघनतूर्यशब्दै:
संमूर्च्छितो भूतभयङ्करोऽभूत् ॥ ८२ ॥

त्यानंतर रघुकुलातील श्रीरघुनाथांच्या प्रयाणाचे वेळी तुताऱ्या, मृदंग, आनक इत्यादी वाद्यांचा घोष व स्वर्गात राहणाऱ्या देवतांनी वाजविलेल्या तुताऱ्या, मृदंग इत्यादींच्या आवाजात मिसळून वाढत गेला आणि त्या तुमुल ध्वनीमुळे सर्व प्राणी विस्मयचकित झाले. (८२)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकाण्डे षष्ठ: सर्ग: ॥ ६ ॥

# सप्तम सर्ग

## परशुरामांची भेट

*श्रीमहादेव उवाच*

अथ गच्छति श्रीरामे मैथिलाद्योजनत्रयम् ।
निमित्तान्यतिघोराणि ददर्श नृपसत्तमः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – श्रीरामचंद्र मिथिला नगरीपासून तीन योजने दूर गेले असता, नृपश्रेष्ठ दशरथांना अतिशय घोर असे अपशकुन दिसू लागले. (१)

नत्वा वसिष्ठं पप्रच्छ किमिदं मुनिपुङ्गव ।
निमित्तानीह दृश्यन्ते विषमाणि समन्ततः ॥ २ ॥

तेव्हा वसिष्ठांना प्रणाम करून त्यांनी विचारले, "अहो मुनिश्रेष्ठ, काय आहे हे ? येथे चारी बाजूंना भयंकर अपशकुन दिसून येत आहेत." (२)

वसिष्ठस्तमथ प्राह भयमागामि सूच्यते ।
पुनरप्यभयं तेऽद्य शीघ्रमेव भविष्यति ॥ ३ ॥

तेव्हा वसिष्ठ म्हणाले, "या अपशकुनांनी कोणते तरी आगामी भय दर्शविले जात आहे. तरीपण लौकरच तुम्हांला पुन: अभय प्राप्त होईल. (३)

मृगाः प्रदक्षिणं यान्ति पश्य त्वां शुभसूचकाः ।
इत्येवं वदतस्तस्य ववौ घोरतरोऽनिलः ॥ ४ ॥

कारण शुभ सुचविणारे मृग हे तुमच्या उजव्या बाजूने जात आहेत." वसिष्ठ असे बोलत आहेत तोच फार भयंकर असा वारा वाहू लागला. (४)

मुष्णंश्चक्षूंषि सर्वेषां पांसुवृष्टिभिरर्दयन् ।
ततो व्रजन्ददर्शाग्रे तेजोराशिमुपस्थितम् ॥ ५ ॥

त्या वाऱ्याने सर्वांना त्रस्त केले. धुळीचा वर्षाव करीत त्या वाऱ्याने सर्वांचे डोळे मिटावयास लावले. त्यानंतर दशरथ पुढे जात असतानाच एक तेजोगोल समोरून येत असलेला त्यांना दिसला. (५)

कोटिसूर्यप्रतीकाशं विद्युत्पुञ्जसमप्रभम् ।
तेजोराशिं ददर्शाथ जामदग्न्यं प्रतापवान् ॥ ६ ॥

नीलमेघनिभं प्रांशुं जटामण्डलमण्डितम् ।
धनुःपरशुपाणिं च साक्षात्कालमिवान्तकम् ॥ ७ ॥

कार्तवीर्यान्तकं रामं दृप्तक्षत्रियमर्दनम् ।
प्राप्तं दशरथस्याग्रे कालमृत्युमिवापरम् ॥ ८ ॥

त्यानंतर कोटिसूर्याप्रमाणे तेजस्वी, विजेच्या पुंजाप्रमाणे कांतिमय, तेजाने संपन्न, निळ्या मेघाप्रमाणे तेज असणारे, उंच, जटाजूटाने विभूषित, हातामध्ये धनुष्य आणि परशू धारण करणारे, प्राण्यांचा नाश करणाऱ्या साक्षात् काळाप्रमाणे भासणारे, असे जमदग्निपुत्र परशुराम येत आहेत, असे त्या प्रतापी दशरथ राजांना समोर दिसले. कार्तवीर्य अर्जुनाचा वध करणारे, गर्विष्ठ क्षत्रियांच्या अभिमानाचे मर्दन करणारे, जणू दुसऱ्या यमराजाप्रमाणे असणारे, अशा जमदग्निनंदन परशुरामांना पराक्रमी दशरथांनी पाहिले. (६-८)

तं दृष्ट्वा भयसन्त्रस्तो राजा दशरथस्तदा ।
अर्घ्यादिपूजां विस्मृत्य त्राहि त्राहीति चाब्रवीत् ॥ ९ ॥

दण्डवत्प्रणिपत्याह पुत्रप्राणं प्रयच्छ मे ।
इति ब्रुवन्तं राजानमनादृत्य रघूत्तमम् ॥ १० ॥

उवाच निष्ठुरं वाक्यं क्रोधात्प्रचलितेन्द्रियः ।
त्वं राम इति नाम्ना मे चरसि क्षत्रियाधम ॥ ११ ॥

त्यांना पाहताच महाराज दशरथ भयभीत झाले. आणि अर्घ्य इत्यादींनी त्याची पूजा करण्याचे विसरून जाऊन, 'रक्षण करा, रक्षण करा,' असे म्हणू लागले. दंडवत प्रणाम करून ते म्हणाले, "माझ्या पुत्राचे रक्षण करा." अशी प्रार्थना करणाऱ्या त्या राजाकडे मुळीच लक्ष न देता, क्रोधाने ज्यांचे अंग थरथरत आहे असे परशुराम रघुश्रेष्ठ श्रीरामचंद्रांना निष्ठुरपणे म्हणाले, "अरे अधम क्षत्रिया, तू राम या माझ्याच नावाने व्यवहार करीत आहेस. (९-११)

द्वन्द्वयुद्धं प्रयच्छाशु यदि त्वं क्षत्रियोऽसि वै ।
पुराणं जर्जरं चापं भङ्क्त्वा त्वं कत्थसे मुधा ॥ १२ ॥

अस्मिंस्तु वैष्णवे चाप आरोपयसि चेद्गुणम् ।
तदा युद्धं त्वया सार्धं करोमि रघुवंशज ॥ १३ ॥

नो चेत्सर्वान्हनिष्यामि क्षत्रियान्तकरो ह्यहम् ।
इति ब्रुवति वै तस्मिंश्चचाल वसुधा भृशम् ॥ १४ ॥

अन्धकारो बभूवाथ सर्वेषामपि चक्षुषाम् ।
रामो दाशरथिर्वीरो वीक्ष्य तं भार्गवं रुषा ॥ १५ ॥

धनुराच्छिद्य तद्धस्तादारोप्य गुणमञ्जसा ।
तूणीराद्बाणमादाय संधायाकृष्य वीर्यवान् ॥ १६ ॥

उवाच भार्गवं रामं शृणु ब्रह्मन्वचो मम ।
लक्ष्यं दर्शय बाणस्य ह्यमोघो मम सायकः ॥ १७ ॥

लोकान्पादयुगं वापि वद शीघ्रं ममाज्ञया ।
अयं लोकः परो वाथ त्वया गन्तुं न शक्यते ॥ १८ ॥

एवं त्वं हि प्रकर्तव्यं वद शीघ्रं ममाज्ञया ।
एवं वदति श्रीरामे भार्गवो विकृताननः ॥ १९ ॥

संस्मरन्पूर्ववृत्तान्तमिदं वचनमब्रवीत् ।
राम राम महाबाहो जाने त्वां परमेश्वरम् ॥ २० ॥

पुराणपुरुषं विष्णुं जगत्सर्गलयोद्भवम् ।
बाल्येऽहं तपसा विष्णुमाराधयितुमञ्जसा ॥ २१ ॥

चक्रतीर्थं शुभं गत्वा तपसा विष्णुमन्वहम् ।
अतोषयं महात्मानं नारायणमनन्यधीः ॥ २२ ॥

ततः प्रसन्नो देवेशः शङ्खचक्रगदाधरः ।
उवाच मां रघुश्रेष्ठ प्रसन्नमुखपङ्कजः ॥ २३ ॥

तेव्हा जर तू खरा क्षत्रिय असशील तर चट्दिशी माझ्याबरोबर द्वंद्वयुद्ध कर. एक जुने-पुराणे, जीर्ण-शीर्ण धनुष्य तोडून तू उगाच प्रौढी मिरवत आहेस. हे राघवा, जर या वैष्णव धनुष्याला तू दोरी लावलीस, तर मी तुझ्याबरोबर युद्ध करीन.नाहीतर मी आताच तुम्हां सर्वांना ठार करीन. कारण मी क्षत्रियांचा अंत करणारा आहे." परशुराम असे बोलत असता, पृथ्वी चळचळा कापू लागली आणि सर्वांच्या डोळ्यापुढे अंधकार पसरला. तेव्हा दशरथ-नंदन, वीरश्रेष्ठ, रामांनी परशुरामांकडे रागाने पाहिले आणि त्यांच्या हातातून धनुष्य हिसकावून घेतले, सहजपणे त्याच्यावर दोरी चढविली, भात्यांतून एक बाण घेतला, तो धनुष्याला जोडला, आणि मग दोरी खेचून पराक्रमी श्रीराम भृगुनंदन परशुरामाला म्हणाले, "अरे ब्राह्मणा, माझे वचन ऐका. माझा बाण हा अमोघ आहे; त्या बाणाचे लक्ष्य दाखवा. (१२-१७)

आपल्या पुण्याने जिंकलेले लोक अथवा तुमचे दोन चरण यांपैकी एक, बाणाचे लक्ष्य म्हणून माझ्या आज्ञेने ताबडतोब सांगा. त्याचा वेध मी या बाणाने करीन. त्यामुळे तुम्ही इहलोकी व परलोकी कोठेही जाऊ शकणार नाही. (१८)

मी तुमच्याबरोबर कसे वागावे हे आता तुम्ही चट्कन माझ्या आज्ञेने मला सांगा." रामचंद्र असे बोलत असतानाच भृगुनंदन परशुरामाचे मुख निस्तेज झाले. (१९)

मग पूर्वीच्या वृत्तांताचे स्मरण करीत ते बोलले, "अहो रामा, अहो महाबाहो, तुम्ही परमेश्वर आहात हे मला आता कळले आहे. (२०)

विश्वाची उत्पत्ती, स्थिती व प्रलय यांचे कारण असणारे पुराण पुरुष भगवान विष्णू तुम्ही आहात. बालपणी मी भगवान विष्णूंची तपाने आराधना करण्यासाठी पवित्र अशा चक्रतीर्थावर गेलो होतो. तेथे दररोज अनन्य बुद्धीने मी तप करीत असता परमात्म्या नारायणांना मी संतुष्ट केले. (२१-२२)

त्या वेळी हे रघुश्रेष्ठा, शंख, चक्र व गदा धारण करणाऱ्या आणि प्रसन्न मुखकमल असणाऱ्या देवेश्वर विष्णूंनी प्रसन्न होऊन मला सांगितले. (२३)

श्रीभगवानुवाच

उत्तिष्ठ तपसो ब्रह्मन्फलितं ते तपो महत् ।
मच्चिदंशेन युक्तस्त्वं जहि हैहयपुङ्गवम् ॥ २४ ॥

कार्तवीर्यं पितृहणं यदर्थं तपसः श्रमः ।
ततस्त्रिःसप्तकृत्वस्त्वं हत्वा क्षत्रियमण्डलम् ॥ २५ ॥

कृत्स्नां भूमिं कश्यपाय दत्त्वा शान्तिमुपावह ।
त्रेतामुखे दाशरथिर्भूत्वा रामोऽहमव्ययः ॥ २६ ॥

उत्पत्स्ये परया शक्त्या तदा द्रक्ष्यसि मां ततः ।
मत्तेजः पुनरादास्ये त्वयि दत्तं मया पुरा ॥ २७ ॥

तदा तपश्चरँल्लोके तिष्ठ त्वं ब्रह्मणो दिनम् ।
इत्युक्त्वान्तर्दधे देवस्तथा सर्वं कृतं मया ॥ २८ ॥

स एव विष्णुस्त्वं राम जातोऽसि ब्रह्मणार्थितः ।
मयि स्थितं तु त्वत्तेजस्त्वयैव पुनराहृतम् ॥ २९ ॥

अद्य मे सफलं जन्म प्रतीतोऽसि मम प्रभो ।
ब्रह्मादिभिरलभ्यस्त्वं प्रकृतेः पारगो मतः ॥ ३० ॥

त्वयि जन्मादिषड्भावा न सन्त्यज्ञानसंभवाः ।
निर्विकारोऽसि पूर्णस्त्वं गमनादिविवर्जितः ॥ ३१ ॥

यथा जले फेनजालं धूमो वह्नौ तथा त्वयि ।
त्वदाधारा त्वद्विषया माया कार्यं सृजत्यहो ॥ ३२ ॥

यावन्मायावृता लोकास्तावत्त्वां न विजानते ।
अविचारितसिद्धैषाऽविद्या विद्याविरोधिनी ॥ ३३ ॥

अविद्याकृतदेहादिसङ्घाते प्रतिबिम्बिता ।
चिच्छक्तिर्जीवलोकेस्मिन् जीव इत्यभिधीयते ॥ ३४ ॥

**श्रीभगवान् म्हणाले** – "हे ब्राह्मणा, तपस्या सोडून तू आता ऊठ. तुझे महान तप सफल झाले आहे. माझ्या चैतन्याच्या अंशाने तू युक्त झालास. ज्याच्यासाठी हे तप करण्याचे श्रम तू घेतले आहेस, त्या तुझ्या पित्याचा घात करणाऱ्या हैहयश्रेष्ठ कार्तवीर्याचा वध कर; त्यानंतर एकवीस वेळा सर्व क्षत्रियांना ठार करून, संपूर्ण पृथ्वी कश्यपाला दान देऊन, शांती धारण कर. अविनाशी परमात्मा असा मी त्रेतायुगाच्या प्रारंभी दशरथाचा पुत्र होऊन राम या नावाने जन्मास येईन. त्या वेळी सीता या माझ्या शक्तीसह मला तू पाहाशील. त्यानंतर पूर्वी तुला दिलेले माझे तेज मी पुनः तुझ्याकडून परत घेईन. नंतर तू तपस्या करीत ब्रह्मदेवाच्या एका दिवसापर्यंत- कल्पांतापर्यंत- या पृथ्वीवर राहा," असे सांगून ते भगवान विष्णू अंतर्धान पावले आणि मग त्यांनी जसे सांगितले होते, तसेच मी केले. (२४-२८)

हे रामा, ते विष्णू तुम्ही आहात. ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेला अनुसरून, तुम्ही जन्माला आलेले आहात. तुमचे जे तेज माझ्या ठिकाणी होते ते तुम्हीच आज परत घेतले आहे. (२९)

हे प्रभू, तुम्हांला विष्णूच्या रूपात मी ओळखले आहे. म्हणून आज माझा जन्म सफल झाला आहे. ब्रह्मदेव इत्यादींना तुम्ही अप्राप्य आहात आणि प्रकृतीच्या पलीकडे आहात, असे मानले जाते. (३०)

अज्ञानामुळे निर्माण होणारे जन्म इत्यादी सहा विकार तुमच्या ठिकाणी नाहीत. तुम्ही गमन इत्यादींनी रहित, विकारांनी रहित आणि पूर्ण आहात. (३१)

अहो आश्चर्य! पाण्यापासून पाण्यावर जसा फेसाचा समूह, अग्नीपासून अग्नीवर जसा धूर उत्पन्न होतो आणि त्यालाच झाकून टाकतो, त्याप्रमाणे तुमच्याच आधाराने असणारी माया तुम्हांला विषय करून, नाना प्रकारची विचित्र कार्ये निर्माण करते आणि तुमच्या खऱ्या स्वरूपाला झाकते. जोपर्यंत माणसे मायेने झाकलेली असतात, तोपर्यंत ती तुम्हांला जाणत नाहीत. अविवेकामुळे उत्पन्न झालेली ही अविद्या विद्येला विरोधी आहे. जोपर्यंत विचार केला जात नाही तोपर्यंत ती अविद्या टिकून राहाते. (३२-३३)

अविद्येने निर्माण झालेल्या देह इत्यादींच्या संघातामध्ये प्रतिबिंबित झालेल्या चित्-शक्तीला या जीवलोकात जीव असे म्हटले जाते. (३४)

यावद्देहमनःप्राणबुद्ध्यादिष्वभिमानवान् ।
तावत्कर्तृत्वभोक्तृत्वसुखदुःखादिभाग्भवेत् ॥ ३५ ॥

जोपर्यंत हा जीव, मन, प्राण, बुद्धी इत्यादींच्या बद्दल अभिमान धारण करतो, तोपर्यंत तो कर्तृत्व, भोक्तृत्व, सुख, दुःख इत्यादी भोगतो. (३५)

आत्मनः संसृतिर्नास्ति बुद्धेर्ज्ञानं न जात्विति ।
अविवेकाद्द्वयं युङ्क्त्वा संसारीति प्रवर्तते ॥ ३६ ॥

वास्तविक पाहता आत्म्याला जन्म, मरण इत्यादी संसार कोणत्याही अवस्थेत असत नाही आणि बुद्धी ही अविद्येचे कार्य असल्यामुळे तिच्या ठिकाणीसुद्धा ज्ञान-शक्ती असत नाही. अविवेकाने ते दोन्ही एकत्र करून, 'मी संसारी आहे', असे मानून जीव कर्मे करण्यास प्रवृत्त होतो. (३६)

जडस्य चित्समायोगाच्चित्त्वं भूयाच्चितेस्तथा ।
जडसङ्गाज्जडत्वं हि जलाग्न्योर्मेलनं यथा ॥ ३७ ॥

पाणी आणि अग्नी यांचा संयोग झाला असता ज्या प्रमाणे पाण्यात उष्णता येते आणि अग्नी शांत होतो, त्या प्रमाणे जडबुद्धीचा चेतन आत्म्याशी संयोग झाला असताना, बुद्धीमध्ये चेतना येते आणि चेतन आत्म्याचा जड बुद्धीशी संयोग झाला असताना त्या चेतन आत्म्याचे ठिकाणी (कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादी) जडत्व प्रकट होते. (३७)

यावत्त्वत्पादभक्तानां सङ्गसौख्यं न विन्दति ।
तावत्संसारदुःखौघान्न निवर्तेन्नरः सदा ॥ ३८ ॥

हे रामा, जोपर्यंत मनुष्य तुमच्या चरणकमळी स्थित भक्तांच्या संगतीचे सौख्य निरंतर प्राप्त करून घेत नाही, तोपर्यंत तो संसारातील दुःखसमूहातून सुटत नाही. (३८)

तत्सङ्गलब्धया भक्त्या यदा त्वां समुपासते ।
तदा माया शनैर्याति तानवं प्रतिपद्यते ॥ ३९ ॥

जेव्हा तुमच्या भक्तांच्या संगतीने प्राप्त झालेल्या भक्तीमुळे मनुष्य तुमची उपासना करतो, तेव्हा तुमची माया हळूहळू निघून जाऊन ती क्षीण होऊन जाते. (३९)

ततस्त्वज्ज्ञानसम्पन्नः सद्गुरुस्तेन लभ्यते ।
वाक्यज्ञानं गुरोर्लब्ध्वा त्वत्प्रसादाद्विमुच्यते ॥ ४० ॥

मग त्या साधकाला तुमच्या ज्ञानाने संपन्न अशा सद्गुरूची प्राप्ती होते आणि त्या सद्गुरुदेवाकडून महावाक्याचे ज्ञान मिळाल्यावर, तो तुमच्या कृपेने मुक्त होतो. (४०)

तस्मात्त्वद्भक्तिहीनानां कल्पकोटिशतैरपि ।
न मुक्तिशङ्का विज्ञानशङ्का नैव सुखं तथा ॥ ४१ ॥

म्हणून तुमच्या भक्तीने रहित अशा पुरुषांना शेकडो कोटी कल्पांमध्येसुद्धा मुक्ती मिळणे अथवा ब्रह्मज्ञान प्राप्त होणे हे संभवनीय नाही आणि म्हणून त्यांना वास्तविक सुख प्राप्त होणे हेसुद्धा संभवनीय नाही. (४१)

अतस्त्वत्पादयुगले भक्तिर्मे जन्मजन्मनि ।
स्यात्त्वद्भक्तिमतां सङ्गोऽविद्या याभ्यां विनश्यति ॥ ४२ ॥

म्हणून तुमच्या चरणयुगलांवर माझी जन्मोजन्मी भक्ती असू दे. तसेच तुमच्या भक्तांची संगती मला मिळू दे. कारण या दोन्ही साधनांनी अविद्या नष्ट होते. (४२)

लोके त्वद्भक्तिनिरतास्त्वद्धर्मामृतवर्षिणः ।
पुनन्ति लोकमखिलं किं पुनः स्वकुलोद्भवान् ॥ ४३ ॥

जगात तुमच्या भक्तीमध्ये तत्पर आणि भगवद् धर्म-रूपी अमृताचा वर्षाव करणारे तुमचे भक्त हे संपूर्ण जगाला पवित्र करतात; मग त्यांच्या स्वतःच्या कुळात उत्पन्न झालेल्या माणसांविषयी काय सांगावे ? (४३)

नमोऽस्तु जगतां नाथ नमस्ते भक्तिभावन ।
नमः कारुणिकानन्त रामचन्द्र नमोऽस्तु ते ॥ ४४ ॥

हे जगन्नाथा, तुम्हांला नमस्कार असो. हे भक्ति-भावना, तुम्हांला नमस्कार असो. हे करुणामया, हे अनंता, तुम्हांला नमस्कार असो. हे रामचंद्रा, तुम्हांला नमस्कार असो. (४४)

देव यद्यत्कृतं पुण्यं मया लोकजिगीषया ।
तत्सर्वं तव बाणाय भूयाद्राम नमोऽस्तु ते ॥ ४५ ॥

हे देवा, पुण्यलोकांच्या प्राप्तीसाठी जे काही पुण्यकर्म मी केले आहे, ते सर्व तुमच्या बाणांचे लक्ष्य होऊ दे. हे रामा, तुम्हांला नमस्कार असो." (४५)

ततः प्रसन्नो भगवान् श्रीरामः करुणामयः ।
प्रसन्नोऽस्मि तव ब्रह्मन्यत्ते मनसि वर्तते ॥ ४६ ॥

दास्ये तदखिलं कामं मा कुरुष्वात्र संशयम् ।
ततः प्रीतेन मनसा भार्गवो राममब्रवीत् ॥ ४७ ॥

तेव्हा करुणामय भगवान श्रीरामचंद्रांनी प्रसन्न होऊन म्हटले, "अरे ब्राह्मणा, मी तुमच्यावर प्रसन्न आहे. तुमच्या मनात ज्या ज्या इच्छा आहेत त्या सर्व इच्छा मी पूर्ण करीन. या बाबतीत तुम्ही मुळीच संशय धरू नका." तेव्हा आनंदित मनाने परशुराम श्रीरामांना म्हणाले. (४६-४७)

यदि मेऽनुग्रहो राम तवास्ति मधुसूदन ।
त्वद्भक्तसङ्गस्त्वत्पादे दृढा भक्तिः सदास्तु मे ॥ ४८ ॥

"हे मधुसूदना, रामा, जर तुमची माझ्यावर कृपा असेल, तर मला सदा तुमच्या भक्तांची संगती प्राप्त होवो आणि तुमच्या चरणकमळांवर माझी सुदृढ भक्ती असू दे. (४८)

स्तोत्रमेतत्पठेद्यस्तु भक्तिहीनोऽपि सर्वदा ।
त्वद्भक्तिस्तस्य विज्ञानं भूयादन्ते स्मृतिस्तव ॥ ४९ ॥

तसेच एखादा पुरुष भक्ति-रहित असूनसुद्धा तो जर या स्तोत्राचे पठन करील, तर त्याला सर्वदा तुमची भक्ती प्राप्त होवो, तसेच त्याला ज्ञान प्राप्त होवो आणि त्याला अंतकाळी तुमची स्मृती राहो." (४९)

तथेति राघवेणोक्तः परिक्रम्य प्रणम्य तम् ।
पूजितस्तदनुज्ञातो महेन्द्राचलमन्वगात् ॥ ५० ॥

त्यानंतर "असेच होऊ दे" असे रघुनाथांनी म्हटल्यावर, परशुरामांनी श्रीरामांना प्रदक्षिणा घालून त्यांना नमस्कार केला आणि त्यांच्याकडून सन्मानित झाल्यावर, त्यांच्याच आज्ञेने ते महेंद्र पर्वताकडे निघून गेले. (५०)

राजा दशरथो हृष्टो रामं मृतमिवागतम् ।
आलिङ्ग्यालिङ्ग्य हर्षेण नेत्राभ्यां जलमुत्सृजत् ॥ ५१ ॥

श्रीराम जणू मृत्यु-मुखातून परत आले असे समजून राजा दशरथांनी अत्यंत हर्षाने रामांना वारंवार आलिंगन दिले. तेव्हा त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले. (५१)

ततः प्रीतेन मनसा स्वस्थचित्तः पुरं ययौ ।
रामलक्ष्मणशत्रुघ्नभरता देवसंमिताः ।
स्वां स्वां भार्यामुपादाय रेमिरे स्वस्वमन्दिरे ॥ ५२ ॥

त्यानंतर स्वस्थ चित्त झालेले दशरथ आनंदित मनाने अयोध्या नगरीला गेले. तेथे पोचल्यावर राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न हे आपापल्या भार्यांसह आपापल्या महालात देवांप्रमाणे रमू लागले. (५२)

मातापितृभ्यां संहृष्टो रामः सीतासमन्वितः ।
रेमे वैकुण्ठभवने श्रिया सह यथा हरिः ॥ ५३ ॥

ज्या प्रमाणे वैकुंठ लोकात भगवान विष्णू लक्ष्मीसह रमतात, त्या प्रमाणेच आपल्या माता-पित्यांचा आनंद वाढवीत श्रीरामचंद्र सीतेसह रमू लागले . (५३)

युधाजिन्नाम कैकेयीभ्राता भरतमातुलः ।
भरतं नेतुमागच्छत्स्वराज्यं प्रीतिसंयुतः ॥ ५४ ॥

काही काळानंतर युधाजित् नावाचा कैकेयीचा भाऊ,- भरताचा मामा- हा प्रेमाने भरताला आपल्या राज्यात नेण्यासाठी आला. (५४)

प्रेषयामास भरतं राजा स्नेहसमन्वितः ।
शत्रुघ्नं चापि संपूज्य युधाजितमरिन्दमः ॥ ५५ ॥

शत्रूचे दमन करणाऱ्या महाराज दशरथांनी प्रेमपूर्वक युधाजिताचा सत्कार करून भरत आणि शत्रुघ्न या दोघांना त्याच्याबरोबर पाठवून दिले. (५५)

कौसल्या शुशुभे देवी रामेण सह सीतया।
देवमातेव पौलोम्या शच्या शक्रेण शोभना ॥ ५६ ॥

इकडे ज्या प्रमाणे देवांची माता अदिती ही पुलोम-पुत्री शची आणि इंद्र यांसह शोभते त्याप्रमाणे राम व सीता यांच्यासह देवी कौसल्या शोभत होती. (५६)

साकेते लोकनाथप्रथितगुणगणो
लोकसङ्गीतकीर्तिः
श्रीरामः सीतयास्तेऽखिलजननिकरा-
नन्दसन्दोहमूर्तिः ।
नित्यश्रीर्निर्विकारो निरवधिविभवो
नित्यमायानिरासो
मायाकार्यानुसारी मनुज इव सदा
भाति देवोऽखिलेशः ॥ ५७ ॥

ज्यांच्या गुणांचे समूह (ब्रह्मदेव इत्यादी) सर्व लोकपालांमध्ये प्रसिद्ध आहेत, ज्यांची कीर्ती सर्व लोकांमध्ये गाईली जात आहे, जे सर्व माणसांच्या आनंद -समूहाची मूर्ती आहेत, जे नित्य शोभाधाम आहेत, जे निर्विकार, आणि अनंत वैभवाने युक्त आहेत आणि जे सदा मायातीत असूनसुद्धा मायेच्या कार्यांचे अनुसरण करीत असल्यामुळे नेहमी सामान्य माणसाप्रमाणे प्रतीत होतात, असे ते सर्वांचे स्वामी देव, भगवान राम हे सीतेसह अयोध्या नगरीत राहू लागले. (५७)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकाण्डे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

## बालकाण्ड समाप्त

# अध्यात्मरामायण

## अयोध्याकाण्ड

## प्रथम सर्ग

### भगवान श्रीरामांजवळ नारदांचे आगमन

*श्रीमहादेव उवाच*

एकदा सुखमासीनं रामं स्वान्तःपुराजिरे ।
सर्वाभरणसंपन्नं रत्नसिंहासने स्थितम् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, सर्व अलंकारांनी विभूषित श्रीरामचंद्र एके दिवशी आपल्या अंतःपुरातील अंगणात रत्नजडित सिंहासनावर सुखाने बसले होते. (१)

नीलोत्पलदलश्यामं कौस्तुभामुक्तकन्धरम् ।
सीतया रत्नदण्डेन चामरेणाथ वीजितम् ॥ २ ॥

विनोदयन्तं ताम्बूलचर्वणादिभिरादरात् ।
नारदोऽवतरद्द्रष्टुमम्बराद्यत्र राघवः ॥ ३ ॥

नीलकमळाप्रमाणे त्यांचा श्याम वर्ण होता व कौस्तुभ मणी त्यांच्या गळ्यांत शोभत होता. अशा रघुनाथांना श्रीसीता ही रत्नखचित दंडाच्या चवरीने वारा घालीत होती. आदरपूर्वक दिलेल्या तांबूलाचे चर्वण करीत श्रीराम सीतेला आनंदित करीत होते. त्या वेळी त्यांचे दर्शन घेण्यास, देवर्षी नारद आकाशातून खाली आले. (२-३)

शुद्धस्फटिकसङ्काशः शरच्चन्द्र इवामलः ।
अतर्कितमुपायातो नारदो दिव्यदर्शनः ॥ ४ ॥

शुद्ध स्फटिक मण्याप्रमाणे स्वच्छ आणि शरद ऋतूतील चंद्राप्रमाणे निर्मळ आणि दिव्य दृष्टी असणारे श्रीनारद अचानक तेथे आले. (४)

तं दृष्ट्वा सहसोत्थाय रामः प्रीत्या कृताञ्जलिः ।
ननाम शिरसा भूमौ सीतया सह भक्तिमान् ॥ ५ ॥

त्यांना पाहून भगवान श्रीराम लगबगीने उठून उभे राहिले आणि सीतेसह भक्तियुक्त होऊन रामांनी प्रेमाने हात जोडले आणि जमिनीवर मस्तक ठेवून नारदांना प्रणाम केला. (५)

उवाच नारदं रामः प्रीत्या परमया युतः ।
संसारिणां मुनिश्रेष्ठ दुर्लभं तव दर्शनम् ।
अस्माकं विषयासक्तचेतसां नितरां मुने ॥ ६ ॥

अवाप्तं मे पूर्वजन्मकृतपुण्यमहोदयैः ।
संसारिणापि हि मुने लभ्यते सत्समागमः ॥ ७ ॥

परम प्रीतीने भगवान श्रीरामांनी नारदांना म्हटले, "हे मुनिश्रेष्ठा, विषयांमध्ये ज्यांची मने अतिशय आसक्त झाली आहेत, अशा आमच्यासारख्या संसारी माणसांना तुमचे दर्शन अत्यंत दुर्लभ आहे. हे मुने, मी पूर्व जन्मात केलेल्या पुण्याच्या संचयाचा उदय झाल्यामुळेच मला आज तुमचे दर्शन झाले आहे. कारण पुण्याचा उदय झाल्यावरच संसारी पुरुषांनासुद्धा सत्संगाचा लाभ होतो. (६-७)

अतस्त्वद्दर्शनादेव कृतार्थोऽस्मि मुनीश्वर ।
किं कार्यं ते मया कार्यं ब्रूहि तत्करवाणि भोः ॥ ८ ॥

म्हणून हे मुनीश्वरा, आज तुमच्या दर्शनानेच मी कृतार्थ होऊन गेलो आहे. आता तुमचे अभीष्ट कार्य मला सांगा. हे मुने, ते मी पूर्ण करतो." (८)

अथ तं नारदोऽप्याह राघवं भक्तवत्सलम् ।
किं मोहयसि मां राम वाक्यैर्लोकानुसारिभिः ॥ ९ ॥

तेव्हा नारदांनी भक्तवत्सल भगवान श्रीरामांना सांगितले, "प्रभू रामा, सामान्य माणसांप्रमाणे बोलून तुम्ही मला का बरे मोहित करीत आहात ? (९)

संसार्यहमिति प्रोक्तं सत्यमेतत्त्वया विभो ।
जगतामादिभूता या सा माया गृहिणी तव ॥ १० ॥

हे विभो, मी संसारी आहे, असे जे तुम्ही म्हणालात, ते अगदी खरे आहे. कारण संपूर्ण जगताचे आदिकारण जी माया ती तुमची गृहिणी आहे. (१०)

त्वत्सन्निकर्षाज्जायन्ते तस्यां ब्रह्मादयः प्रजाः ।
त्वदाश्रया सदा भाति माया या त्रिगुणात्मिका ॥ ११ ॥

हे प्रभो, तुमच्या केवळ सान्निध्यानेच त्या मायेपासून ब्रह्मदेव इत्यादी सर्व प्रजा उत्पन्न होते. सत्त्व, रज आणि तम या त्रिगुणांनी युक्त जी माया आहे, ती तुमच्या आश्रयानेच सदा भासमान होते. (११)

सूतेऽजस्त्रं शुक्लकृष्णलोहिताः सर्वदा प्रजाः ।
लोकत्रयमहागेहे गृहस्थस्त्वमुदाहृतः ॥ १२ ॥

तसेच स्वगुणांना अनुसरून ती नेहमी शुक्ल, लाल आणि कृष्ण वर्ण असणारी प्रजा निर्माण करीत असते. त्रैलोक्याच्या समूहरूपी मोठ्या घरात तुम्हीच गृहस्थाश्रमी आहात, असे म्हटले जाते. (१२)

त्वं विष्णुर्जानकी लक्ष्मीः शिवस्त्वं जानकी शिवा ।
ब्रह्मा त्वं जानकी वाणी सूर्यस्त्वं जानकी प्रभा ॥ १३ ॥

भवान् शशाङ्कः सीता तु रोहिणी शुभलक्षणा ।
शक्रस्त्वमेव पौलोमी सीता स्वाहानलो भवान् ॥ १४ ॥

यमस्त्वं कालरूपश्च सीता संयमिनी प्रभो ।
निर्ऋतिस्त्वं जगन्नाथ तामसी जानकी शुभा ॥ १५ ॥

राम त्वमेव वरुणो भार्गवी जानकी शुभा ।
वायुस्त्वं राम सीता तु सदागतिरितीरिता ॥१६ ॥

कुबेरस्त्वं राम सीता सर्वसंपत्प्रकीर्तिता ।
रुद्राणी जानकी प्रोक्ता रुद्रस्त्वं लोकनाशकृत् ॥ १७ ॥

लोके स्त्रीवाचकं यावत्तत्सर्वं जानकी शुभा ।
पुन्नामवाचकं यावत्तत्सर्वं त्वं हि राघव ॥ १८ ॥

तस्माल्लोकत्रये देव युवाभ्यां नास्ति किञ्चन ॥ १९ ॥

तुम्ही भगवान विष्णू आहात आणि जानकी ही लक्ष्मी आहे. तुम्ही शंकर आहात तर जानकी ही पार्वती आहे. तुम्ही ब्रह्मदेव आहात आणि जानकी सरस्वती आहे. तुम्ही सूर्य आहात तर जानकी ही प्रभा आहे. तुम्ही चंद्र आहात तर शुभ लक्षणे असणारी जानकी ही रोहिणी आहे. तुम्ही इंद्र आहात आणि सीता ही पुलोमकन्या शची (इंद्राणी) आहे. तुम्ही अग्नी आहात तर सीता ही स्वाहा आहे. हे प्रभो, कालरूप असा सर्वांचा यम तुम्ही आहात तर सीता ही संयमिनी आहे. हे जगन्नाथा, तुम्ही निर्ऋती आहात तर मंगलस्वरूप असणारी जानकी ही तामसी आहे. हे श्रीरामा, तुम्हीच वरुण आहात आणि शुभ लक्षणांनी संपन्न जानकी ही भृगु-कन्या वारुणी आहे. हे श्रीरामा, तुम्ही वायू आहात तर सीता ही सदागती आहे , असे म्हटले जाते. हे रामा, तुम्ही कुबेर आहात तर सीता ही त्याची सर्व संपत्ती आहे. लोकांचा नाश करणारे रुद्र तुम्ही आहात तर जानकी ही रुद्राणी आहे. हे राघवा, या जगात जे जे काही पुरुषवाचक नाम असलेले आहे ते ते सर्व तुम्ही आहात आणि जे काही स्त्रीवाचक नाम असलेले आहे ते सर्व म्हणजे शुभ लक्षणांनी संपन्न अशी जानकी आहे, यात संशय नाही. म्हणून हे देवा, तिन्ही लोकांत तुम्हा दोघांखेरीज अन्य काहीही नाही. (१३-१९)

त्वदाभासोदिताज्ञानमव्याकृतमितीर्यते ।
तस्मान्महांस्ततः सूत्रं लिङ्गं सर्वात्मकं ततः ॥ २० ॥

तुमच्या आभासामुळे उत्पन्न होणाऱ्या अज्ञानाला अव्याकृत असे म्हटले जाते. त्यापासून महत् हे तत्त्व, त्या महत्- तत्त्वापासून सूत्रात्मा म्हणजे हिरण्यगर्भ आणि त्या सूत्रात्म्यापासून सर्वात्मक लिंग देह उत्पन्न होतो. (२०)

अहङ्कारश्च बुद्धिश्च पञ्चप्राणेन्द्रियाणि च ।
लिङ्गमित्युच्यते प्राज्ञैर्जन्ममृत्युसुखादिमत् ॥ २१ ॥

अहंकार, बुद्धी, पाच प्राण, दहा इंद्रिये यांच्या समूहालाच शहाणे लोक जन्म, मरण, सुख, दुःख इत्यादी धर्म असणारे लिंगशरीर असे म्हणतात. (२१)

स एव जीवसंज्ञश्च लोके भाति जगन्मय: ।
अवाच्यानाद्यविद्यैव कारणोपाधिरुच्यते ॥ २२ ॥

लिंग देहाचा अभिमानी या जगात जगव्यापक जीव या नावाने विख्यात आहे. अनिर्वचनीय आणि अनादी अशी अविद्या ही या जीवाची कारण उपाधी आहे, असे सांगितले जाते. (२२)

स्थूलं सूक्ष्मं कारणाख्यमुपाधित्रितयं चितेः।
एतैर्विशिष्टो जीवः स्याद्वियुक्तः परमेश्वरः ॥ २३ ॥

शुद्ध चैतन्याला स्थूल, सूक्ष्म आणि कारण अशा तीन देहांच्या उपाधी आहेत. जीव या उपाधींनी युक्त आहे. या उपाधींनी रहित झाल्यावर तोच जीव परमेश्वर आहे, असे म्हटले जाते. (२३)

जाग्रत्स्वप्नसुषुप्त्याख्या संसृतिर्या प्रवर्तते ।
तस्या विलक्षण: साक्षी चिन्मात्रस्त्वं रघूत्तम ॥ २४ ॥

हे रघुश्रेष्ठा, जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती अशी जी तीन प्रकारची सृष्टी आहे, तिच्यापेक्षा तुम्ही संपूर्णपणे विलक्षण आहात. केवळ चैतन्यरूप असे तुम्ही तिचे साक्षी आहात. (२४)

त्वत्त एव जगज्जातं त्वयि सर्वं प्रतिष्ठितम् ।
त्वय्येव लीयते कृत्स्नं तस्मात्त्वं सर्वकारणम् ॥ २५ ॥

हे संपूर्ण जगत तुमच्यापासूनच निर्माण झाले आहे, ते तुमच्या ठिकाणी स्थित आहे आणि ते संपूर्णपणे तुमच्याच ठिकाणी लीन होऊन जाते. म्हणून तुम्हीच सर्वांचे कारण आहात. (२५)

रज्जावहिमिवात्मानं जीवं ज्ञात्वा भयं भवेत् ।
परात्माहमिति ज्ञात्वा भयदु:खैर्विमुच्यते ॥ २६ ॥

रज्जूच्या ठिकाणी दिसणाऱ्या सापाप्रमाणे स्वत:ला जीव मानल्यामुळे मनुष्याला भय वाटते. परंतु 'मीच परमात्मा आहे,' असे जेव्हा माणूस जाणून घेतो तेव्हा संपूर्ण भय आणि दु:ख यांतून मुक्त होऊन जातो. (२६)

चिन्मात्रज्योतिषा सर्वाः सर्वदेहेषु बुद्धयः ।
त्वया यस्मात्प्रकाश्यन्ते सर्वस्यात्मा ततो भवान् ॥२७॥

चिन्मात्र ज्योति:स्वरूपाने तुम्ही सर्व देहांत राहून सर्व देहांतील सर्व बुद्धींना प्रकाशित करता, म्हणून तुम्हीच सर्वांचे आत्मा आहात. (२७)

अज्ञानान्न्यस्यते सर्वं त्वयि रज्जौ भुजङ्गवत् ।
त्वज्ज्ञानाल्लीयते सर्वं तस्माज्ज्ञानं सदाभ्यसेत् ॥ २८ ॥

रज्जूवर भासणाऱ्या सर्पाप्रमाणे, अज्ञानामुळे तुमच्या ठिकाणी सर्व जगाची कल्पना केली जाते. तुमचे ज्ञान झाल्यावर सर्व काही लीन होऊन जाते. म्हणून मनुष्याने नेहमी ज्ञान-प्राप्तीचा अभ्यास करावयास हवा. (२८)

त्वत्पादभक्तियुक्तानां विज्ञानं भवति क्रमात् ।
तस्मात्त्वद्भक्तियुक्ता ये मुक्तिभाजस्त एव हि ॥ २९ ॥

तुमच्या चरणकमळांवरील भक्तीने युक्त असणाऱ्या पुरुषांनाच क्रमाने ज्ञानाची प्राप्ती होते. म्हणून जे पुरुष तुमच्यावरील भक्तीने युक्त आहेत, तेच मुक्तीला पात्र आहेत. (२९)

अहं त्वद्भक्तभक्तानां तद्भक्तानां च किङ्करः।
अतो मामनुगृह्णीष्व मोहयस्व न मां प्रभो ॥ ३० ॥

हे प्रभो, जे तुमच्या भक्तांचे भक्त आणि त्यांचेही भक्त आहेत, त्यांचा मी दास आहे. म्हणून मला मोहित न करता तुम्ही माझ्यावर अनुग्रह करा. (३०)

त्वन्नाभिकमलोत्पन्नो ब्रह्मा मे जनकः प्रभो ।
अतस्तवाहं पौत्रोऽस्मि भक्तं मां पाहि राघव ॥ ३१ ॥

हे प्रभो, तुमच्या नाभिकमलातून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव हा माझा पिता आहे. म्हणून मी तुमचा नातू आहे. हे राघवा, तुमचा भक्त असणाऱ्या माझे तुम्ही रक्षण करा." (३१)

इत्युक्त्वा बहुशो नत्वा स्वानन्दाश्रुपरिप्लुतः ।
उवाच वचनं राम ब्रह्मणा नोदितोऽस्म्यहम् ॥ ३२ ॥

अशा प्रकारे बोलून आणि वारंवार प्रणाम करून आनंदाश्रूंनी भरून येऊन नारदांनी पुढे म्हटले, "हे रामा, ब्रह्मदेवाच्या प्रेरणेने मी तुमच्याकडे आलो आहे. (३२)

रावणस्य वधार्थाय जातोऽसि रघुसत्तम ।
इदानीं राज्यरक्षार्थं पिता त्वामभिषेक्ष्यति ॥ ३३ ॥

हे रघुश्रेष्ठा, रावणाचा वध करण्यासाठी तुमचा अवतार झाला आहे. आता तुमचे पिता दशरथ राज्याच्या रक्षणासाठी तुमच्यावर राज्याभिषेक करणार आहेत. (३३)

यदि राज्याभिसंसक्तो रावणं न हनिष्यसि ।
प्रतिज्ञा ते कृता राम भूभारहरणाय वै ॥ ३४ ॥

हे श्रीरामा, जर तुम्ही राज्यामध्ये आसक्त होऊन, रावणाचा वध केला नाही तर भूमीचा भार हरण करण्याची जी प्रतिज्ञा तुम्ही केली होती, तिचे काय? (३४)

तत्सत्यं कुरु राजेन्द्र सत्यसंधस्त्वमेव हि ।
श्रुत्वैतद्गदितं रामो नारदं प्राह सस्मितम् ॥ ३५ ॥

ती खरी करा. कारण हे राजेंद्रा, तुम्ही सत्यप्रतिज्ञ आहात." नारदांचे हे भाषण ऐकल्यावर श्रीरामचंद्र स्मित करून नारदांना म्हणाले. (३५)

शृणु नारद मे किञ्चिद्विद्यतेऽविदितं क्वचित् ।
प्रतिज्ञातं च यत्पूर्वं करिष्ये तन्न संशयः ॥ ३६ ॥

"नारदमुनी, ऐका. अशी एखादी गोष्ट आहे का की जी मला ज्ञात नाही ? पूर्वी मी जी प्रतिज्ञा केली होती ती मी पूर्ण करीन, यात कोणताही संशय नको. (३६)

किन्तु कालानुरोधेन तत्तत्प्रारब्धसंक्षयात् ।
हरिष्ये सर्वभूभारं क्रमेणासुरमण्डलम् ॥ ३७ ॥

परंतु कालक्रमाने ज्यांचे प्रारब्ध क्षीण होईल, त्या सर्व असुरांना मारून पृथ्वीचा सर्व भार मी हरण करीन. (३७)

रावणस्य विनाशार्थं श्वो गन्ता दण्डकाननम् ।
चतुर्दश समास्तत्र ह्युषित्वा मुनिवेषधृक् ॥ ३८ ॥

रावणाचा वध करण्यासाठी मी उद्याच दंडकारण्यात जाईन आणि तेथे मुनीचा वेष धारण करून चौदा वर्षे राहीन. (३८)

सीतामिषेण तं दुष्टं सकुलं नाशयाम्यहम् ।
एवं रामे प्रतिज्ञाते नारदः प्रमुमोद ह ॥ ३९ ॥

आणि मग सीतेला निमित्त करून मी त्या दुष्टांचा त्यांच्या कुळासह नाश करीन." श्रीरामचंद्रांनी अशी प्रतिज्ञा केल्यावर नारदांना अतिशय आनंद झाला. (३९)

प्रदक्षिणत्रयं कृत्वा दण्डवत्प्रणिपत्य तम् ।
अनुज्ञातश्च रामेण ययौ देवगतिं मुनिः ॥ ४० ॥

त्यानंतर श्रीरामांना तीन प्रदक्षिणा घालून, दण्डवत प्रणाम करून व श्रीरामांची आज्ञा घेऊन नारद मुनी आकाश मार्गाने देवलोकात निघून गेले. (४०)

संवादं पठति शृणोति संस्मरेद्वा
यो नित्यं मुनिवररामयोः स भक्त्या ।
संप्राप्नोत्यमरसुदुर्लभं विमोक्षं
कैवल्यं विरतिपुरःसरं क्रमेण ॥ ४१ ॥

मुनिश्रेष्ठ नारद आणि रामचंद्र यांचा हा संवाद जो कोणी माणूस भक्तिपूर्वक वाचेल, ऐकेल किंवा स्मरण करील, तो वैराग्यपूर्वक देवांनाही अतिशय दुर्लभ असणारे कैवल्य रूपी मोक्षपद क्रमाक्रमाने प्राप्त करून घेईल. (४१)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकाण्डे प्रथमः सर्गः ॥१॥

# द्वितीय सर्ग

## राज्याभिषेकाची तयारी व वसिष्ठ आणि रघुनाथ यांचा संवाद

*श्रीमहादेव उवाच*

अथ राजा दशरथः कदाचिद्रहसि स्थितः ।
वसिष्ठं स्वकुलाचार्यमाहूयेदमभाषत ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**— नंतर एकदा एकांत स्थानी बसलेल्या राजा दशरथांनी आपल्या कुलपुरोहित वसिष्ठांना बोलावून घेऊन सांगितले. (१)

भगवन् राममखिलाः प्रशंसन्ति मुहुर्मुहुः ।
पौराश्च निगमा वृद्धा मन्त्रिणश्च विशेषतः ॥ २ ॥

' हे भगवन्, सर्व नगरवासी लोक, वेदार्थ जाणणारे ज्ञानवृद्ध पुरुष आणि विशेषतः मंत्री-जन हे वारंवार रामाची प्रशंसा करतात. (२)

ततः सर्वगुणोपेतं रामं राजीवलोचनम् ।
ज्येष्ठं राज्येऽभिषेक्ष्यामि वृद्धोऽहं मुनिपुङ्गव ॥ ३ ॥

म्हणून हे मुनिश्रेष्ठा, सर्व-गुण-संपन्न आणि कमलनयन अशा माझ्या ज्येष्ठ पुत्र रामाला राज्यपदावर अभिषिक्त करावे, असा माझा विचार आहे. कारण आता मी वृद्ध झालो आहे. (३)

भरतो मातुलं द्रष्टुं गतः शत्रुघ्नसंयुतः ।
अभिषेक्ष्ये श्व एवाशु भवांस्तच्चानुमोदताम् ॥ ४ ॥

या वेळी शत्रुघ्नाबरोबर भरत हा आपल्या मामाला भेटण्यास गेला आहे. तरीसुद्धा उद्या लगेच रामाचा राज्याभिषेक करावा, अशी माझी इच्छा आहे. या बाबतीत तुम्ही आपली संमती द्यावी. (४)

सम्भाराः सम्भ्रियन्तां च गच्छ मन्त्रय राघवम् ।
उच्छ्रीयन्तां पताकाश्च नानावर्णाः समन्ततः ॥ ५ ॥

तोरणानि विचित्राणि स्वर्णमुक्तामयानि वै ।
आहूय मन्त्रिणं राजा सुमन्त्रं मन्त्रिसत्तमम् ॥ ६ ॥

आज्ञापयति यद्यत्त्वां मुनिस्तत्तत्समानय ।
यौवराज्येऽभिषेक्ष्यामि श्वोभूते रघुनन्दनम् ॥ ७ ॥

हे मुनिश्रेष्ठा, अभिषेकाच्या सर्व साहित्याची जळवाजुळव करा आणि रघुनाथाजवळ जाऊन त्याला ही गोष्ट सांगा. नगरामध्ये सर्व बाजूंनी नाना रंगाच्या पताका उभारा, तसेच सोने आणि मोती यांनी युक्त असणारी चित्रविचित्र तोरणे बांधा," नंतर मंत्रिश्रेष्ठ सुमंताला दशरथ राजांनी बोलावून घेतले आणि त्याला आज्ञा केली, "मुनिश्रेष्ठ वसिष्ठ तुला जे जे साहित्य आणावयास सांगतील, ते ते तू आणून घे. कारण उद्याच मी रघुनाथाला युवराजपदावर अभिषेक करणार आहे." (५-७)

तथेति हर्षात्स मुनिं किं करोमीत्यभाषत ।
तमुवाच महातेजा वसिष्ठो ज्ञानिनां वरः ॥ ८ ॥

'ठीक आहे 'असे म्हणून तो सुमंत्र आनंदाने मुनिश्रेष्ठ वसिष्ठांना म्हणाला, 'मी काय करू ?' तेव्हा ज्ञानी पुरुषांमध्ये श्रेष्ठ आणि महातेजस्वी अशा वसिष्ठांनी त्याला सांगितले. (८)

श्वः प्रभाते मध्यकक्षे कन्यकाः स्वर्णभूषिताः ।
तिष्ठन्तु षोडश गजः स्वर्णरत्नादिभूषितः ॥ ९ ॥

चतुर्दन्तः समायातु ऐरावतकुलोद्भवः ।
नानातीर्थोदकैः पूर्णाः स्वर्णकुम्भाः सहस्रशः ॥ १० ॥

स्थाप्यन्तां नववैयाघ्रचर्माणि त्रीणि चानय ।
श्वेतच्छत्रं रत्नदण्डं मुक्तामणिविराजितम् ॥ ११ ॥

"उद्या प्रातःकाळी मध्यभागात सुवर्ण- अलंकारांनी विभूषित अशा सोळा कन्या उपस्थित असू देत. तसेच सुवर्ण अलंकार आणि रत्ने यांनी भूषित झालेला आणि ऐरावताच्या कुळातील आणि चार सुळे असणारा हत्ती तेथे आणा आणि नाना तीर्थांतील पाण्यांनी पूर्ण भरलेले असे हजारो सोन्याचे कलश तेथे स्थापन करा. तीन नवीन व्याघ्रचर्मे आणा. तसेच रत्नांचा दांडा असणारे आणि मोती व रत्ने यांनी सुशोभित असलेले एक पांढरे छत्र आणा. (९-११)

दिव्यमाल्यानि वस्त्राणि दिव्यान्याभरणानि च ।
मुनयः सत्कृतास्तत्र तिष्ठन्तु कुशपाणयः ॥ १२ ॥

नर्तक्यो वारमुख्याश्च गायका वेणुकास्तथा ।
नानावादित्रकुशला वादयन्तु नृपाङ्गणे ॥ १३ ॥

हस्त्यश्वरथपादाता बहिस्तिष्ठन्तु सायुधाः ।
नगरे यानि तिष्ठन्ति देवतायतनानि च ॥ १४ ॥

तेषु प्रवर्ततां पूजा नानाबलिभिराहृता ।
राजानः शीघ्रमायान्तु नानोपायनपाणयः ॥ १५ ॥

इत्यादिश्य मुनिः श्रीमान् सुमन्त्रं नृपमन्त्रिणम् ।
स्वयं जगाम भवनं राघवस्यातिशोभनम् ॥ १६ ॥

रथमारुह्य भगवान्वसिष्ठो मुनिसत्तमः ।
त्रीणि कक्ष्याण्यतिक्रम्य रथात्क्षितिमवातरत् ॥ १७ ॥

अन्तः प्रविश्य भवनं स्वाचार्यत्वादवारितः ।
गुरुमागतमाज्ञाय रामस्तूर्णं कृताञ्जलिः ॥ १८ ॥

प्रत्युद्गम्य नमस्कृत्य दण्डवद् भक्तिसंयुतः ।
स्वर्णपात्रेण पानीयमानिनायाशु जानकी ॥ १९ ॥

रत्नासने समावेश्य पादौ प्रक्षाल्य भक्तितः ।
तदपः शिरसा धृत्वा सीतया सह राघवः ॥ २० ॥

धन्योऽस्मीत्यब्रवीद्रामस्तव पादाम्बुधारणात् ।
श्रीरामेणैवमुक्तस्तु प्रहसन्मुनिरब्रवीत् ॥ २१ ॥

त्वत्पादसलिलं धृत्वा धन्योऽभूद्गिरिजापतिः ।
ब्रह्मापि मत्पिता ते हि पादतीर्थहताशुभः ॥ २२ ॥

इदानीं भाषसे यत्त्वं लोकानामुपदेशकृत् ।
जानामि त्वां परात्मानं लक्ष्म्या संजातमीश्वरम् ॥ २३ ॥

अनेक दिव्य माळा, दिव्य वस्त्रे आणि दिव्य अलंकार आणा. तसेच अभिषेकाच्या स्थानी ज्यांचा योग्य प्रकारे सत्कार केलेला आहे, असे मुनिजन हातात दर्भ घेऊन उपस्थित असू देत. (१२)

अनेक नर्तकी, प्रमुख वारांगना, गायक, वेणुवादक तसेच अनेक प्रकारची वाद्ये वाजविण्यात कुशल लोक महाराज दशरथांच्या अंगणात नर्तन- गाणे- बजावणे करू देत. (१३)

अभिषेक-स्थानाच्या बाहेर हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ अशी चतुरंग सेना आपापल्या अस्त्र-शस्त्रांनी सुसज्जित होऊन उभी असू दे. नगरातील सर्व देवालयांमध्ये नाना प्रकारच्या बलि- सामग्रीने युक्त अशी पूजा सुरू करा आणि हातांमध्ये नाना प्रकारच्या भेट- वस्तू घेऊन राजेलोक त्वरित येऊ देत." (१४-१५)

सुमंत्र या मंत्रिश्रेष्ठाला अशा प्रकारचा आदेश देऊन श्रीमान वसिष्ठ मुनी स्वतःच रथात बसून श्रीरघुनाथांच्या अतिशय सुंदर महालाकडे गेले. महालाचे तीन कक्ष ओलांडून रथातून खाली उतरले. (१६-१७)

वसिष्ठ हे स्वतः आचार्य असल्यामुळे कुणी त्यांना अडविले नाही. ते श्रीरामांच्या महालात शिरले. गुरू आले आहेत हे पाहून रामचंद्रांनी लगबगीने हात जोडले, वसिष्ठांचे स्वागत करण्यास ते पुढे गेले आणि भक्तिपूर्वक त्यांनी वसिष्ठांना दंडवत प्रणाम केला. त्या वेळी सीतेने लगेच एका सुवर्णपात्रातून पाणी आणले. (१८-१९)

गुरूंना रत्नसिंहासनावर बसवून रघुनाथांनी त्यांचे पाय धुतले आणि ते चरणोदक भक्तिपूर्वक सीतेसह आपल्या मस्तकाला लावून, श्रीराम म्हणाले, "हे मुने, आपले चरणोदक मस्तकावर धारण केल्याने आज मी धन्य झालो आहे." भगवान रामांनी असे म्हटल्यावर, हसत हसत मुनिश्रेष्ठ वसिष्ठ म्हणू लागले. (२०-२१)

"हे प्रभू रामा, तुमचे चरणोदक मस्तकी धारण करून पार्वती- पति भगवान शंकर धन्य धन्य होऊन गेले. तसेच माझे पिता ब्रह्मदेव हेसुद्धा तुमच्या पादतीर्थाचे सेवन करूनच पवित्र झाले आहेत. (२२)

गुरूंशी कसा व्यवहार करावा याचा लोकांना उपदेश करण्यासाठीच आत्ता तुम्ही असे बोलत आहात. मला चांगल्या प्रकारे माहीत आहे की लक्ष्मीसहित प्रकट झालेले तुम्ही साक्षात परमात्मा विष्णू आहात. (२३)

देवकार्यार्थसिद्ध्यर्थं भक्तानां भक्तिसिद्धये ।
रावणस्य वधार्थाय जातं जानामि राघव ॥ २४ ॥

तथापि देवकार्यार्थं गुह्यं नोद्घाटयाम्यहम् ।
यथा त्वं मायया सर्वं करोषि रघुनन्दन ॥ २५ ॥

तथैवानुविधास्येऽहं शिष्यस्त्वं गुरुरप्यहम् ।
गुरुर्गुरूणां त्वं देव पितॄणां त्वं पितामहः ॥ २६ ॥

अन्तर्यामी जगद्यात्रावाहकस्त्वमगोचरः ।
शुद्धसत्त्वमयं देहं धृत्वा स्वाधीनसम्भवम् ॥ २७ ॥

मनुष्य इव लोकेऽस्मिन् भासि त्वं योगमायया ।
पौरोहित्यमहं जाने विगर्ह्यं दूष्यजीवनम् ॥ २८ ॥

इक्ष्वाकूणां कुले रामः परमात्मा जनिष्यते ।
इति ज्ञातं मया पूर्वं ब्रह्मणा कथितं पुरा ॥ २९ ॥

ततोऽहमाशया राम तव सम्बन्धकाङ्क्षया ।
अकार्षं गर्हितमपि तवाचार्यत्वसिद्धये ॥ ३० ॥

ततो मनोरथो मेऽद्य फलितो रघुनन्दन ।
त्वदधीना महामाया सर्वलोकैकमोहिनी ॥ ३१ ॥

मां यथा मोहयेन्नैव तथा कुरु रघूद्वह ।
गुरुनिष्कृतिकामस्त्वं यदि देह्येतदेव मे ॥ ३२ ॥

प्रसङ्गात्सर्वमप्युक्तं न वाच्यं कुत्रचिन्मया ।
राज्ञा दशरथेनाहं प्रेषितोऽस्मि रघूद्वह ॥ ३३ ॥

त्वामामन्त्रयितुं राज्ये श्वोऽभिषेक्ष्यति राघव ।
अद्य त्वं सीतया सार्धमुपवासं यथाविधि ॥ ३४ ॥

कृत्वा शुचिर्भूमिशायी भव राम जितेन्द्रियः ।
गच्छामि राजसान्निध्यं त्वं तु प्रातर्गमिष्यसि ॥ ३५ ॥

हे राघवा, मला माहीत आहे की, देवतांचे कार्य सिद्ध करण्यासाठी, भक्तांची भक्ती सफल करण्यासाठी आणि रावणाचा वध करण्यासाठी तुम्ही अवतार घेतला आहे. (२४)

तथापि देवांचे कार्य सिद्ध व्हावे या हेतूने मी हे गुप्त रहस्य प्रकट करीत नाही. हे रघुनन्दना, तुम्ही स्वतःच्या मायेचा आश्रय घेऊन, सर्व कार्य करीत आहात, म्हणून तुम्ही शिष्य आहात आणि मी तुमचा गुरू आहे, या लौकिक व्यवहाराला अनुसरून मी वागेन. परंतु हे देवा, वास्तविक तुम्हीच गुरूंचे गुरू आहात आणि पितृ-समूहाचे पितामह तुम्हीच आहात. (२५-२६)

तुम्ही सर्वांचे अंतर्यामी, जगाच्या व्यवहाराचे प्रवर्तक आणि मन व वाणी यांचा विषय नसणारे आहात, तथापि स्वतःचा जन्म तुमच्या स्वाधीन असल्यामुळे शुद्ध सत्त्वमय शरीर धारण करून, इहलोकी तुम्ही आपल्या योगमायेने एखाद्या सामान्य माणसासारखे भासवत आहात. मला हेही माहीत आहे की, पुरोहिताचे कार्य हे अतिशय निंदनीय आणि दूषित जीवन असणारे असते. (२७-२८)

तथापि पूर्वी ब्रह्मदेवांनी सांगितलेले, 'इक्ष्वाकूंच्या कुळात परमात्मा राम अवतार घेणार आहेत,' हे जेव्हा मला कळले, तेव्हा हे रामा, मोठ्या आशेने आणि तुमच्याशी संबंध साधण्याच्या इच्छेने तुमचे आचार्यत्व प्राप्त करून घेण्यासाठी, पुरोहिताचे असूनही हे निंद्य पद मी स्वीकारले आहे. (२९-३०)

हे रघुनन्दना, तो माझा मनोरथ आज सफल झाला आहे. आता, हे रघुश्रेष्ठा, तुमच्या स्वाधीन असणारी, सर्व लोकांना मोहात पाडणारी, तुमची महामाया मला मोहित करणार नाही, असे काही करा. गुरूच्या ऋणातून मुक्त होण्याची जर तुमची इच्छा असेल तर तुम्ही मला इतकेच वरदान द्या. (३१-३२)

हे रघुश्रेष्ठा, या वेळी प्रसंगावशात् हे सर्व मी तुम्हांला सांगितले आहे; हे मी अन्य कुणालाच सांगणार नाही. हे राघवा, महाराज दशरथांनी तुम्हांला आमंत्रण देण्यासाठी मला पाठविले आहे. उद्या ते तुम्हांला राज्यपदावर अभिषेक करणार आहेत. तेव्हा आज तुम्ही शास्त्राप्रमाणे सीतेसह उपवास करून, शुद्ध होऊन आणि इंद्रिये जिंकून जमिनीवर शयन करा. आता मी राजांकडे जातो. तुम्ही उद्या सकाळी याल." (३३-३५)

इत्युक्त्वा रथमारुह्य ययौ राजगुरुर्द्रुतम् ।
रामोऽपि लक्ष्मणं दृष्ट्वा प्रहसन्निदमब्रवीत् ॥ ३६ ॥

असे बोलून राजाचे पुरोहित वसिष्ठ रथात बसून त्वरित निघून गेले. तेव्हा श्रीरामचंद्र लक्ष्मणाकडे पाहून हसत हसत म्हणाले. (३६)

सौमित्रे यौवराज्ये मे श्वोऽभिषेको भविष्यति ।
निमित्तमात्रमेवाहं कर्ता भोक्ता त्वमेव हि ॥ ३७ ॥

"हे सौमित्रे, उद्या माझा युवराज-पदावर अभिषेक होणार. त्या वेळी मी केवळ निमित्तमात्र असेन. त्याचा कर्ता आणि भोक्ता मात्र तूच असशील. (३७)

मम त्वं हि बहि:प्राणो नात्र कार्या विचारणा ।
ततो वसिष्ठेन यथा भाषितं तत्तथाकरोत् ॥ ३८ ॥

कारण तूच माझा बाह्य प्राण आहेस. या बाबतीत विचार करू नकोस." त्यानंतर वसिष्ठांनी जसे सांगितले होते, तसेच रघुनाथांनी केले. (३८)

वसिष्ठोऽपि नृपं गत्वा कृतं सर्वं न्यवेदयत् ।
वसिष्ठस्य पुरो राज्ञा ह्युक्तं रामाभिषेचनम् ॥ ३९ ॥

यदा तदैव नगरे श्रुत्वा कश्चित्पुमान् जगौ ।
कौसल्यायै राममात्रे सुमित्रायै तथैव च ॥ ४० ॥

इकडे राजांजवळ जाऊन वसिष्ठांनी आपण जे काही केले ते सर्व दशरथांना सांगितले. जेव्हा महाराज दशरथ वसिष्ठांबरोबर रामचंद्रांच्या अभिषेकासंबंधी बोलत होते, त्या वेळी ते ऐकून कुणी तरी ती वार्ता संपूर्ण नगरात जाहीर केली, तसेच त्याने ती वार्ता रामाची माता कौसल्या आणि सुमित्रा यांनाही सांगितली. (३९-४०)

श्रुत्वा ते हर्षसम्पूर्णे ददतुर्हारमुत्तमम् ।
तस्मै तत: प्रीतमना: कौसल्या पुत्रवत्सला ॥ ४१ ॥

लक्ष्मीं पर्यचरद्देवीं रामस्यार्थप्रसिद्धये ।
सत्यवादी दशरथ: करोत्येव प्रतिश्रुतम् ॥ ४२ ॥

कैकेयीवशग: किन्तु कामुक: किं करिष्यति ।
इति व्याकुलचित्ता सा दुर्गां देवीमपूजयत् ॥ ४३ ॥

वार्ता ऐकून त्या दोघी अत्यंत आनंदित झाल्या व त्यांनी त्या पुरुषाला एक अतिशय उत्तम हार बक्षीस म्हणून दिला. मनात संतुष्ट झालेल्या पुत्रवत्सल कौसल्येने, रामचंद्रांची इष्टसिद्धी व्हावी म्हणून देवी लक्ष्मीचे पूजन केले. तिने विचार केला, 'दशरथ राजा सत्यवादी आहेत. ते आपली प्रतिज्ञा पालन करतात, हे प्रसिद्ध आहेत. परंतु ते कामुक आहेत आणि कैकेयीला वश आहेत. अशा स्थितीत ते आपली प्रतिज्ञा पूर्ण करू शकतील का ?' या विचाराने व्याकूळ झाल्यामुळे तिने दुर्गादेवीची पूजा करण्यास प्रारंभ केला. (४१-४३)

एतस्मिन्नन्तरे देवा देवीं वाणीमचोदयन् ।
गच्छ देवि भुवो लोकमयोध्यायां प्रयत्नत: ॥ ४४ ॥

दरम्यानच्या काळात देवांनी सरस्वती देवीला प्रेरणा केली की "हे देवी, तू भूलोकावरील अयोध्या नगरीत मुद्दाम जा. (४४)

रामाभिषेकविघ्नार्थं यतस्व ब्रह्मवाक्यत: ।
मन्थरां प्रविशस्वादौ कैकेयीं च तत: परम् ॥ ४५ ॥

आणि तेथे जाऊन, ब्रह्मदेवांच्या वचनाप्रमाणे तू श्रीरामचंद्रांच्या राज्याभिषेकात विघ्न उपस्थित करण्याचा अवश्य प्रयत्न कर. प्रथम तू मंथरेमध्ये प्रवेश कर आणि त्यानंतर कैकेयीमध्ये प्रवेश कर. (४५)

ततो विघ्ने समुत्पन्ने पुनरेहि दिवं शुभे ।
तथेत्युक्त्वा तथा चक्रे प्रविवेशाथ मन्थराम् ॥ ४६ ॥

हे शुभदेवी, विघ्न उपस्थित झाल्यावर तू पुन: स्वर्गलोकी परत ये." 'ठीक आहे 'असे म्हणून सरस्वतीने त्या प्रमाणे केले. तिने प्रथम मंथरेमध्ये प्रवेश केला. (४६)

सापि कुब्जा त्रिवक्रा तु प्रासादाग्रमथारुहत् ।
नगरं परितो दृष्ट्वा सर्वत: समलङ्कृतम् ॥ ४७ ॥

तीन ठिकाणी वाकडी असणारी ती कुब्जा मंथरा प्रासादाच्या गच्चीवर गेली होती. तेथून तिला दिसले की अयोध्या नगर हे सर्व बाजूंनी शृंगारले गेले आहे. (४७)

नानातोरणसम्बाधं पताकाभिरलङ्कृतम् ।
सर्वोत्सवसमायुक्तं विस्मिता पुनरागमत् ॥ ४८ ॥

नगरात नाना प्रकारची तोरणे बांधली गेली होती. चित्रविचित्र पताकांनी ते सुशोभित झाले होते. सर्व प्रकारचे उत्सव चालू होते. हे पाहून मंथरा अत्यंत आश्चर्यचकित झाली आणि खाली आली. (४८)

धात्रीं पप्रच्छ मात: किं नगरं समलङ्कृतम् ।
नानोत्सवसमायुक्ता कौसल्या चातिहर्षिता ॥ ४९ ॥

ददाति विप्रमुख्येभ्यो वस्त्राणि विविधानि च ।
तामुवाच तदा धात्री रामचन्द्राभिषेचनम् ॥ ५० ॥

श्वो भविष्यति तेनाद्य सर्वतोऽलङ्कृतं पुरम् ।
तच्छ्रुत्वा त्वरितं गत्वा कैकेयीं वाक्यमब्रवीत् ॥ ५१ ॥

तिने दाईला विचारले, "माई, आज अयोध्या नगर का शृंगारले आहे ? तसेच नाना प्रकारचे उत्सव साजरे करीत अतिशय आनंदाने महाराणी कौसल्या ही श्रेष्ठ ब्राह्मणांना विविध वस्त्र-भूषणे का बरे दान देत आहे ?" तेव्हा दाईने तिला सांगितले, "उद्या रामांचा राज्याभिषेक होणार आहे. म्हणून आज सर्व बाजूंनी अयोध्या नगर शृंगारले गेले आहे." ते वचन ऐकताच मंथरा त्वरित कैकेयीजवळ गेली. (४९-५१)

पर्यङ्कस्थां विशालाक्षीमेकान्ते पर्यवस्थिताम् ।
किं शेषे दुर्भगे मूढे महद्भयमुपस्थितम् ॥ ५२ ॥

त्या वेळी विशालाक्षी कैकेयी एकांत स्थानी पलंगावर बसलेली होती. मंथरा तिला म्हणाली, "अग अभागी मूर्ख स्त्रिये, तू कशी काय झोपली आहेस ? तुझ्यावर मोठे संकट आले आहे. (५२)

न जानीषेऽतिसौन्दर्यमानिनी मत्तगामिनी ॥ ५३ ॥

हे गजगामिनी, तुला स्वत:च्या सौंदर्याची फारच घमेंड आहे. त्यामुळे तुला कोणतीही गोष्ट माहीत नसते. (५३)

रामस्यानुग्रहाद्राज्ञ: श्वोऽभिषेको भविष्यति ।
तच्छ्रुत्वा सहसोत्थाय कैकेयी प्रियवादिनी ॥ ५४ ॥

अग, महाराज दशरथाच्या कृपेने उद्या रामाचा राज्याभिषेक होणार आहे." ते ऐकताच गोड बोलणारी कैकेयी लगेच उठून उभी राहिली. (५४)

तस्यै दिव्यं ददौ स्वर्णनूपुरं रत्नभूषितम् ।
हर्षस्थाने किमिति मे कथ्यते भयमागतम् ॥ ५५ ॥

तिने मंथरेला दिव्य असे रत्नजडित सोन्याचे नूपुर दिले आणि ती म्हणाली "अग, रामाचा राज्याभिषेक ही फार आनंदाची वार्ता आहे. मग ते संकट आहे, असे तू कसे बरे म्हणतेस ? (५५)

भरतादधिको राम: प्रियकृन्मे प्रियंवद: ।
कौसल्यां मां समं पश्यन् सदा शुश्रूषते हि माम् ॥ ५६ ॥

भरतापेक्षा राम हा मला अधिक प्रिय आहे. तो मला आवडणारा आणि माझ्याशी गोड बोलणारा आहे. तो कौसल्या आणि मी यांच्याकडे समान भावनेने पाहात असतो. तसेच तो माझी नेहमीच सेवा करीत असतो. (५६)

रामाद्भयं किमापन्नं तव मूढे वदस्व मे ।
तच्छ्रुत्वा विषसादाथ कुब्जाकारणवैरिणी ॥ ५७ ॥

अग मूर्ख स्त्रिये, अशा त्या रामापासून तुला कोणते भय वाटत आहे, ते मला सांग बरे." हे ऐकल्यानंतर, अकारण वैर करणारी ती कुब्जा विषण्ण झाली आणि म्हणाली. (५७)

शृणु मद्वचनं देवि यथार्थं ते महद्भयम् ।
त्वां तोषयन् सदा राजा प्रियवाक्यानि भाषते ॥ ५८ ॥

"हे राणी, माझे वचन ऐक. खरे म्हणजे तुझ्यावरच मोठे संकट आले आहे. तुला संतुष्ट करण्यासाठी दशरथ राजा तुझ्याबरोबर नेहमी गोड गोड बोलतात. (५८)

कामुकोऽतथ्यवादी च त्वां वाचा परितोषयन् ।
कार्यं करोति तस्या वै राममातु: सुपुष्कलम् ॥ ५९ ॥

ते फार कामुक आणि खोटारडे आहेत. तुला अशा प्रकारे केवळ शब्दांनी संतुष्ट करीत ते रामाच्या मातेचेच सर्व कार्य पूर्ण करीतात. (५९)

मनस्येतन्निधायैव प्रेषयामास ते सुतम् ।
भरतं मातुलकुले प्रेषयामास सानुजम् ॥ ६० ॥

ही गोष्ट मनामध्ये बाळगून, तुझ्या भरत या पुत्राला शत्रुघ्नासह त्यांनी आजोळी पाठवून दिले आहे. (६०)

सुमित्रायाः समीचीनं भविष्यति न संशयः ।
लक्ष्मणो राममन्वेति राज्यं सोऽनुभविष्यति ॥ ६१ ॥

या गोष्टीमुळे सुमित्रेचे तर सर्व काही भलेच होणार यात काहीच संशय नाही. कारण लक्ष्मण हा रामाचा अनुयायी आहे आणि म्हणून तोही राज्य-भोगाचा अनुभव घेईल. (६१)

भरतो राघवस्याग्रे किङ्करो वा भविष्यति ।
विवास्यते वा नगरात्प्राणैर्वा हाप्यतेऽचिरात् ॥ ६२ ॥

परंतु भरताला रामाच्यापुढे त्याचा दास होऊन राहावे लागेल. अथवा त्याला लौकरच नगरातून हाकलून दिले जाईल अथवा त्याचे प्राण हरण केले जातील. (६२)

त्वं तु दासीव कौसल्यां नित्यं परिचरिष्यसि ।
ततोऽपि मरणं श्रेयो यत्सपत्न्याः पराभवः ॥ ६३ ॥

आणि तुला एकाद्या दासीप्रमाणे कौसल्येची सेवा करावी लागेल. अशा प्रकारे सवतीकडून अपमान करून घेऊन राहण्यापेक्षा मरून जाणे, हेच अधिक चांगले. (६३)

अतः शीघ्रं यतस्वाद्य भरतस्याभिषेचने ।
रामस्य वनवासार्थं वर्षाणि नव पञ्च च ॥ ६४ ॥

म्हणून आज तू लगेच भरताच्या राज्याभिषेकासाठी आणि रामाच्या चौदा वर्षे वनवासासाठी प्रयत्न कर. (६४)

ततो रूढोऽभये पुत्रस्तव राज्ञि भविष्यति ।
उपायं ते प्रवक्ष्यामि पूर्वमेव सुनिश्चितम् ॥ ६५ ॥

हे राणी, असे झाल्यावर तुझा पुत्र भरत हा निष्कंटक राज्यपदावर आरूढ होईल. यासाठी मी पूर्वीच ठरवलेला उपाय तुला सांगते. (६५)

पुरा देवासुरे युद्धे राजा दशरथः स्वयम् ।
इन्द्रेण याचितो धन्वी सहायार्थं महारथः ॥ ६६ ॥

पूर्वी देव आणि असुर यांच्या संग्रामाच्या वेळी स्वतः इंद्राने धनुर्धारी, महारथी अशा राजा दशरथांना सहाय्यासाठी प्रार्थना केली होती. (६६)

जगाम सेनया सार्धं त्वया सह शुभानने ।
युद्धं प्रकुर्वतस्तस्य राक्षसैः सह धन्विनः ॥ ६७ ॥

तदाक्षकीलो न्यपतच्छिन्नस्तस्य न वेद सः ।
त्वं तु हस्तं समावेश्य कीलरन्ध्रेऽतिधैर्यतः ॥ ६८ ॥

हे सुंदरी, त्यावेळी तो सेनेसह तुला बरोबर घेऊन गेला होता. जेव्हा धनुर्धारी महाराज दशरथ राक्षसांबरोबर युद्ध करण्यात मग्न होते, तेव्हा रथाच्या कण्याची पाचर तुटून खाली पडली पण ही गोष्ट दशरथांना कळली नाही. त्या वेळी तू अतिशय धैर्याने आपला हात त्या कण्याच्या छिद्रामध्ये घातलास. (६७-६८)

स्थितवत्यसितापाङ्गि पतिप्राणपरीप्सया ।
ततो हत्वासुरान्सर्वान् ददर्श त्वामरिन्दमः ॥ ६९ ॥

आणि हे कृष्णाक्षी, पतीचे प्राण वाचविण्यासाठी तू बराच वेळ त्या स्थितीत राहिलीस. त्यानंतर सर्व दैत्यांना ठार करून, शत्रूचे दमन करणाऱ्या महाराज दशरथांनी तुझ्याकडे पाहिले. (६९)

आश्चर्यं परमं लेभे त्वामालिङ्ग्य मुदान्वितः ।
वृणीष्व यत्ते मनसि वाञ्छितं वरदोऽस्म्यहम् ॥ ७० ॥

तुला त्या स्थितीत पाहून त्यांना अतिशय आश्चर्य वाटले. प्रसन्न होऊन, तुला आलिंगन देऊन ते तुला म्हणाले, 'तुला वर देण्याची माझी इच्छा आहे. तुझ्या मनात जी इच्छा असेल ती मागून घे. (७०)

वरद्वयं वृणीष्व त्वमेवं राजावदत्स्वयम् ।
त्वयोक्तो वरदो राजन्यदि दत्तं वरद्वयम् ॥ ७१ ॥

त्वय्येव तिष्ठतु चिरं न्यासभूतं ममानघ ।
यदा मेऽवसरो भूयात्तदा देहि वरद्वयम् ॥ ७२ ॥

तू दोन वर माग.' असे दशरथ राजा स्वतः तुल म्हणाले होते. तेव्हा तू त्यांना म्हटलेस, 'महाराज, जर तुम्ह मला दोन वर देणार असाल, तर, हे निर्मळ मनाच्या राजा, त वर माझी ठेव म्हणून तुमच्याजवळच राहू देत. जेव्हा योग्य वेळ येईल तेव्हा ते दोन वर तुम्ही मला द्या.' (७१-७२

तथेत्युक्त्वा स्वयं राजा मन्दिरं व्रज सुव्रते ।
त्वत्तः श्रुतं मया पूर्वमिदानीं स्मृतिमागतम् ॥ ७३ ॥

'ठीक आहे' असे बोलून राजा तुला म्हणाला, ' सुव्रते, आता तू युद्धभूमीच्या शिबिरात चल.' हे महाराण कैकेयी, हा संपूर्ण वृत्तांत मी पूर्वी तुझ्याकडूनच ऐकला होत मला आत्ता त्याचे स्मरण झाले. (७३

अतः शीघ्रं प्रविश्याद्य क्रोधागारं रुषान्विता ।
विमुच्य सर्वाभरणं सर्वतो विनिकीर्य च ।
भूमावेव शयाना त्वं तूष्णीमातिष्ठ भामिनि ॥ ७४ ॥

यावत्सत्यं प्रतिज्ञाय राजाभीष्टं करोति ते ।
श्रुत्वा त्रिवक्रयोक्तं तत्तदा केकयनन्दिनी ॥ ७५ ॥

तथ्यमेवाखिलं मेने दुःसङ्गाहितविभ्रमा ।
तामाह कैकेयी दुष्टा कुतस्ते बुद्धिरीदृशी ॥ ७६ ॥

एवं त्वां बुद्धिसम्पन्नां न जाने वक्रसुन्दरि ।
भरतो यदि राजा मे भविष्यति सुतः प्रियः ॥ ७७ ॥

ग्रामान् शतं प्रदास्यामि मम त्वं प्राणवल्लभा ।
इत्युक्त्वा कोपभवनं प्रविश्य सहसा रुषा ॥ ७८ ॥

विमुच्य सर्वाभरणं परिकीर्य समन्ततः ।
भूमौ शयाना मलिना मलिनाम्बरधारिणी ॥ ७९ ॥

प्रोवाच शृणु मे कुब्जे यावद्रामो वनं व्रजेत् ।
प्राणांस्त्यक्ष्येऽथ वा वक्रे शयिष्ये तावदेव हि ॥ ८० ॥

निश्चयं कुरु कल्याणि कल्याणं ते भविष्यति ।
इत्युक्त्वा प्रययौ कुब्जा गृहं सापि तथाकरोत् ॥ ८१ ॥

धीरोऽत्यन्तदयान्वितोऽपि सगुणा-
चारान्वितो वाथवा
नीतिज्ञो विधिवाददेशिकपरो
विद्याविवेकोऽथवा ।
दुष्टानामतिपापभावितधियां
सङ्गं सदा चेद्व्रजेत्-
तद्बुद्ध्या परिभावितो व्रजति तत्-
साम्यं क्रमेण स्फुटम् ॥ ८२ ॥

अतः सङ्गः परित्याज्यो दुष्टानां सर्वदैव हि ।
दुःसङ्गी च्यवते स्वार्थाद्यथेयं राजकन्यका ॥ ८३ ॥

म्हणून हे भामिनी, आता तू लगेच राग धरून क्रोध-भवनात प्रवेश कर आणि आपले सर्व अलंकार अंगावरून उतरवून इकडे तिकडे फेकून दे. राजा प्रतिज्ञा पूर्ण करून जोपर्यंत तुझे अभीष्ट कार्य करण्यास तयार होत नाहीत, तोपर्यंत तू जमिनीवर झोपून अगदी गप्प पडून राहा." त्रिवक्रा मंथरेने सांगितलेले ते वचन ऐकून, दुष्ट संगामुळे केकय-कन्या कैकेयीच्या बुद्धीमध्ये भ्रम निर्माण झाला त्यामुळे अहितामध्ये हित वाटू लागले. अशा प्रकारे बुद्धी दूषित झाल्यामुळे तिला मंथरेचे सर्व कथन खरे वाटले आणि मग कैकेयी तिला म्हणाली, "अग, तुझ्या ठिकाणी इतकी बुद्धी कोठून आली ? (७४-७६)

अग कुबडे, तू इतकी शहाणी आहेस, हे मला माहीत नव्हते. जर माझा लाडका पुत्र भरत राजा झाला, तर मी तुला शंभर गावे देईन. तू मला प्राणाइतकी प्रिय झाली आहेस." असे बोलून कैकेयी रागाने चट्दिशी कोपभवनात शिरली. (७७-७८)

आपले सर्व अलंकार अंगावरून उतरवून तिने सगळीकडे विखरून टाकले आणि मळकट वस्त्रे परिधान करून ती अतिशय मलिन स्थितीत जमिनीवर पडून राहिली आणि म्हणाली, "अग कुब्जे, ऐक. जोपर्यंत राम वनात जात नाही, तोपर्यंत हे वक्रे, मी प्राणत्याग तरी करीन किंवा अशीच येथे जमिनीवर पडून राहीन." (७९-८०)

"मग तू असेच कर. त्यामुळेच तुझे कल्याण होईल" असे कैकेयीला सांगून कुब्जा आपल्या घरी निघून गेली आणि इकडे त्या कैकेयीनेसुद्धा तसेच केले. (८१)

एखादा माणूस अत्यंत धैर्यवान्, अतिशय दयाळू, गुणांनी आणि सदाचाराने संपन्न, नीती जाणणारा, विद्या शिकविणाऱ्या गुरूच्या सेवेत तत्पर आणि विद्या व विवेक यांनी संपन्न असेना का, तथापि ज्यांच्या बुद्धीवर अतिशय पापाचे सावट पडले आहे, अशा दुष्टांच्या संगतीत जर तो नेहमी असेल, तर हळूहळू त्यांच्या बुद्धीने प्रभावित झालेला मनुष्य निश्चितपणे त्या दुष्टांच्या प्रमाणेच बनतो, हे खरे. (८२)

म्हणून दुष्ट पुरुषांची संगती नेहमीच सोडावी . कारण दुःसंग करणारा माणूस हा या राजकन्या कैकेयी प्रमाणे स्वतःच्या पुरुषार्थापासून च्युत होतो. (८३)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकाण्डे द्वितीयः सर्गः ॥२॥

# तृतीय सर्ग

## राजा दशरथांनी कैकेयीला वर दिला

श्रीमहादेव उवाच

ततो दशरथो राजा रामाभ्युदयकारणात् ।
आदिश्य मन्त्रिप्रकृतीः सानन्दो गृहमाविशत् ॥ १ ॥

तत्राद्दृष्ट्वा प्रियां राजा किमेतदतिविह्वलः ।
या पुरा मन्दिरं तस्याः प्रविष्टे मयि शोभना ॥ २ ॥

हसन्ती मामुपायाति सा किं नैवाद्य दृश्यते ।
इत्यात्मन्येव संचिन्त्य मनसातिविदूयता ॥ ३ ॥

पप्रच्छ दासीनिकरं कुतो वः स्वामिनी शुभा ।
नायाति मां यथापूर्वं मत्प्रिया प्रियदर्शना ॥ ४ ॥

ता ऊचुः क्रोधभवनं प्रविष्टा नैव विद्महे ।
कारणं तत्र देव त्वं गत्वा निश्चेतुमर्हसि ॥ ५ ॥

इत्युक्तो भयसन्त्रस्तो राजा तस्याः समीपगः ।
उपविश्य शनैर्देहं स्पृशन्वै पाणिनाब्रवीत् ॥ ६ ॥

किं शेषे वसुधापृष्ठे पर्यङ्कादीन् विहाय च ।
मां त्वं खेदयसे भीरु यतो मां नावभाषसे ॥ ७ ॥

अलङ्कारं परित्यज्य भूमौ मलिनवाससा ।
किमर्थं ब्रूहि सकलं विधास्ये तव वाञ्छितम् ॥ ८ ॥

को वा तवाहितं कर्ता नारी वा पुरुषोऽपि वा ।
स मे दण्ड्यश्च वध्यश्च भविष्यति न संशयः ॥ ९ ॥

ब्रूहि देवि यथा प्रीतिस्तदवश्यं ममाग्रतः ।
तदिदानीं साधयिष्ये सुदुर्लभमपि क्षणात् ॥ १० ॥

जानासि त्वं मम स्वान्तं प्रियं मां स्ववशे स्थितम् ।
तथापि मां खेदयसे वृथा तव परिश्रमः ॥ ११ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – त्यानंतर श्रीरामचंद्रांच्या अभ्युदयासाठी मंत्री आणि प्रजा-वर्ग यांना मंगल कार्य करण्याची आज्ञा करून दशरथ राजा आनंदाने आपल्या महालात शिरले. (१)

तेथे आपली लाडकी कैकेयी न दिसल्यामुळे अतिशय व्याकूळ होऊन ते मनात विचार करू लागले- "हे काय ? मी महालात शिरताच पूर्वी जी सुंदरी हसत हसत माझ्यापुढे येत असे, ती आज का बरे येथे दिसत नाही ?" मग मनात अतिशय दु:खी झालेल्या त्या राजांनी दासींना विचारले "तुमची शुभलक्षणा स्वामिनी कुठे आहे? ती माझी प्रियदर्शना प्रिया आज पूर्वीप्रमाणे माझ्यासमोर का बरे येत नाही ?" (२-४)

दासींनी सांगितले, "महाराज, ती आमची स्वामिनी क्रोधभवनात शिरली आहे. त्याचे कारण आम्हांस माहीत नाही. आपण स्वत:च तेथे जाऊन सर्व गोष्टी जाणून घ्याव्यात." (५)

दासींनी असे सांगितल्यावर भीतीने त्रस्त होऊन राजा कैकेयीजवळ गेले. तेथे बसून ते हळुवारपणे तिचा देह हाताने हळूहळू कुरवाळत म्हणाले. (६)

"अग प्रिये, पलंग इत्यादी सोडून देऊन तू आज जमिनीवर का झोपली आहेस ? तू माझ्याशी काही बोलत नाहीस ? त्यामुळे मला फार खेद होत आहे. (७)

सर्व अलंकार टाकून देऊन, मलिन वस्त्र परिधान करून, तू का बरे जमिनीवर पडली आहेस ? तुझी जी इच्छा असेल ती तू मला सांग. मी ती पूर्ण करीन. (८)

तुझे अनिष्ट करणारा कोण आहे ? तो स्त्री असो वा पुरुष असो, तो माझ्या शिक्षेला पात्र ठरेल. इतकेच नव्हे तर त्याला मृत्युदंडही देता देईन, यात काहीही संशय नाही. (९)

हे देवी, ज्यामुळे तुला आनंद होईल ती गोष्ट तू मला अवश्य सांग. ते कार्य अत्यंत अवघड असले तरीसुद्धा मी ते एका क्षणातच करून टाकीन. (१०)

तू माझे हृदय जाणतेसच. मी तुला अत्यंत प्रिय आहे, आणि तुला वश आहे. तरीसुद्धा तू मला खिन्न करीत आहेस. तुझा हा व्यर्थ खटाटोप आहे. (११)

ब्रूहि कं धनिनं कुर्यां दरिद्रं ते प्रियङ्करम् ।
धनिनं क्षणमात्रेण निर्धनं च तवाहितम् ॥ १२ ॥

मला सांग. तुला आवडणारी गोष्ट करणाऱ्या कोणत्या दरिद्री माणसाला एका क्षणात मी श्रीमंत करू ? किंवा तुला अप्रिय वाटणारी गोष्ट करणाऱ्या कोणत्या श्रीमंत माणसाला मी एका क्षणात निर्धन करू ? (१२)

ब्रूहि कं वा वधिष्यामि वधार्हो वा विमोक्ष्यते ।
किमत्र बहुनोक्तेन प्राणान्दास्यामि ते प्रिये ॥ १३ ॥

मला सांग, कोणाला मी ठार मारू अथवा वधाला योग्य असणाऱ्या कोणत्या माणसाला सोडून देऊ? जास्त काय सांगू ? हे प्रिये, मी तुझ्यासाठी माझे प्राणसुद्धा देईन. (१३)

मम प्राणात्प्रियतरो रामो राजीवलोचनः ।
तस्योपरि शपे ब्रूहि त्वद्धितं तत्करोम्यहम् ॥ १४ ॥

कमलनयन राम मला माझ्या प्राणांपेक्षासुद्धा अधिक प्रिय आहे. त्याची शपथ घेऊन मी तुला सांगतो. तुला जे आवडते ते तू मला सांग.मी तेच करीन." (१४)

इति ब्रुवाणं राजानं शपन्तं राघवोपरि ।
शनैर्विमृज्य नेत्रे सा राजानं प्रत्यभाषत ॥ १५ ॥

रामांची शपथ घेऊन महाराज दशरथांनी असे सांगितल्यावर, कैकेयीने हळूहळू आपले अश्रू पुसले आणि ती राजांना म्हणाली. (१५)

यदि सत्यप्रतिज्ञोऽसि शपथं कुरुषे यदि ।
याच्ञां मे सफलां कर्तुं शीघ्रमेव त्वमर्हसि ॥ १६ ॥

"हे महाराज, जर तुम्ही सत्यप्रतिज्ञ असाल आणि जर तुम्ही शपथसुद्धा घेत आहात, तर मी जी मागणी करीन ती तुम्ही ताबडतोब पूर्ण केली पाहिजे. (१६)

पूर्वं देवासुरे युद्धे मया त्वं परिरक्षितः ।
तदा वरद्वयं दत्तं त्वया मे तुष्टचेतसा ॥ १७ ॥

पूर्वी देव आणि असुर यांच्या युद्धात मी तुमचे सर्व प्रकारे रक्षण केले होते. त्या वेळी तुम्ही संतुष्ट होऊन मला दोन वर दिले होते. (१७)

तद्द्वयं न्यासभूतं मे स्थापितं त्वयि सुव्रत ।
तत्रैकेन वरेणाशु भरतं मे प्रियं सुतम् ॥ १८ ॥

एभिः संभृतसंभारैर्यौवराज्येऽभिषेचय ।
अपरेण वरेणाशु रामो गच्छतु दण्डकान् ॥ १९ ॥

हे सुव्रता, त्या वेळी ते दोन वर मी तुमच्याजवळ ठेव म्हणून ठेवले होते. त्यातील एका वराने तुम्ही त्वरित माझ्या लाडक्या पुत्राला, भरताला, या जमविलेल्या राज्याभिषेकाच्या साहित्याने, युवराजपदावर अभिषेक करा आणि दुसऱ्या वराने राम ताबडतोब दंडक अरण्यात जाऊ दे. (१८-१९)

मुनिवेषधरः श्रीमान् जटावल्कलभूषणः ।
चतुर्दश समास्तत्र कन्दमूलफलाशनः ॥ २० ॥

तेथे राम हा मुनीचा वेष धारण करून, जटा आणि वल्कले ही भूषणे बाळगून, कंद, मुळे व फळे भक्षण करीत चौदा वर्षे तेथे राहू दे. (२०)

पुनरायातु तस्यान्ते वने वा तिष्ठतु स्वयम् ।
प्रभाते गच्छतु वनं रामो राजीवलोचनः ॥ २१ ॥

त्यानंतर तो स्वतः आपल्या इच्छेनुसार अयोध्येला परत येऊ दे अथवा वनातच राहू दे. काही झाले तरी उद्या सकाळी कमलनयन राम हा वनात गेला पाहिजे. (२१)

यदि किञ्चिद्विलम्बेत प्राणांस्त्यक्ष्ये तवाग्रतः ।
भव सत्यप्रतिज्ञस्त्वमेतदेव मम प्रियम् ॥ २२ ॥

जर या बाबतीत थोडा विलंब झाला तर मी तुमच्या समोरच आपल्या प्राणांचा त्याग करीन. आता तुम्ही आपली प्रतिज्ञा खरी करा. बस्, मला आवडणारी हीच गोष्ट आहे." (२२)

श्रुत्वैतद्दारुणं वाक्यं कैकेय्या रोमहर्षणम् ।
निपपात महीपालो वज्राहत इवाचलः ॥ २३ ॥

अंगावर शहारे आणणारे हे कैकेयीचे कठोर वचन ऐकल्यावर वज्राचा तडाखा बसलेल्या पर्वताप्रमाणे महाराज दशरथ खाली कोसळले. (२३)

शनैरुन्मील्य नयने विमृज्य परया भिया ।
दुःस्वप्नो वा मया दृष्टो ह्यथवा चित्तविभ्रमः ॥ २४ ॥

त्यानंतर हळूहळू डोळे उघडून आणि अतिशय भयाने डोळे पुसून ते मनातल्या मनात विचार करू लागले, "हे काय, मी एखादे वाईट स्वप्न पाहिले की माझ्या चित्ताला भ्रम झाला आहे ? " (२४)

इत्यालोक्य पुरः पत्नीं व्याघ्रीमिव पुरः स्थिताम् ।
किमिदं भाषसे भद्रे मम प्राणहरं वचः ॥ २५ ॥

नंतर त्या वेळी एखाद्या वाघिणीप्रमाणे आपल्यासमोर बसलेल्या कैकेयीकडे पाहून दशरथ राजा म्हणू लागले, 'अग प्रिये, माझे प्राण हरण करणारे हे वचन तू काय बोलत आहेस ? (२५)

रामः कमपराधं ते कृतवान्कमलेक्षणः ।
ममाग्रे राघवगुणान्वर्णयस्यनिशं शुभान् ॥ २६ ॥

कमलनयन रामाने तुझा असा कोणता अपराध केला आहे ? यापूर्वी तू रात्रंदिवस माझ्यासमोर त्याचे उत्तम गुण वर्णन करीत होतीस. (२६)

कौसल्यां मां समं पश्यन् शुश्रूषां कुरुते सदा ।
इति ब्रुवन्ती त्वं पूर्वमिदानीं भाषसेऽन्यथा ॥ २७ ॥

पूर्वी तर तू असे म्हणत होतीस की मला व कौसल्येला समान मानून राम माझी सदा सेवा करतो. आता तर तू काही तरी वेगळेच बोलत आहेस. (२७)

राज्यं गृहाण पुत्राय रामस्तिष्ठतु मन्दिरे ।
अनुगृह्णीष्व मां वामे रामान्नास्ति भयं तव ॥ २८ ॥

पुत्रासाठी राज्य घे. पण रामाला मात्र घरातच राहू दे. हे सुंदरी, माझ्यावर अनुग्रह कर. तुला रामापासून कोणतेही भय नाही. " (२८)

इत्युक्त्वाश्रुपरीताक्षः पादयोर्निपपात ह ।
कैकेयी प्रत्युवाचेदं सापि रक्तान्तलोचना ॥ २९ ॥

असे बोलून, रडत रडत महाराज दशरथ कैकेयीच्या पाया पडले. तेव्हा रागाने डोळे लाल करून कैकेयीसुद्धा असे प्रतिवचन बोलली. (२९)

राजेन्द्र किं त्वं भ्रान्तोऽसि उक्तं तद्भाषसेऽन्यथा ।
मिथ्या करोषि चेत्स्वीयं भाषितं नरको भवेत् ॥ ३० ॥

"हे राजेंद्रा, तुमचा बुद्धिभ्रंश झाला आहे का? स्वतः दिलेल्या वचनांपासून तुम्ही माघार घेत आहात. लक्षात ठेवा, तुम्ही स्वतःची प्रतिज्ञा मोडाल, तर तुम्हाला नरक प्राप्त होईल. (३०)

वनं न गच्छेद्यदि रामचन्द्रः
प्रभातकालेऽजिनचीरयुक्तः ।
उद्बन्धनं वा विषभक्षणं वा
कृत्वा मरिष्ये पुरतस्तवाहम् ॥ ३१ ॥

मृगचर्म आणि वल्कले धारण करून रामचंद्र जर उद्या सकाळी वनामध्ये गेला नाही, तर मी तुमच्या पुढेच फास लावून अगर विष खाऊन मरून जाईन. (३१)

सत्यप्रतिज्ञोऽहमितीह लोके
विडम्बसे सर्वसभान्तरेषु ।
रामोपरि त्वं शपथं च कृत्वा
मिथ्याप्रतिज्ञो नरकं प्रयाहि ॥ ३२ ॥

लोकांत सर्व सभांमध्ये 'मी सत्यप्रतिज्ञ आहे' असे सांगून तुम्ही आत्मस्तुती करीत आलात. आत्ता रामाची शपथ घेऊन तुम्ही आपली प्रतिज्ञासुद्धा खोटी करीत आहात. म्हणून तुम्ही नरकात जाल." (३२)

इत्युक्तः प्रियया दीनो मग्नो दुःखार्णवे नृपः ।
मूर्च्छितः पतितो भूमौ विसंज्ञो मृतको यथा ॥ ३३ ॥

आपल्या प्रियेने असे सांगितल्यावर महाराज दशरथ हा व्याकूळ होऊन दुःखरूपी सागरात बुडून गेले आणि एकाद्या मृत प्रेताप्रमाणे ते मूर्च्छित आणि चेतनाहीन होऊन जमिनीवर पडले. (३३)

एवं रात्रिर्गता तस्य दुःखात्संवत्सरोपमा ।
अरुणोदयकाले तु बन्दिनो गायका जगुः ॥ ३४ ॥

अशा प्रकारे अतिशय दुःखामुळे त्याची ती रात्र एखाद्या वर्षाप्रमाणे व्यतीत झाली. इकडे अरुणोदयाच्या वेळी गायक आणि बंदिजन स्तुतिगान करू लागले. (३४)

निवारयित्वा तान् सर्वान्कैकेयी रोषमास्थिता ।
ततः प्रभातसमये मध्यकक्षमुपस्थिताः ॥ ३५ ॥

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्या ऋषयः कन्यकास्तथा ।
छत्रं च चामरं दिव्यं गजो वाजी तथैव च ॥ ३६ ॥

अन्याश्च वारमुख्या याः पौरजानपदास्तथा ।
वसिष्ठेन यथाज्ञप्तं तत्सर्वं तत्र संस्थितम् ॥ ३७ ॥

स्त्रियो बालाश्च वृद्धाश्च रात्रौ निद्रां न लेभिरे ।
कदा द्रक्ष्यामहे रामं पीतकौशेयवाससम् ॥ ३८ ॥

सर्वाभरणसम्पन्नं किरीटकटकोज्ज्वलम् ।
कौस्तुभाभरणं श्यामं कन्दर्पशतसुन्दरम् ॥ ३९ ॥

अभिषिक्तं समायातं गजारूढं स्मिताननम् ।
श्वेतच्छत्रधरं तत्र लक्ष्मणं लक्षणान्वितम् ॥ ४० ॥

रामं कदा वा द्रक्ष्यामः प्रभातं वा कदा भवेत् ।
इत्युत्सुकधियः सर्वे बभूवुः पुरवासिनः ॥ ४१ ॥

नेदानीमुत्थितो राजा किमर्थं चेति चिन्तयन् ।
सुमन्त्रः शनकैः प्रायाद्यत्र राजावतिष्ठते ॥ ४२ ॥

वर्धयन् जयशब्देन प्रणमञ्शिरसा नृपम् ।
अतिखिन्नं नृपं दृष्ट्वा कैकेयीं समपृच्छत ॥ ४३ ॥

देवि कैकेयि वर्धस्व किं राजा दृश्यतेऽन्यथा ।
तमाह कैकेयी राजा रात्रौ निद्रां न लब्धवान् ॥ ४४ ॥

राम रामेति रामेति राममेवानुचिन्तयन् ।
प्रजागरेण वै राजा ह्यस्वस्थ इव लक्ष्यते ।
राममानय शीघ्रं त्वं राजा द्रष्टुमिहेच्छति ॥ ४५ ॥

अश्रुत्वा राजवचनं कथं गच्छामि भामिनि ।
तच्छ्रुत्वा मन्त्रिणो वाक्यं राजा मन्त्रिणमब्रवीत् ॥ ४६ ॥

परंतु त्या सर्वांना थांबवून, कैकेयी राग धरून बसून राहिली होती. त्यानंतर प्रात:काळ झाल्यावर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, ऋषिगण, कन्या, दिव्य छत्र आणि दिव्य चामर तसेच हत्ती, घोडे इत्यादी अभिषेकाला उपयोगी पडणाऱ्या वस्तू मधल्या चौकात जमा झाल्या. (३५-३६)

त्या प्रमाणेच इतर मुख्य वारांगना तसेच नगरवासी आणि जनपदवासी लोक हेही तेथे आले. वसिष्ठांनी आज्ञा केल्याप्रमाणे अभिषेकाला आवश्यक ते सर्व साहित्य तेथे आणले होते. (३७)

त्या रात्री स्त्रिया, बालक आणि वृद्ध यांपैकी कुणालाही झोप आली नाही. रेशमी पीतांबर परिधान केलेल्या भगवान श्रीरामांना आपण केव्हा एकदा पाहू, अशा उत्सुकतेने सर्वजण वाट पाहात होते. (३८)

सर्व अलंकारांनी विभूषित, उज्ज्वल किरीट आणि कटक (कडे) घातलेले, कौस्तुभ मणी धारण केलेले, सावळ्या वर्णाचे, शेकडो कामदेवांप्रमाणे सुंदर, सर्व शुभ लक्षणांनी युक्त अशा लक्ष्मणाने ज्यांच्या मस्तकावर श्वेत छत्र धरले आहे अशा हास्ययुक्त मुखाने राज्याभिषेकानंतर, हत्तीवर आरूढ होऊन येणाऱ्या रामांना आम्ही केव्हा बरे पाहू ? ती मंगल प्रभात केव्हा बरे येईल ? अशा प्रकारे सर्व नगरवासी लोकांची मने उत्कंठित झालेली होती.(३९-४१)

त्या वेळी "महाराज अद्यापि का बरे उठले नाहीत," असा विचार करीत सुमंत्र दशरथ महाराजांकडे गेला. (४२)

तेथे गेल्यावर, 'महाराजांचा विजय असो', असे म्हणून त्याने राजाचे अभिनंदन केले आणि मस्तक नमवून राजाला प्रणाम केला. परंतु राजा अतिशय खिन्न आहे हे पाहून त्याने कैकेयीला प्रश्न केला. (४३)

" कैकेयी राणीसाहेब, तुमचा विजय असो. महाराज असे दु:खी का बरे दिसत आहेत ?" तेव्हा कैकयीने त्याला सांगितले, "आज महाराजांना रात्री अजिबात झोप लागली नाही. (४४)

रात्रभर रामाचेच चिंतन करीत, 'राम, राम, राम' असे ते पुटपुटत राहिले. अशा प्रकारे रात्री संपूर्ण जागरण झाल्यानेच महाराज अस्वस्थ असल्याप्रमाणे दिसत आहेत. रामाला इथे पाहण्याची राजांची इच्छा आहे. म्हणून तू रामाला त्वरित इकडे घेऊन ये. " (४५)

"हे महाराणी, राजांची आज्ञा त्यांचेकडून ऐकल्याशिवाय मी कसा बरे जाऊ?" मंत्र्याचे ते वाक्य ऐकल्यावर महाराज दशरथ त्याला म्हणाले. (४६)

सुमन्त्र रामं द्रक्ष्यामि शीघ्रमानय सुन्दरम् ।
इत्युक्तस्त्वरितं गत्वा सुमन्त्रो राममन्दिरम् ॥ ४७ ॥

"सुमंत्रा, सुंदर रामाला भेटण्याची मला इच्छा आहे. त्याला तू लौकरच इकडे घेऊन ये." राजाने असे सांगितल्यावरच सुमंत्र त्वरित रामाच्या महालाकडे गेला. (४७)

अवारितः प्रविष्टोऽयं त्वरितं राममब्रवीत् ।
शीघ्रमागच्छ भद्रं ते राम राजीवलोचन ॥ ४८ ॥

पितुर्गेहं मया सार्धं राजा त्वां द्रष्टुमिच्छति ।
इत्युक्तो रथमारुह्य सम्भ्रमात्त्वरितो ययौ ॥ ४९ ॥

कुणाचाही अडथळा न येता सुमंत्र त्वरित प्रभू रामांच्या महालात शिरून म्हणाला, "हे कमलनयन रामा, तुमचे कल्याण असो. माझ्याबरोबर तुम्ही चटकन तुमच्या पिताजींच्या महालात चला. तुम्हांला भेटण्याची महाराजांना इच्छा आहे,' असे त्याने रामांना सांगितल्यावर, चकित होऊन, रथावर आरोहण करून, राम त्वरित निघाले. (४८-४९)

रामः सारथिना सार्धं लक्ष्मणेन समन्वितः ।
मध्यकक्षे वसिष्ठादीन् पश्यन्नेव त्वरान्वितः ॥ ५० ॥

पितुः समीपं सङ्गम्य ननाम चरणौ पितुः ।
राममालिङ्गितुं राजा समुत्थाय ससम्भ्रमः ॥ ५१ ॥

बाहू प्रसार्य रामेति दुःखान्मध्ये पपात ह ।
हाहेति रामस्तं शीघ्रमालिङ्ग्याङ्के न्यवेशयत् ॥ ५२ ॥

सारथी आणि लक्ष्मण यांना बरोबर घेऊन, रामांनी मध्य कक्षात विराजमान असणाऱ्या वसिष्ठ इत्यादींना पाहून, पित्याच्या दर्शनाची घाई असल्यामुळे नेत्रांनी अभिवादनाचा शिष्टाचार करीत, त्वरेने पित्याजवळ जाऊन, त्यांनी पित्याच्या पायी प्रणाम केला. त्या वेळी रामांना आलिंगन देण्यासाठी, लगबगीने उठून महाराज दशरथांनी आवेगाने आपले हात पसरले, पण मध्येच दुःखाने 'अरे रामा, अरे रामा' असे म्हणत ते खाली पडले. तेव्हा 'हे काय झाले?' असे म्हणत हाहाकार करीत श्रीरामांनी झटपट दशरथांना आलिंगन देऊन, त्यांना आपल्याजवळ बसविले. (५०-५२)

राजानं मूर्च्छितं दृष्ट्वा चुक्रुशुः सर्वयोषितः ।
किमर्थं रोदनमिति वसिष्ठोऽपि समाविशत् ॥ ५३ ॥

महाराज मूर्च्छित पडले आहेत हे पाहून राणीवशातील सर्व स्त्रिया रडू लागल्या. तेव्हा हे रुदन कशासाठी चालले आहे, असा विचार करीत वसिष्ठसुद्धा तेथे येऊन पोचले. (५३)

रामः पप्रच्छ किमिदं राज्ञो दुःखस्य कारणम् ।
एवं पृच्छति रामे सा कैकेयी राममब्रवीत् ॥ ५४ ॥

भगवान श्रीरामांनी कैकेयीला असे विचारले, "महाराजांच्या दुःखाचे कारण काय बरे ?" श्रीरामांनी असा प्रश्न केल्यावर कैकेयी त्यांना म्हणाली. (५४)

त्वमेव कारणं ह्यत्र राज्ञो दुःखोपशान्तये ।
किञ्चित्कार्यं त्वया राम कर्तव्यं नृपतेर्हितम् ॥ ५५ ॥

"अरे रामा, महाराजांचे हे दुःख दूर करणे तुझ्या हाती आहे. त्यांच्या दुःखाच्या शमनासाठी त्यांना हितकारक होईल, असे एखादे कार्य तुला करावयास हवे. (५५)

कुरु सत्यप्रतिज्ञस्त्वं राजानं सत्यवादिनम् ।
राज्ञा वरद्वयं दत्तं मम सन्तुष्टचेतसा ॥ ५६ ॥

तू स्वतः सत्यप्रतिज्ञ आहेस. म्हणून दशरथ महाराजांनाही सत्यवादी सिद्ध कर. संतुष्ट चित्ताने राजांनी मला दोन वर दिले आहेत. (५६)

त्वदधीनं तु तत्सर्वं वक्तुं त्वां लज्जते नृपः ।
सत्यपाशेन सम्बद्धं पितरं त्रातुमर्हसि ॥ ५७ ॥

ते पूर्ण करणे हे तुझ्या स्वाधीन आहे. प्रत्यक्ष तुला सांगण्यास महाराजांना लाज वाटत आहे. सत्याच्या पाशाने बद्ध झालेल्या आपल्या पित्याचे रक्षण तूच करावयास हवे. (५७)

पुत्रशब्देन चैतद्धि नरकात्त्रायते पिता ।
रामस्तयोदितं श्रुत्वा शूलेनाभिहतो यथा ॥ ५८ ॥

नरकात पडण्यापासून जो आपल्या पित्याचे रक्षण करतो, तोच पुत्र, असाच 'पुत्र' या शब्दाचा अर्थ आहे." कैकेयीने उच्चारलेले हे वचन ऐकून, शूलाने विद्ध झालेल्या

व्यथित: कैकयीं प्राह किं मामेवं प्रभाषसे ।
पित्रर्थे जीवितं दास्ये पिबेयं विषमुल्बणम् ॥ ५९ ॥

माणसाप्रमाणे व्यथित होऊन श्रीराम कैकेयीला म्हणाले, "मातोश्री, आज तुम्ही मला असे का बोलत आहात? पित्यासाठी मी माझे जीवन देईन; भयंकर विषसुद्धा पिऊन टाकीन. (५८-५९)

सीतां त्यक्ष्येऽथ कौसल्यां राज्यं चापि त्यजाम्यहम् ।
अनाज्ञप्तोऽपि कुरुते पितुः कार्यं स उत्तमः ॥ ६० ॥

तसेच पत्नी सीता, माता कौसल्या आणि राज्य यांचासुद्धा मी त्याग करीन. पित्याची आज्ञा नसतानासुद्धा जो पुत्र अभीष्ट कार्य करतो तो पुत्र उत्तम होय. (६०)

उक्तः करोति यः पुत्रः स मध्यम उदाहृतः ।
उक्तोऽपि कुरुते नैव स पुत्रो मल उच्यते ॥ ६१ ॥

पित्याने सांगितल्यावर जो पुत्र कार्य करतो तो पुत्र मध्यम असे म्हटले जाते आणि पित्याने सांगितल्यावर सुद्धा जो त्याचे कार्य करीत नाही तो पुत्र अधम होय, असे म्हटले जाते. (६१)

अतः करोमि तत्सर्वं यन्मामाह पिता मम ।
सत्यं सत्यं करोम्येव रामो द्विर्नाभिभाषते ॥ ६२ ॥

म्हणून पित्याची जी आज्ञा असेल ती सर्व मी अवश्य पूर्ण करीन. हे निश्चितपणे खरे आहे. राम कधी दुतोंडी बोलत नाही." (६२)

इति रामप्रतिज्ञां सा श्रुत्वा वक्तुं प्रचक्रमे ।
राम त्वदभिषेकार्थं संभाराः संभृताश्च ये ॥ ६३ ॥

तैरेव भरतोऽवश्यमभिषेच्यः प्रियो मम ।
अपरेण वरेणाशु चीरवासा जटाधरः ॥ ६४ ॥

वनं प्रयाहि शीघ्रं त्वमद्यैव पितुराज्ञया ।
चतुर्दश समास्तत्र वस मुन्यन्नभोजनः ॥ ६५ ॥

श्रीरामांची अशी प्रतिज्ञा ऐकल्यावर कैकेयी असे बोलू लागली "अरे रामा, तुझ्या अभिषेकासाठी जी काही सामग्री एकत्रित केली गेली आहे, त्या सामग्रीनेच माझ्या प्रिय भरताचा अभिषेक अवश्य झाला पाहिजे, हा माझा पहिला वर आहे. दुसऱ्या वराने पित्याच्या आज्ञेने तू वल्कल-वस्त्रे परिधान करून आणि जटा धारण करून आजच त्वरित वनाप्रत जा आणि तेथे मुनिजनांना उचित कंदमूळ, फळे असे भोजन करीत चौदा वर्षे तेथेच राहा. (६३-६५)

एतदेव पितुस्तेऽद्य कार्यं त्वं कर्तुमर्हसि ।
राजा तु लज्जते वक्तुं त्वामेवं रघुनन्दन ॥ ६६ ॥

बस्. तुझ्या पित्याचे हेच काम आहे. ते तू केले पाहिजेस. परंतु हे रघुनन्दना, तुला असे सांगण्यास राजांना लाज वाटत आहे." (६६)

*श्रीराम उवाच*

भरतस्यैव राज्यं स्यादहं गच्छामि दण्डकान् ।
किन्तु राजा न वक्तीह मां न जानेऽत्र कारणम् ॥ ६७ ॥

**श्रीराम म्हणाला** – "मातोश्री, भरतालाच राज्य प्राप्त होवो. मीसुद्धा लगेच दंडकारण्यात जाईन. परंतु महाराज मला हे स्वतः का सांगत नाहीत, याचे कारण मात्र मला कळत नाही." (६७)

श्रुत्वैतद्रामवचनं दृष्ट्वा रामं पुरः स्थितम् ।
प्राह राजा दशरथो दुःखितो दुःखितं वचः ॥ ६८ ॥

रामांचे वचन ऐकल्यावर आणि राम आपल्या समोर बसला आहे हे पाहून दुःखातुर होऊन राजा अतिशय दुःखाने बोलला. (६८)

स्त्रीजितं भ्रान्तहृदयमुन्मार्गपरिवर्तिनम् ।
निगृह्य मां गृहाणेदं राज्यं पापं न तद्भवेत् ॥ ६९ ॥

"रामा, स्त्रीने जिंकलेल्या, चित्त गोंधळून गेलेल्या, चुकीच्या मार्गाने जाणाऱ्या, पापी अशा मला बंधनात टाकून हे राज्य तू घे. त्यात तुला कोणतेही पाप लागणार नाही. (६९)

एवं चेदनृतं नैव मां स्पृशेद्रघुनन्दन ।
इत्युक्त्वा दुःखसन्तप्तो विललाप नृपस्तदा ॥ ७० ॥

हे रघुनन्दना, असे जर झाले तर असत्य मला मुळीच स्पर्श करणार नाही." असे बोलून त्या वेळी राजा दुःखाने तळमळत विलाप करू लागले. (७०)

हा राम हा जगन्नाथ हा मम प्राणवल्लभ ।
मां विसृज्य कथं घोरं विपिनं गन्तुमर्हसि ॥ ७१ ॥

"हे रामा, हे जगन्नाथा, हे माझ्या प्राणप्रिया, अरे मला सोडून देऊन, घोर वनात तू कसा जाऊ शकशील?" (७१)

इति रामं समालिङ्ग्य मुक्तकण्ठो रुरोद ह ।
विमृज्य नयने रामः पितुः सजलपाणिना ॥ ७२ ॥

असे बोलून रामांना दृढ आलिंगन देऊन, जोरजोराने ते रडू लागले. तेव्हा हातात पाणी घेऊन रामांनी आपल्या पित्याचे डोळे पुसले. (७२)

आश्वासयामास नृपं शनैः स नयकोविदः ।
किमत्र दुःखेन विभो राज्यं शासतु मेऽनुजः ॥ ७३ ॥

आणि मग नीती जाणणाऱ्या रामांनी सावकाशपणे राजांना धीर दिला. ते म्हणू लागले, "महाराज, या बाबतीत दुःख करण्याचे कारण काय ? माझा धाकटा भाऊ भरत खुशाल राज्य करो. (७३)

अहं प्रतिज्ञां निस्तीर्य पुनर्यास्यामि ते पुरम् ।
राज्यात्कोटिगुणं सौख्यं मम राजन्वने सतः ॥ ७४ ॥

मी तुमची प्रतिज्ञा तडीला नेऊन, तुमच्याजवळ अयोध्या नगरीला परत येईन. हे राजा, राज्य करण्यापेक्षा कोटिपट अधिक सौख्य वनात राहताना मला होईल. (७४)

त्वत्सत्यपालनं देवकार्यं चापि भविष्यति ।
कैकेय्याश्च प्रियो राजन्वनवासो महागुणः ॥ ७५ ॥

तुमच्या सत्याचे पालन होईल, देवांचे इष्ट कार्य होईल आणि कैकेयी मातेची इच्छा पूर्ण होईल. महाराज, वनवासात पुष्कळ चांगल्या गोष्टी आहेत. (७५)

इदानीं गन्तुमिच्छमि व्येतु मातुश्च हृज्वरः ।
सम्भाराश्चोपह्रीयन्तामभिषेकार्थमाहृताः ॥ ७६ ॥

आता मी वनात जाऊ इच्छितो. कैकेयी मातेच्या मनातील व्यथा दूर होवो. आणि माझ्या अभिषेकासाठी एकत्रित केलेली ही सामग्री बाजूला ठेवा. (७६)

मातरं च समाश्वास्य अनुनीय च जानकीम् ।
आगत्य पादौ वन्दित्वा तव यास्ये सुखं वनम् ॥ ७७ ॥

कौसल्या मातेचे सांत्वन करून, जानकीची समजूत घालून, मी लगेच परत येतो आणि तुमच्या चरणांना वंदन करून, मी सुखाने वनात जातो." (७७)

इत्युक्त्वा तु परिक्रम्य मातरं द्रष्टुमाययौ ।
कौसल्यापि हरेः पूजां कुरुते रामकारणात् ॥ ७८ ॥

असे सांगून, पित्याला प्रदक्षिणा करून, श्रीराम मातेला भेटण्यास गेले. त्या वेळी कौसल्यासुद्धा श्रीरामांचे कल्याण होण्यासाठी भगवान विष्णूंची पूजा करीत होती. (७८)

होमं च कारयामास ब्राह्मणेभ्यो ददौ धनम् ।
ध्यायते विष्णुमेकाग्रमनसा मौनमास्थिता ॥ ७९ ॥

तिने होम करवून घेतला होता. ब्राह्मणांना पुष्कळसे धन दान दिले होते आणि त्या वेळी ती मौन धारण करून एकाग्र मनाने भगवान श्रीविष्णूंचे ध्यान करीत होती. (७९)

अन्तःस्थमेकं घनचित्प्रकाशं
निरस्तसर्वातिशयस्वरूपम् ।
विष्णुं सदानन्दमयं हृदब्जे
सा भावयन्ती न ददर्श रामम् ॥ ८० ॥

अंतर्यामी रूपाने सर्वांच्या हृदयात वास करणाऱ्या, अद्वितीय, चिद्घनस्वरूप, आपल्या तेजाने सर्वांच्यावर मात करणाऱ्या, सदानंदमय, असे जे विष्णू, त्यांचे आपल्या हृदय-कमळात ध्यान करीत असल्यामुळे तिचे श्रीरामचंद्रांकडे लक्ष गेले नाही. (८०)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

# चतुर्थ सर्ग

## रामांनी मातेचा निरोप घेणे आणि सीता व लक्ष्मणासह वनगमनाची तयारी करणे.

*श्रीमहादेव उवाच*

ततः सुमित्रा दृष्ट्वैनं रामं राज्ञीं ससम्भ्रमा ।
कौसल्यां बोधयामास रामोऽयं समुपस्थितः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, श्रीरामांना पाहून राणी सुमित्रा गोंधळून गेली. आणि महाराणी कौसल्येला म्हणाली- "हा राम आला आहे." (१)

श्रुत्वैव रामनामैषा बहिर्दृष्टिप्रवाहिता ।
रामं दृष्ट्वा विशालाक्षमालिङ्ग्याङ्के न्यवेशयत् ॥ २ ॥

श्रीरामांचे नाव ऐकताच, कौसल्येची दृष्टी बाहेर वळली. विशालनयन रामांना पाहून आणि त्यांना आलिंगन देऊन, तिने त्यांना आपल्या मांडीवर बसविले. (२)

मूर्ध्न्यवघ्राय पस्पर्श गात्रं नीलोत्पलच्छवि ।
भुङ्क्ष्व पुत्रेति च प्राह मिष्टमन्नं क्षुधार्दितः ॥ ३ ॥

त्यांच्या मस्तकाचे अवघ्राण करून तिने नील कमलाप्रमाणे कांती असणाऱ्या प्रभू रामचंद्रांना कुरवाळले आणि म्हटले, "बाळा, तुला भूक लागली असेल. थोडी मिठाई खा." (३)

रामः प्राह न मे मातर्भोजनावसरः कृतः ।
दण्डकागमने शीघ्रं मम कालोऽद्य निश्चितः ॥ ४ ॥

**श्रीराम म्हणाले**– "आई, ही वेळ भोजनाची नाही. कारण मी आज लगेच दंडकारण्यात जाण्याचे ठरवले आहे. (४)

कैकेयीवरदानेन सत्यसन्धः पिता मम ।
भरताय ददौ राज्यं ममाप्यारण्यमुत्तमम् ॥ ५ ॥

कैकेयी मातेला वर देऊन माझ्या सत्यप्रतिज्ञ पित्यांनी भरताला अयोध्येचे राज्य दिले आहे आणि मलाही वनाचे उत्तम राज्य दिले आहे . (५)

चतुर्दश समास्तत्र ह्युषित्वा मुनिवेषधृक् ।
आगमिष्ये पुनः शीघ्रं न चिन्तां कर्तुमर्हसि ॥ ६ ॥

मुनिवेष धारण करून मी चौदा वर्षे तेथे राहीन आणि मग पुनः लवकर परत येईन. तू कसलीही काळजी मुळीच करू नकोस ." (६)

तच्छ्रुत्वा सहसोद्विग्ना मूर्च्छिता पुनरुत्थिता ।
आह रामं सुदुःखार्ता दुःखसागरसम्प्लुता ॥ ७ ॥

अचानक ते वचन ऐकल्यावर उद्विग्न होऊन माता कौसल्या मूर्च्छित पडली. मग पुनः शुद्धीवर आल्यावर, दुःखरूपी सागरात बुडून गेलेली ती अतिशय दुःखाने व्याकूळ होऊन श्रीरामांना म्हणू लागली. (७)

यदि राम वनं सत्यं यासि चेन्नय मामपि ।
त्वद्विहीना क्षणार्द्धं वा जीवितं धारये कथम् ॥ ८ ॥

"अरे रामा, जर तू खरोखरच वनात जाणार असशील तर मलाही तुझ्याबरोबर ने. कारण तुझ्याशिवाय मी अर्धा क्षण तरी कशी बरे जिवंत राहू शकेन ? (८)

यथा गौर्बालकं वत्सं त्यक्त्वा तिष्ठेन्न कुत्रचित् ।
तथैव त्वां न शक्नोमि त्यक्तुं प्राणात्प्रियं सुतम् ॥ ९ ॥

ज्या प्रमाणे लहान वासराला सोडून एकादी गाय अन्य कुठेही राहू शकत नाही, त्या प्रमाणेच प्राणापेक्षा अधिक प्रिय असणाऱ्या तुझ्यासारख्या पुत्राला मी सोडू शकत नाही. (९)

भरताय प्रसन्नश्चेद्राज्यं राजा प्रयच्छतु ।
किमर्थं वनवासाय त्वामाज्ञापयति प्रियम् ॥ १० ॥

महाराज जर भरतावर प्रसन्न झाले असतील, तर ते खुशाल त्याला राज्य देऊ देत. परंतु मला प्रिय असणाऱ्या तुला वनवासात जाण्याची आज्ञा त्यांनी का बरे दिली ? (१०)

कैकेय्या वरदो राजा सर्वस्वं वा प्रयच्छतु ।
त्वया किमपराद्धं हि कैकेय्या वा नृपस्य वा ॥ ११ ॥

कैकेयीला वर देणारे महाराज तिला खुशाल आपले सर्वस्व देऊ देत. परंतु तू कैकेयीचा अथवा महाराजांचा काय अपराध केला आहेस ? (११)

पिता गुरुर्यथा राम तवाहमधिका ततः ।
पित्राऽऽज्ञप्तो वनं गन्तुं वारयेयमहं सुतम् ॥ १२ ॥

हे रामा, तुझे पिता जसे तुझे गुरू आहेत तशी मीसुद्धा त्यांच्यापेक्षा अधिक प्रमाणात तुझी गुरू आहे. जरी पित्यांनी तुला वनात जाण्याची आज्ञा केली असली, तरीसुद्धा मी माझ्या पुत्राला थांबवीन. (१२)

यदि गच्छसि मद्वाक्यमुल्लङ्घ्य नृपवाक्यतः ।
तदा प्राणान्परित्यज्य गच्छामि यमसादनम् ॥ १३ ॥

माझ्या वचनाचे उल्लंघन करून जर तू राजांच्या आज्ञेने वनात जाशील, तर मी प्राणत्याग करून यमसदनाला जाईन." (१३)

लक्ष्मणोऽपि ततः श्रुत्वा कौसल्यावचनं रुषा ।
उवाच राघवं वीक्ष्य दहन्निव जगत्त्रयम् ॥ १४ ॥

त्या वेळी कौसल्येचे वचन लक्ष्मणानेसुद्धा ऐकले आणि श्रीरामांकडे पाहून, जणू तिन्ही लोकांना भस्म करीत तो म्हणाला. (१४)

उन्मत्तं भ्रान्तमनसं कैकेयीवशवर्तिनम् ।
बद्ध्वा निहन्मि भरतं तद्बन्धून्मातुलानपि ॥ १५ ॥

"वेड्या, भ्रांतचित्त झालेल्या आणि कैकेयीला वश झालेल्या राजा दशरथांना कैद करून भरताला व त्याला सहाय्य करणाऱ्या त्याच्या मामांनासुद्धा मी ठार करून टाकीन. (१५)

अद्य पश्यन्तु मे शौर्यं लोकान्प्रदहतः पुरा ।
राम त्वमभिषेकाय कुरु यत्नमरिन्दम ॥ १६ ॥

कालाग्नीप्रमाणे सर्व लोकांना जाळून टाकू शकणाऱ्या माझे शौर्य आज सर्व लोकांना प्रथम बघू दे. शत्रूचे दमन करणाऱ्या हे रामा, तुम्ही स्वतःवर अभिषेक करवून घेण्याची तयारी करा. (१६)

धनुष्पाणिरहं तत्र निहन्यां विघ्नकारिणः ।
इति ब्रुवन्तं सौमित्रिमालिङ्ग्य रघुनन्दनः ॥ १७ ॥

त्यामध्ये विघ्न आणणाऱ्या माणसांना मी हातात धनुष्य घेऊन ठार करीन." असे बोलणाऱ्या लक्ष्मणाला आलिंगन देऊन रघुनाथ त्याला म्हणाले. (१७)

शूरोऽसि रघुशार्दूल ममात्यन्तहिते रतः ।
जानामि सर्वं ते सत्यं किन्तु तत्समयो न हि ॥ १८ ॥

"हे रघुश्रेष्ठा लक्ष्मणा, तू फार शूर वीर आहेस आणि माझे हित जपण्यास तू तत्पर आहेस. तू जे काही म्हणालास ते सर्व खरे आहे, हे मी जाणतो. परंतु तसे करण्याची ही योग्य वेळ नव्हे. (१८)

यदिदं दृश्यते सर्वं राज्यं देहादिकं च यत् ।
यदि सत्यं भवेत्तत्र आयासः सफलश्च ते ॥ १९ ॥

हे जे काही सर्व राज्य तसेच देह इत्यादी दिसत आहेत ते जर सत्य असते तर त्या संदर्भातील तुझे परिश्रम सफळ झाले असते. (१९)

भोगा मेघवितानस्थविद्युल्लेखेव चञ्चलाः ।
आयुरप्यग्निसन्तप्तलोहस्थजलबिन्दुवत् ॥ २० ॥

(परंतु तसे नाही.) मेघांच्या समूहात असणाऱ्या विजेच्या लखलखाटाप्रमाणे भोग हे चंचल, न टिकणारे आहेत. आणि अग्नीने तापलेल्या लोखंडावर पडलेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणे आयुष्य हेसुद्धा क्षणिक आहे. (२०)

यथा व्यालगलस्थोऽपि भेको दंशानपेक्षते ।
तथा कालाहिना ग्रस्तो लोको भोगानशाश्वतान् ॥ २१ ॥

सापाच्या तोंडात अडकलेल्या बेडकालासुद्धा माशा खाण्याची इच्छा होते; त्याप्रमाणे कालरूपी सापाने ग्रस्त झालेले लोकसुद्धा अनित्य भोगांची इच्छा करीत राहतात. (२१)

करोति दुःखेन हि कर्मतन्त्रं
शरीरभोगार्थमहर्निशं नरः ।
देहस्तु भिन्नः पुरुषात्समीक्ष्यते
को वात्र भोगः पुरुषेण भुज्यते ॥ २२ ॥

शरीराला भोग मिळावेत म्हणून माणूस रात्रंदिवस कष्ट करून मोठ्या दुःखाने कर्माच्या खटपटी करतो. परंतु देह हा आत्म्यापेक्षा भिन्न आहे, हे जर विवेकामुळे कळून आले तर या जगात कोणता मनुष्य भोग कसा भोगू शकेल? (२२)

पितृमातृसुतभ्रातृदारबन्ध्वादिसंगमः ।
प्रपायामिव जन्तूनां नद्यां काष्ठौघवच्चलः ॥ २३ ॥

बाप, आई, भाऊ, पुत्र, पत्नी व नातेवाईक यांच्याशी होणारी आपली भेट पाणपोईवर जमलेल्या प्राण्यांच्या भेटीप्रमाणे किंवा नदीच्या प्रवाहामध्ये एकत्र आलेल्या काष्ठांच्या समूहाप्रमाणे क्षणिक आहे. (२३)

छायेव लक्ष्मीश्चपला प्रतीता
तारुण्यमम्बूर्मिवदध्रुवं च ।
स्वप्नोपमं स्त्रीसुखमायुरल्पं
तथापि जन्तोरभिमान एषः ॥ २४ ॥

लक्ष्मी ही छायेप्रमाणे चंचल असल्याचा अनुभव आहे. पाण्यावरील तरंगाप्रमाणे तारुण्य हे अनित्य आहे. स्त्रीसुख हे स्वप्नाप्रमाणे मिथ्या आहे आणि आयुष्य अल्प आहे. तथापि प्राण्यांना केवढा हा अभिमान ! (२४)

संसृतिः स्वप्नसदृशी सदा रोगादिसङ्कुला ।
गन्धर्वनगरप्रख्या मूढस्तामनुवर्तते ॥ २५ ॥

रोग इत्यादींनी सदैव भरलेला हा संसार स्वप्नाप्रमाणे आहे किंवा गंधर्वनगराप्रमाणे भासमान होणारा आहे. तो सत्य मानून मूढ लोक त्याचे अनुसरण करतात. (२५)

आयुष्यं क्षीयते यस्मादादित्यस्य गतागतैः ।
दृष्ट्वान्येषां जरामृत्यू कथञ्चिन्नैव बुध्यते ॥ २६ ॥

सूर्याच्या उदय व अस्ताबरोबर आयुष्य क्षीण होत असते. तसेच इतर लोकांचे वार्धक्य आणि मरण पाहिले जात असूनसुद्धा मूढ माणूस कधीही जागा होत नाही. (२६)

स एव दिवसः सैव रात्रिरित्येव मूढधीः ।
भोगाननुपतत्येव कालवेगं न पश्यति ॥ २७ ॥

दिवस तसाच आहे आणि रात्रही तशीच आहे. (आज त्यात काही फरक नाही, असे वाटून) मतिमूढ झालेला माणूस हा भोगांच्या मागेच धावत सुटतो. त्याला काळाचा वेग कळत नाही. (२७)

प्रतिक्षणं क्षरत्येतदायुरामघटाम्बुवत् ।
सपत्ना इव रोगौघाः शरीरं प्रहरन्त्यहो ॥ २८ ॥

कच्च्या घड्यात भरलेल्या पाण्याप्रमाणे प्रत्येक क्षणी आयुष्य क्षीण होत आहे आणि वाईट गोष्ट अशी की शत्रूंप्रमाणे रोगांचे समूह शरीर नष्ट करीत असतात. (२८)

जरा व्याघ्रीव पुरतस्तर्जयन्त्यवतिष्ठते ।
मृत्युः सहैव यात्येष समयं सम्प्रतीक्षते ॥ २९ ॥

वृद्धावस्था ही एकाद्या वाघिणीप्रमाणे भिववीत पुढे उभी असते. आणि मृत्यूसुद्धा तिच्याबरोबरच चालत असतो आणि तो अंतकाळाची वाट पाहात असतो. (२९)

देहेऽहंभावमापन्नो राजाहं लोकविश्रुतः ।
इत्यस्मिन्मनुते जन्तुः कृमिविड्भस्मसंज्ञिते ॥ ३० ॥

तथापि कृमी, विष्ठा आणि भस्म असे स्वरूप असणाऱ्या या शरीराबद्दल अहंभावना धारण करणारा प्राणी हा 'मी लोकप्रसिद्ध राजा आहे,' असे समजत असतो. (३०)

त्वगस्थिमांसविण्मूत्ररेतोरक्तादिसंयुतः ।
विकारी परिणामी च देह आत्मा कथं वद ॥ ३१ ॥

यमास्थाय भवाँल्लोकं दग्धुमिच्छति लक्ष्मण ।
देहाभिमानिनः सर्वे दोषाः प्रादुर्भवन्ति हि ॥ ३२ ॥

हे लक्ष्मणा, ज्याच्या आधाराने तू जगाला दग्ध करू इच्छितोस तो देह त्वचा, अस्थि, मांस, विष्ठा, मूत्र, शुक्र आणि रक्त इत्यादींनी बनलेला असून तो विकार पावणारा आणि परिणाम पावणारा आहे. तो देह आपला आत्मा कसा असेल, ते सांग बरे ? देहाचा अभिमान बाळगणाऱ्या पुरुषाच्या ठिकाणीच सर्व दोष प्रकट होतात. (३१-३२)

देहोऽहमिति या बुद्धिरविद्या सा प्रकीर्तिता ।
नाहं देहश्चिदात्मेति बुद्धिर्विद्येति भण्यते ॥ ३३ ॥

देह म्हणजे मी, अशी जी बुद्धी तिचेच अविद्या हे नाव आहे आणि मी देह नाही, मी चेतन आत्मा आहे, अशा बुद्धीला विद्या असे म्हटले जाते. (३३)

अविद्या संसृतेर्हेतुर्विद्या तस्या निवर्तिका ।
तस्माद्यत्न: सदा कार्यो विद्याभ्यासे मुमुक्षुभि: ।
कामक्रोधादयस्तत्र शत्रव: शत्रुसूदन ॥ ३४ ॥

जन्म- मरण- रूपी संसाराचे कारण अविद्या आहे. तिला निवृत्त करणारी विद्या आहे. म्हणून मोक्षाची इच्छा करणाऱ्या माणसांनी नेहमी विद्येच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करावयास हवा. त्या प्रयत्नामध्ये, हे शत्रुघातका, काम, क्रोध इत्यादी विकार हे विघ्न आणणारे शत्रू आहेत. (३४)

तत्रापि क्रोध एवालं मोक्षविघ्नाय सर्वदा ।
येनाविष्ट: पुमान्हन्ति पितृभ्रातृसुहृत्सखीन् ॥ ३५ ॥

त्यांमध्येसुद्धा क्रोध हा एकटाच मोक्षामध्ये विघ्न आणण्यास पुरेसा आहे. क्रोधाने झपाटलेला पुरुष हा माता, पिता, सुहृद व बांधव यांचासुद्धा वध करतो. (३५)

क्रोधमूलो मनस्ताप: क्रोध: संसारबन्धनम् ।
धर्मक्षयकर: क्रोधस्तस्मात्क्रोधं परित्यज ॥ ३६ ॥

मनाच्या संतापाचे मूळ कारण क्रोधच आहे. क्रोध हाच माणसाला संसारात बद्ध करणारा आहे. क्रोध हा धर्माचा क्षय करणारा आहे. म्हणून हे लक्ष्मणा, तू क्रोध टाकून दे . (३६)

क्रोध एष महान् शत्रुस्तृष्णा वैतरणी नदी ।
सन्तोषो नन्दनवनं शान्तिरेव हि कामधुक् ॥ ३७ ॥

क्रोध हा एक महान् शत्रू आहे. तृष्णा म्हणजे वैतरणी नदी आहे. संतोष हा नंदनवन आहे आणि शांती हीच कामधेनू आहे. (३७)

तस्माच्छान्तिं भजस्वाद्य शत्रुरेव भवेन्न ते ।
देहेन्द्रियमन:प्राणबुद्ध्यादिभ्यो विलक्षण: ॥ ३८ ॥

आत्मा शुद्ध: स्वयंज्योतिरविकारी निराकृति: ।
यावद्देहेन्द्रियप्राणैर्भिन्नत्वं नात्मनो विदु: ॥ ३९ ॥

तावत्संसारदु:खौघै: पीड्यन्ते मृत्युसंयुता: ।
तस्मात्त्वं सर्वदा भिन्नमात्मानं हृदि भावय ॥ ४० ॥

बुद्ध्यादिभ्यो बहि: सर्वमनुवर्तस्व मा खिद: ।
भुञ्जन्प्रारब्धमखिलं सुखं वा दु:खमेव वा ॥ ४१ ॥

म्हणून शांती धारण कर. त्यामुळे क्रोधरूपी शत्रूचा प्रभाव तुझ्यावर पडणार नाही. आत्मा हा देह, इंद्रिये, मन, प्राण, बुद्धी इत्यादींपेक्षा संपूर्णपणे वेगळा आहे. तो शुद्ध, स्वयंप्रकाशी, विकाररहित आणि आकाररहित आहे. जोपर्यंत देह, इंद्रिये, प्राण यांच्यापेक्षा आत्म्याचे भिन्नत्व माणसे जाणत नाहीत, तोपर्यंत मृत्युपाशाने बद्ध असणारी ती माणसे संसारातील दु:खसमूहांनी पीडित होतात. म्हणून हे लक्ष्मणा, आत्मा हा देह इत्यादींपेक्षा भिन्न आहे , ही गोष्ट तू नेहमी मनात बाळगून ठेव. आत्मा हा बुद्धी इत्यादींच्या पलीकडचा वेगळा आहे, हे जाणून तू सर्व बाह्य व्यवहार कर. सर्व प्रारब्ध सुखरूप किंवा दु:खरूप असेल तसे भोगत तू मनामध्ये खेद करू नकोस. (३८-४१)

प्रवाहपतितं कार्यं कुर्वन्नपि न लिप्यसे ।
बाह्ये सर्वत्र कर्तृत्वमावहन्नपि राघव ॥ ४२ ॥

हे रघुकुलोत्पन्न लक्ष्मणा, बाह्य जगात सर्वत्र इंद्रिये इत्यादींचे द्वारा कर्तृत्व प्रकट करीत, प्रारब्धाच्या प्रवाहात उपस्थित झालेले कार्य करतानासुद्धा तू कर्मबंधनात पडणार नाहीस. (४२)

अन्त:शुद्धस्वभावस्त्वं लिप्यसे न च कर्मभि: ।
एतन्मयोदितं कृत्स्नं हृदि भावय सर्वदा ॥ ४३ ॥

आत राग, द्वेषरहित शुद्ध स्वभाव असणारा तू कर्मांनी लिप्त होणार नाहीस. हे जे मी आत्ता तुला सांगितले आहे, त्या सर्वांचा तू मनामध्ये नेहमी विचार कर. (४३)

संसारदु:खैरखिलैर्बाध्यसे न कदाचन ।
त्वमप्यम्ब मयाऽऽदिष्टं हृदि भावय नित्यदा ॥ ४४ ॥

हे लक्ष्मणा, मग तू संसारातील सर्व दु:खांनी कधीच बाधित होणार नाहीस. हे आई, तूसुद्धा मी सांगितलेल्या गोष्टींवर नेहमी मनात विचार कर. (४४)

समागमं प्रतीक्षस्व न दुःखैः पीड्यसे चिरम् ।
न सदैकत्र संवासः कर्ममार्गानुवर्तिनाम् ॥ ४५ ॥

यथा प्रवाहपतितप्लवानां सरितां तथा ।
चतुर्दशसमासङ्ख्या क्षणार्द्धमिव जायते ॥ ४६ ॥

नंतर हे माते, माझ्याशी पुनः होणाऱ्या भेटीची तू वाट पाहा. तुला फार काळ दुःख सोसावे लागणार नाही. ज्या प्रमाणे नद्यांच्या प्रवाहांत पडलेल्या नावांचे नेहमी एकत्र असणे संभवत नाही, त्या प्रमाणे प्रारब्धकर्मगतीमुळे सर्व जीवांचे नेहमी एकत्रच राहणे शक्य नसते. चौदा वर्षांचा अवधी अर्ध्या क्षणाप्रमाणे निघून जाईल. (४५-४६)

अनुमन्यस्व मामम्ब दुःखं सन्त्यज्य दूरतः ।
एवं चेत्सुखसंवासो भविष्यति वने मम ॥ ४७ ॥

म्हणून हे आई, दुःखाला दूर ठेवून तू माझ्या वनगमनाला अनुमती दे. असे जर तू करशील तर मी वनामध्ये सुखाने राहू शकेन." (४७)

इत्युक्त्वा दण्डवन्मातुः पादयोरपतच्चिरम् ।
उत्थाप्याङ्के समावेश्य आशीर्भिरभ्यनन्दयत् ॥ ४८ ॥

असे बोलून श्रीरामचंद्र पुष्कळ वेळपर्यंत मातेच्या चरणांवर पडून राहिले. त्यानंतर त्यांना उठवून आणि मांडीवर बसवून व आशीर्वाद देऊन, कौसल्येने त्यांचे अभिनंदन केले. (४८)

सर्वे देवाः सगन्धर्वा ब्रह्मविष्णुशिवादय : ।
रक्षन्तु त्वां सदा यान्तं तिष्ठन्तं निद्रया युतम् ॥ ४९ ॥

कौसल्या म्हणाली "हे रामा, तू हिंडत असताना, बसला असताना किंवा झोपी गेला असताना ब्रह्मदेव, विष्णू, शिव इत्यादी, तसेच गंधर्वांसहित सर्व देव तुझे सदा रक्षण करोत." (४९)

इति प्रस्थापयामास समालिङ्ग्य पुनः पुनः ।
लक्ष्मणोऽपि तदा रामं नत्वा हर्षाश्रुगद्गदः ॥ ५० ॥

आह राम ममान्तःस्थः संशयोऽयं त्वया हृतः ।
यास्यामि पृष्ठतो राम सेवां कर्तुं तदादिश ॥ ५१ ॥

अशा प्रकारे रामांना पुनः पुनः आलिंगन देऊन मातेने त्यांना निरोप दिला. त्या वेळी आनंदाश्रूंनी गद्गद झालेल्या लक्ष्मणानेसुद्धा श्रीरामांना वंदन केले आणि म्हटले, "दादा, माझ्या अंतःकरणातील संशय तुम्ही दूर केला. आता तुमची सेवा करण्यासाठी मी तुमच्या मागोमाग येईन. मला तशी अनुज्ञा द्या. (५०-५१)

अनुगृह्णीष्व मां राम नोचेत्प्राणांस्त्यजाम्यहम् ।
तथेति राघवोऽप्याह लक्ष्मणं याहि माचिरम् ॥ ५२ ॥

दादा, माझ्यावर कृपा करा. तसे न झाल्यास मी प्राणत्याग करीन." तेव्हा श्रीराम लक्ष्मणाला म्हणाले, "ठीक आहे. चल, उशीर करू नकोस." (५२)

प्रतस्थे तां समाधातुं गतः सीतापतिर्विभुः ।
आगतं पतिमालोक्य सीता सुस्मितभाषिणी ॥ ५३ ॥

स्वर्णपात्रस्थसलिलैः पादौ प्रक्षाल्य भक्तितः ।
पप्रच्छ पतिमालोक्य देव किं सेनया विना ॥ ५४ ॥

आगतोऽसि गतः कुत्र श्वेतच्छत्रं च ते कुतः ।
वादित्राणि न वाद्यन्ते किरीटादिविवर्जितः ॥ ५५ ॥

सामन्तराजसहितः सम्भ्रमान्नागतोऽसि किम् ।
इति स्म सीतया पृष्टो रामः सस्मितमब्रवीत् ॥ ५६ ॥

त्यानंतर सीतापती भगवान श्रीराम सीतेला समजावण्यासाठी निघाले आणि आपल्या महालात पोचले. तेव्हा सुंदर स्मित करीत बोलणाऱ्या सीतेने आपले पती आलेले पाहून, एका सुवर्ण-पात्रामध्ये पाणी घेऊन रामांचे चरण भक्तिपूर्वक धुतले आणि पतीकडे पाहून तिने विचारले, "हे देवा, या वेळी तुम्ही सेनेशिवाय कसे आला आहात ? प्रातःकाळी तुम्ही कुठे गेला होता ? तुमचे श्वेत छत्र कुठे आहे ? वाद्ये का वाजविली जात नाहीत ? आणि किरीट इत्यादी राजोचित भूषणांशिवाय तुम्ही कसे आला आहात? मंत्री व सामंत राजे यांच्यासह मोठ्या थाटामाटाने का आला नाहीत ?" अशा प्रकारे सीतेने प्रश्न केल्यावर श्रीरामचंद्रांनी स्मित हास्य करून म्हटले. (५३-५६)

राज्ञा मे दण्डकारण्ये राज्यं दत्तं शुभेऽखिलम् ।
अतस्तत्पालनार्थाय शीघ्रं यास्यामि भामिनि ॥५७॥

अद्यैव यास्यामि वनं त्वं तु श्वश्रूसमीपगा ।
शुश्रूषां कुरु मे मातुर्न मिथ्यावादिनो वयम् ॥ ५८ ॥

इति ब्रुवन्तं श्रीरामं सीता भीताब्रवीद्वचः ।
किमर्थं वनराज्यं ते पित्रा दत्तं महात्मना ॥ ५९ ॥

तामाह रामः कैकेय्यै राजा प्रीतो वरं ददौ ।
भरताय ददौ राज्यं वनवासं ममानघे ॥ ६० ॥

चतुर्दश समास्तत्र वासो मे किल याचितः ।
तया देव्या ददौ राजा सत्यवादी दयापरः ॥ ६१ ॥

अतः शीघ्रं गमिष्यामि मा विघ्नं कुरु भामिनि ।
श्रुत्वा तद्रामवचनं जानकी प्रीतिसंयुता ॥ ६२ ॥

अहमग्रे गमिष्यामि वनं पश्चात्त्वमेष्यसि ।
इत्याह मां विना गन्तुं तव राघव नोचितम् ॥ ६३ ॥

तामाह राघवः प्रीतः स्वप्रियां प्रियवादिनीम् ।
कथं वनं त्वां नेष्येऽहं बहुव्याघ्रमृगाकुलम् ॥ ६४ ॥

राक्षसा घोररूपाश्च सन्ति मानुषभोजिनः ।
सिंहव्याघ्रवराहाश्च सञ्चरन्ति समन्ततः ॥ ६५ ॥

कट्वम्लफलमूलानि भोजनार्थं सुमध्यमे ।
अपूपानि व्यञ्जनानि विद्यन्ते न कदाचन ॥ ६६ ॥

काले काले फलं वापि विद्यते कुत्र सुन्दरि ।
मार्गो न दृश्यते क्वापि शर्कराकण्टकान्वितः ॥ ६७ ॥

गुहागह्वरसम्बाधं झिल्लीदंशादिभिर्युतम् ।
एवं बहुविधं दोषं वनं दण्डकसंज्ञितम् ॥ ६८ ॥

"हे प्रिये, महाराजांनी मला दंडकारण्याचे संपूर्ण राज्य दिले आहे. म्हणून हे भामिनी, त्यांच्या आज्ञेचे पालन करण्यासाठी मी त्वरितच तेथे जाणार आहे. (५७)

मी आजच वनात जाईन. तू मात्र आपल्या सासूचे जवळ राहून तिची सेवा-शुश्रूषा करीत राहा. मी खोटे बोलत नाही." (५८)

श्रीरामचंद्रांनी असे म्हटल्यावर भयभीत होऊन सीता त्यांना म्हणाली, "तुमच्या महात्म्या पित्यांनी तुम्हांला वनाचे राज्य का बरे दिले आहे ?" (५९)

तेव्हा रामचंद्रांनी तिला सांगितले, "हे पुण्यशीले, प्रसन्न झालेल्या राजांनी कैकेयीला वर दिला आहे. त्यानुसार त्यांनी भरताला राज्य दिले आणि मला वनवास दिला. (६०)

त्या कैकेयी मातेने माझ्यासाठी, चौदा वर्षांचा वनवास मागितला. तेव्हा माझ्यावर प्रेम करणाऱ्या पण सत्यवादी राजांना तो मान्य करावा लागला. (६१)

म्हणून हे भामिनी, मी पित्याची प्रतिज्ञा खरी करण्यासाठी लगेच वनात जाणार आहे. त्या बाबतीत तू विघ्न आणू नकोस." ते श्रीरामांचे वचन ऐकून प्रसन्नतेने सीता त्यांना म्हणाली, "(जर तुम्ही जाणारच असाल तर) आधी मी वनात जाईन, नंतर तुम्ही यावे. हे राघवा, मला इथे सोडून तुम्ही जावे हे योग्य नव्हे." (६२-६३)

तेव्हा आनंदित झालेले रघुनाथ गोड बोलणाऱ्या आपल्या प्रिय जानकीला सांगू लागले, "पुष्कळ व्याघ्र इत्यादी वन्य पशूंनी भरलेल्या वनात मी तुला कसे बरे नेऊ? (६४)

तेथे माणसाला खाणारे, भयंकर स्वरुप असणारे असे राक्षस राहतात आणि सिंह, वाघ, वराह इत्यादी हिंस्र पशू त्या वनात सगळीकडे फिरत असतात. (६५)

हे प्रिये, त्या वनात भोजनासाठी कडू व आंबट अशी फळे आणि कंदमुळे मिळतात. घाऱ्या इत्यादी कोणतेही गोड पदार्थ आणि चटणी इत्यादी तोंडी लावणी तेथे कधीही मिळत नाहीत. (६६)

हे सुंदरी, ती फळेसुद्धा कधीतरी, कुठेतरी मिळतात. तसेच त्या वनात खडे, काटे व गवत यांनी झाकून गेल्यामुळे वाटसुद्धा अनेकदा दिसत नाही. (६७)

ते वन अनेक गुहा आणि बिळे यांनी भरलेले तसेच रातकिडे, चावणारे कीटक इत्यादींनी युक्त आहे. असे हे दंडकारण्य अनेक प्रकारच्या अडचणींनी भरलेले आहे. (६८)

पादचारेण गन्तव्यं शीतवातातपादिमत् ।
राक्षसादीन्वने दृष्ट्वा जीवितं हास्यसेऽचिरात् ॥ ६९ ॥

ते वन थंडी, वारा आणि ऊन यांनी युक्त आहे. तेथे पायी चालावे लागते. त्या वनात भयंकर राक्षस इत्यादींना पाहून तू त्वरित प्राण गमावून बसशील. (६९)

तस्माद्भद्रे गृहे तिष्ठ शीघ्रं द्रक्ष्यसि मां पुनः ।
रामस्य वचनं श्रुत्वा सीता दुःखसमन्विता ॥ ७० ॥

प्रत्युवाच स्फुरद्वक्त्रा किञ्चित्कोपसमन्विता ।
कथं मामिच्छसे त्यक्तुं धर्मपत्नीं पतिव्रताम् ॥ ७१ ॥

त्वदनन्यामदोषां मां धर्मज्ञोऽसि दयापरः ।
त्वत्समीपे स्थितां राम को वा मां धर्षयेद्वने ॥ ७२ ॥

म्हणून हे कल्याणी, तू घरातच राहा. तू मला पुनः लौकरच भेटशील." श्रीरामांचे हे वचन ऐकून दुःखी झालेली सीता थोडीशी रागावली आणि कंप पावणाऱ्या ओठांनी म्हणाली, "तुम्ही धर्मज्ञ आणि दयाळू आहात. मी तुमची पतिव्रता धर्मपत्नी आहे. मला घरी सोडून जाण्याची इच्छा तुम्हांला कशी बरे झाली? आपल्या अनन्यभक्त व निर्दोष असलेल्या मला कसे सोडता येईल? हे श्रीरामा, वनामध्ये मी तुमच्याजवळ राहात असताना मला कोण त्रास देईल? (७०-७२)

फलमूलादिकं यद्यत्तव भुक्तावशेषितम् ।
तदेवामृततुल्यं मे तेन तुष्टा रमाम्यहम् ॥ ७३ ॥

वनात जे काही फळ- मूळ इत्यादी तुम्ही खाऊन उरेल तेच मला अमृताप्रमाणे गोड वाटेल. त्यानेच संतुष्ट होऊन मी तुमच्याबरोबर आनंदाने रममाण होईन. (७३)

त्वया सह चरन्त्या मे कुशाः काशाश्च कण्टकाः ।
पुष्पास्तरणतुल्या मे भविष्यन्ति न संशयः ॥ ७४ ॥

तुमच्याबरोबर हिंडत असताना कुश, काश, काटे इत्यादी सर्व काही मला फुलांनी आच्छादलेल्या गालिच्याप्रमाणे होईल, यात संशय नाही. (७४)

अहं त्वा क्लेशये नैव भवेयं कार्यसाधिनी ।
बाल्ये मां वीक्ष्य कश्चिद्वै ज्योतिःशास्त्रविशारदः ॥ ७५ ॥

प्राह ते विपिने वासः पत्या सह भविष्यति ।
सत्यवादी द्विजो भूयाद्गमिष्यामि त्वया सह ॥ ७६ ॥

वनात मी तुम्हांला मुळीच त्रास देणार नाही. उलट तुमच्या कार्यात मी सहायक होईन. लहानपणी मला पाहून एका ज्योतिष शास्त्रज्ञाने मला सांगितले होते की, तू आपल्या पतीसह काही काळ अरण्यात राहशील. त्या ब्राह्मणाचे वाक्य खरे होऊ दे. त्यासाठी मी तुमच्याबरोबर वनात येणार. (७५-७६)

अन्यत्किञ्चित्प्रवक्ष्यामि श्रुत्वा मां नय काननम् ।
रामायणानि बहुशः श्रुतानि बहुभिर्द्विजैः ॥ ७७ ॥

मी आणखी एक गोष्ट तुम्हांला सांगते. ती ऐकून तुम्ही मला वनात घेऊन जा. अनेक ब्राह्मणांच्या मुखांतून तुम्ही पुष्कळशी रामायणे ऐकलेली आहेत. (७७)

सीतां विना वनं रामो गतः किं कुत्रचिद्वद ।
अतस्त्वया गमिष्यामि सर्वथा त्वत्सहायिनी ॥ ७८ ॥

त्यामध्ये सीतेशिवाय राम वनात गेला असे कुठेतरी सांगितले आहे का, ते तुम्ही मला सांगा. म्हणून तुम्हांला साहाय्य करणारी मी तुमच्याबरोबर वनात येणारच. (७८)

यदि गच्छसि मां त्यक्त्वा प्राणांस्त्यक्ष्यामि तेऽग्रतः ।
इति तं निश्चयं ज्ञात्वा सीताया रघुनन्दनः ॥ ७९ ॥

अब्रवीद्देवि गच्छ त्वं वनं शीघ्रं मया सह ।
अरुन्धत्यै प्रयच्छाशु हारानाभरणानि च ॥ ८० ॥

जर तुम्ही माझा त्याग करून जाल तर मी तुमच्या समोरच माझे प्राण सोडीन." अशा प्रकारे सीतेचा तो दृढ निश्चय पाहिल्यावर, रघुनाथ तिला म्हणाले, "हे देवी, तू माझ्याबरोबर झटपट वनात चल. तू ताबडतोब आपले हार आणि अलंकार अरुंधती या वसिष्ठांच्या पत्नीला दे. (७९-८०)

ब्राह्मणेभ्यो धनं सर्वं दत्त्वा गच्छामहे वनम् ।
इत्युक्त्वा लक्ष्मणेनाशु द्विजानाहूय भक्तितः ॥ ८१ ॥

आपले संपूर्ण धन ब्राह्मणांना देऊन आपण वनात जाऊ." असे सांगून भगवान श्रीरामांनी लक्ष्मणाकडून लगेच ब्राह्मणांना भक्तिपूर्वक बोलावून घेतले. (८१)

ददौ गवां वृन्दशतं धनानि
वस्त्राणि दिव्यानि विभूषणानि ।
कुटुम्बवद्भ्यः श्रुतशीलवद्भ्यो
मुदा द्विजेभ्यो रघुवंशकेतुः ॥ ८२ ॥

रघुकुलश्रेष्ठ रामांनी विद्वान आणि शीलसंपन्न अशा कुटुंबवत्सल ब्राह्मणांना शेकडो गाईंचे कळप, पुष्कळ द्रव्य, दिव्य वस्त्रे आणि दिव्य अलंकार आनंदाने दिले. (८२)

अरुन्धत्यै ददौ सीता मुख्यान्याभरणानि च ।
रामो मातुः सेवकेभ्यो ददौ धनमनेकधा ॥ ८३ ॥

आपले मुख्य मुख्य अलंकार सीतेने अरुंधतीला दिले. तसेच श्रीरामांनी आपल्या आईच्या सेवकांना नाना प्रकारचे धन दिले. (८३)

स्वकान्तःपुरवासिभ्यः सेवकेभ्यस्तथैव च ।
पौरजानपदेभ्यश्च ब्राह्मणेभ्यः सहस्रशः ॥ ८४ ॥

तसेच स्वतःच्या अंतःपुरातील सेवक, हजारो नगरवासीजन, ग्रामीण भागांतील लोक आणि ब्राह्मण यांना श्रीरामांनी नाना प्रकारचे दान दिले. (८४)

लक्ष्मणोऽपि सुमित्रां तु कौसल्यायै समर्पयत् ।
धनुष्पाणिः समागत्य रामस्याग्रे व्यवस्थितः ॥ ८५ ॥

राम: सीता लक्ष्मणश्च जग्मुः सर्वे नृपालयम् ॥ ८६ ॥

लक्ष्मणानेसुद्धा सुमित्रेला कौसल्येकडे सोपविले आणि हातात धनुष्य घेऊन तो श्रीरामांपुढे येऊन उभा राहिला. त्यानंतर राम, सीता आणि लक्ष्मण हे सगळे राजा दशरथांच्या महालाकडे जाण्यास निघाले. (८५-८६)

श्रीरामः सह सीतया नृपपथे
गच्छन् शनैः सानुजः
पौरान् जानपदान्कुतूहलदृशः
सानन्दमुद्वीक्षयन् ।
श्यामः कामसहस्रसुन्दरवपुः
कान्त्या दिशो भासयन्
पादन्यासपवित्रिताखिलजगत्
प्रापालयं तत्पितुः ॥ ८७ ॥

हजारो कामदेवाप्रमाणे सुंदर शरीर असणारे व श्याम वर्णाचे भगवान श्रीराम सीतेसह आणि लक्ष्मण या धाकट्या भावासह, आपल्या कांतीने दशदिशांना प्रकाशित करीत राजमार्गावरून सावकाश चालू लागले. त्या वेळी वाटेत कुतूहलाने नगरवासी आणि ग्रामवासी श्रीरामप्रभू, सीता व लक्ष्मण यांचेकडे पाहात होते आणि श्रीराम आपल्या आनंदमय दृष्टीने त्यांच्याकडे पाहात व आपल्या चरणांच्या स्पर्शाने संपूर्ण जगाला पवित्र करीत आपल्या पित्याच्या महालात पोहोचले. (८७)

—★—

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकाण्डे चतुर्थः सर्गः ॥४ ॥

—★—

# पञ्चम सर्ग

## भगवंतांचे वनगमन

*श्रीमहादेव उवाच*

आयान्तं नागरा दृष्ट्वा मार्गे रामं सजानकिम् ।
लक्ष्मणेन समं वीक्ष्य ऊचुः सर्वे परस्परम् ॥ १ ॥

कैकेय्या वरदानादि श्रुत्वा दुःखसमावृताः ।
बत राजा दशरथः सत्यसन्धं प्रियं सुतम् ॥ २ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, जानकी आणि लक्ष्मण यांच्यासह मार्गावरून जाताना रामचंद्रांना पाहून, आणि कैकेयीला दशरथांनी दिलेले वरदान इत्यादी ऐकून, सर्व नगरवासी लोक दुःखाने व्याकूळ होऊन गेले आणि ते एकमेकांना म्हणू लागले "हाय! हाय! कामी राजा दशरथांनी आपल्या सत्यप्रतिज्ञ प्रिय पुत्राला एका स्त्रीसाठी सोडून दिले. त्यांची सत्यपरायणता कुठे उरली ? आणि दुष्ट

स्त्रीहेतोरत्यजत्कामी तस्य सत्यात्मता कुतः ।
कैकेयी वा कथं दुष्टा रामं सत्यं प्रियङ्करम् ॥ ३ ॥

विवासयामास कथं क्रूरकर्मातिमूढधीः ।
हे जना नात्र वस्तव्यं गच्छामोऽद्यैव काननम् ॥ ४ ॥

यत्र रामः सभार्यश्च सानुजो गन्तुमिच्छति ।
पश्यन्तु जानकीं सर्वे पादचारेण गच्छतीम् ॥ ५ ॥

पुंभिः कदाचिद्दृष्टा वा जानकी लोकसुन्दरी ।
सापि पादेन गच्छन्ती जनसङ्घेष्वनावृता ॥ ६ ॥

रामोऽपि पादचारेण गजाश्वादिविवर्जितः ।
गच्छति द्रक्ष्यथ विभुं सर्वलोकैकसुन्दरम् ॥ ७ ॥

राक्षसी कैकयीनाम्नी जाता सर्वविनाशिनी ।
रामस्यापि भवेद्दुःखं सीतायाः पादयानतः ॥ ८ ॥

बलवान्विधिरेवात्र पुंप्रयत्नो हि दुर्बलः ।
इति दुःखाकुले वृन्दे साधूनां मुनिपुङ्गवः ॥ ९ ॥

अब्रवीद्वामदेवोऽथ साधूनां सङ्घमध्यगः ।
मानुशोचथ रामं वा सीतां वा वच्मि तत्त्वतः ॥ १० ॥

एष रामः परो विष्णुरादिनारायणः स्मृतः ।
एषा सा जानकी लक्ष्मीर्योगमायेति विश्रुता ॥ ११ ॥

असौ शेषस्तमन्वेति लक्ष्मणाख्यश्च साम्प्रतम् ।
एष मायागुणैर्युक्तस्तत्तदाकारवानिव ॥ १२ ॥

एष एव रजोयुक्तो ब्रह्माभूद्विश्वभावनः ।
सत्त्वाविष्टस्तथा विष्णुस्त्रिजगत्प्रतिपालकः ॥ १३ ॥

एष रुद्रस्तामसोऽन्ते जगत्प्रलयकारणम् ।
एष मत्स्यः पुरा भूत्वा भक्तं वैवस्वतं मनुम् ॥ १४ ॥

नाव्यारोप्य लयस्यान्ते पालयामास राघवः ।
समुद्रमथने पूर्वं मन्दरे सुतलं गते ॥ १५ ॥

कैकेयीनेसुद्धा सत्यवादी आणि प्रिय करणाऱ्या रामांना कसे बरे वनात हाकूलन दिले ? ती तर नेहमी श्रीरामांची प्रशंसा करीत असे. ती आज कशी बरे अशी क्रूर कर्म करणारी आणि मूढबुद्धी झाली? लोकहो, आता आपण येथे राहावयाचे नाही, आजच जेथे आपली पत्नी आणि धाकटा भाऊ लक्ष्मण यांचेसह श्रीराम जाणार आहेत, आपणसुद्धा तेथे वनात जाऊया. हाय! पाहा ना! आज जानकी पायी चालत आहेत ! पूर्वी कधीतरी कुणातरी पुरुषाने जगत्सुंदरी जानकींना पाहिले तरी होते काय ? त्या आज पडदा न घेता जमावातून पायी चालत आहेत. (१-६)

लोकहो, सर्व लोकांमध्ये अद्वितीय सुंदर असलेल्या रामांना तुम्ही पाहा ना ! तेसुद्धा आज हत्ती व घोडे यांशिवाय पायी निघाले आहेत. (७)

कैकेयी नावाची राक्षसी (जणू) सर्वांचा नाश करण्यासाठीच जन्माला आली आहे. सीता देवींना पायी चालताना पाहून श्रीरामांनासुद्धा दुःख झाले असणारच.(८)

(परंतु काय करावे ?) या बाबतीत दैव हेच बलवान आहे. त्यापुढे पुरुषाचा प्रयत्न हा बलहीन ठरतो." अशा प्रकारे बोलत त्या सज्जन माणसांचा समुदाय दुःखाने व्याकूळ झाला असताना, मुनिश्रेष्ठ वामदेव त्या सज्जन लोकांच्या समूहामध्ये येऊन त्यांना सांगू लागले, "तुम्ही श्रीराम अथवा सीता यांच्याबद्दल मुळीच शोक करू नका. मी तुम्हांला खरीखुरी गोष्ट सांगतो, ती ऐका. (९-१०)

हे श्रीराम म्हणजे श्रेष्ठ असे आदिनारायण भगवान विष्णू आहेत, असे म्हटले जाते आणि ही जानकी म्हणजे योगमाया या नावाने प्रसिद्ध असणारी विष्णूंची लक्ष्मी आहे. (११)

आणि या वेळी लक्ष्मण हे नाव असणारा शेष त्या रामांच्या मागोमाग जात आहे. परमात्मा हाच आपल्या मायेच्या गुणांनी युक्त होऊन जणू त्या त्या शरीरधारी व्यक्तीप्रमाणे भासतो. (१२)

रजोगुणाने युक्त होऊन हाच परमात्मा विश्व निर्माण करणारा ब्रह्मदेव झाला आहे आणि सत्त्वगुणाने संपन्न होऊन तोच तीन लोकांचे पालन करणारा भगवान विष्णू बनतो. (१३)

तसेच कल्पाच्या शेवटी तमोगुणाचा आश्रय घेऊन हाच जगाच्या प्रलयाचे कारण असणारा रुद्र बनतो. पूर्वी या रघुनाथांनीच मत्स्यरूप घेऊन आपला भक्त वैवस्वत मनू याला प्रलय-समयी नावेत बसवून त्याचे रक्षण केले. पूर्वी समुद्रमंथनाच्या वेळी मंदर पर्वत हा सुतल लोकाप्रत

अधारयत्स्वपृष्ठेऽद्रिं कूर्मरूपी रघूत्तमः ।
मही रसातलं याता प्रलये सूकरोऽभवत् ॥ १६ ॥

तोलयामास दंष्ट्राग्रे तां क्षोणीं रघुनन्दनः ।
नारसिंहं वपुः कृत्वा प्रह्लादवरदः पुरा ॥ १७ ॥

त्रैलोक्यकण्टकं रक्षः पाटयामास तन्नखैः ।
पुत्रराज्यं हृतं दृष्ट्वा ह्यदित्या याचितः पुरा ॥ १८ ॥

वामनत्वमुपागम्य याच्ञया चाहरत्पुनः ।
दुष्टक्षत्रियभूभारनिवृत्त्यै भार्गवोऽभवत् ॥ १९ ॥

स एव जगतां नाथ इदानीं रामतां गतः ।
रावणादीनि रक्षांसि कोटिशो निहनिष्यति ॥ २० ॥

मानुषेणैव मरणं तस्य दुष्टं दुरात्मनः ।
राज्ञा दशरथेनापि तपसाराधितो हरिः ॥ २१ ॥

पुत्रत्वाकाङ्क्षया विष्णोस्तदा पुत्रोऽभवद्धरिः ।
स एव विष्णुः श्रीरामो रावणादिवधाय हि ॥ २२ ॥

गन्ताद्यैव वनं रामो लक्ष्मणेन सहायवान् ।
एषा सीता हरेर्माया सृष्टिस्थित्यन्तकारिणी ॥ २३ ॥

राजा वा कैकयी वापि नात्र कारणमण्वपि ।
पूर्वेद्युर्नारदः प्राह भूभारहरणाय च ॥ २४ ॥

रामोऽप्याह स्वयं साक्षाच्छ्वो गमिष्याम्यहं वनम् ।
अतो रामं समुद्दिश्य चिन्तां त्यजत बालिशाः ॥ २५ ॥

रामरामेति ये नित्यं जपन्ति मनुजा भुवि ।
तेषां मृत्युभयादीनि न भवन्ति कदाचन ॥ २६ ॥

का पुनस्तस्य रामस्य दुःखशङ्का महात्मनः ।
रामनाम्नैव मुक्तिः स्यात्कलौ नान्येन केनचित् ॥ २७ ॥

गेला असता, कूर्मरूपी रघुश्रेष्ठाने त्या पर्वताला आपल्या पाठीवर धारण केले. प्रलय-काळी जेव्हा पृथ्वी रसातळाला गेली तेव्हा रघुनंदन वराह झाले आणि त्यांनी आपल्या सुळ्याच्या टोकावर धरून पृथ्वीला वर आणले. तसेच पूर्वी नरसिंहाचे रूप धारण करून त्यांनी प्रह्लादाला वर दिला. (१४-१७)

त्या वेळी त्यांनी तिन्ही लोकांना काट्याप्रमाणे सलणाऱ्या त्या दैत्यराज हिरण्यकशिपूला आपल्या नखांनी फाडून टाकले. अदितीने एकदा इंद्र या आपल्या पुत्राचे राज्य हरण केले गेले आहे असे पाहून श्रीरामांची प्रार्थना केली. (१८)

तेव्हा वामनरूप धारण करून बळी राजाकडे याचना करून, त्यांनी पुन: ते इंद्राचे राज्य मिळवले व इंद्राला दिले. दुष्ट अशा क्षत्रियांमुळे झालेल्या पृथ्वीच्या भाराचे निवारण करण्यासाठी श्रीराम भृगुपुत्र परशुराम झाले. (१९)

तेच जगाचे स्वामी असलेले परमात्मा आता श्रीराम झाले आहेत. आता तेच रावण इत्यादी कोट्यवधी राक्षसांना ठार करणार आहेत. (२०)

त्या दुरात्म्या रावणाचे मरण माणसाच्या हातूनच होईल, असे ठरले आहे. तसेच आपल्या पूर्वजन्मात विष्णू हा आपला पुत्र व्हावा, म्हणून महाराज दशरथांनी विष्णूंची आराधना तपस्येच्या द्वारा केली होती. म्हणून हरी त्या दशरथांचे पुत्र झाले आहेत. तेच हे विष्णू म्हणजे श्रीराम होत. आता ते रावणाचा वध करण्यासाठी लक्ष्मणाला बरोबर घेऊन आजच वनात जाणार आहेत. ही सीता म्हणजे जगाची उत्पत्ती, स्थिती व लय करणारी भगवान विष्णूंची साक्षात माया आहे. (२१-२३)

या रामांच्या वनगमनाच्या बाबतीत राजा दशरथ किंवा कैकेयी हेसुद्धा अणुमात्रही कारण नाहीत. कारण पृथ्वीचा भार उतरविण्यासाठी नारदांनी कालच रामांची प्रार्थना केली होती . (२४)

त्या वेळी स्वत: श्रीरामांनीसुद्धा नारदांना सांगितले होते की 'मी उद्याच वनात जाईन.' म्हणून हे भोळ्या लोकांनो, रामांच्या बाबतीत तुम्ही चिंता करणे सोडून द्या. (२५)

या पृथ्वीवर जे लोक नित्य 'राम राम' असा जप करतील, त्यांना कधीही मृत्यूचे भय इत्यादी असणार नाही. (२६)

अशा स्थितीत त्या महात्म्या श्रीरामांना दु:ख होईल, अशी शंका तरी करणे, कसे बरे शक्य आहे ? कलियुगात केवळ प्रभू रामांच्या नामानेच मुक्ती प्राप्त होऊ शकते; अन्य कोणत्याही उपायाने नाही. (२७)

मायामानुषरूपेण विडम्बयति लोककृत् ।
भक्तानां भजनार्थाय रावणस्य वधाय च ॥ २८ ॥

राज्ञश्चाभीष्टसिद्ध्यर्थं मानुषं वपुराश्रितः ।
इत्युक्त्वा विररामाथ वामदेवो महामुनिः ॥ २९ ॥

श्रुत्वा तेऽपि द्विजाः सर्वे रामं ज्ञात्वा हरिं विभुम् ।
जहुर्हृत्संशयग्रन्थिं राममेवान्वचिन्तयन् ॥ ३० ॥

य इदं चिन्तयेन्नित्यं रहस्यं रामसीतयोः ।
तस्य रामे दृढा भक्तिर्भवेद्विज्ञानपूर्विका ॥ ३१ ॥

रहस्यं गोपनीयं वो यूयं वै राघवप्रियाः ।
इत्युक्त्वा प्रययौ विप्रस्तेऽपि रामं परं विदुः ॥ ३२ ॥

ततो रामः समाविश्य पितृगेहमवारितः ।
सानुजः सीतया गत्वा कैकेयीमिदमब्रवीत् ॥ ३३ ॥

आगताः स्मो वयं मातस्त्रयस्ते सम्मतं वनम् ।
गन्तुं कृतधियः शीघ्रमाज्ञापयतु नः पिता ॥ ३४ ॥

इत्युक्ता सहसोत्थाय चीराणि प्रददौ स्वयम् ।
रामाय लक्ष्मणायाथ सीतायै च पृथक् पृथक् ॥ ३५ ॥

रामस्तु वस्त्राण्युत्सृज्य वन्यचीराणि पर्यधात् ।
लक्ष्मणोऽपि तथा चक्रे सीता तन्न विजानती ॥ ३६ ॥

हस्ते गृहीत्वा रामस्य लज्जया मुखमैक्षत ।
रामो गृहीत्वा तच्चीरमंशुके पर्यवेष्टयत् ॥ ३७ ॥

तद्दृष्ट्वा रुरुदुः सर्वे राजदाराः समन्ततः ।
वसिष्ठस्तु तदाकर्ण्य रुदितं भर्त्सयन् रुषा ॥ ३८ ॥

कैकेयीं प्राह दुर्वृत्ते राम एव त्वया वृतः ।
वनवासाय दुष्टे त्वं सीतायै किं प्रयच्छसि ॥ ३९ ॥

भक्तांना भगवंतांच्या गुण कीर्तनाचा सुयोग देण्यासाठी आणि रावणाचा वध करण्यासाठी जगाचे कर्ते प्रभू रामचंद्र माया-मानुष-रूप धारण करून या जगात लीला करीत आहेत. (२८)

तसेच राजा दशरथांचे मनोरथ सिद्ध होण्यासाठी यांनी मनुष्य शरीर धारण केले आहे." असे नगरवासी लोकांना सांगून महामुनी वामदेव थांबले. (२९)

असे ऐकल्यावर श्रीराम हेच सर्वव्यापक विष्णू भगवान आहेत, हे सर्व द्विजांना कळले. मग आपल्या मनातील संशय त्यांनी सोडला आणि ते श्रीरामचंद्रांचेच चिंतन करू लागले. (३०)

राम आणि सीता यांच्या या रहस्याचे मनन जो कोणी नित्य करेल त्याची श्रीरामांचे ठायी विज्ञानपूर्वक दृढ भक्ती होईल. (३१)

"तुम्ही सर्वजण रामांना प्रिय आहात. म्हणून मी हे सांगितले आहे, परंतु हे रहस्य गुप्त राखावे." असे सांगून ते विप्रश्रेष्ठ वामदेव तेथून निघून गेले. तेव्हा श्रीराम हे परमात्माच आहेत असे त्या पौरजनांनासुद्धा कळून आले. (३२)

नंतर लक्ष्मण आणि सीता यांच्यासह श्रीराम कोणताही अडथळा न येता आपल्या पित्याच्या महालात गेले आणि ते कैकेयीला म्हणाले. (३३)

"मातोश्री, तुमच्या इच्छेप्रमाणे वनवासास जाण्याचा निश्चय करून आम्ही तिघेजण येथे आलो आहोत. आता चट्दिशी पिताजींनी आम्हांला आज्ञा करावी." (३४)

श्रीरामांनी तिला असे सांगितल्यावर कैकेयी झट्दिशी उठली आणि तिने स्वतःच राम, लक्ष्मण व सीता यांना वल्कले दिली. (३५)

तेव्हा रामचंद्रांनी आपली राजोचित वस्त्रे काढून टाकली व वल्कले धारण केली. लक्ष्मणानेसुद्धा तसेच केले. परंतु सीता मात्र ती वल्कले परिधान करण्याचे जाणत नव्हती. (३६)

म्हणून वस्त्रे हातात घेऊन ती लाजेने श्रीरामांच्या मुखाकडे पाहू लागली. तेव्हा श्रीरामांनी ती वल्कले घेऊन, सीतेच्या रेशमी वस्त्रावरच गुंडाळून टाकली. (३७)

ते पाहून सर्व राजस्त्रिया सर्व बाजूंनी रडू लागल्या. तेव्हा तो रडण्याचा आवाज ऐकून वसिष्ठांनी रागाने कैकेयीची निर्भर्त्सना करीत म्हटले, "अग दुष्ट स्त्रिये, तू फक्त रामासाठीच वनात जाण्याचा वर मागितलेला आहेस ना ? तर मग तू सीतेलासुद्धा वनात जाण्यास योग्य अशी वल्कले का बरे देत आहेस ? (३८-३९)

यदि रामं समन्वेति सीता भक्त्या पतिव्रता ।
दिव्याम्बरधरा नित्यं सर्वाभरणभूषिता ॥ ४० ॥

रमयत्वनिशं रामं वनदुःखनिवारिणी ।
राजा दशरथोऽप्याह सुमन्त्रं रथमानय ॥ ४१ ॥

जर पतिव्रता सीतेलाही भक्तीने श्रीरामांच्या मागोमाग जाण्याची इच्छा असेल तर ती सतत दिव्य वस्त्रे धारण करून आणि सर्व अलंकारांनी विभूषित होऊन, श्रीरामांचे वनातील दुःख हरण करीत रात्रंदिवस रामांना आनंदित करू दे.'' नंतर महाराज दशरथसुद्धा सुमंत्राला म्हणाले, ''सुमंत्रा, तू रथ घेऊन ये. (४०-४१)

रथमारुह्य गच्छन्तु वनं वनचरप्रियाः ।
इत्युक्त्वा राममालोक्य सीतां चैव सलक्ष्मणम् ॥ ४२ ॥

दुःखान्निपतितो भूमौ रुरोदाश्रुपरिप्लुतः ।
आरुरोह रथं सीता शीघ्रं रामस्य पश्यतः ॥ ४३ ॥

वनवासी लोकांना प्रिय असणारे राम इत्यादी रथात बसून जाऊ देत.'' असे बोलून, आणि लक्ष्मणासह रामांना तसेच सीतेला पाहून, ते दुःखाने जमिनीवर पडले आणि अश्रूंनी भरलेल्या डोळ्यांनी ते रडू लागले. मग श्रीरामांच्या देखतच सीता चट्‌दिशी रथात चढली. (४२-४३)

रामः प्रदक्षिणं कृत्वा पितरं रथमारुहत् ।
लक्ष्मणः खड्‌गयुगलं धनुस्तूणीयुगं तथा ॥ ४४ ॥

गृहीत्वा रथमारुह्य नोदयामास सारथिम् ।
तिष्ठ तिष्ठ सुमन्त्रेति राजा दशरथोऽब्रवीत् ॥ ४५ ॥

नंतर पित्याला प्रदक्षिणा करून राम रथात चढले. दोन तलवारी, दोन धनुष्ये आणि बाणांचे दोन भाते घेऊन लक्ष्मणाने रथात आरोहण केले आणि त्याने सारथ्याला रथ हाकण्याची प्रेरणा दिली. तेव्हा राजा दशरथ म्हणू लागले, ''अरे सुमंत्रा, थांब, थांब.'' (४४-४५)

गच्छ गच्छेति रामेण नोदितोऽचोदयद्रथम् ।
रामे दूरं गते राजा मूर्च्छितः प्रापतद्भुवि ॥ ४६ ॥

परंतु 'नीघ, नीघ' असे म्हणत श्रीरामांनी सुमंत्राला रथ हाकण्यास प्रेरणा केली. श्रीराम दूर निघून गेल्यावर महाराज दशरथ मूर्च्छित होऊन धरणीवर पडले. (४६)

पौरास्तु बालवृद्धाश्च वृद्धा ब्राह्मणसत्तमाः ।
तिष्ठ तिष्ठेति रामेति क्रोशन्तो रथमन्वयुः ॥ ४७ ॥

नंतर 'हे रामा, थांब थांब' असा आक्रोश करीत सर्व नगरवासी, बाल, वृद्ध आणि श्रेष्ठ ब्राह्मण रथाच्या मागोमाग निघाले. (४७)

राजा रुदित्वा सुचिरं मां नयन्तु गृहं प्रति ।
कौसल्याया राममातुरित्याह परिचारकान् ॥ ४८ ॥

खूप वेळ रडून झाल्यावर राजा दशरथ आपल्या सेवकांना म्हणाले, ''मला राममाता कौसल्येच्या महालाकडे न्या. (४८)

किञ्चित्कालं भवेत्तत्र जीवनं दुःखितस्य मे ।
अत ऊर्ध्वं न जीवामि चिरं रामं विना कृतः ॥ ४९ ॥

तेथे काही काळपर्यंत माझे हे जीवन दुःखातून टिकू शकेल. यानंतर रामाच्या वियोगामुळे मी फार काळ जिवंत राहू शकणार नाही . '' (४९)

ततो गृहं प्रविश्यैव कौसल्यायाः पपात ह ।
मूर्च्छितश्च चिरादबुद्ध्वा तूष्णीमेवावतस्थिवान् ॥ ५० ॥

त्यानंतर कौसल्येच्या महालात प्रवेश करताच राजा मूर्च्छित होऊन पडले. नंतर पुष्कळ वेळाने शुद्धीवर आल्यानंतर ते गप्पच पडून राहिले. (५०)

रामस्तु तमसातीरं गत्वा तत्रावसत्सुखी ।
जलं प्राश्य निराहारो वृक्षमूलेऽस्वपद्विभुः ॥ ५१ ॥

इकडे श्रीरामचंद्र तमसा नदीच्या तीरावर पोचले आणि तेथे सुखाने राहिले. रात्रीचे वेळी कोणताही आहार न करता केवळ पाणी पिऊन, राम सीतेसह एका वृक्षाच्या खाली झोपी गेले. तेव्हा धर्मात्मा आणि धर्मज्ञ असा लक्ष्मण

सीतया सह धर्मात्मा धनुष्पाणिस्तु लक्ष्मणः ।
पालयामास धर्मज्ञः सुमन्त्रेण समन्वितः ॥ ५२ ॥

हातात धनुष्य घेऊन सुमंत्रासह श्रीरामांचे रक्षण करीत राहिला. (५१-५२)

पौराः सर्वे समागत्य स्थितास्तस्याविदूरतः ।
शक्ता रामं पुरं नेतुं नोचेद्गच्छामहे वनम् ॥ ५३ ॥

इति निश्चयमाज्ञाय तेषां रामोऽतिविस्मितः ।
नाहं गच्छामि नगरमेते वै क्लेशभागिनः ॥ ५४ ॥

भविष्यन्तीति निश्चित्य सुमन्त्रमिदमब्रवीत् ।
इदानीमेव गच्छामः सुमन्त्र रथमानय ॥ ५५ ॥

सर्व नगरवासी लोकही तेथे आले आणि ते रामांच्याजवळ राहिले. श्रीरामांना अयोध्या नगरीला परत तरी नेऊ; नाहीतर आपणही त्यांचेबरोबर वनात जाऊ, असा त्यांचा निश्चय कळताच रामांना अतिशय आश्चर्य वाटले. "काही झाले तरी मी अयोध्या नगरीत परत जाणार नाही. तेव्हा हे लोक माझ्याबरोबर वनात येऊन क्लेशच भोगतील." असा विचार करून राम सुमंत्राला म्हणाले, "हे सुमंत्रा, तू रथ घेऊन ये. आपण आता ताबडतोब निघू या." (५३-५५)

इत्याज्ञप्तः सुमन्त्रोऽपि रथं वाहैरयोजयत् ।
आरुह्य रामः सीता च लक्ष्मणोऽपि ययुर्द्रुतम् ॥ ५६ ॥

श्रीरामांची अशी आज्ञा झाल्यावर सुमंत्रानेसुद्धा रथाला घोडे जोडले. मग राम, सीता, लक्ष्मण हेसुद्धा चट्‌दिशी रथात चढले आणि तेथून झपाट्याने निघून गेले. (५६)

अयोध्याभिमुखं गत्वा किञ्चिद्दूरं ततो ययुः ।
तेऽपि राममदृष्ट्वैव प्रातरुत्थाय दुःखिताः ॥ ५७ ॥

अयोध्येकडे तोंड करून काही अंतर गेले. नंतर ते दूर वनात निघून गेले. प्रात:काल होताच नगरवासी लोक उठले पण त्यांना राम कुठेच न दिसल्याने ते सर्वजण फार दु:खी झाले. (५७)

रथनेमिगतं मार्गं पश्यन्तस्ते पुरं ययुः ।
हृदि रामं ससीतं ते ध्यायन्तस्तस्थुरन्वहम् ॥ ५८ ॥

रथाच्या धावेने आक्रमिलेला मार्ग पाहात पाहात ते अयोध्या नगरीत पोचले. नंतर दररोज सीतेसह रामांचे ध्यान मनात करीत ते तेथेच राहू लागले . (५८)

सुमन्त्रोऽपि रथं शीघ्रं नोदयामास सादरम् ।
स्फीताञ्जनपदान्पश्यन् रामः सीतासमन्वितः ॥ ५९ ॥

गङ्गातीरं समागच्छच्छृङ्गवेराविदूरतः ।
गङ्गां दृष्ट्वा नमस्कृत्य स्नात्वा सानन्दमानसः ॥ ६० ॥

इकडे सुमंत्रानेसुद्धा आदरपूर्वक रथ वेगाने चालविला. नंतर विस्तृत असा ग्रामीण भाग पाहात पाहात, सीतेसहित श्रीराम शृंगवेर नगरापासून अगदी जवळच असणाऱ्या गंगा नदीच्या तीरावर पोचले. गंगा नदी पाहून त्यांनी आनंदाने तिला नमस्कार केला आणि गंगेत स्नान केले. (५९-६०)

शिंशपावृक्षमूले स निषसाद रघूत्तमः ।
ततो गुहो जनैः श्रुत्वा रामागममहोत्सवम् ॥ ६१ ॥

सखायं स्वामिनं द्रष्टुं हर्षात्तूर्णं समापतत् ।
फलानि मधुपुष्पादि गृहीत्वा भक्तिसंयुतः ॥ ६२ ॥

नंतर रघुश्रेष्ठ राम शिसवी वृक्षाच्या सावलीत बसले. त्या वेळी लोकांच्या मुखातून रामांच्या आगमनाचा मंगल समाचार ऐकल्यावर निषादराज गुह आनंदाने आपले स्वामी आणि मित्र असलेल्या श्रीरघुनाथांना भेटण्यास भक्तीने युक्त होऊन, फळे, मध, फुले इत्यादी घेऊन, सत्वर तेथे येऊन पोचला. (६१-६२)

रामस्याग्रे विनिक्षिप्य दण्डवत्प्रापतद्भुवि ।
गुहमुत्थाप्य तं तूर्णं राघवः परिषस्वजे ॥ ६३ ॥

नजराण्याची सामग्री पुढे ठेवून तो श्रीरामांपुढे दंडवत जमिनीवर पडला. तेव्हा गुहाला त्वरित उठवून श्रीरघुनाथांनी आलिंगन दिले. (६३)

संपृष्टकुशलो रामं गुहः प्राञ्जलिरब्रवीत् ।
धन्योऽहमद्य मे जन्म नैषादं लोकपावन ॥ ६४ ॥

त्यानंतर श्रीरामांनी त्याचे कुशल विचारले. मग हात जोडून गुह म्हणाला, "हे लोकपावन रामा, आज मी धन्य झालो. आज निषाद जातीतील माझा जन्म सफल झाला. (६४)

बभूव परमानन्दः स्पृष्ट्वा तेऽङ्गं रघूत्तम ।
नैषादराज्यमेतत्ते किङ्करस्य रघूत्तम ॥ ६५ ॥

त्वदधीनं वसन्नत्र पालयास्मान् रघूद्वह ।
आगच्छ यामो नगरं पावनं कुरु मे गृहम् ॥ ६६ ॥

हे रघुश्रेष्ठा, तुमच्या शरीराचा स्पर्श झाल्याने मला फार मोठा आनंद झाला आहे. हे रघुवरा, तुमच्या सेवकाचे हे निषाद-राज्य तुमचेच आहे. म्हणून हे रघुनाथा, आता येथेच राहून तुम्ही आमचे पालन करा. या, आपण माझ्या नगरात जाऊ. तुम्ही माझे घर पावन करा. (६५-६६)

गृहाण फलमूलानि त्वदर्थं सञ्चितानि मे ।
अनुगृह्णीष्व भगवन् दासस्तेऽहं सुरोत्तम ॥ ६७ ॥

हे भगवन, जी काही फळे, मुळे इत्यादी मी तुमच्यासाठी गोळा केली आहेत, ती तुम्ही घ्या. हे सुरश्रेष्ठा, मी तुमचा दास आहे. तुम्ही माझ्यावर कृपा करा." (६७)

रामस्तमाह सुप्रीतो वचनं शृणु मे सखे ।
न वेक्ष्यामि गृहं ग्रामं नव वर्षाणि पञ्च च ॥ ६८ ॥

अतिशय प्रसन्न झालेले श्रीराम त्याला म्हणाले, "मित्रा, प्रतिज्ञा पालन करण्यासाठी चौदा वर्षे मी कोणत्याही गावात अगर घरात प्रवेश करणार नाही. (६८)

दत्तमन्येन नो भुञ्जे फलमूलादि किञ्चन ।
राज्यं ममैतत्ते सर्वं त्वं सखा मेऽतिवल्लभः ॥ ६९ ॥

तसेच दुसऱ्या कोणी दिलेली कोणतीही फळे आणि मुळे मी खाणार नाही. तुझे हे संपूर्ण राज्य माझेच आहे. कारण तू माझा अतिशय लाडका मित्र आहेस." (६९)

वटक्षीरं समानाय्य जटामुकुटमादरात् ।
बबन्ध लक्ष्मणेनाथ सहितो रघुनन्दनः ॥ ७० ॥

त्यानंतर वडाचा चीक मागवून घेऊन, लक्ष्मणाने आणि श्रीरामांनी योग्य रीतीने जटाजूट बांधला. (७०)

जलमात्रं तु सम्प्राश्य सीतया सह राघवः ।
आस्तृतं कुशपर्णाद्यैः शयनं लक्ष्मणेन हि ॥ ७१ ॥

सीतेबरोबर श्रीराम फक्त पाणी प्याले. तितक्यात कुश, पाने इत्यादींच्या सहाय्याने लक्ष्मणाने जमिनीवर शय्या तयार केली . (७१)

उवास तत्र नगरप्रासादाग्रे यथा पुरा ।
सुष्वाप तत्र वैदेह्या पर्यङ्क इव संस्कृते ॥ ७२ ॥

पूर्वी ज्याप्रमाणे अयोध्या नगरीतील प्रासादातील महालामध्ये जनकनंदिनीसहित राम शृंगारलेल्या अशा पलंगावर झोपत होते, त्या प्रमाणे त्या कुश-शय्येवर राम सीतेसह सुखाने पहुडले . (७२)

ततोऽविदूरे परिगृह्य चापं
सबाणतूणीरधनुः स लक्ष्मणः ।
ररक्ष रामं परितो विपश्यन्
गुहेन सार्धं सशरासनेन ॥ ७३ ॥

त्यानंतर जवळच, धनुष्यधारी गुहाबरोबर बाण, भाता व धनुष्य घेतलेला लक्ष्मण धनुष्य सज्ज ठेवून, सर्वत्र पाहात पाहात श्रीरामचंद्रांचे रक्षण करू लागला. (७३)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकाण्डे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

# षष्ठ सर्ग

## गंगा उतरून पलीकडे गमन आणि भरद्वाज व वाल्मीकी यांची भेट

*श्रीमहादेव उवाच*

सुप्तं रामं समालोक्य गुहः सोऽश्रुपरिप्लुतः ।
लक्ष्मणं प्राह विनयाद् भ्रातः पश्यसि राघवम् ॥ १ ॥

शयानं कुशपत्रौघसंस्तरे सीतया सह ।
यः शेते स्वर्णपर्यङ्के स्वास्तीर्णे भवनोत्तमे ॥ २ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, त्या वेळी झोपलेल्या श्रीरामांना पाहून गुहाचे डोळे अश्रूंनी भरून आले. तो विनयाने लक्ष्मणाला म्हणाला, "बंधू लक्ष्मणा, पाहा ना! जे रघुनाथ पूर्वी आपल्या उत्तम महालातील उत्तम प्रकारे शृंगारलेल्या सोन्याच्या पलंगावर सीतेसह झोपत होते, तेच श्रीराम आज सीतेसह कुश आणि पानांनी बनविलेल्या पथारीवर झोपले आहेत ! (१-२)

कैकेयी रामदुःखस्य कारणं विधिना कृता ।
मन्थराबुद्धिमास्थाय कैकेयी पापमाचरत् ॥ ३ ॥

ब्रह्मदेवाने या श्रीरामांच्या दुःखाचे कारण कैकेयीला बनविले. मंथरेच्या बुद्धीवर विश्वास ठेवून कैकेयीने पापकर्म केले." (३)

तच्छ्रुत्वा लक्ष्मणः प्राह सखे शृणु वचो मम ।
कः कस्य हेतुर्दुःखस्य कश्च हेतुः सुखस्य वा ॥ ४ ॥

स्वपूर्वार्जितकर्मैव कारणं सुखदुःखयोः ॥ ५ ॥

ते ऐकून लक्ष्मण म्हणाला, " मित्रा, माझे वचन ऐक. एखाद्याच्या दुःखाचे कारण अथवा एखाद्याच्या सुखाचे कारण दुसरा कोण असणार ? अर्थात् दुसरा कोणी कारण होऊ शकत नाही, तर माणसाने स्वतःच पूर्वी केलेले कर्मच त्याच्या सुखदुःखाचे कारण बनते. (४-५)

सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता
परो ददातीति कुबुद्धिरेषा ।
अहं करोमीति वृथाभिमानः
स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः ॥ ६ ॥

माणसाला सुख आणि दुःख देणारा अन्य कोणीही नाही. दुसरा कुणी सुखदुःख देतो, असे समजणे ही चुकीची समजूत आहे. 'मी करतो' हा माणसाचा फुकटचा अभिमान आहे. कारण लोक हे स्वतःच्या कर्माच्या दोरीने बांधलेले असतात. (६)

सुहृन्मित्रार्युदासीनद्वेष्यमध्यस्थबान्धवाः ।
स्वयमेवाचरन्कर्म तथा तत्र विभाव्यते ॥ ७ ॥

स्वतःच नाना प्रकारची कर्मे करणारा माणूस हा आपल्याच भावनेप्रमाणे सुहृद, मित्र, शत्रू, उदासीन, द्वेष्य, मध्यस्थ, बांधव इत्यादी वेगवेगळ्या कल्पना करीत राहतो. (७)

सुखं वा यदि वा दुःखं स्वकर्मवशगो नरः ।
यद्यद्यथागतं तत्तद् भुक्त्वा स्वस्थमना भवेत् ॥ ८ ॥

स्वतःच्या प्रारब्धानुसार माणसाने जे जे सुख अथवा दुःख जसे येईल तसे ते भोगून स्वस्थ मनाने राहावे. (८)

न मे भोगागमे वाञ्छा न मे भोगविवर्जने ।
आगच्छत्वथ मागच्छत्वभोगवशगो भवेत् ॥ ९ ॥

आपण भोगांच्या प्राप्तीची इच्छा करू नये. भोग येऊ नयेत अशी इच्छाही नाही. माझ्याकडे भोग येवोत अथवा न येवोत, असे मानून माणसाने भोगांच्या अधीन होऊ नये . (९)

यस्मिन् देशे च काले च यस्माद्वा येन केन वा ।
कृतं शुभाशुभं कर्म भोज्यं तत्तत्र नान्यथा ॥ १० ॥

ज्या स्थळी आणि ज्या काळी, ज्या योगाने, ज्या कोणी जे शुभ किंवा अशुभ कर्म केले असेल ते त्याला येथेच भोगावे लागते, त्यापेक्षा वेगळे असे अन्य काही घडणार नाही . (१०)

अलं हर्षविषादाभ्यां शुभाशुभफलोदये ।
विधात्रा विहितं यद्यत्तदलङ्घ्यं सुरासुरैः ॥ ११ ॥

म्हणून शुभ अथवा अशुभ फळाची प्राप्ती झाली असता, हर्ष अथवा विषाद मानू नये. कारण विधात्याने जे जे काही ठरविलेले असेल, ते देव किंवा असुर यांनाही चुकविणे शक्य नाही. (११)

सर्वदा सुखदुःखाभ्यां नरः प्रत्यवरुध्यते ।
शरीरं पुण्यपापाभ्यामुत्पन्नं सुखदुःखवत् ॥ १२ ॥

माणूस हा नेहमी सुख अथवा दुःख यांनी घेरलेला असतो. कारण शरीर हे पुण्य आणि पाप यांच्यामुळे उत्पन्न होते; म्हणून ते सुखदुःखांनी युक्त असते. (१२)

सुखस्यानन्तरं दुःखं दुःखस्यानन्तरं सुखम् ।
द्वयमेतद्धि जन्तूनामलङ्घ्यं दिनरात्रिवत् ॥ १३ ॥

सुखानंतर दुःख येते आणि दुःखानंतर सुख येते. ही दोन्हीही दिवस-रात्रीप्रमाणे प्राण्यांना टाळता येणार नाहीत. (१३)

सुखमध्ये स्थितं दुःखं दुःखमध्ये स्थितं सुखम् ।
द्वयमन्योन्यसंयुक्तं प्रोच्यते जलपङ्कवत् ॥ १४ ॥

सुखामध्येच दुःख असते आणि दुःखामध्येच सुख असते. हे दोन्हीही पाणी आणि चिखल यांच्याप्रमाणे एकमेकांत मिसळून गेलेले असतात, असे म्हटले जाते. (१४)

तस्माद्धैर्येण विद्वांस इष्टानिष्टोपपत्तिषु ।
न हृष्यन्ति न मुह्यन्ति सर्वं मायेति भावनात् ॥ १५ ॥

म्हणून 'सर्व काही माया आहे' या भावनेने विद्वान लोक इष्ट अथवा अनिष्ट यांची प्राप्ती झाली असताना, धीर धरून, आनंदितही होत नाहीत अगर मोहितही होत नाहीत." (१५)

गुहलक्ष्मणयोरेवं भाषतोर्विमलं नभः ।
बभूव रामः सलिलं स्पृष्ट्वा प्रातः समाहितः ॥ १६ ॥

या प्रमाणे गुह आणि लक्ष्मण हे संभाषण करीत असताना, आकाश उजळून गेले. पाण्याने आचमन करून रामचंद्रांनी प्रातःकालचे संध्यावंदनादी उरकले. (१६)

उवाच शीघ्रं सुदृढां नावमानय मे सखे ।
श्रुत्वा रामस्य वचनं निषादाधिपतिर्गुहः ॥ १७ ॥

स्वयमेव दृढां नावमानिनाय सुलक्षणाम् ।
स्वामिन्नारुह्यतां नौका सीतया लक्ष्मणेन च ॥ १८ ॥

मग श्रीराम गुहाला म्हणाले, "मित्रा, माझ्यासाठी एक चांगली बळकट नाव त्वरित घेऊन ये." श्रीरामांचे हे वचन ऐकल्यावर, निषादराज गुहाने स्वतःच एक चांगली अशी बळकट नाव आणली. मग तो श्रीरामांना म्हणाला, "स्वामी, सीता आणि लक्ष्मण यांच्यासह आपण नौकेत चढावे. (१७-१८)

वाहये ज्ञातिभिः सार्धमहमेव समाहितः ।
तथेति राघवः सीतामारोप्य शुभलक्षणाम् ॥ १९ ॥

माझ्या नातलगांसह मी स्वतःच काळजीपूर्वक ही नाव चालवीन." "ठीक आहे" असे म्हणून रामांनी प्रथम शुभलक्षणी सीतेला नौकेत चढविले. (१९)

गुहस्य हस्तावालम्ब्य स्वयं चारोहदच्युतः ।
आयुधादीन् समारोप्य लक्ष्मणोऽप्यारुरोह च ॥ २० ॥

नंतर गुहाच्या हातांचा आधार घेऊन भगवान राम स्वतः नावेत चढले. त्यानंतर आयुधे इत्यादी नावेत चढवून लक्ष्मणसुद्धा नावेत बसला. (२०)

गुहस्तान्वाहयामास ज्ञातिभिः सहितः स्वयम् ।
गङ्गामध्ये गता गङ्गां प्रार्थयामास जानकी ॥ २१ ॥

आपल्या ज्ञातिबांधवांसह गुहाने स्वतःच ती नाव चालविली. ज्या वेळी ती नाव गंगेच्या मध्यभागी पोचली, तेव्हा जानकीने गंगेची प्रार्थना केली. (२१)

देवि गङ्गे नमस्तुभ्यं निवृत्ता वनवासतः ।
रामेण सहिताहं त्वां लक्ष्मणेन च पूजये ॥ २२ ॥

"हे देवी गंगे, तुला नमस्कार असो. वनवासातून परत आल्यावर राम आणि लक्ष्मण यांच्यासह मी तुझी पूजा करीन." (२२)

इत्युक्त्वा परकूलं तौ शनैरुत्तीर्य जग्मतुः ॥ २३ ॥

त्यानंतर ते सावकाशपणे गंगा नदी पार करून पलीकडच्या तीरावर पोचले.

गुहोऽपि राघवं प्राह गमिष्यामि त्वया सह ।
अनुज्ञां देहि राजेन्द्र नोचेत्प्राणांस्त्यजाम्यहम् ॥ २४ ॥

त्यानंतर गुह श्रीरघुनाथांना म्हणाला, "हे राजेंद्रा, मीसुद्धा तुमच्याबरोबर येईन. मला तशी अनुज्ञा द्या. नाहीतर मी प्राणांचा त्याग करीन.' (२४)

श्रुत्वा नैषादिवचनं श्रीरामस्तमथाब्रवीत् ।
चतुर्दश समाः स्थित्वा दण्डके पुनरप्यहम् ॥ २५ ॥

आयास्याम्युदितं सत्यं नासत्यं रामभाषितम् ।
इत्युक्त्वालिङ्ग्य तं भक्तं समाश्वास्य पुनः पुनः ॥ २६ ॥

निवर्तयामास गुहं सोऽपि कृच्छ्राद्ययौ गृहम् ॥ २७ ॥

निषादराज गुहाचे वचन ऐकल्यावर, श्रीरामचंद्र त्याला म्हणाले, "दंडकारण्यात चौदा वर्षे राहिल्यावर मी पुनः येथे परत येईन. मी जे काही बोलतो ते सत्यच असते. रामाचे भाषण कधीच खोटे नसते." असे बोलून आणि त्या भक्ताला आलिंगन देऊन पुनः पुनः धीर दिला आणि मग रामांनी गुहाला परत पाठवून दिले. तेव्हा मोठ्या कष्टाने तोसुद्धा आपल्या घरी परत गेला. (२५-२७)

ततो रामस्तु वैदेह्या लक्ष्मणेन समन्वितः ॥ २८ ॥

भरद्वाजाश्रमपदं गत्वा बहिरुपस्थितः ।
तत्रैकं बटुकं दृष्ट्वा रामः प्राह च हे बटो ॥ २९ ॥

रामो दाशरथिः सीतालक्ष्मणाभ्यां समन्वितः ।
आस्ते बहिर्वनस्येति ह्युच्यतां मुनिसन्निधौ ॥ ३० ॥

त्यानंतर जानकी आणि लक्ष्मण यांच्यासह श्रीरामचंद्र हे भरद्वाज मुनींच्या आश्रमस्थानी जाऊन बाहेरच उभे राहिले. तेथे एका बटूला पाहून श्रीरामचंद्र म्हणाले, "अरे बटू, सीता आणि लक्ष्मण यांच्यासह दशरथपुत्र राम आश्रमाच्या वनाच्या बाहेर उभा आहे, असे मुनींजवळ जाऊन तू सांग." (२८-३०)

तच्छ्रुत्वा सहसा गत्वा पादयोः पतितो मुनेः ।
स्वामिन् रामः समागत्य वनाद्बहिरवस्थितः ॥ ३१ ॥

सभार्यः सानुजः श्रीमानाह मां देवसन्निभः ।
भरद्वाजाय मुनये ज्ञापयस्व यथोचितम् ॥ ३२ ॥

रघुनाथांचे ते वचन ऐकल्यावर तो बटू त्वरित गेला आणि मुनींच्या चरणी लोटांगण घालून म्हणाला, "अहो भगवन्, आपली पत्नी व आपला धाकटा भाऊ यांच्यासह आलेल्या देवतुल्य श्रीमान् रामांनी मला सांगितले आहे की भरद्वाज मुनींना योग्य रीतीने मी आल्याचे कळव." (३१-३२)

तच्छ्रुत्वा सहसोत्थाय भरद्वाजो मुनीश्वरः ।
गृहीत्वार्घ्यं च पाद्यं च रामसामीप्यमाययौ ॥ ३३ ॥

ते वचन ऐकून मुनीश्वर भरद्वाज चट्दिशी उठले आणि अर्घ्य व पादोदक घेऊन ते रामांच्याजवळ आले. (३३)

दृष्ट्वा रामं यथान्यायं पूजयित्वा सलक्ष्मणम् ।
आह मे पर्णशालां भो राम राजीवलोचन ॥ ३४ ॥

आगच्छ पादरजसा पुनीहि रघुनन्दन ।
इत्युक्त्वोटजमानीय सीतया सह राघवौ ॥ ३५ ॥

श्रीरामांना पाहिल्यावर त्यांनी लक्ष्मणासह त्यांची यथाविधी पूजा केली आणि म्हटले, "हे कमलनयन रामा, या. हे रघुनन्दना, तुमच्या चरण धुळीने ही माझी पर्णशाला तुम्ही पवित्र करा." असे बोलून, सीतेसह त्या दोघा रघुकुमारांना त्यांनी आपल्या कुटीत आणले. (३४-३५)

भक्त्या पुनः पूजयित्वा चकारातिथ्यमुत्तमम् ।
अद्याहं तपसः पारं गतोऽस्मि तव सङ्गमात् ॥३६ ॥

त्यानंतर भक्तीने पुनः त्यांची पूजा करून त्यांनी त्यांचा उत्तम आदर-सत्कार केला आणि ते म्हणाले, "अहो रामा, तुमची भेट झाल्याने आज माझी तपश्चर्या सफल झाली आहे. हे रघुनन्दना रामा, तुमचा जो काही भूतकालीन आणि भविष्यकालीन वृत्तांत आहे तो सर्व मला ज्ञात आहे आणि मी हेही जाणतो की तुम्ही साक्षात परमात्मा आहात

ज्ञातं राम तवोदन्तं भूतं चागामिकं च यत् ।
जानामि त्वां परात्मानं मायया कार्यमानुषम् ॥३७॥

यदर्थमवतीर्णोऽसि प्रार्थितो ब्रह्मणा पुरा ।
यदर्थं वनवासस्ते यत्करिष्यसि वै पुरः ॥ ३८ ॥

जानामि ज्ञानदृष्ट्याहं जातया त्वदुपासनात् ।
इतः परं त्वां किं वक्ष्ये कृतार्थोऽहं रघूत्तम ॥ ३९ ॥

यस्त्वां पश्यामि काकुत्स्थं पुरुषं प्रकृतेः परम् ।
रामस्तमभिवाद्याह सीतालक्ष्मणसंयुतः ॥ ४० ॥

अनुग्राह्यास्त्वया ब्रह्मन्वयं क्षत्रियबान्धवाः ।
इति सम्भाष्य तेऽन्योन्यमुषित्वा मुनिसन्निधौ ॥ ४१ ॥

प्रातरुत्थाय यमुनामुत्तीर्य मुनिदारकैः ।
कृताप्लवेन मुनिना दृष्टमार्गेण राघवः ॥ ४२ ॥

प्रययौ चित्रकूटाद्रिं वाल्मीकेर्यत्र चाश्रमः ।
गत्वा रामोऽथ वाल्मीकेराश्रमं ऋषिसङ्कुलम् ॥ ४३ ॥

नानामृगद्विजाकीर्णं नित्यपुष्पफलाकुलम् ।
तत्र दृष्ट्वा समासीनं वाल्मीकिं मुनिसत्तमम् ॥ ४४ ॥

ननाम शिरसा रामो लक्ष्मणेन च सीतया ।
दृष्ट्वा रामं रमानाथं वाल्मीकिर्लोकसुन्दरम् ॥ ४५ ॥

जानकीलक्ष्मणोपेतं जटामुकुटमण्डितम् ।
कन्दर्पसदृशाकारं कमनीयाम्बुजेक्षणम् ॥ ४६ ॥

दृष्ट्वैव सहसोत्तस्थौ विस्मयानिमिषेक्षणः ।
आलिङ्ग्य परमानन्दं रामं हर्षाश्रुलोचनः ॥ ४७ ॥

पूजयित्वा जगत्पूज्यं भक्त्याघ्र्यादिभिरादृतः ।
फलमूलैः स मधुरैर्भोजयित्वा च लालितः ॥ ४८ ॥

राघवः प्राञ्जलिः प्राह वाल्मीकिं विनयान्वितः ।
पितुराज्ञां पुरस्कृत्य दण्डकानागता वयम् ॥४९॥

कार्याच्या सिद्धीसाठी तुम्ही मायेने मनुष्याचे रूप धारण केले आहे. (३६-३७)

पूर्वी ब्रह्मदेवाने प्रार्थना केल्यामुळे ज्या कारणासाठी तुम्ही अवतार घेतला आहे, ज्यासाठी तुम्हांला वनवास पत्करावा लागला आहे आणि यानंतर तुम्ही जे काही करणार आहात ते सर्व तुमची उपासना केल्यामुळे निर्माण झालेल्या ज्ञान-दृष्टीने मला कळले आहे. हे रघुश्रेष्ठा, यापेक्षा अधिक मी तुम्हांला काय सांगू ? मी कृतार्थ झालो आहे; कारण प्रकृतीच्या पलीकडे असणाऱ्या साक्षात पुरुषोत्तम अशा तुम्हांला- ककुत्स्थनंदनाला- मी पाहात आहे.'' त्यानंतर सीता आणि लक्ष्मण यांचे सह श्रीरामचंद्रांनी त्यांना प्रणाम केला. ते त्यांना म्हणाले. (३८-४०)

''हे ब्रह्मन, आम्हा क्षत्रियबांधवांवर तुम्ही कृपा करावी,'' अशा प्रकारे एकमेकांशी बोलून झाल्यावर श्रीराम मुनींच्या जवळ राहिले. (४१)

सर्वजण सकाळी उठले. मग मुनिकुमारांनी तयार केलेल्या होडीत बसून, यमुना नदी ओलांडून, मुनींनी दाखविलेल्या मार्गाने श्रीरघुनाथ चित्रकूट पर्वताकडे गेले. तेथे वाल्मीकि-मुनींचा आश्रम होता. तो ऋषि-समूहांनी भरलेला, नाना प्रकारच्या वन्य पशूंनी आणि पक्ष्यांनी गजबजलेला आणि नेहमी फुलांनी व फळांनी बहरलेला होता, त्या वाल्मीकींच्या आश्रमात गेल्यावर, रामांनी तेथे बसलेल्या मुनिश्रेष्ठ वाल्मीकींना पाहिले. (४२-४४)

आणि लक्ष्मण व सीता यांसह श्रीरामचंद्रांनी मस्तक नमवून वाल्मीकींना प्रणाम केला. तेव्हा सुंदर कमळाप्रमाणे नेत्र असणारे, मदनाप्रमाणे रूप असणारे, जटारूपी मुकुटाने विभूषित, सर्व लोकांमध्ये सुंदर, लक्ष्मीचे पती, आणि जानकी व लक्ष्मण यांच्याबरोबर असलेल्या रामचंद्र यांना वाल्मीकींनी पाहिले . (४५-४६)

त्यांना पाहताच वाल्मीकी लगबगीने उठून उभे राहिले. विस्मयाने त्यांच्या डोळ्यांच्या पापण्या हलेनाशा झाल्या आणि आनंदाश्रूंनी डोळे भरलेल्या स्थितीत त्यांनी परमानंद-स्वरूप अशा श्रीरामांना आलिंगन दिले. (४७)

सर्व जगाला पूज्य अशा भगवान रामांची अर्घ्य इत्यादींनी आदरपूर्वक भक्तीने पूजा करून व त्यांना मधुर फळे आणि मुळे यांचे भोजन देऊन वाल्मीकींनी वात्सल्य भावनेने त्यांचा सत्कार केला. (४८)

त्यानंतर अतिशय नम्रतापूर्वक हात जोडून श्रीरघुनाथ वाल्मीकींना म्हणाले '' पित्याची आज्ञा मान्य करून आम्ही दण्डकारण्यात आलो आहोत. (४९)

भवन्तो यदि जानन्ति किं वक्ष्यामोऽत्र कारणम् ।
यत्र मे सुखवासाय भवेत्स्थानं वदस्व तत् ॥ ५० ॥

जर आपणास सर्व काही माहीत आहे, तर याचे कारण मी काय सांगणार ? तेव्हा आता सुखाने राहण्यासाठी योग्य असेल, ते स्थान आपण मला सांगा. (५०)

सीतया सहित: कालं किञ्चित्तत्र नयाम्यहम् ।
इत्युक्तो राघवेणासौ मुनि: सस्मितमब्रवीत् ॥ ५१ ॥

म्हणजे त्या स्थळी सीतेसहित मी काही काळ व्यतीत करीन." रघुनाथांनी असे म्हटल्यावर मुनिवर स्मितपूर्वक बोलले. (५१)

त्वमेव सर्वलोकानां निवासस्थानमुत्तमम् ।
तवापि सर्वभूतानि निवाससदनानि हि ॥ ५२ ॥

" हे श्रीराम, तुम्हीच सर्व लोकांचे एक मात्र उत्तम निवास-स्थान आहात, आणि सर्व भूते हीसुद्धा तुमच्या निवासाचे स्थान आहेत. (५२)

एवं साधारणं स्थानमुक्तं ते रघुनन्दन ।
सीतया सहितस्येति विशेषं पृच्छतस्तव ॥ ५३ ॥

तद्वक्ष्यामि रघुश्रेष्ठ यत्ते नियतमन्दिरम् ।
शान्तानां समदृष्टीनामद्वेष्टॄणां च जन्तुषु ।
त्वामेव भजतां नित्यं हृदयं तेऽधिमन्दिरम् ॥ ५४ ॥

अशा प्रकारे, हे रघुनन्दना, मी तुमचे सर्वसामान्य असे निवासस्थान सांगितले. परंतु सीतेसहित राहण्यासाठी विशिष्ट असे निवासस्थान विचारले आहे, म्हणून हे रघुश्रेष्ठा, तुमच्यासाठी जे निश्चित स्थान आहे ते मी सांगतो. जे शांत आहेत, जे समदृष्टी आहेत, जे सर्व प्राण्यांच्या बाबतीत द्वेषरहित आहेत आणि जे नित्य तुमचेच भजन करतात, त्यांचे हृदय हेच तुमचे मुख्य निवास- स्थान आहे. (५३-५४)

धर्माधर्मान्परित्यज्य त्वामेव भजतोऽनिशम् ।
सीतया सह ते राम तस्य हृत्सुखमन्दिरम् ॥ ५५ ॥

हे रामा, धर्म व अधर्म यांचा त्याग करून जो निरंतर तुमचेच भजन करतो, त्याचे हृदय हेच सीतेसहित तुम्हांला राहण्यास सुखकारक मंदिर आहे. (५५)

त्वन्मन्त्रजापको यस्तु त्वामेव शरणं गत: ।
निर्द्वन्द्वो नि:स्पृहस्तस्य हृदयं ते सुमन्दिरम् ॥ ५६ ॥

जो तुमच्या नामाच्या मंत्राचा जप करतो आणि जो तुम्हांलाच शरण आला आहे, आणि जो द्वंद्वरहित आहे आणि नि:स्पृह आहे त्याचे हृदय हे तुमच्यासाठी सुंदर मंदिर आहे. (५६)

निरहङ्कारिण: शान्ता ये रागद्वेषवर्जिता: ।
समलोष्टाश्मकनकास्तेषां ते हृदयं गृहम् ॥ ५७ ॥

जे अहंकाररहित व शांत आहेत, जे राग व द्वेष यांनी रहित आहेत आणि ज्यांना माती व दगड किंवा सोने एकसारखेच वाटतात, त्यांचे हृदय हे तुमच्यासाठी राहण्याचे घर आहे. (५७)

त्वयि दत्तमनोबुद्धिर्य: सन्तुष्ट: सदा भवेत् ।
त्वयि सन्त्यक्तकर्मा यस्तन्मनस्ते शुभं गृहम् ॥ ५८ ॥

ज्याने आपले मन आणि बुद्धी हे तुमच्या ठिकाणी लावले आहेत, जो सदा संतुष्ट असतो आणि जो आपली सर्व कर्मे तुम्हांला अर्पण करतो, त्याचे मन हेच तुम्हांला राहण्यास शुभ गृह आहे. (५८)

यो न द्वेष्ट्यप्रियं प्राप्य प्रियं प्राप्य न हृष्यति ।
सर्वं मायेति निश्चित्य त्वां भजेत्तन्मनो गृहम् ॥ ५९ ॥

जरी अप्रिय गोष्ट प्राप्त झाली तरी जो तिचा द्वेष करीत नाही आणि जो प्रिय गोष्ट मिळाल्यावरही आनंदित होत नाही, तसेच 'हे संपूर्ण जग माया आहे' असा निश्चय करून जो नेहमी तुम्हांला भजतो, त्याचे मन हेच तुम्हांला राहण्यास योग्य घर आहे. (५९)

षड्भावादिविकारान्यो देहे पश्यति नात्मनि ।
क्षुत्तृट् सुखं भयं दु:खं प्राणबुद्ध्योर्निरीक्षते ॥ ६० ॥

(अस्तित्व, जन्म, वाढ, बदल, क्षीणत्व आणि नाश) हे वस्तूचे सहा विकार जो देहाच्या ठिकाणी म्हणजे देहाचे आहेत असे पाहातो, ते आत्म्याचे ठायी नाहीत असे जो जाणतो, तसेच तहान-भूक, सुख-दु:ख, भय हे सर्व प्राण आणि बुद्धी यांचे परिणाम आहेत, असे जो जाणतो

संसारधर्मैर्निर्मुक्तस्तस्य ते मानसं गृहम् ॥ ६१ ॥

पश्यन्ति ये सर्वगुहाशयस्थं
त्वां चिद्घनं सत्यमनन्तमेकम् ।
अलेपकं सर्वगतं वरेण्यं
तेषां हृदब्जे सह सीतया वस ॥ ६२ ॥

निरन्तराभ्यासदृढीकृतात्मनां
त्वत्पादसेवापरिनिष्ठितानाम् ।
त्वन्नामकीर्त्या हतकल्मषाणां
सीतासमेतस्य गृहं हृदब्जे ॥ ६३ ॥

राम त्वन्नाममहिमा वर्ण्यते केन वा कथम् ।
यत्प्रभावादहं राम ब्रह्मर्षित्वमवाप्तवान् ॥ ६४ ॥

अहं पुरा किरातेषु किरातैः सह वर्धितः ।
जन्ममात्रद्विजत्वं मे शूद्राचाररतः सदा ॥ ६५ ॥

शूद्रायां बहवः पुत्रा उत्पन्ना मेऽजितात्मनः ।
ततश्चौरैश्च सङ्गम्य चौरोऽहमभवं पुरा ॥ ६६ ॥

धनुर्बाणधरो नित्यं जीवानामन्तकोपमः ।
एकदा मुनयः सप्त दृष्टा महति कानने ॥ ६७ ॥

साक्षान्मया प्रकाशन्तो ज्वलनार्कसमप्रभाः ।
तानन्वधावं लोभेन तेषां सर्वपरिच्छदान् ॥ ६८ ॥

ग्रहीतुकामस्तत्राहं तिष्ठ तिष्ठेति चाब्रवम् ।
दृष्ट्वा मां मुनयोऽपृच्छन्किमायासि द्विजाधम ॥ ६९ ॥

अहं तानब्रवं किञ्चिदादातुं मुनिसत्तमाः ।
पुत्रदारादयः सन्ति बहवो मे बुभुक्षिताः ॥ ७० ॥

तेषा संरक्षणार्थाय चरामि गिरिकानने ।
ततो मामूचुरव्यग्राः पृच्छ गत्वा कुटुम्बकम् ॥ ७१ ॥

यो यो मया प्रतिदिनं क्रियते पापसञ्चयः ।
यूयं तद्भागिनः किं वा नेति वेति पृथक्पृथक् ॥ ७२ ॥

आणि जो स्वतः सांसारिक धर्मापासून संपूर्णपणे मुक्त आहे, त्याचे मन हे तुमचे राहण्यासाठीचे घर आहे. (६०-६१)

चिद्घन, सत्यस्वरूप, अनंत, एकमेवाद्वितीय, लेपरहित, सर्व व्यापक आणि आपलेसे करण्याजोगे, अशा तुम्हा परमेश्वराला जे सर्वांच्या अंतःकरणामध्ये विराजमान असले आहेत असे पाहतात, त्यांच्या हृदयकमलात, हे रामा, तुम्ही सीतेसह निवास करा. (६२)

निरंतर अभ्यास केल्याने ज्यांनी आपले चित्त तुमच्यामध्ये स्थिर केले आहे, जे तुमच्या चरणसेवेत पूर्णपणे रत आहेत, तुमच्या नामाच्या संकीर्तनाने ज्यांचे पाप नष्ट होऊन गेले आहे, त्यांच्या हृदयकमळात, हे रामा, सीतेसह तुमचे निवास-स्थान आहे. (६३)

ज्याच्या प्रभावामुळे, हे रामा, मी ब्रह्मर्षि-पद प्राप्त करून घेतले आहे, त्या तुमच्या नामाचा महिमा कोण व कसा वर्णन करू शकेल ? (६४)

फार पूर्वी मी किरातलोकांमध्ये राहात होतो व त्या किरातांकडूनच मी वाढविला गेलो. मी नेहमी शूद्रांच्या आचारातच रत होतो. माझे द्विजत्व हे केवळ जन्मानेच होते. (६५)

इंद्रियांवर नियंत्रण नसणाऱ्या अशा मला एका शूद्र स्त्रीपासून पुष्कळ पुत्र उत्पन्न झाले होते. त्या वेळी चोरांच्या संगतीत राहिल्याने मी पूर्वी स्वतःही चोर बनलो होतो.(६६)

जीवांचा अंत करणाऱ्या यमाप्रमाणे असणारा मी नेहमी धनुष्य बाण जवळ बाळगीत असे. अग्नी व सूर्याप्रमाणे तेज असणारे आणि प्रकाशमान असणारे असे साक्षात सप्त ऋषी एकदा मला मोठ्या घोर वनात दिसले. त्यांच्या जवळची वस्त्रे इत्यादी सर्व सामग्री हिरावून घेण्याच्या लोभामुळे मी त्यांच्या मागे धावलो आणि 'थांबा, थांबा' असे ओरडलो. तेव्हा मला पाहून मुनींनी विचारले, 'अरे अधम द्विजा, तू येथे का आला आहेस ?' (६७-६९)

तेव्हा मी त्यांना म्हटले, "हे मुनिश्रेष्ठांनो, मला पुष्कळ पुत्र, पत्नी इत्यादी आहेत. ते भुकेलेले आहेत. त्यांच्यासाठी तुमच्याकडून काही तरी लुबाडून घेण्यास मी आलो आहे. (७०)

त्या पुत्र इत्यादींचे पालन-पोषण करण्यासाठी मी पर्वतावर आणि अरण्यात फिरत असतो." तेव्हा ते मला निर्भयपणे म्हणाले, "तू तुझ्या कुटुंबाकडे जा आणि प्रत्येकाला वेगवेगळे विचार की 'दररोज मी जो पापाचा संचय करतो, त्याचा काही भाग तुम्ही घेणार आहात की नाही.?' (७१-७२)

वयं स्थास्यामहे तावदागमिष्यसि निश्चयः ।
तथेत्युक्त्वा गृहं गत्वा मुनिभिर्यदुदीरितम् ॥ ७३ ॥

अपृच्छं पुत्रदारादींस्तैरुक्तोऽहं रघूत्तम ।
पापं तवैव तत्सर्वं वयं तु फलभागिनः ॥ ७४ ॥

तच्छ्रुत्वा जातनिर्वेदो विचार्य पुनरागमम् ।
मुनयो यत्र तिष्ठन्ति करुणापूर्णमानसाः ॥ ७५ ॥

मुनीनां दर्शनादेव शुद्धान्तःकरणोऽभवम् ।
धनुरादीन्परित्यज्य दण्डवत्पतितोऽस्म्यहम् ॥ ७६ ॥

रक्षध्वं मां मुनिश्रेष्ठा गच्छन्तं निरयार्णवम् ।
इत्यग्रे पतितं दृष्ट्वा मामूचुर्मुनिसत्तमाः ॥ ७७ ॥

उत्तिष्ठोत्तिष्ठ भद्रं ते सफलः सत्समागमः ।
उपदेक्ष्यामहे तुभ्यं किञ्चित्तेनैव मोक्ष्यसे ।
परस्परं समालोच्य दुर्वृत्तोऽयं द्विजाधमः ॥ ७८ ॥

उपेक्ष्य एव सद्वृत्तैस्तथापि शरणं गतः ।
रक्षणीयः प्रयत्नेन मोक्षमार्गोपदेशतः ॥ ७९ ॥

इत्युक्त्वा राम ते नाम व्यत्यस्ताक्षरपूर्वकम् ।
एकाग्रमनसात्रैव मरेति जप सर्वदा ॥ ८० ॥

आगच्छामः पुनर्यावत्तावदुक्तं सदा जप ।
इत्युक्त्वा प्रययुः सर्वे मुनयो दिव्यदर्शनाः ॥ ८१ ॥

अहं यथोपदिष्टं तैस्तथाकरवमञ्जसा ।
जपन्नेकाग्रमनसा बाह्यं विस्मृतवानहम् ॥ ८२ ॥

एवं बहुतिथे काले गते निश्चलरूपिणः ।
सर्वसङ्गविहीनस्य वल्मीकोऽभून्ममोपरि ॥ ८३ ॥

ततो युगसहस्रान्ते ऋषयः पुनरागमन् ।
मामूचुर्निष्क्रमस्वेति तच्छ्रुत्वा तूर्णमुत्थितः ॥ ८४ ॥

तू परत येईपर्यंत आम्ही निश्चितपणे येथेच थांबू." 'ठीक आहे' असे म्हणून मी घरी गेलो आणि मुनींनी जे सांगितले होते ते मी माझे पुत्र, पत्नी इत्यादींना विचारले. तेव्हा, हे रघूतमा, ते मला म्हणाले, "ते सर्व पाप तुम्हीच भोगा. (धनाचे) फळ मात्र आम्ही भोगू." (७३-७४)

ते ऐकून मला वैराग्य आले. आणि मग मी विचार करीत, करूणेने मन पूर्ण भरलेले मुनी जेथे उभे होते तेथे पुनः परत आलो. (७५)

त्या वेळी त्या मुनींच्या दर्शनानेच माझे अंतःकरण शुद्ध झाले. मी धनुष्य इत्यादी फेकून दिले आणि त्या मुनींपुढे साष्टांग नमस्कार घातला. (७६)

मी त्यांना म्हणालो "हे मुनिश्रेष्ठांनो, नरकरूप सागराकडे जाणाऱ्या माझे रक्षण करा." तेव्हा त्यांच्यापुढे पडलेल्या मला ते श्रेष्ठ मुनी म्हणाले. (७७)

"ऊठ, ऊठ. तुझे कल्याण होवो. तुझा सत्समागम सफल झाला आहे. आम्ही तुला थोडासा उपदेश देतो. त्यामुळेच तू कर्माच्या बंधनातून मुक्त होशील." त्यानंतर त्यांनी परस्परांमध्ये विचार करून म्हटले " हा अधम ब्राह्मण दुराचारी असल्यामुळे सज्जनांनी याची उपेक्षाच केली पाहिजे. पण तो आपणास शरण आला आहे. म्हणून त्याला मोक्षमार्गाचा उपदेश करून त्याचे अवश्य रक्षण करावयास हवे." (७८-७९)

असे बोलून, हे रामा, तुमच्या नावातील अक्षरे उलटी करून ते मला म्हणाले, 'येथेच राहून तू एकाग्रचित्ताने 'मरा' असा सतत जप कर. (८०)

आम्ही पुनः परत येईपर्यंत तू आम्ही सांगितलेल्या नावाचा सतत जप कर.' असे सांगून दिव्य दर्शन असणारे ते सर्व मुनी तेथून निघून गेले. (८१)

त्या वेळी त्यांनी ज्या प्रमाणे सांगितले होते त्या प्रमाणे मी सरळ भावाने करीत राहिलो. अशा प्रकारे एकाग्र मनाने जप करता करता मी बाह्य जग विसरून गेलो. (८२)

अशा प्रकारे पुष्कळ काळ व्यतीत झाला असता, सर्व संगाने रहित आणि निश्चल स्वरूपात राहिल्यामुळे माझ्या अंगावर एक वारूळ तयार झाले. (८३)

त्यानंतर एक हजार युगांच्या शेवटी ते ऋषी पुनः तेथे परत आले. ते मला म्हणाले "तू वारुळातून बाहेर ये." ते शब्द ऐकून मी झट्दिशी उठून उभा राहिलो. (८४)

वल्मीकान्निर्गतश्चाहं नीहारादिव भास्करः ।
मामप्याहुर्मुनिगणा वाल्मीकिस्त्वं मुनीश्वर ॥ ८५ ॥

ज्या प्रमाणे धुक्यातून सूर्य बाहेर येतो, त्या प्रमाणे मी त्या वारुळातून बाहेर आलो. तेव्हा ते मुनी मला म्हणाले, "हे मुनिवर, तू वाल्मीकी आहेस. (८५)

वल्मीकात्सम्भवो यस्माद् द्वितीयं जन्म तेऽभवत् ।
इत्युक्त्वा ते ययुर्दिव्यगतिं रघुकुलोत्तम ॥ ८६ ॥

आत्ता तू वारुळातून जन्मला आहेस. म्हणून हा तुझा दुसरा जन्म झाला आहे" असे सांगून हे रघुकुलश्रेष्ठा, ते मुनी दिव्यलोकी गेले. (८६)

अहं ते राम नाम्नश्च प्रभावादीदृशोऽभवम् ।
अद्य साक्षात्प्रपश्यामि ससीतं लक्ष्मणेन च ॥ ८७ ॥

रामं राजीवपत्राक्षं त्वां मुक्तो नात्र संशयः ।
आगच्छ राम भद्रं ते स्थलं वै दर्शयाम्यहम् ॥ ८८ ॥

श्रीरामा, तुमच्या नामाच्या सामर्थ्याने मी असा झालो आहे. लक्ष्मण व सीता यांच्यासह, कमल-पत्राप्रमाणे नयन असणाऱ्या अशा श्रीरामा, तुम्हांला मी आज साक्षात पाहात आहे. मी निश्चितपणे मुक्त झालो यात संशय नाही. हे श्रीरामा, तुमचे मंगल होवो. या. मी तुम्हांला राहण्यास योग्य असे स्थळ दाखवितो." (८७-८८)

एवमुक्त्वा मुनिः श्रीमाँल्लक्ष्मणेन समन्वितः ।
शिष्यैः परिवृतो गत्वा मध्ये पर्वतगङ्गयोः ॥ ८९ ॥

तत्र शालां सुविस्तीर्णां कारयामास वासभूः ।
प्राक्पश्चिमं दक्षिणोदक् शोभनं मन्दिरद्वयम् ॥ ९० ॥

असे बोलून शिष्यांबरोबर ते श्रीमान मुनिवर लक्ष्मणाला तसेच राम व सीतेला बरोबर घेऊन, पर्वत आणि गंगा नदी यांच्यामधील प्रदेशात गेले. ते स्थान त्यांनी रामांना दाखविले. मग सर्व जगाचे निवास-स्थान असलेल्या रामांनी तेथे एक अतिशय विस्तीर्ण पर्ण-शाला तसेच एक पूर्वपश्चिम आणि एक दक्षिणोत्तर अशी दोन सुंदर घरे तयार करवून घेतली. (८९-९०)

जानक्या सहितो रामो लक्ष्मणेन समन्वितः ।
तत्र ते देवसदृशा ह्यवसन् भवनोत्तमे ॥ ९१ ॥

जानकी आणि लक्ष्मण यांच्यासह, देवसदृश असणारे राम तेथे त्या उत्तम भवनात राहू लागले. (९१)

वाल्मीकिना तत्र सुपूजितोऽयं
रामः ससीतः सह लक्ष्मणेन ।
दैवैर्मुनीन्द्रैः सहितो मुदास्ते
स्वर्गे यथा देवपतिः सशच्या ॥ ९२ ॥

देवांचा राजा इंद्र ज्या प्रमाणे देव आणि शचीसह स्वर्गात आनंदाने राहातो, त्या प्रमाणे वाल्मीकीकडून चांगल्या प्रकारे सन्मानित झालेले श्रीराम हे सीता व लक्ष्मण यांच्यासमवेत आणि मुनिश्रेष्ठांसह तेथे आनंदाने राहू लागले. (९२)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकाण्डे षष्ठः सर्गः ॥६ ॥

# सप्तम सर्ग

**सुमंत्राचे प्रत्यागमन, राजा दशरथाचे स्वर्गगमन, तसेच मातुलगृहातून भरताचे आगमन आणि वसिष्ठांच्या आदेशाने त्याने पित्याचे अंत्येष्टी संस्कार करणे.**

*श्रीमहादेव उवाच*

सुमन्त्रोऽपि तदायोध्यां दिनान्ते प्रविवेश ह ।
वस्त्रेण मुखमाच्छाद्य बाष्पाकुलितलोचनः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** - त्या वेळी इकडे संध्याकाळच्या वेळी, आपले तोंड वस्त्राने झाकून, अश्रूंनी डोळे डबडबलेल्या सुमंत्राने अयोध्येत प्रवेश केला. (१)

बहिरेव रथं स्थाप्य राजानं द्रष्टुमाययौ ।
जयशब्देन राजानं स्तुत्वा तं प्रणनाम ह ॥ २ ॥

बाहेरच रथ ठेवून राजांना भेटण्यासाठी तो अंत:पुरात गेला आणि 'जय' शब्दाच्या उच्चाराने राजांची स्तुती केली व त्यांना त्याला प्रणाम केला. (२)

ततो राजा नमन्तं तं सुमन्त्रं विह्वलोऽब्रवीत् ।
सुमन्त्र रामः कुत्रास्ते सीतया लक्ष्मणेन च ॥ ३ ॥

त्यानंतर शोकाने विव्हळ झालेले राजा दशरथ नमस्कार करणाऱ्या सुमंत्राला म्हणाले, "अरे सुमंत्रा, सीता व लक्ष्मण यांच्यासह राम कुठे आहे ? (३)

कुत्र त्यक्तस्त्वया रामः किं मां पापिनमब्रवीत् ।
सीता वा लक्ष्मणो वापि निर्दयं मां किमब्रवीत् ॥ ४ ॥

तू रामाला कुठे सोडलेस ? त्याने मज पाप्याला काय निरोप दिला आहे ? तसेच सीता व लक्ष्मण हेसुद्धा मज निर्दयाला काय म्हणाले ? (४)

हा राम हा गुणनिधे हा सीते प्रियवादिनि ।
दुःखार्णवे निमग्नं मां म्रियमाणं न पश्यसि ॥ ५ ॥

हाय रामा ! हाय गुणनिधे ! हाय प्रियवादिनी सीते ! दु:खरूपी सागरात बुडून मरणारा मी तुम्हाला दिसत नाही काय ? " (५)

विलप्यैवं चिरं राजा निमग्नो दुःखसागरे ।
एवं मन्त्री रुदन्तं तं प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् ॥ ६ ॥

दु:खसमुद्रात निमग्न असणाऱ्या राजांनी पुष्कळ वेळपर्यंत अशा प्रकारे विलाप केला. रडणाऱ्या राजांना मंत्री सुमंत्र हात जोडून बोलला. (६)

रामः सीता च सौमित्रिर्मया नीता रथेन ते ।
शृङ्गवेरपुराभ्याशे गङ्गाकूले व्यवस्थिताः ॥ ७ ॥

"महाराज, राम, सीता व लक्ष्मण यांना तुमच्या रथात बसवून मी त्यांना शृंगवेर नगराजवळ नेले; तेथे ते गंगा नदीच्या तीरावर थांबले. (७)

गुहेन किञ्चिदानीतं फलमूलादिकं च यत् ।
स्पृष्ट्वा हस्तेन सम्प्रीत्या नाग्रहीद्विससर्ज तत् ॥ ८ ॥

तेथे निषाद राजाने जी काही फळे, मुळे इत्यादी आणले होते, त्यांना रामांनी प्रीतिपूर्वक हाताने स्पर्श केला, पण ती घेतली नाहीत, ती परत केली. (८)

वटक्षीरं समानाय्य गुहेन रघुनन्दनः ।
जटामुकुटमाबद्ध्य मामाह नृपते स्वयम् ॥ ९ ॥

महाराज, त्यानंतर गुहाकडून वटवृक्षाचा चीक आणवून घेऊन, जटारूपी मुकुट श्रीरामांनी बांधला आणि ते स्वत: मला म्हणाले. (९)

सुमन्त्र ब्रूहि राजानं शोकस्तेऽस्तु न मत्कृते ।
साकेतादधिकं सौख्यं विपिने नो भविष्यति ॥ १० ॥

'हे सुमंत्रा, राजांना माझा निरोप सांग की तुम्ही माझ्यासाठी शोक करू नका. अयोध्या नगरीपेक्षा अधिक सौख्य आम्हांला येथे अरण्यात मिळेल. (१०)

मातुर्मे वन्दनं ब्रूहि शोकं त्यजतु मत्कृते ।
आश्वासयतु राजानं वृद्धं शोकपरिप्लुतम् ॥ ११ ॥

आईला माझा प्रणाम सांग. तिने माझ्यासाठी शोक करणे सोडून शोकाकुल वृद्ध राजांचे सांत्वन करावे. (११)

सीता चाश्रुपरीताक्षी मामाह नृपसत्तम ।
दुःखगद्गदया वाचा रामं किञ्चिदवेक्षती ॥ १२ ॥

त्यानंतर हे नृपश्रेष्ठा, अश्रूंनी डोळे भरलेली सीता रामांकडे किंचित पाहात दु:खाने दाटलेल्या वाणीने मला म्हणाली . (१२)

साष्टाङ्गं प्रणिपातं मे ब्रूहि श्वश्र्वोः पदाम्बुजे ।
इति प्ररुदती सीता गता किञ्चिदवाङ्मुखी ॥ १३ ॥

' कौसल्या आणि सुमित्रा या दोघी सासवांच्या चरणकमळांना माझा प्रणिपात सांग.' असे काहीसे बोलून, तोंडखाली करून, सीता रडत तेथून निघून गेली. (१३)

ततस्तेऽश्रुपरीताक्षा नावमारुरुहुस्तदा ।
यावद्गङ्गां समुत्तीर्य गतास्तावदहं स्थितः ॥१४॥

त्यानंतर त्या वेळी सजल नेत्रांनी ते तिघे नावेत चढले. ते गंगा पार करून जात होते तोपर्यंत मी तेथे थांबलो. (१४)

ततो दुःखेन महता पुनरेवाहमागतः ।
नतो रुदन्ती कौसल्या राजानमिदमब्रवीत् ॥ १५ ॥

त्यानंतर मोठ्या दुःखाने परत आलो." तेव्हा रडत रडत कौसल्या राजांना म्हणाली . (१५)

कैकेय्यै प्रियभार्यायै प्रसन्नो दत्तवान्वरम् ।
त्वं राज्यं देहि तस्यैव मत्पुत्रः किं विवासितः ॥ १६ ॥

"कैकेयी या आवडत्या भार्येला तुम्ही प्रसन्न होऊन वर दिलात. ठीक आहे. तुम्ही खुशाल तिच्या पुत्राला राज्य द्या. माझे काही म्हणणे नाही. परंतु तुम्ही माझ्या पुत्राला राज्यातून का घालवले ? (१६)

कृत्वा त्वमेव तत्सर्वमिदानीं किं नु रोदिषि ।
कौसल्यावचनं श्रुत्वा क्षते स्पृष्ट इवाग्निना ॥ १७ ॥

हे सर्व करून आता तुम्हीच का बरे रडत आहात?" कौसल्येचे हे वचन ऐकल्यावर महाराजांना अशी वेदना झाली की जणू जखमेला अग्नीचा स्पर्श झाला. (१७)

पुनः शोकाश्रुपूर्णाक्षः कौसल्यामिदमब्रवीत् ।
दुःखेन म्रियमाणं मां कि पुनर्दुःखयस्यलम् ॥ १८ ॥

तेव्हा पुनः शोकाश्रूंनी डोळे भरलेले दशरथ कौसल्येला म्हणाले, "दुःखाने मरत असताना मला तू पुनः का बरे आणखी दुःख देत आहेस ? (१८)

इदानीमेव मे प्राणा उत्क्रमिष्यन्ति निश्चयः ।
शप्तोऽहं बाल्यभावेन केनचिन्मुनिना पुरा ॥ १९ ॥

आताच माझे प्राण जाणार आहेत हे निश्चित आहे. कारण फार पूर्वी माझ्या मूर्खपणामुळे एका मुनीने मला शाप दिला होता. (१९)

पुराहं यौवने दृप्तश्चापबाणधरो निशि ।
अचरं मृगयासक्तो नद्यास्तीरे महावने ॥ २० ॥

(त्या वेळची गोष्ट अशी आहे की) पूर्वी तरुणपणी घमेंडीत मृगयेमध्ये आसक्त होऊन, धनुष्य- बाण घेऊन, रात्रीच्या वेळी मी एका घोर वनात नदीच्या तीरावर फिरत होतो. (२०)

तत्रार्धरात्रसमये मुनिः कश्चित्तृषार्दितः ।
पिपासार्दितयोः पित्रोर्जलमानेतुमुद्यतः ।
अपूरयज्जले कुम्भं तदा शब्दोऽभवन्महान् ॥ २१ ॥

तेथे मध्यरात्रीच्या वेळी तहानेने व्याकूळ झालेला मुनी तहानलेल्या आपल्या आई-बापासाठी पाणी आणण्यास आला होता. त्याने पाण्यात घागर बुडविली. तेव्हा फार मोठा आवाज झाला. (२१)

गजः पिबति पानीयमिति मत्वा महानिशि ।
बाणं धनुषि सन्धाय शब्दवेधिनमक्षिपम् ॥ २२ ॥

त्या घोर रात्री 'एखादा हत्ती पाणी पीत आहे 'असे वाटून मी एक शब्दवेधी बाण धनुष्यावर चढवून सोडला. (२२)

हा हतोऽस्मीति तत्राभूच्छब्दो मानुषसूचकः ।
कस्यापि न कृतो दोषो मया केन हतो विधे ॥ २३ ॥

तेव्हा एका माणसाचे शब्द तेथून ऐकू आले- 'हाय ! मी मेलो. हे विधे, मी कुणाचाही अपराध केलेला नाही. मग मला कुणी का मारले ? (२३)

प्रतीक्षते मां माता च पिता च जलकाङ्क्षया ।
तच्छ्रुत्वा भयसन्त्रस्तस्ततोऽहं पौरुषं वचः ॥ २४ ॥

पाण्यासाठी माता-पिता माझी वाट पाहात असतील.' त्या वेळी ते पुरुषाचे शब्द ऐकल्यावर मी भयाने अतिशय त्रस्त झालो. (२४)

शनैर्गत्वाथ तत्पार्श्वं स्वामिन् दशरथोऽस्म्यहम् ।
अजानता मया विद्धस्त्रातुमर्हसि मां मुने ॥ २५ ॥

मग सावकाश त्याचेजवळ जाऊन मी म्हटले, 'अहो, स्वामी, मी दशरथ आहे. अजाणता माझ्याकडून तुम्ही बाणाने विद्ध केला गेला आहात. हे मुने, माझे रक्षण करा.' (२५)

इत्युक्त्वा पादयोस्तस्य पतितो गद्गदाक्षरः ।
तदा मामाह स मुनिर्मा भैषीर्नृपसत्तम ॥ २६ ॥

गद्गद कंठाने असे शब्द उच्चारून मी त्यांच्या पाया पडलो. तेव्हा ते मुनिवर मला म्हणाले, 'हे नृपश्रेष्ठा, तू भिऊ नकोस. (२६)

ब्रह्महत्या स्पृशेत्त्र त्वां वैश्योऽहं तपसि स्थितः ।
पितरौ मां प्रतीक्षेते क्षुत्तृड्भ्यां परिपीडितौ ॥ २७॥

तुला ब्रह्महत्या लागणार नाही. कारण मी तपस्या करणारा एक वैश्य आहे. तहान-भुकेने अतिशय व्याकूळ झालेले माझे आईबाप माझी वाट पाहात आहेत. (२७)

तयोस्त्वमुदकं देहि शीघ्रमेवाविचारयन् ।
न चेत्त्वां भस्मसात्कुर्यात्पिता मे यदि कुप्यति ॥ २८॥

तेव्हा कसलाही विचार न करता तू त्यांना चट्दिशी पाणी नेऊन दे. तसे झाले नाही तर मात्र माझा पिता रागावेल व तो तुला भस्मसात करून टाकील. (२८)

जलं दत्त्वा तु तौ नत्वा कृतं सर्वं निवेदय ।
शल्यमुद्धर मे देहात्प्राणांस्त्यक्ष्यामि पीडितः ॥ २९॥

त्यांना पाणी देऊन आणि नमस्कार करून, तू स्वतः केलेले सर्व कृत्य त्यांना सांगून टाक. मला अत्यंत पीडा होत आहे. तेव्हा तू माझ्या शरीरातून बाण काढून टाक. मी प्राण सोडतो.' (२९)

इत्युक्तो मुनिना शीघ्रं बाणमुत्पाट्य देहतः ।
सजलं कलशं धृत्वा गतोऽहं यत्र दम्पती ॥ ३०॥

मुनींनी असे सांगितल्यावर मी त्यांच्या शरीरातून झट्दिशी बाण उपसून काढला आणि मग पाण्याने भरलेला घडा घेऊन, जेथे ते जोडपे होते तेथे मी गेलो. (३०)

अतिवृद्धावन्धदृशौ क्षुत्पिपासार्दितौ निशि ।
नायाति सलिलं गृह्य पुत्रः किं वात्र कारणम् ॥ ३१॥

अनन्यगतिकौ वृद्धौ शोच्यौ तृट्परिपीडितौ ।
आवामुपेक्षते किं वा भक्तिमानावयोः सुतः ॥ ३२॥

इति चिन्ताव्याकुलौ तौ मत्पादन्यासजं ध्वनिम् ।
श्रुत्वा प्राह पिता पुत्र किं विलम्बः कृतस्त्वया ॥ ३३॥

त्या वेळी ते दोघे चिंतेने व्याकूळ झाले होते. 'आम्ही दोघे अत्यंत वृद्ध आहोत आणि दोन्ही डोळ्यांनी आंधळे आहोत. आम्ही तहान-भुकेने त्रस्त आहोत. या रात्रीच्या वेळी आमचा पुत्र पाणी घेऊन अजुनी आलेला नाही. याचे काय कारण असावे बरे ? पुत्राखेरीज आम्हांला दुसरा कोणताही आधार नाही. आम्ही दोघे वृद्ध, शोकाकुल आणि तहानेने फार त्रस्त झालेले आहोत. आमच्यावर भक्ती असणारा आमचा पुत्र आमची उपेक्षा करीत आहे, याचे काय कारण असावे बरे ?' ते अशी चिंता करीत असतानाच, त्यांनी माझ्या पावलांचा आवाज ऐकला. तो ऐकून पिता म्हणाला, 'बाळा, या वेळी तू का उशीर केलास बरे ? (३१-३३)

देह्यावयोः सुपानीयं पिब त्वमपि पुत्रक ।
इत्येवं लपतोर्भीत्या सकाशमगमं शनैः ॥ ३४॥

आम्हाला पाणी दे आणि बाळा, तूसुद्धा थोडे पाणी पी.' अशा प्रकारे ते दोघे बोलत असताना, मी भीतभीत हळूहळू त्यांच्याजवळ गेलो. (३४)

पादयोः प्रणिपत्याहमब्रवं विनयान्वितः ।
नाहं पुत्रस्त्वयोध्याया राजा दशरथोऽस्म्यहम् ॥ ३५॥

त्यांच्या चरणांना प्रणाम करून मी अतिशय विनयाने त्यांना म्हणालो, 'मी तुमचा पुत्र नव्हे. तर मी अयोध्येचा राजा दशरथ आहे. (३५).

पापोऽहं मृगयासक्तो रात्रौ मृगविहिंसकः ।
जलावताराद्दूरेऽहं स्थित्वा जलगतं ध्वनिम् ॥ ३६॥

श्रुत्वाहं शब्दवेधित्वादेकं बाणमथात्यजम् ।
हतोऽस्मीति ध्वनिं श्रुत्वा भयात्तत्राहमागतः ॥ ३७॥

मी पापी आहे. शिकार करण्याच्या नादात रात्रीच्या वेळी पशूंचा वध करीत मी फिरत होतो. पाण्याच्या घाटापासून दूर उभा होतो. त्या वेळी पाण्यात झालेला शब्द ऐकून मी तिकडे एक शब्दवेधी बाण सोडला. तेव्हा 'मी मेलो !' असे शब्द ऐकल्यावर मी भयभीत होऊन गेलो. (३६-३७)

जटा विकीर्य पतितं दृष्ट्वाहं मुनिदारकम् ।
भीतो गृहीत्वा तत्पादौ रक्ष रक्षेति चाब्रवम् ॥ ३८॥

तेथे गेल्यावर जटा सुटलेल्या अवस्थेत पडलेला मुनिकुमार पाहून मी भ्यालो आणि त्याचे पाय पकडून, 'रक्षण कर, रक्षण कर' असे त्याला म्हणालो. (३८)

मा भैषीरिति मां प्राह ब्रह्महत्याभयं न ते ।
मत्पित्रोः सलिलं दत्त्वा नत्वा प्रार्थय जीवितम् ॥ ३९ ॥

तेव्हा तो मला म्हणाला, 'भिऊ नकोस. तुला ब्रह्महत्येचे भय नाही. माझ्या माता-पित्यांना पाणी देऊन तू त्यांना प्रणाम कर आणि जीवन-दान देण्यासाठी त्यांची प्रार्थना कर.' (३९)

इत्युक्तो मुनिना तेन ह्यागतो मुनिहिंसकः ।
रक्षेतां मां दयायुक्तौ युवां हि शरणागतम् ॥ ४० ॥

मुनिकुमाराने मला असे सांगितल्यावर, मुनीची हिंसा करणारा मी तुम्हांला शरण आलो आहे. तुम्ही दोघांनी दयायुक्त होऊन माझे रक्षण करा.' (४०)

इति श्रुत्वा तु दुःखार्तौ विलप्य बहु शोच्य तम् ।
पतितौ नौ सुतो यत्र नय तत्राविलम्बयन् ॥ ४१ ॥

हे ऐकल्यावर दुःखाने पीडित झालेल्या त्या दोघांनी पुत्रासाठी फार शोक केला आणि रडत रडत ते जमिनीवर पडले आणि म्हणू लागले 'आमचा पुत्र जेथे पडला आहे तेथे आम्हांला ताबडतोब ने.' (४१)

ततो नीतौ सुतो यत्र मया तौ वृद्धदम्पती ।
स्पृष्ट्वा सुतं तौ हस्ताभ्यां बहुशोऽथ विलेपतुः ॥ ४२ ॥

मग त्यांचा पुत्र जेथे होता तेथे मी त्या वृद्ध दांपत्याला नेले. आपल्या दोन्ही हातांनी पुत्राला स्पर्श करून ते दोघे फारच विलाप करू लागले . (४२)

हाहेति क्रन्दमानौ तौ पुत्रपुत्रेत्यवोचताम् ।
जलं देहीति पुत्रेति किमर्थं न ददास्यलम् ॥ ४३ ॥

'हा ! हा ! अरे मुला ! अरे पोरा !' अशा प्रकारे आक्रंदन करीत ते बोलू लागले 'मुला, आम्हांला पाणी दे. आम्हांला भरपूर पाणी तू का बरे देत नाहीस ?' (४३)

ततो मामूचतुः शीघ्रं चितिं रचय भूपते ।
मया तदैव रचिता चितिस्तत्र निवेशिताः ।
त्रयस्तत्राग्निरुत्सृष्टो दग्धास्ते त्रिदिवं ययुः ॥ ४४ ॥

नंतर ते दोघे मला म्हणाले, 'हे राजा, ताबडतोब एक चिता तयार कर.' त्या वेळी लगेच मी एक चिता रचली. मग त्या तिघांनाही चितेवर ठेवले. चितेला अग्नी दिला. जळून ते स्वर्गलोकी गेले. (४४)

तत्र वृद्धः पिता प्राह त्वमप्येवं भविष्यसि ।
पुत्रशोकेन मरणं प्राप्स्यसे वचनान्मम ॥ ४५ ॥

मरणापूर्वी तो वृद्ध पिता मला म्हणाला, 'तुझ्या बाबतीतसुद्धा असेच होईल. माझ्या वचनानुसार तूसुद्धा पुत्रशोकाने मरण पावशील. ' (४५)

स इदानीं मम प्राप्तः शापकालोऽनिवारितः ।
इत्युक्त्वा विललापाथ राजा शोकसमाकुलः ॥ ४६ ॥

तो अनिवार्य असा शापकाल आता माझ्या बाबतीत प्राप्त झाला आहे." असे बोलून नंतर अत्यंत शोकाकुल झालेले राजा दशरथ विलाप करू लागले. (४६)

हा राम पुत्र हा सीते हा लक्ष्मण गुणाकर ।
त्वद्वियोगादहं प्राप्तो मृत्युं कैकेयिसम्भवम् ॥ ४७ ॥

"हाय पुत्रा रामा ! हाय सीते ! हाय गुणांची खाण असणाऱ्या लक्ष्मणा ! तुमच्या वियोगामुळे कैकेयीने निर्माण केलेल्या मृत्यूप्रत मी आता पोहोचलो आहे." (४७)

वदन्नेवं दशरथः प्राणांस्त्यक्त्वा दिवं गतः ।
कौसल्या च सुमित्रा च तथान्या राजयोषितः ॥ ४८ ॥

चुक्रुशुश्च विलेपुश्च उरस्ताडनपूर्वकम् ।
वसिष्ठः प्रययौ तत्र प्रातर्मन्त्रिभिरावृतः ॥ ४९ ॥

असे बोलत असतानाच प्राणत्याग करून महाराज दशरथ स्वर्गलोकी गेले. तेव्हा कौसल्या, सुमित्रा आणि इतर राजस्त्रिया छाती बडवून घेत आक्रोश आणि विलाप करू लागल्या. सकाळ होताच मंत्र्यांसह मुनिवर वसिष्ठ तेथे गेले. (४८-४९)

तैलद्रोण्यां दशरथं क्षिप्त्वा दूतानथाब्रवीत् ।
गच्छत त्वरितं साश्वा युधाजिन्नगरं प्रति ॥ ५० ॥

नंतर तेलाने भरलेल्या एका डोणीत दशरथ महाराजांचे शव ठेवून, वसिष्ठ दूतांना म्हणाले, 'घोड्यांवर बसून तुम्ही ताबडतोब युधाजिताच्या राजधानीला जा. (५०)

तत्रास्ते भरतः श्रीमाञ्छत्रुघ्नसहितः प्रभुः ।
उच्यतां भरतः शीघ्रमागच्छेति ममाज्ञया ॥ ५१ ॥

अयोध्यां प्रति राजानं कैकेयीं चापि पश्यतु ।
इत्युक्तास्त्वरितं दूता गत्वा भरतमातुलम् ॥ ५२ ॥

युधाजितं प्रणम्योचुर्भरतं सानुजं प्रति ।
वसिष्ठस्त्वाब्रवीद्राजन् भरतः सानुजः प्रभुः ॥ ५३ ॥

शीघ्रमागच्छतु पुरीमयोध्यामविचारयन् ।
इत्याज्ञप्तोऽथ भरतस्त्वरितं भयविह्वलः ॥ ५४ ॥

आययौ गुरुणादिष्टः सह दूतैस्तु सानुजः ।
राज्ञो वा राघवस्यापि दुःखं किञ्चिदुपस्थितम् ॥ ५५ ॥

इति चिन्तापरो मार्गे चिन्तयन्नगरं ययौ ।
नगरं भ्रष्टलक्ष्मीकं जनसम्बाधवर्जितम् ॥ ५६ ॥

उत्सवैश्च परित्यक्तं दृष्ट्वा चिन्तापरोऽभवत् ।
प्रविश्य राजभवनं राजलक्ष्मीविवर्जितम् ॥ ५७ ॥

अपश्यत्कैकयीं तत्र एकामेवासने स्थिताम् ।
ननाम शिरसा पादौ मातुर्भक्तिसमन्वितः ॥ ५८ ॥

आगतं भरतं दृष्ट्वा कैकेयी प्रेमसम्भ्रमात् ।
उत्थायालिङ्ग्य रभसा स्वाङ्कमारोप्य संस्थिता ॥ ५९ ॥

मूर्ध्न्यवघ्राय पप्रच्छ कुशलं स्वकुलस्य सा ।
पिता मे कुशली भ्राता माता च शुभलक्षणा ॥ ६० ॥

दिष्ट्या त्वमद्य कुशली मया दृष्टोऽसि पुत्रक ।
इति पृष्टः स भरतो मात्रा चिन्ताकुलेन्द्रियः ॥ ६१ ॥

दूयमानेन मनसा मातरं समपृच्छत ।
मातः पिता मे कुत्रास्ते एका त्वमिह संस्थिता ॥ ६२ ॥

त्वया विना न मे तातः कदाचिद्रहसि स्थितः ।
इदानीं दृश्यते नैव कुत्र तिष्ठति मे वद ॥ ६३ ॥

अदृष्ट्वा पितरं मेऽद्य भयं दुःखं च जायते ।
अथाह कैकयी पुत्रं किं दुःखेन तवानघ ॥ ६४ ॥

तेथे शत्रुघ्नासहित श्रीमान प्रभू भरत आहे. माझी आज्ञा म्हणून तुम्ही भरताला सांगा- 'अयोध्येला शीघ्र निघून ये आणि येथे आल्यावर राजा दशरथ व कैकेयी यांचे दर्शन घे.' वसिष्ठांनी दूतांना असे सांगितल्यावर ते दूत त्वरित तिकडे गेले आणि भरताचा मामा युधाजित आणि शत्रुघ्न या धाकट्या भावासह भरताला प्रणाम करून ते युधाजिताला म्हणाले-' हे राजन, वसिष्ठांनी तुम्हांला सांगितले आहे की शत्रुघ्नासह महाराज भरताने कोणताही विचार न करता ताबडतोब अयोध्या नगरीला यावे.' तेव्हा अशी आज्ञा ऐकून लगेच भरत भीतीने विव्हल झाला आणि गुरूंच्या आदेशानुसार, लहान भाऊ शत्रुघ्न आणि दूत यांच्यासह तो निघाला. "महाराज दशरथ अथवा रघुनाथ यांच्यावर कोणते तरी घोर संकट आले असावे का? "असा वाटेत मनातल्या मनात विचार करीत, तो अयोध्या नगरीत पोचला. ती नगरी कळाहीन वाटत होती. लोकांची वर्दळ नाही, तसेच उत्सव दिसत नाहीत, असे पाहून भरत चिंताक्रांत झाला. राजलक्ष्मीने रहित अशा राजवाड्यात प्रवेश केल्यावर तेथे त्याला दिसले की एकाकी कैकेयी एका आसनावर बसलेली आहे. भक्तीने युक्त होऊन त्याने मातेच्या चरणांवर मस्तक ठेवून तिला प्रणाम केला. (५१-५८)

भरत आला आहे, हे पाहून कैकेयीने मोठ्या प्रेमाने तत्काळ उठून त्याला आलिंगन दिले आणि त्याला मांडीवर घेऊन ती बसली. (५९)

नंतर त्याच्या मस्तकाचे अवघ्राण करून, तिने आपल्या स्वतःच्या कुळाचे कुशल त्याला विचारले, "माझी सुलक्षणा आई, बाबा व भाऊ सर्व खुशाल आहेत ना? (६०)

हे बाळा, तुला आज खुशाल पाहून मला बरे वाटले." मातेने असे म्हटल्यावर, काळजीने व्याकूळ झालेल्या भरताने दुःखी मनाने तिला विचारले, "आई, माझे तात कुठे आहेत? कारण तू एकटीच येथे बसलेली आहेस. (६१-६२)

तुझ्याविना तर माझे तात एकांतात कधीही राहात नसतात. परंतु आता मात्र ते कुठे दिसत नाहीत. ते कुठे आहेत, ते मला सांग. (६३)

पिताजी न दिसल्यामुळे आज मला दुःख होत आहे आणि भयही वाटत आहे, " तेव्हा कैकेयी पुत्राला म्हणाली, "हे पुण्यशील भरता, तुला दुःख का होत आहे ? (६४)

या गतिर्धर्मशीलानामश्वमेधादियाजिनाम् ।
तां गतिं गतवानद्य पिता ते पितृवत्सल ॥ ६५ ॥

तच्छ्रुत्वा निपपातोर्व्यां भरत: शोकविह्वल: ।
हा तात क्व गतोऽसि त्वं त्यक्त्वा मां वृजिनार्णवे ॥ ६६ ॥

असमर्प्यैव रामाय राज्ञे मां क्व गतोऽसि भो: ।
इति विलपितं पुत्रं पतितं मुक्तमूर्धजम् ॥ ६७ ॥

उत्थाप्यामृज्य नयने कैकेयी पुत्रमब्रवीत् ।
समाश्वसिहि भद्रं ते सर्वं सम्पादितं मया ॥ ६८ ॥

तामाह भरतस्तातो म्रियमाण: किमब्रवीत् ।
तमाह कैकयी देवी भरतं भयवर्जिता ॥ ६९ ॥

हा राम राम सीतेति लक्ष्मणेति पुन: पुन: ।
विलपन्नेव सुचिरं देहं त्यक्त्वा दिवं ययौ ॥ ७० ॥

तामाह भरतो हेऽम्ब राम: सन्निहितो न किम् ।
तदानीं लक्ष्मणो वापि सीता वा कुत्र ते गता: ॥ ७१ ॥

*कैकेय्युवाच*

रामस्य यौवराज्यार्थं पित्रा ते सम्भ्रम: कृत: ।
तव राज्यप्रदानाय तदाहं विघ्नमाचरम् ॥ ७२ ॥

राज्ञा दत्तं हि मे पूर्वं वरदेन वरद्वयम् ।
याचितं तदिदानीं मे तयोरेकेन तेऽखिलम् ॥ ७३ ॥

राज्यं रामस्य चैकेन वनवासो मुनिव्रतम् ।
तत: सत्यपरो राजा राज्यं दत्त्वा तवैव हि ॥ ७४ ॥

रामं सम्प्रेषयामास वनमेव पिता तव ।
सीताप्यनुगता रामं पातिव्रत्यमुपाश्रिता ॥ ७५ ॥

सौभ्रात्रं दर्शयन्राममनुयातोऽपि लक्ष्मण: ।
वनं गतेषु सर्वेषु राजा तानेव चिन्तयन् ॥ ७६ ॥

प्रलपन् राम रामेति ममार नृपसत्तम: ।
इति मातुर्वच: श्रुत्वा वज्राहत इव द्रुम: ॥ ७७ ॥

पपात भूमौ नि:संज्ञस्तं दृष्ट्वा दु:खिता तदा ।
कैकेयी पुनरप्याह वत्स शोकेन किं तव ॥ ७८ ॥

हे पितृवत्सल भरता, अश्वमेध इत्यादी यज्ञ करणाऱ्या धर्मपरायण पुरुषांची जी गत होते, तीच गत आज तुझ्या पित्याचीसुद्धा झाली आहे." (६५)

ते ऐकताच शोकाने विव्हल झालेला भरत धरणीवर पडला आणि म्हणू लागला, "अहो बाबा, मला दु:खसागरात लोटून तुम्ही कुठे गेलात ? अहो, महाराज, श्रीरामांकडे मला सोपविल्याशिवाय तुम्ही कुठे गेलात ?" विस्कटलेल्या केसांच्या स्थितीत भरत धरणीवर पडून विलाप करू लागला. त्याला उठवून, त्याचे डोळे पुसून, कैकेयी म्हणाली, "मुला, शांत हो, तुझे कल्याण असो. तुझ्यासाठी पुत्राला आवश्यक ते सर्व मी प्राप्त करून घेतले आहे." (६६-६८)

तेव्हा भरताने तिला विचारले, "मरताना पिताजी काय म्हणाले ? " तेव्हा राणी कैकेयीने निर्भयपणे भरताला सांगितले. "हा राम ! हा राम ! हा सीते ! हा लक्ष्मण !' अशा प्रकारे पुष्कळ काळपर्यंत वारंवार विलाप करीत, देहाचा त्याग करून तुझे वडील स्वर्गात गेले."(६९-७०)

तेव्हा भरताने तिला विचारले, "अग आई, त्या वेळी श्रीराम जवळ नव्हता काय ? त्या वेळी लक्ष्मण तसेच सीता हे कुठे गेले होते ?" (७१)

**कैकेयी म्हणाली**– "तुझ्या पित्याने रामाच्या यौवराज्याच्या अभिषेकासाठी तयारी केली होती. तेव्हा त्यांनी तुला राज्य द्यावे, म्हणून मी त्यात विघ्न निर्माण केले. (७२)

पूर्वी राजांनी मला दोन वर दिले होते. आता त्यांतील एका वराने मी तुझ्यासाठी संपूर्ण राज्य मागून घेतले आणि दुसऱ्या वराने रामासाठी मुनिव्रतपूर्वक वनवास मागून घेतला. तेव्हा सत्यपरायण अशा महाराज दशरथांनी तुला राज्य दिले आणि रामाला वनवासात पाठविले. पातिव्रत्याचे पालन करीत सीता हीसुद्धा रामाच्या मागोमाग वनात गेली. (७३-७५)

त्या वेळी भ्रातृप्रेमामुळे लक्ष्मण हासुद्धा रामाच्या मागोमाग वनात गेला. ते सगळे वनात गेल्यावर, त्यांचेच स्मरण करीत आणि 'राम ! राम !' असे पुटपुटत महाराजही मृत्यू पावले." आईचे हे वचन ऐकल्यावर वज्राचा तडाखा बसलेल्या वृक्षाप्रमाणे भरत बेशुद्ध होऊन धरणीवर पडला. तेव्हा त्याला पाहून दु:खी झालेली कैकेयी पुन्हा त्याला म्हणाली, " बाळा, तू कशासाठी शोक करीत आहेस ? (७६-७८)

राज्ये महति सम्प्राप्ते दुःखस्यावसरः कुतः ।
इति ब्रुवन्तीमालोक्य मातरं प्रदहन्निव ॥ ७९ ॥

एवढे मोठे राज्य प्राप्त झाल्यावर दुःख करण्याचे कारण काय?" असे बोलणाऱ्या आईकडे पाहून रागाने जणू जाळीत भरत म्हणाला, "अग पापिणी, मी तुझ्याशी बोलणेसुद्धा योग्य नाही. अग भयंकर स्त्रिये, तू आपल्या पतीची हत्या केली आहेस. अग पापिणी, तुझ्या पोटी जन्मलेला मीसुद्धा आता पापी झालो आहे. मी आता अग्नीत प्रवेश करतो अथवा विष खातो. (७९-८०)

असम्भाष्यासि पापे मे घोरे त्वं भर्तृघातिनी ।
पापे त्वद्गर्भजातोऽहं पापवानस्मि साम्प्रतम् ।
अहमग्निं प्रवेक्ष्यामि विषं वा भक्षयाम्यहम् ॥ ८० ॥

खड्गेन वाथ चात्मानं हत्वा यामि यमक्षयम् ।
भर्तृघातिनि दुष्टे त्वं कुम्भीपाकं गमिष्यसि ॥ ८१ ॥

अथवा तरवारीने स्वत:ला ठार करून मी यमसदनास जातो. नवऱ्याला मारणाऱ्या हे दुष्टे, तू कुंभीपाक नरकात जाशील." (८१)

इति निर्भर्त्स्य कैकेयीं कौसल्याभवनं ययौ ।
सापि तं भरतं दृष्ट्वा मुक्तकण्ठा रुरोद ह ॥ ८२ ॥

अशा रीतीने कैकेयीची निर्भर्त्सना करून भरत कौसल्येच्या महालात गेला. भरताला पाहाताच तीसुद्धा धाय मोकलून रडू लागली. (८२)

पादयोः पतितस्तस्या भरतोऽपि तदारुदत् ।
आलिङ्ग्य भरतं साध्वी राममाता यशस्विनी ।
कृशातिदीनवदना साश्रुनेत्रेदमब्रवीत् ॥ ८३ ॥

तेव्हा तिच्या पाया पडून भरतसुद्धा रडू लागला. भरताला आलिंगन देऊन दुःखाने कृश झालेली, अतिशय दीन-वदन असणारी, साध्वी, यशस्विनी अशी रामाची माता डोळ्यांत अश्रू आणून त्याला म्हणाली. (८३)

पुत्र त्वयि गते दूरमेवं सर्वमभूदिदम् ।
उक्तं मात्रा श्रुतं सर्वं त्वया ते मातृचेष्टितम् ॥ ८४ ॥

"बाळा, तू दूर गेला असताना, हे सर्व असे घडले. तुझ्या आईने जे काही केले ते सर्व तिने तुला सांगितले असेल व ते सर्व तू ऐकले असशीलच. (८४)

पुत्रः सभार्यो वनमेव यातः
सलक्ष्मणो मे रघुरामचन्द्रः ।
चीराम्बरो बद्धजटाकलापः
सन्त्यज्य मां दुःखसमुद्रमग्नाम् ॥ ८५ ॥

दुःखसागरात बुडलेल्या माझा त्याग करून, माझा पुत्र रघुश्रेष्ठ श्रीरामचंद्र आपली भार्या व लक्ष्मण यांच्यासह वल्कले धारण करून आणि मस्तकावर जटाजूट बांधून वनामध्ये निघून गेला. (८५)

हा राम हा मे रघुवंशनाथ
जातोऽसि मे त्वं परतः परात्मा ।
तथापि दुःखं न जहाति मां वै
विधिर्बलीयानिति मे मनीषा ॥ ८६ ॥

हाय रामा ! हाय माझ्या रघुवंशाच्या शिरोमणी ! अरे, सर्वश्रेष्ठ असा परमात्मा असून माझा पुत्र म्हणून जन्माला आलास. तथापि दुःख काही मला सोडीत नाही. म्हणून मला वाटते की दैव हेच बलवान होय." (८६)

स एवं भरतो वीक्ष्य विलपन्तीं भृशं शुचा ।
पादौ गृहीत्वा प्राहेदं शृणु मातर्वचो मम ॥ ८७ ॥

अतिशय शोकाने अशा प्रकारे विलाप करणाऱ्या कौसल्येला पाहून भरताने तिचे पाय धरले आणि तो म्हणाला, "हे माते, माझे वचन ऐक. (८७)

कैकेय्या यत्कृतं कर्म रामराज्याभिषेचने ।
अन्यद्वा यदि जानामि सा मया नोदिता यदि ॥ ८८ ॥

श्रीरामांच्या राज्याभिषेकाच्या वेळी कैकयीने जे काही कृत्य केले किंवा आणखी जे काही केले असेल, ते जर मला ठाऊक असेल किंवा मी जर तिला प्रेरणा दिली असेल तर हे माते, शंभर ब्रह्महत्यांमुळे उद्भवणारे महापाप

पापं मेऽस्तु तदा मातर्ब्रह्महत्याशतोद्भवम् ।
हत्वा वसिष्ठं खड्गेन अरुन्धत्या समन्वितम् ॥ ८९ ॥

भूयात्तत्पापमखिलं मम जानामि यद्यहम् ।
इत्येवं शपथं कृत्वा रुरोद भरतस्तदा ॥ ९० ॥

मला लागू दे. किंवा याला माझी संमती असेल तर अरुंधती सह वसिष्ठांना तरवारीने ठार केल्यावर जे पाप लागेल ते सर्व पाप मला लागो." अशा प्रकारे शपथ घेऊन भरत त्या वेळी रडू लागला. (८८-९०)

कौसल्या तमथालिङ्ग्य पुत्र जानामि मा शुचः ।
एतस्मिन्नन्तरे श्रुत्वा भरतस्य समागमम् ॥ ९१ ॥

वसिष्ठो मन्त्रिभिः सार्धं प्रययौ राजमन्दिरम् ।
रुदन्तं भरतं दृष्ट्वा वसिष्ठः प्राह सादरम् ॥ ९२ ॥

तेव्हा त्याला आलिंगन देऊन कौसल्या म्हणाली, "बाळा, मला सर्व काही माहीत आहे. तू मुळीच शोक करू नकोस." दरम्यानच्या काळात भरताचे आगमन झाले आहे हे ऐकून, मंत्र्यांसह वसिष्ठ राजमंदिरात आले आणि शोक करणाऱ्या भरताला पाहून आदरपूर्वक म्हणाले. (९१-९२)

वृद्धो राजा दशरथो ज्ञानी सत्यपराक्रमः ।
भुक्त्वा मर्त्यसुखं सर्वमिष्ट्वा विपुलदक्षिणैः ॥ ९३ ॥

अश्वमेधादिभिर्यज्ञैर्लब्ध्वा रामं सुतं हरिम् ।
अन्ते जगाम त्रिदिवं देवेन्द्रार्द्धासनं प्रभुः ॥ ९४ ॥

"महाराज दशरथ हे वृद्ध, ज्ञानी व सत्यपराक्रमी होते. मर्त्यलोकातील सर्व सुखे भोगून, भरपूर दक्षिणा देत अश्वमेध इत्यादी यज्ञांचे द्वारा भगवंतांची आराधना करून आणि रामचंद्राच्या रूपात साक्षात विष्णूला पुत्र म्हणून प्राप्त करून घेऊन, शेवटी ते स्वर्गाला गेले आणि तेथे ते देवराज इंद्राच्या अर्ध्या आसनावर विराजमान झाले आहेत. (९३-९४)

तं शोचसि वृथैव त्वमशोच्यं मोक्षभाजनम् ।
आत्मा नित्योऽव्ययः शुद्धो जन्मनाशादिवर्जितः ॥९५ ॥

म्हणून संपूर्णपणे अशोचनीय आणि मोक्षाचे अधिकारी अशा राजांच्याविषयी तू उगीचच शोक करीत आहेस. लक्षात ठेव की आत्मा हा नित्य, अव्यय, शुद्ध, आणि जन्म- नाश इत्यादी विकारांनी रहित असतो. (९५)

शरीरं जडमत्यर्थमपवित्रं विनश्वरम् ।
विचार्यमाणे शोकस्य नावकाशः कथञ्चन ॥ ९६ ॥

याउलट शरीर हे जड, अतिशय अपवित्र आणि नाशवंत आहे. अशा प्रकारे विचार केला असता एखाद्या माणसाच्या मृत्यूसाठी शोक करण्यास मुळीच जागा उरत नाही. (९६)

पिता वा तनयो वापि यदि मृत्युवशं गतः ।
मूढास्तमनुशोचन्ति स्वात्मताडनपूर्वकम् ॥९७ ॥

पिता अगर पुत्र जर मरण पावला असेल तर स्वतःची छाती बडवून घेत अज्ञानी माणसे त्याच्यासाठी शोक करतात. (९७)

निःसारे खलु संसारे वियोगो ज्ञानिनां यदा ।
भवेद्वैराग्यहेतुः स शान्तिसौख्यं तनोति च ॥ ९८ ॥

परंतु अशा असार संसारात ज्ञानी माणसांना जेव्हा एखाद्याचा वियोग होतो, तेव्हा तो त्यांच्या वैराग्याचे कारण बनतो आणि तो शांती व सुखच वाढवितो. (९८)

जन्मवान्यदिलोकेऽस्मिंस्तर्हि तं मृत्युरन्वगात् ।
तस्मादपरिहार्योऽयं मृत्युर्जन्मवतां सदा ॥ ९९ ॥

या जगात जर कुणी जन्माला आला असेल तर मृत्यू हा अवश्य त्याच्या मागोमाग येतच असतो. म्हणून जन्माला आलेल्या माणसांच्या बाबतीत मृत्यू हा अपरिहार्य आहे. (९९)

स्वकर्मवशतः सर्वजन्तूनां प्रभवाप्ययौ ।
विजानन्नप्यविद्वान्यः कथं शोचति बान्धवान् ॥ १०० ॥

स्वतःच्या कर्मानुसारच सर्व प्राण्यांना जन्म आणि मरण येत असते, हे जाणत असूनसुद्धा अज्ञानी माणूस आपल्या बांधवांच्या मरणाबद्दल का बरे शोक करतो? (१००)

ब्रह्माण्डकोटयो नष्टाः सृष्टयो बहुशो गताः ।
शुष्यन्ति सागराः सर्वे कैवास्था क्षणजीविते ॥ १०१ ॥

कोट्यवधी ब्रह्मांडे नष्ट होऊन गेली आहेत. अनेक सृष्टी होऊन गेल्या आहेत. सर्व सागर हे केव्हाना केव्हा तरी शुष्क होऊन जातात. अशा स्थितीत क्षणभर टिकणाऱ्या जीवनाच्या बाबतीत कसली आस्था ठेवायची ? (१०१)

चलपत्रान्तलग्नाम्बुबिन्दुवत्क्षणभङ्गुरम् ।
आयुस्त्यजत्यवेलायां कस्तत्र प्रत्ययस्तव ॥ १०२ ॥

झाडाच्या हलणाऱ्या पानाच्या टोकावर चिकटलेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणे आयुष्य हे क्षणभंगुर आहे. ते अवेळी निघून जाते. त्याचेबद्दल तू कसला विश्वास धरतोस? (१०२)

देही प्राक्तनदेहोत्थकर्मणा देहवान्पुनः ।
तद्देहोत्थेन च पुनरेवं देहः सदात्मनः ॥ १०३ ॥

पूर्व जन्मातील देहाकडून निर्माण झालेल्या कर्मांमुळे देहधारी जीवाला पुन्हा नवीन देह प्राप्त होतो. नंतर त्या नवीन देहाकडून केल्या जाणाऱ्या कर्मांमुळे पुन्हा त्याला नवीन देह प्राप्त होतो. अशा प्रकारे जीवात्म्याला पुन्हा पुन्हा नवीन देहांची प्राप्ती होत राहाते. (१०३)

यथा त्यजति वै जीर्णं वासो गृह्णाति नूतनम् ।
तथा जीर्णं परित्यज्य देही देहं पुनर्नवम् ॥ १०४ ॥

भजत्येव सदा तत्र शोकस्यावसरः कुतः ।
आत्मा न म्रियते जातु जायते न च वर्धते ॥ १०५ ॥

षड्भावरहितोऽनन्तः सत्यप्रज्ञानविग्रहः ।
आनन्दरूपो बुद्ध्यादिसाक्षी लयविवर्जितः ॥ १०६ ॥

एक एव परो ह्यात्मा ह्यद्वितीयः समः स्थितः ।
इत्यात्मानं दृढं ज्ञात्वा त्यक्त्वा शोकं कुरु क्रियाम् ॥ १०७ ॥

ज्या प्रमाणे माणूस हा जीर्ण वस्त्र टाकून देऊन नवीन वस्त्र ग्रहण करतो, त्या प्रमाणे देहधारी जीव जीर्ण शरीर टाकून देऊन पुनः नवीन देह नेहमी धारण करीत असतो. अशा स्थितीत त्या संदर्भात शोक करण्याला संधी तरी कुठे आहे ? कारण आत्मा हा कधीही मरत नाही, कधीही जन्माला येत नाही, आणि तो कधीही वाढत नाही. अर्थात आत्मा हा सहा विकारांनी रहित, अनंत, सच्चिदानंद स्वरूप बुद्धी इत्यादींचा साक्षी आणि नाशरहित आहे. तो परमात्मा एकच आहे, अद्वितीय आहे आणि सर्व ठिकाणी समरूपाने स्थित आहे. अशा प्रकारे आत्मा आहे, हे ज्ञान पक्के जाणून घेऊन आणि शोक टाकून देऊन, तू सर्व कामे कर. (१०४-१०७)

तैलद्रोण्याः पितुर्देहमुद्धृत्य सचिवैः सह ।
कृत्यं कुरु यथान्यायमस्माभिः कुलनन्दन ॥ १०८ ॥

हे कुलनंदन भरता, तेलाच्या डोणीतून पित्याचे शव बाहेर काढून, मंत्री आणि आम्हा ऋषींच्याबरोबर त्याचा यथाविधी अंत्येष्टि-संस्कार कर." (१०८)

इति सम्बोधितः साक्षाद्गुरुणा भरतस्तदा ।
विसृज्याज्ञानजं शोकं चक्रे स विधिवत्क्रियाम् ॥ १०९ ॥

अशा प्रकारे प्रत्यक्ष गुरूंनी सांगितल्यावर, अज्ञान-जन्य शोक सोडून देऊन, भरताने त्या वेळी यथाविधी अंत्य संस्काराच्या क्रिया केल्या. (१०९)

गुरुणोक्तप्रकारेण आहिताग्नेर्यथाविधि ।
संस्कृत्य स पितुर्देहं विधिदृष्टेन कर्मणा ॥ ११० ॥

एकादशेऽहनि प्राप्ते ब्राह्मणान्वेदपारगान् ।
भोजयामास विधिवच्छतशोऽथ सहस्रशः ॥ १११ ॥

ज्या प्रमाणे एखाद्या आहिताग्नी पुरुषाचे अंतिम संस्कार केले जातात, त्या प्रमाणे गुरूंनी सांगितलेल्या प्रकाराने, शास्त्रोक्त विधीप्रमाणे, पित्याच्या देहावर संस्कार करून, मग अकराव्या दिवशी वेदात पारंगत असणाऱ्या शेकडो-हजारो ब्राह्मणांना भरताने यथाविधी भोजन घातले. (११०-१११)

उद्दिश्य पितरं तत्र ब्राह्मणेभ्यो धनं बहु ।
ददौ गवां सहस्राणि ग्रामान् रत्नाम्बराणि च ॥ ११२ ॥

तसेच पित्यासाठी तेव्हा त्याने ब्राह्मणांना पुष्कळ धन, हजारो गाई, अनेक गावे, पुष्कळ रत्ने आणि वस्त्रे इत्यादी दान दिली. (११२)

अवसत्स्वगृहे तत्र राममेवानुचिन्तयन् ।
वसिष्ठेन सह भ्रात्रा मन्त्रिभिः परिवारितः ॥ ११३ ॥

त्यानंतर वसिष्ठ, शत्रुघ्न आणि मंत्री यांच्या समवेत तो श्रीरामांचेच स्मरण करीत स्वतःच्या महालात राहू लागला. (११३)

रामेऽरण्यं प्रयाते सह जनकसुता-
लक्ष्मणाभ्यां सुघोरं
माता मे राक्षसीव प्रदहति हृदयं
दर्शनादेव सद्यः ।
गच्छाम्यारण्यमद्य स्थिरमतिरखिलं
दूरतोऽपास्य राज्यं
रामं सीतासमेतं स्मितरुचिरमुखं
नित्यमेवानुसेवे ॥ ११४ ॥

(महालात राहात असताना) भरत मनातल्या मनात विचार करीत असे की जनकनंदिनी महाराणी सीता व लक्ष्मण यांच्यासह श्रीरामचंद्र अतिशय घोर अरण्यात गेले असताना, माझी माता केवळ आपल्या दर्शनाने एखाद्या राक्षसिणीप्रमाणे माझे हृदय जाळीत आहे. म्हणून हे संपूर्ण राज्य दूर सारून मी आजच अरण्यात जातो आणि मधुर स्मिताने ज्यांचे मुख अतिशय शोभित असते, अशा सीतेसहित श्रीरामांची मी नित्य सेवा करीत राहतो, असा माझा निश्चय आहे. (११४)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकाण्डे सप्तमः सर्गः ॥७॥

# अष्टम सर्ग

## भरताचे वनाकडे प्रस्थान, वाटेत गुह व भरद्वाज यांची भेट आणि चित्रकूटदर्शन

*श्री महादेव उवाच*

वसिष्ठो मुनिभिः सार्धं मन्त्रिभिः परिवारितः ।
राज्ञः सभां देवसभासन्निभामविशद्विभुः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**— एके दिवशी मुनीश्वर आणि मंत्री यांच्यासह भगवान वसिष्ठ हे देवसभेप्रमाणे असणाऱ्या राजसभेत प्रविष्ट झाले. (१)

तत्रासने समासीनश्चतुर्मुख इवापरः ।
आनीय भरतं तत्र उपवेश्य सहानुजम् ॥ २ ॥

चतुर्मुख ब्रह्मदेवांप्रमाणे असणारे वसिष्ठ तेथे आसनावर विराजमान झाले. नंतर त्यांनी शत्रुघ्नासह भरताला तेथे बोलावून घेतले आणि त्याला आसनावर बसविले. (२)

अब्रवीद्वचनं देशकालोचितमरिन्दमम् ।
वत्स राज्येऽभिषेक्ष्यामस्त्वामद्य पितृशासनात् ॥ ३ ॥

नंतर देश व काल यांना उचित असे वचन वसिष्ठ शत्रुघातक भरताला बोलले, "वत्सा, तुझ्या पित्याच्या आज्ञेप्रमाणे आज आम्ही तुला राज्यपदावर अभिषेक करणार आहोत. (३)

कैकेय्या याचितं राज्यं त्वदर्थे पुरुषर्षभ ।
सत्यसन्धो दशरथः प्रतिज्ञाय ददौ किल ॥ ४ ॥

हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्यासाठी कैकेयीने राज्य मागून घेतले होते, म्हणून सत्यप्रतिज्ञ राजांनी प्रतिज्ञा करून ते राज्य तुला दिले आहे. (४)

अभिषेको भवत्वद्य मुनिभिर्मन्त्रपूर्वकम् ।
तच्छ्रुत्वा भरतोऽप्याह मम राज्येन किं मुने ॥ ५ ॥

म्हणून आता मुनींच्या द्वारा मंत्रोच्चारपूर्वक राज्याभिषेक होऊ दे." ते वचन ऐकून भरतसुद्धा म्हणाला, "अहो मुनिनाथ, मला राज्य कशाला ? (५)

रामो राजाधिराजश्च वयं तस्यैव किङ्कराः ।
श्वःप्रभाते गमिष्यामो राममानेतुमञ्जसा ॥ ६ ॥

खरे म्हणजे श्रीराम हेच राजाधिराज आहेत आणि आम्ही त्यांचेच सेवक आहोत. म्हणून मी, तुम्ही आणि राक्षसिणीसारख्या कैकेयीखेरीज इतर माता, असे आपण

अहं यूयं मातरश्च कैकयीं राक्षसीं विना ।
हनिष्याम्यधुनैवाहं कैकयीं मातृगन्धिनीम् ॥ ७ ॥

किन्तु मां नो रघुश्रेष्ठः स्त्रीहन्तारं सहिष्यते ।
तच्छ्वोभूते गमिष्यामि पादचारेण दण्डकान् ॥ ८ ॥

शत्रुघ्नसहितस्तूर्णं यूयमायात वा न वा ।
रामो यथा वने यातस्तथाहं वल्कलाम्बरः ॥ ९ ॥

फलमूलकृताहारः शत्रुघ्नसहितो मुने ।
भूमिशायी जटाधारी यावद्रामो निवर्तते ॥ १० ॥

सर्व जण रामांना परत आणण्यासाठी उद्या सकाळीच त्वरेने वनाकडे जाऊया. नाममात्र माता असणाऱ्या कैकेयीला मी आत्ताच ठार केले असते. परंतु स्त्रीची हत्या केल्यास मला रघुश्रेष्ठ राम क्षमा करणार नाहीत. तेव्हा उद्याचा दिवस उजाडताच मी शत्रुघ्नासह पायी पायी दंडकारण्यात जाणार आहे. तुम्ही या अगर येऊ नका. ज्या प्रकारे राम वनात गेले त्याच प्रकारे राम परत येत नाहीत तोपर्यंत, शत्रुघ्नासह मी वल्कले आणि जटा धारण करून, फळे, मुळे यांचाच आहार करीत जमिनीवर झोपेन." (६-१०)

इति निश्चित्य भरतस्तूष्णीमेवावतस्थिवान् ।
साधुसाध्विति तं सर्वे प्रशशंसुर्मुदान्विताः ॥ ११ ॥

असा आपला निश्चय सांगून भरत गप्प बसला. 'छान ! छान !' असे म्हणत आनंदाने युक्त होऊन सर्व लोकांनी त्याची प्रशंसा केली. (११)

ततः प्रभाते भरतं गच्छन्तं सर्वसैनिकाः ।
अनुजग्मुः सुमन्त्रेण नोदिताः साश्वकुञ्जराः ॥ १२ ॥

त्यानंतर दुसरे दिवशी प्रातःकाळी भरत निघाल्यावर, सुमंत्राने प्रेरणा दिलेले सर्व सैनिक, हत्ती व घोडे यांच्यासह त्याच्या मागोमाग निघाले. (१२)

कौसल्याद्या राजदारा वसिष्ठप्रमुखा द्विजाः ।
छादयन्तो भुवं सर्वे पृष्ठतः पार्श्वतोऽग्रतः ॥ १३ ॥

कौसल्या इत्यादी राजस्त्रिया, वसिष्ठ इत्यादी द्विजगण असे सर्व जण पृथ्वीला आच्छादित करीत, त्याच्या मागे, पुढे, दोन्ही बाजूंनी यथायोग्य रीतीने निघाले. (१३)

शृङ्गवेरपुरं गत्वा गङ्गाकूले समन्ततः ।
उवास महती सेना शत्रुघ्नपरिचोदिता ॥ १४ ॥

शृंगवेर नगरीस पोचल्यावर, शत्रुघ्नाने प्रेरणा दिलेली ती मोठी सेना गंगानदीच्या तीरावर सगळीकडे तळ ठोकून राहिली. (१४)

आगतं भरतं श्रुत्वा गुहः शङ्कितमानसः ।
महत्या सेनया सार्धमागतो भरतः किल ॥ १५ ॥

पापं कर्तुं न वा याति रामस्याविदितात्मनः ।
गत्वा तद्धृदयं ज्ञेयं यदि शुद्धस्तरिष्यति ॥ १६ ॥

गङ्गां नो चेत्समाकृष्य नावस्तिष्ठन्तु सायुधाः ।
ज्ञातयो मे समायत्ताः पश्यन्तः सर्वतोदिशम् ॥ १७ ॥

भरत आला आहे हे ऐकल्यावर, गुहाच्या मनात शंका आली की मोठी सेना बरोबर घेऊन भरत येथे आला आहे. श्रीरामांना काहीच कल्पना नाही, असे काहीतरी वाईट कृत्य करण्यास तर तो आलेला नसेल ना? तेव्हा त्याच्याजवळ जाऊन त्याचे मन जाणून घ्यावयास हवे. जर त्याचा भाव शुद्ध असेल तरच तो माझ्या मदतीने गंगा नदी ओलांडून जाईल. नाहीतर माझे ज्ञातिबांधव हातात शस्त्रे घेऊन, नावा खेचून काढून उभ्या करतील आणि सगळ्या दिशांकडे लक्ष ठेवून सावध राहतील. (१५-१७)

इति सर्वान्समादिश्य गुहो भरतमागतः ।
उपायनानि संगृह्य विविधानि बहून्यपि ॥ १८ ॥

अशा प्रकारे आपल्या सर्व ज्ञातिबांधवांना आज्ञा करून आणि नाना प्रकारचे पुष्कळ नजराणे घेऊन गुह भरताकडे गेला. (१८)

प्रययौ ज्ञातिभिः सार्धं बहुभिर्विविधायुधैः ।
निवेद्योपायनान्यग्रे भरतस्य समन्ततः ॥ १९ ॥

विविध प्रकारची पुष्कळ शस्त्रे धारण करणाऱ्या ज्ञातिबांधवांसह तो भरताकडे पोचला आणि भरताच्या पुढे त्याने सर्व नजराणे ठेवले. जेव्हा त्याने सगळीकडे पाहिले तेव्हा त्याला दिसले की वल्कल वस्त्र धारण केलेला, मेघाप्रमाणे श्याम, जटारूपी मुकुट धारण करणारा, रामांबद्दल शोक

दृष्ट्वा भरतमासीनं सानुजं सह मन्त्रिभि: ।
चीराम्बरं घनश्यामं जटामुकुटधारिणम् ॥ २० ॥

राममेवानुशोचन्तं रामरामेति वादिनम् ।
ननाम शिरसा भूमौ गुहोऽहमिति चाब्रवीत् ॥ २१ ॥

करणारा, 'राम राम' असे तोंडाने म्हणणारा व धाकटा भाऊ बरोबर असणारा भरत मंत्र्यांच्या समवेत बसलेला आहे. ते पाहून निषादराज गुहाने जमिनीवर मस्तक ठेवून 'मी गुह आहे' असे म्हणून भरताला नमस्कार केला. (१९-२१)

शीघ्रमुत्थाप्य भरतो गाढमालिङ्ग्य सादरम् ।
पृष्ट्वानामयमव्यग्र: सखायमिदमब्रवीत् ॥ २२ ॥

झट्दिशी गुहाला उठवून आदरपूर्वक भरताने त्याला आलिंगन दिले आणि शांतपणे त्याचे कुशल विचारले. नंतर मोकळ्या मनाने तो गुहाला मित्रत्वाने म्हणाला. (२२)

भ्रातस्त्वं राघवेणात्र समेत: समवस्थित: ।
रामेणालिङ्गित: सार्द्रनयनेनामलात्मना ॥ २३ ॥

"हे बंधो, तू रामचंद्रांबरोबर येथे राहिला होतास. आणि निर्मळ मनाच्या हर्षाश्रुपूर्ण नेत्र असलेल्या श्रीरामांनी तुला आलिंगन दिले होते. (२३)

धन्योऽसि कृतकृत्योऽसि यत्त्वया परिभाषित: ।
रामो राजीवपत्राक्षो लक्ष्मणेन च सीतया ॥ २४ ॥

लक्ष्मण व सीता बरोबर असणाऱ्या, कमलपत्राप्रमाणे नेत्र असणाऱ्या श्रीरामांनी तुझ्याबरोबर संभाषण केले होते. यामुळे तू धन्य झाला आहेस, तुझे जीवन सफल झाले आहे. (२४)

यत्र रामस्त्वया दृष्टस्तत्र मां नय सुव्रत ।
सीतया सहितो यत्र सुप्तस्तद्दर्शयस्व मे ॥ २५ ॥

हे सुव्रता, तू श्रीरामांना जेथे पाहिलेस तेथे तू मला ने. तसेच सीतेसह राम जेथे झोपले होते, ते स्थान तू मला दाखव. (२५)

त्वं रामस्य प्रियतमो भक्तिमानसि भाग्यवान् ।
इति संस्मृत्य संस्मृत्य रामं साश्रुविलोचन: ॥ २६ ॥

तू रामांचा प्रियतम मित्र आणि रामांची भक्ती करणारा आहेस. म्हणून तू भाग्यवान आहेस." असे बोलताना श्रीरामांची पुन: पुन: आठवण केल्याने, भरताचे डोळे अश्रूंनी भरून गेले. (२६)

गुहेन सहितस्तत्र यत्र राम: स्थितो निशि ।
ययौ ददर्श शयनस्थलं कुशसमास्तृतम् ॥ २७ ॥

सीताभरणसंलग्नस्वर्णबिन्दुभिरर्चितम् ।
दु:खसन्तप्तहृदयो भरत: पर्यदेवयत् ॥ २८ ॥

रात्री राम जेथे झोपले होते तेथे भरत गुहाबरोबर गेला. नंतर ज्यावर कुश गवत पसरले होते आणि सीतेच्या अलंकारातून गळून पडलेल्या सुवर्ण-मण्यांनी जे सुशोभित झाले होते, असे ते रामांचे शयन- स्थान भरताने पाहिले. तेव्हा दु:खाने व्याकूळ झालेला तो भरत शोक करू लागला. (२७-२८)

अहोऽतिसुकुमारी या सीता जनकनन्दिनी ।
प्रासादे रत्नपर्यङ्के कोमलास्तरणे शुभे ॥ २९ ॥

रामेण सहिता शेते सा कथं कुशविष्टरे ।
सीता रामेण सहिता दु:खेन मम दोषत: ॥ ३० ॥

"अहो ! अतिशय सुकुमार जनककन्या सीता प्रासादातील मऊ आवरण असणाऱ्या व सुंदर अशा रत्नजडित पलंगावर रघुनाथांसह झोपत असे, तीच माझ्यामुळे रामांसह कुशांच्या बिछान्यावर दु:खाने कशी बरे झोपली असेल ? (२९-३०)

धिङ् मां जातोऽस्मि कैकेय्यां पापराशिसमानत: ।
मन्निमित्तमिदं क्लेशं रामस्य परमात्मन: ॥ ३१ ॥

माझा धिक्कार असो ! पापाच्या राशीप्रमाणे असणाऱ्या कैकेयीपासून मी उत्पन्न झालो . म्हणूनच माझ्या निमित्तानेच परमात्म्या रामांना हे क्लेश सहन करावे लागले. (३१)

अहोऽतिसफलं जन्म लक्ष्मणस्य महात्मन: ।
राममेव सदान्वेति वनस्थमपि हृष्टधी: ॥ ३२ ॥

अहाहा! जो लक्ष्मण आनंदित मनाने वनातही श्रीरामांच्या मागोमाग नेहमी जातो; त्या महात्म्या लक्ष्मणाचा जन्म अतिशय सफल होय. (३२)

अहं रामस्य दासा ये तेषां दासस्य किङ्करः ।
यदि स्यां सफलं जन्म मम भूयान्न संशयः ॥ ३३ ॥

श्रीरामांचे जे दास आहेत त्यांच्या दासांचा दास जर मी होईन, तरच माझा जन्म सफल होईल, यात संशय नाही. (३३)

भ्रातर्जानासि यदि तत्कथयस्व ममाखिलम् ।
यत्र तिष्ठति तत्राहं गच्छाम्यानेतुमञ्जसा ॥ ३४ ॥

हे बंधो गुहा, जर तुला माहीत असेल तर मला सांग की श्रीराम कुठे आहेत? त्यांना लगेच परत नेण्यासाठी मी तेथे जाणार आहे." (३४)

गुहस्तं शुद्धहृदयं ज्ञात्वा सस्नेहमब्रवीत् ।
देव त्वमेव धन्योऽसि यस्य ते भक्तिरीदृशी ॥ ३५ ॥

रामे राजीवपत्राक्षे सीतायां लक्ष्मणे तथा ।
चित्रकूटाद्रिनिकटे मन्दाकिन्यविदूरतः ॥ ३६ ॥

मुनीनामाश्रमपदे रामस्तिष्ठति सानुजः ।
जानक्या सहितो नन्दात्सुखमास्ते किल प्रभुः ॥ ३७ ॥

भरताचे हृदय शुद्ध आहे हे पाहून गुह स्नेहपूर्वक त्याला म्हणाला, "स्वामी, कमलपत्राप्रमाणे नेत्र असणारे श्रीराम, सीता आणि लक्ष्मण यांच्या ठिकाणी तुझी अशी शुद्ध भक्ती आहे. तू खरोखरच धन्य आहेस. मंदाकिनी नदीच्या जवळील चित्रकूट पर्वताच्याजवळ, श्रीराम आपल्या लहान भावासह मुनींच्या आश्रमस्थानी राहात आहेत. तेथे जानकीसह प्रभू श्रीराम आनंदाने सुखात राहात आहेत. (३५-३७)

तत्र गच्छामहे शीघ्रं गङ्गां तर्तुमिहार्हसि ।
इत्युक्त्वा त्वरितं गत्वा नावः पञ्चशतानि ह ॥ ३८ ॥

समानयत्ससैन्यस्य तर्तुं गङ्गां महानदीम् ।
स्वयमेवानिनायैकां राजनावं गुहस्तदा ॥ ३९ ॥

चल. आपण तेथे लवकर जाऊ. प्रथम येथे गंगा नदी पार करून घे." असे सांगून तो त्वरित निघून गेला. सैन्यासह भरताला महानदी गंगा तरून जाता यावी म्हणून त्याने पाचशे नौका आणवून घेतल्या, आणि राजाला शोभेल अशी एक नौका त्या वेळी गुहाने स्वतःच आणली. (३८-३९)

आरोप्य भरतं तत्र शत्रुघ्नं राममातरम् ।
वसिष्ठं च तथान्यत्र कैकयीं चान्ययोषितः ॥ ४० ॥

त्या नावेत त्याने भरत, शत्रुघ्न, रामाची माता आणि वसिष्ठ यांना बसविले. आणि दुसऱ्या एका नावेत त्याने कैकेयी आणि अन्य राजस्त्रियांना बसविले. (४०)

तीर्त्वा गङ्गां ययौ शीघ्रं भरद्वाजाश्रमं प्रति ।
दूरे स्थाप्य महासैन्यं भरतः सानुजो ययौ ॥ ४१ ॥

गंगा नदी झट्पट पार करून भरत भरद्वाजांच्या आश्रमाकडे निघाला. आश्रमापासून एका दूर स्थानी आपले मोठे सैन्य ठेवून, शत्रुघ्नासह भरत त्या आश्रमाकडे निघाला. (४१)

आश्रमे मुनिमासीनं ज्वलन्तमिव पावकम् ।
दृष्ट्वा ननाम भरतः साष्टाङ्गमतिभक्तितः ॥ ४२ ॥

प्रज्वलित अग्नीप्रमाणे तेजस्वी असणाऱ्या त्या मुनींना आश्रमात बसलेले पाहून, भरताने अतिशय भक्तीने साष्टांग प्रणिपात केला. (४२)

ज्ञात्वा दाशरथिं प्रीत्या पूजयामास मौनिराट् ।
पप्रच्छ कुशलं दृष्ट्वा जटावल्कलधारिणम् ॥ ४३ ॥

राज्यं प्रशासतस्तेऽद्य किमेतद्वल्कलादिकम् ।
आगतोऽसि किमर्थं त्वं विपिनं मुनिसेवितम् ॥ ४४ ॥

तो राजा दशरथांचा पुत्र आहे हे कळल्यावर, त्या वेळी त्या मुनीश्वरांनी त्याचा प्रेमाने सत्कार केला व त्याचे कुशल विचारले. नंतर जटा आणि वल्कले धारण करणाऱ्या त्या भरताला पाहिल्यावर ते मुनी म्हणाले, "राज्याचे प्रशासन करणाऱ्या तू आज ही वल्कले इत्यादी का धारण केली आहेस ? आणि जेथे मुनी आश्रय घेतात अशा या वनात तू का आला आहेस ?" (४३-४४)

भरद्वाजवचः श्रुत्वा भरतः साश्रुलोचनः ।
सर्वं जानासि भगवन् सर्वभूताशयस्थितः ॥ ४५ ॥

तथापि पृच्छसे किञ्चित्तदनुग्रह एव मे ।
कैकेय्या यत्कृतं कर्म रामराज्यविघातनम् ॥ ४६ ॥

वनवासादिकं वापि न हि जानामि किञ्चन ।
भवत्पादयुगं मेऽद्य प्रमाणं मुनिसत्तम ॥ ४७ ॥

भरद्वाजांचे वचन ऐकल्यावर, डोळ्यांत अश्रू आणून भरत बोलला, "अहो भगवन, सर्व भूतांच्या मनात राहणाऱ्या तुम्हांला सर्व काही माहीत आहे. तथापि तुम्ही पृच्छा करीत आहात, ही गोष्ट म्हणजे तुमचा माझ्यावर थोडासा अनुग्रहच आहे. श्रीरामांच्या राज्याभिषेकात विघ्न आणणे आणि रामाला वनवास देणे इत्यादी जे काही कर्म कैकेयीने केले, त्या बाबतीत मला काहीही माहीत नव्हते. या बाबतीतही हे मुनिश्रेष्ठा, तुमचे पादयुगुल हेच मला आज प्रमाण आहेत." (४५-४७)

इत्युक्त्वा पादयुगलं मुनेः स्पृष्ट्वार्त्तमानसः ।
ज्ञातुमर्हसि मां देव शुद्धो वाशुद्ध एव वा ॥ ४८ ॥

असे सांगून आर्त चित्त झालेल्या भरताने मुनींच्या चरण युगुलाला स्पर्श करून म्हटले, "हे देवा, मी दोषी आहे की निर्दोष आहे हे जाणण्यास तुम्हीच योग्य आहात. (४८)

मम राज्येन किं स्वामिन् रामे तिष्ठति राजनि ।
किङ्करोऽहं मुनिश्रेष्ठ रामचन्द्रस्य शाश्वतः ॥ ४९ ॥

अहो स्वामी, महाराज राम विद्यमान असताना, मी राज्य का करावे ? अहो मुनिश्रेष्ठा, मी श्रीरामचंद्रांचा नित्य दास आहे. (४९)

अतो गत्वा मुनिश्रेष्ठ रामस्य चरणान्तिके।
पतित्वा राज्यसम्भारान् समर्प्यात्रैव राघवम् ॥ ५० ॥

म्हणून हे मुनिश्रेष्ठा, श्रीरामांच्या चरणांजवळ जाऊन, मी त्यांच्या पाया पडीन, आणि येथेच सर्व राज्याभिषेकाची सामग्री श्रीरामांना अर्पण करीन. (५०)

अभिषेक्ष्ये वसिष्ठाद्यैः पौरजानपदैः सह ।
नेष्येऽयोध्यां रमानाथं दासः सेवेऽतिनीचवत् ॥ ५१ ॥

वसिष्ठ इत्यादी तसेच नगरवासी व ग्रामवासी यांच्यासह मी रामांना अभिषेक करीन आणि त्यांना अयोध्येला नेईन. नंतर अतिशय सामान्य माणसाप्रमाणे त्यांचा दास होऊन मी त्या लक्ष्मीपती श्रीरामांची सेवा करीन." (५१)

इत्युदीरितमाकर्ण्य भरतस्य वचो मुनिः ।
आलिङ्ग्य मूर्ध्न्यवघ्राय प्रशशंस सविस्मयः ॥ ५२ ॥

भरताने उच्चारलेले वचन ऐकल्यावर अत्यंत आश्चर्यचकित होऊन मुनींनी त्याला आलिंगन देऊन त्याच्या मस्तकाचे अवघ्राण केले, त्याची स्तुती केली आणि त्याला म्हटले. (५२)

वत्स ज्ञातं पुरैवैतद्भविष्यं ज्ञानचक्षुषा ।
मा शुचस्त्वं परो भक्तः श्रीरामे लक्ष्मणादपि ॥ ५३ ॥

"वत्सा, हे मी पूर्वीच ज्ञानदृष्टीने जाणले होते. तू शोक करू नकोस. लक्ष्मणापेक्षासुद्धा तू श्रीरामांचा श्रेष्ठ भक्त आहेस. (५३)

आतिथ्यं कर्तुमिच्छामि ससैन्यस्य तवानघ ।
अद्य भुक्त्वा ससैन्यस्त्वं श्वो गन्ता रामसन्निधिम् ॥ ५४ ॥

हे पुण्यशील भरता, तुझ्या सैन्यासह तुझा आदर-सत्कार करण्याची माझी इच्छा आहे. आज तू सैन्यासह येथेच भोजन करून उद्या रामांजवळ जावेस." (५४)

यथाज्ञापयति भवांस्तथेति भरतोऽब्रवीत् ।
भरद्वाजस्त्वपः स्पृष्ट्वा मौनी होमगृहे स्थितः ॥ ५५ ॥

"जशी आपली आज्ञा. " असे भरत म्हणाला. त्यानंतर पाण्याने आचमन करून, मौन धारण करून, मुनी भरद्वाज यज्ञशाळेमध्ये बसले. (५५)

दध्यौ कामदुघां कामवर्षिणीं कामदो मुनिः ।
असृजत्कामधुक् सर्वं यथाकाममलौकिकम् ॥ ५६ ॥

आणि त्यांनी सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या कामधेनूचे ध्यान केले. तेव्हा त्या कामधेनूने सर्वांच्या इच्छेनुसार सर्व अलौकिक खाद्य पदार्थ निर्माण केले. (५६)

भरतस्य ससैन्यस्य यथेष्टं च मनोरथम् ।
यथा ववर्ष सकलं तृप्तास्ते सर्वसैनिकाः ॥ ५७ ॥

सैन्यासकट भरताच्या इच्छेप्रमाणे त्या कामधेनूने सर्व मनोरथ अशा प्रकारे पूर्ण केले की सर्व सैनिक संतुष्ट झाले. (५७)

वसिष्ठं पूजयित्वाग्रे शास्त्रदृष्टेन कर्मणा ।
पश्चात्ससैन्यं भरतं तर्पयामास योगिराट् ॥ ५८ ॥

त्यानंतर शास्त्रात सांगितलेल्या विधीप्रमाणे प्रथम त्या योगिराज मुनींनी वसिष्ठांची पूजा केली आणि सर्व सैन्यासह भरताला तृप्त केले. (५८)

उषित्वा दिनमेकं तु आश्रमे स्वर्गसन्निभे ।
अभिवाद्य पुनः प्रातर्भरद्वाजं सहानुजः ।
भरतस्तु कृतानुज्ञः प्रययौ रामसन्निधिम् ॥ ५९ ॥

त्यानंतर स्वर्गसदृश अशा त्या आश्रमात एक दिवस राहून, प्रातःकाळी पुनः भरद्वाजांना अभिवादन करून व अनुज्ञा घेऊन, भरत आपल्या धाकट्या भावासह रामांजवळ जाण्यास निघाला. (५९)

चित्रकूटमनुप्राप्य दूरे संस्थाप्य सैनिकान् ।
रामसंदर्शनाकाङ्क्षी प्रययौ भरतः स्वयम् ॥ ६० ॥

चित्रकूट पर्वताच्याजवळ पोचल्यावर, सर्व सैनिकांना दूरच थांबण्यास सांगून श्रीरामांच्या दर्शनासाठी भरत स्वतःच पुढे निघाला. (६०)

शत्रुघ्नेन सुमन्त्रेण गुहेन च परन्तपः ।
तपस्विमण्डलं सर्वं विचिन्वानो न्यवर्तत ॥ ६१ ॥

शत्रुघ्न, सुमंत्र आणि गुह यांच्यासह शत्रुपीडक भरताने सर्व तपस्वी लोकांत शोध घेतला. पण राम न दिसल्याने तो परत फिरला. (६१)

अदृष्ट्वा रामभवनमपृच्छदृषिमण्डलम् ।
कुत्रास्ते सीतया सार्धं लक्ष्मणेन रघूत्तमः ॥ ६२ ॥

श्रीरामांची कुटी न दिसल्याने त्याने ऋषिमंडळींना विचारले, "सीता आणि लक्ष्मण यांच्यासह असणारे रघूत्तम राम कुठे राहात आहेत ?" (६२)

ऊचुरग्रे गिरेः पश्चाद्गङ्गाया उत्तरे तटे ।
विविक्तं रामसदनं रम्यं काननमण्डितम् ॥ ६३ ॥

ते म्हणाले, "पुढे दिसणाऱ्या पर्वताच्या पलीकडील बाजूस, गंगेच्या उत्तर तटावर, वनांमध्ये शोभणारी व रम्य अशी रामाची कुटी एकांत स्थानी आहे. (६३)

सफलैराम्रपनसैः कदलीषण्डसंवृतम् ।
चम्पकैः कोविदारैश्च पुन्नागैर्विपुलैस्तथा ॥ ६४ ॥

फळांनी भरलेल्या, आंबे व फणस वृक्षांनी आणि पुष्कळ चंपक, कोविदार तसेच पुन्नाग आणि केळी यांनी वेढलेली अशी कुटी आहे." (६४)

एवं दर्शितमालोक्य मुनिभिर्भरतोऽग्रतः ।
हर्षाद्ययौ रघुश्रेष्ठभवनं मन्त्रिणा सह ॥ ६५॥

अशा प्रकारे मुनींनी सांगितल्यावर, मंत्र्यांचे सह भरत आनंदाने सर्वात प्रथम रघुनाथांच्या निवासस्थानाकडे निघाला. (६५)

ददर्श दूरादतिभासुरं शुभं
रामस्य गेहं मुनिवृन्दसेवितम् ।
वृक्षाग्रसंलग्नसुवल्कलाजिनं
रामाभिरामं भरतः सहानुजः ॥ ६६ ॥

पुढे गेल्यावर दुरूनच भरत-शत्रुघ्न यांनी अतिशय प्रकाशमान, अतिशय सुंदर, आणि मुनिजनांनी सेविलेला श्रीरामांचा आश्रम पाहिला. तेथे वृक्षाच्या शाखांवर चांगली वल्कले आणि मृगाजिने टांगलेली होती आणि श्रीरामांच्या निवासाने ते स्थान रमणीय झाले होते. (६६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकाण्डेऽष्टमः सर्गः ॥८ ॥

# नवम सर्ग

## भगवान राम व भरत यांची भेट, अयोध्या नगरीला भरताचे प्रत्यागमन आणि श्रीरामचंद्रांचे अत्रिमुनींच्या आश्रमाकडे गमन

*श्रीमहादेव उवाच*

अथ गत्वाश्रमपदसमीपं भरतो मुदा ।
सीतारामपदैर्युक्तं पवित्रमतिशोभनम् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले-** हे पार्वती, त्यानंतर सीता व राम यांच्या चरण- चिन्हांनी युक्त, अतिशय सुंदर आणि पवित्र, अशा श्रीरामांच्या आश्रमस्थानाच्या सन्निध भरत आनंदाने गेला. (१)

स तत्र वज्राङ्कुशवारिजाञ्चित-
ध्वजादिचिह्नानि पदानि सर्वत: ।
ददर्श रामस्य भुवोऽतिमङ्गला-
न्यचेष्टयत्पादरज:सु सानुज: ॥ २ ॥

तेथे वज्र, अंकुश, कमल, ध्वज इत्यादींनी युक्त आणि पृथ्वीसाठी अतिशय मंगल, अशा श्रीरामांच्या चरणांची चिन्हे भरताने सर्वत्र पाहिली. तेव्हा शत्रुघ्नासह भरत त्या चरण-रजामध्ये लोळू लागला. (२)

अहो सुधन्योऽहममूनि राम-
पादारविन्दाङ्कितभूतलानि ।
पश्यामि यत्पादरजो विमृग्यं
ब्रह्मादिदेवै: श्रुतिभिश्च नित्यम् ॥ ३ ॥

तो मनात म्हणू लागला, 'श्रीरामांच्या चरणकमलांच्या चिन्हांनी अंकित झालेली भूमी मी पाहात आहे. अहो ! मी खरोखरच अतिशय धन्य आहे. ब्रह्मा इत्यादी देवसमूह आणि सर्व वेद या चरणरजाचा शोध सतत घेत असतात.' (३)

इत्यद्भुतप्रेमरसाप्लुताशयो
विगाढचेता रघुनाथभावने ।
आनन्दजाश्रुस्नपितस्तनान्तर:
शनैरवापाश्रमसन्निधिं हरे: ॥ ४ ॥

अशा प्रकारे अत्यंत अद्भुत प्रेमरसाने ज्याचे मन भरले होते, ज्याचे चित्त रघुनाथांच्या चिंतनात गढून गेले होते व ज्याचे वक्ष:स्थळ आनंदाश्रूंनी भिजून गेले होते, असा भरत हळूहळू श्रीरामांच्या आश्रमाजवळ पोचला. (४)

स तत्र दृष्ट्वा रघुनाथमास्थितं
दूर्वादलश्यामलमायतेक्षणम् ।
जटाकिरीटं नववल्कलाम्बरं
प्रसन्नवक्त्रं तरुणारुणद्युतिम् ॥ ५ ॥

विलोकयन्तं जनकात्मजां शुभां
सौमित्रिणा सेवितपादपङ्कजम् ।
तदाभिदुद्राव रघूत्तमं शुचा
हर्षाच्च तत्पादयुगं त्वराग्रहीत् ॥ ६ ॥

दूर्वादलाप्रमाणे श्यामल शरीर असणारे, दीर्घ नयन असणारे, जटारूपी मुकुट धारण करणारे, नवीन वल्कले परिधान केलेले, प्रसन्नमुख असणारे, तरुण अरुणाप्रमाणे तेज असणारे, शुभलक्षणी जनक-कन्येकडे पाहात असणारे आणि ज्यांच्या चरण कमलांची सेवा लक्ष्मण करीत होता, असे श्रीरघुनाथ तेथे बसलेले जेव्हा भरताने पाहिले, तेव्हा हर्षाने तसेच शोकाने तो त्यांचेकडे त्वरेने धावत गेला आणि त्याने त्यांचे चरणयुगुल पकडले. (५-६)

रामस्तमाकृष्य सुदीर्घबाहु-
र्दोर्भ्यां परिष्वज्य सिषिञ्च नेत्रजै: ।
जलैरथाङ्कोपरि संन्यवेशयत्
पुन: पुन: संपरिषस्वजे विभु: ॥ ७ ॥

दीर्घ बाहू असणाऱ्या श्रीरामांनी त्याला आपल्या दोन हातांनी उठविले, आलिंगन दिले व आपल्या नेत्रांतील अश्रूंचा त्याच्यावर वर्षाव केला; नंतर त्याला आपल्याजवळ बसवून त्याला पुन: पुन: आलिंगन दिले. (७)

अथ ता मातरः सर्वाः समाजग्मुस्त्वरान्विताः ।
राघवं द्रष्टुकामास्तास्तृषार्ता गौर्यथा जलम् ॥ ८ ॥

त्यानंतर तहानेने व्याकुळ झालेली गाय ज्या प्रमाणे पाण्याकडे धावत जाते, त्या प्रमाणे रामांना पाहण्याची इच्छा असणाऱ्या त्या सर्व कौसल्या इत्यादी माता त्वरेने पुढे झाल्या. (८)

रामः स्वमातरं वीक्ष्य द्रुतमुत्थाय पादयोः ।
ववन्दे साश्रु सा पुत्रमालिङ्ग्यातीव दुःखिता ॥ ९ ॥

आपल्या आईला पाहून श्रीराम चट्दिशी उठले आणि त्यांनी मातेच्या पायांना वंदन केले. तेव्हा तिने दुःखाने डोळ्यांत अश्रू आणून पुत्राला मिठी मारली. (९)

इतराश्च तथा नत्वा जननी रघुनन्दनः ।
ततः समागतं दृष्ट्वा वसिष्ठं मुनिपुङ्गवम् ॥ १० ॥

साष्टाङ्गं प्रणिपत्याह धन्योऽस्मीति पुनः पुनः ।
यथार्हमुपवेश्याह सर्वानेव रघूद्वहः ॥ ११ ॥

त्यानंतर इतर मातांनासुद्धा रघुनंदन श्रीरामांनी नमस्कार केला. मुनिश्रेष्ठ वसिष्ठ आलेले आहेत हे पाहिल्यावर त्यांनी त्यांना साष्टांग प्रणिपात घातला आणि 'मी धन्य आहे' असे ते वारंवार म्हणू लागले. योग्यतेप्रमाणे सर्वांनाच बसण्यास सांगून रघुश्रेष्ठ राम बोलले. (१०-११)

पिता मे कुशली किं वा मां किमाहातिदुःखितः ।
वसिष्ठस्तमुवाचेदं पिता ते रघुनन्दन ॥ १२ ॥

त्वद्वियोगाभितप्तात्मा त्वामेव परिचिन्तयन् ।
राम रामेति सीतेति लक्ष्मणेति ममार ह ॥ १३ ॥

"सांगा, माझे पिताजी कुशल आहेत ना ? माझ्या वियोगाने अतिशय दुःखी झालेल्या पिताजींनी मला काय आज्ञा केली आहे ?" तेव्हा वसिष्ठ त्यांना म्हणाले "हे रघुनन्दना, तुमच्या वियोगाने दशरथ महाराजांचे मन अतिशय उद्विग्न झाले होते. तुमचे चिंतन करीत आणि 'हे रामा ! हे रामा ! हे सीते ! हे लक्ष्मणा !' असे म्हणत त्यांनी आपले प्राण सोडले." (१२-१३)

श्रुत्वा तत्कर्णशूलाभं गुरोर्वचनमञ्जसा ।
हा हतोऽस्मीति पतितो रुदन् रामः सलक्ष्मणः ॥ १४ ॥

कानाला शूलाप्रमाणे वाटणारे ते गुरूंचे शब्द ऐकल्यावर, 'हाय ! मी मेलो,' असा विलाप करीत, श्रीराम लक्ष्मणासह एकदम जमिनीवर कोसळले. (१४)

ततोऽनुरुरुदुः सर्वा मातरश्च तथापरे ।
हा तात मां परित्यज्य क्व गतोऽसि घृणाकर ॥ १५ ॥

त्या वेळी सर्व माता आणि इतर उपस्थित असणारे लोकही रडू लागले. मग श्रीरामचंद्र म्हणू लागले, "हाय बाबा ! हे दयाळू पिताजी ! मला टाकून देऊन तुम्ही कोठे गेलात ? (१५)

अनाथोऽस्मि महाबाहो मां को वा लालयेदितः ।
सीता च लक्ष्मणश्चैव विलेपतुरतो भृशम् ॥ १६ ॥

हे महाबाहो, मी आता अनाथ झालो आहे. यापुढे माझे लाड कोण करील ?" नंतर सीता आणि लक्ष्मण यांनी त्यापेक्षाही खूपच विलाप केला. (१६)

वसिष्ठः शान्तवचनैः शमयामास तां शुचम् ।
ततो मन्दाकिनीं गत्वा स्नात्वा ते वीतकल्मषाः ॥ १७ ॥

तेव्हा शांतिपूर्ण वचनांनी वसिष्ठांनी त्यांचा तो शोक निवारण केला. मंदाकिनीवर जाऊन आणि तेथे स्नान करून ते सर्वजण शुचिर्भूत झाले. (१७)

राज्ञे ददुर्जलं तत्र सर्वे ते जलकाङ्क्षिणे ।
पिण्डान्निर्वापयामास रामो लक्ष्मणसंयुतः ॥ १८ ॥

तेथे त्या सर्वांनी महाराज दशरथांना जलांजली दिली. नंतर लक्ष्मणासह श्रीरामांनी पिंडदान केले. (१८)

इङ्गुदीफलपिण्याकरचितान्मधुसम्प्लुतान् ।
वयं यदन्नाः पितरस्तदन्नाः स्मृतिनोदिताः ॥ १९ ॥

'आमचे जे अन्न आहे तेच अन्न पितरांना चालेल असे स्मृतींनी सांगितले आहे,' असे म्हणून इंगुदी फळाचे पिंड बनवून व त्यावर मध घालून रामांनी पिंडदान केले. (१९)

इति दु:खाश्रुपूर्णाक्ष: पुन: स्नात्वा गृहं ययौ ।
सर्वे रुदित्वा सुचिरं स्नात्वा जग्मुस्तदाश्रमम् ॥ २० ॥

त्यानंतर डोळे दु:खाश्रूंनी भरलेले श्रीराम पुन: स्नान करून आश्रमाकडे परतले. इतर सर्व जणही पुष्कळ वेळ रडले आणि नंतर स्नान करून श्रीरामांच्या आश्रमाकडे परत गेले. (२०)

तस्मिंस्तु दिवसे सर्वे उपवासं प्रचक्रिरे ।
तत: परेद्युर्विमले स्नात्वा मन्दाकिनीजले ॥ २१ ॥

उपविष्टं समागम्य भरतो राममब्रवीत् ।
राम राम महाभाग स्वात्मानमभिषेचय ॥ २२ ॥

त्या दिवशी सर्वांनी उपवास केला. नंतर दुसरे दिवशी मंदाकिनीच्या निर्मळ जळात स्नान करून, भरताने आश्रमात बसलेल्या श्रीरामांजवळ जाऊन त्यांना म्हटले "अहो राम, अहो महाभाग, तुम्ही स्वत: आपल्यावर राज्याभिषेक करून घ्या. (२१-२२)

राज्यं पालय पित्र्यं ते ज्येष्ठस्त्वं मे पिता यथा ।
क्षत्रियाणामयं धर्मो यत्प्रजापरिपालनम् ॥ २३ ॥

हे पैतृक राज्य तुमचेच आहे. तुम्ही त्याचे पालन करा. तुम्ही माझे ज्येष्ठ बंधू आहात. म्हणून तुम्ही मला पित्याप्रमाणे आहात. प्रजेचे पालन करणे हाच क्षत्रियांचा धर्म आहे. (२३)

इष्ट्वा यज्ञैर्बहुविधै: पुत्रानुत्पाद्य तन्तवे ।
राज्ये पुत्रं समारोप्य गमिष्यसि ततो वनम् ॥ २४ ॥

तेव्हा नाना प्रकारच्या यज्ञांनी यजन करून, वंशाचा तंतू सुरक्षित ठेवण्यासाठी पुत्रांना जन्म दिल्यानंतर ज्येष्ठ पुत्राला राजसिंहासनावर बसवून, मग तुम्ही वनात जा. (२४)

इदानीं वनवासस्य कालो नैव प्रसीद मे ।
मातुर्मे दुष्कृतं किञ्चित्स्मर्तुं नार्हसि पाहि न: ॥ २५ ॥

हा काही तुमचा वनवासाचा काळ नाही. तुम्ही माझ्यावर प्रसन्न व्हा. माझ्या मातेने जे काही वाईट कर्म केले आहे, ते तुम्ही लक्षात घेऊ नका. आमचे रक्षण करा." (२५)

इत्युक्त्वा चरणौ भ्रातु: शिरस्याधाय भक्तित: ।
रामस्य पुरत: साक्षाद्दण्डवत्पतितो भुवि ॥ २६ ॥

असे बोलून त्याने भक्तिपूर्वक प्रभू रामचंद्रांचे चरण आपल्या मस्तकावर घेतले आणि जमिनीवर दंडवत घातले. (२६)

उत्थाप्य राघव: शीघ्रमारोप्याङ्केऽतिभक्तित: ।
उवाच भरतं राम: स्नेहार्द्रनयन: शनै: ॥ २७ ॥

त्याला झटदिशी उठवून श्रीरामांनी अतिशय प्रेमाने आपल्याजवळ बसविले आणि प्रेमाने डोळे ओले झालेले श्रीराम हळूहळू भरताशी बोलू लागले. (२७)

शृणु वत्स प्रवक्ष्यामि त्वयोक्तं यत्तथैव तत् ।
किन्तु मामब्रवीत्तातो नव वर्षाणि पञ्च च ॥ २८ ॥

उषित्वा दण्डकारण्ये पुरं पश्चात्समाविश ।
इदानीं भरतायेदं राज्यं दत्तं मयाखिलम् ॥ २९ ॥

तत: पित्रैव सुव्यक्तं राज्यं दत्तं तवैव हि ।
दण्डकारण्यराज्यं मे दत्तं पित्रा तथैव च ॥ ३० ॥

"वत्सा, मी आता जे सांगणार आहे ते तू ऐक. तू आत्ता जे सांगितलेस ते खरे आहे. तथापि पिताजी मला म्हणाले आहेत की 'चौदा वर्षे तू दंडकारण्यात राहून त्यानंतर अयोध्या नगरात प्रवेश कर. या वेळी हे संपूर्ण राज्य मी भरताला दिले आहे.' याचा अर्थ असा की त्या वेळी पिताजींनीच हे राज्य तुलाच दिले आहे, ही गोष्ट अगदी स्पष्ट आहे. तसेच त्यांनी मला दंडकारण्याचे राज्य दिले आहे, हीसुद्धा गोष्ट अगदी स्पष्ट आहे. (२८-३०)

अत: पितुर्वच: कार्यमावाभ्यामतियत्नत: ।
पितुर्वचनमुल्लङ्घ्य स्वतन्त्रो यस्तु वर्तते ॥ ३१ ॥

म्हणून आपण दोघांनी अतिशय प्रयत्नपूर्वक पित्याचे वचन पूर्ण करावयास हवे. या उलट पित्याच्या वचनाचे उल्लंघन करून जो स्वेच्छेने वागतो, तो जिवंत

स: जीवन्नेव मृतको देहान्ते निरयं व्रजेत् ।
तस्माद्राज्यं प्रशाधि त्वं वयं दण्डकपालकाः ॥ ३२ ॥

असतानाच मेल्यासारखा होतो आणि तो शरीर पडल्यावर नरकात जातो. म्हणून तू राज्य सांभाळ व मी दंडकारण्याचे रक्षण करतो." (३१-३२)

भरतस्त्वब्रवीद्रामं कामुको मूढधीः पिता ।
स्त्रीजितो भ्रान्तहृदय उन्मत्तो यदि वक्ष्यति ।
तत्सत्यमिति न ग्राह्यं भ्रान्तवाक्यं यथा सुधीः ॥ ३३ ॥

तेव्हा भरत रामांना बोलला, "कामुक, मूढबुद्धीच्या, स्त्रीने वश केलेल्या, भ्रांत चित्त आणि उन्मत्त अशा पित्याने जर काही सांगितले असेल तर ते सत्य आहे, असे समजून ते ग्राह्य मानावयाचे नसते. बुद्धिमान मनुष्य भ्रांत माणसाचे वचन खरे मानीत नाही." (३३)

*श्रीराम उवाच*

न स्त्रीजितः पिता ब्रूयान्न कामी नैव मूढधीः ।
पूर्वं प्रतिश्रुतं तस्यै सत्यवादी ददौ भयात् ॥ ३४ ॥

**श्रीराम म्हणाले–** "स्त्रीवश झालेल्या, कामुक तसेच मूढबुद्धी अशा राजांनी तसे म्हटलेले नाही. सत्यवादी पिताजी कैकेयी मातेला पूर्वी कबूल केलेले वर देण्यासाठी वचनबद्ध होते. जर त्यांनी तसे केले नसते, तर वचन-भंग झाला असता. या भीतीमुळे ते वर दिले होते. (३४)

असत्याद्भीतिरधिका महतां नरकादपि ।
करोमीत्यहमप्येतत्सत्यं तस्यै प्रतिश्रुतम् ॥ ३५ ॥

महान पुरुषांना नरकापेक्षासुद्धा असत्याची भीती अधिक वाटते. 'माता कैकेयीला दिलेल्या वचनानुसार पित्याने सांगितलेले हे सर्व मी करीन' असे सांगून मीसुद्धा त्यांना खरेखुरे आश्वासन दिले आहे. (३५)

कथं वाक्यमहं कुर्यामसत्यं राघवो हि सन् ।
इत्युदीरितमाकर्ण्य रामस्य भरतोऽब्रवीत् ॥ ३६ ॥

रघुकुळात जन्मलो असताना मी माझे वचन असत्य कसे बरे करू ?" अशा प्रकारे रामांनी उच्चारलेले वचन ऐकल्यावर भरत त्यांना म्हणाला. (३६)

तथैव चीरवसनो वने वत्स्यामि सुव्रत ।
चतुर्दश समास्त्वं तु राज्यं कुरु यथासुखम् ॥ ३७ ॥

"हे सुव्रता, तुमच्याप्रमाणेच वल्कल वस्त्र धारण करून मी तुमचा प्रतिनिधी म्हणून चौदा वर्षे वनात राहीन. तुम्ही सुखाने राज्य करा." (३७)

*श्रीराम उवाच*

पित्रा दत्तं तवैवैतद्राज्यं मह्यं वनं ददौ ।
व्यत्ययं यद्यहं कुर्यामसत्यं पूर्ववत् स्थितम् ॥ ३८ ॥

**श्रीराम म्हणाले-** "पित्याने हे राज्य तुलाच दिले आहे आणि मला वनवास दिला आहे. जर मी त्याच्या विपरीत करीन तर असत्य हे पूर्वीप्रमाणे जसेच्या तसे राहील." (३८)

*भरत उवाच*

अहमप्यागमिष्यामि सेवे त्वां लक्ष्मणो यथा ।
नोचेत्प्रायोपवेशेन त्यजाम्येतत्कलेवरम् ॥ ३९ ॥

**भरत म्हणाला–** "ठीक आहे. तुम्ही वनातून परत येणार नसाल तर मीसुद्धा तुमच्याबरोबर वनात येतो. आणि लक्ष्मणाप्रमाणे तुमची सेवा करतो. असे न झाल्यास मी प्रायोपवेशन करून या माझ्या शरीराचा त्याग करीन." (३९)

इत्येवं निश्चयं कृत्वा दर्भानास्तीर्य चातपे ।
मनसापि विनिश्चित्य प्राङ्मुखोपविवेश सः ॥ ४० ॥

अशा प्रकारे मनात दृढनिश्चय करून, त्याने उन्हामध्ये दर्भ पसरले व पूर्वेकडे तोंड करून तो भरत खाली बसला. (४०)

भरतस्यापि निर्बन्धं दृष्ट्वा रामोऽतिविस्मितः ।
नेत्रान्तसंज्ञां गुरवे चकार रघुनन्दनः ॥ ४१ ॥

भरताचा तो हट्ट पाहून श्रीराम अतिशय विस्मय चकित झाले. मग रघुनंदन श्रीरामांनी गुरू वसिष्ठांना डोळ्यांनी खूण केली. (४१)

एकान्ते भरतं प्राह वसिष्ठो ज्ञानिनां वरः ।
वत्स गुह्यं शृणुष्वेदं मम वाक्यात्सुनिश्चितम् ॥ ४२ ॥

तेव्हा ज्ञान्यांमध्ये श्रेष्ठ अशा वसिष्ठांनी भरताला एकांतात म्हटले, "वत्सा, मी सांगतो ते निश्चित असे गुह्य आहे, ते तू ऐक. (४२)

रामो नारायणः साक्षाद्ब्रह्मणा याचितः पुरा ।
रावणस्य वधार्थाय जातो दशरथात्मजः ॥ ४३ ॥

राम हे प्रत्यक्ष भगवान् नारायण आहेत. पूर्वी ब्रह्मदेवाने त्यांच्याकडे प्रार्थना केली होती. त्यानुसार रावणाचा वध करण्यासाठी विष्णू नारायण हे दशरथांचा पुत्र म्हणून जन्माला आलेले आहेत. (४३)

योगमायापि सीतेति जाता जनकनन्दिनी ।
शेषोऽपि लक्ष्मणो जातो राममन्वेति सर्वदा ॥ ४४ ॥

नारायणाची योगमाया हीसुद्धा जनकाची कन्या म्हणून जन्माला आली आहे. आणि शेष नाग हासुद्धा लक्ष्मण म्हणून जन्माला आला आहे. तो नेहमी रामांच्याबरोबर मागे जात असतो. (४४)

रावणं हन्तुकामास्ते गमिष्यन्ति न संशयः ।
कैकेय्या वरदानादि यद्यन्निष्ठुरभाषणम् ॥ ४५ ॥

सर्वं देवकृतं नोचेदेवं सा भाषयेत्कथम् ।
तस्मात्त्यजाग्रहं तात रामस्य विनिवर्तने ॥ ४६ ॥

रावणाला ठार करण्याची इच्छा असल्यामुळे ते अरण्यात जातील, यात काहीही शंका नाही. कैकेयीने जे वरदान मागितले आणि जे काही निष्ठुर भाषण केले ते सर्व तिने देवांच्या प्रेरणेनुसार केले आहे. असे जर नसते तर ती असे कसे बोलली असती ? म्हणून हे वत्सा, श्रीरामांनी परत यावे हा तुझा हट्ट तू सोडून दे. (४५-४६)

निवर्तस्व महासैन्यैर्मातृभिः सहितः पुरम् ।
रावणं सकुलं हत्वा शीघ्रमेवागमिष्यति ॥ ४७ ॥

तेव्हा या मोठ्या सैन्यासह, मातांना बरोबर घेऊन, तू अयोध्या नगरीला परत जा. कुळासकट रावणाचा वध करून राम लौकरच परत येतील." (४७)

इति श्रुत्वा गुरोर्वाक्यं भरतो विस्मयान्वितः ।
गत्वा समीपं रामस्य विस्मयोत्फुल्ललोचनः ॥ ४८ ॥

पादुके देहि राजेन्द्र राज्याय तव पूजिते ।
तयोः सेवां करोम्येव यावदागमनं तव ॥ ४९ ॥

गुरूचे हे शब्द ऐकून भरत विस्मित होऊन गेला. आश्चर्याने त्याचे डोळे विस्फारले. तो श्रीरामांच्याजवळ जाऊन त्यांना म्हणाला, "हे राजेंद्रा, जगाला पूज्य असणाऱ्या तुमच्या पादुका राज्य करण्यासाठी मला द्या. तुमचे आगमन होईपर्यंत मी त्या पादुकांचीच सेवा करीत राहीन." (४८-४९)

इत्युक्त्वा पादुके दिव्ये योजयामास पादयोः ।
रामस्य ते ददौ रामो भरतायातिभक्तितः ॥ ५० ॥

असे बोलून दोन दिव्य पादुका भरताने श्रीरामांच्या दोन चरणांमध्ये घातल्या. भरताची ती अतिशय भक्ती पाहून रामांनी भरताला त्या दोन पादुका मोठ्या प्रेमाने दिल्या. (५०)

गृहीत्वा पादुके दिव्ये भरतो रत्नभूषिते ।
रामं पुनः परिक्रम्य प्रणनाम पुनः पुनः ॥ ५१ ॥

रत्नांनी भूषित अशा त्या दिव्य पादुका घेऊन भरताने श्रीरामांना पुनः प्रदक्षिणा घातली आणि पुनः पुनः प्रणाम केला. (५१)

भरतः पुनराहेदं भक्त्या गद्गदया गिरा ।
नवपञ्चसमान्ते तु प्रथमे दिवसे यदि ॥ ५२ ॥

नागमिष्यसि चेद्राम प्रविशामि महानलम् ।
बाढमित्येव तं रामो भरतं संन्यवर्तयत् ॥ ५३ ॥

भक्तीने गद्गद झालेल्या वाणीने भरत पुनः असे म्हणाला, "चौदा वर्षे संपल्यानंतर, अगदी पहिल्याच दिवशी हे रामा, तुम्ही जर परत आला नाहीत, तर मी अग्नीत प्रवेश करीन." "ठीक आहे" असे म्हणून श्रीरामांनी त्याला जाण्यास निरोप दिला. (५२-५३)

ससैन्यः सवसिष्ठश्च शत्रुघ्नसहितः सुधीः ।
मातृभिर्मन्त्रिभिः सार्धं गमनायोपचक्रमे ॥ ५४ ॥

तेव्हा सर्व सैन्य, वसिष्ठ, शत्रुघ्न, सर्व माता आणि मंत्री यांच्यासह, बुद्धिमान भरताने परत जाण्याची तयारी केली. (५४)

कैकेयी राममेकान्ते स्त्रवन्नेत्रजलाकुला ।
प्राञ्जलिः प्राह हे राम तव राज्यविघातनम् ॥ ५५ ॥

कृतं मया दुष्टधिया मायामोहितचेतसा ।
क्षमस्व मम दौरात्म्यं क्षमासारा हि साधवः ॥ ५६ ॥

त्या वेळी, डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रूंनी व्याकूळ झालेली कैकेयी एकांत स्थानी हात जोडून श्रीरामांना म्हणाली, "अरे रामा, माझे मन मायेमुळे मोहित झाल्यामुळे माझी बुद्धी भ्रष्ट झाली आणि म्हणून मी तुझ्या राज्याभिषेकात विघ्न निर्माण केले. माझ्या या दुष्टपणाची तू क्षमा कर. कारण क्षमा करणे हेच साधूंचे वैशिष्ट्य असते. (५५-५६)

त्वं साक्षाद्विष्णुरव्यक्तः परमात्मा सनातनः ।
मायामानुषरूपेण मोहयस्यखिलं जगत् ।
त्वयैव प्रेरितो लोकः कुरुते साध्वसाधु वा ॥ ५७ ॥

तू साक्षात विष्णू आहेस, अव्यक्त आणि सनातन परमात्मा आहेस. माया-मानुष रूपाने तू सर्व जगाला मोहित करीत आहेस. तुझ्याच प्रेरणेने लोक शुभ किंवा अशुभ कर्मे करीत असतात. (५७)

त्वदधीनमिदं विश्वमस्वतन्त्रं करोति किम् ।
यथा कृत्रिमनर्तक्यो नृत्यन्ति कुहकेच्छया ॥ ५८ ॥

त्वदधीना तथा माया नर्तकी बहुरूपिणी ।
त्वयैव प्रेरिताहं च देवकार्यं करिष्यता ॥ ५९ ॥

पापिष्ठं पापमनसा कर्माचरमरिन्दम ।
अद्य प्रतीतोऽसि मम देवानामप्यगोचरः ॥ ६० ॥

हे संपूर्ण विश्व तुझ्या अधीन आहे. साहजिकच स्वतंत्र नसणारे हे जग स्वतः काय करू शकेल ? ज्याप्रमाणे कठपुतळ्या सूत्रधाराच्या इच्छेनुसार नाचत राहातात, त्याप्रमाणे अनेक रूपे धारण करणारी ही मायारूपी नर्तकी तुझ्या अधीन आहे आणि हे शत्रुदमना, देवांचे कार्य करू इच्छिणाऱ्या तुझ्याकडूनच प्रेरित होऊन मी आपल्या दुष्ट बुद्धीने हे अतिशय पापी कर्म केले. देवांना सुद्धा अगोचर असणारा तू आज मला कळून आला आहेस. (५८-६०)

पाहि विश्वेश्वरानन्त जगन्नाथ नमोऽस्तु ते ।
छिन्धि स्नेहमयं पाशं पुत्रवित्तादिगोचरम् ॥ ६१ ॥

त्वज्ज्ञानानलखड्गेन त्वामहं शरणं गता ।
कैकेय्या वचनं श्रुत्वा रामः सस्मितमब्रवीत् ॥ ६२ ॥

हे विश्वेश्वरा, हे अनंता, माझे रक्षण कर. हे जगन्नाथा, तुला नमस्कार असो. मी तुला शरण आले आहे. तुझ्याविषयीच्या ज्ञानरूपी तलवारीने तू पुत्र, वित्त इत्यादींचे बाबतीत असणारा माझा स्नेहरूपी पाश तोडून टाक." कैकेयीचे हे वचन ऐकल्यावर स्मित करून श्रीरामचंद्र म्हणाले. (६१-६२)

यदाह मां महाभागे नानृतं सत्यमेव तत् ।
मयैव प्रेरिता वाणी तव वक्त्राद्विनिर्गता ॥ ६३ ॥

देवकार्यार्थसिद्ध्यर्थमत्र दोषः कुतस्तव ।
गच्छ त्वं हृदि मां नित्यं भावयन्ती दिवानिशम् ॥ ६४ ॥

सर्वत्र विगतस्नेहा मद्भक्त्या मोक्ष्यसेऽचिरात् ।
अहं सर्वत्र समदृग् द्वेष्यो वा प्रिय एव वा ॥ ६५ ॥

"हे महाभागे, तू जे आत्ता बोललीस ते खोटे नाही, ते खरेच आहे. देवांच्या कार्यसिद्धीसाठी, मीच प्रेरणा दिलेली तुझी वाणी तुझ्या मुखातून बाहेर पडली. या बाबतीत तुझा दोष कसला ? आता तू परत जा. हृदयात रात्रंदिवस माझेच चिंतन करीत तू सर्व बाबतीत स्नेहरहित हो, माझ्या भक्तीमुळे लौकरच मुक्त होऊन जाशील. सर्व ठिकाणी माझी समदृष्टी आहे. त्यामुळे मला कोणीही अप्रिय किंवा प्रिय नाही. (६३-६५)

नास्ति मे कल्पकस्येव भजतोऽनुभजाम्यहम् ।
मन्मायामोहितधियो मामम्ब मनुजाकृतिम् ॥ ६६ ॥

सुखदु:खाद्यनुगतं जानन्ति न तु तत्त्वत: ।
दिष्ट्या मद्गोचरं ज्ञानमुत्पन्नं ते भवापहम् ॥ ६७ ॥

आपणच निर्माण केलेल्या पदार्थांचे ठिकाणी ज्या प्रमाणे जादुगार हा राग अथवा द्वेष ठेवीत नाही, त्याप्रमाणे कुणाचेही ठिकाणी माझा राग आणि द्वेष नाही. जो पुरुष ज्या प्रकाराने मला भजतो, त्याला अनुसरून मी त्याच्याकडे लक्ष देतो. अग आई, माझ्याच मायेने ज्यांची बुद्धी मोहित झाली आहे, असे लोक सुख-दु:ख इत्यादींनी युक्त असे मनुष्य रूप धारण केलेला मी आहे, असे समजतात; ते लोक मला माझ्या खऱ्या स्वरूपात जाणत नाहीत. संसाराच्या भयाला दूर करणारे असे माझ्या विषयीचे ज्ञान हे तुझ्या ठिकाणी उत्पन्न झाले आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. (६६-६७)

स्मरन्ती तिष्ठ भवने लिप्यसे न च कर्मभि: ।
इत्युक्त्वा सा परिक्रम्य रामं सानन्दविस्मया ॥ ६८ ॥

प्रणम्य शतशो भूमौ ययौ गेहं मुदान्विता ।
भरतस्तु सहामात्यैर्मातृभिर्गुरुणा सह ॥ ६९ ॥

अयोध्यामगमच्छीघ्रं राममेवानुचिन्तयन् ।
पौरजानपदान् सर्वानयोध्यायामुदारधी: ॥ ७० ॥

स्थापयित्वा यथान्यायं नन्दिग्रामं ययौ स्वयम् ।
तत्र सिंहासने नित्यं पादुके स्थाप्य भक्तित: ॥ ७१ ॥

पूजयित्वा यथा रामं गन्धपुष्पाक्षतादिभि: ।
राजोपचारैरखिलै: प्रत्यहं नियतव्रत: ॥ ७२ ॥

फलमूलाशनो दान्तो जटावल्कलधारक: ।
अध:शायी ब्रह्मचारी शत्रुघ्नसहितस्तदा ॥ ७३ ॥

माझे स्मरण करीत तू घरातच राहा. तू कर्मांनी लिप्त होणार नाहीस," श्रीरामांनी असे सांगितल्यावर, कैकेयीला आनंद आणि विस्मय वाटला. रामांना प्रदक्षिणा घालून आणि जमिनीवर मस्तक टेकवून व शेकडो वेळा प्रणाम करून कैकेयी आनंदाने घरी निघाली. इकडे अमात्य, सर्व माता आणि गुरू वसिष्ठ यांच्यासह भरत हासुद्धा रामांचेच चिंतन करीत तातडीने अयोध्या नगरीस गेला. सर्व नगरवासी आणि ग्रामवासी लोकांना अयोध्येमध्ये यथायोग्यपणे राहण्यास सांगून उदार बुद्धी असणारा भरत स्वत: मात्र नंदिग्रामात गेला. तेथे एका सिंहासनावर श्रीरामांच्या पादुका भक्तीने कायमच्या स्थापन करून, भरत गंध, फुले, अक्षता इत्यादी राजोचित सर्व सामग्रीने रामांची पूजा करण्याचे व्रत दररोज पाळू लागला. इंद्रियांचे दमन करून, फळे आणि मुळे यांचे भोजन करीत, जटा व वल्कले धारण करून व ब्रह्मचर्य पाळून, तो शत्रुघ्नासह खाली जमिनीवर झोपू लागला. (६८-७३)

राजकार्याणि सर्वाणि यावन्ति पृथिवीतले ।
तानि पादुकयो: सम्यङ्‌निवेदयति राघव: ॥ ७४ ॥

पृथ्वीवरील जितकी म्हणून राजकार्ये येत ती सर्व तो रघुश्रेष्ठ भरत योग्य प्रकारे पादुकांना निवेदन करीत असे. (७४)

गणयन् दिवसानेव रामागमनकाङ्क्षया ।
स्थितो रामार्पितमना: साक्षाद्‌ब्रह्ममुनिर्यथा ॥ ७५ ॥

रामस्तु चित्रकूटाद्रौ वसन्मुनिभिरावृत: ।
सीतया लक्ष्मणेनापि किञ्चित्कालमुपावसत् ॥ ७६ ॥

अशा प्रकारे श्रीरामांच्या आगमनाची प्रतीक्षा करीत आणि दिवस मोजीत, रामांच्या ठिकाणी मन अर्पण करून, भरत एखाद्या साक्षात ब्रह्मर्षीप्रमाणे राहू लागला. इकडे मुनींच्या समवेत श्रीराम, सीता व लक्ष्मण यांचेसह चित्रकूट पर्वतावर काही काळ राहिले. (७५-७६)

नागराश्च सदा यान्ति रामदर्शनलालसा: ।
चित्रकूटस्थितं ज्ञात्वा सीतया लक्ष्मणेन च ॥ ७७ ॥

सीता आणि लक्ष्मण यांच्यासह श्रीराम चित्रकूट पर्वतावर राहात आहेत हे कळल्यावर, त्यांचे दर्शन घेण्याच्या इच्छेने जवळपासच्या नगरांत राहाणारे लोक नेहमी तेथे येऊ लागले. (७७)

दृष्ट्वा तज्जनसम्बाधं रामस्तत्याज तं गिरिम् ।
दण्डकारण्यगमने कार्यमप्यनुचिन्तयन् ॥ ७८ ॥

त्या लोकांचा सततचा संपर्क पाहून आणि दंडकारण्यात येण्याच्या आपल्या कार्याचा विचार करून श्रीरामांनी तो पर्वत सोडला. (७८)

अन्वगात्सीतया भ्रात्रा ह्यत्रेराश्रममुत्तमम् ।
सर्वत्र सुखसंवासं जनसम्बाधवर्जितम् ॥ ७९ ॥

त्यानंतर सीता आणि लक्ष्मण यांच्यासह राम अत्रि-ऋषींच्या अतिशय उत्तम असलेल्या आणि जनसंपर्काने रहित असलेल्या आश्रमात गेले. तो आश्रम सर्व प्रकारे सुखाने राहाण्यास योग्य होता. (७९)

गत्वा मुनिमुपासीनं भासयन्तं तपोवनम् ।
दण्डवत्प्रणिपत्याह रामोऽहमभिवादये ॥ ८० ॥

संपूर्ण तपोवनाला प्रकाशित करीत, आश्रमात वसलेल्या त्या मुनींजवळ जाऊन आणि त्यांना दंडवत् प्रणाम करून श्रीराम म्हणाले, "अहो मुनीश्वर, मी राम तुम्हांला अभिवादन करीत आहे. (८०)

पितुराज्ञां पुरस्कृत्य दण्डकाननमागतः ।
वनवासमिषेणापि धन्योऽहं दर्शनात्तव ॥ ८१ ॥

पित्याची आज्ञा शिरोधार्थ मानून मी दंडकारण्यात आलो आहे. या वेळी वनवासाच्या निमित्ताने का होईना आपले दर्शन झाल्याने मी कृतार्थ झालो आहे ." (८१)

श्रुत्वा रामस्य वचनं रामं ज्ञात्वा हरिं परम् ।
पूजयामास विधिवद्भक्त्या परमया मुनिः ॥ ८२ ॥

श्रीरामांचे हे वचन ऐकल्यावर आणि श्रीराम हे प्रत्यक्ष परब्रह्म आहेत, असे जाणून मुनिवरांनी अतिशय भक्तीने त्यांची विधिवत पूजा केली. (८२)

वन्यैः फलैः कृतातिथ्यमुपविष्टं रघूत्तमम् ।
सीतां च लक्ष्मणं चैव संतुष्टो वाक्यमब्रवीत् ॥ ८३ ॥

वनातील फळांनी ज्यांचा आदर-सत्कार केलेला आहे व जे आसनावर बसले आहेत, अशा रघूत्तमांना, सीतेला आणि लक्ष्मणाला ते मुनी प्रसन्न होऊन असे बोलले. (८३)

भार्या मेऽतीव संवृद्धा ह्यनसूयेति विश्रुता ।
तपश्चरन्ती सुचिरं धर्मज्ञा धर्मवत्सला ॥ ८४ ॥

"माझी पत्नी अनसूया या नावाने विख्यात आहे. ती अतिशय वृद्ध आहे. तिने पुष्कळ काळ तपश्चर्या केली आहे. ती धर्म जाणणारी आणि धर्मावर प्रेम करणारी आहे. (८४)

अन्तस्तिष्ठति तां सीता पश्यत्वरिनिषूदन ।
तथेति जानकीं प्राह रामो राजीवलोचनः ॥ ८५ ॥

ती आत आहे. हे शत्रुदमन रामा, सीतेला तिची भेट घेऊ दे." तेव्हा 'ठीक आहे' असे म्हणून कमलनयन रामचंद्रांनी जानकीला सांगितले. (८५)

गच्छ देवीं नमस्कृत्य शीघ्रमेहि पुनः शुभे ।
तथेति रामवचनं सीता चापि तथाकरोत् ॥ ८६ ॥

"हे कल्याणी, जा, देवी अनसूयेला नमस्कार करून लौकर ये." 'ठीक आहे' असे म्हणून सीतेने श्रीरामांच्या वचनाप्रमाणे केले. (८६)

दण्डवत्पतितामग्रे सीतां दृष्ट्वातिहृष्टधीः ।
अनसूया समालिङ्ग्य वत्से सीतेति सादरम् ॥ ८७ ॥

दिव्ये ददौ कुण्डले द्वे निर्मिते विश्वकर्मणा ।
दुकूले द्वे ददौ तस्यै निर्मले भक्तिसंयुता ॥ ८८ ॥

आपल्या पुढे दंडवत घातलेल्या सीतेला पाहून अनसूयेचे मन अतिशय आनंदित झाले. आदरपूर्वक तिला आलिंगन देऊन, 'मुली सीते ' असे म्हणून आणि भक्तीने युक्त होऊन, विश्वकर्म्याने निर्माण केलेली दोन दिव्य कुंडले आणि दोन निर्मळ रेशमी वस्त्रे अनसूयेने तिला दिली. (८७-८८)

अङ्गरागं च सीतायै ददौ दिव्यं शुभानना ।
न त्यक्ष्यतेऽङ्गरागेण शोभा त्वां कमलानने ॥ ८९ ॥

तसेच सुंदर अनसूयेने सीतेला दिव्य अंगराग दिला आणि ती म्हणाली, "हे कमलमुखी सीते, हा अंगराग लावल्यामुळे तुझ्या शरीराची शोभा कधी क्षीण होणार नाही. (८९)

पातिव्रत्यं पुरस्कृत्य राममन्वेहि जानकि ।
कुशली राघवो यातु त्वया सह पुनर्गृहम् ॥ ९० ॥

हे जानकी, पातिव्रत्याचे पालन करीत तू नेहमी श्रीरामांच्या मागोमाग जा. तुझ्यासह श्रीराम सुखरूप स्थितीत पुन: घरी परत जावोत." (९०)

भोजयित्वा यथान्यायं रामं सीतासमन्वितम् ।
लक्ष्मणं च तदा रामं पुन: प्राह कृताञ्जलि: ॥ ९१ ॥

त्यानंतर यथायोग्यरीतीने सीतेसहित श्रीरामांना तिने भोजन घातले. पुन: हात जोडून ती श्रीराम व लक्ष्मण यांना म्हणाली . (९१)

राम त्वमेव भुवनानि विधाय तेषां
संरक्षणाय सुरमानुषतिर्यगादीन् ।
देहान्बिभर्षि न च देहगुणैर्विलिप्त-
स्त्वत्तो बिभेत्यखिलमोहकरी च माया ॥ ९२ ॥

"हे रामा, ही सर्व भुवने निर्माण करून, त्यांच्या रक्षणासाठी देव, मनुष्य, तिर्यक प्राणी यांचे देह तुम्ही धारण करता. तथापि तुम्ही त्या देहांच्या गुणांनी लिप्त होत नाही. सर्व विश्वाला मोहात टाकणारी तुमची माया हीसुद्धा तुम्हांला भीत असते." (९२)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकांडे नवम: सर्ग: ॥ ९ ॥

## अयोध्याकाण्ड समाप्त

ॐ

# अध्यात्मरामायण

## अरण्यकाण्ड

## प्रथम सर्ग

### विराध- वध

*श्रीमहादेव उवाच*

अथ तत्र दिनं स्थित्वा प्रभाते रघुनन्दनः।
स्नात्वा मुनिं समामन्त्र्य प्रयाणायोपचक्रमे ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, नंतर त्या दिवशी तेथे अत्रींच्या आश्रमात राहून दुसरे दिवशी प्रात:काळी स्नान करून व मुनींचा निरोप घेऊन रामांनी प्रयाण करण्याची तयारी केली. (१)

मुने गच्छामहे सर्वे मुनिमण्डलमण्डितम्।
विपिनं दण्डकं यत्र त्वमाज्ञातुमिहार्हसि ॥ २ ॥

(राम म्हणाले) "अहो मुनी, मुनिमंडळींनी सुशोभित अशा दंडकारण्यात आम्ही सर्व जण जाणार आहोत. तुम्ही आम्हांला अनुज्ञा द्यावी. (२)

मार्गप्रदर्शनार्थाय शिष्यानाज्ञमुमर्हसि।
श्रुत्वा रामस्य वचनं प्रहस्यात्रिर्महायशाः।
प्राह तत्र रघुश्रेष्ठं राम राम सुराश्रय ॥ ३ ॥

तसेच दंडकारण्याचा मार्ग दाखविण्यासाठी आपण शिष्यांना आज्ञा द्यावी." रामांचे वचन ऐकल्यावर महायशस्वी मुनी मोठ्यांदा हसून रघुश्रेष्ठ रामांना म्हणाले,

सर्वस्य मार्गद्रष्टा त्वं तव को मार्गदर्शकः।
तथापि दर्शयिष्यन्ति तव लोकानुसारिणः ॥ ४ ॥

"अहो रामा, देवांचा आश्रय असणाऱ्या अहो रामा, तुम्ही सर्वांना मार्ग दाखविणारे आहात. तुम्हांला मार्ग दाखवणारा कोण असेल बरे ? तथापि या वेळी लोकव्यवहाराप्रमाणे वागणाऱ्या तुम्हांला माझे शिष्य मार्ग दाखवतील." (३-४)

इति शिष्यान्समादिश्य स्वयं किञ्चित्तमन्वगात्।
रामेण वारितः प्रीत्या अत्रिः स्वभवनं ययौ ॥ ५ ॥

असे सांगून आणि शिष्यांना आज्ञा करून, मुनिवर अत्री स्वत:च काही अंतर रामांबरोबर गेले. मग रामांनी त्यांना मोठ्या प्रेमाने परत जाण्यास सांगितल्यावर अत्री स्वत:च्या आश्रमाकडे परत गेले. (५)

क्रोशमात्रं ततो गत्वा ददर्श महतीं नदीम्।
अत्रेः शिष्यानुवाचेदं रामो राजीवलोचनः ॥ ६ ॥

फक्त एक कोस अंतर गेल्यावर रामांना एक फार मोठी नदी दिसली. तेव्हा कमलनयन राम अत्रींच्या शिष्यांना म्हणाले. (६)

नद्याः सन्तरणे कश्चिदुपायो विद्यते न वा।
ऊचुस्ते विद्यते नौका सुदृढा रघुनन्दन ॥ ७ ॥

"हे बटूंनो, ही नदी पार करून जाण्यास काही उपाय आहे की नाही ?" तेव्हा ते शिष्य म्हणाले, " अहो रघुनंदना, येथे एक फार बळकट नौका आहे. (७)

तारयिष्यामहे युष्मान्वयमेव क्षणादिह।
ततो नावि समारोप्य सीतां राघवलक्ष्मणौ ॥ ८ ॥

क्षणात्सन्तारयामासुर्नदीं मुनिकुमारकाः।
रामाभिनन्दिताः सर्वे जग्मुरत्रेरथाश्रमम् ॥ ९ ॥

येथे आम्हीच तुम्हा सर्वांना तिच्यामध्ये बसवून क्षणात नदीच्या पलीकडील तीराला नेऊ." त्यानंतर सीता, राम व लक्ष्मण यांना नौकेत चढवून मुनिकुमारांनी एका क्षणात त्या सर्वांना नदीच्या पैलतीराला पोचविले. मग रामांनी त्यांची प्रशंसा केल्यावर ते सर्व मुनिकुमार नंतर अत्रींच्या आश्रमाकडे परत गेले. (८-९)

तावेत्य विपिनं घोरं झिल्लीझङ्कारनादितम् ।
नानामृगगणाकीर्णं सिंहव्याघ्रादिभीषणम् ॥ १० ॥

राक्षसैर्घोररूपैश्च सेवितं रोमहर्षणम् ।
प्रविश्य विपिनं घोरं रामो लक्ष्मणमब्रवीत् ॥ ११ ॥

त्यानंतर ते दोघे एका भयानक अरण्याजवळ आले. रातकिड्यांच्या झंकाराच्या नादाने निनादित झालेल्या, नाना प्रकारच्या वन्य पशूंच्या समूहांनी भरलेल्या, सिंह, वाघ इत्यादी हिंस्र पशूंमुळे भयंकर वाटणाऱ्या, भयंकर रूप असणारे राक्षस राहात असलेल्या, आणि रोमांचकारक, अशा त्या भयंकर वनात शिरल्यावर श्रीरामचंद्र लक्ष्मणाला म्हणाले. (१०-११)

इतः परं प्रयत्नेन गन्तव्यं सहितेन मे ।
धनुर्गुणेन संयोज्य शरानपि करे दधत् ॥ १२ ॥

अग्रे यास्याम्यहं पश्चात्त्वमन्वेहि धनुर्धरः ।
आवयोर्मध्यगा सीता मायेवात्मपरात्मनोः ॥ १३ ॥

"आता यापुढे आपण दोघांनी सावधपणे जावयास हवे. धनुष्याला प्रत्यंचा जोडून आणि हातात बाण घेऊन मी पुढे चालत राहातो, आणि माझ्यामागे तू धनुष्य धारण करून ये. ज्या प्रमाणे जीवात्मा आणि परमात्मा यांमध्ये माया असते, त्या प्रमाणे आपणा दोघांच्या मध्ये सीता असू दे. (१२-१३)

चक्षुश्चारय सर्वत्र दृष्टं रक्षोभयं महत् ।
विद्यते दण्डकारण्ये श्रुतपूर्वमरिन्दम ॥ १४ ॥

हे अरिदमना लक्ष्मणा, तू सावधपणे सगळीकडे दृष्टी फिरवत राहा. आपण पूर्वी ऐकल्याप्रमाणे या दंडकारण्यात राक्षसांचे फार मोठे भय दिसून येत आहे." (१४)

इत्येवं भाषमाणौ तौ जग्मतुः सार्धयोजनम् ।
तत्रैका पुष्करिण्यास्ते कह्लारकुमुदोत्पलैः ॥ १५ ॥

अशा प्रकारे परस्परांशी बोलत ते दोघे दीड योजन (सहा कोस) अंतर चालून गेले. त्या ठिकाणी कल्हार, कुमुदे, आणि कमळे यांनी भरलेली एक पुष्करिणी होती. (१५)

अम्बुजैः शीतलोदेन शोभमाना व्यदृश्यत ।
तत्समीपमथो गत्वा पीत्वा तत्सलिलं शुभम् ॥ १६ ॥

ऊषुस्ते सलिलाभ्याशे क्षणं छायामुपाश्रिताः ।
ततो ददृशुरायान्तं महासत्त्वं भयानकम् ॥ १७ ॥

कमळे व शीतल पाणी यांनी शोभणारी ती दिसत होती. नंतर जवळ जाऊन आणि तिचे स्वच्छ व शीतल पाणी पिऊन जवळच्या एका वृक्षाच्या छायेखाली ते तिघे क्षणभर विसावले. त्यावेळी त्यांना दिसले की एक भयानक महासामर्थ्यशाली राक्षस येत आहे. (१६-१७)

करालदंष्ट्रवदनं भीषयन्तं स्वगर्जितैः ।
वामांसे न्यस्तशूलाग्रग्रथितानेकमानुषम् ॥ १८ ॥

त्याच्या मुखात तीक्ष्ण दाढा होत्या. आपल्या गर्जनांनी तो इतरांना भिववीत होता. आणि त्याच्या डाव्या खांद्यावर ठेवलेल्या शूलाच्या टोकावर विद्ध केलेली अनेक माणसे लोंबत होती. (१८)

भक्षयन्तं गजव्याघ्रमहिषं वनगोचरम् ।
ज्यारोपितं धनुर्धृत्वा रामो लक्ष्मणमब्रवीत् ॥ १९ ॥

आणि तो वनात राहाणारे अनेक हत्ती, वाघ आणि रेडे यांना खात येत होता. त्याला पाहिल्यावर प्रत्यंचा जोडलेले धनुष्य हातात घेऊन श्रीरामचंद्र लक्ष्मणाला म्हणाले. (१९)

पश्य भ्रातर्महाकायो राक्षसोऽयमुपागतः ।
आयात्यभिमुखं नोऽग्रे भीरूणां भयमावहन् ॥ २० ॥

"अरे बंधो, बघ. प्रचंड शरीर असणारा हा राक्षस जवळ येत आहे. भित्र्या माणसांच्या ठिकाणी भय निर्माण करणारा हा राक्षस समोरून आपल्याकडे तोंड करून येत आहे. (२०)

सज्जीकृतधनुस्तिष्ठ मा भैर्जनकनन्दिनि ।
इत्युक्त्वा बाणमादाय स्थितो राम इवाचलः ॥ २१ ॥

हे लक्ष्मणा, धनुष्य सज्ज करून तू तयारीत उभा राहा. हे जनकनंदिनी, तू भिऊ नकोस." असे सांगून व धनुष्यावर बाण चढवून श्रीराम एखाद्या पर्वताप्रमाणे निश्चल उभे राहिले. (२१)

स तु दृष्ट्वा रमानाथं लक्ष्मणं जानकीं तदा ।
अट्टहासं ततः कृत्वा भीषयन्निदमब्रवीत् ॥ २२ ॥

त्या वेळी श्रीराम, लक्ष्मण आणि जानकी यांना पाहिल्यावर मोठ्याने हसून हाः हाः करीत भीती दाखवीत तो राक्षस म्हणाला. (२२)

कौ युवां बाणतूणीरजटावल्कलधारिणौ ।
मुनिवेषधरौ बालौ स्त्रीसहायौ सुदुर्मदौ ॥ २३ ॥

"अरे पोरांनो, तुम्ही मुनीचा वेष आणि बाण, भाते, जटा आणि वल्कले धारण केली आहेत. तुमच्या बरोबर एक स्त्री आहे. तुम्ही मला फार मदोन्मत दिसता. तुम्ही दोघे कोण आहात ? (२३)

सुन्दरौ बत मे वक्त्रप्रविष्टकवलोपमौ ।
किमर्थमागतौ घोरं वनं व्यालनिषेवितम् ॥ २४ ॥

खरोखर तुम्ही सुंदर असे दोघे माझ्या तोंडात जाणाऱ्या घासाप्रमाणे आहात. हिंस्र प्राण्यांनी भरलेल्या या घोर वनात तुम्ही कशासाठी आला आहात ?" (२४)

श्रुत्वा रक्षोवचो रामः स्मयमान उवाच तम् ।
अहं रामस्त्वयं भ्राता लक्ष्मणो मम सम्मतः ॥ २५ ॥

राक्षसाचे वचन ऐकल्यावर हसत हसत श्रीराम त्याला म्हणाले, "मी राम आहे. आणि हा माझा धाकटा लाडका भाऊ लक्ष्मण आहे. (२५)

एषा सीता मम प्राणवल्लभा वयमागताः ।
पितृवाक्यं पुरस्कृत्य शिक्षणार्थं भवादृशाम् ॥२६ ॥

तसेच मला प्राणाप्रमाणे प्रिय असणारी ही सीता माझी भार्या आहे. पित्याचे वचन शिरोधार्थ मानून, तुमच्या सारख्यांना शिक्षा करण्यासाठी आम्ही वनात आलो आहोत." (२६)

श्रुत्वा तद्रामवचनमट्टहासमथाकरोत् ।
व्यादाय वक्त्रं बाहुभ्यां शूलमादाय सत्वरः ॥२७॥

श्रीरामांचे वचन ऐकल्यावर त्याने प्रचंड हास्य केले. आणि तोंडाचा आ वासून झट्कन त्याने आपला शूल हाती घेतला. (२७)

मां न जानासि राम त्वं विराधं लोकविश्रुतम् ।
मद्भयान्मुनयः सर्वे त्यक्त्वा वनमितो गताः ॥ २८ ॥

तो म्हणाला, "अरे रामा, जगामध्ये प्रसिद्ध असणाऱ्या मज विराधाला तू जाणत नाहीस काय ? माझ्या भयामुळेच हे वन सोडून सर्व मुनी येथून पळून गेले आहेत. (२८)

यदि जीवितुमिच्छास्ति त्यक्त्वा सीतां निरायुधौ ।
पलायतं न चेच्छीघ्रं भक्षयामि युवामहम् ॥ २९ ॥

तेव्हा आता जर तुम्हाला जिवंत राहाण्याची इच्छा असेल तर येथेच सीतेला सोडून देऊन, शस्त्रे फेकून देऊन, तुम्ही दोघे येथून पळून जा. नाहीतर मी तुम्हा दोघांना पटकन खाऊन टाकीन." (२९)

इत्युक्त्वा राक्षसः सीतामादातुमभिदुद्रुवे ।
रामश्चिच्छेद तद्बाहू शरेण प्रहसन्निव ॥ ३० ॥

असे बोलून सीतेला पकडण्यासाठी तो धावत येऊ लागला. तेव्हा मोठ्याने हसत हसत श्रीरामांनी एका बाणाने त्याचे दोन्ही बाहू तोडून टाकले. (३०)

ततः क्रोधपरीतात्मा व्यादाय विकटं मुखम् ।
राममभ्यद्रवद्रामश्चिच्छेद परिधावतः ॥ ३१ ॥

पदद्वयं विराधस्य तदद्भुतमिवाभवत् ॥ ३२ ॥

तेव्हा क्रोधाने तो आपले विक्राळ मुख उघडून श्रीरामचंद्रांकडे धावत सुटला. त्या वेळी आपल्याकडे धावत येणाऱ्या त्या विराधाचे दोन्ही पाय श्रीरामांनी तोडून टाकले. हे कृत्य म्हणजे एक अद्‌भुत कार्य होते. (३१-३२)

ततः सर्प इवास्येन ग्रसितुं राममापतत् ।
ततोऽर्धचन्द्राकारेण बाणेनास्य महच्छिरः ॥ ३३ ॥

चिच्छेद रुधिरौघेण पपात धरणीतले ।
ततः सीता समालिङ्ग्य प्रशशंस रघूत्तमम् ॥ ३४ ॥

त्यानंतर आपल्या मुखाने श्रीरामांना गिळण्यास तो विराध एखाद्या सापाप्रमाणे पुढे येऊ लागला. तेव्हा भगवान श्रीरामांनी एका अर्धचंद्राकार बाणाने त्याचे प्रचंड मस्तक तोडून टाकले. तेव्हा रक्ताने माखलेला तो जमिनीवर पडला. त्या वेळी रघूत्तमांना आलिंगन देऊन सीतेने त्यांची मोठी प्रशंसा केली. (३३-३४)

ततो दुन्दुभयो नेदुर्दिवि देवगणेरिताः ।
ननृतुश्चाप्सरा हृष्टा जगुर्गन्धर्वकिन्नराः ॥ ३५ ॥

त्या वेळी देवसमूहाच्या प्रेरणेने आकाशात दुंदुभींचा नाद घुमू लागला. आनंदित झालेल्या अप्सरा नाचू लागल्या. आणि हृष्ट झालेले गंधर्व आणि किन्नर गाऊ लागले. (३५)

विराधकायादतिसुन्दराकृति-
विभ्राजमानो विमलाम्बरावृतः ।
प्रतप्तचामीकरचारुभूषणो
व्यदृश्यताग्रे गगने रविर्यथा ॥ ३६ ॥

इकडे विराधाच्या मृत देहातून, अतिशय सुंदर आकार असणारा, स्वच्छ वस्त्रे परिधान केलेला, तापलेल्या सोन्याप्रमाणे असणाऱ्या सुंदर अलंकारांनी सुशोभित असणारा आणि आकाशातील सूर्याप्रमाणे प्रकाशमान असा एक पुरुष समोरच प्रकट झाला. (३६)

प्रणम्य रामं प्रणतार्तिहारिणं
भवप्रवाहोपरमं घृणाकरम् ।
प्रणम्य भूयः प्रणनाम दण्डवत्
प्रपन्नसर्वार्तिहरं प्रसन्नधीः ॥ ३७ ॥

त्या पुरुषाने प्रभू श्रीरामांना प्रणाम केला आणि प्रसन्न चित्ताने स्तुती करीत म्हणाला, "हे रामचंद्रा, तुम्ही साक्षात कृपा-मूर्ती आहात. प्रणाम करणाऱ्या जीवांचे दुःख तुम्ही हरण करता व त्यांच्या जन्म-मरणाचा फेरा नष्ट करता." असे म्हणत वारंवार दंडवत करीत प्रभू रामांचा शरणागत होऊन तो म्हणू लागला, (३७)

*विराध उवाच*

श्रीराम राजीवदलायताक्ष
विद्याधरोऽहं विमलप्रकाशः ।
दुर्वाससाकारणकोपमूर्तिना
शप्तः पुरा सोऽद्य विमोचितस्त्वया ॥ ३८ ॥

**विराध म्हणाला–** "कमलपत्राप्रमाणे नयन असणाऱ्या हे रामा, विमल तेज असणारा मी एक विद्याधर आहे. विनाकारण रागावणाऱ्या श्रीदुर्वासाने मला पूर्वी शाप दिला होता. आज मला तुम्ही शापातून मुक्त केले आहे. (३८)

इतः परं त्वच्चरणारविन्दयोः
स्मृतिः सदा मेऽस्तु भवोपशान्तये ।
त्वन्नामसङ्कीर्तनमेव वाणी
करोतु मे कर्णपुटं त्वदीयम् ॥ ३९ ॥

कथामृतं पातु करद्वयं ते
पादारविन्दार्चनमेव कुर्यात् ।
शिरश्च ते पादयुगप्रणामं
करोतु नित्यं भवदीयमेवम् ॥ ४० ॥

आता तुम्ही माझ्यावर अशी दया करा की यापुढे संसाराच्या नाशाला कारण होणारे तुमच्या पदकमलांचे स्मरण मला सदा असू दे. माझी वाणी सतत तुमच्या नामाचे संकीर्तन करो, माझे कान तुमच्या कथामृताचे प्राशन करोत, माझे दोन्ही हात तुमच्या चरणकमळांची पूजा करोत, आणि माझे मस्तक हे नेहमी तुमच्या पदयुगलाला प्रणाम करीत राहो. (३९-४०)

नमस्तुभ्यं भगवते विशुद्धज्ञानमूर्तये ।
आत्मारामाय रामाय सीतारामाय वेधसे ॥ ४१ ॥

तुम्ही भगवान आहात. विशुद्ध ज्ञान हे तुमचे स्वरूप आहे. तुम्ही तुमच्या स्वरूपातच रममाण होता. तुम्ही आपल्या भक्तांना रमविणारे आहात. तुम्ही सीतारूपी मायेने युक्त आहात. सृष्टी रचणारे ब्रह्मदेव तुम्हीच आहात. तुम्हांला माझा नमस्कार असो. (४१)

प्रपन्नं पाहि मां राम यास्यामि त्वदनुज्ञया ।
देवलोकं रघुश्रेष्ठ माया मां मावृणोतु ते ॥ ४२ ॥

हे रामा, तुम्हांला मी शरण आलो आहे. माझे तुम्ही रक्षण करा. हे रघुश्रेष्ठा, तुमच्या अनुज्ञेने मी देवलोकी जात आहे. तुमची माया मला आच्छादित न करो." (४२)

इति विज्ञापितस्तेन प्रसन्नो रघुनन्दनः ।
ददौ वरं तदा प्रीतो विराधाय महामतिः ॥ ४३ ॥

तेव्हा विराधाने अशी प्रार्थना केल्यावर रघुनंदन प्रसन्न झाले आणि महाबुद्धिमान अशा रामांनी आनंदाने विराधाला वर दिला. (४३)

गच्छ विद्याधराशेषमायादोषगुणा जिताः ।
त्वया मद्दर्शनात्सद्यो मुक्तो ज्ञानवतां वरः ॥ ४४ ॥

"हे विद्याधरा, आता तू जा. मायेचे सर्व गुण आणि दोष तू जिंकून घेतले आहेस. ज्ञानी लोकांत तू श्रेष्ठ आहेस. माझे दर्शन झाल्यामुळे तू ताबडतोब मुक्त झाला आहेस. (४४)

मद्भक्तिर्दुर्लभा लोके जाता चेन्मुक्तिदा यतः ।
अतस्त्वं भक्तिसम्पन्नः परं याहि ममाज्ञया ॥ ४५ ॥

रामेण रक्षोनिधनं सुघोरं
शापाद्विमुक्तिर्वरदानमेवम् ।
विद्याधरत्वं पुनरेव लब्धं
रामं गृणन्नेति नरोऽखिलार्थान् ॥ ४६ ॥

या लोकात माझी भक्ती दुर्लभ आहे. कारण ती निर्माण झाली की लगेच मुक्ती देणारी आहे. तू माझ्या भक्तीने संपन्न आहेस, म्हणून माझ्या आज्ञेने तू परमधामाप्रत जा." अशा प्रकारे श्रीरामांनी अतिशय भयंकर राक्षसाचा वध केला, त्याला शापातून मुक्तीचे वरदान दिले आणि त्याला पुनः विद्याधराचे रूप देऊन टाकले. अशा प्रकारे लीला करणाऱ्या रामांची स्तुती करणारा माणूस सर्व इष्ट पदार्थ प्राप्त करून घेतो. (४५-४६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

# द्वितीय सर्ग

## शरभङ्ग तसेच सुतीक्ष्ण इत्यादी मुनीश्वरांची भेट

*श्रीमहादेव उवाच*

विराधे स्वर्गते रामो लक्ष्मणेन च सीतया ।
जगाम शरभङ्गस्य वनं सर्वसुखावहम् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, विराध स्वर्गाला गेल्यानंतर, लक्ष्मण व सीता यांच्यासह श्रीरामचंद्र सर्व सुखे देणाऱ्या शरभंगाच्या तपोवनात गेले. (१)

शरभङ्गस्ततो दृष्ट्वा रामं सौमित्रिणा सह ।
आयान्तं सीतया सार्धं सम्भ्रमादुत्थितः सुधीः ॥ २ ॥

तेव्हा लक्ष्मण आणि सीता यांच्यासह येणाऱ्या श्रीरामांना पाहून, फार बुद्धिमान असणारे शरभंग मुनी लगबगीने उठून उभे राहिले. (२)

अभिगम्य सुसम्पूज्य विष्टरेषूपवेशयत् ।
आतिथ्यमकरोत्तेषां कन्दमूलफलादिभिः ॥ ३ ॥

त्यांच्या स्वागतासाठी पुढे जाऊन आणि त्यांची चांगल्याप्रकारे पूजा करून मुनींनी त्यांना आसनांवर बसविले. मग कंद, मुळे, फळे , इत्यादींच्या द्वारा त्यांनी त्यांचे आतिथ्य केले. (३)

प्रीत्याह शरभङ्गोऽपि रामं भक्तपरायणम् ।
बहुकालमिहैवासं तपसे कृतनिश्चयः ॥ ४ ॥

तव सन्दर्शनाकाङ्क्षी राम त्वं परमेश्वरः ।
अद्य मत्तपसा सिद्धं यत्पुण्यं बहु विद्यते ।
तत्सर्वं तव दास्यामि ततो मुक्तिं व्रजाम्यहम् ॥ ५ ॥

नंतर भक्तपरायण रामाला शरभंग प्रेमाने म्हणाले, " हे रामा, तुमच्या दर्शनाची इच्छा करीत, तपस्या करण्याचा निश्चय करून, मी पुष्कळ काळ येथेच राहिलो आहे. हे रामा, तुम्ही साक्षात परमेश्वर आहात. माझ्या तपस्येने जे पुष्कळ पुण्य मला प्राप्त झाले आहे, ते सगळे आज मी तुम्हांला अर्पण करून, मोक्षाप्रत जातो." (४-५)

समर्प्य रामस्य महत्सुपुण्य-
फलं विरक्तः शरभङ्गयोगी ।
चितिं समारोहयदप्रमेयं
रामं ससीतं सहसा प्रणम्य ॥ ६ ॥

असे बोलून महाविरक्त असणाऱ्या योगिश्रेष्ठ शरभंगांनी आपल्या उत्कृष्ट पुण्याचे महान फळ श्रीरामचंद्रांना अर्पण करून, सीतेसहित असणाऱ्या अप्रमेय भगवान रामांना प्रणाम केला व ते लगेच चितेवर चढले. (६)

ध्यायंश्चिरं राममशेषहृत्स्थं
दूर्वादलश्याममलमम्बुजाक्षम् ।
चीराम्बरं स्निग्धजटाकलापं
सीतासहायं सहलक्ष्मणं तम् ॥ ७ ॥

को वा दयालुः स्मृतकामधेनु-
रन्यो जगत्यां रघुनायकादहो ।
स्मृतो मया नित्यमनन्यभाजा
ज्ञात्वा स्मृतिं मे स्वयमेव यातः ॥ ८ ॥

पश्यत्विदानीं देवेशो रामो दाशरथिः प्रभुः ।
दग्ध्वा स्वदेहं गच्छामि ब्रह्मलोकमकल्मषः ॥ ९ ॥

अयोध्याधिपतिर्मेऽस्तु हृदये राघवः सदा ।
यद्वामाङ्के स्थिता सीता मेघस्येव तडिल्लता ॥ १० ॥

इति रामं चिरं ध्यात्वा दृष्ट्वा च पुरतः स्थितम् ।
प्रज्वाल्य सहसा वह्निं दग्ध्वा पञ्चात्मकं वपुः ॥ ११ ॥

दिव्यदेहधरः साक्षाद्ययौ लोकपतेः पदम् ।
ततो मुनिगणाः सर्वे दण्डकारण्यवासिनः ।
आजग्मू राघवं द्रष्टुं शरभङ्गनिवेशनम् ॥ १२ ॥

दृष्ट्वा मुनिसमूहं तं जानकीरामलक्ष्मणाः ।
प्रणेमुः सहसा भूमौ मायामानुषरूपिणः ॥ १३ ॥

आशीर्भिरभिनन्द्याथ रामं सर्वहृदि स्थितम् ।
ऊचुः प्राञ्जलयः सर्वे धनुर्बाणधरं हरिम् ॥ १४ ॥

भूमेर्भारावताराय जातोऽसि ब्रह्मणार्थितः ।
जानीमस्त्वां हरिं लक्ष्मीं जानकीं लक्ष्मणं तथा ॥ १५ ॥

शेषांशं शङ्खचक्रे द्वे भरतं सानुजं तथा ।
अतश्चादौ ऋषीणां त्वं दुःखं मोक्तुमिहार्हसि ॥ १६ ॥

आगच्छ यामो मुनिसेवितानि
वनानि सर्वाणि रघूत्तम क्रमात् ।
द्रष्टुं सुमित्रासुतजानकीभ्यां
तदा दयाऽस्मासु दृढा भविष्यति ॥ १७ ॥

इति विज्ञापितो रामः कृताञ्जलिपुटैर्विभुः ।
जगाम मुनिभिः सार्धं द्रष्टुं मुनिवनानि सः ॥ १८ ॥

त्या वेळी सर्वांतर्यामी, दूर्वादलाप्रमाणे श्यामवर्ण, कमलनयन, वल्कल धारण करणाऱ्या, कोमल जटाकलाप असणाऱ्या, सीता व लक्ष्मण यांच्यासह असणाऱ्या, श्रीरामचंद्रांचे शरभंगांनी बराच वेळ ध्यान केले. (७)

ते म्हणाले "अहो ! या जगात श्रीरघुनाथाशिवाय, स्मरण केल्यावर कामधेनूप्रमाणे असणारा दुसरा कोण दयाळू पुरुष आहे ? अनन्य भावाने मी त्यांचे नित्य स्मरण केलेले होते. माझे स्मरण जाणून ते स्वतःच येथे आले. (८)

देवांचा ईश्वर, अशा दशरथनंदन श्रीरामांची दृष्टी आता मजकडे राहू दे. त्यांच्या देखत मी स्वतःचा देह जाळून घेऊन आणि निष्पाप होऊन ब्रह्मलोकी जातो. (९)

मेघातील विजेप्रमाणे ज्यांच्या डाव्या मांडीवर सीता विराजमान आहे असे अयोध्येचे स्वामी श्रीराम सदा माझ्या हृदयात राहू देत." (१०)

अशा प्रकारे पुष्कळ वेळ रामांचे ध्यान करून तसेच पुढे उभे असणाऱ्या श्रीरामांना पाहात पाहात मुनिश्रेष्ठ शरभंगांनी तत्काळ अग्नी प्रज्वलित करून, आपले पांचभौतिक शरीर जाळून टाकले. (११)

आणि दिव्य देह धारण करून, श्रीरामांच्या देखत ते साक्षात प्रजापती ब्रह्मदेवांच्या स्थानी गेले. त्या वेळी दंडकारण्यात राहाणारे मुनिगण श्रीरामांना भेटण्यासाठी शरभंगमुनींच्या आश्रमस्थानी आले. (१२)

त्या मुनिसमूहाला पाहून, माया- मानव- रूप धारण करणाऱ्या सीता, श्रीराम व लक्ष्मण यांनी जमिनीवर मस्तक ठेवून त्यांना आदराने प्रणाम केला. (१३)

तेव्हा सर्वांच्या अंतर्यामी श्रीरामांचे आशीर्वादपूर्वक अभिनंदन करून, ते मुनी हात जोडून, धनुष्य व बाण धारण करणाऱ्या श्रीहरीला म्हणाले. (१४)

"ब्रह्मदेवांनी प्रार्थना केल्यावर भूमीचा भार उतरविण्यासाठी तुम्ही अवतार धारण केला आहे. आम्हास माहीत आहे की तुम्ही साक्षात् विष्णू आहात, जानकी ही लक्ष्मी आहे, लक्ष्मण शेषाचा अंश आहे, तसेच भरत व त्याचा भाऊ शत्रुघ्न हे दोघे शंख व चक्र आहेत. आणि म्हणून प्रथम तुम्ही ऋषींचे दुःख दूर करा. (१५-१६)

हे रघुश्रेष्ठा, या. लक्ष्मण व जानकी यांच्यासह तुम्ही आणि आम्ही मुनींनी सेवन केलेली सर्व वने पाहाण्यास क्रमाक्रमाने जाऊ या. या वेळी असे केल्याने आमच्यावर मोठी दया होईल." (१७)

अशा प्रकारे हात जोडून मुनींनी विनंती केल्यावर, सर्वव्यापक भगवान् श्रीराम मुनींची तपोवने पाहाण्यास निघाले. (१८)

दर्दर्श तत्र पतितान्यनेकानि शिरांसि सः ।
अस्थिभूतानि सर्वत्र रामो वचनमब्रवीत् ॥ १९ ॥

सगळीकडे अस्थिरूप होऊन पडलेली अनेक मस्तके त्यांनी पाहिली. तेव्हा श्रीरामांनी विचारले. (१९)

अस्थीनि केषामेतानि किमर्थं पतितानि वै ।
तमूचुर्मुनयो राम ऋषीणां मस्तकानि हि ॥ २० ॥

"कुणाची हाडे आहेत ही ? ती येथे का पडलेली आहेत?" तेव्हा मुनी त्यांना म्हणाले, "हे श्रीरामा, या ऋषींच्या कवट्या आहेत. (२०)

राक्षसैर्भक्षितानीश प्रमत्तानां समाधितः ।
अन्तरायं मुनीनां ते पश्यन्तोऽनुचरन्ति हि ॥ २१ ॥

हे ईश्वरा, ती मस्तके राक्षसांनी खाल्लेली आहेत. मुनींना समाधीमध्ये जेव्हा बाह्य भान नसते. तेव्हा संधी मिळताच त्यांना भक्षण करण्यासाठी राक्षस इकडे फिरत असतात." (२१)

श्रुत्वा वाक्यं मुनीनां स भयदैन्यसमन्वितम् ।
प्रतिज्ञामकरोद्रामो वधायाशेषरक्षसाम् ॥ २२ ॥

भय आणि दीनपणा यांनी युक्त असे मुनींचे वाक्य ऐकल्यावर, संपूर्ण राक्षसांचा वध करण्याची प्रतिज्ञा श्रीरामांनी केली. (२२)

पूज्यमानः सदा तत्र मुनिभिर्वनवासिभिः ।
जानक्या सहितो रामो लक्ष्मणेन समन्वितः ॥ २३ ॥

उवास कतिचित्तत्र वर्षाणि रघुनन्दनः ।
एवं क्रमेण संपश्यन्नृषीणामाश्रमान्विभुः ॥ २४ ॥

तेथे वनात राहाणाऱ्या मुनींचे कडून पूजा स्वीकारत, श्रीराम हे जानकी आणि लक्ष्मण यांच्यासह क्रमाक्रमाने ऋषींचे आश्रम पाहात पाहात काही वर्षे तेथेच राहिले. (२३-२४)

सुतीक्ष्णस्याश्रमं प्रागात्प्रख्यातमृषिसङ्कुलम् ।
सर्वर्तुगुणसम्पन्नं सर्वकालसुखावहम् ॥ २५ ॥

त्यानंतर श्रीराम सुतीक्ष्णाच्या प्रख्यात आश्रमात गेले. तो आश्रम ऋषींनी गजबजलेला, सर्व ऋतूंच्या गुणांनी संपन्न आणि सर्व काळी सुखकारक होता. (२५)

राममागतमाकर्ण्य सुतीक्ष्णः स्वयमागतः ।
अगस्त्यशिष्यो रामस्य मन्त्रोपासनतत्परः ।
विधिवत्पूजयामास भक्त्युत्कण्ठितलोचनः ॥ २६ ॥

श्रीराम आले आहेत हे ऐकल्यावर, श्रीराम-मंत्राची उपासना करण्यात तत्पर असणारे, अगस्ती ऋषींचे शिष्य, सुतीक्ष्ण स्वतःच श्रीरामांकडे आले आणि भक्तीने उत्कंठित नेत्रांनी त्यांनी श्रीरामांची विधिवत पूजा केली . (२६)

*सुतीक्ष्ण उवाच*

त्वन्मन्त्रजाप्यहमनन्तगुणाप्रमेय
सीतापते शिवविरिञ्चिसमाश्रिताङ्घ्रे ।
संसारसिन्धुतरणामलपोतपाद
रामाभिराम सततं तव दासदासः ॥ २७ ॥

**सुतीक्ष्ण म्हणाले –** "अनंत गुण असणाऱ्या आणि अप्रमेय अशा हे सीतापते, मी तुमच्या नामाचा मंत्र जपत असतो. ज्यांच्या चरणांचा शिव आणि ब्रह्मदेव यांनी आश्रय घेतला आहे आणि ज्यांचे पाय संसार-सागर तरून जाण्यास सुदृढ नौका आहेत, अशा मनोहर, श्यामसुंदर श्रीरामा, मी सतत तुमच्या दासांचा दास आहे. (२७)

मामद्य सर्वजगतामविगोचरस्त्वं
त्वन्मायया सुतकलत्रगृहान्धकूपे ।
मग्नं निरीक्ष्य मलपुद्गलपिण्डमोह-
पाशानुबद्धहृदयं स्वयमागतोऽसि ॥ २८ ॥

संपूर्ण जगातील प्राण्यांच्या इंद्रियांना तुम्ही गोचर नाही. तुमच्या मायेमुळे मोहित होऊन पुत्र, पत्नी,घर इत्यादी रूपात असणाऱ्या काळ्याकुट्ट कूपात पडलेल्या, आणि मल, मूत्र इत्यादींचा गोळा असणाऱ्या शरीराच्या मोहपाशाने ज्यांचे मन बद्ध झाले आहे अशा मला पाहून, हे श्रीरामा, आज तुम्ही आपणहूनच (तुमचे पुण्यदर्शन देण्यास) माझ्याकडे आला आहात. (२८)

त्वं सर्वभूतहृदयेषु कृतालयोऽपि
त्वन्मन्त्रजाप्यविमुखेषु तनोषि मायाम्।
त्वन्मन्त्रसाधनपरेष्वपयाति माया
सेवानुरूपफलदोऽसि यथा महीपः ॥ २९ ॥

सर्व भूतांच्या हृदयांत तुमचे निवासस्थान आहे. तथापि तुमच्या नावाच्या मंत्राचा जप करण्यापासून जे विन्मुख आहेत त्यांच्या ठिकाणी तुम्ही आपल्या मायेने मोह निर्माण करता. तुमच्या नामाच्या मंत्राचा जप करण्याच्या साधनात तत्पर असणाऱ्या प्राण्यांपासून तुमची माया दूर पळते. अशा प्रकारे एखाद्या राजाप्रमाणे सेवेला अनुसरून सर्वांना असे फळ देणारे तुम्ही आहात. (२९)

विश्वस्य सृष्टिलयसंस्थितिहेतुरेक-
स्त्वं मायया त्रिगुणया विधिरीशविष्णू ।
भासीश मोहितधियां विविधाकृतिस्त्वं
यद्वद्रविः सलिलपात्रगतो ह्यनेकः ॥ ३० ॥

हे ईश्वरा, या विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि नाश यांचे एक मात्र कारण तुम्हीच आहात. तथापि स्वतःच्या त्रिगुणात्मक मायेमुळे तुम्ही ब्रह्मदेव, विष्णू आणि महादेव या रूपांनी भासता. ज्या प्रमाणे अनेक भांड्यातील पाण्यात प्रतिबिंबित झालेला सूर्य अनेक वाटतो, त्या प्रमाणे ज्यांची बुद्धी मोहित झाली आहे अशा पुरुषांना तुम्ही (मनुष्य, पशू, पक्षी इत्यादी) नाना प्रकारच्या आकृती रूपांत प्रचीतीस येता. (३०)

प्रत्यक्षतोऽद्य भवतश्चरणारविन्दं
पश्यामि राम तमसः परतः स्थितस्य ।
दृग्रूपतस्त्वमसतामविगोचरोऽपि
त्वन्मन्त्रपूतहृदयेषु सदा प्रसन्नः ॥ ३१ ॥

हे श्रीरामा, अंधकाराच्या- अज्ञानाच्या- पलीकडे असणाऱ्या तुमचे चरणकमल मी आज प्रत्यक्षच पाहात आहे. सर्वांचा द्रष्टा हे जरी तुमचे रूप आहे तरी दुराचारी पुरुषांना तुम्ही गोचर नाही. या उलट तुमच्या नामाच्या मंत्राच्या जपाने ज्यांचे मन शुद्ध झाले आहे, त्यांच्या ठिकाणी तुम्ही सदा प्रसन्नरूपाने असता. (३१)

पश्यामि राम तव रूपमरूपिणोऽपि
मायाविडम्बनकृतं सुमनुष्यवेषम् ।
कन्दर्पकोटिसुभगं कमनीयचाप-
बाणं दयार्द्रहृदयं स्मितचारुवक्त्रम् ॥ ३२ ॥

हे श्रीरामा, जरी तुम्ही रूपरहित आहात तरी मायेच्या विलासाने निर्माण झालेले, माणसाचा सुंदर वेष धारण केलेले तुमचे रूप मी पाहात आहे. हे रूप कोट्यवधी मदनाप्रमाणे कांतिमान आहे. या तुमच्या रूपाने सुंदर धनुष्य आणि बाण धारण केले आहेत. या रूपाच्या हृदयात दयेचा ओलावा आहे, आणि स्मितामुळे मुख सुंदर दिसत आहे. (३२)

सीतासमेतमजिनाम्बरमप्रधृष्यं
सौमित्रिणा नियतसेवितपादपद्मम् ।
नीलोत्पलद्युतिमनन्तगुणं प्रशान्तं
मद्भागधेयमनिशं प्रणमामि रामम् ॥ ३३ ॥

जे सीतेसहित आहेत, ज्यांनी मृगाजिन धारण केले आहे, जे नेहमी अजेय आहेत, ज्यांचे चरणकमल लक्ष्मणाकडून नियमितपणे सेविले जातात, नीलकमलाप्रमाणे ज्यांची प्रभा आहे, ज्यांच्याजवळ अनंत गुण आहेत, जे अत्यंत शांत आहेत, आणि जे माझे सौभाग्यच आहे, अशा त्या श्रीरामांना मी नेहमी प्रणाम करतो. (३३)

जानन्तु राम तव रूपमशेषदेश-
कालाद्युपाधिरहितं घनचित्प्रकाशम्।
प्रत्यक्षतोऽद्य मम गोचरमेतदेव
रूपं विभातु हृदये न परं विकाङ्क्षे ॥ ३४ ॥

"हे श्रीराम, सर्व देश आणि काल यांच्या उपाधींनी रहित आणि चिद्घन प्रकाश असणारे तुमचे रूप जाणणारे जे आहेत ते तसेच जाणोत. परंतु आज प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांपुढे जे हे तुमचे रूप आहे तेच माझ्या हृदयात प्रकाशित होऊन राहो. याशिवाय माझी अन्य कोणतीही इच्छा नाही." (३४)

इत्येवं स्तुवतस्तस्य रामः सस्मितमब्रवीत् ।
मुने जानामि ते चित्तं निर्मलं मदुपासनात् ॥ ३५ ॥

अशा प्रकारे तो सुतीक्ष्ण स्तुती करीत असताना श्रीरामचंद्र स्मितपूर्वक त्यांना म्हणाले, "हे मुने, माझ्या उपासनेमुळे तुमचे चित्त निर्मळ झाले आहे, हे मला माहीत आहे. (३५)

अतोऽहमागतो द्रष्टुं मद्दते नान्यसाधनम् ।
मन्मन्त्रोपासका लोके मामेव शरणं गताः ॥ ३६ ॥

निरपेक्षा नान्यगतास्तेषां दृश्योऽहमन्वहम् ।
स्तोत्रमेतत्पठेद्यस्तु त्वत्कृतं मत्प्रियं सदा ॥ ३७ ॥

सद्भक्तिर्मे भवेत्तस्य ज्ञानं च विमलं भवेत् ।
त्वं ममोपासनादेव विमुक्तोऽसीह सर्वतः ॥ ३८ ॥

तुमची माझ्यावर अनन्य भक्ती आहे आणि माझ्याखेरीज तुम्हांला अन्य कोणतेही साधन नाही. म्हणून तुम्हांला भेटण्यास मी आलो आहे. या जगात जे पुरुष माझ्या नाममंत्राचे उपासक आहेत, जे मलाच शरण आलेले आहेत, जे निरपेक्ष आणि अनन्यगतिक आहेत त्यांना मी दररोज दिसतो. तुम्ही केलेले आणि मला प्रिय असणारे हे स्तोत्र जो माणूस सदा पठण करील, त्याची माझ्याठिकाणी शुद्ध भक्ती निर्माण होईल. आणि त्याला शुद्ध ज्ञान प्राप्त होईल. केवळ माझ्या उपासनेमुळेच तुम्ही या जगात संपूर्णपणे मुक्त होऊन गेला आहात. (३६-३८)

देहान्ते मम सायुज्यं लप्स्यसे नात्र संशयः ।
गुरुं ते द्रष्टुमिच्छामि ह्यगस्त्यं मुनिनायकम् ।
किञ्चित्कालं तत्र वस्तुं मनो मे त्वरयत्यलम् ॥ ३९ ॥

तुमचा देहान्त झाल्यावर तुम्हाला माझे सायुज्य पद प्राप्त होईल, यात संशय नाही. आता तुमचे गुरू व मुनिश्रेष्ठ असे जे अगस्त्य ऋषी त्यांना भेटण्याची माझी इच्छा आहे. त्यांच्याजवळ काही काळ राहाण्यास माझे मन फारच उत्सुक आहे." (३९)

सुतीक्ष्णोऽपि तथेत्याह श्वो गमिष्यसि राघव ।
अहमप्यागमिष्यामि चिरादृष्टो महामुनिः ॥ ४० ॥

सुतीक्ष्ण म्हणाले, "ठीक आहे. हे राघवा, उद्या तुम्ही त्यांच्याजवळ जा. मीसुद्धा तुमच्याबरोबर येईन. कारण त्या महामुनींना पाहून बराच काळ झाला." (४०)

अथ प्रभाते मुनिना समेतो
रामः ससीतः सह लक्ष्मणेन ।
अगस्त्यसम्भाषणलोलमानसः
शनैरगस्त्यानुजमन्दिरं ययौ ॥ ४१ ॥

नंतर दुसरे दिवशी प्रभात काळी, सीता व लक्ष्मण यांना बरोबर घेऊन, त्या सुतीक्ष्ण मुनींसह, अगस्त्यांशी संभाषण करण्यास उत्सुक असलेल्या मनाने, श्रीराम सावकाशपणे अगस्त्यांच्या धाकट्या भावाच्या (=अग्निजिव्हाच्या) आश्रमाकडे निघाले. (४१)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

# तृतीय सर्ग

## मुनिवर अगस्त्यांची भेट

*श्रीमहादेव उवाच*

अथ रामः सुतीक्ष्णेन जानक्या लक्ष्मणेन च ।
अगस्त्यस्यानुजस्थानं मध्याह्ने समपद्यत ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**—हे पार्वती, त्यानंतर सुतीक्ष्ण, जानकी आणि लक्ष्मण यांच्यासह राम मध्यान्हाच्या वेळी, अगस्त्याच्या धाकट्या भावाच्या आश्रमस्थानात पोचले. (१)

तेन सम्पूजितः सम्यग्भुक्त्वा मूलफलादिकम् ।
ऊषुः प्रातरुत्थाय जग्मुस्तेऽगस्त्यमण्डलम् ॥ २ ॥

त्याचेकडून चांगल्या प्रकारे पूजा-सत्कार झाल्यावर त्यांनी मुळे, फळे इत्यादी खाल्ली. दुसरे दिवशी प्रातःकाळी उठून ते सर्वजण अगस्त्याच्या आश्रममंडलाकडे गेले. (२)

सर्वर्तुफलपुष्पाढ्यं नानामृगगणैर्युतम् ।
पक्षिसङ्घैश्च विविधैर्नादितं नन्दनोपमम् ॥ ३ ॥

सर्व ऋतूतील फळे व फुले यांनी समृद्ध, नाना प्रकारच्या वन्य पशूंनी युक्त, आणि विविध प्रकारच्या पक्ष्यांच्या समूहांच्या कूजनाने निनादित असा तो आश्रम नंदनवनाप्रमाणे होता. (३)

ब्रह्मर्षिभिर्देवर्षिभिः सेवितं मुनिमन्दिरैः ।
सर्वतोऽलङ्कृतं साक्षाद् ब्रह्मलोकमिवापरम् ॥ ४ ॥

ब्रह्मर्षी आणि देवर्षी यांच्याकडून सेवन केला गेलेला आणि सर्व बाजूंनी अन्य मुनींच्या आश्रमांनी मंडित झालेला तो आश्रम हा साक्षात दुसऱ्या ब्रह्मलोकाप्रमाणे होता. (४)

बहिरेवाश्रमस्याथ स्थित्वा रामोऽब्रवीन्मुनिम् ।
सुतीक्ष्ण गच्छ त्वं शीघ्रमागतं मां निवेदय ॥ ५ ॥

अगस्त्यमुनिवर्याय सीतया लक्ष्मणेन च ।
महाप्रसाद इत्युक्त्वा सुतीक्ष्णः प्रययौ गुरोः ॥ ६ ॥

आश्रमं त्वरया तत्र ऋषिसङ्घसमावृतम् ।
उपविष्टं रामभक्तैर्विशेषेण समायुतम् ॥ ७ ॥

व्याख्यातराममन्त्रार्थं शिष्येभ्यश्चातिभक्तितः ।
दृष्ट्वागस्त्यं मुनिश्रेष्ठं सुतीक्ष्णः प्रययौ मुनेः ॥ ८ ॥

दण्डवत्प्रणिपत्याह विनयावनतः सुधीः ।
रामो दाशरथिर्ब्रह्मन् सीतया लक्ष्मणेन च ।
आगतो दर्शनार्थं ते बहिस्तिष्ठति साञ्जलिः ॥ ९ ॥

जवळ पोचल्यानंतर आश्रमाच्या बाहेरच थांबून श्रीराम सुतीक्ष्ण मुनींना म्हणाले, "हे सुतीक्ष्णा, तुम्ही लवकर पुढे जा. आणि सीता व लक्ष्मण यांच्यासह मी आलो आहे, असे मुनिश्रेष्ठ अगस्त्यांना निवेदन करा." "मोठी तुमची कृपा" असे म्हणून सुतीक्ष्ण त्वरेने गुरुंच्या आश्रमात गेले. तेथे ऋषि संघांनी युक्त, विशेषतः श्रीरामांच्या भक्तांसमवेत असलेल्या व आसनावर बसलेल्या, आणि अतिशय भक्तीने आपल्या शिष्यांना श्रीराममंत्राचे विवेचन करणाऱ्या, मुनिश्रेष्ठ अगस्तींना पाहिल्यावर, सुतीक्ष्ण त्या मुनींच्या जवळ गेले, आणि त्यांना दंडवत प्रणाम करून, विनयाने नम्र झालेल्या बुद्धिमान सुतीक्ष्णांनी म्हटले "अहो गुरुवर्य, सीता व लक्ष्मण यांच्यासह दशरथकुमार श्रीराम हे तुमच्या दर्शनासाठी आले असून ते हात जोडून आश्रमाबाहेर उभे आहेत." (५-९)

*अगस्त्य उवाच*

शीघ्रमानय भद्रं ते रामं मम हृदि स्थितम् ।
तमेव ध्यायमानोऽहं काङ्क्षमाणोऽत्र संस्थितः ॥ १० ॥

**अगस्ती म्हणाले –** "वत्सा, तुझे कल्याण असो! माझ्या हृदयात असणाऱ्या श्रीरामांना तू आत लवकर घेऊन ये. त्यांच्या दर्शनाची इच्छा करीत व त्यांचेच ध्यान करीत मी येथे राहात आहे." (१०)

इत्युक्त्वा स्वयमुत्थाय मुनिभिः सहितो द्रुतम् ।
अभ्यगात्परया भक्त्या गत्वा राममथाब्रवीत् ॥ ११ ॥

आगच्छ राम भद्रं ते दिष्ट्या तेऽद्य समागमः ।
प्रियातिथिर्मम प्राप्तोऽस्यद्य मे सफलं दिनम् ॥ १२ ॥

रामोऽपि मुनिमायान्तं दृष्ट्वा हर्षसमाकुलः ।
सीतया लक्ष्मणेनापि दण्डवत्पतितो भुवि ॥ १३ ॥

द्रुतमुत्थाप्य मुनिराड्राममालिङ्ग्य भक्तितः ।
तद्गात्रस्पर्शजाह्लादस्त्रवन्नेत्रजलाकुलः ॥ १४ ॥

गृहीत्वा करमेकेन करेण रघुनन्दनम् ।
जगाम स्वाश्रमं हृष्टो मनसा मुनिपुङ्गवः ॥ १५ ॥

सुखोपविष्टं सम्पूज्य पूजया बहुविस्तरम् ।
भोजयित्वा यथान्यायं भोज्यैर्वन्यैरनेकधा ॥ १६ ॥

असे सांगून, मुनींच्यासह ते स्वतःच चटदिशी उठून श्रीरामांकडे गेले, आणि अतिशय भक्तीने त्यांना म्हणाले. "हे श्रीरामा, या, तुमचे कल्याण असो ! आज तुमच्याशी भेट झाली ही फार सुदैवाची गोष्ट आहे. माझे प्रिय अतिथी म्हणून तुम्ही येथे आलात. माझा आजचा दिवस कृतार्थ झाला आहे." मुनी येत आहे, हे पाहिल्यावर श्रीरामसुद्धा हर्षित झाले आणि सीता व लक्ष्मण यांच्यासह त्यांनी जमिनीवर दंडवत घातले. श्रीरामांना चट्दिशी उठवून आणि भक्तिपूर्वक त्यांनी आलिंगन दिले, श्रीरामांच्या देहाचा स्पर्श होताच आनंदामुळे त्या मुनिराजांचे नेत्र भरून आले. त्यानंतर एका हाताने रघुनंदनाचा एक हात धरून, मनांत आनंदित झालेले ते श्रेष्ठ मुनी स्वतःच्या आश्रमाकडे गेले. श्रीराम-प्रभूंना सुखपूर्वक आसनावर बसवून त्यांचे विस्तृत साग्रसंगीत पूजन केले व समयानुकूल अशा वनात प्राप्त होणाऱ्या खाद्य पदार्थांनी अगस्त्यांनी श्रीरामांना भोजन घातले. (११-१६)

सुखोपविष्टमेकान्ते रामं शशिनिभाननम् ।
कृताञ्जलिरुवाचेदमगस्त्यो भगवानृषिः ॥ १७ ॥

नंतर एकांत स्थळी सुखाने बसलेल्या व चंद्राप्रमाणे मुख असणाऱ्या श्रीरामचंद्रांना भगवान अगस्त्य ऋषी हात जोडून असे म्हणाले. (१७)

त्वदागमनमेवाहं प्रतीक्षन्समवस्थितः ।
यदा क्षीरसमुद्रान्ते ब्रह्मणा प्रार्थितः पुरा ॥ १८ ॥

भूमेर्भारापनुत्त्यर्थं रावणस्य वधाय च ।
तदादि दर्शनाकाङ्क्षी तव राम तपश्चरन् ।
वसामि मुनिभिः सार्धं त्वामेव परिचिन्तयन् ॥ १९ ॥

"हे रामा, पूर्वी ज्या वेळी क्षीरसमुद्राच्या तीरावर, भूमीचा भार हरण करण्यासाठी आणि रावणाचा वध करण्यासाठी ब्रह्मदेवांनी तुमची प्रार्थना केली होती, तेव्हापासून तुमच्या दर्शनाच्या इच्छेने, तपश्चर्या करीत तुमचे चिंतन करीत तुमच्याच आगमनाची वाट पाहात मी येथे अन्य मुनींसह राहात आहे. (१८-१९)

सृष्टेः प्रागेक एवासीर्निर्विकल्पोऽनुपाधिकः ।
त्वदाश्रया त्वद्विषया माया ते शक्तिरुच्यते ॥ २० ॥

विश्वोत्पत्तीच्या पूर्वी विकल्परहित आणि उपाधिरहित असे तुम्ही एकटेच होता. तुम्हांला विषय करणारी आणि तुमच्या आश्रयाने राहणारी माया ही तुमची शक्ती आहे, असे म्हटले जाते. (२०)

त्वामेव निर्गुणं शक्तिरावृणोति यदा तदा ।
अव्याकृतमिति प्राहुर्वेदान्तपरिनिष्ठिताः ॥ २१ ॥

जेव्हा ही माया-शक्ती निर्गुण अशा तुम्हांला आवरण घालते, तेव्हा तिला अव्याकृत तत्त्व, असे वेदांत शास्त्रात पारंगत असणारे म्हणतात. (२१)

मूलप्रकृतिरित्येके प्राहुर्मायेति केचन ।
अविद्या संसृतिर्बन्ध इत्यादि बहुधोच्यते ॥ २२ ॥

तिला मूळ प्रकृती असे काही जण म्हणतात. तर इतर काही तिला माया असे म्हणतात. तसेच तिचा निर्देश अविद्या, संसृती, बंध इत्यादी नावांनीही अनेक प्रकारे केला जातो. (२२)

त्वया संक्षोभ्यमाणा सा महत्तत्त्वं प्रसूयते ।
महत्तत्त्वादहङ्कारस्त्वया सञ्चोदितादभूत् ॥ २३ ॥

तुमच्याकडून प्रेरित झालेली ती प्रकृती महत हे तत्त्व उत्पन्न करते. तुमचीच प्रेरणा मिळालेल्या महत्-तत्त्वापासून अहंकार निर्माण झाला. (२३)

अहङ्कारो महत्तत्त्वसंवृतस्त्रिविधोऽभवत् ।
सात्त्विको राजसश्चैव तामसश्चेति भण्यते ॥ २४ ॥

महत्-तत्त्वाने ओतप्रोत भरलेला तो अहंकार तीन प्रकारचा झाला. तो सात्त्विक, राजस आणि तामस असा त्रिविध आहे, असे म्हटले जाते. (२४)

तामसात्सूक्ष्मतन्मात्राण्यासन् भूतान्यतः परम् ।
स्थूलानि क्रमशो राम क्रमोत्तरगुणानि ह ॥ २५ ॥

हे रामा, तामस अहंकारापासून शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध अशी नावे असणाऱ्या पाच तन्मात्रा उत्पन्न झाल्या. नंतर त्या सूक्ष्म तन्मात्रांपासून त्यांच्या क्रमाने एकेक वाढत जाणाऱ्या गुणांनुसार आकाश, वायू, अग्नी, जल व पृथ्वी अशी पाच स्थूल भूते निर्माण झाली. (२५)

राजसानीन्द्रियाण्येव सात्त्विका देवता मनः ।
तेभ्योऽभवत्सूत्ररूपं लिङ्गं सर्वगतं महत् ॥ २६ ॥

इंद्रिये ही राजस म्हणजे राजस अहंकारापासून उत्पन्न होणारी आहेत. त्या इंद्रियांच्या अधिष्टात्या देवता आणि मन हे सात्त्विक म्हणजे सात्त्विक अहंकारापासून निर्माण होणारे आहे. त्या सूक्ष्म तत्त्वांपासून महान, सर्वव्यापक, सूत्ररूप असे समष्टिरूप लिंग (=सूक्ष्म) शरीर उत्पन्न झाले (त्यात राहाणारा तो हिरण्यगर्भ होय).यालाच *सूत्रात्मा* असेही दुसरे नाव आहे. (२६)

[illegible] [illegible] समुत्पन्नः स्थूलाद् भूतकदम्बकात् ।
[illegible] पुरुषात्सर्वं जगत्स्थावरजङ्गमम् ॥ २७ ॥

नंतर स्थूल भूतांच्या समूहापासून विराट पुरुष निर्माण झाला, आणि त्या विराट पुरुषापासून स्थावर-जंगमात्मक संपूर्ण जग निर्माण झाले. (२७)

[illegible]नुष्याश्च कालकर्मक्रमेण तु ।
[illegible] [illegible]गुणतो ब्रह्मा जगतः सर्वकारणम् ॥ २८ ॥

हे जगदीश्वर रामा, काल आणि कर्म यांच्या क्रमानुसार तुम्हीच देव, तिर्यक् प्राणी आणि मानव इत्यादींच्या

सत्त्वाद्विष्णुस्त्वमेवास्य पालकः सद्भिरुच्यते ।
लये रुद्रस्त्वमेवास्य त्वन्मायागुणभेदतः ॥ २९ ॥

जाग्रत्स्वप्नसुषुप्त्याख्या वृत्तयो बुद्धिजैर्गुणैः ।
तासां विलक्षणो राम त्वं साक्षी चिन्मयोऽव्ययः ॥ ३० ॥

सृष्टिलीलां यदा कर्तुमीहसे रघुनन्दन ।
अङ्गीकरोषि मायां त्वं तदा वै गुणवानिव ॥ ३१ ॥

राम माया द्विधा भाति विद्याविद्येति ते सदा ।
प्रवृतिमार्गनिरता अविद्यावशवर्तिनः ।
निवृत्तिमार्गनिरता वेदान्तार्थविचारकाः ॥ ३२ ॥

त्वद्भक्तिनिरता ये च ते वै विद्यामयाः स्मृताः ।
अविद्यावशगा ये तु नित्यं संसारिणश्च ते ।
विद्याभ्यासरता ये तु नित्यमुक्तास्त एव हि ॥ ३३ ॥

लोके त्वद्भक्तिनिरतास्त्वन्मन्त्रोपासकाश्च ये ।
विद्या प्रादुर्भवेत्तेषां नेतरेषां कदाचन ॥ ३४ ॥

अतस्त्वद्भक्तिसम्पन्ना मुक्ता एव न संशयः ।
त्वद्भक्त्यमृतहीनानां मोक्षः स्वप्नेऽपि नो भवेत् ॥ ३५ ॥

किं राम बहुनोक्तेन सारं किञ्चिद्ब्रवीमि ते ।
साधुसङ्गतिरेवात्र मोक्षहेतुरुदाहृता ॥ ३६ ॥

साधवः समचित्ता ये निःस्पृहा विगतैषणाः ।
दान्ताः प्रशान्तास्त्वद्भक्ता निवृत्ताखिलकामनाः ॥ ३७ ॥

इष्टप्राप्तिविपत्त्योश्च समाः सङ्गविवर्जिताः ।
संन्यस्ताखिलकर्माणः सर्वदा ब्रह्मतत्पराः ॥ ३८ ॥

यमादिगुणसम्पन्नाः सन्तुष्टा येन केनचित् ।
सत्सङ्गमो भवेद्यर्हि त्वत्कथाश्रवणे रतिः ॥ ३९ ॥

योनीमध्ये प्रगट झाला. तुमच्याच मायेच्या गुणांच्या भेदानुसार, संपूर्ण जगाचे कारण असणारे ब्रह्मदेव हे रजोगुणाचे द्वारा तुम्हीच झाला आहात. तसेच सत्त्व गुणाचे द्वारा या जगाचा पालक असणारे विष्णू तुम्हीच आहात आणि या जगाचा लय करणारे रुद्र हा तमोगुणाचे द्वारा तुम्हीच झाला, असे विद्वान पुरुषांकडून सांगितले जाते. (२८-२९)

हे रामा, बुद्धीतील सत्त्व, रज, तम या तीन गुणांनी जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती ही नावे असणाऱ्या अवस्था उद्भूत होतात. तथापि चिन्मय, अविनाशी आणि साक्षी असणारे तुम्ही मात्र त्या तीन अवस्थांपेक्षा अगदी विलक्षण आहात. हे रघुनन्दना, ज्या वेळी सृष्टी निर्माण करण्याची लीला तुम्हांला करावीशी वाटते. त्या वेळी तुम्ही मायेचा अंगीकार करता आणि गुणांनी युक्त असल्याप्रमाणे भासता. हे रामा, तुमची ही माया नेहमी विद्या आणि अविद्या या दोन प्रकारांनी भासते. प्रवृत्ति-मार्गात रत असणारे लोक हे अविद्येला वश असतात आणि वेदांताच्या अर्थाचा विचार करणारे, निवृत्ति-मार्गात रत असणारे आणि तुमची भक्ती करण्यात रममाण होणारे लोक हे विद्यामय- विद्येला वश- आहेत असे मानले जाते. जे लोक अविद्येला वश होऊन राहातात ते नेहमी जन्म-मरण-रूपी संसारात पडलेले असतात. या उलट जे विद्येच्या अभ्यासात रत असतात, ते नित्यमुक्तच असतात. (३०-३३)

या जगात जे पुरुष तुमच्या भक्तीमध्ये रत असतात आणि जे तुमच्या नाम- मंत्राचे उपासक असतात, त्यांच्याच ठिकाणी विद्या प्रादुर्भूत होते; इतरांच्या ठिकाणी मुळीच नाही. म्हणून तुमच्या भक्तीने संपन्न असणारे पुरुष हे मुक्तच असतात यात संशय नाही. या उलट तुमच्या भक्तिरूपी अमृताने रहित असणारे जे पुरुष आहेत त्यांना स्वप्नात सुद्धा मोक्ष मिळणार नाही. हे रामा, फार काय सांगावे ? या बाबतीत जे काही सार आहे ते मी तुम्हाला सांगतो. या जगात साधूंची संगती हीच मोक्षाचे कारण आहे, असे सांगितले आहे. या जगातील सुख-दुःख इत्यादी द्वंद्वांमध्ये चित्त सम असणारे, स्पृहा-रहित, कोणत्याही प्रकारची इच्छा नसणारे, इंद्रियांचा संयम करणारे, अत्यंत शांत चित्त असणारे, तुमचे भक्त असणारे, ज्यांच्या सर्व कामना निवृत्त झाल्या आहेत असे, इष्ट गोष्टींची प्राप्ती आणि विपत्ती यांमध्ये चित्त सम असणारे, आसक्तिरहित, सर्व कर्मांचा त्याग करणारे, नेहमी ब्रह्मपरायण, यम-नियम इत्यादी गुणांनी संपन्न, जे काही प्राप्त होईल त्यात संतुष्ट असणारे असे ते साधू असतात. जर त्या साधूंची संगती प्राप्त झाली तर तुमची कथा ऐकण्यात आवड उत्पन्न होते. (३४-३९)

समुदेति ततो भक्तिस्त्वयि राम सनातने ।
त्वद्भक्तावुपपन्नायां विज्ञानं विपुलं स्फुटम् ॥ ४० ॥

उदेति मुक्तिमार्गोऽयमाद्यश्चतुरसेवितः ।
तस्माद्राघव सद्भक्तिस्त्वयि मे प्रेमलक्षणा ॥ ४१ ॥

सदा भूयाद्धरे सङ्गस्त्वद्भक्तेषु विशेषतः ।
अद्य मे सफलं जन्म भवत्सन्दर्शनादभूत् ॥ ४२ ॥

अद्य मे क्रतवः सर्वे बभूवुः सफलाः प्रभो ।
दीर्घकालं मया तप्तमनन्यमतिना तपः ॥ ४३ ॥

तस्येह तपसो राम फलं तव यदर्चनम् ।
सदा मे सीतया सार्धं हृदये वस राघव ।
गच्छतस्तिष्ठतो वापि स्मृतिःस्यान्मे सदा त्वयि ॥ ४४ ॥

इति स्तुत्वा रमानाथमगस्त्यो मुनिसत्तमः ।
ददौ चापं महेन्द्रेण रामार्थे स्थापितं पुरा ॥ ४५ ॥

अक्षय्यौ बाणतूणीरौ खड्गो रत्नविभूषितः ।
जहि राघव भूभारभूतं राक्षसमण्डलम् ॥ ४६ ॥

यदर्थमवतीर्णोऽसि मायया मनुजाकृतिः ।
इतो योजनयुग्मे तु पुण्यकाननमण्डितः ॥ ४७ ॥

अस्ति पञ्चवटीनाम्ना आश्रमो गौतमीतटे ।
नेतव्यस्तत्र ते कालः शेषो रघुकुलोद्वह ॥ ४८ ॥

तत्रैव बहुकार्याणि देवानां कुरु सत्पते ॥ ४९ ॥

श्रुत्वा तदागस्त्यसुभाषितं वचः
स्तोत्रं च तत्त्वार्थसमन्वितं विभुः ।
मुनिं समाभाष्य मुदान्वितो ययौ
प्रदर्शितं मार्गमशेषविद्धरिः ॥५०॥

त्यानंतर हे रामा, सनातन अशा तुमच्या ठिकाणी भक्ती उत्पन्न होते. तुमची भक्ती उत्पन्न झाली असताना, तुमचे स्पष्ट आणि प्रचुर ज्ञान प्राप्त होते. (४०)

चतुर पुरुषांनी सेवन केलेला हा मुक्तीचा आद्य मार्ग उदयास येतो. म्हणून हे राघवा, प्रेमस्वरूप असणारी माझी सद्-भक्ती ही तुमच्या ठिकाणी नेहमी असो. तसेच हे हरे, विशेषतः तुमच्या भक्तांची संगती मला सदा प्राप्त होवो. आज तुमच्या दर्शनाने माझा जन्म सफल झाला आहे . (४१-४२)

हे प्रभू, मी केलेले सर्व यज्ञ आज सफल झाले आहेत. मी दीर्घ काळपर्यंत अनन्य बुद्धीने तप केलेले आहे. इहलोकी, हे रामा, त्या तपाचे फळ म्हणजेच मी आज जे तुमचे पूजन केले तेच होय. हे राघवा, सीतेसह तुम्ही सदा माझ्या हृदयात वास करा. तसेच मी चालत असलो, किंवा उभा असलो तरीसुद्धा मला सतत तुमचेच स्मरण होवो." (४३- ४४)

अशा प्रकारे लक्ष्मीपती रामांची स्तुती करून मुनिश्रेष्ठ अगस्त्यांनी श्रीरामांना -पूर्वीच रामांसाठी इंद्राने ठेवलेले धनुष्य, बाणाने भरलेले आणि अक्षय टिकणारे दोन बाणांचे भाते आणि रत्नविभूषित तलवार या गोष्टी दिल्या आणि म्हटले "हे राघवा, भूमीला भार झालेल्या राक्षस-समूहांचा संहार करा. (४५-४६)

त्यासाठीच मायेने मानव- रूप धारण करून तुम्ही या पृथ्वीवर अवतीर्ण झाला आहात. येथून दोन योजने अंतरावर, गौतमी नदीच्या तीरावर, पवित्र वनाने सुशोभित असा 'पंचवटी' नावाचा एक आश्रम आहे. हे रघुकुलश्रेष्ठा, तुम्ही आता तुमचा उरलेला काळ तेथे व्यतीत करावा. (४७-४८)

हे सज्जनांच्या स्वामी, तेथेच राहून तुम्ही देवांची पुष्कळ कार्ये करा." (४९)

अगस्त्यांनी चांगल्या प्रकारे उच्चारलेले ते वचन तसेच तात्त्विक अर्थाने युक्त असे स्तोत्र ऐकल्यावर, भगवान रामांनी मुनींचा निरोप घेतला. आणि सर्व जाणणारे हरी आनंदाने युक्त होऊन, अगस्त्यांनी दाखविलेल्या मार्गावरून जाण्यास निघाले. (५०)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

# चतुर्थ सर्ग

## पंचवटीत निवास आणि लक्ष्मणाला उपदेश

*श्रीमहादेव उवाच*

मार्गे व्रजन्ददर्शाथ शैलशृङ्गमिव स्थितम् ।
वृद्धं जटायुषं रामः किमेतदिति विस्मितः ॥ १ ॥

धनुरानय सौमित्रे राक्षसोऽयं पुरः स्थितः ।
इत्याह लक्ष्मणं रामो हनिष्याम्यृषिभक्षकम् ॥ २ ॥

तच्छ्रुत्वा रामवचनं गृध्रराड् भयपीडितः ।
वधार्होऽहं न ते राम पितुस्तेऽहं प्रियः सखा ॥ ३ ॥

जटायुर्नाम भद्रं ते गृध्रोऽहं प्रियकृत्तव ॥ ४ ॥

पञ्चवट्यामहं वत्स्ये तवैव प्रियकाम्यया ।
मृगयायां कदाचित्तु प्रयाते लक्ष्मणेऽपि च ॥ ५ ॥

सीता जनककन्या मे रक्षितव्या प्रयत्नतः ।
श्रुत्वा तद्गृध्रवचनं रामः सस्नेहमब्रवीत् ॥ ६ ॥

साधु गृध्र महाराज तथैव कुरु मे प्रियम् ।
अत्रैव मे समीपस्थो नातिदूरे वने वसन् ॥ ७ ॥

इत्यामन्त्रितमालिङ्ग्य ययौ पञ्चवटीं प्रभुः ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया रघुनन्दनः ॥ ८ ॥

गत्वा ते गौतमीतीरं पञ्चवट्यां सुविस्तरम् ।
मन्दिरं कारयामास लक्ष्मणेन सुबुद्धिना ॥ ९ ॥

तत्र ते न्यवसन्सर्वे गङ्गाया उत्तरे तटे ।
कदम्बपनसाम्रादिफलवृक्षसमाकुले ॥ १० ॥

विविक्ते जनसम्बाधवर्जिते नीरुजस्थले ।
विनोदयन् जनकजां लक्ष्मणेन विपश्चिता ॥ ११ ॥

अध्युवास सुखं रामो देवलोक इवापरः ।
कन्दमूलफलादीनि लक्ष्मणोऽनुदिनं तयोः ॥ १२ ॥

आनीय प्रददौ रामसेवातत्परमानसः ।
धनुर्बाणधरो नित्यं रात्रौ जागर्ति सर्वतः ॥ १३ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**— हे पार्वती, नंतर मार्गाने जाताना, पर्वत शिखराप्रमाणे प्रचंड असणारा वृद्ध जटायू रामांना दिसला. आणि 'हे काय आहे ?' असा विस्मय त्यांना वाटला. (१)

तेव्हा श्रीराम लक्ष्मणाला म्हणाले, "अरे लक्ष्मणा, माझे धनुष्य आण. हा कोणीतरी राक्षस पुढे ठाकला आहे. ऋषींना भक्षण करणाऱ्या या दुष्टाला मी ठार करतो." (२)

श्रीरामांचे ते वचन ऐकून तो गिधाडांचा राजा जटायू भयाने व्यथित होऊन म्हणाला, "अरे रामा, तू मला मारू नकोस. मी तुझ्या पित्याचा प्रिय मित्र जटायू नावाचा गृध्र आहे. मी तुझे हित करणारा आहे. तुझे कल्याण असो. (३-४)

तुझे प्रिय करण्याच्या इच्छेने मी या पंचवटीजवळ राहात आहे. कधी तू आणि लक्ष्मणसुद्धा मृगया करण्यास गेला असता मी काळजीपूर्वक जनककन्येचे रक्षण करीन." गृध्राचे ते वचन ऐकून श्रीरामचंद्रांनी स्नेहपूर्वक म्हटले. (५-६)

"हे गृध्र महाराज, तुमचे म्हणणे योग्य आहे. येथे या वनातच माझ्या सन्निध राहून, तुम्ही तुमच्या म्हणण्याप्रमाणे तुम्हांला आवडेल ते करा." (७)

अशा प्रकारे आपली संमती देऊन व त्याला आलिंगन देऊन, प्रभू रघुनंदन लक्ष्मण व सीता यांच्यासह पंचवटीकडे निघाले. (८)

ते सर्व जण गौतमी नदीच्या तटावर गेले. तेथे बुद्धिमान लक्ष्मणाने पंचवटीमध्ये एक फार विस्तृत आश्रम बनविला. (९)

तेथे गंगेच्या उत्तर तीरावर कदंब, फणस, आम्र इत्यादी फळांच्या वृक्षांनी भरलेल्या, लोकांच्या संपर्काने रहित असणाऱ्या, रोगरहित व एकांत स्थानी ते सर्व जण राहू लागले. बुद्धिमान लक्ष्मणासह, जनकात्मजा सीतेचे मनोरंजन करीत श्रीराम हे देवलोकाप्रमाणे असणाऱ्या त्या स्थानात दुसऱ्या इंद्राप्रमाणे सुखाने राहू लागले. रामांची सेवा करण्यास ज्याचे मन तत्पर होते असा लक्ष्मण दररोज कंद, मुळे, फळे इत्यादी आणून ती त्या दोघांना देत असे. आणि रात्री धनुष्य व बाण धारण करून तो सर्व प्रकारे नित्य पहारा करीत असे. (१०-१३)

स्नानं कुर्वन्त्यनुदिनं त्रयस्ते गौतमीजले ।
उभयोर्मध्यगा सीता कुरुते च गमागमौ ॥ १४ ॥

ते तिघेही प्रत्येक दिवशी गौतमी नदीच्या पाण्यात स्नान करीत. त्या वेळी त्या दोघांच्या मध्ये राहून सीता ये-जा करी. (१४)

आनीय सलिलं नित्यं लक्ष्मणः प्रीतमानसः ।
सेवतेऽहरहः प्रीत्या एवमासन् सुखं त्रयः ॥ १५ ॥

लक्ष्मण नेहमी पाणी आणावयाचे काम करी व आनंदित मनाने दररोज भक्तीनेच त्यांची सेवा करीत असे. अशा प्रकारे ती तिघे सुखाने राहू लागली. (१५)

एकदा लक्ष्मणो राममेकान्ते समुपस्थितम् ।
विनयावनतो भूत्वा पप्रच्छ परमेश्वरम् ॥ १६ ॥

एकदा एकान्तात असणाऱ्या श्रीरामांजवळ जाऊन आणि विनयाने नम्र होऊन लक्ष्मणाने परमेश्वर अशा श्रीरामांना विचारले. (१६)

भगवन् श्रोतुमिच्छामि मोक्षस्यैकान्तिकीं गतिम् ।
त्वत्तः कमलपत्राक्ष सङ्क्षेपाद्वक्तुमर्हसि ॥ १७ ॥

" हे भगवन राम, तुमच्याकडून मोक्षाचे ऐकांतिक साधन मी ऐकू इच्छित आहे. कमलनयन असणाऱ्या हे रामा, ते तुम्ही मला संक्षेपाने सांगा. (१७)

ज्ञानं विज्ञानसहितं भक्तिवैराग्यबृंहितम् ।
आचक्ष्व मे रघुश्रेष्ठ वक्ता नान्योऽस्ति भूतले ॥ १८ ॥

हे रघुश्रेष्ठा, भक्ती आणि वैराग्य यांनी युक्त असणारे विज्ञानासहित ज्ञान तुम्ही मला सांगा. या भूतलावर तुमच्याखेरीज अन्य कोणीही या विषयाचा उपदेश करणारा नाही." (१८)

*श्रीराम उवाच*

शृणु वक्ष्यामि ते वत्स गुह्याद्गुह्यतरं परम् ।
यद्विज्ञाय नरो जह्यात्सद्यो वैकल्पिकं भ्रमम् ॥ १९ ॥

**श्रीराम म्हणाले**– "वत्सा, ऐक. गुह्यापेक्षा श्रेष्ठ गुह्य मी तुला सांगेन. ते जाणल्यावर माणूस विकल्प-जनित संसार- रूपी भ्रम ताबडतोब टाकून देतो. (१९)

आदौ मायास्वरूपं ते वक्ष्यामि तदनन्तरम् ।
ज्ञानस्य साधनं पश्चाज्ज्ञानं विज्ञानसंयुतम् ॥ २० ॥

ज्ञेयं च परमात्मानं यज्ज्ञात्वा मुच्यते भयात् ।
अनात्मनि शरीरादावात्मबुद्धिस्तु या भवेत् ॥ २१ ॥

सैव माया तयैवासौ संसारः परिकल्प्यते ।
रूपे द्वे निश्चिते पूर्वं मायायाः कुलनन्दन ॥ २२ ॥

प्रथम मी तुला मायेचे स्वरूप सांगतो. त्यानंतर ज्ञानाचे साधन सांगतो आणि त्यानंतर विज्ञानाने युक्त असे ज्ञान सांगतो. त्याखेरीज ज्ञेय अशा परमात्म्याचे स्वरूप मी सांगतो. ते सर्व जाणल्यावर मनुष्य हा संसाराच्या भीतीपासून मुक्त होऊन जातो. आत्मा नसणाऱ्या अशा शरीर इत्यादी पदार्थांच्या ठिकाणी ते आत्मा आहेत अशी जी बुद्धी होते तीच माया होय. तिच्यामुळेच हा विश्वप्रपंच कल्पिला जातो. हे कुलनंदना, प्रथमतः मायेची दोन रूपे आहेत, असे मानले आहे. (२०-२२)

विक्षेपावरणे तत्र प्रथमं कल्पयेज्जगत् ।
लिङ्गाद्याब्रह्मपर्यन्तं स्थूलसूक्ष्मविभेदतः ॥ २३ ॥

विक्षेप आणि आवरण अशी मायेची दोन रूपे आहेत. त्यांतील पहिले रूप म्हणजे विक्षेप हे लिंगापासून-महत्तत्त्वापासून-ते थेट ब्रह्मदेवापर्यंत स्थूल आणि सूक्ष्म या भेदांसह जगाची कल्पना करते. (२३)

अपरं त्वखिलं ज्ञानरूपमावृत्य तिष्ठति ।
मायया कल्पितं विश्वं परमात्मनि केवले ॥ २४ ॥

रज्जौ भुजङ्गवद् भ्रान्त्या विचारे नास्ति किञ्चन ।
श्रूयते दृश्यते यद्यत्स्मर्यते वा नरैः सदा ॥ २५ ॥

मायेचे दुसरे (आवरण हे) रूप संपूर्ण ज्ञानावर आवरण टाकते. ज्या प्रमाणे भ्रांतीमुळे रज्जूचे ठिकाणी भुजंग कल्पिला जातो, त्या प्रमाणे केवळ शुद्ध अशा परमात्म्यावर हे विश्व मायेने कल्पिलेले आहे. विचार केला असता हे काहीही नाही, असे कळून येते. या जगात माणसे जे जे नेहमी ऐकतात, पाहातात अथवा स्मरण करतात, ते ते सर्व

असदेव हि तत्सर्वं यथा स्वप्नमनोरथौ ।
देह एव हि संसारवृक्षमूलं दृढं स्मृतम् ॥ २६ ॥

तन्मूलः पुत्रदारादिबन्धः किं तेऽन्यथात्मनः ॥ २७ ॥

देहस्तु स्थूलभूतानां पञ्च तन्मात्रपञ्चकम् ।
अहंकारश्च बुद्धिश्च इन्द्रियाणि तथा दश ॥ २८ ॥

चिदाभासो मनश्चैव मूलप्रकृतिरेव च ।
एतत्क्षेत्रमिति ज्ञेयं देह इत्यभिधीयते ॥ २९ ॥

एतैर्विलक्षणो जीवः परमात्मा निरामयः ।
तस्य जीवस्य विज्ञाने साधनान्यपि मे शृणु ॥ ३० ॥

जीवश्च परमात्मा च पर्यायो नात्र भेदधीः ।
मानाभावस्तथा दम्भहिंसादिपरिवर्जनम् ॥ ३१ ॥

पराक्षेपादिसहनं सर्वत्रावक्रता तथा ।
मनोवाक्कायसद्भक्त्या सद्गुरोः परिसेवनम् ॥ ३२ ॥

बाह्याभ्यन्तरसंशुद्धिः स्थिरता सत्क्रियादिषु ।
मनोवाक्कायदण्डश्च विषयेषु निरीहता ॥ ३३ ॥

निरहङ्कारता जन्मजराद्यालोचनं तथा ।
असक्तिः स्नेहशून्यत्वं पुत्रदारधनादिषु ॥ ३४ ॥

इष्टानिष्टागमे नित्यं चित्तस्य समता तथा ।
मयि सर्वात्मके रामे ह्यनन्यविषया मतिः ॥ ३५ ॥

जनसम्बाधरहितशुद्धदेशनिषेवणम् ।
प्राकृतैर्जनसङ्घैश्च ह्यरतिः सर्वदा भवेत् ॥ ३६ ॥

आत्मज्ञाने सदोद्योगो वेदान्तार्थावलोकनम् ।
उक्तैरेतैर्भवेज्ज्ञानं विपरीतैर्विपर्ययः ॥ ३७ ॥

बुद्धिप्राणमनोदेहाहङ्कृतिभ्यो विलक्षणः ।
चिदात्माहं नित्यशुद्धो बुद्ध एवेति निश्चयम् ॥ ३८ ॥

येन ज्ञानेन संवित्ते तज्ज्ञानं निश्चितं च मे ।
विज्ञानं च तदैवैतत्साक्षादनुभवेद्यदा ॥ ३९ ॥

स्वप्न किंवा मनोरथ यांसारखे संपूर्णपणे असत् व अविद्यमान आहे. देह हाच या संसाररूपी वृक्षाचे बळकट मूळ आहे, असे म्हटले जाते. (२४-२६)

या देहामुळेच पुत्र, पत्नी इत्यादी बंधन येते. तसे नसते तर त्यांचा आत्म्याशी काय संबंध आहे ? (२७)

पाच स्थूल भूते, पाच तन्मात्रा , अहंकार, बुद्धी, दहा इंद्रिये, चिदाभास आणि मन तसेच मूल प्रकृती हे सर्व मिळून क्षेत्र बनते, असे जाणावे. हे क्षेत्र म्हणजेच देह असे म्हटले जाते. (२८-२९)

निर्दोष असा परमात्मरूप जीव या सर्वांपेक्षा भिन्न आहे. त्या जीवाचे ज्ञान होण्यासाठी जी काही साधने आहेत तीसुद्धा मी तुला सांगतो. ती तू ऐक. (३०)

जीव आणि परमात्मा हे शब्द पर्यायवाचक आहेत. म्हणून त्यांचे बाबतीत ते भिन्न आहेत असे मानू नये. (आता ज्ञानाची साधने ऐकः) अभिमानाचा अभाव; दंभ, हिंसा इत्यादींचा त्याग; दुसऱ्याने केलेली निंदा सहन करणे; सर्व बाबतीत सरळपणा, मन, वाणी आणि शरीर यांचे द्वारा उत्तम भक्तीने सद्गुरुसेवा; बाह्य व आंतरशुद्धी; सत्कर्मे करण्यात स्थिरता राखणे; मन, वाणी व शरीर यांचा संयम; विषयांच्या ठिकाणी इच्छा नसणे; अहंकाररहित असणे; जन्म, जरा इत्यादीमुळे होणाऱ्या दुःखांचा विचार; पुत्र, पत्नी, धन इत्यादींचे ठिकाणी आसक्तीचा आणि प्रेमाचा अभाव; इष्ट किंवा अनिष्ट गोष्टी प्राप्त झाल्या असता नेहमी चित्त सम ठेवणे; सर्वात्मक अशा माझ्या- रामाच्या -ठिकाणी अनन्य भक्ती; जनसंपर्काने रहित अशा पवित्र स्थानी वास्तव्य; सामान्य संसारी लोकसमाजाविषयी सर्वदा नावड बाळगणे; आत्मज्ञानाचे प्राप्तीसाठी नेहमी प्रयत्न करणे; वेदान्ताच्या अर्थाचा विचार- या आता सांगितलेल्या साधनांनी ज्ञान प्राप्त होईल. यांच्याविरुद्ध असणाऱ्या गोष्टींनी ज्ञानाच्या उलट फळ म्हणजे अज्ञान प्राप्त होते. (३१-३७)

बुद्धी, प्राण, मन, देह आणि अहंकार यांच्यापेक्षा वेगळा असणारा, नित्य शुद्ध-बुद्ध असा चैतन्यरूप आत्मा मीच आहे, असा निश्चय ज्या ज्ञानाच्या योगाने माणसाला अनुभवास येतो, ते ज्ञान होय, असे माझे निश्चित मत आहे. आणि जेव्हा या ज्ञानाचा साक्षात अनुभव माणसाला येईल तेव्हा ते ज्ञानच विज्ञान होते. (३८-३९)

आत्मा सर्वत्र पूर्णः स्याच्चिदानन्दात्मकोऽव्ययः ।
बुद्ध्याद्युपाधिरहितः परिणामादिवर्जितः ॥ ४० ॥

आत्मा हा सर्वत्र पूर्ण चिदानंदस्वरूपी, अविनाशी, बुद्धी इत्यादी उपाधींनी तसेच विकार इत्यादींनी रहित आहे. (४०)

स्वप्रकाशेन देहादीन् भासयन्ननपावृतः ।
एक एवाद्वितीयश्च सत्यज्ञानादिलक्षणः ॥ ४१ ॥

असङ्गः स्वप्रभो द्रष्टा विज्ञानेनावगम्यते ।
आचार्यशास्त्रोपदेशादैक्यज्ञानं यदा भवेत् ॥ ४२ ॥

आत्मनोर्जीवपरयोर्मूलाविद्या तदैव हि ।
लीयते कार्यकरणैः सहैव परमात्मनि ॥ ४३ ॥

तो आत्मा स्वतःच्या प्रकाशाने देह इत्यादींना प्रकाशित करतो; तो स्वतः आवरणरहित आहे. तो एकच , अद्वितीय, आणि सत्य ज्ञान इत्यादी स्वरूप असणारा आहे. तो आत्मा संगरहित, स्वयंप्रकाशी, साक्षी आहे, हे विज्ञानाने कळून येते. आचार्य व शास्त्र यांच्या उपदेशाने जेव्हा जीवात्मा आणि परमात्मा यांच्या एकत्वाचे ज्ञान होते, तेव्हाच मूलाविद्या ही स्वतःचे शरीर इत्यादी कार्य आणि इंद्रिये ही करणे यांच्यासह परमात्म्यामध्ये लीन होऊन जाते. (४१-४३)

सावस्था मुक्तिरित्युक्ता ह्युपचारोऽयमात्मनि ।
इदं मोक्षस्वरूपं ते कथितं रघुनन्दन ॥ ४४ ॥

ज्ञानविज्ञानवैराग्यसहितं मे परात्मनः ।
किन्त्वेतद्दुर्लभं मन्ये मद्भक्तिविमुखात्मनाम् ॥ ४५ ॥

परमात्म्यामध्ये मूल अविद्येचा लय ही अवस्था म्हणजे मुक्ती असे म्हटले जाते. हा मोक्ष म्हणजे आत्म्याच्या ठिकाणी केवळ उपचार होय. (कारण आत्मा हा सदा मुक्तच आहे. त्याची मुक्त अवस्था ही नवीन कोठून येणारी नाही). हे रघुनंदन लक्ष्मणा, ज्ञान, विज्ञान आणि वैराग्य यांच्या सह हे परमात्म्याचे मोक्षस्वरूप मी तुला सांगितले आहे. परंतु माझ्या भक्तीला ज्याचे मन विन्मुख आहे, त्याला ते सर्व दुर्लभ आहे, असे माझे मत आहे. (४४-४५)

चक्षुष्मतामपि यथा रात्रौ सम्यङ् न दृश्यते ।
पदं दीपसमेतानां दृश्यते सम्यगेव हि ॥ ४६ ॥

एवं मद्भक्तियुक्तानामात्मा सम्यक् प्रकाशते ।
मद्भक्तेः कारणं किञ्चिद्वक्ष्यामि शृणु तत्त्वतः ॥ ४७ ॥

डोळे शाबूत असणाऱ्या लोकांनासुद्धा ज्या प्रमाणे रात्री अंधारामुळे चोर, इत्यादींच्या पाऊलखुणा नीटशा दिसू शकत नाहीत, याउलट जवळ दिवा असणाऱ्या माणसांना ते नीट दिसून येते, त्याप्रमाणे माझ्या भक्तीने युक्त असणाऱ्या पुरुषांच्या पुढे आत्मा हा योग्य प्रकारे प्रगट होतो. आता माझी भक्ती निर्माण होण्याची काही कारणे मी तुला तत्त्वतः सांगतो, ती तू ऐक. (४६-४७)

मद्भक्तसङ्गो मत्सेवा मद्भक्तानां निरन्तरम् ।
एकादश्युपवासादि मम पर्वानुमोदनम् ॥ ४८ ॥

मत्कथाश्रवणे पाठे व्याख्याने सर्वदा रतिः ।
मत्पूजापरिनिष्ठा च मम नामानुकीर्तनम् ॥ ४९ ॥

माझ्या भक्तांची संगती, निरंतर माझी आणि माझ्या भक्तांची सेवा, एकादशीच्या दिवशी उपवास इत्यादी करणे, माझे पर्व-दिवस पाळणे, माझी कथा ऐकण्यात, पठन करण्यात आणि तिचे स्पष्टीकरण करण्यात नेहमी आवड बाळगणे, माझ्या पूजेच्या बाबतीत आत्यंतिक निष्ठा आणि माझ्या नामाचे संकीर्तन हे सर्व माझी भक्ती उत्पन्न होण्याचे उपाय आहेत. (४८-४९)

एवं सततयुक्तानां भक्तिरव्यभिचारिणी ।
मयि सञ्जायते नित्यं ततः किमवशिष्यते ॥ ५० ॥

अशा प्रकारे जे सतत माझ्या ठिकाणी तत्पर असतात, त्यांच्या ठिकाणी माझ्या विषयीची अव्यभिचारी भक्ती उत्पन्न होते. त्यानंतर मग काय बरे शिल्लक राहते? (५०)

अतो मद्भक्तियुक्तस्य ज्ञानं विज्ञानमेव च ।
वैराग्यं च भवेच्छीघ्रं ततो मुक्तिमवाप्नुयात् ॥ ५१ ॥

म्हणून हे नक्की आहे की वर सांगितलेल्या माझ्या भक्तीने युक्त असणाऱ्या पुरुषाच्या बाबतीत ज्ञान, विज्ञान आणि वैराग्य हे शीघ्र निर्माण होतात आणि त्या नंतर तो पुरुष मुक्ती प्राप्त करून घेतो. (५१)

कथितं सर्वमेतत्ते तव प्रश्नानुसारतः ।
अस्मिन्मनः समाधाय यस्तिष्ठेत्स तु मुक्तिभाक् ॥ ५२ ॥

तुझ्या प्रश्नाला अनुसरून हे सर्व मी तुला सांगितले आहे. या कथनाचे ठिकाणी मन मग्न करून जो राहील तो मुक्ती प्राप्त करून घेईल. (५२)

न वक्तव्यमिदं यत्नान्मद्भक्तिविमुखाय हि ।
मद्भक्ताय प्रदातव्यमाहूयापि प्रयत्नतः ॥ ५३ ॥

माझ्या भक्तिला जे विन्मुख आहेत, त्यांना हे सांगू नये. या उलट माझ्या भक्ताला बोलावून आणूनसुद्धा प्रयत्नपूर्वक त्याला हे सांगावे. (५३)

य इदं तु पठेन्नित्यं श्रद्धाभक्तिसमन्वितः ।
अज्ञानपटलध्वान्तं विधूय परिमुच्यते ॥ ५४ ॥

जो कुणी पुरुष श्रद्धा आणि भक्ती यांनी युक्त होऊन हे सर्व विवेचन नेहमी पठण करील तो अज्ञान-समूहरूपी अंधकार टाकून देऊन मुक्त होईल. (५४)

भक्तानां मम योगिनां सुविमल-
स्वान्तातिशान्तात्मनां
मत्सेवाभिरतात्मनां च विमल-
ज्ञानात्मनां सर्वदा ।
सङ्गं यः कुरुते सदोद्यतमति-
स्तत्सेवनानन्यधी-
र्मोक्षस्तस्य करे स्थितोऽहमनिशं
दृश्यो भवे नान्यथा ॥ ५५ ॥

ज्याचे अंत:करण अतिशय शुद्ध आहे, ज्याचे मन अतिशय शांत आहे, ज्याचे मन माझी सेवा करण्यात रत आहे, ज्याच्या मनात शुद्ध ज्ञान आहे, अशा माझ्या भक्त-योग्याची संगती, जो कुणी सदा तत्पर बुद्धी ठेवून करतो आणि त्याची सेवा करण्यात अनन्य असतो, त्याच्या हाती मोक्ष असतो आणि मी त्याला रात्रंदिवस दृश्यमान होतो, अन्यथा नाही." (५५)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

# पञ्चम सर्ग

## शूर्पणखेला शिक्षा, खर इत्यादी राक्षसांचा वध आणि शूर्पणखेचे रावणाकडे गमन

*श्रीमहादेव उवाच*

तस्मिन् काले महारण्ये राक्षसी कामरूपिणी ।
विचचार महासत्त्वा जनस्थाननिवासिनी ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, त्या काळी त्या महाघोर अरण्यात, जनस्थानात राहाणारी महा-सामर्थ्यसंपन्न, इच्छेनुसार रूपे धारण करणारी एक राक्षसी फिरत असे. (१)

एकदा गौतमीतीरे पञ्चवट्याः समीपतः ।
पद्मवज्राङ्कुशाङ्कानि पदानि जगतीपतेः ॥ २ ॥

दृष्ट्वा कामपरीतात्मा पादसौन्दर्यमोहिता ।
पश्यन्ती सा शनैरायाद्राघवस्य निवेशनम् ॥ ३ ॥

एकदा गौतमी नदीच्या तीरावर, पंचवटीच्या जवळ, जगत्पती श्रीरामांची पद्म, वज्र व अंकुश यांनी युक्त असणारी पदचिन्हे पाहूनच, त्या पावलांच्या सौंदर्याने मोहित झाल्याने, तिचे मन कामेच्छेने भरून गेले; आणि पदचिन्हे पाहात पाहात ती हळूहळू श्रीरामांच्या आश्रमात आली. (२-३)

तत्र सा तं रमानाथं सीतया सह संस्थितम् ।
कन्दर्पसदृशं रामं दृष्ट्वा कामविमोहिता ॥ ४ ॥

राक्षसी राघवं प्राह कस्य त्वं कः किमाश्रमे ।
युक्तो जटावल्कलाद्यैः साध्यं किं तेऽत्र मे वद ॥ ५ ॥

तेथे मदन-सदृश, लक्ष्मीपती अशा श्रीरामचंद्रांना सीतेसहित बसलेले पाहून, ती कामातुर झालेली राक्षसी राघवांना म्हणाली, "तू कुणाचा पुत्र आहेस? तुझे नाव काय आहे ? जटा, वल्कल इत्यादी धारण करून तू या आश्रमात का राहात आहेस ? येथे तुला काय मिळवायचे आहे ? हे सर्व मला सांग. (४-५)

अहं शूर्पणखा नाम राक्षसी कामरूपिणी ।
भगिनी राक्षसेन्द्रस्य रावणस्य महात्मनः ॥ ६ ॥

राक्षसराज महात्म्या रावणाची बहीण आणि इच्छेप्रमाणे कोणतेही रूप धारण करणारी शूर्पणखा नावाची मी राक्षसी आहे. (६)

खरेण सहिता भ्रात्रा वसाम्यत्रैव कानने ।
राज्ञा दत्तं च मे सर्वं मुनिभक्षा वसाम्यहम् ॥ ७ ॥

खर नावाच्या भावासह मी येथेच वनात राहात असते. राजाने मला हे सर्व वन दिले आहे. मुनींना भक्षण करीत मी येथेच राहात असते. (७)

त्वां तु वेदितुमिच्छामि वद मे वदतां वर ।
तामाह रामनामाहमयोध्याधिपतेः सुतः ॥ ८ ॥

वक्त्यांमध्ये श्रेष्ठ असणाऱ्या हे पुरुषा, मी तुझ्याविषयी सर्व काही जाणू इच्छिते. म्हणून ते मला सांग." तेव्हा श्रीराम तिला सांगू लागले, " मी अयोध्यापती दशरथ राजांचा राम नावाचा पुत्र आहे. (८)

एषा मे सुन्दरी भार्या सीता जनकनन्दिनी ।
स तु भ्राता कनीयान्मे लक्ष्मणोऽतीव सुन्दरः ॥ ९ ॥

ही सुंदर स्त्री, जनककन्या सीता ही माझी भार्या आहे. आणि अतिशय सुंदर असणारा हा माझा धाकटा भाऊ लक्ष्मण आहे. (९)

किं कृत्यं ते मया ब्रूहि कार्यं भुवनसुन्दरि ।
इति रामवचः श्रुत्वा कामार्ता साब्रवीदिदम् ॥ १० ॥

हे त्रिभुवनसुंदरी, मी तुझे कोणते कार्य करू, ते मला सांग." असे श्रीरामांचे वचन ऐकल्यावर ती काम-पीडित शूर्पणखा म्हणाली. (१०)

एहि राम मया सार्धं रमस्व गिरिकानने ।
कामार्ताहं न शक्नोमि त्यक्तुं त्वां कमलेक्षणम् ॥ ११ ॥

"रामा, चल. एखाद्या गिरि-काननात तू माझ्याबरोबर रममाण हो. मी कामेच्छेने पीडित आहे. कमलनयन असलेल्या तुला मी सोडू शकत नाही." (११)

रामः सीतां कटाक्षेण पश्यन् सस्मितमब्रवीत् ।
भार्या ममैषा कल्याणी विद्यते ह्यनपायिनी ॥ १२ ॥

सीतेकडे कटाक्ष टाकून स्मित करीत श्रीराम म्हणाले, "हे सुंदरी, ही माझी कल्याणकारक भार्या आहे आणि मला तिला टाकता येणे शक्य नाही. (१२)

त्वं तु सापत्न्यदुःखेन कथं स्थास्यसि सुन्दरि ।
बहिरास्ते मम भ्राता लक्ष्मणोऽतीव सुन्दरः ॥ १३ ॥

हे सुंदरी, तू सवतीचे दुःख भोगत कशी बरे राहू शकशील ? या आश्रमाच्या बाहेर अतिशय सुंदर असा माझा भाऊ लक्ष्मण आहे. (१३)

तवानुरूपो भविता पतिस्तेनैव सञ्चर ।
इत्युक्ता लक्ष्मणं प्राह पतिर्मे भव सुन्दर ॥ १४ ॥

भ्रातुराज्ञां पुरस्कृत्य सङ्गच्छावोऽद्य मा चिरम् ।
इत्याह राक्षसी घोरा लक्ष्मणं काममोहिता ॥ १५ ॥

तो तुला अनुरूप पती आहे. त्याच्याबरोबरच तू राहा." श्रीरामांनी असे म्हटल्यावर ती लक्ष्मणाकडे आली, "भावाची आज्ञा शिरोधार्थ मानून, हे सुंदर पुरुषा, तू माझा पती हो. आज आपणा दोघांचे मीलन होवो. उशीर करू नको." कामाने मोहित झालेली ती भयंकर राक्षसी लक्ष्मणाला असे म्हणाली. (१४-१५)

तामाह लक्ष्मणःसाध्वि दासोऽहं तस्य धीमतः ।
दासी भविष्यसि त्वं तु ततो दुःखतरं नु किम् ॥१६ ॥

तिला लक्ष्मण म्हणाला, "बाई ग , त्या बुद्धिमान श्रीरामांचा मी दास आहे. माझ्याशी विवाह करून तुला त्यांची दासी व्हावे लागेल. यापेक्षा अधिक दुःखकारक काय असेल बरे ? (१६)

तमेव गच्छ भद्रं ते स तु राजाखिलेश्वरः ।
तच्छ्रुत्वा पुनरप्यागाद्राघवं दुष्टमानसा ॥ १७ ॥

तेव्हा तू त्यांच्याकडेच जा. तुझे कल्याण असो. ते महाराज सर्वांचे स्वामी आहेत." हे लक्ष्मणाचे वचन ऐकून ती दुष्ट मनाची राक्षसी पुन्हा राघवाकडे गेली. (१७)

क्रोधाद्राम किमर्थं मां भ्रामयस्यनवस्थितः ।
इदानीमेव तां सीतां भक्षयामि तवाग्रतः ॥ १८ ॥

आणि रागाने रामांना म्हणाली, "अरे रामा, चंचल चित्त असणारा तू मला का बरे इकडे तिकडे फिरवीत आहेस? तुझ्यासमोर मी आत्ताच या सीतेला खाऊन टाकते." (१८)

इत्युक्त्वा विकटाकारा जानकीमनुधावति ।
ततो रामाज्ञया खड्‌गमादाय परिगृह्य ताम् ॥ १९ ॥

चिच्छेद नासां कर्णौ च लक्ष्मणो लघुविक्रमः ।
ततो घोरध्वनिं कृत्वा रुधिराक्तवपुर्द्रुतम् ॥ २० ॥

क्रन्दमाना पपाताग्रे खरस्य परुषाक्षरा ।
किमेतदिति तामाह खरः खरतराक्षरः ॥ २१ ॥

असे बोलून आणि भयंकर रूप धारण करून ती जानकीकडे धावली. तेव्हा श्रीरामांच्या आज्ञेवरून, तिला पकडून, आणि हातात खड्‌ग घेऊन, महापराक्रमी लक्ष्मणाने तिचे नाक आणि दोन्ही कान कापून टाकले. तेव्हा भयंकर किंकाळी मारून, रक्ताने लडबडलेले शरीर घेऊन, ती रडत ओरडत आणि कठोर शब्द बोलत घाईघाईने जाऊन खरापुढे पडली. कर्कश बोलणाऱ्या खराने तिला म्हटले, "अग, काय हे ? (१९-२१)

केनैवं कारितासि त्वं मृत्योर्वक्त्रानुवर्तिना ।
वद मे तं वधिष्यामि कालकल्पमपि क्षणात् ॥ २२ ॥

मृत्यूच्या मुखात जाऊ इच्छिणाऱ्या कुणी बरे तुझी अशी दशा केली आहे ? मला सांग तू. तो जरी काळाप्रमाणे असला तरी मी क्षणात त्याचा वध करीन." (२२)

तमाह राक्षसी रामः सीतालक्ष्मणसंयुतः ।
दण्डकं निर्भयं कुर्वन्नास्ते गोदावरीतटे ॥ २३ ॥

तेव्हा ती राक्षसी त्याला म्हणाली, " सीता आणि लक्ष्मण यांच्यासह असणारा राम दंडकारण्याला निर्भय करीत, गोदावरीच्या तीरावर राहात आहे. (२३)

मामेवं कृतवांस्तस्य भ्राता तेनैव चोदितः ।
यदि त्वं कुलजातोऽसि वीरोऽसि जहि तौ रिपू ॥ २४ ॥

त्या रामाच्या सांगण्यावरून त्याच्या भावानेच माझी अशी दशा केली आहे. जर तू उच्च कुळात जन्माला आला असशील आणि जर तू वीर असशील, तर तू त्या दोन शत्रूंना ठार कर. (२४)

तयोस्तु रुधिरं पास्ये भक्षयैतौ सुदुर्मदौ ।
नो चेत्प्राणान्परित्यज्य यास्यामि यमसादनम् ॥ २५ ॥

त्या दोघांचे रक्त मी पिईन. त्या दोन अतिशय मन्दोन्मत्त माणसांना तू खाऊन टाक. नाही तर प्राणत्याग करून मी यमसदनास जाईन." (२५)

तच्छ्रुत्वा त्वरितं प्रागात्खरः क्रोधेन मूर्च्छितः ।
चतुर्दश सहस्त्राणि रक्षसां भीमकर्मणाम् ॥ २६ ॥

चोदयामास रामस्य समीपं वधकाङ्क्षया ।
खरश्च त्रिशिराश्चैव दूषणश्चैव राक्षसः ॥ २७ ॥

सर्वे रामं ययुः शीघ्रं नानाप्रहरणोद्यताः ।
श्रुत्वा कोलाहलं तेषां रामः सौमित्रिमब्रवीत् ॥ २८ ॥

ते ऐकल्यावर, क्रोधाने झपाटलेला खर रामांबरोबर युद्ध करण्यास त्वरित निघाला. आणि श्रीरामांचा वध करण्याच्या इच्छेने त्याने भयंकर कर्मे करणाऱ्या चौदा हजार राक्षसांना श्रीरामांवर चालून जाण्याची आज्ञा केली. तसेच खर, त्रिशिरा आणि दूषण असे हे सर्व राक्षस नाना प्रकारची अस्त्रे परजून झटक्यात श्रीरामांकडे गेले. त्यांचा कोलाहल ऐकल्यावर श्रीराम लक्ष्मणाला म्हणाले. (२६-२८)

श्रूयते विपुलः शब्दो नूनमायान्ति राक्षसाः ।
भविष्यति महद्युद्धं नूनमद्य मया सह ॥ २९ ॥

"लक्ष्मणा, बघ. प्रचंड आवाज ऐकू येत आहे. निश्चितपणे राक्षस आपल्यावर चालून येत आहेत. आज खरेच माझ्याबरोबर त्यांचे प्रचंड युद्ध होईल. (२९)

सीतां नीत्वा गुहां गत्वा तत्र तिष्ठ महाबल ।
हन्तुमिच्छाम्यहं सर्वान् राक्षसान् घोररूपिणः ॥ ३० ॥

म्हणून, हे महाबली लक्ष्मणा, सीतेला घेऊन एका गुहेत जाऊन तू तेथेच थांब. भयंकर रूप असणाऱ्या सर्व राक्षसांचा वध करण्याची माझी इच्छा आहे. (३०)

अत्र किञ्चिन्न वक्तव्यं शापितोऽसि ममोपरि ।
तथेति सीतामादाय लक्ष्मणो गह्वरं ययौ ॥ ३१ ॥

या बाबतीत तू काहीही बोलावयाचे नाही. तुला माझी शपथ आहे." "ठीक आहे," असे म्हणून सीतेला घेऊन लक्ष्मण एका गुहेत गेला. (३१)

रामः परिकरं बद्ध्वा धनुरादाय निष्ठुरम् ।
तूणीरावक्षयशरौ बद्ध्वायत्तोऽभवत्प्रभुः ॥ ३२ ॥

इकडे कंबर कसून, बळकट धनुष्य घेऊन, अक्षय बाण असणारे दोन भाते पाठीवर बांधून प्रभू रामचंद्र युद्धासाठी सज्ज झाले. (३२)

तत आगत्य रक्षांसि रामस्योपरि चिक्षिपुः ।
आयुधानि विचित्राणि पाषाणान्पादपानपि ॥ ३३ ॥

त्यानंतर राक्षस तेथे आले आणि त्यांनी श्रीरामांवर नाना प्रकारची विचित्र शस्त्रे, दगड आणि वृक्षसुद्धा फेकले. (३३)

तानि चिच्छेद रामोऽपि लीलया तिलशःक्षणात् ।
ततो बाणसहस्रेण हत्वा तान् सर्वराक्षसान् ॥ ३४ ॥

खरं त्रिशिरसं चैव दूषणं चैव राक्षसम् ।
जघान प्रहरार्धेन सर्वानेव रघूत्तमः ॥ ३५ ॥

श्रीरामांनीसुद्धा एका क्षणात त्यांचे तिळतिळ तुकडे करून ती अस्त्रे तोडून टाकली. नंतर हजारो बाणांनी त्या सर्व राक्षसांना ठार करून, खर, त्रिशिरा व दूषण या सर्वच राक्षसांना त्यांनी ठार केले. अशा प्रकारे अर्ध्या प्रहरातच रघूत्तमांनी त्या सर्वच राक्षसांना मारून टाकले. (३४-३५)

लक्ष्मणोऽपि गुहामध्यात्सीतामादाय राघवे ।
समर्प्य राक्षसान्दृष्ट्वा हतान्विस्मयमाययौ ॥ ३६ ॥

नंतर गुहेमधून सीतेला परत आणून लक्ष्मणाने तिला श्रीरामांच्या स्वाधीन केले. सर्व राक्षस मेलेले पाहून लक्ष्मण विस्मय-चकित झाला. (३६)

सीता रामं समालिङ्ग्य प्रसन्नमुखपङ्कजा ।
शस्त्रव्रणानि चाङ्गेषु ममार्ज जनकात्मजा ॥ ३७ ॥

जिचे मुखकमल प्रसन्न झाले आहे अशा सीतेने श्रीरामांना आलिंगन दिले आणि जनककन्या सीतेने श्रीरामांच्या अंगावरील शस्त्रांच्या जखमा धुवून काढल्या. (३७)

सापि दुद्राव दृष्ट्वा तान्हतान् राक्षसपुङ्गवान् ।
लङ्कां गत्वा सभामध्ये क्रोशन्ती पादसन्निधौ ॥ ३८ ॥

रावणस्य पपातोर्व्यां भगिनी तस्य रक्षसः ।
दृष्ट्वा तां रावणः प्राह भगिनीं भयविह्वलाम् ॥ ३९ ॥

ते सर्व महाभयंकर राक्षस मारले गेले आहेत हे पाहून राक्षसराज रावणाची ती बहीण पळत सुटली, आणि लंकेत जाऊन, राजसभेमध्ये बसलेल्या रावणाच्या पायाजवळ आक्रोश करीत जमिनीवर पडली. भयाने विव्हळ झालेल्या आपल्या बहिणीला पाहून रावण तिला म्हणाला. (३८-३९)

उत्तिष्ठोत्तिष्ठ वत्से त्वं विरूपकरणं तव ।
कृतं शक्रेण वा भद्रे यमेन वरुणेन वा ॥ ४० ॥

कुबेरेणाथवा ब्रूहि भस्मीकुर्यां क्षणेन तम् ।
राक्षसी तमुवाचेदं त्वं प्रमत्तो विमूढधीः ॥ ४१ ॥

"अग वत्से, ऊठ, ऊठ. हे भद्रे, तुझे हे रूप कुणी विद्रूप केले ? इंद्राने की यमाने की वरुणाने की कुबेराने? मला सांग. एका क्षणात मी त्याला भस्म करून टाकीन." तेव्हा राक्षसी त्याला असे म्हणाली, "रावणा, तू निष्काळजी झाला आहेस. आणि तुझ्या बुद्धीला मोह पडला आहे. (४०-४१)

पानासक्तः स्त्रीविजितः षण्ढः सर्वत्र लक्ष्यसे ।
चारचक्षुर्विहीनस्त्वं कथं राजा भविष्यसि ॥ ४२ ॥

तू मद्यपानात आसक्त आहेस. तू स्त्री-वश झाला आहेस. सर्वच बाबतीत तू एकाद्या षंढाप्रमाणे दिसतोस. गुप्तहेररूपी नेत्र नसलेला तू राजा कसा बरे राहाशील ? (४२)

खरश्च निहतः सङ्ख्ये दूषणस्त्रिशिरास्तथा ।
चतुर्दश सहस्राणि राक्षसानां महात्मनाम् ॥ ४३ ॥

निहतानि क्षणेनैव रामेणासुरशत्रुणा ।
जनस्थानमशेषेण मुनीनां निर्भयं कृतम् ।
न जानासि विमूढस्त्वमत एव मयोच्यते ॥ ४४ ॥

युद्धात खर मारला गेला. तसेच दूषण आणि त्रिशिरा हेही मारले गेले. तसेच चौदा हजार महाशक्तिशाली भयंकर राक्षसही असुरांचा शत्रू असणाऱ्या रामाकडून एका क्षणातच ठार केले गेले. अशा प्रकारे ते जनस्थान रामाने मुनींच्यासाठी संपूर्णपणे निर्भय करून टाकले आहे. परंतु तुला माहिती दिसत नाही. म्हणूनच तू फार मूर्ख आहेस, असे मी म्हणाले." (४३-४४)

*रावण उवाच*

को वा रामः किमर्थं वा कथं तेनासुरा हताः ।
सम्यक्कथय मे तेषां मूलघातं करोम्यहम् ॥ ४५ ॥

**रावण म्हणाला** – "अग, हा राम कोण आहे ? त्याने असुरांना कशासाठी आणि कसे ठार केले ? तू मला सर्व नीट सांग. मी त्याचा समूळ नाश करीन." (४५)

*शूर्पणखोवाच*

जनस्थानादहं याता कदाचिद्गौतमीतटे ।
तत्र पञ्चवटी नाम पुरा मुनिजनाश्रया ॥ ४६ ॥

**शूर्पणखा म्हणाली** –"एकदा मी जनस्थानातून गौतमीच्या तीरावर गेले होते. पूर्वी जेथे मुनीजनांनी आश्रय घेतला होता, असा पंचवटी नावाचा एक आश्रम तेथे आहे. (४६)

तत्राश्रमे मया दृष्टो रामो राजीवलोचनः ।
धनुर्बाणधरः श्रीमान् जटावल्कलमण्डितः ॥ ४७ ॥

कमळाप्रमाणे नेत्र असणारा, धनुष्य व बाण धारण करणारा, शोभेने संपन्न, जटा आणि वल्कले यांनी मंडित असा राम मी तेथे त्या आश्रमात पाहिला. (४७)

कनीयाननुजस्तस्य लक्ष्मणोऽपि तथाविधः ।
तस्य भार्या विशालाक्षी रूपिणी श्रीरिवापरा ॥ ४८ ॥

त्याचा धाकटा भाऊ लक्ष्मणसुद्धा त्या रामाप्रमाणे आहे. त्या रामाची भार्या ही विशाल नेत्र असणारी, रूप संपन्न, आणि दुसऱ्या लक्ष्मीप्रमाणे आहे. (४८)

देवगन्धर्वनागानां मनुष्याणां तथाविधा ।
न दृष्टा न श्रुता राजन्द्योतयन्ती वनं शुभा ॥ ४९ ॥

हे राजन, देव, गंधर्व, नाग आणि मनुष्य यांच्यामध्ये तिच्यासारखी सुंदर स्त्री कुणी पाहिलेली नाही आणि कुणी ऐकलेली नाही. शुभ लक्षणे असणारी ती स्त्री संपूर्ण वनाला सुशोभित करीत होती. (४९)

आनेतुमहमुद्युक्ता तां भार्यार्थं तवानघ ।
लक्ष्मणो नाम तद्भ्राता चिच्छेद मम नासिकाम् ॥ ५० ॥

हे निष्पापा, तुझी भार्या बनविण्यासाठी मी तिला आणण्याचा प्रयत्न केला. तेव्हा लक्ष्मण नावाच्या त्या रामाच्या भावाने माझे नाक कापले. (५०)

कर्णौ च नोदितस्तेन रामेण स महाबलः ।
ततोऽहमतिदुःखेन रुदती खरमन्वगाम् ॥ ५१ ॥

त्या रामाच्या प्रेरणेनेच त्या महाबली लक्ष्मणाने माझे कानही कापले. त्या वेळी अतिशय दुःखाने रडत रडत मी खराच्याजवळ गेले. (५१)

सोऽपि रामं समासाद्य युद्धं राक्षसयूथपैः ।
ततः क्षणेन रामेण तेनैव बलशालिना ॥ ५२ ॥

सर्वे तेन विनष्टा वै राक्षसा भीमविक्रमाः ।
यदि रामो मनः कुर्यात्त्रैलोक्यं निमिषार्धतः ॥ ५३ ॥

भस्मीकुर्यान्न सन्देह इति भाति मम प्रभो ।
यदि सा तव भार्या स्यात्सफलं तव जीवितम् ॥ ५४ ॥

राक्षस सैन्याच्या सेनापतींसह त्या खरानेसुद्धा रामाबरोबर युद्ध केले. आणि त्या बलशाली रामाने एका क्षणात ते सर्व भयंकर पराक्रम करणारे राक्षस नष्ट करून टाकले. मला असे वाटते की राम जर मनात आणील, तर तो अर्ध्या निमिषात सर्व त्रैलोक्य भस्मसात करून टाकील, यात शंका नाही. हे प्रभो, जर ती सीता तुझी भार्या बनेल, तर तुझे जीवन सफल होईल. (५२-५४)

अतो यतस्व राजेन्द्र यथा ते वल्लभा भवेत् ।
सीता राजीवपत्राक्षी सर्वलोकैकसुन्दरी ॥ ५५ ॥

म्हणून हे राजेंद्रा, कमलपत्राप्रमाणे नयन असणारी, सर्व लोकांत एकमात्र सुंदर असणारी ती सीता तुझी प्राणप्रिया होईल, असा प्रयत्न तू कर. (५५)

साक्षाद्रामस्य पुरतः स्थातुं त्वं न क्षमः प्रभो ।
मायया मोहयित्वा तु प्राप्स्यसे तां रघूत्तमम् ॥ ५६ ॥

हे स्वामी, रामापुढे या रूपाने साक्षात उभे राहणे तुला शक्य नाही. तेव्हा कपटाने त्याला भुलवून तू सीतेला प्राप्त करून घे. (५६)

श्रुत्वा तत्सूक्तवाक्यैश्च दानमानादिभिस्तथा ।
आश्वास्य भगिनीं राजा प्रविवेश स्वकं गृहम् ।
तत्र चिन्तापरो भूत्वा निद्रां रात्रौ न लब्धवान् ॥ ५७ ॥

शूर्पणखेचे ते वचन ऐकल्यावर, चांगल्या शब्दांनी तिला धीर देऊन आणि तिला दान, मान इत्यादी देऊन राक्षसराज रावणाने आपल्या बहिणीचे सांत्वन केले व तो स्वत:च्या महालात शिरला. पण काळजीमुळे त्याला रात्री झोप आली नाही. (५७)

एकेन रामेण कथं मनुष्य-
मात्रेण नष्टः सबलः खरो मे ।
भ्राता कथं मे बलवीर्यदर्प-
युतो विनष्टो बत राघवेण ॥ ५८ ॥

तो विचार करीत होता. 'काय आश्चर्य आहे ! सामर्थ्य, वीर्य आणि दर्प यांनी युक्त असा माझा भाऊ खर याला सैन्यासकट मनुष्य असणाऱ्या रामाने केवळ एकटा असून कसे बरे मारले? (५८)

यद्वा न रामो मनुजः परेशो
मां हन्तुकामः सबलं बलौघैः ।
सम्प्रार्थितोऽयं द्रुहिणेन पूर्वं
मनुष्यरूपोऽद्य रघोः कुलेऽभूत् ॥ ५९ ॥

अथवा राम हा माणूस नव्हे. पूर्वीच्या काळी ब्रह्मदेवांनी प्रार्थना केल्यामुळे वानरसेनेच्या समूहाद्वारे मला सैन्यासह मारण्याच्या इच्छेने, परमेश्वरच आता रघूच्या कुळात मनुष्यरूपाने जन्माला आला असावा. (५९)

वध्यो यदि स्यां परमात्मनाहं
वैकुण्ठराज्यं परिपालयेऽहम् ।
नो चेदिदं राक्षसराज्यमेव
भोक्ष्ये चिरं राममतो व्रजामि ॥ ६० ॥

जर मी परमात्म्याकडून मारला गेलो तर मी वैकुंठाचे राज्य भोगीन. तसे न घडल्यास मी चिरकाल हे राक्षसांचे राज्य भोगत राहीन. म्हणून मी आता रामाकडेच जातो." (६०)

इत्थं विचिन्त्याखिलराक्षसेन्द्रो
रामं विदित्वा परमेश्वरं हरिम् ।
विरोधबुद्ध्यैव हरिं प्रयामि
द्रुतं न भक्त्या भगवान्प्रसीदेत् ॥ ६१ ॥

अशा प्रकारे विचार करून, सर्व राक्षसांचा राजा असणाऱ्या रावणाने राम हे साक्षात परमेश्वर आहेत असे जाणले. आणि त्याने ठरविले की, मी विरोध- बुद्धीनेच रामांकडे जाईन. कारण प्रेमपूर्ण भक्तीने भगवंत शीघ्र प्रसन्न होत नाही. (६१)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकाण्डे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

# षष्ठ सर्ग

## रावण मारीचाकडे जातो

*श्रीमहादेव उवाच*

विचिन्त्यैवं निशायां स प्रभाते रथमास्थितः ।
रावणो मनसा कार्यमेकं निश्चित्य बुद्धिमान् ॥ १ ॥

ययौ मारीचसदनं परं पारमुदन्वतः ।
मारीचस्तत्र मुनिवज्जटावल्कलधारकः ॥ २ ॥

ध्यायन् हृदि परात्मानं निर्गुणं गुणभासकम् ।
समाधिविरमेऽपश्यद्रावणं गृहमागतम् ॥ ३ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**—हे पार्वती, रात्री असा विचार करून आणि प्रभात काळी उठून बुद्धिमान रावण रथावर आरूढ झाला आणि मनातल्या मनात एक निश्चय करून, सागराच्या दुसऱ्या तीरावर असणाऱ्या मारीचाच्या घरी गेला. तेथे मुनीप्रमाणे जटा व वल्कल धारण करणारा मारीच आपल्या हृदयात प्रकृतीच्या गुणांना प्रकाशित करणाऱ्या पण स्वत: निर्गुण असणाऱ्या परमात्म्याचे ध्यान करीत होता. समाधी संपल्यावर, रावण आपल्या घरी आलेला त्याला दिसला. (१-३)

द्रुतमुत्थाय चालिङ्‌ग्य पूजयित्वा यथाविधि ।
कृतातिथ्यं सुखासीनं मारीचो वाक्यमब्रवीत् ॥ ४ ॥

चटकन उठून व रावणाला आलिंगन देऊन आणि त्याची विधिवत पूजा करून मारीचाने त्याचे आतिथ्य केले. नंतर स्वस्थ बसलेल्या रावणाला मारीच म्हणाला. (४)

समागमनमेतत्ते रथेनैकेन रावण ।
चिन्तापर इवाभासि हृदि कार्यं विचिन्तयन् ॥ ५ ॥

"हे रावणा, या वेळी फक्त एकटा रथात बसून तू येथे आला आहेस. मनात कोणत्यातरी कार्याचा विचार करीत असल्याने, तू चिंताग्रस्त असल्याप्रमाणे दिसत आहेस. (५)

ब्रूहि मे न हि गोप्यं चेत्करवाणि तव प्रियम् ।
न्याय्यं चेद् ब्रूहि राजेन्द्र वृजिनं मां स्पृशेन्न हि ॥ ६ ॥

हे राजेंद्रा, जर काही गुप्त गोष्ट नसेल तर ते कार्य तू मला सांग. मी तुझे प्रिय कार्य करीन. जर ते न्याय्य असेल व ते करण्याने मला पाप लागणार नसेल, तर ते तू मला सांग." (६)

*रावण उवाच*

अस्ति राजा दशरथः साकेताधिपतिः किल ।
रामनामा सुतस्तस्य ज्येष्ठः सत्यपराक्रमः ॥ ७ ॥

**रावण म्हणाला–** "लोक असे म्हणतात की अयोध्या नगरीचा अधिपती दशरथ राजा आहे. त्याचा राम नावाचा ज्येष्ठ पुत्र सत्य-पराक्रमी आहे. (७)

विवासयामास सुतं वनं वनजनप्रियम् ।
भार्यया सहितं भ्रात्रा लक्ष्मणेन समन्वितम् ॥ ८ ॥

वनांतील लोकांना प्रिय असणाऱ्या रामाला दशरथाने पत्नीसह आणि लक्ष्मण या भावासह वनात पाठविले आहे.(८)

स आस्ते विपिने घोरे पञ्चवट्याश्रमे शुभे ।
तस्य भार्या विशालाक्षी सीता लोकविमोहिनी ॥ ९ ॥

आता तो राम भयंकर अरण्यातील पवित्र अशा पंचवटीत एका आश्रमात राहात आहे. मी असे ऐकले आहे की विशाल नयन असणारी त्याची पत्नी सीता ही तिन्ही लोकांना मोहित करणारी आहे. (९)

रामो निरपराधान्मे राक्षसान् भीमविक्रमान् ।
खरं च हत्वा विपिने सुखमास्तेऽतिनिर्भयः ॥ १० ॥

भयंकर पराक्रम करणाऱ्या अशा माझ्या निरपराध राक्षसांना तसेच खराला ठार करून राम आता अतिशय निर्भयपणे अरण्यात सुखाने राहात आहे. (१०)

भगिन्याः शूर्पणखाया निर्दोषायाश्च नासिकाम् ।
कर्णौ चिच्छेद दुष्टात्मा वने तिष्ठति निर्भयः ॥ ११ ॥

शूर्पणखा या माझ्या निर्दोष बहिणीचे नाक आणि दोन कान त्या दुष्टात्म्याने तोडून टाकले. आणि आता तो अरण्यात निर्भयपणे राहात आहे. (११)

अतस्त्वया सहायेन गत्वा तत्प्राणवल्लभाम् ।
आनयिष्यामि विपिने रहिते राघवेण ताम् ॥ १२ ॥

म्हणून राम तपोवनात नसताना, तेथे जाऊन, त्याची ती प्राणापेक्षा प्रिय असणारी सीता मी तुझ्या सहाय्याने आणू इच्छितो . (१२)

त्वं तु मायामृगो भूत्वा ह्याश्रमादपनेष्यसि ।
रामं च लक्ष्मणं चैव तदा सीतां हराम्यहम् ॥ १३ ॥

आता तू इतकेच करायचे की माया-मृग होऊन राम आणि लक्ष्मण यांना त्यांच्या आश्रमापासून दूर ने. त्या वेळी मी सीतेचे हरण करीन. (१३)

त्वं तु तावत्सहायं मे कृत्वा स्थास्यसि पूर्ववत् ।
इत्येवं भाषमाणं तं रावणं वीक्ष्य विस्मितः ॥ १४ ॥

इतके सहाय्य मला करून नंतर तू पूर्वीप्रमाणेच आपल्या आश्रमात राहा." अशा प्रकारे बोलणाऱ्या त्या रावणाकडे पाहून मारीच विस्मयचकित झाला आणि म्हणू लागला. (१४)

केनेदमुपदिष्टं ते मूलघातकरं वचः ।
स एव शत्रुर्वध्यश्च यस्त्वन्नाशं प्रतीक्षते ॥ १५ ॥

"तुझा सर्वनाश करणारी ही गोष्ट तुला कुणी सांगितली ? असा उपदेश करणारा तो प्राणी तुझा नाश करण्याची प्रतीक्षा करीत आहे, तोच तुझा शत्रू आहे आणि तोच वध करण्यास योग्य आहे. (१५)

रामस्य पौरुषं स्मृत्वा चित्तमद्यापि रावण ।
बालोऽपि मां कौशिकस्य यज्ञसंरक्षणाय सः ॥ १६ ॥

आगतस्त्विषुणैकेन पातयामास सागरे ।
योजनानां शतं रामस्तदादि भयविह्वलः ॥ १७ ॥

स्मृत्वा स्मृत्वा तदेवाहं रामं पश्यामि सर्वतः ॥ १८ ॥

हे रावणा, तो राम लहान असूनसुद्धा विश्वामित्राच्या यज्ञाच्या रक्षणासाठी वनात आला होता. त्या वेळी त्याने केवळ एकाच बाणाने मला शंभर योजने दूर समुद्रात फेकून दिले होते. तेव्हापासून मी भयाने व्याकूळ आहे. रामाचे ते सामर्थ्य आजसुद्धा मला स्मरते आणि त्याचे वारंवार स्मरण झाल्यावर मला सगळीकडे रामच राम दिसू लागतो. (१६-१८)

दण्डकेऽपि पुनरप्यहं वने
पूर्ववैरमनुचिन्तयन् हृदि ।
तीक्ष्णशृङ्गमृगरूपमेकदा
माहशैर्बहुभिरावृतोऽभ्ययाम् ॥ १९ ॥

पूर्वीच्या वैराचे स्मरण करीत तीक्ष्ण शिंगे असणाऱ्या मृगाचे रूप धारण करून आणि माझ्यासारख्या अनेक मृगांना बरोबर घेऊन मी पुनः एकदा त्या दंडकारण्यातसुद्धा गेलो होतो. (१९)

राघवं जनकजासमन्वितं
लक्ष्मणेन सहितं त्वरान्वितः ।
आगतोऽहमथ हन्तुमुद्यतो
मां विलोक्य शरमेकमक्षिपत् ॥ २० ॥

नंतर जनककन्या सीता आणि लक्ष्मणासहित असणाऱ्या रामाजवळ मी एकदा त्वरेने गेलो आणि नंतर त्याला ठार करण्यास उद्युक्त झालो. तेव्हा मला पाहून त्या रामाने एक बाण माझ्यावर सोडला. (२०)

तेन विद्धहृदयोऽहमुद्भ्रमन्
राक्षसेन्द्र पतितोऽस्मि सागरे ।
तत्प्रभृत्यहमिदं समाश्रितः
स्थानमूर्जितमिदं भयार्दितः ॥ २१ ॥

हे राक्षसेंद्रा, त्या बाणाने माझे हृदय विद्ध झाले. आणि वर आकाशात कोलांट्या खात मी समुद्रात जाऊन पडलो. तेव्हापासून फारच भयभीत होऊन मी या निर्भय स्थानाचा आश्रय घेऊन राहात आहे. (२१)

राममेव सततं विभावये
भीतभीत इव भोगराशितः ।
राजरत्नरमणीरथादिकं
श्रोत्रयोर्यदि गतं भयं भवेत् ॥ २२ ॥

तेव्हापासून मला सगळीकडे रामाचाच भास होत आहे. इतका की मी भोग्य वस्तूंच्या राशींना अतिशय भितो. राजा, रत्न, रमणी, रथ (या भोग्य वस्तू असूनही त्यांचे पहिले अक्षर 'र' असल्यामुळे) हे शब्द कानावर पडले तरी मला भय वाटते. (२२)

राम आगत इहेति शङ्कया
बाह्यकार्यमपि सर्वमत्यजम् ।
निद्रया परिवृतो यदा स्वपे
राममेव मनसानुचिन्तयन् ॥ २३ ॥

'राम येथे आला असेल' या शंकेने मी बाहेरील सर्व कामेसुद्धा सोडली आहेत. निद्रेने घेरल्यावर मी जेव्हा झोपतो, तेव्हासुद्धा मनाने रामाची काळजी करीतच मी झोपतो. (२३)

स्वप्नदृष्टिगतराघवं तदा
बोधितो विगतनिद्र आस्थितः ।
तद्भवानपि विमुच्य चाग्रहं
राघवं प्रति गृहं प्रयाहि भोः ॥ २४ ॥

त्या वेळी स्वप्नात दृष्टीस पडलेल्या राघवाला पाहून मी जागा होतो. त्यानंतर मी निद्रा-रहित स्थितीत पडूनच राहातो. तेव्हा अरे रावणा, राघवांसंबंधी तुझा हट्ट सोडून देऊन तू घरी परत जा. (२४)

रक्ष राक्षसकुलं चिरागतं
तत्स्मृतौ सकलमेव नश्यति ।
तव हितं वदतो मम भाषितं
परिगृहाण परात्मनि राघवे ॥ २५ ॥

(घरी परत जाऊन) चिरकाळ चालत आलेल्या राक्षस- कुळाचे रक्षण कर. नुसती त्या रामाची स्मृती आली तरी तुझे सर्वस्व नष्ट होऊन जाईल. तुझ्या हितासाठी मी आता जे सांगतो ते ऐक. परमात्मा असणाऱ्या राघवाच्या बाबतीतील तुझी विरोधी बुद्धी सोडून दे. भक्तीने त्याला शरण जा. रघुनंदन राम अतिशय करुणा-संपन्न आहे. मुनीश्वरांच्या मुखातून येणाऱ्या वाक्यांवरून मी हे सर्व काही ऐकले आहे की सत्ययुगात परमात्म्याला ब्रह्मदेवाने प्रार्थना केली. तेव्हा हरी परमात्मा त्याला म्हणाला, 'हे ब्रह्मदेवा, तू तुझे मनोरथ मला सांग. मी ते पूर्ण करीन.' तेव्हा ब्रह्मदेव हरींना म्हणाला 'अहो कमलनयन श्रीहरी, तुम्ही मनुष्यरूप धारण करून पृथ्वीवर जा आणि दशरथाचा पुत्र श्रीराम होऊन, देवांचा शत्रू जो दशानन रावण त्याला शीघ्र ठार करा.' (२५-२७)

त्यज विरोधमतिं भज भक्तितः
परमकारुणिको रघुनन्दनः ।
अहमशेषमिदं मुनिवाक्यतो-
ऽश्रृणवमादियुगे परमेश्वरः ॥२६ ॥

ब्रह्मणार्थित उवाच तं हरिः
किं तवेप्सितमहं करवाणि तत् ।
ब्रह्मणोक्तमरविन्दलोचन
त्वं प्रयाहि भुवि मानुषं वपुः ।
दशरथात्मजभावमञ्जसा
जहि रिपुं दशकन्धरं हरे ॥ २७ ॥

अतो न मानुषो रामः साक्षान्नारायणोऽव्ययः ।
मायामानुषवेषेण वनं यातोऽतिनिर्भयः ॥ २८ ॥

भूभारहरणार्थाय गच्छ तात गृहं सुखम् ।
श्रुत्वा मारीचवचनं रावणः प्रत्यभाषत ॥ २९ ॥

म्हणून हे रावणा, तू हे पक्के लक्षात घे की राम हा साधा मानव नाही. तो साक्षात अविनाशी नारायण आहे. भूमीचा भार हरण करण्यासाठी, मायेने मनुष्यवेष धारण करून तो अतिशय निर्भयपणे वनात आलेला आहे. तेव्हा बाबा रे, तू सुखाने घरी जा." मारीचाचे हे वचन ऐकल्यावर रावणाने त्याला प्रत्युत्तर दिले. (२८-२९)

परमात्मा यदा रामः प्रार्थितो ब्रह्मणा किल ।
मां हन्तुं मानुषो भूत्वा यत्नादिह समागतः ॥ ३० ॥

करिष्यत्यचिरादेव सत्यसङ्कल्प ईश्वरः ।
अतोऽहं यत्नतः सीतामानेष्याम्येव राघवात् ॥ ३१ ॥

"ब्रह्मदेवाने प्रार्थना केल्यामुळे परमात्मा राम हा माणूस होऊन प्रयत्नपूर्वक मला मारण्यास जर नक्की येथे आला असेल तर तो सत्य-संकल्प असा ईश्वर लौकरच तसे करील. मग मी कशाला घाबरू ? म्हणून सीतेला मी राघवाजवळून हरण करून प्रयत्नपूर्वक घेऊन जाईन. (३०-३१)

वधे प्राप्ते रणे वीर प्राप्स्यामि परमं पदम् ।
यद्वा रामं रणे हत्वा सीतां प्राप्स्यामि निर्भयः ॥ ३२ ॥

हे वीर मारीचा, जर युद्धात मला मरण आले तर मला परम पद प्राप्त होईल. या उलट युद्धात रामाला ठार मारून मी निर्भयपणाने सीतेला प्राप्त करून घेईन. (३२)

तदुत्तिष्ठ महाभाग विचित्रमृगरूपधृक् ।
रामं सलक्ष्मणं शीघ्रमाश्रमादतिदूरतः ॥ ३३ ॥

आक्रम्य गच्छ त्वं शीघ्रं सुखं तिष्ठ यथा पुरा ।
अतः परं चेद्यत्किञ्चिद्भाषसे मद्विभीषणम् ॥ ३४ ॥

हनिष्याम्यसिनानेन त्वामत्रैव न संशयः ।
मारीचस्तद्वचःश्रुत्वा स्वात्मन्येवान्वचिन्तयत् ॥ ३५ ॥

तेव्हा, हे महाभागा, ऊठ. विचित्र मृगरूप धारण करून, तू राम आणि लक्ष्मण यांना झट्दिशी त्यांच्या आश्रमापासून खूप दूर घेऊन जा आणि मग तू त्वरित स्वतःच्या आश्रमात येऊन पूर्वीप्रमाणे सुखाने राहा. आता यापुढे मला भयभीत करण्यास जर तू आणखी काही बोललास तर या माझ्या खड्गाने मी तुला येथेच ठार करीन, यात संशय नाही." रावणाचे ते वचन ऐकून मारीच स्वतःच्या मनात विचार करू लागला. (३३-३५)

यदि मां राघवो हन्यात्तदा मुक्तो भवार्णवात् ।
मां हन्याद्यदि चेद्दुष्टस्तदा मे निरयो ध्रुवम् ॥ ३६ ॥

'जर राघवाने मला ठार केले तर मी भवसागरातून पलीकडे जाऊन मुक्त होईन. या उलट जर या दुष्टाने मला ठार मारले तर मला निश्चितपणे नरक प्राप्त होईल. (३६)

इति निश्चित्य मरणं रामादुत्थाय वेगतः ।
अब्रवीद्रावणं राजन्करोम्याज्ञां तव प्रभो ॥ ३७ ॥

तेव्हा रामाकडून मरण येणे हे अधिक चांगले' असा विचार करून तो मारीच चट्‌दिशी उठला आणि रावणाला म्हणाला, "हे राजन, हे प्रभो, मी तुझी आज्ञा पाळीन." (३७)

इत्युक्त्वा रथमास्थाय गतो रामाश्रमं प्रति ।
शुद्धजाम्बूनदप्रख्यो मृगोऽभूद्रौप्यबिन्दुकः ॥ ३८ ॥

असे बोलून आणि रथावर आरूढ होऊन मारीच रामांच्या आश्रमात गेला. तेथे तो शुद्ध सुवर्ण वर्णाचा आणि त्यावर चांदीचे पांढरे ठिपके असणारा असा मृग बनला. (३८)

रत्नशृङ्गो मणिखुरो नीलरत्नविलोचनः ।
विद्युत्प्रभो विमुग्धास्यो विचचार वनान्तरे ॥ ३९ ॥

रत्नांची शिंगे, रत्नमय खूर, निळ्या रत्नाप्रमाणे डोळे, विजेप्रमाणे प्रभा आणि सुंदर तोंड असणारा तो मृग वना-वनात हिंडू लागला. (३९)

रामाश्रमपदस्यान्ते सीतादृष्टिपथे चरन् ॥ ४० ॥

नंतर रामांच्या आश्रम-स्थानाजवळ येऊन सीतेच्या दृष्टिपथात येईल, असा तो फिरू लागला. (४०)

क्षणं च धावत्यवतिष्ठते क्षणं
समीपमागत्य पुनर्भयावृतः ।
एवं स मायामृगवेषरूपधृक्
चचार सीतां परिमोहयन्खलः ॥ ४१ ॥

तो मृग क्षणभर पळे, क्षणभर सीतेजवळ येऊन थांबे, नंतर पुन: भयभीत होऊन दूर पळून जाई. अशा प्रकारे माया-मृगाचा वेष आणि रूप धारण करणारा तो दुष्ट मारीच सीतेला पूर्णपणे मोहात पाडीत हिंडू लागला. (४१)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

# सप्तम सर्ग

## मारीचाचा वध आणि सीतेचे अपहरण

*श्रीमहादेव उवाच*

अथ रामोऽपि तत्सर्वं ज्ञात्वा रावणचेष्टितम् ।
उवाच सीतामेकान्ते शृणु जानकि मे वचः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, नंतर इकडे रावणाचे ते सर्व कृत्य जाणून, श्रीरामसुद्धा एकान्तात सीतेला म्हणाले, "हे जानकी, मी सांगतो ते ऐक." (१)

रावणो भिक्षुरूपेण आगमिष्यति तेऽन्तिकम् ।
त्वं तु छायां त्वदाकारां स्थापयित्वोटजे विश ॥ २ ॥

अग्नावदृश्यरूपेण वर्षं तिष्ठ ममाज्ञया ।
रावणस्य वधान्ते मां पूर्ववत्प्राप्स्यसे शुभे ॥ ३ ॥

"हे कल्याणी, भिक्षूचे रूप धारण करून रावण तुझ्याजवळ येईल. तत्पूर्वी तुझ्याच आकाराची छाया कुटीमध्ये सोडून देऊन तू अग्नीमध्ये प्रवेश कर. आणि माझ्या आज्ञेनुसार एक वर्षभर अदृश्य रूपाने तेथे अग्नीत राहा. पुढे रावणाचा वध झाल्यावर तू पूर्वीप्रमाणे मला प्राप्त करून घेशील." (२-३)

श्रुत्वा रामोदितं वाक्यं सापि तत्र तथाकरोत् ।
मायासीतां बहिः स्थाप्य स्वयमन्तर्दधेऽनले ॥ ४ ॥

श्रीरामांच्या आज्ञेनुसार सीतेनेसुद्धा त्या प्रमाणे केले. बाहेर कुटीमध्ये मायासीतेला ठेवून सीता स्वतः अग्नीमध्ये अंतर्धान पावली. (४)

मायासीता तदापश्यन्मृगं मायाविनिर्मितम् ।
हसन्ती राममभ्येत्य प्रोवाच विनयान्विता ॥ ५ ॥

मग त्या वेळी माया-सीतेने मायेमुळे उत्पन्न झालेला मृग पाहिला. तेव्हा हसत हसत श्रीरामांजवळ येऊन ती विनयपूर्वक म्हणाली. (५)

पश्य राम मृगं चित्रं कानकं रत्नभूषितम् ।
विचित्रबिन्दुभिर्युक्तं चरन्तमकुतोभयम् ।
बद्ध्वा देहि मम क्रीडामृगो भवतु सुन्दरः ॥ ६ ॥

"अहो श्रीरामा, रत्नांनी विभूषित, विचित्र, सुवर्णवर्णी, निरनिराळ्या रंगाचे ठिपके असणारा आणि निर्भयपणे हिंडणारा हा मृग बघा. तो पकडून मला आणून द्या. हा सुंदर हरिण माझा क्रीडा-मृग बनू दे." (६)

तथेति धनुरादाय गच्छन् लक्ष्मणमब्रवीत् ।
रक्ष त्वमतियत्नेन सीतां मत्प्राणवल्लभाम् ॥ ७ ॥

"ठीक आहे" असे म्हणून धनुष्य घेऊन जाताना श्रीराम लक्ष्मणाला म्हणाले "अरे लक्ष्मणा, मला प्राणाप्रमाणे प्रिय असणाऱ्या सीतेचे तू अतिशय प्रयत्नपूर्वक रक्षण कर. (७)

मायिनः सन्ति विपिने राक्षसा घोरदर्शनाः ।
अतोऽत्रावहितः साध्वीं रक्ष सीतामनिन्दिताम् ॥ ८ ॥

या अरण्यात भयंकर दिसणारे पुष्कळ मायावी राक्षस आहेत. म्हणून सती-साध्वी अशा सीतेचे तू येथे सावधपणाने रक्षण कर." (८)

लक्ष्मणो राममाहेदं देवायं मृगरूपधृक् ।
मारीचोऽत्र न सन्देह एवंभूतो मृगः कुतः ॥ ९ ॥

तेव्हा लक्ष्मण असे म्हणाला, "देवा, मृगाचे रूप धारण करणारा हा मारीच येथे आला आहे, यात शंका नाही. नाही तर असला मृग कुठे असेल बरे?" (९)

*श्रीराम उवाच*

यदि मारीच एवायं तदा हन्मि न संशयः ।
मृगश्चेदानयिष्यामि सीताविश्रमहेतवे ॥ १० ॥

**श्रीराम म्हणाले–** "जर हा मारीच असेल तर मी त्याला ठार करीन, यात संशय नाही. तो जर खराखुरा मृग असेल तर सीतेची करमणूक करण्यासाठी मी त्याला पकडून घेऊन येईन. (१०)

गमिष्यामि मृगं बद्ध्वा ह्यानयिष्यामि सत्वरः ।
त्वं प्रयत्नेन सन्तिष्ठ सीतासंरक्षणोद्यतः ॥ ११ ॥

तेव्हा मी आता जातो आणि मृगाला पकडून सत्वर घेऊन येतो. दरम्यान सीतेचे प्रयत्नपूर्वक रक्षण करण्यासाठी तू सावध राहा." (११)

इत्युक्त्वा प्रययौ रामो मायामृगमनुद्रुतः ।
माया यदाश्रया लोकमोहिनी जगदाकृतिः ॥ १२ ॥

या जगाच्या रूपाने असणारी आणि लोकांना मोहित करणारी माया ज्यांच्या आश्रयाने राहाते असे श्रीराम लक्ष्मणाला असे सांगून माया-मृगाच्या मागे पळत गेले. (१२)

निर्विकारश्चिदात्मापि पूर्णोऽपि मृगमन्वगात् ।
भक्तानुकम्पी भगवानिति सत्यं वचो हरिः ॥ १३ ॥

कर्तुं सीताप्रियार्थाय जानन्नपि मृगं ययौ ।
अन्यथा पूर्णकामस्य रामस्य विदितात्मनः ॥ १४ ॥

ते श्रीराम निर्विकार, चिदात्मा, आणि सर्वव्यापक असूनसुद्धा त्या माया-मृगाच्या मागे गेले. भगवान हरी हे भक्तवत्सल आहेत, हे वचन संपूर्णपणे सत्य आहे. श्रीराम सर्व काही जाणत होते. म्हणून मारीचाच्या भक्तीचे फल देण्यासाठी ते स्वतः त्याच्या मागे गेले. आणि सीतेचे आवडीचे काम करण्यासाठी ते माया-मृगाच्या मागे गेले. नाही तर पूर्णकाम आणि स्वतःच स्वतःला जाणणाऱ्या अशा परमात्म्या श्रीरामांना मृगाशी अथवा स्त्रीशी काय प्रयोजन

मृगेण वा स्त्रिया वापि किं कार्यं परमात्मनः ।
कदाचिद्दृश्यतेऽभ्याशे क्षणं धावति लीयते ॥१५॥

होते? तो मृग कधी जवळ दिसत असे तर कधी क्षणात तो पळून जाई आणि लपून बसे. (१३-१५)

दृश्यते च ततो दूरादेवं राममपाहरत् ।
ततो रामोऽपि विज्ञाय राक्षसोऽयमिति स्फुटम् ॥ १६ ॥

विव्याध शरमादाय राक्षसं मृगरूपिणम् ।
पपात रुधिराक्तास्यो मारीचः पूर्वरूपधृक् ॥ १७ ॥

आणि नंतर पुन: तो दूरवर दिसून येत असे. अशा प्रकारे त्या मृगाने श्रीरामांना खूप दूरवर नेले. तेव्हा हा नक्कीच राक्षस आहे असे जाणून श्रीरामांनीसुद्धा बाण घेऊन मृगरूपी राक्षसाला घायाळ केले. बाण लागताच तो मारीच पूर्वीचे रूप धारण करून रक्ताने तोंड माखलेल्या स्थितीत जमिनीवर पडला. (१६-१७)

हा हतोऽस्मि महाबाहो त्राहि लक्ष्मण मां द्रुतम् ।
इत्युक्त्वा रामवद्वाचा पपात रुधिराशनः ॥ १८ ॥

"हाय ! मी मेलो. महाबाहू लक्ष्मणा, माझे त्वरित रक्षण कर." असे श्रीरामांच्या आवाजाप्रमाणे शब्द उच्चारून तो जमिनीवर पडला. (१८)

यन्नामाज्ञोऽपि मरणे स्मृत्वा तत्साम्यमाप्नुयात् ।
किमुताग्रे हरिं पश्यंस्तेनैव निहतोऽसुरः ॥ १९ ॥

मरणसमयी ज्या हरींच्या नामाचे स्मरण केल्याने अज्ञानी माणूससुद्धा हरीचे साम्य प्राप्त करून घेतो, त्या हरींकडूनच समोर साक्षात हरींना पाहात पाहात मारल्या गेलेल्या असुराबद्दल काय सांगावे ? (१९)

तद्देहादुत्थितं तेजः सर्वलोकस्य पश्यतः ।
राममेवाविशद्देवा विस्मयं परमं ययुः ॥ २० ॥

सर्व लोक पाहात असतानाच, त्या मारीचाच्या देहातून बाहेर पडलेले तेज श्रीरामांमध्येच प्रविष्ट झाले. ते पाहून देवांना फारच विस्मय वाटला. (२०)

किं कर्म कृत्वा किं प्राप्तः पातकी मुनिहिंसकः ।
अथवा राघवस्यायं महिमा नात्र संशयः ॥ २१ ॥

ते म्हणू लागले "(अहो) मुनींची हिंसा करणाऱ्या या पातकी मारीचाने किती पापकर्म केले आणि त्याला काय चांगले फळ प्राप्त झाले. किंबहुना हा राघवांचा महिमा आहे, यात संशय नाही. (२१)

रामबाणेन संविद्धः पूर्वं राममनुस्मरन् ।
भयात्सर्वं परित्यज्य गृहवित्तादिकं च यत् ॥ २२ ॥

श्रीरामांच्या बाणाने पूर्वी विद्ध झालेल्या मारीचाने भीतीमुळे घर, धन इत्यादी सर्व काही टाकले होते, आणि तो रामांचे सतत स्मरण करू लागला होता. (२२)

हृदि रामं सदा ध्यात्वा निर्धूताशेषकल्मषः ।
अन्ते रामेण निहतः पश्यन् राममवाप सः ॥ २३ ॥

हृदयामध्ये सदा श्रीरामांचे ध्यान केल्यानंतर त्याची सर्व पापे नष्ट झाली होती. शेवटी श्रीरामांकडून मारला गेल्यावर रामांना पाहात पाहातच त्याने रामांना प्राप्त करून घेतले. (२३)

द्विजो वा राक्षसो वापि पापी वा धार्मिकोऽपि वा ।
त्यजन्कलेवरं रामं स्मृत्वा याति परं पदम् ॥ २४ ॥

याचा अर्थ असा की ब्राह्मण असो की राक्षस किंवा पापी असो की धार्मिक , जो कुणी श्रीरामांचे स्मरण करीत देहाचा त्याग करतो तो परम पदाप्रत जातो." (२४)

इति तेऽन्योन्यमाभाष्य ततो देवा दिवं ययुः ।
रामस्तच्चिन्तयामास म्रियमाणोऽसुराधमः ॥ २५ ॥

हा लक्ष्मणेति मद्वाक्यमनुकुर्वन्ममार किम् ।
श्रुत्वा मद्वाक्यसदृशं वाक्यं सीतापि किं भवेत् ॥ २६ ॥

अशा प्रकारे आपापसात बोलत ते देव नंतर स्वर्गात गेले. इकडे श्रीरामांनी विचार केला की मरताना या नीच असुराने "हा लक्ष्मण" असा माझ्यासारखा आवाज काढून का बरे प्राण सोडला ? माझ्या बोलण्यासारखे शब्द ऐकल्यावर, सीतेची काय दशा झाली असेल ? (२५-२६)

इति चिन्तापरीतात्मा रामो दूराद्न्यवर्तत ।
सीता तद्भाषितं श्रुत्वा मारीचस्य दुरात्मनः ॥ २७॥

भीतातिदुःखसंविग्ना लक्ष्मणं त्विदमब्रवीत् ।
गच्छ लक्ष्मण वेगेन भ्राता तेऽसुरपीडितः ॥ २८॥

हा लक्ष्मणेति वचनं भ्रातुस्ते न शृणोषि किम् ।
तामाह लक्ष्मणो देवि रामवाक्यं न तद्भवेत् ॥ २९॥

यः कश्चिद्राक्षसो देवि म्रियमाणो ऽब्रवीद्वचः ।
रामस्त्रैलोक्यमपि यः क्रुद्धो नाशयति क्षणात् ॥ ३०॥

स कथं दीनवचनं भाषतेऽमरपूजितः ।
क्रुद्धा लक्ष्मणमालोक्य सीता बाष्पविलोचना ॥ ३१॥

प्राह लक्ष्मण दुर्बुद्धे भ्रातर्व्यसनमिच्छसि ।
प्रेषितो भरतेनैव रामनाशाभिकाङ्क्षिणा ॥ ३२॥

मां नेतुमागतोऽसि त्वं रामनाश उपस्थिते ।
न प्राप्स्यसे त्वं मामद्य पश्य प्राणांस्त्यजाम्यहम् ॥ ३३॥

न जानातीदृशं रामस्त्वां भार्याहरणोद्यतम् ।
रामादन्यं न स्पृशामि त्वां वा भरतमेव वा ॥ ३४॥

इत्युक्त्वा वध्यमाना सा स्वबाहुभ्यां रुरोद ह ।
तच्छ्रुत्वा लक्ष्मणः कर्णौ पिधायातीव दुःखितः ॥ ३५॥

मामेवं भाषसे चण्डि धिक् त्वां नाशमुपैष्यसि ।
इत्युक्त्वा वनदेवीभ्यः समर्प्य जनकात्मजाम् ॥ ३६॥

ययौ दुःखातिसंविग्नो राममेव शनैः शनैः ।
ततोऽन्तरं समालोक्य रावणो भिक्षुवेषधृक् ॥ ३७॥

सीतासमीपमगमत्स्फुरद्दण्डकमण्डलुः ।
सीता तमवलोक्याशु नत्वा सम्पूज्य भक्तितः ॥ ३८॥

कन्दमूलफलादीनि दत्वा स्वागतमब्रवीत् ।
मुने भुङ्क्ष्व फलादीनि विश्रमस्व यथासुखम् ॥ ३९॥

अशा प्रकारच्या काळजीने भरलेल्या मनाने, श्रीराम खूप दूरून परत निघाले. इकडे असे झाले होते की त्या दुष्टात्म्या मारीचाचे ते शब्द ऐकून भ्यालेली आणि अतिशय दुःखाने व्याकूळ झालेली सीता लक्ष्मणाला म्हणाली, "हे लक्ष्मणा, तू वेगाने जा. तुझा भाऊ कोणत्या तरी असुराकडून त्रस्त झाला आहे. (२७-२८)

'हा लक्ष्मणा' हे तुझ्या भावाचे शब्द तू ऐकले नाहीस काय ?" तेव्हा लक्ष्मण तिला म्हणाला, "हे देवी, ते वाक्य श्रीरामांचे असणार नाही. हे देवी, जो कुणी राक्षस मरत होता, त्याने ते शब्द उच्चारले असणार. जे श्रीराम रागावल्यावर एका क्षणात त्रैलौक्यसुद्धा नष्ट करून टाकतील, ते देवपूज्य राम असले दीन वचन कसे बरे उच्चारतील?" तेव्हा डोळ्यांत पाणी आणून लक्ष्मणाकडे पाहात रागावलेली सीता म्हणाली. (२९-३१)

"अरे वाईट बुद्धी असणाऱ्या लक्ष्मणा, भावावर संकट यावे अशी तुझी इच्छा दिसते आहे. मला वाटते, श्रीरामांचा नाश करू इच्छिणाऱ्या भरतानेच तुला आमच्याबरोबर पाठविले आहे. (३२)

श्रीराम नाहीसे झाल्यावर मला पळवून नेण्यासाठी तू आलेला दिसतो आहेस. परंतु आज मी तुला प्राप्त होणार नाही. बघ, आत्ताच मी प्राणांचा त्याग करते. (३३)

आपल्या पत्नीचे हरण करण्यास तू तयार आहेस, हे श्रीरामांना माहीत नव्हते. रामांखेरीज अन्य कुणालाही -तुला किंवा भरतालासुद्धा-मी स्पर्श करणार नाही." (३४)

असे बोलून आणि स्वतःच्या हातांनी आपली छाती बडवीत सीता रडू लागली. ते ऐकून अतिशय दुःखी झालेल्या लक्ष्मणाने आपले कान झाकून घेतले आणि तो म्हणाला. (३५)

"अग चंडिके, तू मला अशा प्रकारे बोलतेस ? तुझा धिक्कार असो ! अशा बोलण्याने तू नाश पावशील." असे बोलून आणि वनदेवींच्याकडे जनककन्येला सोपवून, दुःखाने अतिशय खिन्न झालेला लक्ष्मण हळूहळू रामांकडेच जाण्यास निघाला. इकडे बरोबर त्याच वेळी संधी पाहून, भिक्षूचा वेष धारण केलेला रावण दंड व कमंडलू घेऊन सीतेजवळ गेला. त्याला पाहून सीतेने चट्‌दिशी नमस्कार केला, भक्तीने त्याचे पूजन केले आणि त्याला कंद, मुळे, फळे इत्यादी देऊन तिने त्याचे स्वागत करीत म्हटले "हे मुने, ही फळे इत्यादी खा आणि सुखाने विश्रांती घ्या. थोड्याच वेळात माझे पती येतील. ते तुमचा विशेष करून सत्कार

इदानीमेव भर्ता मे ह्यागमिष्यति ते प्रियम् ।
करिष्यति विशेषेण तिष्ठ त्वं यदि रोचते ॥ ४० ॥

*भिक्षुरुवाच*

कां त्वं कमलपत्राक्षि को वा भर्ता तवानघे ।
किमर्थमत्र ते वासो वने राक्षससेविते ।
ब्रूहि भद्रे ततः सर्वं स्ववृत्तान्तं निवेदये ॥ ४१ ॥

*सीतोवाच*

अयोध्याधिपतिः श्रीमान् राजा दशरथो महान् ।
तस्य ज्येष्ठः सुतो रामः सर्वलक्षणलक्षितः ॥ ४२ ॥

तस्याहं धर्मतः पत्नी सीता जनकनन्दिनी ।
तस्य भ्राता कनीयांश्च लक्ष्मणो भ्रातृवत्सलः ॥ ४३ ॥

पितुराज्ञां पुरस्कृत्य दण्डके वस्तुमागतः ।
चतुर्दश समास्त्वां तु ज्ञातुमिच्छामि मे वद ॥ ४४ ॥

*भिक्षुरुवाच*

पौलस्त्यतनयोऽहं तु रावणो राक्षसाधिपः ।
त्वत्कामपरितप्तोऽहं त्वां नेतुं पुरमागतः ॥ ४५ ॥

मुनिवेषेण रामेण किं करिष्यसि मां भज ।
भुङ्क्ष्व भोगान्मया सार्धं त्यज दुःखं वनोद्भवम् ॥ ४६ ॥

श्रुत्वा तद्वचनं सीता भीता किञ्चिदुवाच तम् ।
यद्येवं भाषसे मां त्वं नाशमेष्यसि राघवात् ॥ ४७ ॥

आगमिष्यति रामोऽपि क्षणं तिष्ठ सहानुजः ।
मां को धर्षयितुं शक्तो हरेर्भार्यां शशो यथा ॥ ४८ ॥

रामबाणैर्विभिन्नस्त्वं पतिष्यसि महीतले ।
इति सीतावचः श्रुत्वा रावणः क्रोधमूर्च्छितः ॥ ४९ ॥

स्वरूपं दर्शयामास महापर्वतसन्निभम् ।
दशास्यं विंशतिभुजं कालमेघसमद्युतिम् ॥ ५० ॥

करतील. तुमची जर इच्छा असेल तर तुम्ही थोडा वेळ थांबा.'' (३६-४०)

**भिक्षू म्हणाला–** ''हे कमलनयने , तू कोण आहेस ? हे निष्पाप स्त्रिये, तुझा पती कोण आहे ? राक्षसांनी सेवन केलेल्या या अरण्यामध्ये इथे तू कशासाठी निवास केला आहेस ? हे भद्रे, सर्व सांग. मग मी माझी सर्व हकीगत तुला सांगेन.'' (४१)

**सीता म्हणाली –** ''हे भिक्षू , श्रीमान व महान् असे महाराज दशरथ अयोध्येचे अधिपती होते. सर्व शुभ लक्षणांनी युक्त असे श्रीराम हे त्याचे ज्येष्ठ पुत्र आहेत. (४२)

त्या श्रीरामांची धर्मपत्नी मी सीता आहे. मी जनकाची कन्या आहे. भ्रातृवत्सल लक्ष्मण हा रामांचा धाकटा भाऊ आहे. (४३)

पित्याच्या आज्ञेप्रमाणे श्रीराम चौदा वर्षे दंडकारण्यात आम्हा दोघांबरोबर राहावयास आले आहेत. आता तुम्ही कोण आहात हे मी जाणून घेऊ इच्छिते. ते तुम्ही मला सांगा.'' (४४)

**भिक्षू म्हणाला –** '' मी पुलस्त्य- नंदन विश्रवाचा पुत्र व राक्षसांचा राजा रावण आहे. तुला प्राप्त करून घेण्याच्या इच्छेने मी बेचैन झालो आहे आणि तुला माझ्या नगरीला नेण्यास येथे आलो आहे. (४५)

मुनि-वेषातील रामाचा तुला काय उपयोग ? तू माझा आश्रय घे. वनात राहण्यामुळे होणारे दुःख सोडून दे आणि माझ्याबरोबर नाना प्रकारचे भोग घे.'' (४६)

त्याचे ते वचन ऐकून भ्यालेली सीता त्याला म्हणाली, ''असे जर तू बोलशील, तर श्रीराघवांकडून तुझा नाश होईल. (४७)

क्षणभर थांब. धाकट्या भावासह माझे पती श्रीरामसुद्धा आत्ता येतीलच. ज्या प्रमाणे ससा सिंहिणीवर बळाचा प्रयोग करू शकत नाही, त्या प्रमाणे माझ्यावर बळजबरी करण्यास कोण समर्थ आहे? (४८)

श्रीरामांच्या बाणांनी छिन्न भिन्न होऊन तू धरणीवर पडशील.'' असे सीतेचे वचन ऐकल्यावर, क्रुद्ध होऊन रावणाने आपले स्वतःचे खरे रूप तिला दाखविले. ते रूप प्रचंड पर्वताप्रमाणे होते; त्या रूपाला दहा तोंडे व वीस बाहू होते. काळ्या मेघाप्रमाणे तो काळाकुट्ट होता. (४९-५०)

इदानीमेव भर्ता मे ह्यागमिष्यति ते प्रियम् ।
करिष्यति विशेषेण तिष्ठ त्वं यदि रोचते ॥ ४० ॥

*भिक्षुरुवाच*

कां त्वं कमलपत्राक्षि को वा भर्ता तवानघे ।
किमर्थमत्र ते वासो वने राक्षससेविते ।
ब्रूहि भद्रे ततः सर्वं स्ववृत्तान्तं निवेदये ॥ ४१ ॥

*सीतोवाच*

अयोध्याधिपतिः श्रीमान् राजा दशरथो महान् ।
तस्य ज्येष्ठः सुतो रामः सर्वलक्षणलक्षितः ॥ ४२ ॥

तस्याहं धर्मतः पत्नी सीता जनकनन्दिनी ।
तस्य भ्राता कनीयांश्च लक्ष्मणो भ्रातृवत्सलः ॥ ४३ ॥

पितुराज्ञां पुरस्कृत्य दण्डके वस्तुमागतः ।
चतुर्दश समास्त्वां तु ज्ञातुमिच्छामि मे वद ॥ ४४ ॥

*भिक्षुरुवाच*

पौलस्त्यतनयोऽहं तु रावणो राक्षसाधिपः ।
त्वत्कामपरितप्तोऽहं त्वां नेतुं पुरमागतः ॥ ४५ ॥

मुनिवेषेण रामेण किं करिष्यसि मां भज ।
भुङ्क्ष्व भोगान्मया सार्धं त्यज दुःखं वनोद्भवम् ॥ ४६ ॥

श्रुत्वा तद्वचनं सीता भीता किञ्चिदुवाच तम् ।
यद्येवं भाषसे मां त्वं नाशमेष्यसि राघवात् ॥ ४७ ॥

आगमिष्यति रामोऽपि क्षणं तिष्ठ सहानुजः ।
मां को धर्षयितुं शक्तो हरेर्भार्यां शशो यथा ॥ ४८ ॥

रामबाणैर्विभिन्नस्त्वं पतिष्यसि महीतले ।
इति सीतावचः श्रुत्वा रावणः क्रोधमूर्च्छितः ॥ ४९ ॥

स्वरूपं दर्शयामास महापर्वतसन्निभम् ।
दशास्यं विंशतिभुजं कालमेघसमद्युतिम् ॥ ५० ॥

करतील. तुमची जर इच्छा असेल तर तुम्ही थोडा वेळ थांबा." (३६-४०)

**भिक्षू म्हणाला–** "हे कमलनयने , तू कोण आहेस ? हे निष्पाप स्त्रिये, तुझा पती कोण आहे ? राक्षसांनी सेवन केलेल्या या अरण्यामध्ये इथे तू कशासाठी निवास केला आहेस ? हे भद्रे, सर्व सांग. मग मी माझी सर्व हकीगत तुला सांगेन." (४१)

**सीता म्हणाली –** "हे भिक्षू , श्रीमान व महान् असे महाराज दशरथ अयोध्येचे अधिपती होते. सर्व शुभ लक्षणांनी युक्त असे श्रीराम हे त्याचे ज्येष्ठ पुत्र आहेत. (४२)

त्या श्रीरामांची धर्मपत्नी मी सीता आहे. मी जनकाची कन्या आहे. भ्रातृवत्सल लक्ष्मण हा रामांचा धाकटा भाऊ आहे. (४३)

पित्याच्या आज्ञेप्रमाणे श्रीराम चौदा वर्षे दंडकारण्यात आम्हा दोघांबरोबर राहावयास आले आहेत. आता तुम्ही कोण आहात हे मी जाणून घेऊ इच्छिते. ते तुम्ही मला सांगा." (४४)

**भिक्षू म्हणाला –** " मी पुलस्त्य- नंदन विश्रवाचा पुत्र व राक्षसांचा राजा रावण आहे. तुला प्राप्त करून घेण्याच्या इच्छेने मी बेचैन झालो आहे आणि तुला माझ्या नगरीला नेण्यास येथे आलो आहे. (४५)

मुनि-वेषातील रामाचा तुला काय उपयोग ? तू माझा आश्रय घे. वनात राहण्यामुळे होणारे दुःख सोडून दे आणि माझ्याबरोबर नाना प्रकारचे भोग घे." (४६)

त्याचे ते वचन ऐकून भ्यालेली सीता त्याला म्हणाली, "असे जर तू बोलशील, तर श्रीराघवांकडून तुझा नाश होईल. (४७)

क्षणभर थांब. धाकट्या भावासह माझे पती श्रीरामसुद्धा आत्ता येतीलच. ज्या प्रमाणे ससा सिंहिणीवर बळाचा प्रयोग करू शकत नाही, त्या प्रमाणे माझ्यावर बळजबरी करण्यास कोण समर्थ आहे? (४८)

श्रीरामांच्या बाणांनी छिन्न भिन्न होऊन तू धरणीवर पडशील." असे सीतेचे वचन ऐकल्यावर, क्रुद्ध होऊन रावणाने आपले स्वतःचे खरे रूप तिला दाखविले. ते रूप प्रचंड पर्वताप्रमाणे होते; त्या रूपाला दहा तोंडे व वीस बाहू होते. काळ्या मेघाप्रमाणे तो काळाकुट्ट होता. (४९-५०)

यद्यहं विरतो भूत्वा तूष्णीं स्थास्यामि मन्दिरे ।
तदा राक्षसकोटीनां वधोपायः कथं भवेत् ॥ ४ ॥

जर मी शोक न करता माझ्या आश्रमात गप्प बसेन तर कोट्यवधी राक्षसांचा वध करण्याचा मार्ग मला कसा बरे प्राप्त होईल? (४)

यदि शोचामि तां दुःखसन्तप्तः कामुको यथा ।
तदा क्रमेणानुचिन्वन्सीतां यास्येऽसुरालयम् ।
रावण सकुलं हत्वा सीतामग्नौ स्थितां पुनः ॥ ५ ॥

मयैव स्थापितां नीत्वा यातायोध्यामतन्द्रितः ।
अहं मनुष्यभावेन जातोऽस्मि ब्रह्मणार्थितः ॥ ६ ॥

मनुष्यभावमापन्नः किञ्चित्कालं वसामि कौ ।
ततो मायामनुष्यस्य चरितं मेऽनुशृण्वताम् ॥ ७ ॥

मुक्तिः स्यादप्रयासेन भक्तिमार्गानुवर्तिनाम् ।
निश्चित्यैवं तदा दृष्ट्वा लक्ष्मणं वाक्यमब्रवीत् ॥ ८ ॥

दुःखाने संत्रस्त होऊन मी जर एखाद्या कामुक माणसाप्रमाणे त्या सीतेविषयी शोक केला तरच सीतेचा शोध करीत मी असुरांच्या स्थानी जाऊ शकेन. आणि रावणाचा कुळासह वध करून, मीच अग्नीमध्ये स्थापन केलेल्या सीतेला पुनः बरोबर घेऊन नंतर तिला अयोध्येला त्वरित घेऊन जाईन. ब्रह्मदेवाने प्रार्थना केल्यामुळे मी मनुष्य-भावाने जन्माला आलो आहे. म्हणून मनुष्य-भावात मी काही काळ या पृथ्वीवर राहीन. त्यामुळे माया-मनुष्य झालेल्या माझे चरित्र ऐकणाऱ्या आणि भक्तिमार्गाचे अनुसरण करणाऱ्या भक्तांना विनासायास मुक्ती प्राप्त होईल." असा निश्चय करून, मग लक्ष्मणाला पाहून राम म्हणाला. (५-८)

किमर्थमागतोऽसि त्वं सीतां त्यक्त्वा मम प्रियाम् ।
नीता वा भक्षिता वापि राक्षसैर्जनकात्मजा ॥ ९ ॥

"अरे लक्ष्मणा, माझ्या प्रिय सीतेला सोडून तू का बरे इकडे आलास ? तिला राक्षसांनी तरी नेले असेल अथवा खाऊन टाकले असेल." (९)

लक्ष्मणः प्राञ्जलिः प्राह सीताया दुर्वचो रुदन् ।
हा लक्ष्मणेति वचनं राक्षसोक्तं श्रुतं तया ॥ १० ॥

त्वद्वाक्यसदृशं श्रुत्वा मां गच्छेति त्वराब्रवीत् ।
रुदन्ती सा मया प्रोक्ता देवि राक्षसभाषितम् ।
नेदं रामस्य वचनं स्वस्था भव शुचिस्मिते ॥ ११ ॥

इत्येवं सान्त्विता साध्वी मया प्रोवाच मां पुनः ।
यदुक्तं दुर्वचो राम न वाच्यं पुरतस्तव ॥ १२ ॥

तेव्हा हात जोडून, रडत रडत लक्ष्मणाने त्याला सीतेने उच्चारलेले वाईट शब्द सांगितले. "हाय लक्ष्मणा, इत्यादी राक्षसाने उच्चारलेले शब्द सीतेने ऐकले. तुमच्या शब्दाप्रमाणे असणारे ते शब्द ऐकून ती त्वरेने मला म्हणाली, 'तू ताबडतोब श्रीरामांकडे जा.' तेव्हा रडणाऱ्या सीतेला मी म्हटले 'अग देवी, हे राक्षसाचे शब्द आहेत. हे श्रीरामांचे शब्द नव्हेत. हे देवी, तू निश्चित राहा.' मी तिचे सांत्वन केले तरी ती साध्वी मला पुन्हा जे वाईट शब्द बोलली, ते हे रामा, मी तुमच्यापुढे उच्चारणे योग्य नाही. (१०-१२)

कर्णौ पिधाय निर्गत्य यातोऽहं त्वां समीक्षितुम् ।
रामस्तु लक्ष्मणं प्राह तथाप्यनुचितं कृतम् ॥ १३ ॥

त्या वेळी कानावर हात ठेवून मी तेथून निघून तुम्हाला पाहण्यास इकडे आलो." तेव्हा राम लक्ष्मणाला म्हणाले, "तथापि तू हे बरोबर केले नाहीस. (१३)

त्वया स्त्रीभाषितं सत्यं कृत्वा त्यक्ता शुभानना ।
नीता वा भक्षिता वापि राक्षसैर्नात्र संशयः ॥ १४ ॥

स्त्रीचे भाषण खरे मानून तू त्या सीतेला एकटीला सोडलेस. त्यामुळे राक्षसांनी तिला नेले असेल अगर खाऊन तरी टाकले असेल, यात शंका नाही." (१४)

इति चिन्तापरो रामः स्वाश्रमं त्वरितो ययौ ।
तत्रादृष्ट्वा जनकजां विललापातिदुःखितः ॥ १५ ॥

अशा प्रकारे चिंताग्रस्त झालेले राम त्वरित स्वतःच्या आश्रमाकडे गेले. तेथे जनक-कन्या सीता न दिसल्याने, ते अतिशय दुःखी होऊन विलाप करू लागले. (१५)

हा प्रिये क्व गतासि त्वं नासि पूर्ववदाश्रमे ।
अथवा मद्विमोहार्थं लीलया क्व विलीयसे ॥ १६ ॥

इत्याचिन्वन्वनं सर्वं नापश्यज्जानकीं तदा ।
वनदेव्यः कुतः सीतां ब्रुवन्तु मम वल्लभाम् ॥ १७ ॥

मृगाश्च पक्षिणो वृक्षा दर्शयन्तु मम प्रियाम् ।
इत्येवं विलपन्नेव रामः सीतां न कुत्रचित् ॥ १८ ॥

सर्वज्ञः सर्वथा क्वापि नापश्यद्रघुनन्दनः ।
आनन्दोऽप्यन्वशोचत्तामचलोऽप्यनुधावति ॥ १९ ॥

निर्ममो निरहङ्कारोऽप्यखण्डानन्दरूपवान् ।
मम जायेति सीतेति विललापातिदुःखितः ॥ २० ॥

एवं मायामनुचरन्नसक्तोऽपि रघूत्तमः ।
आसक्त इव मूढानां भाति तत्त्वविदां न हि ॥ २१ ॥

एवं विचिन्वन्सकलं वनं रामः सलक्ष्मणः ।
भग्नं रथं छत्रचापं कूबरं पतितं भुवि ॥ २२ ॥

दृष्ट्वा लक्ष्मणमाहेदं पश्य लक्ष्मण केनचित् ।
नीयमानां जनकजां तं जित्वान्यो जहार ताम् ॥ २३ ॥

ततः कश्चिद्भुवो भागं गत्वा पर्वतसन्निभम् ।
रुधिराक्तवपुर्दृष्ट्वा रामो वाक्यमथाब्रवीत् ॥ २४ ॥

एष वै भक्षयित्वा तां जानकीं शुभदर्शनाम् ।
शेते विविक्तेऽतितृप्तः पश्य हन्मि निशाचरम् ॥ २५ ॥

चापमानय शीघ्रं मे बाणं च रघुनन्दन ।
तच्छ्रुत्वा रामवचनं जटायुः प्राह भीतवत् ॥ २६ ॥

"हा प्रिये, आता तू पूर्वीप्रमाणे आश्रमात दिसत नाहीस. तू कुठे गेली आहेस ? माझी थट्टा करण्यासाठी तू खोडकरपणाने कुठे लपून बसली आहेस का ? " (१६)

असे बोलून त्यांनी संपूर्ण वनात तिचा शोध घेतला. परंतु त्यांना कुठेही जानकी आढळली नाही. तेव्हा ते म्हणू लागले, "अहो वनदेवींनो, माझी लाडकी सीता कुठे आहे ते मला सांगा. (१७)

हे मृग, पक्षी आणि वृक्ष हो, तुम्ही माझी प्रिया मला दाखवा." अशा प्रकारे विलाप करीत असता त्या संपूर्ण, सर्वज्ञ रघुनंदनांना सीता कुठेही दिसली नाही. श्रीराम हे जरी आनंदस्वरूप होते तरी सीतेला शोधण्यासाठी शोक करीत होते. आणि स्वतः अचल असूनही ते तिला शोधण्यास इकडे तिकडे धावत होते. (१८-१९)

श्रीराम हे स्वतः जरी ममत्व- रहित, अहंकार- रहित आणि अखंड आनंद- स्वरूप होते तरी ते अतिशय दुःखी होऊन 'माझी भार्या, माझी सीता' असे बडबडत विलाप करीत होते. (२०)

अशा प्रकारे मायेला अनुसरून वागणारे रघूत्तम हे जरी अनासक्त होते तरी ते आसक्त आहेत असे अज्ञानी माणसांना भासत होते, पण श्रीरामांचे खरे तत्त्व जाणणाऱ्या पुरुषांना मात्र असा भास होत नव्हता. (२१)

अशा प्रकारे लक्ष्मणासह श्रीराम सीतेसाठी संपूर्ण वनाचा शोध घेत असताना, त्यांना जमिनीवर पडलेला एक मोडका रथ, भंगलेले छत्र आणि धनुष्य तसेच रथाचे जू दिसले. ते पाहिल्यावर राम लक्ष्मणाला म्हणाले, "अरे लक्ष्मणा, पाहा, जनक-कन्येला नेताना तसे करणाऱ्या पुरुषाला जिंकून दुसऱ्या कुणीतरी तिचे हरण केले आहे. " (२२-२३)

त्यानंतर जमिनीवर थोडे चालून गेल्यावर पर्वताप्रमाणे प्रचंड आणि रक्ताने लडबडलेले शरीर दिसल्यानंतर श्रीराम असे म्हणाले. (२४)

"अरे लक्ष्मणा, पाहा. त्या सुंदर जानकीला खाऊन टाकल्यावर अतिशय तृप्त झालेला कुणीतरी राक्षस येथे एकांतस्थानी झोपला आहे. बघ, मी आत्ता या राक्षसाला ठार करतो. तेव्हा हे रघुनंदना लक्ष्मणा, चट्दिशी माझे धनुष्य आणि बाण आण." ते रामाचे वचन ऐकल्यावर भ्यालेला जटायू बोलू लागला. (२५-२६)

मां न मारय भद्रं ते म्रियमाणं स्वकर्मणा ।
अहं जटायुस्ते भार्याहारिणं समनुद्रुत: ॥ २७ ॥

रावणं तत्र युद्धं मे बभूवारिविमर्दन ।
तस्य वाहान् रथं चापं छित्त्वाहं तेन घातित: ॥ २८ ॥

पतितोऽस्मि जगन्नाथ प्राणांस्त्यक्ष्यामि पश्य माम् ॥ २९ ॥

तच्छ्रुत्वा राघवो दीनं कण्ठप्राणं ददर्श ह ।
हस्ताभ्यां संस्पृशन् रामो दु:खाश्रुवृतलोचन: ॥ ३० ॥

जटायो ब्रूहि मे भार्या केन नीता शुभानना ।
मत्कार्यार्थं हतोऽसि त्वमतो मे प्रियबान्धव: ॥ ३१ ॥

जटायु: सन्नया वाचा वक्त्राद्रक्तं समुद्वमन् ।
उवाच रावणो राम राक्षसो भीमविक्रम: ॥ ३२ ॥

आदाय मैथिलीं सीतां दक्षिणाभिमुखो ययौ ।
इतो वक्तुं न मे शक्ति: प्राणांस्त्यक्ष्यामि तेऽग्रत: ॥ ३३ ॥

दिष्ट्या दृष्टोऽसि राम त्वं म्रियमाणेन मेऽनघ ।
परमात्मासि विष्णुस्त्वं मायामनुजरूपधृक् ॥ ३४ ॥

अन्तकालेऽपि दृष्ट्वा त्वां मुक्तोऽहं रघुसत्तम ।
हस्ताभ्यां स्पृश मां राम पुनर्यास्यामि ते पदम् ॥ ३५ ॥

तथेति राम: पस्पर्श तदङ्गं पाणिना स्मयन् ।
तत: प्राणान् परित्यज्य जटायु: पतितो भुवि ॥ ३६ ॥

रामस्तमनुशोचित्वा बन्धुवत्साश्रुलोचन: ।
लक्ष्मणेन समानाय्य काष्ठानि प्रददाह तम् ॥ ३७ ॥

स्नात्वा दु:खेन रामोऽपि लक्ष्मणेन समन्वित: ।
हत्वा वने मृगं तत्र मांसखण्डान्समन्तत: ॥ ३८ ॥

शाद्वले प्राक्षिपद्राम: पृथक् पृथगनेकधा ।
भक्षन्तु पक्षिण: सर्वे तृप्तो भवतु पक्षिराट् ॥३९॥

"हे रामा, स्वत:च्या कर्मानेच मरणाऱ्या मला मारू नकोस. तुझे कल्याण असो. मी जटायू आहे. तुझ्या भार्येचे हरण करणाऱ्या रावणाच्यामागे मी गेलो होतो. हे शत्रुनाशका, तेथे माझे रावणाबरोबर युद्ध झाले. मी त्याच्या रथाचे घोडे, रथ आणि धनुष्य तोडून टाकले. परंतु मी त्याच्याकडून घायाळ झालो, आता येथे पडलो आहे. हे जगन्नाथा, मी आता प्राणत्याग करणार आहे. तू माझ्याकडे पाहा." ते ऐकल्यावर, अतिशय दीन अवस्थेत असणाऱ्या आणि कंठाशी प्राण आलेल्या जटायूला रामांनी पाहिले. त्यांचे डोळे दु:खाश्रूंनी भरले होते. रामांनी दोन्ही हात त्याच्या अंगावरून फिरविले. मग ते म्हणाले. (२७-३०)

"हे जटायू, माझी सुमुखी भार्या कुणी पळवून नेली, ते सांग. माझ्या कार्यासाठी तू घायाळ झाला आहेस. म्हणून तू माझा प्रिय बांधव आहेस." (३१)

तेव्हा तोंडातून रक्त ओकीत अडखळत्या व क्षीण झालेल्या वाणीने जटायूने म्हटले, "हे रामा, भयंकर पराक्रम करणारा रावण नावाचा राक्षस मिथिल-राजकन्या सीतेला घेऊन, दक्षिण दिशेकडे गेला आहे. याहून अधिक सांगण्याची शक्ती माझ्याजवळ नाही. मी तुझ्यासमोरच प्राणांचा त्याग करतो. (३२-३३)

हे रामा, भाग्याची गोष्ट अशी की मी मरत असताना तुला पाहात आहे. हे निष्पाप रामा, माया- मनुष्य-रूप धारण करणारा तू प्रत्यक्ष परमात्मा विष्णू आहेस. (३४)

हे रघुश्रेष्ठा, माझ्या अंतकाळी तुला पाहिल्यामुळे मी मुक्त होऊन गेलो आहे. हे रामा, तू तुझ्या हातांनी मला स्पर्श कर. मग मी तुझ्या परमस्थानी जाईन." (३५)

"ठीक आहे" असे म्हणून आश्चर्याने रामांनी त्याच्या शरीराला स्पर्श केला. त्यानंतर प्राणत्याग करून जटायू जमिनीवर पडला. (३६)

जटायूला बंधूप्रमाणे मानून, डोळ्यांत अश्रू आणून रामांनी त्याच्याविषयी शोक केला आणि लक्ष्मणाकडून काष्ठे आणवून घेऊन त्याचा दाह-संस्कार केला. (३७)

दु:खी झालेल्या रामांनी लक्ष्मणासह स्नान केले. नंतर पक्षिराज जटायूसाठी तेथील हिरवळीवर पिंडदान केले. "हे पिंड खाऊन पक्षी तृप्त होऊ देत आणि त्यामुळे पक्षिराज जटायू तृप्त होऊ दे." असे म्हटले. (३८-३९)

इत्युक्त्वा राघवः प्राह जटायो गच्छ मत्पदम् ।
मत्सारूप्यं भजस्वाद्य सर्वलोकस्य पश्यतः ॥ ४० ॥

राघव म्हणाले, "हे जटायू, तू माझ्या पदी जा. आणि सर्व लोकांच्या देखत आज सरूपता मुक्ती प्राप्त करून घे." (४०)

ततोऽनन्तरमेवासौ दिव्यरूपधरः शुभः ।
विमानवरमारुह्य भास्वरं भानुसन्निभम् ॥ ४१ ॥

त्यानंतर त्या वेळी जटायू सुंदर व दिव्य रूप धारण करून, सूर्याप्रमाणे तेजस्वी अशा एका उत्कृष्ट विमानात चढला. (४१)

शङ्खचक्रगदापद्मकिरीटवरभूषणैः ।
द्योतयन्स्वप्रकाशेन पीताम्बरधरोऽमलः ॥ ४२ ॥

तेथे तो स्वच्छ पीतांबर धारण केलेला शंख, चक्र, गदा, पद्म, उत्कृष्ट किरीट इत्यादी भूषणांनी युक्त होता. तो स्वतःच्या तेजाने सर्व दिशांना प्रकाशित करीत होता. (४२)

चतुर्भिः पार्षदैर्विष्णोस्तादृशैरभिपूजितः ।
स्तूयमानो योगिगणै राममाभाष्य सत्वरः ।
कृताञ्जलिपुटो भूत्वा तुष्टाव रघुनन्दनम् ॥ ४३ ॥

तसाच वेष व भूषणे असणाऱ्या विष्णूंच्या चार पार्षदांनी पूजिलेल्या आणि योगी लोकांनी स्तुती केलेल्या जटायूने रामांना उद्देशून सत्वर हात जोडून, त्यांची स्तुती केली. (४३)

*जटायुरुवाच*

अगणितगुणमप्रमेयमाद्यं
सकलजगत्स्थितिसंयमादिहेतुम् ।
उपरमपरमं परात्मभूतं
सततमहं प्रणतोऽस्मि रामचन्द्रम् ॥ ४४ ॥

**जटायू म्हणाला–** "जे अगणित गुणांनी युक्त आहेत, जे अप्रमेय आहेत, जे जगाचे आदिकारण आहेत, जे सर्व जगाची स्थिती, नाश इत्यादींचा हेतू आहेत, जे श्रेष्ठ शांत स्वरूप आहेत आणि जे परमात्मा आहेत त्या रामचंद्रांना मी सतत प्रणाम करतो. (४४)

निरवधिसुखमिन्दिराकटाक्षं
क्षपितसुरेन्द्रचतुर्मुखादिदुःखम् ।
नरवरमनिशं नतोऽस्मि रामं
वरदमहं वरचापबाणहस्तम् ॥ ४५ ॥

जे अमर्याद आनंदस्वरूप आहेत, ज्यांच्याकडे लक्ष्मी प्रेमाने पाहात राहते, परंतु तृप्त होत नाही. ज्यांनी इंद्र, ब्रह्मदेव इत्यादी देवांचे दुःख हरण केले आहे. जे नरश्रेष्ठ आहेत, जे वर देणारे आहेत, आणि ज्यांच्या हातात धनुष्य व बाण आहेत, अशा रामांपुढे मी रात्रंदिवस नतमस्तक आहे. (४५)

त्रिभुवनकमनीयरूपमीड्यं
रविशतभासुरमीहितप्रदानम् ।
शरणदमनिशं सुरागमूले
कृतनिलयं रघुनन्दनं प्रपद्ये ॥ ४६ ॥

तीनही भुवनांत ज्यांचे रूप सर्वांत जास्त सुंदर आहे, जे स्तुती करण्यास पात्र आहेत, जे शेकडो सूर्यांप्रमाणे देदीप्यमान आहेत, जे इष्ट फळ देणारे आहेत, जे रक्षण करणारे आहेत आणि भक्तांच्या अतिशय भक्तिमूलक हृदयात जे वास करून राहातात, अशा रघुनंदनांना मी अहर्निश शरण जातो. (४६)

भवविपिनदवाग्निनामधेयं
भवमुखदैवतदैवतं दयालुम् ।
दनुजपतिसहस्रकोटिनाशं
रवितनयासदृशं हरिं प्रपद्ये ॥ ४७ ॥

ज्यांचे नाव हे संसाररूपी अरण्याला वणव्याप्रमाणे नष्ट करणारे आहे, जे शंकरादी दैवतांचे दैवत आहेत, जे दयाळू आहेत, कोट्यवधी दानव श्रेष्ठांचा ज्यांनी नाश केला आहे आणि सूर्यकन्या यमुनेप्रमाणे जे श्यामवर्ण आहेत, अशा हरींना मी शरण जातो. (४७)

अविरतभवभावनातिदूरं
भवविमुखैर्मुनिभिः सदैव दृश्यम् ।
भवजलधिसुतारणाङ्घ्रिपोतं
शरणमहं रघुनन्दनं प्रपद्ये ॥ ४८॥

संसारात सतत वासना ठेवणाऱ्या माणसांपासून जे अतिशय दूर आहेत, या उलट संसाराला विन्मुख असणाऱ्या मुनींना जे नेहमीच दृश्यमान असतात, संसारसागर चांगल्याप्रकारे तरून जाण्यास ज्यांचे चरण हे नौका आहेत, अशा रघुनंदनांना मी शरण जातो. (४८)

गिरिशगिरिसुतामनोनिवासं
गिरिवरधारिणमीहिताभिरामम् ।
सुरवरदनुजेन्द्रसेविताङ्घ्रिं
सुरवरदं रघुनायकं प्रपद्ये ॥ ४९॥

शंकर आणि पार्वती यांच्या मनांत ज्याचा निवास आहे, ज्यांनी श्रेष्ठ असा गोवर्धन पर्वत उचलून धरला होता, ज्यांचे चरित्र मनोवेधक आहे, श्रेष्ठ देव आणि दानवांचे राजे यांच्याकडून ज्यांचे चरणकमल सेविले जातात आणि जे देवांना वर देतात, अशा रघुनायकांना मी शरण जातो. (४९)

परधनपरदारवर्जितानां
परगुणभूतिषु तुष्टमानसानाम् ।
परहितनिरतात्मनां सुसेव्यं
रघुवरमम्बुजलोचनं प्रपद्ये ॥ ५०॥

परद्रव्य आणि परस्त्री हे ज्यांनी वर्ज्य केले आहे, दुसऱ्याचे गुण आणि वैभव यांचे बाबतीत ज्यांचे मन प्रसन्न असते, दुसऱ्यांचे हित करण्यात ज्यांचे मन सदा तत्पर असते, अशा संतपुरुषांकडून ज्यांची उत्तम सेवा केली जाते, अशा कमलनयन रघुश्रेष्ठांना मी शरण आहे. (५०)

स्मितरुचिरविकासिताननाब्ज-
मतिसुलभं सुरराजनीलनीलम् ।
सितजलरुहचारुनेत्रशोभं
रघुपतिमीशगुरोर्गुरुं प्रपद्ये ॥ ५१॥

ज्यांचे मुखकमल मनोहर स्मिताने सुशोभित झाले आहे, जे भक्तांना प्राप्त होण्यास अतिशय सुलभ आहेत, जे इंद्रनील मण्याप्रमाणे नीलरंगाचे आहेत, श्वेत कमळाप्रमाणे ज्यांच्या सुंदर नेत्रांची शोभा आहे, जे शंकरांच्या गुरुंचे गुरु आहेत, अशा रघुनाथांना मी शरण आहे. (५१)

हरिकमलजशम्भुरूपभेदा-
त्त्वमिह विभासि गुणत्रयानुवृत्तः ।
रविरिव जलपूरितोदपात्रे-
ष्वमरपतिस्तुतिपात्रमीशमीडे ॥५२॥

हे श्रीराम, पाण्याने भरलेल्या जल-पात्रांमध्ये ज्याप्रमाणे एकच सूर्य (अनेक प्रकारांनी) प्रतिबिंबित होतो, त्याप्रमाणे सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या समूहाशी संबंध असल्यामुळे तुम्हीच येथे या विश्वात विष्णू, ब्रह्मदेव आणि शंकर अशा भिन्न रूपांत भासता. देवराज इंद्राच्या स्तुतीस पात्र असणाऱ्या आणि ईश्वरस्वरूप असणाऱ्या तुमची मी स्तुती करतो. (५२)

रतिपतिशतकोटिसुन्दराङ्गं
शतपथगोचरभावनाविदूरम् * ।
यतिपतिहृदये सदा विभातं
रघुपतिमार्तिहरं प्रभुं प्रपद्ये ॥ ५३॥

कोट्यवधी मदनांपेक्षा ज्यांचे शरीर सुंदर आहे, शेकडो मार्गांवर भरकटलेल्या लोकांपासून जे अतिशय दूर आहेत (किंवा शतपथ ब्राह्मणातील बृहदारण्यक उपनिषदांत सांगितल्याप्रमाणे प्रेम भावनेने ज्यांची प्राप्ती दूर नाही), श्रेष्ठ यतींच्या हृदयात जे सदा प्रकाशित असतात आणि जे दुःख हरण करतात, अशा प्रभू रघुपतींना मी शरण जातो." (५३)

इत्येवं स्तुवतस्तस्य प्रसन्नोऽभूद्रघूत्तमः ।
उवाच गच्छ भद्रं ते मम विष्णोः परं पदम् ॥ ५४॥

अशी स्तुती करणाऱ्या त्या जटायूवर रघूत्तम प्रसन्न झाले आणि म्हणाले "तुझे कल्याण असो. विष्णुलोकात तू जा. (५४)

* टीकेप्रमाणे येथे अकार लुप्त आहे. - **"शतपथगोचरभावनाविदूरम्"** असा पाठ आहे आणि त्याचा भावार्थ असा की, 'शतपथब्राह्मणातील **'बृहदारण्यक'** यामध्ये ज्या ब्रह्म-भावनेचा उपदेश आहे, त्या भावनेमुळे जे प्राप्यआहे.'

श्रृणोति य इदं स्तोत्रं लिखेद्वा नियतः पठेत् ।
स याति मम सारूप्यं मरणे मत्स्मृतिं लभेत् ॥ ५५ ॥

जटायूने उच्चारलेले हे स्तोत्र जो कोणी ऐकतो, लिहून काढतो अथवा नियमितपणे पठण करतो, त्याला मरणकाळी माझी स्मृती येते आणि तो माझे सारूप्य प्राप्त करून घेतो." (५५)

इति राघवभाषितं तदा
श्रुतवान् हर्षसमाकुलो द्विजः ।
रघुनन्दनसाम्यमास्थितः
प्रययौ ब्रह्मसुपूजितं पदम् ॥ ५६ ॥

असे हे रामांचे भाषण त्या वेळी आनंदित झालेल्या जटायू पक्ष्याने ऐकले आणि रघुनंदनांप्रमाणे समान रूप धारण केलेला तो जटायू ब्रह्मदेवाने उत्तम प्रकारे पूजिलेल्या विष्णूच्या परमधामात निघून गेला. (५६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकाण्डे अष्टमः सर्गः ॥

# नवम सर्ग

## कबन्धोद्धार

*श्रीमहादेव उवाच*

ततो रामो लक्ष्मणेन जगाम विपिनान्तरम् ।
पुनर्दुःखं समाश्रित्य सीतान्वेषणतत्परः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**— हे पार्वती, त्यानंतर पुनः दुःखाचा आश्रय घेऊन सीतेचा शोध करण्यात तत्पर होऊन, श्रीराम हे लक्ष्मणासह दुसऱ्या एका अरण्यात गेले. (१)

तत्राद्भुतसमाकारो राक्षसः प्रत्यदृश्यत ।
वक्षस्येव महावक्त्रश्चक्षुरादिविवर्जितः ॥ २ ॥

तेथे त्यांना अद्भुत आकाराचा एक राक्षस दिसून आला. त्याच्या वक्षःस्थळावरच प्रचंड तोंड होते. त्याला डोळे वगैरे नव्हते. (२)

बाहू योजनमात्रेण व्यापृतौ तस्य रक्षसः ।
कबन्धो नाम दैत्येन्द्रः सर्वसत्त्वविहिंसकः ॥ ३ ॥

त्या राक्षसाचे बाहू एकेक योजनापर्यंत पसरलेले होते. हा राक्षस म्हणजे सर्व प्राण्यांची हिंसा करणारा कबंध नावाचा दैत्यराज होता. (३)

तद्बाह्वोर्मध्यदेशे तौ चरन्तौ रामलक्ष्मणौ ।
ददर्शतुर्महासत्त्वं तद्बाहुपरिवेष्टितौ ॥ ४ ॥

त्या राक्षसाच्या पसरलेल्या बाहूंच्या मध्यभागी राम व लक्ष्मण फिरत असताना, त्याच्या बाहूंनी वेढले गेले होते. त्या दोघांनी त्या महासामर्थ्यसंपन्न राक्षसाला पाहिले. (४)

रामः प्रोवाच विहसन्पश्य लक्ष्मण राक्षसम् ।
शिरःपादविहीनोऽयं यस्य वक्षसि चाननम् ॥ ५ ॥

तेव्हा श्रीराम हसत हसत म्हणाले, "लक्ष्मणा, हा राक्षस बघ. याला मस्तक व पाय नाहीत. याच्या वक्षःस्थळावर तोंड आहे. (५)

बाहुभ्यां लभ्यते यद्यत्तत्तद्भक्षन् स्थितो ध्रुवम् ।
आवामप्येतयोर्बाह्वोर्मध्ये सङ्कलितौ ध्रुवम् ॥ ६ ॥

आपल्या दोन बाहूंच्या द्वारा याला जे जे काही मिळते ते ते खाऊन हा जिवंत राहातो. आत्ता आपण दोघेही नक्कीच याच्या दोन बाहूंच्या मध्ये अडकलो आहोत. (६)

गन्तुमन्यत्र मार्गो न दृश्यते रघुनन्दन ।
किं कर्तव्यमितोऽस्माभिरिदानीं भक्षयेत्स नौ ॥ ७ ॥

हे रघुनंदन लक्ष्मणा, याच्या बाहूंमधून सुटून दुसरीकडे जाण्यास मार्ग दिसत नाही. तेव्हा आपण काय करायचे ? हा आपणा दोघांना खाऊन टाकेल." (७)

लक्ष्मणस्तमुवाचेदं किं विचारेण राघव ।
आवामेकैकमव्यग्रौ छिन्द्यावास्य भुजौ ध्रुवम् ॥८॥

तेव्हा लक्ष्मण त्यांना म्हणाला, "हे राघवा, येथे कसला विचार करायचा ? आपण दोघेही सावधपणे एकेक करून याचे दोन्ही बाहू नक्कीच तोडून टाकू." (८)

तथेति रामः खड्गेन भुजं दक्षिणमच्छिनत् ।
तथैव लक्ष्मणो वामं चिच्छेद भुजमञ्जसा ॥९॥

"ठीक आहे" असे म्हणून श्रीरामांनी तलवारीने कबंधाचा उजवा बाहू तोडून टाकला. त्याचप्रमाणे लक्ष्मणाने सुद्धा झटपट त्याचा डावा बाहू सहजपणे तोडला. (९)

ततोऽतिविस्मितो दैत्यः कौ युवां सुरपुङ्गवौ ।
मद्बाहुच्छेदकौ लोके दिवि देवेषु वा कुतः ॥१०॥

तेव्हा अतिशय आश्चर्यचकित झालेल्या त्या दैत्याने विचारले, "माझे बाहू तोडणारे तुम्ही दोघे कोणी सामर्थ्यशाली श्रेष्ठ देव आहात काय? या जगात अथवा स्वर्गातील देवांमध्ये असा पराक्रमी पुरुष कोठून असणार?" (१०)

ततोऽब्रवीद्धसन्नेव रामो राजीवलोचनः ।
अयोध्याधिपतिः श्रीमान् राजा दशरथो महान् ॥११॥

त्यावेळी हसतच कमलनयन राम म्हणाले, "श्रीमान आणि महान असे राजा दशरथ अयोध्या नगरीचे अधिपती होते. (११)

रामोऽहं तस्य पुत्रोऽसौ भ्राता मे लक्ष्मणः सुधीः ।
मम भार्या जनकजा सीता त्रैलोक्यसुन्दरी ॥१२॥

मी राम त्यांचा पुत्र आहे. हा बुद्धिमान लक्ष्मण माझा भाऊ आहे. तिन्ही लोकांत सुंदर असणारी जनक-कन्या सीता ही माझी पत्नी आहे. (१२)

आवां मृगयया यातौ तदा केनापि रक्षसा ।
नीतां सीतां विचिन्वन्तौ चागतौ घोरकानने ॥१३॥

मृगया करण्यास आम्ही दोघे आश्रमातून बाहेर गेलो होतो. त्यावेळी कोण्या राक्षसाने सीतेला पळवून नेले. तिचा शोध करीत आम्ही दोघे या भयंकर अरण्यात आलो आहोत. (१३)

बाहुभ्यां वेष्टितावत्र तव प्राणरिरक्षया ।
छिन्नौ तव भुजौ त्वं च को वा विकटरूपधृक् ॥१४॥

आम्ही येथे आलो असताना तुझ्या बाहूंमध्ये पकडले गेलो. आम्ही आमच्या प्राणांचे रक्षण करण्यासाठी तुझे दोन्ही बाहू तोडले आहेत. आता सांग की हे भयंकर रूप धारण करणारा तू कोण आहेस ?" (१४)

*कबन्ध उवाच*

धन्योऽहं यदि रामस्त्वमागतोऽसि ममान्तिकम् ।
पुरा गन्धर्वराजोऽहं रूपयौवनदर्पितः ॥१५॥

**कबंध म्हणाला**– "जर तुम्ही श्रीराम असाल आणि जर तुम्ही माझ्याजवळ आहात, तर मी धन्य आहे. ऐका. पूर्वी रूप आणि तारुण्य यांचा गर्व बाळगणारा मी गंधर्वराजा होतो. (१५)

विचरँल्लोकमखिलं वरनारीमनोहरः ।
तपसा ब्रह्मणो लब्धमवध्यत्वं रघूत्तम ॥१६॥

सुंदर स्त्रियांना आकर्षित करीत मी सर्व लोकांत हिंडत होतो. हे रघूत्तमा, तपाच्या द्वारा ब्रह्मदेवाकडून मी अवध्यत्व मिळविले होते. (१६)

अष्टावक्रं मुनिं दृष्ट्वा कदाचिदहसं पुरा ।
क्रुद्धोऽसावाह दुष्ट त्वं राक्षसो भव दुर्मते ॥१७॥

पूर्वी एकदा अष्टावक्र नावाच्या मुनींना पाहून मी हसलो. तेव्हा रागाने ते मुनी मला म्हणाले, 'दुष्टा, दुर्बुद्धीच्या गंधर्वा, तू राक्षस हो.' (१७)

अष्टावक्रः पुनः प्राह वन्दितो मे दयापरः ।
शापस्यान्तं च मे प्राह तपसा द्योतितप्रभः ॥१८॥

(त्यांच्या शापातून सुटण्यासाठी) मी त्या दयाळू मुनींना वंदन केले आणि त्यांची क्षमा मागितली. तेव्हा तपामुळे तेजस्वी दिसणाऱ्या त्या मुनींनी मला शापाचा अंत कसा होईल ते सांगितले. ते म्हणाले- (१८)

त्रेतायुगे दाशरथिर्भूत्वा नारायणः स्वयम् ।
आगमिष्यति ते बाहू छिद्येते योजनायतौ ॥ १९ ॥

तेन शापाद्विनिर्मुक्तो भविष्यसि यथा पुरा ।
इति शप्तोऽहमद्राक्षं राक्षसीं तनुमात्मनः ॥ २० ॥

कदाचिद्देवराजानमभ्याद्रवमहं रुषा ।
सोऽपि वज्रेण मां राम शिरोदेशेऽभ्यताडयत् ॥ २१ ॥

तदा शिरो गतं कुक्षिं पादौ च रघुनन्दन ।
ब्रह्मदत्तवरान्मृत्युर्नाभून्मे वज्रताडनात् ॥ २२ ॥

मुखाभावे कथं जीवेदयमित्यमराधिपम् ।
ऊचुः सर्वे दयाविष्टा मां विलोक्यास्यवर्जितम् ॥ २३ ॥

ततो मां प्राह मघवा जठरे ते मुखं भवेत् ।
बाहू ते योजनायामौ भविष्यत इतो व्रज ॥ २४ ॥

इत्युक्तोऽत्र वसन्नित्यं बाहुभ्यां वनगोचरान् ।
भक्षयाम्यधुना बाहू खण्डितौ मे त्वयानघ ॥ २५ ॥

इतः परं मां श्वभ्रास्ये निक्षिपाग्नीन्धनावृते ।
अग्निना दह्यमानोऽहं त्वया रघुकुलोत्तम ॥ २६ ॥

पूर्वरूपमनुप्राप्य भार्यामार्गं वदामि ते ।
इत्युक्ते लक्ष्मणेनाशु श्वभ्रं निर्माय तत्र तम् ॥ २७ ॥

निक्षिप्य प्रादहत्काष्ठैस्ततो देहात्समुत्थितः ।
कन्दर्पसदृशाकारः सर्वाभरणभूषितः ॥ २८ ॥

रामं प्रदक्षिणं कृत्वा साष्टाङ्गं प्रणिपत्य च।
कृताञ्जलिरुवाचेदं भक्तिगद्गदया गिरा ॥ २९ ॥

*गन्धर्व उवाच*

स्तोतुमुत्सहते मेऽद्य मनो रामातिसम्भ्रमात् ।
त्वामनन्तमनाद्यन्तं मनोवाचामगोचरम् ॥ ३० ॥

'त्रेतायुगात स्वतः नारायण हे दशरथाचे पुत्र होऊन तुझ्याजवळ येतील. एक योजन लांब असणारे तुझे दोन बाहू ते तोडून टाकतील. (१९)

त्यामुळे तू माझ्या शापातून मुक्त होऊन पूर्वी होतास तसा होशील.' असा शाप मिळाल्यावर माझे शरीर राक्षसाचे झाले आहे, असे मला दिसले. (२०)

हे श्रीरामा, एकदा मी क्रोधाने देवराज इंद्रावर धावून गेलो. तेव्हा त्यानेसुद्धा रागाने आपल्या वज्राने माझ्या मस्तकावर तडाखा दिला. (२१)

हे रघुनंदना, त्या व्रजाच्या आघाताने माझे डोके आणि दोन्ही पाय माझ्या पोटात घुसले. तथापि ब्रह्मदेवाने दिलेल्या वरामुळे मला मृत्यू आला नाही. (२२)

मी मुखरहित झालो आहे हे पाहून दया येऊन सर्व देव देवराज इंद्राला म्हणाले, 'अहो, मुखाच्या अभावी हा कसा बरे जिवंत राहील ?' (२३)

तेव्हा इंद्र मला म्हणाला, 'तुझ्या पोटावरच तुला मुख येईल. आणि तुझे दोन्ही बाहू एक एक योजन लांब होतील. आता तू येथून चालू लाग.' (२४)

इंद्राने असे सांगितल्यावर, येथेच राहून, आपल्या दोन बाहूंनी वनातील प्राण्यांना पकडून मी नेहमी त्यांना खात असतो. हे पुण्यशील रामा, आता तुम्ही माझे ते बाहू तोडून टाकले आहेत. (२५)

हे रघुकुलश्रेष्ठा, आता अग्नी आणि इंधन यांनी भरलेल्या एका खड्ड्यात तुम्ही मला टाकून द्या. तुम्ही दिलेल्या अग्नीने दग्ध झाल्यावर मला माझे पूर्वीचे रूप प्राप्त होईल. मग मी तुम्हांला तुमच्या पत्नीचा पत्ता सांगेन." असे त्याने सांगितल्यावर श्रीरामांनी लक्ष्मणाकडून तेथे एक खड्डा करवून घेतला आणि त्या कबंधाला त्यात ठेवून लाकडांनी जाळून टाकले. तेव्हा त्या कबंधाच्या देहातून एक पुरुष निर्माण झाला; तो मदनाप्रमाणे सुंदर रूप असणारा आणि सर्व अलंकारांनी विभूषित असा होता. (२६-२८)

त्याने श्रीरामांना प्रदक्षिणा घातली व साष्टांग प्रणिपात केला. आणि हात जोडून, भक्तीने गद्गद झालेल्या वाणीने तो असे बोलू लागला. (२९)

**गंधर्व म्हणाला–** "हे श्रीरामा, तुम्ही अनंत, आदी व अंत यांनी रहित आणि मन व वाणी यांना अगोचर आहात. तथापि आज अतिशय आदराने तुमची स्तुती करण्यास माझे मन उत्सुक झाले आहे. (३०)

सूक्ष्मं ते रूपमव्यक्तं देहद्वयविलक्षणम् ।
दृग्रूपमितरत्सर्वं दृश्यं जडमनात्मकम् ।
तत्कथं त्वां विजानीयाद् व्यतिरिक्तं मनः प्रभो ॥ ३१ ॥

हे प्रभू, तुमच्या स्थूल आणि सूक्ष्म म्हणजे विराट् आणि हिरण्यगर्भ अशा या दोन शरीरांपेक्षा वेगळे असे तुमचे ज्ञानमय सत्य स्वरूप अव्यक्त आणि सूक्ष्म आहे. तुम्ही सर्वांचे साक्षी आहात. तुमच्याखेरीज अन्य जे काही आहे तेही दृश्य, अचेतन, आणि अनात्म स्वरूप आहे. म्हणून तुमच्यापेक्षा वेगळे असणारे अचेतन मन तुम्हांला कसे बरे जाणू शकेल? (३१)

बुद्‍ध्यात्माभासयोरैक्यं जीव इत्यभिधीयते ।
बुद्‍ध्यादिसाक्षी ब्रह्मैव तस्मिन्निर्विषयेऽखिलम् ॥ ३२ ॥

आरोप्यतेऽज्ञानवशान्निर्विकारेऽखिलात्मनि ।
हिरण्यगर्भस्ते सूक्ष्मं देहं स्थूलं विराट् स्मृतम् ॥ ३३ ॥

भावनाविषयो राम सूक्ष्मं ते ध्यातृमङ्गलम् ।
भूतं भव्यं भविष्यच्च यत्रेदं दृश्यते जगत् ॥ ३४ ॥

बुद्धी आणि चिदाभास यांच्या एकमेकांवरील अध्यासालाच जीव असे म्हटले जाते. त्या बुद्धी इत्यादींचे साक्षी असणारे ब्रह्म हेच आहे. त्या निर्विषय, निर्विकार आणि सर्वात्मरूप अशा ब्रह्मावर अज्ञानामुळे संपूर्ण चराचर जगाचा आरोप केला जातो. हे रामा, तुमचा सूक्ष्म देह म्हणजे हिरण्यगर्भ आणि तुमचा स्थूल देह म्हणजे विराट असे म्हटले जाते. त्या तुमच्या सूक्ष्म रूपात भूतकालीन, वर्तमानकालीन आणि भविष्यकालीन असे हे जग दिसून येते, ते तुमचे सूक्ष्म रूप हे ध्यानाचा विषय असते आणि ते रूप तुमचे ध्यान करणाऱ्यांचे कल्याण करते. (३२-३४)

स्थूलेऽण्डकोशे देहे ते महदादिभिरावृते ।
सप्तभिरुत्तरगुणैर्वैराजो धारणाश्रयः ॥ ३५ ॥

उत्तरोत्तर मोठे होत जाणाऱ्या महत् इत्यादी सात तत्त्वांनी आवृत असणाऱ्या* तुमच्या ब्रह्मांडरूपी स्थूल देहात धारणेला आधारभूत असणारे विराट शरीर स्थित आहे. (३५)

त्वमेव सर्वकैवल्यं लोकास्तेऽवयवाः स्मृताः ।
पातालं ते पादमूलं पार्ष्णिस्तव महातलम् ॥ ३६ ॥

फक्त तुम्हीच सर्व कैवल्यस्वरूप आहात. सर्व लोक हे तुमचे अवयव म्हटले जातात. पाताळ हे तुमच्या पायाचा तळवा आहे. महातल हे तुमच्या पायाची टाच आहे. (३६)

रसातलं ते गुल्फौ तु तलातलमितीर्यते ।
जानुनी सुतलं राम ऊरू ते वितलं तथा ॥ ३७ ॥

हे रामा, रसातल आणि तलातल हे तुमचे घोटे आहेत. सुतल हे गुडघे, तसेच अतल व वितल हे मांड्या आहेत, असे म्हटले जाते. (३७)

* १. महत्, अहंकार, आकाश, वायू, तेज, पृथ्वी अशी सात तत्त्वे आहेत. यांतील उत्तर म्हणजे पुढले तत्त्व हे पूर्व तत्त्वापेक्षा मोठे आहे. म्हणून उत्तरोत्तर वाढत जाणारे आहे, असे म्हटले जाते.

२. या संदर्भात सांख्य व पुराणे यांना मान्य असणारी पुढील प्रक्रिया टीकेमध्ये दिली आहे. स्वयंभू ब्रह्मदेवांच्या संकल्पाने उत्पन्न होणारी चौदा भुवने (भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः आणि सत्यं ) ही स्वयंभूचे स्थूल शरीर आहेत. त्याच्या बाहेर चारी बाजूंना पृथ्वी व तेज यांपासून उत्पन्न झालेले अंड आहे; ते चतुर्दश भुवनांपेक्षा दसपट मोठे आहे. या अंडाचे आवरण पृथ्वी आहे. ती अंडापेक्षा दसपट मोठी आहे. या पृथ्वीचे आवरण जल आहे; ते पृथ्वीपेक्षा दसपट मोठे आहे. जलाचे आवरण तेज आहे. तेजाचे आवरण वायू आहे. वायूचे आवरण आकाश आहे. आकाशाचे आवरण अहंकार आहे. अहंकाराचे आवरण महत् तत्त्व आहे. यांतील प्रत्येक आवरण हे स्वतःकडून आवरणीय असणाऱ्या पृथ्वी इत्यादीपेक्षा दसपट मोठे आहे. पृथ्वी, जल, तेज, वायू आणि आकाश ही सर्व आवरणे येथे सूक्ष्म आहेत; ती स्थूल नाहीत.

येथे विराट् रूपाला धारणेचा विषय असे म्हटले जाते. योगदर्शनात धारणेचे स्वरूप असे सांगितले आहे. - 'देशबंधश्चित्तस्य धारणा।' (३/१) म्हणजे अन्य विषय सोडून देऊन, कोणत्या तरी एका वस्तूच्या ठिकाणी वृत्तीच्या मार्फत चित्ताचे स्थिरीकरण म्हणजे धारणा.

अतलं च मही राम जघनं नाभिगं नभः ।
उरःस्थलं ते ज्योतींषि ग्रीवा ते मह उच्यते ॥ ३८ ॥

हे श्रीरामा, अतल आणि पृथ्वी ही तुमचे नितंब आहेत. आकाश (भूर्लोक) हे तुमचे नाभि-स्थान आहे. ज्योतिर्गण हे तुमचे उरःस्थळ आहेत आणि महर्लोक हा तुमची ग्रीवा आहे, असे म्हणतात. (३८)

वदनं जनलोकस्ते तपस्ते शङ्खदेशगम् ।
सत्यलोको रघुश्रेष्ठ शीर्षण्यास्ते सदा प्रभो ॥ ३९ ॥

हे रघुश्रेष्ठा, जनलोक हा तुमचे मुख आहे. तपोलोक हा शंखाच्या आकाराचे तुमचे ललाट आहे. हे प्रभो, सत्यलोक हा नेहमी तुमच्या मस्तकस्थानी असतो. (३९)

इन्द्रादयो लोकपाला बाहवस्ते दिशः श्रुती ।
अश्विनौ नासिके राम वक्त्रं तेऽग्निरुदाहृतः ॥ ४० ॥

हे श्रीरामा, इंद्र इत्यादी लोकपाल हे तुमचे बाहू आहेत. दिशा तुमचे कान आहेत. दोन अश्विनीकुमार हे तुमच्या दोन नाकपुड्या आहेत आणि अग्नी हा तुमचे मुख आहे, असे सांगितले जाते. (४०)

चक्षुस्ते सविता राम मनश्चन्द्र उदाहृतः ।
भ्रूभङ्ग एव कालस्ते बुद्धिस्ते वाक्पतिर्भवेत् ॥ ४१ ॥

हे श्रीरामा, सूर्य हे तुमचे डोळे आहेत तर चंद्र म्हणजे तुमचे मन आहे, असे म्हणतात. काळ हाच तुमचा भ्रूभंग आहे. बृहस्पती हा तुमची बुद्धी आहे. (४१)

रुद्रोऽहङ्काररूपस्ते वाचश्छन्दांसि तेऽव्यय ।
यमस्ते दंष्ट्रदेशस्थो नक्षत्राणि द्विजालयः ॥ ४२ ॥

हे अविनाशी श्रीरामा, रुद्र हा तुमचा अहंकार आहे. वेद ही तुमची वाणी आहे. यम हा तुमच्या दाढेच्या स्थानी आहे आणि नक्षत्रे म्हणजे तुमची दंतावली आहे. (४२)

हासो मोहकरी माया सृष्टिस्तेऽपाङ्गमोक्षणम् ।
धर्मः पुरस्तेऽधर्मश्च पृष्ठभाग उदीरितः ॥ ४३ ॥

सर्वांना मोहात पाडणारी माया ही तुमचे हास्य आहे. सृष्टी ही तुमचा कटाक्षपात आहे, धर्म हा तुमचा पुढील भाग आहे आणि अधर्म हा तुमचा मागचा भाग आहे, असे म्हटले जाते. (४३)

निमिषोन्मेषणे रात्रिर्दिवा चैव रघूत्तम ।
समुद्राः सप्त ते कुक्षिर्नाड्यो नद्यस्तव प्रभो ॥ ४४ ॥

हे रघूत्तमा, रात्र आणि दिवस हे तुमचे निमिष व उन्मेष (=पापण्यांची उघडझाप) आहेत, सात समुद्र हे तुमची कुक्षी (=पोट, कूस, आतील भाग) आहे, आणि हे प्रभो, नद्या तुमच्या नाड्या आहेत. (४४)

रोमाणि वृक्षौषधयो रेतो वृष्टिस्तव प्रभो ।
महिमा ज्ञानशक्तिस्ते एवं स्थूलं वपुस्तव ॥ ४५ ॥

हे प्रभो, वृक्ष आणि वनस्पती हे तुमचे केस आहेत, वृष्टी ही तुमचे रेत आहे आणि ज्ञानशक्ती ही तुमचा महिमा आहे. अशा प्रकारचे तुमचे स्थूल शरीर आहे. (४५)

यदस्मिन् स्थूलरूपे ते मनः सन्धार्यते नरैः ।
अनायासेन मुक्तिः स्यादतोऽन्यन्नहि किञ्चन ॥ ४६ ॥

जर या तुमच्या स्थूल रूपाचे ठिकाणी माणसांनी आपले मन स्थिर केले, तर त्यांना विनासायास मुक्ती प्राप्त होते. अशा प्रकारे मुक्त झाल्यावर प्राप्त करण्याजोगे काहीही उरत नाही. (४६)

अतोऽहं राम रूपं ते स्थूलमेवानुभावये ।
यस्मिन्ध्याते प्रेमरसः सरोमपुलको भवेत् ॥ ४७ ॥

म्हणून हे श्रीरामा, मी तुमच्या स्थूल रूपाचेच चिंतन करीत असतो. त्याचे ध्यान केले असता शरीरावरील रोमांच्यासह हृदयात प्रेमरस उत्पन्न होतो. (४७)

तदैव मुक्तिः स्याद्राम यदा ते स्थूलभावकः ।
तदप्यास्तां तवैवाहमेतद्रूपं विचिन्तये ॥ ४८ ॥

हे श्रीरामा, जेव्हा एखादा जीव हा तुमच्या स्थूल रूपाचे ध्यान करतो, तेव्हाच त्याला मुक्ती मिळते. पण मला त्याची गरज नाही. मी मात्र तुमच्या या माझ्यासमोर दिसणाऱ्या रामरूपाचेच चिंतन करतो. (४८)

धनुर्बाणधरं श्यामं जटावल्कलभूषितम् ।
अपीच्यवयसं सीतां विचिन्वन्तं सलक्ष्मणम् ॥ ४९ ॥

तुमचे हे रूप धनुष्य-बाण धारण करणारे, श्यामवर्ण, जटा आणि वल्कल यांनी विभूषित, तरुण वय असणारे, आणि लक्ष्मणासह सीतेचा शोध घेणारे आहे. (४९)

इदमेव सदा मे स्यान्मानसे रघुनन्दन ।
सर्वज्ञः शङ्करः साक्षात्पार्वत्या सहितः सदा ॥ ५० ॥

त्वद्रूपमेवं सततं ध्यायन्नास्ते रघूत्तम ।
मुमूर्षूणां तदा काश्यां तारकं ब्रह्मवाचकम् ॥ ५१ ॥

रामरामेत्युपदिशन्सदा संतुष्टमानसः ।
अतस्त्वं जानकीनाथ परमात्मा सुनिश्चितः ॥ ५२ ॥

हेच रूप, हे रघुनंदना, सदा माझ्या मनात राहो. हे रघुश्रेष्ठा, पार्वतीसह सर्वज्ञ शंकर हे साक्षात् सदा तुमच्या रूपाचेच ध्यान करीत असतात आणि काशी नगरीमध्ये मरावयास टेकलेल्या माणसांना भगवान शंकर हे ब्रह्मवाचक व संसार तरून नेणाऱ्या 'राम राम' या तारक मंत्राचा नेहमी उपदेश करतात आणि संतुष्ट मनाने राहातात. म्हणून हे जानकीनाथा, तुम्हीच निश्चितपणे परमात्मा आहात. (५०-५२)

सर्वे ते मायया मूढास्त्वां न जानन्ति तत्त्वतः ।
नमस्ते रामभद्राय वेधसे परमात्मने ॥ ५३ ॥

तुमच्या मायेने मोहित झालेले सर्व लोक हे तुम्हांला तत्त्वतः जाणत नाहीत. सृष्टिरचना करणाऱ्या परमात्म्या श्रीरामा, तुम्हांला माझा नमस्कार असो. (५३)

अयोध्याधिपते तुभ्यं नमः सौमित्रिसेवित ।
त्राहि त्राहि जगन्नाथ मां माया नावृणोतु ते ॥ ५४ ॥

लक्ष्मणाकडून सेवा केल्या जाणाऱ्या हे अयोध्येच्या अधिपते, तुम्हांला माझा नमस्कार असो. हे जगन्नाथा, माझे रक्षण करा. तुमच्या मायेमुळे मला मोह पडू नये." (५४)

*श्रीराम उवाच*

तुष्टोऽहं देवगन्धर्व भक्त्या स्तुत्या च तेऽनघ ।
याहि मे परमं स्थानं योगिगम्यं सनातनम् ॥ ५५ ॥

**श्रीराम म्हणाले**– "हे निष्पाप देवगंधर्वा, तुझ्या भक्तीने आणि स्तुतीने मी संतुष्ट झालो आहे. केवळ योगिलोकांना प्राप्त होण्याजोगे असे जे माझे सनातन श्रेष्ठ स्थान आहे, त्या स्थानी तू जा. (५५)

जपन्ति ये नित्यमनन्यबुद्ध्या
भक्त्या त्वदुक्तं स्तवमागमोक्तम् ।
तेऽज्ञानसम्भूतभवं विहाय
मां यान्ति नित्यानुभवानुमेयम् ॥ ५६ ॥

वेदाला अनुसणारे आणि तू उच्चारलेले हे स्तोत्र जे कोणी अनन्य बुद्धीने आणि भक्तीने नित्य जपतील, ते लोक अज्ञानापासून निर्माण होणाऱ्या संसाराचा त्याग करून, नित्य आणि अनुभवस्वरूप अशा माझ्या स्वरूपाप्रत जातील." (५६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

# दशम सर्ग

## शबरीची भेट

*श्रीमहादेव उवाच*

लब्ध्वा वरं स गन्धर्वः प्रयास्यन् राममब्रवीत् ।
शबर्यास्ते पुरोभागे आश्रमे रघुनन्दन ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, श्रीरामांकडून वर मिळवून, श्रीरामांच्या परम धामाकडे जात असताना तो गंधर्व म्हणाला, "हे रघुनंदना, या समोरच्या भागातील एका आश्रमात शबरी राहात आहे. (१)

भक्त्या त्वत्पादकमले भक्तिमार्गविशारदा ।
तां प्रयाहि महाभाग सर्वं ते कथयिष्यति ॥ २ ॥

तुमच्या चरणकमळांच्या ठिकाणी भक्ती असल्यामुळे ती भक्तिमार्गात प्रवीण आहे. हे महाभागा, आता तुम्ही तिच्याकडे जा. ती तुम्हांला (सीतेच्या संबंधात) सर्व काही सांगेल.'' (२)

इत्युक्त्वा प्रययौ सोऽपि विमानेनार्कवर्चसा ।
विष्णोः पदं रामनामस्मरणे फलमीदृशम् ॥ ३ ॥

असे बोलून सूर्याप्रमाणे तेज असणाऱ्या विमानात बसून तो विष्णुलोकात निघून गेला. रामनामाच्या स्मरणाचे फळ असेच असते, हे खरे. (३)

त्यक्त्वा तद्विपिनं घोरं सिंहव्याघ्रादिदूषितम् ।
शनैरथाश्रमपदं शबर्या रघुनन्दनः ॥ ४ ॥

त्यानंतर सिंह, वाघ इत्यादींनी भरलेले ते भयंकर अरण्य सोडल्यानंतर रघुनंदन हळूहळू शबरीच्या आश्रमस्थानी पोचले. (४)

शबरी राममालोक्य लक्ष्मणेन समन्वितम् ।
आयान्तमाराद्धर्षेण प्रत्युत्थायाचिरेण सा ॥ ५ ॥

लक्ष्मणासहित श्रीराम जवळ आलेले आहेत हे पाहून शबरी आनंदित होऊन त्वरित त्यांच्या स्वागतासाठी उठली. (५)

पतित्वा पादयोरग्रे हर्षपूर्णाश्रुलोचना ।
स्वागतेनाभिनन्द्याथ स्वासने संन्यवेशयत् ॥ ६ ॥

आनंदाश्रूंनी जिचे डोळे पूर्ण भरले होते, अशी ती शबरी श्रीरामांच्या पाया पडली. नंतर त्यांचे स्वागत करून, त्यांना क्षेम कुशल-विषयक प्रश्न विचारून, तिने श्रीरामांना एका सुंदर आसनावर बसविले. (६)

रामलक्ष्मणयोः सम्यक्पादौ प्रक्षाल्य भक्तितः ।
तज्जलेनाभिषिच्याङ्गमथार्घ्यादिभिरादृता ॥ ७ ॥

सम्पूज्य विधिवद्रामं ससौमित्रिं सपर्यया ।
सङ्गृहीतानि दिव्यानि रामार्थं शबरी मुदा ॥ ८ ॥

फलान्यमृतकल्पानि ददौ रामाय भक्तितः ।
पादौ सम्पूज्य कुसुमैः सुगन्धैः सानुलेपनैः ॥ ९ ॥

राम आणि लक्ष्मण यांचे पाय शबरीने भक्तिपूर्वक स्वच्छ धुतले. त्यांचे ते चरणोदक तिने आपल्या अंगावर शिंपडून घेतले. नंतर अर्घ्य इत्यादी देऊन तिने त्यांचा आदर सत्कार केला. त्यानंतर तिने विधिवत पूजा साहित्याने लक्ष्मणासह श्रीरामांची पूजा केली. दिव्य आणि अमृताप्रमाणे गोड असणारी फळे तिने श्रीरामांसाठी आनंदाने गोळा केली होती, ती तिने भक्तीने त्यांना दिली. नंतर चंदनाच्या लेपाने युक्त असणाऱ्या सुवासिक फुलांनी तिने श्रीरामांच्या चरणांची पूजा केली. (७-९)

कृतातिथ्यं रघुश्रेष्ठमुपविष्टं सहानुजम् ।
शबरी भक्तिसम्पन्ना प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् ॥ १० ॥

अशा प्रकारे ज्यांचे आतिथ्य केले ते रघुश्रेष्ठ राम हे लक्ष्मणासह बसले असता, ती भक्तिसंपन्न शबरी हात जोडून श्रीरामांना म्हणाली. (१०)

अत्राश्रमे रघुश्रेष्ठ गुरवो मे महर्षयः ।
स्थिताः शुश्रूषणं तेषां कुर्वती समुपस्थिता ॥ ११ ॥

बहुवर्षसहस्राणि गतास्ते ब्रह्मणः पदम् ।
गमिष्यन्तोऽब्रुवन्मां त्वं वसात्रैव समाहिता ॥ १२ ॥

''हे रघुश्रेष्ठा, पूर्वी येथे या आश्रमात माझे गुरू महर्षी मतंग राहात असत. त्यांची सेवा शुश्रूषा करीत मी येथे हजारो वर्षे राहात आहे. आता माझे गुरू ब्रह्मलोकी गेले आहेत. जाण्यापूर्वी ते मला म्हणाले 'तू एकाग्र चित्त करून येथेच राहा. (११-१२)

रामो दाशरथिर्जातः परमात्मा सनातनः ।
राक्षसानां वधार्थाय ऋषीणां रक्षणाय च ॥ १३ ॥

राक्षसांचा वध करण्यासाठी आणि ऋषींचे रक्षण करण्यासाठी सनातन परमात्मा दशरथांचे पुत्र म्हणून जन्माला आलेले आहेत. (१३)

आगमिष्यति सैकाग्रध्याननिष्ठा स्थिरा भव ।
इदानीं चित्रकूटाद्रावाश्रमे वसति प्रभुः ॥ १४ ॥

ते येथे येतील. एकाग्र मनाने त्यांचे ध्यान करीत तू येथेच स्थिर राहा. सध्या प्रभू राम हे चित्रकूट पर्वतावरील आश्रमात राहात आहेत. (१४)

यावदागमनं तस्य तावद्रक्ष कलेवरम् ।
दृष्ट्वैव राघवं दग्ध्वा देहं यास्यसि तत्पदम् ॥ १५ ॥

त्यांचे आगमन होईपर्यंत तू स्वतःच्या शरीराचे रक्षण कर. राघवांचे दर्शन घेऊन मग स्वतःचा देह जाळून घेतल्यावर, तू त्यांच्या परमधामात जाशील.' (१५)

तथैवाकरवं राम त्वद्ध्यानैकपरायणा ।
प्रतीक्ष्यागमनं तेऽद्य सफलं गुरुभाषितम् ॥ १६ ॥

हे रामा, तसेच मी केले. केवळ तुमचे ध्यान करण्यात तत्पर होऊन, मी तुमच्या आगमनाची वाट पाहात होते. आज ते गुरूंचे वचन सफल झाले आहे. (१६)

तव सन्दर्शनं राम गुरूणामपि मे न हि ।
योषिन्मूढाप्रमेयात्मन् हीनजातिसमुद्भवा ॥ १७ ॥

हे रामा, माझ्या गुरूंनाही तुमचे दर्शन झालेले नाही. अप्रमेयस्वरूप असणाऱ्या हे रामा, हीन जातीत जन्माला आलेली मी एक अडाणी स्त्री आहे. (१७)

तव दासस्य दासानां शतसङ्ख्योत्तरस्य वा ।
दासीत्वे नाधिकारोऽस्ति कुतः साक्षात्तवैव हि ॥ १८ ॥

तुमच्या दासांचे जे दास आहेत आणि त्याच्यानंतर त्यांचे जे शेकडो दास आहेत, त्यांची दासी होण्याचासुद्धा माझा अधिकार नाही. तेव्हा साक्षात तुमची मी दासी आहे, असे मी कोणत्या तोंडाने म्हणू ? (१८)

कथं रामाद्य मे दृष्टस्त्वं मनोवागगोचरः ।
स्तोतुं न जाने देवेश किं करोमि प्रसीद मे ॥ १९ ॥

हे रामा, तुम्ही तर मन आणि वाणी यांना अगोचर आहात. तथापि मला तुमचे दर्शन कसे काय झाले ? हे मला कळत नाही. हे देवेश्वर रामा, तुमची स्तुती कशी करावी, हे मला कळत नाही. तेव्हा मी काय करू ? तुम्ही माझ्यावर प्रसन्न व्हा ." (१९)

*श्रीराम उवाच*

पुंस्त्वे स्त्रीत्वे विशेषो वा जातिनामाश्रमादयः ।
न कारणं मद्भजने भक्तिरेव हि कारणम् ॥ २० ॥

**श्रीराम म्हणाले–** "पुरुष किंवा स्त्री असा कोणताही भेद तसेच जात, नाम, आश्रम इत्यादी काहीही मला भजण्याचे कारण ठरू शकत नाहीत. केवळ भक्ती हीच त्याचे कारण आहे. (२०)

यज्ञदानतपोभिर्वा वेदाध्ययनकर्मभिः ।
नैव द्रष्टुमहं शक्यो मद्भक्तिविमुखैः सदा ॥ २१ ॥

यज्ञ, दान किंवा तप, तसेच वेदांचे अध्ययन इत्यादी कर्मांच्या द्वारा, माझ्या भक्तीला विन्मुख असणाऱ्या माणसांना माझे दर्शन घडणे, कधीही शक्य नाही. (२१)

तस्माद्भामिनि सङ्क्षेपाद्वक्ष्येऽहं भक्तिसाधनम् ।
सतां सङ्गतिरेवात्र साधनं प्रथमं स्मृतम् ॥ २२ ॥

म्हणून हे भामिनी, मी तुला संक्षेपाने भक्तीची साधने सांगतो. त्या साधनांमध्ये संतांची संगती हेच पहिले मुख्य साधन आहे. (२२)

द्वितीयं मत्कथालापस्तृतीयं मद्गुणेरणम् ।
व्याख्यातृत्वं मद्वचसां चतुर्थं साधनं भवेत् ॥ २३ ॥

माझ्या कथांचे कीर्तन करणे हे दुसरे साधन आहे. माझ्या गुणांचे उच्चारण करणे हे तिसरे साधन आहे. उपनिषदे, गीता, इत्यादी माझ्या वचनांचे विवेचन करणे हे चौथे साधन आहे. (२३)

आचार्योपासनं भद्रे मद्बुद्ध्यामायया सदा ।
पञ्चमं पुण्यशीलत्वं यमादि नियमादि च ॥ २४ ॥

हे भद्रे, गुरू म्हणजे मी परमेश्वर आहे, अशा बुद्धीने निष्कपटपणाने गुरूंची सदा उपासना करणे हे पाचवे साधन आहे. पवित्र स्वभाव, यम, नियम इत्यादींचे पालन करणे

निष्ठा मत्पूजने नित्यं षष्ठं साधनमीरितम् ।
मम मन्त्रोपासकत्वं साङ्गं सप्तममुच्यते ॥ २५ ॥

आणि माझी पूजा करण्यात नित्य निष्ठा राखणे हे सहावे साधन म्हटले गेले आहे. माझ्या नाम-मंत्राची सांगोपांग उपासना, हे सातवे साधन म्हटले जाते. (२४-२५)

मद्भक्तेष्वधिका पूजा सर्वभूतेषु मन्मतिः ।
बाह्यार्थेषु विरागित्वं शमादिसहितं तथा ॥ २६ ॥

अष्टमं नवमं तत्त्वविचारो मम भामिनि ।
एवं नवविधा भक्तिः साधनं यस्य कस्य वा ॥ २७ ॥

स्त्रियो वा पुरुषस्यापि तिर्यग्योनिगतस्य वा ।
भक्तिः सञ्जायते प्रेमलक्षणा शुभलक्षणे ॥ २८ ॥

माझ्या भक्तांचा माझ्यापेक्षासुद्धा अधिक सत्कार करणे, सर्व भूतांच्या ठिकाणी मी म्हणजे ईश्वर आहे अशी बुद्धी बाळगणे आणि शम इत्यादींचेसहित बाह्य विषयांच्या बाबतीत वैराग्य असणे हे (सर्व माझ्या भक्तीचे) आठवे साधन आहे. माझ्या तत्त्वाचा म्हणजे माझ्या खऱ्या स्वरूपाचा विचार हे नववे साधन आहे. हे भामिनी, अशा प्रकारे भक्ती ही नऊ प्रकारची आहे. हे शुभलक्षणे , ज्या कुणाजवळ- मग ती व्यक्ती स्त्री असो अथवा पुरुष असो किंवा पशु- पक्षी इत्यादींमधील कोणीही असो, ज्यांच्या ठिकाणी ही साधने असतात, त्यांच्या ठिकाणी प्रेमस्वरूप भक्ती निर्माण होते. (२६-२८)

भक्तौ सञ्जातमात्रायां मत्तत्त्वानुभवस्तदा ।
ममानुभवसिद्धस्य मुक्तिस्तत्रैव जन्मनि ॥ २९ ॥

अशी ही भक्ती उत्पन्न होताक्षणीच माझ्या तत्त्वाचा- खऱ्या स्वरूपाचा- अनुभव येतो. माझ्या स्वरूपाच्या अनुभवात जो सिद्ध होतो, त्याला तेथेच त्या जन्मी मुक्ती प्राप्त होते. (२९)

स्यात्तस्मात्कारणं भक्तिर्मोक्षस्येति सुनिश्चितम् ।
प्रथमं साधनं यस्य भवेत्तस्य क्रमेण तु ॥ ३० ॥

भवेत्सर्वं ततो भक्तिर्मुक्तिरेव सुनिश्चितम् ।
यस्मान्मद्भक्तियुक्ता त्वं ततोऽहं त्वामुपस्थितः ॥ ३१ ॥

म्हणून भक्ती हीच मोक्षाचे कारण आहे, हे निश्चितपणे सिद्ध होते. ज्या कुणाला भक्तीचे पहिले साधन प्राप्त होते, त्याला क्रमाने उरलेली सर्व साधने प्राप्त होतात. म्हणून भक्ती म्हणजेच मुक्ती हे निश्चितपणे ठरते. हे शबरी, तू भक्तीने युक्त आहेस; म्हणूनच मी तुझ्याजवळ आलो आहे. (३०-३१)

इतो मद्दर्शनान्मुक्तिस्तव नास्त्यत्र संशयः ।
यदि जानासि मे ब्रूहि सीता कमललोचना ॥ ३२ ॥

कुत्रास्ते केन वा नीता प्रिया मे प्रियदर्शना ॥ ३३ ॥

आता माझे दर्शन झाल्यामुळे तुला मुक्ती मिळणार, या बाबतीत कोणताही संशय नाही. आता दुसरी गोष्ट. तुला जर माहीत असेल तर मला सांग की कमलनयना सीता कोठे आहे ? माझी प्रियदर्शना सीता कोणी बरे पळवून नेली आहे ?" (३२-३३)

*शबर्युवाच*

देव जानासि सर्वज्ञ सर्वं त्वं विश्वभावन ।
तथापि पृच्छसे यन्मां लोकाननुसृतः प्रभो ॥ ३४ ॥

ततोऽहमभिधास्यामि सीता यत्राधुना स्थिता ।
रावणेन हृता सीता लङ्कायां वर्ततेऽधुना ॥ ३५ ॥

**शबरी म्हणाली**– विश्व उत्पन्न करणाऱ्या हे सर्वज्ञ देवा, तुम्ही सर्व काही जाणत आहात. तरीसुद्धा हे प्रभो, लोकाचारानुसार तुम्ही मला प्रश्न करीत आहात. म्हणून सीता कुठे आहे, हे मी तुम्हांला आता सांगते. रावणाने सीतेचे अपहरण केलेले आहे आणि ती आता लंकेमध्ये आहे. (३४-३५)

इतः समीपे रामास्ते पम्पानाम सरोवरम् ।
ऋष्यमूकगिरिर्नाम तत्समीपे महानगः ॥ ३६ ॥

हे रामा, येथून जवळच पंपा नावाचे सरोवर आहे. त्याच्याजवळ ऋष्यमूक नावाचा एक मोठा पर्वत आहे. (३६)

चतुर्भिर्मन्त्रिभिः सार्धं सुग्रीवो वानराधिपः ।
भीतभीतः सदा यत्र तिष्ठत्यतुलविक्रमः ॥ ३७ ॥

वालिनश्च भयाद् भ्रातुस्तदगम्यमृषेर्भयात् ।
वालिनस्तत्र गच्छ त्वं तेन सख्यं कुरु प्रभो ॥ ३८ ॥

सुग्रीवेण स सर्वं ते कार्यं सम्पादयिष्यति ।
अहमग्निं प्रवेक्ष्यामि तवाग्रे रघुनन्दन ॥ ३९ ॥

अतुल पराक्रम असणारा, वानरांचा राजा सुग्रीव हा आपला भाऊ वालीच्या भीतीने सतत आपल्या चार मंत्र्यांसह सध्या तेथे पर्वतावर राहात आहे. ऋषीचा शाप होईल या भीतीने ते सुग्रीवाचे स्थान वालीला पूर्णपणे अगम्य आहे. हे प्रभो, तुम्ही तेथे जा आणि त्या सुग्रीवाशी मैत्री करा. तो तुमचे सर्व कार्य सिद्ध करील. हे रघुनंदना, मी आता तुमच्या समोरच अग्नीमध्ये प्रवेश करते. (३७-३९)

मुहूर्तं तिष्ठ राजेन्द्र यावद्दग्ध्वा कलेवरम् ।
यास्यामि भगवन् राम तव विष्णोः परं पदम् ॥ ४० ॥

हे राजेंद्रा, हे भगवान रामा, स्वतःचे शरीर जाळून टाकून मी तुमच्या-विष्णूच्या- परमपदी जाईन; तोपर्यंत तुम्ही एक मुहूर्तभर येथेच थांबा." (४०)

इति रामं समामन्त्र्य प्रविवेश हुताशनम् ।
क्षणान्निर्धूय सकलमविद्याकृतबन्धनम् ।
रामप्रसादाच्छबरी मोक्षं प्रापातिदुर्लभम् ॥ ४१ ॥

अशा प्रकारे रामांशी बोलून झाल्यावर ती शबरी अग्नीमध्ये शिरली. आणि क्षणात अविद्येने निर्माण झालेले सर्व बंधन नष्ट करून, रामांच्या कृपेने ती अतिशय दुर्लभ अशा मोक्षाप्रत पोचली. (४१)

किं दुर्लभं जगन्नाथे श्रीरामे भक्तवत्सले ।
प्रसन्नेऽधमजन्मापि शबरी मुक्तिमाप सा ॥ ४२ ॥

भक्तवत्सल आणि जगाचे नाथ श्रीराम प्रसन्न झाल्यावर कोणती गोष्ट दुर्लभ असेल बरे ? खालच्या जातीत जन्मलेल्या त्या शबरीनेसुद्धा मोक्ष प्राप्त करून घेतला. (४२)

किं पुनर्ब्राह्मणा मुख्याः पुण्याः श्रीरामचिन्तकाः ।
मुक्तिं यान्तीति तद्भक्तिर्मुक्तिरेव न संशयः ॥ ४३ ॥

मग श्रीरामांचे ध्यान करणारे पुण्यवान, ब्राह्मण इत्यादी मुक्तीप्रत जातील, तर त्यात नवल काय आहे ? त्या रामांची भक्ती हीच मुक्ती आहे, यात संशय नाही. (४३)

भक्तिर्मुक्तिविधायिनी भगवतः
श्रीरामचन्द्रस्य हे
लोकाः कामदुघाङ्घ्रिपद्मयुगलं
सेवध्वमत्युत्सुकाः ।
नानाज्ञानविशेषमन्त्रविततिं
त्यक्त्वा सुदूरे भृशं
रामं श्यामतनुं स्मरारिहृदये
भान्तं भजध्वं बुधाः ॥ ४४ ॥

लोकहो, भगवान श्रीरामचंद्रांची भक्ती ही मुक्ती देणारी आहे. म्हणून कामधेनूप्रमाणे सर्व काही देणाऱ्या त्यांच्या चरणकमलयुगलाची अतिशय आदराने सेवा करा. हे शहाण्या लोकांनो, अज्ञानमूलक असे (लौकिक व वैदिक) विषय आणि मंत्रांचा फापटपसारा अगदी बाजूला सारून शंकरांच्या हृदयात विशेष करून प्रकाशमान असणाऱ्या, श्याम शरीर असणाऱ्या श्रीरामांचा सतत आश्रय घ्या. (४४)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥

## अरण्यकाण्ड समाप्त

ॐ

# अध्यात्मरामायण

## किष्किन्धाकाण्ड

### प्रथम सर्ग

**सुग्रीवाशी मैत्री**

*श्रीमहादेव उवाच*

ततः सलक्ष्मणो रामः शनैः पम्पासरस्तटम् ।
आगत्य सरसां श्रेष्ठं दृष्ट्वा विस्मयमाययौ ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, त्यानंतर लक्ष्मणासह श्रीराम हळूहळू पंपा सरोवराच्या तटावर आले. सरोवरांमध्ये श्रेष्ठ असे ते सरोवर पाहून ते विस्मयचकित झाले. (१)

क्रोशमात्रं सुविस्तीर्णमगाधामलशम्बरम् ।
उत्फुल्लाम्बुजकह्लारकुमुदोत्पलमण्डितम् ॥ २ ॥

ते सरोवर एक कोसभर पसरलेले होते. त्यात अगाध, निर्मल पाणी होते. फुललेली कमळे, कल्हारे, कुमुदे आणि उत्पले यांनी ते मंडित झालेले होते. (२)

हंसकारण्डवाकीर्णं चक्रवाकादिशोभितम् ।
जलकुक्कुटकोयष्टिक्रौञ्चनादोपनादितम् ॥ ३ ॥

हंस आणि कारंडव या पक्ष्यांनी ते गजबजले होते. चक्रवाक इत्यादी पक्ष्यांनी ते शोभित झाले होते. पाणकोंबडे, कोंढे आणि क्रौंच पक्ष्यांच्या आवाजांनी ते निनादित झाले होते. (३)

नानापुष्पलताकीर्णं नानाफलसमावृतम् ।
सतां मनःस्वच्छजलं पद्मकिञ्जल्कवासितम् ॥ ४ ॥

नाना प्रकारच्या पुष्पलतांनी ते भरले होते. नाना प्रकारच्या फलयुक्त वृक्षांनी ते घेरलेले होते. त्याचे पाणी सज्जनांच्या मनाप्रमाणे स्वच्छ होते. तसेच ते कमळांच्या परागांनी सुगंधित झालेले होते. (४)

तत्रोपस्पृश्य सलिलं पीत्वा श्रमहरं विभुः ।
सानुजः सरसस्तीरे शीतलेन पथा ययौ ॥ ५ ॥

तेथे त्या सरोवरातील पाण्यात स्नान करून व धाकट्या भावासह प्रभू राम ते शीण घालवणारे पाणी प्याले आणि मग ते त्या सरोवराच्या तीरावरून शीतल छायेने युक्त अशा मार्गावरून पुढे चालू लागले. (५)

ऋष्यमूकगिरेः पार्श्वे गच्छन्तौ रामलक्ष्मणौ ।
धनुर्बाणकरौ दान्तौ जटावल्कलमण्डितौ ।
पश्यन्तौ विविधान्वृक्षान् गिरेः शोभां सुविक्रमौ ॥ ६ ॥

हातात धनुष्य व बाण घेतलेले, इंद्रियनिग्रही, जटा आणि वल्कल यांनी मंडित तसेच अतिशय पराक्रमी राम व लक्ष्मण हे विविध वृक्ष आणि पर्वत यांची शोभा पाहात, ऋष्यमूक पर्वताच्या जवळून जात होते. (६)

सुग्रीवस्तु गिरेर्मूर्ध्नि चतुर्भिः सह वानरैः ।
स्थित्वा ददर्श तौ यान्तावारुरोह गिरेः शिरः ॥ ७ ॥

त्या वेळी चार वानर मंत्र्यासह पर्वताच्या माथ्यावर बसलेल्या सुग्रीवाने त्या दोघांना जाताना पाहिले. आणि तो त्या पर्वताच्या सर्वांत उंच शिखरावर पळाला. (७)

भयादाह हनूमन्तं कौ तौ वीरवरौ सखे ।
गच्छ जानीहि भद्रं ते बटुर्भूत्वा द्विजाकृतिः ॥ ८ ॥

भयभीत होऊन सुग्रीव हनुमंताला म्हणाला, "मित्रा, हे दोन श्रेष्ठ वीर कोण आहेत ? ब्राह्मण बटूचे रूप धारण करून तू त्यांच्याजवळ जा आणि ते कोण आहेत हे तू जाणून घे. तुझे कल्याण असो . (८)

वालिना प्रेषितौ किंवा मां हन्तुं समुपागतौ ।
ताभ्यां सम्भाषणं कृत्वा जानीहि हृदयं तयोः ॥ ९ ॥

त्यांना वालीने पाठविले आहे काय? किंवा ते मला मारण्यासाठी आलेले आहेत काय ? या बाबतीत त्यांच्याशी संभाषण करून तू त्या दोघांचे मनोगत जाणून घे. (९)

यदि तौ दुष्टहृदयौ संज्ञां कुरु कराग्रतः ।
विनयावनतो भूत्वा एवं जानीहि निश्चयम् ॥ १० ॥

जर त्यांचे हृदय दुष्ट आहे असे तुला वाटले तर तू बोटांनी मला खूण कर. त्यांच्यापुढे विनयाने नम्र होऊन, तू हे सर्व खात्रीपूर्वक जाणून घे." (१०)

तथेति बटुरूपेण हनुमान् समुपागतः ।
विनयावनतो भूत्वा रामं नत्वेदमब्रवीत् ॥ ११ ॥

'ठीक आहे' असे म्हणून ब्रह्मचारी बटूचे रूप धारण करून हनुमान रामलक्ष्मणांचे जवळ गेला. विनयाने नम्र होऊन आणि रामांना नमस्कार करून तो म्हणाला. (११)

कौ युवां पुरुषव्याघ्रौ युवानौ वीरसम्मतौ ।
द्योतयन्तौ दिशः सर्वाः प्रभया भास्कराविव ॥ १२ ॥

"अहो पुरुषश्रेष्ठांनो, तरूण, वीर पुरुषांना आदरणीय, सूर्याप्रमाणे स्वतःच्या प्रभेने सर्व दिशांना प्रकाशित करणारे तुम्ही दोघे कोण आहात? (१२)

युवां त्रैलोक्यकर्ताराविति भाति मनो मम ।
युवां प्रधानपुरुषौ जगद्धेतू जगन्मयौ ॥ १३ ॥

मायया मानुषाकारौ चरन्ताविव लीलया ।
भूभारहरणार्थाय भक्तानां पालनाय च ॥ १४ ॥

माझ्या मनाला असे वाटते की तुम्ही दोघे त्रैलोक्य निर्माण करणारे आहात. विश्वाचे कारण असणारे, जगन्मय असणारे, प्रधान व पुरूष असे तुम्ही दोघे असून, तुम्ही मायेने मनुष्यरूप धारण करून, भूमीचा भार हरण करण्यासाठी आणि भक्तांचे पालन करण्यासाठी दोघे सहजपणे फिरत आहात. (१३-१४)

अवतीर्णाविह परौ चरन्तौ क्षत्रियाकृती ।
जगत्स्थितिलयौ सर्गं लीलया कर्तुमुद्यतौ ॥ १५ ॥

तुम्ही दोघे श्रेष्ठ असून क्षत्रियांचे रूप धारण करून येथे पृथ्वीवर अवतीर्ण होऊन फिरत आहात. लीलेने जगाची उत्पत्ती, स्थिती आणि नाश करण्यास तयार झालेले, असे दिसता. (१५)

स्वतन्त्रौ प्रेरकौ सर्वहृदयस्थाविहेश्वरौ ।
नरनारायणौ लोके चरन्ताविति मे मतिः ॥ १६ ॥

तुम्ही दोघे स्वतंत्र, सर्वांच्या हृदयात राहून प्रेरणा करणारे, ईश्वररूप असे नर आणि नारायण असून तुम्ही दोघे येथे फिरत आहात, असे मला वाटते." (१६)

श्रीरामो लक्ष्मणं प्राह पश्यैनं बटुरूपिणम् ।
शब्दशास्त्रमशेषेण श्रुतं नूनमनेकधा ॥ १७ ॥

ते ऐकल्यावर श्रीराम लक्ष्मणाला म्हणाले, "या बटुरूप ब्रह्मचाऱ्याला पाहा. याने खरोखर नाना प्रकारे संपूर्ण शब्द-शास्त्र पढलेले दिसते. (१७)

अनेन भाषितं कृत्स्नं न किञ्चिदपशब्दितम् ।
ततः प्राह हनूमन्तं राघवो ज्ञानविग्रहः ॥ १८ ॥

याच्या संपूर्ण बोलण्यात कोणताही चुकीचा शब्द नव्हता." त्यानंतर ज्ञानरूप राघव हनुमंताला म्हणाले. (१८)

अहं दाशरथी रामस्त्वयं मे लक्ष्मणोऽनुजः ।
सीतया भार्यया सार्धं पितुर्वचनगौरवात् ॥ १९ ॥

आगतस्तत्र विपिने स्थितोऽहं दण्डके द्विज ।
तत्र भार्या हृता सीता रक्षसा केनचिन्मम ।
तमन्वेष्टुमिहायातौ त्वं को वा कस्य वा वद ॥ २० ॥

"हे ब्राह्मणा, मी दशरथाचा पुत्र राम आहे. हा माझा धाकटा भाऊ लक्ष्मण आहे. पित्याची आज्ञा शिरसावंद्य मानून, सीता या माझ्या पत्नीसह येऊन दंडकारण्यात राहात होतो. तेथे माझ्या सीता या भार्येला एका राक्षसाने हरण करून नेले आहे. तिला शोधत शोधत आम्ही दोघे येथे आलो आहोत. तू कोण आहेस आणि कुणाचा आहेस हे सांग बरे ?" (१९-२०)

*बटुरुवाच*

सुग्रीवो नाम राजा यो वानराणां महामतिः ।
चतुर्भिर्मन्त्रिभिः सार्धं गिरिमूर्धनि तिष्ठति ॥ २१ ॥

भ्राता कनीयान् सुग्रीवो वालिनः पापचेतसः ।
तेन निष्कासितो भार्या हृता तस्येह वालिना ॥ २२ ॥

तद्भयादृष्यमूकाख्यं गिरिमाश्रित्य संस्थितः ।
अहं सुग्रीवसचिवो वायुपुत्रो महामते ॥ २३ ॥

हनूमान्नाम विख्यातो ह्यञ्जनीगर्भसम्भवः ।
तेन सख्यं त्वया युक्तं सुग्रीवेण रघूत्तम ॥ २४ ॥

भार्यापहारिणं हन्तुं सहायस्ते भविष्यति ।
इदानीमेव गच्छाम आगच्छ यदि रोचते ॥ २५ ॥

**बटू बोलला–** "महाबुद्धिमान सुग्रीव नावाचा जो वानरांचा राजा आहे, तो येथे पर्वताच्या माथ्यावर चार मंत्र्यांसह राहात आहे. (२१)

सुग्रीव हा दुष्ट मनाच्या वालीचा धाकटा भाऊ आहे. त्या वालीने सुग्रीवाला हाकलून देऊन त्याची बायको पळविली आहे. (२२)

त्या वालीच्या भीतीने सुग्रीव ऋष्यमूक नावाच्या पर्वताचा आश्रय घेऊन राहिला आहे. हे महाबुद्धिमान पुरुषा, मी सुग्रीवाचा मंत्री आहे. माझे 'हनुमान' हे नाव आहे. अंजनीपासून उत्पन्न झालेला मी वायूचा पुत्र आहे. हे रघुश्रेष्ठा, मला वाटते की त्या सुग्रीवाबरोबर मैत्री करणे हे तुमच्या दृष्टीने योग्य होईल. (२३-२४)

तुमच्या भार्येचे अपहरण करणाऱ्या राक्षसाला मारण्यास तो तुम्हाला सहायक होईल. जर तुम्हाला पसंत असेल, तर चला, आत्ताच आपण त्याच्याजवळ जाऊ या." (२५)

*श्रीराम उवाच*

अहमप्यागतस्तेन सख्यं कर्तुं कपीश्वर ।
सख्युस्तस्यापि यत्कार्यं तत्करिष्याम्यसंशयम् ॥ २६ ॥

हनूमान् स्वस्वरूपेण स्थितो राममथाब्रवीत् ।
आरोहतां मम स्कन्धौ गच्छामः पर्वतोपरि ॥ २७ ॥

यत्र तिष्ठति सुग्रीवो मन्त्रिभिर्वालिनो भयात् ।
तथेति तस्यारुरोह स्कन्धं रामोऽथ लक्ष्मणः ॥ २८ ॥

उत्पपात गिरेर्मूर्ध्नि क्षणादेव महाकपिः ।
वृक्षच्छायां समाश्रित्य स्थितौ तौ रामलक्ष्मणौ ॥ २९ ॥

हनूमानपि सुग्रीवमुपगम्य कृताञ्जलिः ।
व्येतु ते भयमायातौ राजन् श्रीरामलक्ष्मणौ ॥ ३० ॥

शीघ्रमुत्तिष्ठ रामेण सख्यं ते योजितं मया ।
अग्निं साक्षिणमारोप्य तेन सख्यं द्रुतं कुरु ॥ ३१ ॥

ततोऽतिहर्षात्सुग्रीवः समागम्य रघूत्तमम् ।
वृक्षशाखां स्वयं छित्त्वा विष्टराय ददौ मुदा ॥ ३२ ॥

**श्रीराम म्हणाले–** "हे कपिश्रेष्ठा, मीसुद्धा त्या सुग्रीवाशी मैत्री करण्यास आलो आहे. त्या मित्राचेसुद्धा जे कार्य असेल ते मी निःसंशयपणे करीन." (२६)

तेव्हा स्वतःचे मूळ रूप धारण करून हनुमान तेथे उभा राहिला. मग तो श्रीरामांना म्हणाला, "तुम्ही दोघे माझ्या खांद्यावर आरूढ व्हा. वालीच्या भीतीने, आपल्या मंत्र्यांसह सुग्रीव पर्वताच्या शिखरावर जेथे राहात आहे तेथे आपण जाऊया." "ठीक आहे" असे म्हणून श्रीराम तसेच लक्ष्मण हे त्याच्या खांद्यावर आरूढ झाले. (२७-२८)

तो महावानर उड्डाण करून एका क्षणातच पर्वताच्या माथ्यावर पोचला. तेथे एका वृक्षाच्या छायेत श्रीराम व लक्ष्मण उभे राहिले. (२९)

हनुमानसुद्धा सुग्रीवाजवळ जाऊन हात जोडून त्याला म्हणाला, "हे राजन, भिऊ नकोस . श्रीराम आणि लक्ष्मण येथे आलेले आहेत. (३०)

लौकर ऊठ. श्रीरामांशी तुझी मैत्री व्हावी, असे मी योजिले आहे. तेव्हा अग्नीला साक्षी ठेवून तू लगेच त्यांच्याशी सख्य कर." (३१)

तेव्हा अतिशय आनंदाने सुग्रीव रघूत्तमाजवळ गेला. त्याने स्वतःच एका वृक्षाची फांदी तोडली आणि ती आसन म्हणून आनंदाने श्रीरामांना दिली. (३२)

हनूमाँल्लक्ष्मणायादात्सुग्रीवाय च लक्ष्मण: ।
हर्षेण महताविष्टा: सर्व एवावतस्थिरे ॥ ३३ ॥

लक्ष्मणस्त्वब्रवीत्सर्वं रामवृत्तान्तमादित: ।
वनवासाभिगमनं सीताहरणमेव च ॥ ३४ ॥

लक्ष्मणोक्तं वच: श्रुत्वा सुग्रीवो राममब्रवीत् ।
अहं करिष्ये राजेन्द्र सीताया: परिमार्गणम् ॥ ३५ ॥

साहाय्यमपि ते राम करिष्ये शत्रुघातिन: ।
श्रृणु राम मया दृष्टं किञ्चित्ते कथयाम्यहम् ॥ ३६ ॥

एकदा मन्त्रिभि: सार्धं स्थितोऽहं गिरिमूर्धनि ।
विहायसा नीयमानां केनचित्प्रमदोत्तमाम् ॥ ३७ ॥

क्रोशन्तीं रामरामेति दृष्ट्वास्मान्पर्वतोपरि ।
आमुच्याभरणान्याशु स्वोत्तरीयेण भामिनी ॥ ३८ ॥

निरीक्ष्याध: परित्यज्य क्रोशन्ती तेन रक्षसा ।
नीताहं भूषणान्याशु गुहायामक्षिपं प्रभो ॥ ३९ ॥

इदानीमपि पश्य त्वं जानीहि तव वा न वा ।
इत्युक्त्वानीय रामाय दर्शयामास वानर: ॥ ४० ॥

विमुच्य रामस्तद्दृष्ट्वा हा सीतेति मुहुर्मुहु: ।
हृदि निक्षिप्य तत्सर्वं रुरोद प्राकृतो यथा ॥ ४१ ॥

आश्वास्य राघवं भ्राता लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् ।
अचिरेणैव ते राम प्राप्यते जानकी शुभा ।
वानरेन्द्रसहायेन हत्वा रावणमाहवे ॥ ४२ ॥

सुग्रीवोऽप्याह हे राम प्रतिज्ञां करवाणि ते ।
समरे रावणं हत्वा तव दास्यामि जानकीम् ॥ ४३ ॥

ततो हनूमान्प्रज्वाल्य तयोरग्निं समीपत: ।
तावुभौ रामसुग्रीवावग्नौ साक्षिणि तिष्ठति ॥ ४४ ॥

हनुमानाने लक्ष्मणाला वृक्षाच्या शाखेचे आसन दिले तर लक्ष्मणाने सुग्रीवाला तसेच आसन दिले. अशा प्रकारे ते सर्वच जण अतिशय आनंदाने बसले. (३३)

त्यानंतर पहिल्यापासून प्रारंभ करून, वनवासात आगमन आणि सीतेचे अपहरण इत्यादी सर्व वृत्तांत लक्ष्मणाने कथन केला. (३४)

लक्ष्मणाचे बोलणे ऐकून सुग्रीव श्रीरामांना बोलला, "हे राजेंद्रा, मी सीतेचा शोध करीन. (३५)

आणि तुम्ही शत्रूचा वध करीत असताना मी तुम्हांला साहाय्य सुद्धा करीन. हे श्रीरामा, सीतेच्या संदर्भात मी जे काही पाहिले आहे, ते तुम्हांला सांगतो. ते तुम्ही ऐका. (३६)

एकदा मी मंत्र्यांसह पर्वतशिखरावर बसलो होतो. त्या वेळी कोणी तरी राक्षस आकाश मार्गाने एका श्रेष्ठ स्त्रीला पळवून नेत असताना आम्ही पाहिले. ती 'राम, राम' असा आक्रोश करीत होती. पर्वतावर बसलेल्या आम्हांला पाहून त्या सुंदर स्त्रीने चट्‌दिशी आपल्या अंगावरील अलंकार उतरवून ते आपल्या उत्तरीय वस्त्रात बांधले आणि आमच्याकडे पाहात खाली सोडले. हे प्रभो, ती स्त्री आक्रोश करीत असताना त्या राक्षसाने तिला पळवून नेले. ते अलंकार मी त्वरेने उचलले आणि एका गुहेत ठेवून दिले. (३७-३९)

आता तुम्ही ते बघा. आणि ते तुमचे आहेत की नाहीत हे पाहून घ्या." असे सांगून सुग्रीवाने ते अलंकार तेथे आणले आणि त्याने रामांना दाखविले. (४०)

उत्तरीय वस्त्राची गाठ सोडून, ते सर्व अलंकार पाहिल्यावर रामांनी ते ओळखले आणि ते सर्व आपल्या हृदयाशी धरून, एखाद्या सामान्य माणसाप्रमाणे 'हाय सीते! हाय सीते !" असे वारंवार म्हणत, राम रडू लागले. (४१)

राघवांचे सांत्वन करीत लक्ष्मण बोलला, 'अहो रामा, वानरराज सुग्रीवाच्या सहाय्याने युद्धात रावणाला ठार मारल्यावर, तुम्हांला लौकरच शुभ- लक्षणी सीता प्राप्त होईल."' (४२)

सुग्रीवसुद्धा म्हणाला, "हे रामा, मी तुमच्यापुढे प्रतिज्ञा करतो. युद्धामध्ये रावणाला ठार करून मी तुम्हांला जानकी मिळवून देईन." (४३)

त्यानंतर त्या दोघांच्याजवळ हनुमानाने अग्नी पेटविला. तेव्हा अग्नी हा साक्षी म्हणून असताना, त्या दोघा पुण्यशील राम आणि सुग्रीव यांनी आपापले बाहू पसरून

बाहू प्रसार्य चालिङ्ग्य परस्परमकल्मषौ ।
समीपे रघुनाथस्य सुग्रीवः समुपाविशत् ॥ ४५ ॥

स्वोदन्तं कथयामास प्रणयाद्रघुनायके ।
सखे शृणु ममोदन्तं वालिना यत्कृतं पुरा ॥ ४६ ॥

मयपुत्रोऽथ मायावी नाम्ना परमदुर्मदः ।
किष्किन्धां समुपागत्य वालिनं समुपाह्वयत् ॥ ४७ ॥

सिंहनादेन महता वाली तु तदमर्षणः ।
निर्ययौ क्रोधताम्राक्षो जघान दृढमुष्टिना ॥ ४८ ॥

दुद्राव तेन संविग्नो जगाम स्वगुहां प्रति ।
अनुदुद्राव तं वाली मायाविनमहं तथा ॥ ४९ ॥

ततः प्रविष्टमालोक्य गुहां मायाविनं रुषा ।
वाली मामाह तिष्ठ त्वं बहिर्गच्छाम्यहं गुहाम् ।
इत्युक्त्वाविश्य स गुहां मासमेकं न निर्ययौ ॥ ५० ॥

मासादूर्ध्वं गुहाद्वारान्निर्गतं रुधिरं बहु ।
तद्दृष्ट्वा परितप्ताङ्गो मृतो वालीति दुःखितः ॥ ५१ ॥

गुहाद्वारि शिलामेकां निधाय गृहमागतः ।
ततोऽब्रवं मृतो वाली गुहायां रक्षसा हतः ॥ ५२ ॥

तच्छ्रुत्वा दुःखिताः सर्वे मामनिच्छन्तमप्युत ।
राज्येऽभिषेचनं चक्रुः सर्वे वानरमन्त्रिणः ॥ ५३ ॥

शिष्टं तदा मया राज्यं किञ्चित्कालमरिन्दम ।
ततः समागतो वाली मामाह परुषं रुषा ॥ ५४ ॥

बहुधा भर्त्सयित्वा मां निजघान च मुष्टिभिः ।
ततो निर्गत्य नगरादधावं परया भिया ॥ ५५ ॥

लोकान् सर्वान्परिक्रम्य ऋष्यमूकं समाश्रितः ।
ऋषेः शापभयात्सोऽपि नायातीमं गिरिं प्रभो ॥५६ ॥

एकमेकांना आलिंगन दिले. तदनंतर सुग्रीव रघुनाथांच्या जवळ बसला. (४४-४५)

आणि प्रेमाने तो रघुनायकांना स्वतःची हकीगत सांगू लागला. “ मित्रा, माझ्या बाबतीत वालीने पूर्वी जे काही केले तो सर्व वृत्तांत तुम्ही आता ऐका. (४६)

एकदा अतिशय मदोन्मत्त, मायावी नावाचा मयाचा पुत्र किष्किंधा नगरीत आला आणि त्याने फार मोठा सिंहनाद करून वालीला युद्धासाठी आव्हान दिले. ते वालीला सहन झाले नाही. त्याचे डोळे रागाने लाल झाले. तो घरातून बाहेर आला आणि त्याने त्या मायावीला बळकट मुठीने तडाखा दिला. (४७-४८)

त्यामुळे व्याकूळ झालेला मायावी आपल्या गुहेकडे पळून गेला. तेव्हा वालीने आणि मीसुद्धा त्या मायावीचा पाठलाग केला. (४९)

नंतर तो मायावी गुहेत शिरला आहे हे पाहून रागावलेला वाली मला म्हणाला, “तू बाहेरच थांब. मी आत गुहेत जातो.” असे सांगून तो गुहेत शिरला. पण एक महिना झाला तरी तो बाहेर आला नाही. (५०)

एक महिना झाल्यावर, गुहेच्या दारातून पुष्कळ रक्त बाहेर आले. ते पाहून, “वाली मेला” असे वाटून मी दुःखी झालो आणि दुःखाने माझे अंग तप्त झाले. (५१)

(तेव्हा मायावीने गुहेबाहेर येऊन मलाही मारू नये या हेतूने) मी गुहेच्या तोंडाशी एक शिळा ठेवली आणि मी घरी परत आलो आणि सर्वांना सांगितले की गुहेमध्ये राक्षसाकडून वाली मारला गेला आहे.” (५२)

ते ऐकून सर्व जण दुःखी झाले आणि मग माझी इच्छा नसतानासुद्धा सर्व वानरमंत्र्यांनी मला राज्यपदावर अभिषेक केला. (५३)

त्यानंतर हे शत्रुदमना रामा, काही काळ मी राज्यशासन केले. तितक्यात वाली परत आला आणि रागाने मला कठोर शब्द बोलू लागला. (५४)

नाना प्रकारे माझी निर्भर्त्सना करून वाली मला मुठींनी मारू लागला. तेव्हा अतिशय घाबरून नगरातून बाहेर पडून मी धावत सुटलो. (५५)

हे प्रभो, आसरा मिळविण्यासाठी मी सर्व लोकांतून हिंडलो आणि शेवटी या ऋष्यमूक पर्वताचा आश्रय घेतला. ऋषीचा शाप होईल या भीतीने वालीसुद्धा या पर्वताकडे येत नाही. (५६)

तदादि मम भार्यां स स्वयं भुङ्क्ते विमूढधीः ।
अतो दुःखेन सन्तप्तो हृतदारो हताश्रयः ॥ ५७॥

वसाम्यद्य भवत्पादसंस्पर्शात्सुखितोऽस्म्यहम् ।
मित्रदुःखेन सन्तप्तो रामो राजीवलोचनः ॥ ५८॥

हनिष्यामि तव द्वेष्यं शीघ्रं भार्यापहारिणम् ।
इति प्रतिज्ञामकरोत्सुग्रीवस्य पुरस्तदा ॥ ५९॥

सुग्रीवोऽप्याह राजेन्द्र वाली बलवतां बली ।
कथं हनिष्यति भवान्देवैरपि दुरासदम् ॥ ६०॥

शृणु ते कथयिष्यामि तद्बलं बलिनां वर ।
कदाचिद्दुन्दुभिर्नाम महाकायो महाबलः ॥ ६१॥

किष्किन्धामगमद्राम महामहिषरूपधृक् ।
युद्धाय वालिनं रात्रौ समाह्वयत भीषणः ॥ ६२॥

तच्छ्रुत्वासहमानोऽसौ वाली परमकोपनः ।
महिषं शृङ्गयोर्धृत्वा पातयामास भूतले ॥ ६३॥

पादेनैकेन तत्कायमाक्रम्यास्य शिरो महत् ।
हस्ताभ्यां भ्रामयंश्छित्वा तोलयित्वाक्षिपद्भुवि ॥ ६४॥

पपात तच्छिरो राम मातङ्गाश्रमसन्निधौ ।
योजनात्पतितं तस्मान्मुनेराश्रममण्डले ॥ ६५॥

रक्तवृष्टिः पपातोच्चैर्दृष्ट्वा तां क्रोधमूर्च्छितः ।
मातङ्गो वालिनं प्राह यद्यागन्तासि मे गिरिम् ॥ ६६॥

इतः परं भग्नशिरा मरिष्यसि न संशयः ।
एवं शप्तस्तदारभ्य ऋष्यमूकं न यात्यसौ ॥ ६७॥

एतज्ज्ञात्वाहमप्यत्र वसामि भयवर्जितः ।
राम पश्य शिरस्तस्य दुन्दुभेः पर्वतोपमम् ॥ ६८॥

तेव्हापासून दुष्ट बुद्धीचा वाली माझ्या पत्नीबरोबर राहात आहे आणि माझी पत्नी आणि आसरा मी गमावून बसलो आहे. त्यामुळे मी दुःखाने कुढत येथे राहात आहे. पण आज मात्र तुमच्या पायांच्या स्पर्शाने मी सुखी झालो आहे.” तेव्हा मित्राच्या दुःखाने दुःखी झालेल्या कमलनयन रामांनी सुग्रीवासमोर प्रतिज्ञा केली की, “तुझ्या पत्नीचे अपहरण करणाऱ्या तुझ्या शत्रूला मी लौकरच ठार करीन.” (५७-५९)

तेव्हा सुग्रीवसुद्धा म्हणाला, “अहो राजेंद्र, वाली हा बलवानांमध्येही श्रेष्ठ असा बलवान योद्धा आहे. देवांनासुद्धा जिंकण्यास कठीण असणाऱ्या त्या वालीला तुम्ही कसे बरे ठार करू शकाल ? (६०)

हे बलवानांतील पुरुषश्रेष्ठा, त्या वालीचे सामर्थ्य मी तुम्हांला सांगतो. ऐका. हे रामा, दुंदुभी नावाचा, प्रचंड शरीराचा व अतिशय सामर्थ्य संपन्न असा एक राक्षस प्रचंड रेड्याचे रूप धारण करून किष्किंधा नगरीत आला आणि त्या भयंकर राक्षसाने रात्रीच्या वेळी वालीला युद्धासाठी आव्हान दिले. (६१-६२)

ते ऐकल्यावर आव्हान सहन न झालेला वाली अतिशय रागावला. त्याने त्या रेड्याची शिंगे धरून त्याला जमिनीवर आपटले. (६३)

नंतर आपल्या एका पायाने त्याचे शरीर दाबून धरून, त्याने त्या रेड्याचे प्रचंड मस्तक आपल्या हातांनी पिरगाळून तोडून टाकले आणि ते जमिनीवर दूर भिरकावून दिले. (६४)

हे रामा, मग ते मस्तक मातंग ऋषींच्या आश्रमाजवळ जाऊन पडले. तेथून ते पुनः उसळून वर उडाल्यामुळे त्या मुनींच्या आश्रममंडलाच्या एक योजन परिसरात त्या मस्तकातून उंचावरून रक्ताची वृष्टी झाली. ती पाहून अतिशय क्रोधाविष्ट झालेले मातंग ऋषी वालीला म्हणाले, ‘यापुढे जर तू माझ्या पर्वतावर येशील तर तुझे डोके फुटून तू मरून जाशील, यात संशय नाही.’ अशा प्रकारे शाप मिळाल्यामुळे तेव्हापासून वाली या ऋष्यमूक पर्वतावर येत नाही. (६५-६७)

हे कळल्यावर मीसुद्धा निर्भय होऊन येथेच राहात आहे. श्रीरामा, दुंदुभीचे पर्वताप्रमाणे असणारे ते मस्तक पाहा. (६८)

तत्क्षेपणे यदा शक्तः शक्तस्त्वं वालिनो वधे ।
इत्युक्त्वा दर्शयामास शिरस्तद्गिरिसन्निभम् ॥ ६९ ॥

दृष्ट्वा रामः स्मितं कृत्वा पादाङ्गुष्ठेन चाक्षिपत् ।
दशयोजनपर्यन्तं तदद्भुतमिवाभवत् ॥ ७० ॥

साधु साध्विति सम्प्राह सुग्रीवो मन्त्रिभिः सह।
पुनरप्याह सुग्रीवो रामं भक्तपरायणम् ॥ ७१ ॥

एते ताला महासाराः सप्त पश्य रघूत्तम ।
एकैकं चालयित्वासौ निष्पत्रान्कुरुतेऽञ्जसा ॥ ७२ ॥

यदि त्वमेकबाणेन विद्ध्वा छिद्रं करोषि चेत् ।
हतस्त्वया तदा वाली विश्वासो मे प्रजायते ।
तथेति धनुरादाय सायकं तत्र सन्दधे ॥ ७३ ॥

बिभेद च तदा रामः सप्त तालान्महाबलः ।
तालान्सप्त विनिर्भिद्य गिरिं भूमिं च सायकः ॥ ७४ ॥

पुनरागत्य रामस्य तूणीरे पूर्ववत्स्थितः ।
ततोऽतिहर्षात्सुग्रीवो राममाहातिविस्मितः ॥ ७५ ॥

देव त्वं जगतां नाथः परमात्मा न संशयः ।
मत्पूर्वकृतपुण्यौघैः सङ्गतोऽद्य मया सह ॥ ७६ ॥

त्वां भजन्ति महात्मानः संसारविनिवृत्तये ।
त्वां प्राप्य मोक्षसचिवं प्रार्थयेऽहं कथं भवम् ॥ ७७ ॥

दाराः पुत्रा धनं राज्यं सर्वं त्वन्मायया कृतम् ।
अतोऽहं देवदेवेश नाकाङ्क्षेऽन्यत्प्रसीद मे ॥ ७८ ॥

आनन्दानुभवं त्वाद्य प्राप्तोऽहं भाग्यगौरवात् ।
मृदर्थं यतमानेन निधानमिव सत्पते ॥ ७९ ॥

अनाद्यविद्यासंसिद्धं बन्धनं छिन्नमद्य नः ।
यज्ञदानतपःकर्मपूर्तेष्टादिभिरप्यसौ ॥ ८० ॥

ते मस्तक फेकून देण्यास जर तुम्ही समर्थ असाल तर तुम्ही वालीचा वध करू शकाल.'' असे बोलून सुग्रीवाने ते पर्वताप्रमाणे प्रचंड असणारे मस्तक रामांना दाखविले. (६९)

ते पाहून रामांनी लीलया स्मित करीत आपल्या पायाच्या अंगठ्यानेच ते मस्तक दहा योजने दूर उडविले. ते एक आश्चर्यच होते. (७०)

'छान! छान!' असे मंत्र्यासह सुग्रीव उद्गारला. भक्तांचे श्रेष्ठ आश्रय-स्थान असणाऱ्या रामांना सुग्रीव पुन्हा म्हणाला. (७१)

''हे रघुश्रेष्ठा, हे पाहा, फार बळकट असणारे हे सात ताल वृक्ष आहेत. त्यांतील एकेकाला हलवून वाली त्यांना विनासायास पर्णहीन करतो. (७२)

जर तुम्ही एका बाणाने त्यांचा वेध घेऊन त्यांना छिद्र पाडाल, तर मला विश्वास वाटेल की वाली तुमच्याकडून मारला जाईल.'' तेव्हा महासामर्थ्यसंपन्न रामांनी 'ठीक आहे' असे म्हणून, धनुष्य घेऊन त्यावर बाण चढविला आणि त्या बाणाने सातही ताल वृक्षांचा वेध घेतला. तो बाण सात ताल वृक्ष, पर्वत व पृथ्वी यांना वेधून परत रामाच्या भात्यात पूर्वीप्रमाणे येऊन बसला. तेव्हा अतिशय विस्मयचकित झालेला सुग्रीव अत्यंत आनंदाने रामांना म्हणाला. (७३-७५)

''हे देवा, तुम्ही सर्व जगाचे स्वामी परमात्मा आहात यात संशय नाही. मी पूर्वी केलेल्या पुण्याच्या संचयामुळे आज तुमच्याबरोबर माझी भेट झाली आहे. (७६)

संसार-बंधनाच्या निवृत्तीसाठी महात्मे लोक तुमचा आश्रय घेतात. मोक्षदायक तुम्ही मला प्राप्त झाल्यावर मी सांसारिक गोष्टींची कशी बरे इच्छा करू? (७७)

हे देवदेवेश्वरा, पत्नी, पुत्र, धन, राज्य हे सर्व काही तुमच्या मायेचे कार्य आहे. म्हणून मी तुमच्याशिवाय अन्य कशाचीही इच्छा करीत नाही. तुम्ही माझ्यावर प्रसन्न व्हा. (७८)

हे सज्जनांच्या स्वामी, मातीच्या प्राप्तीसाठी खणण्याचा प्रयत्न करणाऱ्याला द्रव्याचा साठा सापडावा, त्या प्रमाणे माझ्या थोर भाग्यामुळे आनंदाचा अनुभव देणारे तुम्ही मला मिळाले आहात. (७९)

अनादी अविद्येमुळे उत्पन्न झालेले आमचे संसाराचे बंधन आज तुटले आहे. हे प्रभो, यज्ञ, दान, तप, इष्टापूर्त इत्यादी कर्मांनी हा संसारसुद्धा नष्ट होत नाही तर उलट तो बळकटच होत जातो. परंतु तुमच्या पायाच्या दर्शनाने मात्र

न जीर्यते पुनर्दार्ढ्यं भजते संसृतिः प्रभो ।
त्वत्पाददर्शनात्सद्यो नाशमेति न संशयः ॥ ८१ ॥

तो ताबडतोब नाशाप्रत जातो, यात संशय नाही. (८०-८१)

क्षणार्धमपि यच्चित्तं त्वयि तिष्ठत्यचञ्चलम् ।
तस्याज्ञानमनर्थानां मूलं नश्यति तत्क्षणात् ॥ ८२ ॥

ज्याचे निश्चल झालेले चित्त अर्धा क्षणसुद्धा तुमच्या ठिकाणी स्थिर होते, त्याचे अज्ञान- जे सर्व अनर्थांचे मूळ आहे ते - त्याच क्षणी नष्ट होते. (८२)

तत्तिष्ठतु मनो राम त्वयि नान्यत्र मे सदा ॥ ८३ ॥

म्हणून हे रामा, माझे मनसुद्धा तुमच्या ठिकाणी राहू दे. ते अन्यत्र कुठेही जाऊ नये. (८३)

रामरामेति यद्वाणी मधुरं गायति क्षणम् ।
स ब्रह्महा सुरापो वा मुच्यते सर्वपातकैः ॥ ८४ ॥

ज्याची वाणी एक क्षणभर 'राम राम' असे मधुर गायन करते, तो ब्रह्मघातक असो अगर सुरा पिणारा असो, तो सर्व पातकांतून मुक्त होऊन जातो. (८४)

न काङ्क्षे विजयं राम न च दारसुखादिकम् ।
भक्तिमेव सदाकाङ्क्षे त्वयि बन्धविमोचनीम् ॥ ८५ ॥

हे रामा, आता मला वालीवर विजय मिळविण्याची इच्छा उरली नाही, तसेच पत्नीचे सुख इत्यादी सुखे मिळविण्याची इच्छाही राहिलेली नाही. संसाराच्या बंधनातून मोकळे करणारी तुमच्या ठिकाणची सततची भक्ती आता मला हवी आहे. (८५)

त्वन्मायाकृतसंसारस्त्वदंशोऽहं रघूत्तम ।
स्वपादभक्तिमादिश्य त्राहि मां भवसङ्कटात् ॥ ८६ ॥

हे रघुश्रेष्ठा, हा संसार तुमच्या मायेने निर्माण केलेला आहे. आणि मी तुमचाच अंश आहे. तुमच्या चरणांची भक्ती देऊन तुम्हीच संसाररूपी संकटातून माझे रक्षण करा. (८६)

पूर्वं मित्रार्युदासीनास्त्वन्मायावृतचेतसः ।
आसन्मेद्य भवत्पाददर्शनादेव राघव ॥ ८७ ॥

सर्वं ब्रह्मैव मे भाति क्व मित्रं क्व च मे रिपुः ।
यावत्त्वन्मायया बद्धस्तावद्गुणविशेषता ॥ ८८ ॥

तुमच्या मायेने माझे चित्त झाकलेले असल्यामुळे पूर्वी मला मित्र, शत्रू व उदासीन असे पुरुषांचे भेद वाटत होते. परंतु हे राघवा, आता मात्र तुमचे दर्शन झाल्यापासूनच 'सर्व काही ब्रह्म आहे,' असे मला वाटत आहे. आता माझा कोण मित्र आहे आणि कोण शत्रू ? जोपर्यंत एकादा माणूस तुमच्या मायेने बद्ध झालेला असतो तोपर्यंतच त्याच्यावर सत्त्व इत्यादी गुणांचा विशेष प्रभाव पडत असतो. (८७-८८)

सा यावदस्ति नानात्वं तावद्भवति नान्यथा ।
यावन्नानात्वमज्ञानात्तावत्कालकृतं भयम् ॥ ८९ ॥

जोपर्यंत ती माया असते तोपर्यंतच या जगात सर्वत्र शत्रू, मित्र, इत्यादी भेदभाव असतो, नाही तर नाही. आणि जोपर्यंत अज्ञानामुळे येणारा भेदभाव आहे, तोपर्यंत मृत्यूमुळे निर्माण होणारे भय असते. (८९)

अतोऽविद्यामुपास्ते यः सोऽन्धे तमसि मज्जति ।
मायामूलमिदं सर्वं पुत्रदारादिबन्धनम् ।
तदुत्सारय मायां त्वं दासीं तव रघूत्तम ॥ ९० ॥

म्हणून जो कोणी अज्ञानजनित पदार्थांची इच्छा करतो तो गाढ अशा अंधारात पडतो. पुत्र, पत्नी इत्यादी सर्व बंधन मायेमुळे निर्माण होते. हे रघुश्रेष्ठा, तुमची दासी असणारी ही माया माझ्यापासून दूर हाकलून द्या. (९०)

त्वत्पादपद्मार्पितचित्तवृत्ति-
स्त्वन्नामसङ्गीतकथासु वाणी ।
त्वद्भक्तसेवानिरतौ करौ मे
त्वदङ्गसङ्गं लभतां मदङ्गम् ॥ ९१ ॥

माझ्या चित्ताची वृत्ती ही तुमच्या चरण-कमळी लागलेली असो. माझी वाणी तुमच्या नामाचे संकीर्तन आणि तुमच्या कथा यांतच रमून राहू दे. माझे दोन्ही हात हे तुमच्या भक्तांची सेवा करण्यात रत होऊन जाऊ देत. आणि माझे शरीर हे तुमच्या पदस्पर्शाच्या निमित्ताने तुमच्या शरीराचा स्पर्श प्राप्त करून घेवो. (९१)

त्वन्मूर्तिभक्तान् स्वगुरुं च चक्षुः
पश्यत्वजस्रं स श्रृणोति कर्णः ।
त्वज्जन्मकर्माणि च पादयुग्मं
व्रजत्वजस्रं तव मन्दिराणि ॥ ९२ ॥

माझे डोळे हे तुमची मूर्ती, तुमचे भक्त आणि स्वतःचे गुरू यांचे दर्शन करू देत. माझे कान हे सतत तुमचा अवतार व त्यांतील तुमची लीला सतत ऐकोत आणि माझे दोन्ही पाय हे सतत तुमच्या मंदिराकडे वळोत. (९२)

अङ्गानि ते पादरजोविमिश्र-
तीर्थानि बिभ्रत्वहिशत्रुकेतो ।
शिरस्त्वदीयं भवपद्मजाद्यै-
र्जुष्टं पदं राम नमत्वजस्रम् ॥ ९३ ॥

हे गरुडध्वजा, माझे अवयव हे तुमची चरण-धूळ ज्यात मिसळली आहे अशा तीर्थजलांना धारण करोत आणि हे रामा, शंकर, ब्रह्मदेव इत्यादी देवगण ज्या तुमच्या चरणांची सतत सेवा करतात, त्या तुमच्या चरणांना माझे मस्तक सदा नमस्कार करो." (९३)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किधाकांडे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

# द्वितीय सर्ग

## वालीचा वध आणि भगवंतांबरोबर त्याचे संभाषण

*श्रीमहादेव उवाच*

इत्थं स्वात्मपरिष्वङ्गनिर्धूताशेषकल्मषम् ।
रामः सुग्रीवमालोक्य सस्मितं वाक्यमब्रवीत् ॥ १ ॥

मायां मोहकरीं तस्मिन्वितन्वन् कार्यसिद्धये ।
सखे त्वदुक्तं यत्तन्मां सत्यमेव न संशयः ॥ २ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, अशा प्रकारे आपल्या शरीराच्या आलिंगनामुळे ज्याची सर्व पातके धुवून गेली होती, अशा सुग्रीवाकडे रामांनी पाहिले. मग स्वतःचे कार्य सिद्ध करण्यासाठी, मोह निर्माण करणारी आपली माया त्या सुग्रीवावर पसरवून, राम त्याला हसत हसत बोलले, "हे मित्रा, जे काही तू म्हणालास, ते खरे आहे यात शंका नाही. (१-२)

किन्तु लोका वदिष्यन्ति मामेवं रघुनन्दनः ।
कृतवान्किं कपीन्द्राय सख्यं कृत्वाग्निसाक्षिकम् ॥ ३ ॥

इति लोकापवादो मे भविष्यति न संशयः ।
तस्मादाह्वय भद्रं ते गत्वा युद्धाय वालिनम् ॥ ४ ॥

तथापि लोक माझ्याविषयी असे म्हणतील की, अग्नीला साक्षी ठेवून रघुनंदनांनी वानरराज सुग्रीवाशी सख्य केले, पण त्याच्यासाठी त्यांनी काय केले ? असा लोकापवाद माझ्यावर येईल, यात संशय नाही. म्हणून तू जा आणि युद्धासाठी वालीला आव्हान दे. तुझे कल्याण असो. (३-४)

बाणेनैकेन तं हत्वा राज्ये त्वामभिषेचये ।
तथेति गत्वा सुग्रीवः किष्किन्धोपवनं द्रुतम् ॥ ५ ॥

कृत्वा शब्दं महानादं तमाह्वयत वालिनम् ।
तच्छ्रुत्वा भ्रातृनिनदं रोषताम्रविलोचनः ॥ ६ ॥

निर्जगाम गृहाच्छीघ्रं सुग्रीवो यत्र वानरः ।
तमापतन्तं सुग्रीवः शीघ्रं वक्षस्यताडयत् ॥ ७ ॥

एकाच बाणाने त्या वालीला ठार मारून मी तुला राज्यपदावर अभिषेक करीन." 'ठीक आहे' असे म्हणून सुग्रीव सत्वर किष्किंधा नगरीच्या उपवनात गेला आणि प्रचंड ध्वनियुक्त शब्द उच्चारून त्याने त्या वालीला आव्हान दिले. भावाचा तो आवाज ऐकून रागाने डोळे लाल झालेला वाली घरातून लगेच बाहेर पडला. आपल्यावर चालून येणाऱ्या वालीला पाहून, सुग्रीवाने एका झटक्यात त्याच्या वक्षःस्थळावर प्रहार केला. (५-७)

सुग्रीवमपि मुष्टिभ्यां जघान क्रोधमूर्च्छितः ।
वाली तमपि सुग्रीव एवं क्रुद्धौ परस्परम् ॥ ८ ॥

अयुद्ध्येतामेकरूपौ दृष्ट्वा रामोऽतिविस्मितः ।
न मुमोच तदा बाणं सुग्रीववधशङ्कया ॥ ९ ॥

ततो दुद्राव सुग्रीवो वमन् रक्तं भयाकुलः ।
वाली स्वभवनं यातः सुग्रीवो राममब्रवीत् ॥ १० ॥

किं मां घातयसे राम शत्रुणा भ्रातृरूपिणा ।
यदि मद्धनने वाञ्छा त्वमेव जहि मां विभो ॥ ११ ॥

एवं मे प्रत्ययं कृत्वा सत्यवादिन् रघूत्तम ।
उपेक्षसे किमर्थं मां शरणागतवत्सल ॥ १२ ॥

श्रुत्वा सुग्रीववचनं रामः साश्रुविलोचनः ।
आलिङ्ग्य मा स्म भैषीस्त्वं दृष्ट्वा वामेकरूपिणौ ॥ १३ ॥

मित्रघातित्वमाशङ्क्य मुक्तवान्सायकं न हि ।
इदानीमेव ते चिह्नं करिष्ये भ्रमशान्तये ॥ १४ ॥

गत्वाह्वय पुनः शत्रुं हतं द्रक्ष्यसि वालिनम् ।
रामोऽहं त्वां शपे भ्रातर्हनिष्यामि रिपुं क्षणात् ॥ १५ ॥

इत्याश्वास्य स सुग्रीवं रामो लक्ष्मणमब्रवीत् ।
सुग्रीवस्य गले पुष्पमालामामुच्य पुष्पिताम् ॥ १६ ॥

प्रेषयस्व महाभाग सुग्रीवं वालिनं प्रति ।
लक्ष्मणस्तु तदा बद्ध्वा गच्छ गच्छेति सादरम् ॥ १७ ॥

प्रेषयामास सुग्रीवं सोऽपि गत्वा तथाकरोत् ।
पुनरप्यद्भुतं शब्दं कृत्वा वालिनमाह्वयत् ॥ १८ ॥

तच्छ्रुत्वा विस्मितो वाली क्रोधेन महतावृतः ।
बद्ध्वा परिकरं सम्यग्गमनायोपचक्रमे ॥ १९ ॥

क्रोधाने बेभान झालेल्या वालीने सुग्रीवावर आपल्या दोन मुठींनी प्रहार केले. सुग्रीवानेही त्याच प्रमाणे वालीवर प्रहार केले. अशा प्रकारे ते दोघे रागावून परस्परांशी लढू लागले. ते दोघेही समान रूपांचे आहेत, हे पाहून राम हा अतिशय गोंधळून गेले. (त्या दोघांतील वाली कोण आणि सुग्रीव कोण हे त्यांना कळले नाही). त्यामुळे सुग्रीवाचा वध होईल, या भीतीने त्या वेळी रामांनी आपला बाण सोडला नाही. (८-९)

युद्धात सुग्रीव हरला. भीतीने व्याकूळ झालेला सुग्रीव रक्त ओकीत पळत सुटला. वाली आपल्या घरी परत गेला. तेव्हा सुग्रीव रामांना म्हणाला. (१०)

"हे रामा, भ्रातृरूपी शत्रूकडून तुम्ही माझा घात करवीत आहात ? माझा वध व्हावा, अशी जर तुमची इच्छा असेल, तर हे विभो, तुम्ही मला मारून टाका. (११)

हे सत्यवादी, शरणागत वत्सल रघूत्तमा, मला अशा प्रकारे खात्री देऊन आता तुम्ही माझी का बरे उपेक्षा करीत आहात ?" (१२)

सुग्रीवाचे वचन ऐकल्यावर, डोळ्यांत अश्रू आणून आणि सुग्रीवाला आलिंगन देऊन श्रीराम त्याला म्हणाले , 'मित्रा, तू अजिबात भिऊ नकोस. तुम्ही दोघे एकाच रूपाचे आहात, हे पाहून तुझा म्हणजे माझ्या मित्राचा वध होईल, या भीतीने मी बाण सोडला नाही. माझा गोंधळ दूर करण्यासाठी मी तुझ्या शरीरावर काही तरी खूण करतो. (१३-१४)

आता जाऊन तू पुन्हा शत्रूला आव्हान दे. मग वाली मेलेलाच तुला दिसेल. हे बंधू, मी राम तुला शपथ घेऊन सांगतो की, मी एका क्षणात तुझ्या शत्रूला ठार करीन." (१५)

अशा प्रकारे सुग्रीवाला आश्वासन देऊन श्रीराम लक्ष्मणाला म्हणाले, "हे महाभागा, सुग्रीवाच्या गळ्यात एक फुललेल्या फुलांची माळ घालून, त्याला वालीकडे पाठव." तेव्हा लक्ष्मणाने सुग्रीवाच्या गळ्यात माळ घातली आणि आदरपूर्वक 'जा, जा' असे म्हणून त्याने सुग्रीवाला पाठविले. सुग्रीवानेसुद्धा वालीकडे जाऊन पूर्वीप्रमाणेच विलक्षण आवाज काढून वालीला आव्हान दिले. (१६-१८)

सुग्रीवाचे ते शब्द ऐकून वाली विस्मयचकित झाला. तो अतिशय क्रुद्ध झाला. मग योग्य प्रकारे कंबर कसून तो जाण्यास तयार झाला. (१९)

गच्छन्तं वालिनं तारा गृहीत्वा निषिषेध तम् ।
न गन्तव्यं त्वयेदानीं शङ्का मेऽतीव जायते ॥ २० ॥

वाली निघालेला पाहून तारा नावाच्या त्याच्या पत्नीने त्याचा हात धरून त्याला थांबवले आणि ती त्याला म्हणाली, "स्वामी, आत्ताच आपण जाऊ नये. मला फार शंका वाटते. (२०)

इदानीमेव ते भग्नः पुनरायाति सत्वरः ।
सहायो बलवांस्तस्य कश्चिन्नूनं समागतः ॥ २१ ॥

कारण सुग्रीव पराभूत होऊन पळून गेला होता. आणि तोच पुनः लगेच परत आला आहे. मला वाटते की खरोखरच त्याला सहाय्य करणारा कोणी तरी बलवान पुरुष भेटला आहे." (२१)

वाली तामाह हे सुभ्रु शङ्का ते व्येतु तद्गता ।
प्रिये करं परित्यज्य गच्छ गच्छामि तं रिपुम् ॥ २२ ॥

हत्वा शीघ्रं समायास्ये सहायस्तस्य को भवेत् ।
सहायो यदि सुग्रीवस्ततो हत्वोभयं क्षणात् ॥ २३॥

आयास्ये मा शुचः शूरः कथं तिष्ठेद् गृहे रिपुम् ।
ज्ञात्वाप्याह्वयमानं हि हत्वायास्यामि सुन्दरि ॥ २४ ॥

वाली तिला म्हणाला, "हे सुंदरी, त्या सुग्रीवाविषयीची तुझी शंका सोडून दे. लाडके, माझा हात सोड आणि तू परत जा. आता मी त्या शत्रूकडे जातो आणि त्याला ठार करून लगेच परत येतो. त्या सुग्रीवाला सहाय्य करणारा कोण बरे असेल? कुणी सुग्रीवाचा सहायक असेल तर त्या दोघांनाही क्षणात ठार करून मी परत येईन. हे सुंदरी, तू मुळीच चिंता करू नकोस. आव्हान देणारा शत्रू आला आहे हे कळल्यावर कोणी शूर घरात कसा बरे थांबेल ? लक्षात ठेव, शत्रूला नक्कीच ठार करून मी परत येईन." (२२- २४)

*तारोवाच*

मत्तोऽन्यच्छृणु राजेन्द्र श्रुत्वा कुरु यथोचितम् ।
आह मामङ्गदः पुत्रो मृगयायां श्रुतं वचः ॥ २५ ॥

**तारा म्हणाली**—"हे राजेंद्रा, मी आणखी जे काही सांगते ते तुम्ही ऐका. मग तुम्हांला उचित वाटेल ते तुम्ही करा. मृगयेसाठी वनात गेलेल्या आपल्या अंगद नावाच्या पुत्राने जे ऐकले ते त्याने मला सांगितले आहे. (२५)

अयोध्याधिपतिः श्रीमान् रामो दाशरथिः किल ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया भार्यया सह ॥ २६ ॥

आगतो दण्डकारण्यं तत्र सीता हृता किल ।
रावणेन सह भ्रात्रा मार्गमाणोऽथ जानकीम् ॥ २७ ॥

आगतो ऋष्यमूकाद्रिं सुग्रीवेण समागतः ।
चकार तेन सुग्रीवः सख्यं चानलसाक्षिकम् ॥ २८ ॥

असे म्हणतात की अयोध्येचे अधिपती, दशरथांचे पुत्र, श्रीमान् राम लक्ष्मण या आपल्या भावासह आणि सीता या पत्नीसह दंडकारण्यात आले आहेत. तेथे रावणाने सीतेचे अपहरण केले. तेव्हा जानकीचा शोध करीत राम भावासह ऋष्यमूक पर्वतावर आले असून त्यांची सुग्रीवाशी भेट झाली आहे आणि अग्नीला साक्षी ठेवून सुग्रीवाने त्यांच्याशी सख्य केले. (२६-२८)

प्रतिज्ञां कृतवान् रामः सुग्रीवाय सलक्ष्मणः ।
वालिनं समरे हत्वा राजानं त्वां करोम्यहम् ॥ २९ ॥

लक्ष्मणासह असणाऱ्या रामांनी सुग्रीवापुढे अशी प्रतिज्ञा केली आहे की, 'युद्धात वालीला मारून हे सुग्रीवा, मी तुला राजा करीन.' (२९)

इति निश्चित्य तौ यातौ निश्चितं शृणु मद्वचः ।
इदानीमेव ते भग्नः कथं पुनरुपागतः ॥ ३० ॥

असा निश्चय करून ते दोघेही सुग्रीवाबरोबर आले आहेत, असे मला निश्चितपणे वाटते. तेव्हा माझे म्हणणे ऐका. नाही तर आत्ताच तुमच्याकडून पराभूत होऊन गेलेला तो सुग्रीव कसा बरे पुनः परत आला असता ? (३०)

अतस्त्वं सर्वथा वैरं त्यक्त्वा सुग्रीवमानय ।
यौवराज्येऽभिषिञ्चाशु रामं त्वं शरणं व्रज ॥ ३१ ॥

म्हणून सुग्रीवाबरोबरचे वैर संपूर्णपणे टाकून देऊन, तुम्ही सुग्रीवाला इकडे आणा. त्वरित त्याच्यावर यौवराज्य अभिषेक करा आणि तुम्ही रामांना शरण जा. (३१)

पाहि मामङ्गदं राज्यं कुलं च हरिपुङ्गव ।
इत्युक्त्वाश्रुमुखी तारा पादयोः प्रणिपत्य तम् ॥ ३२ ॥

हस्ताभ्यां चरणौ धृत्वा रुरोद भयविह्वला ।
तामालिङ्ग्य तदा वाली सस्नेहमिदमब्रवीत् ॥ ३३ ॥

स्त्रीस्वभावाद्बिभेषि त्वं प्रिये नास्ति भयं मम ।
रामो यदि समायातो लक्ष्मणेन समं प्रभुः ॥ ३४ ॥

तदा रामेण मे स्नेहो भविष्यति न संशयः ।
रामो नारायणः साक्षादवतीर्णोऽखिलप्रभुः ॥ ३५ ॥

भूभारहरणार्थाय श्रुतं पूर्वं मयानघे ।
स्वपक्षः परपक्षो वा नास्ति तस्य परात्मनः ॥ ३६ ॥

आनेष्यामि गृहं साध्वि नत्वा तच्चरणाम्बुजम् ।
भजतोऽनुभजत्येष भक्तिगम्यः सुरेश्वरः ॥ ३७ ॥

यदि स्वयं समायाति सुग्रीवो हन्मि तं क्षणात् ।
यदुक्तं यौवराज्याय सुग्रीवस्याभिषेचनम् ॥ ३८ ॥

कथमाहूयमानोऽहं युद्धाय रिपुणा प्रिये ।
शूरोऽहं सर्वलोकानां सम्मतः शुभलक्षणे ॥ ३९ ॥

भीतभीतमिदं वाक्यं कथं वाली वदेत्प्रिये ।
तस्माच्छोकं परित्यज्य तिष्ठ सुन्दरि वेश्मनि ॥ ४० ॥

एवमाश्वास्य तारां तां शोचन्तीमश्रुलोचनाम् ।
गतो वाली समुद्युक्तः सुग्रीवस्य वधाय सः ॥ ४१ ॥

दृष्ट्वा वालिनमायान्तं सुग्रीवो भीमविक्रमः ।
उत्पपात गले बद्धपुष्पमालो मतङ्गवत् ॥ ४२ ॥

मुष्टिभ्यां ताडयामास वालिनं सोऽपि तं तथा ।
अहन्वाली च सुग्रीवं सुग्रीवो वालिनं तथा ॥ ४३ ॥

हे वानरश्रेष्ठा, माझे, अंगदाचे, राज्याचे आणि कुळाचे रक्षण करा." असे बोलून, अश्रू ढाळत तारा त्याच्या पाया पडली आणि आपल्या दोन्ही हातांनी त्याचे पाय धरून, भयाने विव्हल होऊन ती रडू लागली. तेव्हा प्रेमाने आलिंगन देऊन वाली तिला म्हणाला. (३२-३३)

"लाडके, आपल्या स्त्री- स्वभावामुळे तू उगीचच भीत आहेस. मला कोणत्याही प्रकारे भय दिसत नाही. जर लक्ष्मणासह प्रभू राम येथे आले असतील तर श्रीरामांबरोबर माझा स्नेह होईल, यात शंका नाही. हे कल्याणी, राम हे सर्वांचे स्वामी साक्षात नारायण असून ते भूमीचा भार हरण करण्यासाठी अवतरले आहेत, असे मी पूर्वीच ऐकले आहे. त्या परमात्म्यांना स्वतःचा पक्ष आणि दुसऱ्याचा पक्ष असा भेद असणार नाही. (३४-३६)

हे साध्वी, त्यांच्या पदकमलांना वंदन करून मी त्यांना घरी आणीन. देवांचा ईश्वर असलेले श्रीराम भक्तीने प्राप्त होणारे आहेत. आणि जो त्यांचा आश्रय घेतो त्याला ते आपलेसे करतात. (३७)

या उलट जर सुग्रीव स्वतःच म्हणजे एकटाच आला असेल तर मी त्याला एका क्षणात मारून टाकीन. आता तू सुग्रीवाच्या यौवराज्याभिषेकाच्या बाबतीत जे काही म्हणालीस, त्या बाबतीत माझे म्हणणे असे आहे की, हे प्रिये, शत्रूने युद्धासाठी आव्हान दिले असताना मी तसे कसे बरे करू ? हे शुभलक्षणी, सर्व लोकांमध्ये मान्यता असणारा, शूर असणारा मी वाली घाबरून असे शब्द कसे बरे बोलणार ? म्हणून हे सुंदरी, भीती टाकून देऊन घरात स्वस्थ बैस." (३८-४०)

अशा प्रकारे शोक करणाऱ्या आणि डोळ्यांत अश्रू आलेल्या त्या तारेला आश्वासन देऊन, सुग्रीवाचा वध करण्यास उद्युक्त झालेला वाली युद्धासाठी निघाला. (४१)

वालीला येताना पाहून प्रचंड पराक्रम असणारा आणि गळ्यात पुष्पमाला बांधलेला सुग्रीव एखाद्या माजलेल्या हत्तीप्रमाणे चवताळला. (४२)

सुग्रीवाने दोन्ही मुठींनी वालीला मारले. वालीनेसुद्धा सुग्रीवाला तसेच तडाखे दिले. सुग्रीवाने वालीला बडविले तसेच वालीनेही सुग्रीवाला तडाखे दिले. (४३)

रामं विलोकयन्नेव सुग्रीवो युयुधे युधि ।
इत्येवं युद्ध्यमानौ तौ दृष्ट्वा रामः प्रतापवान् ॥ ४४ ॥

बाणमादाय तूणीरादैन्द्रे धनुषि सन्दधे ।
आकृष्य कर्णपर्यन्तमदृश्यो वक्षखण्डगः ॥ ४५ ॥

निरीक्ष्य वालिनं सम्यग् लक्ष्यं तद्धृदयं हरिः ।
उत्ससर्जाशनिसमं महावेगं महाबलः ॥ ४६ ॥

बिभेद स शरो वक्षो वालिनः कम्पयन्महीम् ।
उत्पपात महाशब्दं मुञ्चन्स निपपात ह ॥ ४७ ॥

तदा मुहूर्तं निःसंज्ञो भूत्वा चेतनमाप सः ।
ततो वाली ददर्शाग्रे रामं राजीवलोचनम् ।
धनुरालम्ब्य वामेन हस्तेनान्येन सायकम् ॥ ४८ ॥

बिभ्राणं चीरवसनं जटामुकुटधारिणम् ।
विशालवक्षसं भ्राजद्वनमालाविभूषितम् ॥ ४९ ॥

पीनचार्वायतभुजं नवदूर्वादलच्छविम् ।
सुग्रीवलक्ष्मणाभ्यां च पार्श्वयोः परिसेवितम् ॥ ५० ॥

विलोक्य शनकैः प्राह वाली रामं विगर्हयन् ।
किं मयापकृतं राम तव येन हतोऽस्म्यहम् ॥ ५१ ॥

राजधर्ममविज्ञाय गर्हितं कर्म ते कृतम् ।
वृक्षखण्डे तिरोभूत्वा त्यजता मयि सायकम् ॥ ५२ ॥

यशः किं लप्स्यसे राम चोरवत्कृतसङ्गरः ।
यदि क्षत्रियदायादो मनोर्वंशसमुद्भवः ॥ ५३ ॥

युद्धं कृत्वा समक्षं मे प्राप्स्यसे तत्फलं तदा ।
सुग्रीवेण कृतं किं ते मया वा न कृतं किमु ॥ ५४ ॥

रावणेन हता भार्या तव राम महावने ।
सुग्रीवं शरणं यातस्तदर्थमिति शुश्रुम ॥ ५५ ॥

त्या युद्धात सुग्रीव श्रीरामांकडे पाहात युद्ध करीत होता. अशा प्रकारे लढणाऱ्या त्या दोघांना पाहिल्यावर, पराक्रमी श्रीरामांनी भात्यातून एक बाण घेतला आणि आपल्या ऐंद्र धनुष्यावर चढविला. ते एका वृक्षाच्या आड वालीला न दिसेल अशा पद्धतीने उभे राहिले. त्यानंतर वालीकडे नीट पाहून, धनुष्याची दोरी कानापर्यंत खेचून, आणि त्याच्या हृदयाला अचूक लक्ष्य करून, महाबलवान श्रीरामांनी वज्राप्रमाणे कठोर आणि प्रचंड वेगवान असलेला बाण सोडला. (४४-४६)

त्या बाणाने वालीच्या हृदयाचा वेध घेतला. भयंकर आवाज करीत आणि पृथ्वीला कापवीत वाली वर उडाला आणि नंतर खाली जमिनीवर पडला. (४७)

एक मुहूर्तभर बेशुद्ध पडलेला वाली भानावर आला तेव्हा त्याला कमलनयन राम समोर दिसले. रामांनी डाव्या हातात धनुष्य पकडले होते आणि दुसऱ्या उजव्या हाताने बाण धरलेला होता; त्यांनी वल्कल-वस्त्र परिधान केले होते; जटारूपी मुकुट त्यांनी धारण केला होता; त्यांचे वक्षःस्थळ विशाल होते; मनोहर वनमालेने ते विभूषित होते; त्यांचे बाहू पुष्ट, सुंदर आणि दीर्घ होते; नवीन दूर्वादलाप्रमाणे त्यांच्या शरीराची कांती होती; त्यांच्या दोन्ही बाजूंना उभे राहून लक्ष्मण आणि सुग्रीव त्यांची सेवा करीत होते. (४८-५०)

श्रीरामांना पाहिल्यावर त्याची निंदा करीत वाली क्षीण स्वरात बोलू लागला, 'अहो रामा, मी तुमचा काय अपराध केला होता म्हणून तुम्ही मला मारले ? (५१)

झाडाच्या मागे दडून माझ्यावर बाण सोडलात. हे निंद्य कर्म तुम्ही राजधर्म न जाणल्यामुळे केले आहे. (५२)

अहो रामा, चोराप्रमाणे युद्ध करून तुम्हाला काय कीर्ती मिळणार आहे ? तुम्ही जर क्षत्रियकुळातील असाल आणि जर मनूच्या वंशात जन्माला आला असाल तर माझ्याशी समोरासमोर युद्ध करायला हवे होते. मग तुम्हाला त्याचे फळ (कीर्ती किंवा स्वर्ग प्राप्ती) मिळाले असते. सुग्रीवाने तुमचे कोणते कार्य केले आहे ? आणि मी कोणते कार्य केले नाही ? (५३-५४)

अहो रामा, घोर अरण्यात तुमची पत्नी रावणाने हरण करून नेली आणि तिच्या शोधासाठी तुम्ही सुग्रीवाला शरण गेला, असे मी ऐकले आहे. (५५)

बत राम न जानीषे मद्बलं लोकविश्रुतम् ।
रावणं सकुलं बद्ध्वा ससीतं लङ्कया सह ॥ ५६ ॥

आनयामि मुहूर्त्तार्द्धाद्यदि चेच्छामि राघव ।
धर्मिष्ठ इति लोकेऽस्मिन् कथ्यसे रघुनन्दन ॥ ५७ ॥

परंतु आश्चर्याची गोष्ट अशी की, हे रामा, विश्वामध्ये प्रसिद्ध असलेले माझे सामर्थ्य तुम्ही जाणत नाही. हे राघवा, मला वाटले तर मी अर्ध्या मुहूर्तात लंका, सीता आणि त्या रावणाचे कुळ या सर्वांसह रावणाला बांधून आणीन. शिवाय हे रघुनंदना, या लोकात असे म्हटले जाते की तुम्ही मोठे धर्मात्मा आहात. (५६-५७)

वानरं व्याधवद्धत्वा धर्मं कं लप्स्यसे वद ।
अभक्ष्यं वानरं मांसं हत्वा मां किं करिष्यसि ॥ ५८ ॥

मग मला सांगा की एखाद्या व्याधाप्रमाणे वानराला मारून कोणते पुण्य तुम्हांला मिळाले ? वानराचे मांस हे खाण्यास योग्य नाही. तेव्हा मला ठार मारून तुम्ही काय मिळविलेत ?" (५८)

इत्येवं बहु भाषन्तं वालिनं राघवोऽब्रवीत् ।
धर्मस्य गोप्ता लोकेऽस्मिंश्चरामि सशरासनः ॥ ५९ ॥

अशा प्रकारे बरेच बोलणाऱ्या वालीला राघव म्हणाले, "धर्माचा रक्षक या नात्याने धनुष्य धारण करून मी या जगात हिंडत आहे. (५९)

अधर्मकारिणं हत्वा सद्धर्मं पालयाम्यहम् ।
दुहिता भगिनी भ्रातुर्भार्या चैव तथा स्नुषा ॥ ६० ॥

समा यो रमते तासामेकामपि विमूढधीः ।
पातकी स तु विज्ञेयः स वध्यो राजभिः सदा ॥ ६१ ॥

अधर्म करणाऱ्यांना ठार करून मी चांगल्या धर्माचे पालन करतो. हे बघ, स्वतःची कन्या, बहीण, भावाची बायको तसेच सून या चारही स्त्रिया समान आहेत. बुद्धी भ्रष्ट झालेला जो मनुष्य या चौघींपैकी एकीशीही रमतो, तो पातकी आहे असे मानतात आणि म्हणून राजांनी त्याचा वध करणे योग्य आहे. (६०-६१)

त्वं तु भ्रातुः कनिष्ठस्य भार्यायां रमसे बलात् ।
अतो मया धर्मविदा हतोऽसि वनगोचर ॥ ६२ ॥

तू बळजबरीने धाकट्या भावाच्या बायकोबरोबर रमत आहेस. म्हणून हे वानरा, धर्म जाणणाऱ्या मी तुला मारले आहे. (६२)

त्वं कपित्वान्न जानीषे महान्तो विचरन्ति यत् ।
लोकं पुनानाः सञ्चारैरतस्तान्नातिभाषयेत् ॥ ६३ ॥

तू वानर असल्यामुळे तुला हे माहीत नाही की आपल्या आचरणांनी जगाला पवित्र करीत महापुरुष या जगात फिरत असतात. त्यांच्याशी मर्यादा सोडून बोलू नये." (६३)

तच्छ्रुत्वा भयसन्त्रस्तो ज्ञात्वा रामं रमापतिम् ।
वाली प्रणम्य रभसाद्रामं वचनमब्रवीत् ॥ ६४ ॥

हे रामाचे वचन ऐकल्यावर, भीतीने संत्रस्त झालेल्या वालीने जाणले की राम हे लक्ष्मीचे पती नारायण आहेत आणि लगेच त्यांना प्रणाम करून तो म्हणाला. (६४)

राम राम महाभाग जाने त्वां परमेश्वरम् ।
अजानता मया किञ्चिदुक्तं तत्क्षन्तुमर्हसि ॥ ६५ ॥

"हे रामा, हे महाभाग रामा, तुम्ही परमेश्वर आहात, हे मला आता कळले. ते न समजता मी जे काही म्हटले, त्याबद्दल तुम्ही मला क्षमा करा. (६५)

साक्षात्त्वच्छरघातेन विशेषेण तवाग्रतः ।
त्यजाम्यसून्महायोगिदुर्लभं तव दर्शनम् ॥ ६६ ॥

तुमच्या बाणाच्या प्रत्यक्ष आघाताने आणि विशेष म्हणजे तुमच्यासमोर मी प्राण सोडीत आहे. महायोगी लोकांनासुद्धा तुमचे दर्शन दुर्लभ आहे. (६६)

यन्नाम विवशो गृह्णन् म्रियमाणः परं पदम् ।
याति साक्षात्स एवाद्य मुमूर्षोर्मे पुरः स्थितः ॥ ६७ ॥

मरणाऱ्या माणसाने करसे का होईना; ज्यांचे नाव घेतले तर तो परमपदी जातो, ते तुम्ही आता मरत असलेल्या माझ्यापुढे साक्षात उभे आहात. (६७)

देव जानामि पुरुषं त्वां श्रियं जानकीं शुभाम् ।
रावणस्य वधार्थाय जातं त्वां ब्रह्मणार्थितम् ॥ ६८ ॥

हे देवा, मला आता कळले आहे की तुम्ही साक्षात् परम पुरुष नारायण आहात व शुभलक्षणी जानकी ही लक्ष्मी आहे. तसेच रावणाचा वध करण्यासाठी ब्रह्मदेवाने प्रार्थना केल्यामुळे तुम्ही अवतार घेतला आहे. (६८)

अनुजानीहि मां राम यान्तं तत्पदमुत्तमम् ।
मम तुल्यबले बाले अङ्गदे त्वं दयां कुरु ॥ ६९ ॥

हे रामा, आता मी तुमच्या त्या परमपदी जात आहे. तुम्ही मला अनुज्ञा द्या. माझ्याप्रमाणेच सामर्थ्य असणारा माझा पुत्र जो अंगद त्याचेवर तुम्ही दया करा. (६९)

विशल्यं कुरु मे राम हृदयं पाणिना स्पृशन् ।
तथेति बाणमुद्धृत्य रामः पस्पर्श पाणिना ।
त्यक्त्वा तद्वानरं देहममरेन्द्रोऽभवत्क्षणात् ॥ ७० ॥

हे रामा, तुमच्या हाताने माझ्या हृदयाला स्पर्श करून तुम्ही बाण काढून घ्या." "ठीक आहे" असे म्हणून बाण उपसून काढून श्रीरामांनी आपल्या हाताने वालीला स्पर्श केला. त्याच क्षणी तो वानर-देह टाकून देवश्रेष्ठ झाला. (७०)

वाली रघूत्तमशराभिहतो विमृष्टो
रामेण शीतलकरेण सुखाकरेण ।
सद्यो विमुच्य कपिदेहमनन्यलभ्यं
प्राप्तः पदं परमहंसगणैर्दुरापम् ॥ ७१ ॥

आपल्या सुखकारक शीतल हाताने श्रीरामांनी वालीला स्पर्श केला आणि रघूत्तमांच्या बाणाने वाली मारला गेला म्हणून तत्काळ वानर-देह टाकून तो परमपदाला गेला. ते पद परमहंस संन्याशी लोकांनासुद्धा मिळणे कठीण आहे. मग इतरांची काय कथा ? (७१)

★

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

★

# तृतीय सर्ग

## तारेचा विलाप, श्रीरामचंद्रांनी तिची समजूत काढणे आणि सुग्रीवाला राजपदाची प्राप्ती

*श्रीमहादेव उवाच*

निहते वालिनि रणे रामेण परमात्मना ।
दुद्रुवुर्वानराः सर्वे किष्किन्धां भयविह्वलाः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, परमात्म्या श्रीरामांनी युद्धात वालीला ठार मारल्यावर, सर्व वानर भयाने विव्हळ होऊन किष्किंधा नगरीत पळून गेले. (१)

तारामूचुर्महाभागे हतो वाली रणाजिरे ।
अङ्गदं परिरक्षाद्य मन्त्रिणः परिणोदय ॥ २ ॥

ते तारेला म्हणाले, "हे महाभागे, रणांगणात वाली मारला गेला आहे. आता तू अंगदाचे रक्षण कर, आणि सर्व मंत्र्यांना सावधगिरीची सूचना दे. (२)

चतुर्द्वारकपाटादीन् बद्ध्वा रक्षामहे पुरीम् ।
वानराणां तु राजानमङ्गदं कुरु भामिनि ॥ ३ ॥

हे भामिनी, आपल्या नगरीच्या चारही द्वारांची कवाडे बंद करून आम्ही नगरीचे रक्षण करू. तू अंगदाला वानरांचा राजा कर ." (३)

निहतं वालिनं श्रुत्वा तारा शोकविमूर्च्छिता ।
अताडयत्स्वपाणिभ्यां शिरो वक्षश्च भूरिशः ॥ ४ ॥

वाली मेला हे ऐकताच तारा शोकाने मूर्च्छित झाली. आणि ती आपल्या हातांनी आपले मस्तक आणि छाती वारंवार बडवून घेऊ लागली. (४)

किमङ्गदेन राज्येन नगरेण धनेन वा ।
इदानीमेव निधनं यास्यामि पतिना सह ॥ ५ ॥

ती म्हणू लागली. 'आता मला अंगद, राज्य, नगर अथवा धन यांचा काय उपयोग ? मी आता पतीचे बरोबरच सहगमन करून मरून जाते.' (५)

इत्युक्त्वा त्वरिता तत्र रुदती मुक्तमूर्धजा ।
ययौ तारातिशोकार्ता यत्र भर्तृकलेवरम् ॥ ६ ॥

असे बोलून रडणारी, केस मोकळे सोडलेली, आणि अतिशय शोकाने आर्त झालेली तारा पतीच्या शवाजवळ तत्काळ गेली. (६)

पतितं वालिनं दृष्ट्वा रक्तैः पांसुभिरावृतम् ।
रुदन्ती नाथनाथेति पतिता तस्य पादयोः ॥ ७ ॥

रक्त आणि धूळ यांनी माखलेल्या आणि मृत होऊन पडलेल्या वालीला पाहून, 'हे नाथा ! हे नाथा !' असा आक्रोश करीत ती त्याच्या पायांवर पडली . (७)

करुणं विलपन्ती सा ददर्श रघुनन्दनम् ।
राम मां जहि बाणेन येन वाली हतस्त्वया ॥ ८ ॥

करुण स्वरात विलाप करताना तिला रघुनंदन दिसले. ती म्हणाली, "हे रामा, ज्या बाणाने तुम्ही वालीला ठार केलेत त्याच बाणाने तुम्ही मलाही ठार मारून टाका.(८)

गच्छामि पतिसालोक्यं पतिर्मामभिकाङ्क्षते ।
स्वर्गेऽपि न सुखं तस्य मां विना रघुनन्दन ॥ ९ ॥

म्हणजे मी पतीच्याच लोकात जाईन. माझे पती माझी वाट पाहात असतील. हे रघुनंदना, माझ्याशिवाय त्यांना स्वर्गातसुद्धा सुख लाभणार नाही. (९)

पत्नीवियोगजं दुःखमनुभूतं त्वयानघ ।
वालिने मां प्रयच्छाशु पत्नीदानफलं भवेत् ॥ १० ॥

हे पुण्यशील रामा, पत्नीच्या वियोगाने होणारे दुःख तुम्ही अनुभवले आहेच. तुम्ही मला वालींकडे पाठवा. त्यामुळे त्यांना पुनः पत्नी प्राप्त करून दिल्याचे फळ तुम्हाला मिळेल.(१०)

सुग्रीव त्वं सुखं राज्यं दापितं वालिघातिना ।
रामेण रुमया सार्धं भुङ्क्ष्व सापत्नवर्जितम् ॥ ११ ॥

हे सुग्रीवा, वालीचा वध करणाऱ्या श्रीरामांनी तुला राज्य दिलेच आहे. तेव्हा ते शत्रुरहित राज्य तू रुमा या तुझ्या पत्नीसह सुखाने भोग." (११)

इत्येवं विलपन्तीं तां तारां रामो महामनाः ।
सान्त्वयामास दयया तत्त्वज्ञानोपदेशतः ॥ १२ ॥

अशा प्रकारे विलाप करणाऱ्या त्या तारेला महामना श्रीरामांनी दयापूर्वक तत्त्वज्ञानाचा उपदेश करून, तिचे सांत्वन केले. (१२)

किं भीरु शोचसि व्यर्थं शोकस्याविषयं पतिम् ।
पतिस्तवायं देहो वा जीवो वा वद तत्त्वतः ॥ १३ ॥

श्रीराम म्हणाले, "हे तारे, शोक करण्यास पात्र नसणाऱ्या तुझ्या पतीबद्दल तू का बरे व्यर्थ शोक करीत आहेस ? हा तुझा पती म्हणजे त्याचा देह की जीव हे तू मला तत्त्वतः सांग. (१३)

पञ्चात्मको जडो देहस्त्वङ्मांसरुधिरास्थिमान् ।
कालकर्मगुणोत्पन्नः सोऽप्यास्तेऽद्यापि ते पुरः ॥ १४ ॥

(जर हा देह तुझा पती असेल तर बघ.) पंचमहाभूतांनी बनलेला हा अचेतन देह त्वचा, मांस, रक्त व हाडे यांनी युक्त आहे. तो देह काल, कर्म, आणि गुण यांच्यामुळे उत्पन्न झालेला आहे. आणि तोच हा देह आतासुद्धा तुझ्यासमोर पडलेला आहे. (१४)

मन्यसे जीवमात्मानं जीवस्तर्हि निरामयः ।
न जायते न म्रियते न तिष्ठति न गच्छति ॥ १५ ॥

आता जर जीवात्मा म्हणजे तुझा पती असे तुला वाटत असेल, तर लक्षात घे की जीव हा निरामय (=रोगरहित, विकाररहित) आहे, तो जन्माला येत नाही, मरत नाही, उभा राहात नाही आणि कुठे जात-येत नाही. (१५)

न स्त्री पुमान्वा षण्ढो वा जीवः सर्वगतोऽव्ययः ।
एक एवाद्वितीयोऽयमाकाशवदलेपकः ।
नित्यो ज्ञानमयः शुद्धः स कथं शोकमर्हति ॥ १६ ॥

जीव हा स्त्री अथवा पुरुष किंवा नपुंसक नाही. तो सर्वव्यापक आणि अव्यय आहे. तो एकमेव, अद्वितीय असून तो आकाशाप्रमाणे लेप-रहित आहे; तो नित्य, ज्ञानस्वरूप आणि शुद्ध आहे. अशा जीवाबद्दल शोक करणे हे कसे बरे योग्य होईल ?" (१६)

*तारोवाच*

देहोऽचित्काष्ठवद्राम जीवो नित्यश्चिदात्मकः ।
सुखदुःखादिसम्बन्धः कस्य स्याद्राम मे वद ॥ १७ ॥

*श्रीराम उवाच*

अहङ्कारादिसम्बन्धो यावद्देहेन्द्रियैः सह ।
संसारस्तावदेव स्यादात्मनस्त्वविवेकिनः ॥ १८ ॥

मिथ्यारोपितसंसारो न स्वयं विनिवर्तते ।
विषयान्ध्यायमानस्य स्वप्ने मिथ्यागमो यथा ॥ १९ ॥

अनाद्यविद्यासम्बन्धात्तत्कार्याहङ्कृतेस्तथा ।
संसारोऽपार्थकोऽपि स्याद्रागद्वेषादिसङ्कुलः ॥ २० ॥

मन एव हि संसारो बन्धश्चैव मनः शुभे ।
आत्मा मनःसमानत्वमेत्य तद्गतबन्धभाक् ॥ २१ ॥

यथा विशुद्धः स्फटिकोऽलक्तकादिसमीपगः ।
तत्तद्वर्णयुगाभाति वस्तुतो नास्ति रञ्जनम् ॥ २२ ॥

बुद्धीन्द्रियादिसामीप्यादात्मनः संसृतिर्बलात् ।
आत्मा स्वलिङ्गं तु मनः परिगृह्य तदुद्भवान् ॥ २३ ॥

कामान् जुषन् गुणैर्बद्धः संसारे वर्ततेऽवशः ।
आदौ मनोगुणान् सृष्ट्वा ततः कर्माण्यनेकधा ॥ २४ ॥

शुक्ललोहितकृष्णानि गतयस्तत्समानतः ।
एवं कर्मवशाज्जीवो भ्रमत्याभूतसम्प्लवम् ॥ २५ ॥

सर्वोपसंहतौ जीवो वासनाभिः स्वकर्मभिः ।
अनाद्यविद्यावशगस्तिष्ठत्यभिनिवेशतः ॥ २६ ॥

**तारा म्हणाली–** "हे रामा, देह हा काष्ठाप्रमाणे अचेतन आहे आणि चैतन्यस्वरूप असणारा जीव हा नित्य आहे. मग हे श्रीरामा, मला सांगा की सुख-दुःख इत्यादींचा संबंध कुणाशी येतो?" (१७)

**राम म्हणाले –**"जोपर्यंत अविवेकी जीवांचा देह व इंद्रिये यांच्या ठायी मी, माझे इत्यादीं संबंध असतो तोपर्यंतच त्याला संसार असतो. (१८)

ज्या प्रमाणे विषयांचे चिंतन करणाऱ्या माणसाला स्वप्नात मिथ्या पदार्थ उत्पन्न झालेले दिसतात, त्या प्रमाणे आत्म्यावर आरोपित केलेला मिथ्या संसार ज्ञानाविना आपोआप निवृत्त होत नाही. (१९)

अनादी अविद्येशी संबंध आल्यामुळे तसेच त्या अविद्येच्या अहंकार या कार्याशी संबंध आल्यामुळे जरी हा संसार सत्य नसला तरी तो राग, द्वेष इत्यादींनी भरलेला असतो. (२०)

हे कल्याणी , मन हेच संसार आहे आणि मन हाच बंध आहे. अनात्म वस्तू असलेल्या मनाबरोबर एकाकार झाल्यामुळे (अन्योन्याध्यास) आत्मा हा मनातील सुख-दुःखांच्या बंधनात पडतो. (२१)

ज्या प्रमाणे शुद्ध स्फटिक मणी हा लाख इत्यादींच्या समीप आला असताना तो त्या रंगाचा आहे असे भासते; परंतु खरे तर त्या स्फटिकात ते रंग नसतात, त्या प्रमाणे बुद्धी आणि इंद्रिये यांच्या सान्निध्यामुळे आत्म्याला बळजबरीने संसार येतो; स्वतःला ओळखण्याची खूण असणाऱ्या मनाचा स्वीकार करून, त्या मनामुळे प्राप्त होणाऱ्या विषयांचे सेवन करीत आत्मा हा राग, द्वेष इत्यादी गुणांनी बद्ध होतो आणि मग तो असहायपणे संसारात अडकून राहातो. प्रथम मन हे राग इत्यादी गुण निर्माण करते. मग ते नाना प्रकारची कर्मे उत्पन्न करते. जीव हा मनाबरोबर त्या गुणांमध्ये संचार करतो आणि नंतर त्यांच्या संबंधांमुळे तो नाना प्रकारची कर्मे करतो. ती कर्मे शुक्ल म्हणजे जप, ध्यान इत्यादी उत्तम, लोहित म्हणजे काम्य कर्मे इत्यादी मध्यम आणि कृष्ण म्हणजे आभिचारिक कर्मे इत्यादी कनिष्ठ अशी तीन प्रकारची असतात. त्या कर्मानुसार जीवाला उत्तम, मध्यम, अधम अशा गती प्राप्त होतात. अशा प्रकारे कर्मांना वश होऊन जीव हा प्रलयकालापर्यंत जन्ममरणरूपी संसारात भ्रमण करीत राहातो. (२२-२५)

प्रलयाच्यावेळी सर्वांचा लय झाला असतानासुद्धा स्वतःमध्ये कर्ता-भोक्तारूप अभिनिवेशामुळे हा जीव आपल्या वासना आणि कर्मे यांच्यासह अनादी अविद्येच्या ताब्यात राहातो. मुक्त होत नाही. (२६)

सृष्टिकाले पुनः पूर्ववासनामानसैः सह ।
जायते पुनरप्येवं घटीयन्त्रमिवावशः ॥ २७ ॥

नंतर पुन: जेव्हा नवीन सृष्टीचा प्रारंभ होतो, तेव्हा हा जीव असहायपणे आपल्या पूर्वीच्या वासना आणि मन यांचेसह रहाटगाडग्याप्रमाणे पुनरपि जन्माला येतो. (२७)

यदा पुण्यविशेषेण लभते सङ्गतिं सताम् ।
मद्भक्तानां सुशान्तानां तदा मद्विषया मतिः ॥ २८ ॥

नंतर ज्या वेळी एखाद्या तरी विशेष पुण्याईमुळे त्याला सज्जनांची तसेच अतिशय शांत चित्त असणाऱ्या माझ्या भक्तांची संगती लाभते, तेव्हा त्याची बुद्धी माझ्या ठिकाणी जडते. (२८)

मत्कथाश्रवणे श्रद्धा दुर्लभा जायते ततः ।
ततः स्वरूपविज्ञानमनायासेन जायते ॥ २९ ॥

त्यानंतर माझ्या कथा ऐकण्याच्या बाबतीत त्याच्या ठिकाणी दुर्लभ अशी श्रद्धा उत्पन्न होते. त्यामुळे माझ्या स्वरूपाचे ज्ञान त्याच्या ठायी विनासायास निर्माण होते. (२९)

तदाचार्यप्रसादेन वाक्यार्थज्ञानतः क्षणात् ।
देहेन्द्रियमनःप्राणाहङ्कृतिभ्यः पृथक्स्थितम् ॥ ३० ॥

स्वात्मानुभवतः सत्यमानन्दात्मानमद्वयम् ।
ज्ञात्वा सद्यो भवेन्मुक्तः सत्यमेव मयोदितम् ॥ ३१ ॥

त्या वेळी गुरूंच्या कृपेने आणि 'तत्त्वमसि' इत्यादी महावाक्यांच्या अर्थाच्या ज्ञानाने, तसेच स्वतःच्या अनुभवामुळे, आपला आत्मा हा देह, इंद्रिये, मन, प्राण व अहंकार यांच्यापेक्षा संपूर्णपणे वेगळा आहे, तसेच तो आत्मा हा सत्य आणि आनंदस्वरूप तसेच अद्वितीय आहे असे जाणून, तो जीव एका क्षणात तत्काळ मुक्त होऊन जातो. हे सत्यच मी तुला सांगितले आहे. (३०-३१)

एवं मयोदितं सम्यगालोचयति योऽनिशम् ।
तस्य संसारदुःखानि न स्पृशन्ति कदाचन ॥ ३२ ॥

अशा प्रकारे मी सांगितलेल्या उपदेशांचा जो कोणी रात्रंदिवस योग्य विचार करतो, त्याला संसारातील दुःखे केव्हाही स्पर्श करीत नाहीत. (३२)

त्वमप्येतन्मया प्रोक्तमालोचय विशुद्धधीः ।
न स्पृश्यसे दुःखजालैः कर्मबन्धाद्विमोक्ष्यसे ॥ ३३ ॥

तूसुद्धा मी जे सांगितले आहे, त्याचा नीट विचार कर. मग तुझी बुद्धी शुद्ध होईल आणि तुला दुःख-समूहाचा कधीही स्पर्श होणार नाही. आणि तू कर्मांच्या बंधनातून मुक्त होऊन जाशील. (३३)

पूर्वजन्मनि ते सुभ्रु कृता मद्भक्तिरुत्तमा ।
अतस्तव विमोक्षाय रूपं मे दर्शितं शुभे ॥ ३४ ॥

हे सुंदरी, पूर्व जन्मी तू माझी उत्तम भक्ती केली होतीस. म्हणून हे शुभे, तुझ्या मोक्षासाठी मी तुला दर्शन दिले आहे . (३४)

ध्यात्वा मद्रूपमनिशमालोचय मयोदितम् ।
प्रवाहपतितं कार्यं कुर्वत्यपि न लिप्यसे ॥ ३५ ॥

माझ्या रूपाचे ध्यान करीत, तू रात्रंदिवस मी जे सांगितले आहे त्याचे मनन कर. मग जीवनाच्या प्रवाहात प्राप्त होतील ती कर्मे करूनसुद्धा तू त्या कर्मांनी लिप्त होणार नाहीस." (३५)

श्रीरामेणोदितं सर्वं श्रुत्वा तारातिविस्मिता ।
देहाभिमानजं शोकं त्यक्त्वा नत्वा रघूत्तमम् ॥ ३६ ॥

आत्मानुभवसन्तुष्टा जीवन्मुक्ता बभूव ह ।
क्षणसङ्गममात्रेण रामेण परमात्मना ॥ ३७ ॥

श्रीरामांनी सांगितलेले सर्व काही ऐकून तारा अतिशय विस्मयचकित झाली. देहावरील अभिमानामुळे उत्पन्न होणारा शोक टाकून आणि रघूत्तमांना नमस्कार करून, आत्मानुभवाने संतुष्ट झालेली तारा जीवन्मुक्त झाली. परमात्म्या श्रीरामांशी क्षणमात्र झालेल्या सत्संगामुळे अनादी अविद्येचे बंधन झुगारून देऊन, तारासुद्धा निष्पाप

अनादिबन्धं निर्धूय मुक्ता सापि विकल्मषा ।
सुग्रीवोऽपि च तच्छ्रुत्वा रामवक्त्रात्समीरितम् ॥ ३८ ॥

जहावज्ञानमखिलं स्वस्थचित्तोऽभवत्तदा ।
ततः सुग्रीवमाहेदं रामो वानरपुङ्गवम् ॥ ३९ ॥

भ्रातुर्ज्येष्ठस्य पुत्रेण यद् युक्तं साम्परायिकम् ।
कुरु सर्वं यथान्यायं संस्कारादि ममाज्ञया ॥ ४० ॥

तथेति बलिभिर्मुख्यैर्वानरैः परिणीय तम् ।
वालिनं पुष्पके क्षिप्त्वा सर्वराजोपचारकैः ॥ ४१ ॥

भेरीदुन्दुभिनिर्घोषैर्ब्राह्मणैर्मन्त्रिभिः सह ।
यूथपैर्वानरैः पौरैस्तारया चाङ्गदेन च ॥ ४२ ॥

गत्वा चकार तत्सर्वं यथाशास्त्रं प्रयत्नतः ।
स्नात्वा जगाम रामस्य समीपं मन्त्रिभिः सह ॥ ४३ ॥

नत्वा रामस्य चरणौ सुग्रीवः प्राह हृष्टधीः ।
राज्यं प्रशाधि राजेन्द्र वानराणां समृद्धिमत् ॥ ४४ ॥

दासोऽहं ते पादपद्मं सेवे लक्ष्मणवच्चिरम् ।
इत्युक्तो राघवः प्राह सुग्रीवं सस्मितं वचः ॥ ४५ ॥

त्वमेवाहं न सन्देहः शीघ्रं गच्छ ममाज्ञया ।
पुरराज्याधिपत्ये त्वं स्वात्मानमभिषेचय ॥ ४६ ॥

नगरं न प्रवेक्ष्यामि चतुर्दश समाः सखे ।
आगमिष्यति मे भ्राता लक्ष्मणः पत्तनं तव ॥ ४७ ॥

अङ्गदं यौवराज्ये त्वमभिषेचय सादरम् ।
अहं समीपे शिखरे पर्वतस्य सहानुजः ॥ ४८ ॥

वत्स्यामि वर्षदिवसांस्ततस्त्वं यत्नवान् भव ।
किञ्चित्कालं पुरे स्थित्वा सीतायाः परिमार्गणे ॥ ४९ ॥

आणि मुक्त झाली. श्रीरामांच्या मुखातून बाहेर आलेले ते वचन ऐकल्यावर संपूर्ण अज्ञान नष्ट झाल्यामुळे सुग्रीवसुद्धा स्वस्थचित्त झाला. त्यानंतर वानरश्रेष्ठ सुग्रीवाला श्रीराम म्हणाले. (३६-३९)

"हे सुग्रीवा, माझ्या आज्ञेने, ज्येष्ठ भावाच्या अंगद या पुत्राकडून, जे काही शास्त्राने सांगितले असेल ते और्ध्वदैहिक संस्कार सर्व तू विधिपूर्वक करवून घे." (४०)

'ठीक आहे' असे म्हणवून बलवान आणि मुख्य अशा वानरांना बरोबर घेऊन, राजाला उचित अशा सर्व उपचारांसह, फुलांनी बनवलेल्या पुष्पक विमानात सुग्रीवाने वालीला ठेवले. नंतर भेरी, दुंदुभी इत्यादींच्या वाद्यघोषात, ब्राह्मण व मंत्री यांचेसह तसेच वानर-सेनापती, नागरिक वानर, तारा आणि अंगद यांच्यासह जाऊन, सुग्रीवाने प्रयत्नपूर्वक ते सर्व और्ध्वदैहिक संस्कार यथाशास्त्र केले. तदनंतर स्नान करून, सर्व मंत्र्यांसह सुग्रीव पुनः श्रीरामांजवळ गेला. (४१-४३)

आनंदित मनाने सुग्रीवाने रामांच्या चरणांना वंदन करून म्हटले "हे राजेंद्रा, वानरांच्या वैभवाने संपन्न असणाऱ्या या राज्याचे प्रशासन आता तुम्ही करा. (४४)

मी तुमचा दास आहे. लक्ष्मणाप्रमाणे मीसुद्धा चिरकाळ तुमच्या पदकमळांची सेवा करीन." त्याने असे म्हटल्यावर राघव स्मित करीत सुग्रीवाला म्हणाले. (४५)

"हे सुग्रीवा, तुझ्यात व माझ्यात काही अंतर नाही. तू म्हणजेच मी आहे, यात संदेह नाही. तथापि माझ्या आज्ञेने तू सत्वर जा आणि किष्किंधा नगरीच्या राज्यपदावर स्वतःलाच अभिषेक करवून घे. (४६)

अरे मित्रा, चौदा वर्षेपर्यंत मी कोणत्याही नगरात प्रवेश करणार नाही. म्हणून माझा भाऊ लक्ष्मण तुझ्या नगरीत येईल. (४७)

तू अंगदाला आदरपूर्वक यौवराज्याभिषेक कर. मी माझ्या धाकट्या भावासह जवळच असलेल्या पर्वताच्या शिखरावर पावसाळ्याचे दिवसांत राहीन. त्यानंतर तू काही काळ तुझ्या नगरात राहून मग सीतेचा शोध करण्याचे प्रयत्न सुरू कर." (४८-४९)

साष्टाङ्गं प्रणिपत्याह सुग्रीवो रामपादयोः ।
यदाज्ञापयसे देव तत्तथैव करोम्यहम् ॥ ५० ॥

मग श्रीरामांच्या चरणी साष्टांग प्रणिपात करून सुग्रीव म्हणाला, "हे देवा, जशी तुमची आज्ञा आहे , तसेच मी करीन." (५०)

अनुज्ञातश्च रामेण सुग्रीवस्तु सलक्ष्मणः ।
गत्वा पुरं तथा चक्रे यथा रामेण चोदितः ॥ ५१ ॥

नंतर रामांची आज्ञा मिळालेला सुग्रीव लक्ष्मणाला बरोबर घेऊन किष्किंधा नगरीत गेला आणि श्रीरामांनी त्याला आज्ञा दिली होती, ते सर्व त्याने केले. (५१)

सुग्रीवेण यथान्यायं पूजितो लक्ष्मणस्तदा ।
आगत्य राघवं शीघ्रं प्रणिपत्योपतस्थिवान् ॥ ५२ ॥

त्यानंतर सुग्रीवाकडून यथोचित आदरपूर्वक सत्कार झाल्यावर लक्ष्मण हा त्वरित राघवांकडे परत आला आणि त्यांना प्रणाम करून त्यांच्या सेवेत उपस्थित झाला. (५२)

ततो रामो जगामाशु लक्ष्मणेन समन्वितः ।
प्रवर्षणगिरेरूर्ध्वं शिखरं भूरिविस्तरम् ॥ ५३ ॥

त्यानंतर प्रभू श्रीराम लगेच लक्ष्मणाला घेऊन प्रवर्षण नावाच्या पर्वताच्या उंच आणि अतिशय विस्तृत अशा शिखरावर गेले. (५३)

तत्रैकं गह्वरं दृष्ट्वा स्फाटिकं दीप्तिमच्छुभम् ।
वर्षवातातपसहं फलमूलसमीपगम् ।
वासाय रोचयामास तत्र रामः सलक्ष्मणः ॥ ५४ ॥

तेथे स्फटिक-मण्यांनी बनलेली, प्रकाशमान आणि स्वच्छ अशी एक गुहा त्यांनी पाहिली. पाऊस, वारा आणि ऊन यांपासून रक्षण करणारी ती गुहा होती. तिच्या जवळच फळे आणि मुळे होती. ती गुहा रामांना आवडली. आणि लक्ष्मणासह तेथे राहाण्याचे त्यांनी ठरविले. (५४).

दिव्यमूलफलपुष्पसंयुते
मौक्तिकोपमजलौघपल्वले ।
चित्रवर्णमृगपक्षिशोभिते
पर्वते रघुकुलोत्तमोऽवसत् ॥ ५५ ॥

दिव्य मुळे, फळे आणि फुले यांनी युक्त, मोत्याप्रमाणे स्वच्छ अशा पाण्याने भरलेल्या, अनेक सरोवरांनी संपन्न, चित्रविचित्र पशु- पक्ष्यांनी सुशोभित, अशा त्या पर्वतावर रघुकुलश्रेष्ठ श्रीराम राहू लागले. (५५)

★

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

★

# चतुर्थ सर्ग

## भगवान राम लक्ष्मणाला क्रियायोग वर्णन करून सांगतात

*श्रीमहादेव उवाच*

तत्र वार्षिकदिनानि राघवो
लीलया मणिगुहासु सञ्चरन् ।
पक्वमूलफलभोगतोषितो
लक्ष्मणेन सहितोऽवसत्सुखम् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, तेथे मणिमय गुहांमध्ये लीलेने फिरत, आणि पक्व मुळे आणि फळे खाऊन संतुष्ट होत, श्रीराम लक्ष्मणासह पावसाळ्याच्या दिवसांत तेथेच सुखाने राहिले. (१)

वातनुन्नजलपूरितमेघा-
नन्तरस्तनितवैद्युतगर्भान् ।
वीक्ष्य विस्मयमगाद्गजयूथा-
न्यद्वदाहितसुकाञ्चनकक्षान् ॥ २ ॥

नवघासं समास्वाद्य हृष्टपुष्टमृगद्विजाः ।
धावन्तः परितो रामं वीक्ष्य विस्फारितेक्षणाः ॥ ३ ॥

न चलन्ति सदाध्याननिष्ठा इव मुनीश्वराः ।
रामं मानुषरूपेण गिरिकाननभूमिषु ॥ ४ ॥

चरन्तं परमात्मानं ज्ञात्वा सिद्धगणा भुवि ।
मृगपक्षिगणा भूत्वा राममेवानुसेविरे ॥ ५ ॥

सौमित्रिरेकदा राममेकान्ते ध्यानतत्परम् ।
समाधिविरमे भक्त्या प्रणयाद्विनयान्वितः ॥ ६ ॥

अब्रवीद्देव ते वाक्यात्पूर्वोक्ताद्विगतो मम ।
अनाद्यविद्यासम्भूतः संशयो हृदि संस्थितः ॥ ७ ॥

इदानीं श्रोतुमिच्छामि क्रियामार्गेण राघव ।
भवदाराधनं लोके यथा कुर्वन्ति योगिनः ॥ ८ ॥

इदमेव सदा प्राहुर्योगिनो मुक्तिसाधनम् ।
नारदोऽपि तथा व्यासो ब्रह्मा कमलसम्भवः ॥ ९ ॥

ब्रह्मक्षत्रादिवर्णानामाश्रमाणां च मोक्षदम् ।
स्त्रीशूद्राणां च राजेन्द्र सुलभं मुक्तिसाधनम् ।
तव भक्ताय मे भ्रात्रे ब्रूहि लोकोपकारकम् ॥ १० ॥

*श्रीराम उवाच*

मम पूजाविधानस्य नान्तोऽस्ति रघुनन्दन ।
तथापि वक्ष्ये सङ्क्षेपाद्यथावदनुपूर्वशः ॥ ११ ॥

स्वगृह्योक्तप्रकारेण द्विजत्वं प्राप्य मानवः ।
सकाशात्सद्गुरोर्मन्त्रं लब्ध्वा मद्भक्तिसंयुतः ॥ १२ ॥

वायूने प्रेरणा दिलेले, पाण्याने भरलेले, आणि ज्यांच्या मधून विजा चमकत होत्या असे मेघ म्हणजे ज्यांच्या पाठीवर सोन्याच्या झुली घातल्या आहेत, असे हत्तीचे कळप आहेत, असे वाटत होते. ते मेघ पाहून श्रीरामांना विस्मय वाटला. (२)

नवीन गवताचा आस्वाद घेऊन, आनंदित आणि पुष्ट झालेले पशू आणि पक्षी आसपास धावत होते, त्यांनी श्रीरामांना पाहिल्यावर, त्यांचे डोळे मुग्ध होऊन, ते सदा ध्याननिष्ठ असणाऱ्या श्रेष्ठ मुनींप्रमाणे स्थिर होत, इकडे तिकडे जात नसत. या वेळी परमात्मा श्रीराम हे मनुष्यरूपाने पर्वत आणि वनभूमी यांवर फिरत आहेत, असे कळल्यावर सिद्धांचे समूह पृथ्वीवरील पशू व पक्षी यांचे समूह बनून श्रीरामांची सेवा करीत आहेत, असे वाटत होते. (३-५)

राम तेथे एकांतात ध्यानामध्ये तत्पर होत असत. एकदा त्यांची समाधी उतरल्यावर, विनयाने युक्त अशा लक्ष्मणाने भक्तिप्रेमाने श्रीरामांना म्हटले, "हे देवा, पूर्वी तुम्ही केलेल्या उपदेश-वाक्यांनी माझ्या मनात असणारा आणि अनादी अविद्येने निर्माण झालेला संशय दूर झाला आहे. (६-७)

आता हे राघवा, या जगात योगी लोक ज्या क्रियामार्गाने - पूजा पद्धतीने- तुमची आराधना करतात, तो क्रियामार्ग जाणून घेण्याची माझी इच्छा आहे. (८)

योगि-जन, देवर्षी नारद, महर्षी व्यास आणि कमळातून उत्पन्न झालेले ब्रह्मदेव हेसुद्धा हाच क्रियामार्ग (पूजा पद्धत) मुक्तीचे साधन आहे, असे म्हणत असतात. (९)

हे राजेंद्रा, ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादी वर्ण व ब्रह्मचर्य इत्यादी सर्व आश्रमांतील लोक यांना मुक्ती देणारे, तसेच स्त्री, शूद्र यांना सुलभ असणारे हे मुक्तीचे साधन आहे, तेव्हा तुमचा भक्त आणि भाऊ असणाऱ्या मला तुम्ही लोकांना उपकारक असणारे हे साधन सांगा." (१०)

**श्रीराम म्हणाले–** "हे रघुनंदन लक्ष्मणा, माझ्या पूजा विधानाला काही अंत नाही. तथापि मी ते तुला शास्त्रानुसार क्रमशः संक्षेपाने सांगतो. (११)

माणसाने स्वतःच्या वेदाच्या शाखेच्या गृह्य सूत्रात सांगितलेल्या प्रकाराने उपनयन संस्कारानंतर द्विजत्व प्राप्त करून घ्यावे व माझ्या भक्तीने युक्त होऊन, चांगल्या गुरुंजवळून मंत्र प्राप्त करून घेऊन त्या गुरुंनी दाखवून दिलेल्या विधीप्रमाणे, चांगली बुद्धी बाळगून माणसाने माझी

तेन सन्दर्शितविधिर्मामेवाराधयेत्सुधीः ।
हृदये वानले वार्चेत्प्रतिमादौ विभावसौ ॥ १३ ॥

शालग्रामशिलायां वा पूजयेन्मामतन्द्रितः ।
प्रातःस्नानं प्रकुर्वीत प्रथमं देहशुद्धये ॥ १४ ॥

वेदतन्त्रोदितैर्मन्त्रैर्मृल्लेपनविधानतः ।
सन्ध्यादि कर्म यन्नित्यं तत्कुर्याद्विधिना बुधः ॥ १५ ॥

सङ्कल्पमादौ कुर्वीत सिद्ध्यर्थं कर्मणां सुधीः ।
स्वगुरुं पूजयेद्भक्त्या मद्बुद्ध्या पूजको मम ॥ १६ ॥

शिलायां स्नपनं कुर्यात्प्रतिमासु प्रमार्जनम् ।
प्रसिद्धैर्गन्धपुष्पाद्यैर्मत्पूजा सिद्धिदायिका ॥ १७ ॥

अमायिकोऽनुवृत्त्या मां पूजयेन्नियतव्रतः ।
प्रतिमादिष्वलङ्कारः प्रियो मे कुलनन्दन ॥ १८ ॥

अग्नौ यजेत हविषा भास्करे स्थण्डिले यजेत् ।
भक्तेनोपहृतं प्रीत्यै श्रद्धया मम वार्यपि ॥ १९ ॥

किं पुनर्भक्ष्यभोज्यादि गन्धपुष्पाक्षतादिकम् ।
पूजाद्रव्याणि सर्वाणि सम्पाद्यैवं समारभेत् ॥ २० ॥

चैलाजिनकुशैः सम्यगासनं परिकल्पयेत् ।
तत्रोपविश्य देवस्य सम्मुखे शुद्धमानसः ॥ २१ ॥

ततो न्यासं प्रकुर्वीत मातृकाबहिरान्तरम् ।
केशवादि ततः कुर्यात्तत्त्वन्यासं ततः परम् ॥ २२ ॥

आराधना करावी; किंवा हृदय, अग्नी, मूर्ती इत्यादी अथवा सूर्य इत्यादी ठिकाणी माझी पूजा करावी. (१२-१३)

अथवा निरलसपणे शाळीग्राम शिळेच्या ठिकाणी माझी पूजा करावी. बुद्धिमान उपासक भक्ताने प्रथम देहाच्या शुद्धीसाठी प्रात: काली वेदात किंवा तंत्रात सांगितलेल्या मंत्रांचा उच्चार करीत, शरीरावर शास्त्रविधानाप्रमाणे माती इत्यादी लावून स्नान करावे. नंतर संध्या इत्यादी नित्य कर्मे विधिपूर्वक करावीत. (१४-१५)

कर्माची सिद्धी व्हावी म्हणून चांगली बुद्धी असणाऱ्या माझ्या पूजकाने प्रथम संकल्प करावा आणि नंतर आपला गुरू म्हणजे मी (=राम, परमेश्वर) आहे या बुद्धीने त्याने गुरूची पूजा करावी. (१६)

पूजेसाठीची माझी मूर्ती शालीग्रामाची असल्यास त्या शिलेला त्याने स्नान घालावे. आणि जर ती प्रतिमा मातीची असेल तर तिच्यावर मार्जन करावे. प्रसिद्ध असलेल्या गंध, फुले इत्यादींनी माझी पूजा करावी. ही पूजा सिद्धी प्राप्त करून देणारी आहे. (१७)

दांभिकपणा सोडून आणि गुरुंनी सांगितलेल्या व्रतांचे नियमाने पालन करीत, माणसाने विधिपूर्वक माझी पूजा व्रत म्हणून करावी. हे कुलनंदन लक्ष्मणा, माझ्या प्रतिमा इत्यादीवर अलंकार घालणे व सजविणे हे तर मला प्रिय आहे . (१८)

अग्नीची पूजा करावयाची असेल तर अग्नीमध्ये हविर्द्रव्ये अर्पण करून त्याची पूजा करावी. जर सूर्याची पूजा करावयाची असेल तर वेदीवर सूर्याची आकृती काढून त्याची पूजा करावी. माझ्या भक्ताने श्रद्धापूर्वक मला अर्पण केलेले पाणीसुद्धा माझ्या प्रसन्नतेला कारण होते. तर मग भक्ष्य, भोज्य इत्यादी पदार्थ, तसेच गंध, फुले, अक्षता इत्यादी मला अर्पण केल्यास मी संतुष्ट होतो, हे काय सांगावयास हवे ? सर्व पूजा द्रव्ये मिळवून अशा प्रकारे माझ्या पूजेचा प्रारंभ करावा. (आता प्रत्यक्ष पूजा कशी करावी ते मी तुला सांगतो ऐक) प्रथम खाली दर्भ, त्यावर मृगाजिन आणि त्यावर वस्त्र पसरून पूजकाने स्वत:साठी योग्य आसन तयार करावे. मग शुद्ध मनाने देवाकडे तोंड करून त्या आसनावर बसावे. त्यानंतर बहिर्मातृका आणि अंतर्मातृका न्यास करावा. अर्थात् अंगन्यास-करन्यासपूर्वक अंतर्बाह्य शुद्ध व पवित्र व्हावे. तसेच केशव, नारायण इत्यादी चोवीस नावांचा न्यास करावा आणि त्यानंतर पूजकाने तत्त्वन्यास करावा. (१९-२२)

मन्मूर्तिपञ्जरन्यासं मन्त्रन्यासं ततो न्यसेत् ।
प्रतिमादावपि तथा कुर्यान्नित्यमतन्द्रितः ॥ २३ ॥

नंतर विष्णुपंजर स्तोत्रात सांगितल्याप्रमाणे मूर्तीवर पंजरन्यास आणि मंत्रन्यास करावा. याचप्रमाणे माझ्या प्रतिमा इत्यादींवरसुद्धा तशा प्रकारचा न्यास पूजकाने निरलसपणाने करावा. (२३)

कलशं स्वपुरो वामे क्षिपेत्पुष्पादि दक्षिणे ।
अर्घ्यपाद्यप्रदानार्थं मधुपर्कार्थमेव च ॥ २४ ॥

तथैवाचमनार्थं तु न्यसेत्पात्रचतुष्टयम् ।
हृत्पद्मे भानुविमले मत्कलां जीवसंज्ञिताम् ॥ २५ ॥

ध्यायेत्स्वदेहमखिलं तया व्याप्तमरिन्दम ।
तामेवावाहयेन्नित्यं प्रतिमादिषु मत्कलाम् ॥ २६ ॥

आपल्या स्वत:च्यापुढे डाव्या बाजूला पाण्याचा कलश आणि उजव्या बाजूला फुले इत्यादी सामग्री ठेवावी. त्याचप्रमाणे अर्घ्य आणि पाद्य देण्यासाठी तसेच मधुपर्कासाठी आणि आचमनासाठी चार पात्रे ठेवावीत. त्यानंतर सूर्याप्रमाणे तेजस्वी अशा आपल्या हृदयकमळात जीव हे नाव असणाऱ्या माझ्या कलेचे ध्यान करावे आणि हे शत्रुदमना लक्ष्मणा, आपला संपूर्ण देह हा त्या कलेने व्यापलेला आहे असे समजून घ्यावे आणि प्रतिमा इत्यादींचे पूजन करताना त्या प्रतिमा इत्यादींच्या ठिकाणी त्याच माझ्या जीव- कलेचे आवाहन करावे. (२४-२६)

पाद्यार्घ्याचमनीयाद्यैः स्नानवस्त्रविभूषणैः ।
यावच्छक्योपचारैर्वा त्वर्चयेन्माममायया ॥ २७ ॥

त्यानंतर पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, वस्त्र, अलंकार यांनी किंवा जितके उपचार शक्य आहेत, तितक्यांचे द्वारा निष्कपटपणे माझे पूजन करावे. (२७)

विभवे सति कर्पूरकुङ्कुमागरुचन्दनैः ।
अर्चयेन्मन्त्रवन्नित्यं सुगन्धकुसुमैः शुभैः ॥ २८ ॥

जर पूजकाजवळ वैभव असेल तर कापूर, केशर, रक्तचंदन, चंदन तसेच उत्तम सुवासिक फुले यांनी मंत्रोच्चार करीत माझी पूजा नित्य करावी. (२८)

दशावरणपूजां वै ह्यागमोक्तां प्रकारयेत् ।
नीराजनैर्धूपदीपैर्नैवेद्यैर्बहुविस्तरैः ॥ २९ ॥

तसेच नीराजन (पंचारती) धूप, दीप आणि नाना प्रकारचे नैवेद्य यांचे द्वारा शास्त्रात सांगितल्याप्रमाणे माझी दशावरण पूजा करावी. (२९)

श्रद्धयोपहरेन्नित्यं श्रद्धाभुगहमीश्वरः ।
होमं कुर्यात्प्रयत्नेन विधिना मन्त्रकोविदः ॥ ३० ॥

(हे सर्व उपचार) नित्य मला श्रद्धेने अर्पण करावेत; कारण मी परमेश्वर श्रद्धेने दिलेल्या पदार्थांचा भोक्ता आहे. मंत्र जपणाऱ्या पूजकाने पूजेनंतर विधिपूर्वक होम करावा. (३०)

अगस्त्येनोक्तमार्गेण कुण्डेनागमवित्तमः ।
जुहुयान्मूलमन्त्रेण पुंसूक्तेनाथवा बुधः ॥ ३१ ॥

अगस्त्य ऋषींनी सांगितलेल्या पद्धतीनुसार एक कुंड तयार करवून घेऊन, त्या कुंडामध्ये गुरूने सांगितलेल्या मूल मंत्राचा किंवा पुरुषसूक्ताचा वापर करून, आगम जाणणाऱ्या बुद्धिमान पुरुषाने होम करावा. (३१)

अथवौपासनाग्नौ वा चरुणा हविषा तथा ।
तप्तजाम्बूनदप्रख्यं दिव्याभरणभूषितम् ॥ ३२ ॥

ध्यायेदनलमध्यस्थं होमकाले सदा बुधः ।
पार्षदेभ्यो बलिं दत्त्वा होमशेषं समापयेत् ॥ ३३ ॥

अथवा अग्निहोत्रासाठी सिद्ध केलेल्या अग्नीमध्ये चरू (भात) आणि अन्य हविर्द्रव्ये यांचा होम करावा. होम करण्याच्या वेळी तापलेल्या सोन्याप्रमाणे असणारी, दिव्य आभरणांनी भूषित असणारी यज्ञ-पुरुषाच्या रूपातील माझी मूर्ती अग्नीमध्ये उभी आहे असे कल्पून, शहाण्या याजकाने परमात्म्याचे ध्यान करावे. त्यानंतर माझ्या पार्षदांसाठी बली अर्पण करून, होमाचा उरलेला भाग पूर्ण करावा. (३२-३३)

ततो जपं प्रकुर्वीत ध्यायेन्मां यतवाक् स्मरन् ।
मुखवासं च ताम्बूलं दत्त्वा प्रीतिसमन्वितः ॥ ३४ ॥

मदर्थे नृत्यगीतादि स्तुतिपाठादि कारयेत् ।
प्रणमेद्दण्डवद्भूमौ हृदये मां निधाय च ॥ ३५ ॥

त्यानंतर वाचेवर नियंत्रण ठेवून, माझे स्मरण करीत ध्यान करावे आणि जप करावा. त्यानंतर मुखवासासाठी प्रेमपूर्वक तांबूल अर्पण करावा. नंतर माझ्यासाठी नृत्य, गीत इत्यादी तसेच स्तुतिपाठ इत्यादीही करवून घ्यावेत. हृदयात माझी स्थापना करून, जमिनीवर साष्टांग दंडवत घालून प्रणाम करावा. (३४-३५)

शिरस्याधाय मद्दत्तं प्रसादं भावनामयम् ।
पाणिभ्यां मत्पदे मूर्ध्नि गृहीत्वा भक्तिसंयुतः ॥ ३६ ॥

मी दिलेला भावनामय प्रसाद हा 'भगवंताचा प्रसाद' आहे अशा भावनेने तो मस्तकी धारण करावा; नंतर भक्तीने युक्त होऊन माझे पाय धरून ते आपल्या मस्तकावर पूजकाने धारण करावेत. (३६)

रक्ष मां घोरसंसारादित्युक्त्वा प्रणमेत्सुधीः ।
उद्वासयेद्यथापूर्वं प्रत्यग्ज्योतिषि संस्मरन् ॥ ३७ ॥

नंतर 'हे प्रभो, घोर संसारातून माझे रक्षण करा' असे म्हणून त्या बुद्धिमान उपासकाने मला नमस्कार करावा. शेवटी प्रतिमेत आवाहन केलेली जीवकला आता माझ्या हृदयातील तेजात पूर्वीप्रमाणे आली आहे, असे स्मरण करून विसर्जन करावे. (३७)

एवमुक्तप्रकारेण पूजयेद्विधिवद्यदि ।
इहामुत्र च संसिद्धिं प्राप्नोति मदनुग्रहात् ॥ ३८ ॥

अशा प्रकारे आत्ता मी सांगितलेल्या पद्धतीने जर कोणी विधिवत माझी पूजा करील, तर त्याला माझ्या अनुग्रहामुळे इहलोकी व परलोकी उत्तम सिद्धी प्राप्त होईल. (३८)

मद्भक्तो यदि मामेवं पूजां चैव दिने दिने ।
करोति मम सारूप्यं प्राप्नोत्येव न संशयः ॥ ३९ ॥

अशा पद्धतीने माझा भक्त जर दररोज माझी पूजा करीत राहील, तर त्याला माझे सारूप्य प्राप्त होईलच, यात संशय नाही. (३९)

इदं रहस्यं परमं च पावनं
मयैव साक्षात्कथितं सनातनम् ।
पठत्यजस्त्रं यदि वा शृणोति यः
स सर्वपूजाफलभाङ् न संशयः ॥ ४० ॥

हे अतिशय गुप्त, अतिशय पवित्र आणि पूर्वीपासून चालत आलेले सनातन असे माझ्या पूजेचे तंत्र साक्षात मीच तुला सांगितले आहे. जो कुणी हे निरंतर पठण करील अथवा ऐकेल त्याला पूजेचे संपूर्ण फळ प्राप्त होईल, यात संशय नाही." (४०)

एवं परात्मा श्रीरामः क्रियायोगमनुत्तमम् ।
पृष्टः प्राह स्वभक्ताय शेषांशाय महात्मने ॥ ४१ ॥

लक्ष्मणाने विचारल्यानंतर, स्वतःचा भक्त, शेषाचा अंश आणि महात्मा असलेल्या लक्ष्मणाला अशा प्रकारे श्रीराम परमात्म्यांनी अतिशय उत्तम क्रियायोग (पूजाविधी) सांगितला. (४१)

पुनः प्राकृतवद्रामो मायामालम्ब्य दुःखितः ।
हा सीतेति वदन्नैव निद्रां लेभे कथञ्चन ॥ ४२ ॥

त्यानंतर पुन: आपल्या मायेचा आधार घेऊन राम सामान्य माणसाप्रमाणे दुःखी दिसू लागले. 'हाय सीते' असे म्हणत राहिल्याने रात्री त्यांना झोपही येत नसे. (४२)

एतस्मिन्नन्तरे तत्र किष्किन्धायां सुबुद्धिमान् ।
हनूमान्प्राह सुग्रीवमेकान्ते कपिनायकम् ॥ ४३ ॥

दरम्यानच्या काळात तेथे किष्किंधा नगरीत अतिशय बुद्धिमान् असा हनुमान वानरराज सुग्रीवाला एकांत स्थानी म्हणाला. (४३)

शृणु राजन्प्रवक्ष्यामि तवैव हितमुत्तमम् ।
रामेण ते कृतः पूर्वमुपकारो ह्यनुत्तमः ॥ ४४ ॥

"हे राजन ऐक. मी तुझ्याच हिताची उत्तम गोष्ट सांगत आहे. या पूर्वी श्रीरामांनी तुझ्यावर फार मोठा उपकार केलेला आहे. (४४)

कृतघ्नवत्त्वया नूनं विस्मृत: प्रतिभाति मे ।
त्वत्कृते निहतो वाली वीरस्त्रैलोक्यसम्मत: ॥ ४५ ॥

राज्ये प्रतिष्ठितोऽसि त्वं तारां प्राप्तोऽसि दुर्लभाम् ।
स राम: पर्वतस्याग्रे भ्रात्रा सह वसन्सुधी: ॥ ४६ ॥

त्वदागमनमेकाग्रमीक्षते कार्यगौरवात् ।
त्वं तु वानरभावेन स्त्रीसक्तो नावबुद्ध्यसे ॥ ४७ ॥

परंतु मला वाटते की तू एखाद्या कृतघ्न माणसाप्रमाणे तो उपकार खरोखर विसरून गेला आहेस. लक्षात ठेव, तुझ्यासाठी रामांनी त्रैलोक्याला मान्य असणाऱ्या अशा वीर वालीला ठार केला व तुला राज्यपदावर प्रतिष्ठित केले. त्या श्रीरामांमुळेच तुला दुर्लभ अशी तारा प्राप्त झाली. परंतु चांगल्या बुद्धीचे राम मात्र सध्या आपल्या भावासह पर्वताच्या शिखरावर राहून, सीतेच्या शोधाच्या आपल्या महान कार्याचा विचार करीत एकाग्रपणाने तुझ्या आगमनाची वाट पाहात आहेत. परंतु तू मात्र वानर स्वभावाला अनुसरून स्त्रीलंपट होऊन सर्व काही विसरून गेला आहेस . (४५-४७)

करोमीति प्रतिज्ञाय सीताया: परिमार्गणम् ।
न करोषि कृतघ्नस्त्वं हन्यसे वालिवद्द्रुतम् ॥ ४८ ॥

'मी सीतेचा शोध करीन,' अशी प्रतिज्ञा करून तू आता तसे काहीही करीत नाहीस. तू कृतघ्न आहेस. मला वाटते वालीप्रमाणेच तूही लवकरच मारला जाशील." (४८)

हनूमद्वचनं श्रुत्वा सुग्रीवो भयविह्वल: ।
प्रत्युवाच हनूमन्तं सत्यमेव त्वयोदितम् ॥ ४९ ॥

हनूमानाचे वचन ऐकल्यावर भयाने विव्हल झालेल्या सुग्रीवाने हनुमंताला प्रत्युत्तर दिले, "तू जे म्हणालास ते खरेच आहे. (४९)

शीघ्रं कुरु ममाज्ञां त्वं वानराणां तरस्विनाम् ।
सहस्राणि दशेदानीं प्रेषयाशु दिशो दश ॥ ५० ॥

आता तू माझी आज्ञा त्वरित पाळ. अतिशय वेगवान असणारे दहा हजार वानर तू आत्ता दाही दिशांना पाठवून दे. (५०)

सप्तद्वीपगतान्सर्वान्वानरानानयन्तु ते ।
पक्षमध्ये समायान्तु सर्वे वानरपुङ्गवा: ॥ ५१ ॥

सात द्वीपांत राहाणाऱ्या सर्व वानरांना त्यांनी येथे बोलावून आणावे. पंधरा दिवसांत सर्वश्रेष्ठ वानर येथे एकत्र येवोत. (५१)

ये पक्षमतिवर्तन्ते ते वध्या मे न संशय: ।
इत्याज्ञाप्य हनूमन्तं सुग्रीवो गृहमाविशत् ॥ ५२ ॥

जे वानर पंधरा दिवसांची मुदत मोडतील त्यांना मी ठार मारीन, यात संशय नाही." हनुमंताला अशी आज्ञा करून सुग्रीव आपल्या घरात गेला. (५२)

सुग्रीवाज्ञां पुरस्कृत्य हनूमान्मन्त्रिसत्तम: ।
तत्क्षणे प्रेषयामास हरीन्दश दिश: सुधी: ॥ ५३ ॥

सुग्रीवाची आज्ञा शिरसावंद्य मानून अतिशय बुद्धिमान मंत्रिश्रेष्ठ हनुमानाने त्याच क्षणी दाही दिशांना वानरांना पाठवून दिले. (५३)

अगणितगुणसत्त्वान्वायुवेगप्रचारान्
वनचरगणमुख्यान् पर्वताकाररूपान् ।
पवनहितकुमार: प्रेषयामास दूता-
नतिरभसतरात्मा दानमानादितृप्तान् ॥ ५४ ॥

अगणित गुण आणि पराक्रम यांनी युक्त, वायूच्या गतीने हिंडू शकणारे, पर्वताप्रमाणे आकार व रूप असणारे, आणि वनात हिंडणाऱ्या वानर समूहांचे मुख्य, अशा वानरांना देणग्या व मानसन्मान देऊन संतुष्ट केले व त्यांना श्रीरामांच्या कार्यासाठी ज्याचे मन अतिशय उतावळे झाले होते, अशा वायूच्या प्रिय पुत्र हनुमानाने सर्वांना दाही दिशांना पाठवून दिले. (५४)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किन्धाकाण्डे चतुर्थ: सर्ग: ॥ ४ ॥

# पंचम सर्ग

## भगवान श्रीरामांचा शोक आणि लक्ष्मणाचे किष्किंधापुरीत गमन

*श्रीमहादेव उवाच*

रामस्तु पर्वतस्याग्रे मणिसानौ निशामुखे ।
सीताविरहजं शोकमसहन्निदमब्रवीत् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, एकदा संध्याकाळच्या वेळी प्रवर्षण पर्वताच्या माथ्यावरील रत्नशिखरावर राम बसले असताना त्यांना सीतेच्या विरहाने झालेला शोक असह्य झाला आणि ते असे म्हणू लागले. (१)

पश्य लक्ष्मण मे सीता राक्षसेन हृता बलात् ।
मृतामृता वा निश्चेतुं न जानेऽद्यापि भामिनीम् ॥ २ ॥

"लक्ष्मणा, पाहा. एका राक्षसाने बळजबरीने माझ्या सीतेला हरण करून नेले आहे. ती भामिनी जिवंत आहे की मेली हेसुद्धा मला अद्यापि काही कळलेले नाही. (२)

जीवतीति मम ब्रूयात्कश्चिद्वा प्रियकृत्स मे ।
यदि जानामि तां साध्वीं जीवन्तीं यत्र कुत्र वा ॥ ३ ॥

हठादेवाहरिष्यामि सुधामिव पयोनिधेः ।
प्रतिज्ञां शृणु मे भ्रातर्येन मे जनकात्मजा ॥ ४ ॥

नीता तं भस्मसात्कुर्यां सपुत्रबलवाहनम् ।
हे सीते चन्द्रवदने वसन्ती राक्षसालये ॥ ५ ॥

दुःखार्ता मामपश्यन्ती कथं प्राणान् धरिष्यसि ।
चन्द्रोऽपि भानुवद्भाति मम चन्द्राननां विना ॥ ६ ॥

'ती जिवंत आहे' असे जर मला कुणी तरी सांगेल तर माझ्यावर उपकार होतील. ती साध्वी कुठे तरी जिवंत आहे, असे जर मला कळले तर ज्या प्रमाणे प्रयत्नपूर्वक समुद्रातून अमृत काढले गेले, त्या प्रमाणे मी प्रयत्नपूर्वक तिला निश्चित परत आणीन. हे बंधो, माझी प्रतिज्ञा ऐक. ज्याने माझी जानकी पळवून नेली आहे, त्याचे पुत्र, सैन्य आणि वाहने यांसकट मी त्याला भस्मसात करून टाकीन. हे चंद्रवदने सीते, तुला मी दिसत नसल्यामुळे दुःखार्त झालेली तू राक्षसाच्या घरी कशी बरे जिवंत राहात असशील ? चंद्रमुखी सीतेशिवाय हा चंद्रसुद्धा मला सूर्याप्रमाणे तापदायक वाटत आहे. (३-६)

चन्द्र त्वं जानकीं स्पृष्ट्वा करैर्मां स्पृश शीतलैः ।
सुग्रीवोऽपि दयाहीनो दुःखितं मां न पश्यति ॥ ७ ॥

अरे चंद्रा, तू प्रथम तुझ्या शीतल किरणांनी जानकीला स्पर्श करून मग मला स्पर्श कर. सुग्रीवसुद्धा निर्दय झाला आहे. कारण तो मी दुःखी असतानाही माझ्याकडे पाहात नाही. (७)

राज्यं निष्कण्टकं प्राप्य स्त्रीभिः परिवृतो रहः ।
कृतघ्नो दृश्यते व्यक्तं पानासक्तोऽतिकामुकः ॥ ८ ॥

निष्कंटक राज्य प्राप्त झाल्यावर, मद्यपानात आसक्त झालेला आणि एकांतात स्त्रियांनी वेढलेला तो अतिशय कामुक वानर नक्कीच कृतघ्न झाला आहे, असे स्पष्ट दिसते. (८)

नायाति शरदं पश्यन्नपि मार्गयितुं प्रियाम् ।
पूर्वोपकारिणं दुष्टः कृतघ्नो विस्मृतो हि माम् ॥ ९ ॥

शरद ऋतू आलेला असूनसुद्धा तो माझ्या प्रियेच्या शोधासाठी येत नाही. मी पूर्वी त्याच्यावर उपकार केला आहे. परंतु तो दुष्ट कृतघ्न होऊन मला विसरून गेलेला आहे. (९)

हन्मि सुग्रीवमप्येवं सपुरं सहबान्धवम् ।
वाली यथा हतो मेऽद्य सुग्रीवोऽपि तथा भवेत् ॥ १० ॥

सुग्रीवालासुद्धा मी नगरी आणि बांधव यांच्यासह नष्ट करीन. वालीला ज्याप्रमाणे मी ठार केले त्या प्रमाणे सुग्रीवसुद्धा आता माझ्याकडून मारला जाईल." (१०)

इति रुष्टं समालोक्य राघवं लक्ष्मणोऽब्रवीत् ।
इदानीमेव गत्वाहं सुग्रीवं दुष्टमानसम् ॥ ११ ॥

मामाज्ञापय हत्वा तमायास्ये राम तेऽन्तिकम् ।
इत्युक्त्वा धनुरादाय स्वयं तूणीरमेव च ॥ १२ ॥

गन्तुमभ्युद्यतं वीक्ष्य रामो लक्ष्मणमब्रवीत् ।
न हन्तव्यस्त्वया वत्स सुग्रीवो मे प्रियः सखा ॥ १३ ॥

अशा प्रकारे राघव रागावलेले आहेत हे पाहून लक्ष्मण त्यांना म्हणाला, "दादा, तुम्ही मला आज्ञा द्या. आत्ताच जाऊन त्या दुष्ट सुग्रीवाला ठार करून मी परत येतो." असे बोलून, धनुष्य व भाता घेऊन, स्वतःच जाण्यास तयार झालेल्या लक्ष्मणाला पाहून श्रीराम म्हणाले, "वत्सा, सुग्रीव हा माझा प्रिय मित्र आहे. तू त्याला ठार करणे योग्य नव्हे. (११-१३)

किन्तु भीषय सुग्रीवं वालिवत्त्वं हनिष्यसे ।
इत्युक्त्वा शीघ्रमादाय सुग्रीवप्रतिभाषितम् ॥ १४ ॥

आगत्य पश्चाद्यत्कार्यं तत्करिष्याम्यसंशयम् ।
तथेति लक्ष्मणोऽगच्छत्त्वरितो भीमविक्रमः ।
किष्किन्धां प्रति कोपेन निर्दहन्निव वानरान् ॥ १५ ॥

तथापि 'वालीप्रमाणे तूसुद्धा मारला जाशील' असे सांगून त्या सुग्रीवाला तू भीती घाल. मग सुग्रीवाचे उत्तर घेऊन लगेच तू परत ये. त्यानंतर जे काही करावयाचे आहे, ते मी निश्चितपणे करीन." 'ठीक आहे' असे म्हणून महान पराक्रमी लक्ष्मण त्वरित किष्किंधा नगरीला गेला. त्या वेळी तो रागाने जणू सर्व वानरांना जाळून टाकील की काय असे वाटले. (१४-१५)

*श्रीमहादेव उवाच*

सर्वज्ञो नित्यलक्ष्मीको विज्ञानात्मापि राघवः ॥ १६ ॥

सीतामनुशुशोचार्त्तः प्राकृतः प्राकृतामिव ।
बुद्ध्यादिसाक्षिणस्तस्य मायाकार्यातिवर्तिनः ॥ १७ ॥

रागादिरहितस्यास्य तत्कार्यं कथमुद्भवेत् ।
ब्रह्मणोक्तमृतं कर्तुं राज्ञो दशरथस्य हि ॥ १८ ॥

तपसः फलदानाय जातो मानुषवेषधृक् ।
मायया मोहिताः सर्वे जना अज्ञानसंयुताः ॥ १९ ॥

कथमेषां भवेन्मोक्ष इति विष्णुर्विचिन्तयन् ।
कथां प्रथयितुं लोके सर्वलोकमलापहाम् ॥ २० ॥

रामायणाभिधां रामो भूत्वा मानुषचेष्टकः ।
क्रोधं मोहं च कामं च व्यवहारार्थसिद्धये ॥ २१ ॥

तत्कालोचितं गृह्णन् मोहयत्यवशाः प्रजाः ।
अनुरक्त इवाशेषगुणेषु गुणवर्जितः ॥ २२ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** वस्तुतः राघव हे सर्वज्ञ आहेत; लक्ष्मी ही नित्य त्यांच्याजवळ असते. विज्ञान हे त्यांचे स्वरूप आहे. असे असूनसुद्धा एखाद्या सामान्य स्त्रीसाठी तिच्या वियोगाने दुःखी झालेल्या एखाद्या सामान्य माणसाने शोक करावा, त्या प्रमाणे दुःखी श्रीराम सीतेसाठी शोक करीत होते. खरे म्हणजे बुद्धी इत्यादीचे साक्षी असणारे, मायेच्या कार्यांच्या पलीकडे असणारे आणि राग, द्वेष इत्यादींनी रहित अशा त्या श्रीरामांच्या ठायी राग इत्यादींपासून उद्भवणारे शोकरूपी कार्य कसे बरे उद्भवेल ? तथापि ब्रह्मदेवांचे शब्द खरे करण्यासाठी आणि दशरथाला तपस्येचे फळ देण्यासाठी श्रीरामांनी मनुष्य रूप धारण केले होते. 'सर्व लोक मायेने मोहित होऊन अज्ञानाने युक्त झाले आहेत; त्यांना कसा बरे मोक्ष मिळेल ?' असा विचार ते विष्णू करीत असताना, सर्व लोकांचे पाप हरण करणारी, रामायण नावाची आपली कथा या जगात पसरविण्यासाठी, ते रामरूप झाले आणि माणसाप्रमाणे क्रिया करीत, व्यवहारातील गोष्टी सिद्ध करण्यासाठी, त्या त्या वेळी उचित असणारे क्रोध, मोह, आणि काम हे विकार स्वीकारून ते मायासक्त जीवांना मनुष्य असल्याचे भासवीत होते. खरे म्हणजे ते जरी सर्व गुणांत आसक्त असल्याप्रमाणे दिसत असले, तरी ते सर्व गुणांनी रहित असेच आहेत. (१६-२२)

विज्ञानमूर्तिर्विज्ञानशक्तिः साक्ष्यगुणान्वितः ।
अतः कामादिभिर्नित्यमविलिप्तो यथा नभः ॥ २३ ॥

विज्ञान हे त्यांचे स्वरूप आहे. विज्ञान ही त्यांची शक्ती आहे. ते साक्षी असून गुणांनी युक्त नाहीत. म्हणून ते काम इत्यादी विकारांनी कधीही आकाशाप्रमाणे लिप्त होत नाहीत. (२३)

विन्दन्ति मुनयः केचिज्जानन्ति जनकादयः ।
तद्भक्ता निर्मलात्मानः सम्यग् जानन्ति नित्यदा ।
भक्तचित्तानुसारेण जायते भगवानजः ॥ २४ ॥

त्यांचे खरे खुरे स्वरूप काही मुनिजन जाणतात, जनक इत्यादी राजर्षी जाणतात, तसेच निर्मल अंतःकरणाचे त्यांचे भक्त नेहमी योग्यप्रकारे जाणतात. ते जन्मरहित भगवान भक्तांच्या इच्छेनुसार (अवतार रूपाने) जन्माला येतात. (२४)

लक्ष्मणोऽपि तदा गत्वा किष्किन्धानगरान्तिकम् ।
ज्याघोषमकरोत्तीव्रं भीषयन् सर्ववानरान् ॥ २५ ॥

इकडे लक्ष्मणसुद्धा त्या वेळी किष्किंधा नगरीच्या जवळ गेला. आणि सर्व वानरांचे ठायी भीती निर्माण करीत त्याने आपल्या धनुष्याच्या प्रत्यंचेचा भयंकर टणत्कार केला. (२५)

तं दृष्ट्वा प्राकृतास्तत्र वानरा वप्रमूर्धनि ।
चक्रुः किलकिलाशब्दं धृतपाषाणपादपाः ॥ २६ ॥

त्या वेळी तेथे नगराच्या तटबंदीवर असणारे सामान्य वानर लक्ष्मणाला पाहून, हातात दगड व वृक्ष घेऊन कलकलाट करू लागले. (२६)

तान्दृष्ट्वा क्रोधताम्राक्षो वानरान् लक्ष्मणस्तदा ।
निर्मूलान्कर्तुमुद्युक्तो धनुरानम्य वीर्यवान् ॥ २७ ॥

त्या वानरांना पाहून त्या वेळी लक्ष्मणाचे डोळे क्रोधाने लाल बुंद झाले. आणि तो पराक्रमी लक्ष्मण धनुष्य ताणून त्यांना समूळ नष्ट करण्यास सिद्ध झाला. (२७)

ततः शीघ्रं समाप्लुत्य ज्ञात्वा लक्ष्मणमागतम् ॥ २८ ॥

निवार्य वानरान् सर्वानङ्गदो मन्त्रिसत्तमः ।
गत्वा लक्ष्मणसामीप्यं प्रणनाम स दण्डवत् ॥ २९ ॥

लक्ष्मण आला आहे हे कळल्यावर, मंत्रिश्रेष्ठ अंगद हा झटदिशी उडी मारून तेथे आला. त्याने सर्व वानरांना रोखले आणि लक्ष्मणाचेजवळ जाऊन त्याने त्याला दंडवत प्रणाम केला. (२८-२९)

ततोऽङ्गदं परिष्वज्य लक्ष्मणः प्रियवर्धनः ।
उवाच वत्स गच्छ त्वं पितृव्याय निवेदय ॥ ३० ॥

मामागतं राघवेण चोदितं रौद्रमूर्तिना ।
तथेति त्वरितं गत्वा सुग्रीवाय न्यवेदयत् ॥ ३१ ॥

त्यानंतर लक्ष्मणाने अंगदाला प्रेमाने आलिंगन दिले आणि त्याला म्हटले, "वत्सा, तू लगेच जा आणि तुझ्या काकाला, सुग्रीवाला सांग की तुझ्यावर अतिशय क्रुद्ध झालेल्या श्रीराघवांच्या सांगण्यावरून मी लक्ष्मण येथे आलो आहे". 'ठीक आहे' असे म्हणून अंगद त्वरित परत गेला आणि त्याने सुग्रीवाला निरोप सांगितला. (३०-३१)

लक्ष्मणः क्रोधताम्राक्षः पुरद्वारि बहिः स्थितः ।
तच्छ्रुत्वातीव सन्त्रस्तः सुग्रीवो वानरेश्वरः ॥ ३२ ॥

तो म्हणाला, "क्रोधाने डोळे लाल झालेला लक्ष्मण बाहेर नगराच्या दाराशी उभा आहे." ते ऐकून वानरांचा राजा सुग्रीव अतिशय भयभीत झाला. (३२)

आहूय मन्त्रिणां श्रेष्ठं हनूमन्तमथाब्रवीत् ।
गच्छ त्वमङ्गदेनाशु लक्ष्मणं विनयान्वितः ॥ ३३ ॥

सान्त्वयन्कोपितं वीरं शनैरानय सादरम् ।
प्रेषयित्वा हनूमन्तं तारामाह कपीश्वरः ॥ ३४ ॥

मग मंत्र्यांमधील श्रेष्ठ अशा हनुमंताला बोलावून घेऊन तो त्याला म्हणाला "अंगदाबरोबर तू ताबडतोब लक्ष्मणाजवळ जा आणि विनयपूर्वक बोलून सावकाशपणे त्या रागावलेल्या वीर लक्ष्मणाला शांत कर, आणि आदरपूर्वक त्याला इकडे घेऊन ये." अशा प्रकारे हनुमंताला पाठवून देऊन वानरांचा राजा सुग्रीव तारेला म्हणाला. (३३-३४)

त्वं गच्छ सान्त्वयन्ती तं लक्ष्मणं मृदुभाषितैः ।
शान्तमन्तःपुरं नीत्वा पश्चाद्दर्शय मेऽनघे ॥ ३५ ॥

"हे तारे, तूही जा आणि तुझ्या मधुर वचनांनी लक्ष्मणाला शांत कर आणि मग तो शांत झाल्यावर त्याला अंतःपुरात आण आणि मला भेटव." (३५)

भवत्विति ततस्तारा मध्यकक्षं समाविशत् ।
हनूमानङ्गदेनैव सहितो लक्ष्मणान्तिकम् ॥ ३६ ॥

गत्वा ननाम शिरसा भक्त्या स्वागतमब्रवीत् ।
एहि वीर महाभाग भवद्गृहमशङ्कितम् ॥ ३७ ॥

प्रविश्य राजदारादीन् दृष्ट्वा सुग्रीवमेव च ।
यदाज्ञापयसे पश्चात्तत्सर्वं करवाणि भोः ॥ ३८ ॥

"ठीक आहे" असे म्हणून त्यानंतर ताराही राजवाड्याच्या मधल्या दालनात येऊन थांबली. इकडे अंगदाबरोबर हनुमान लक्ष्मणाजवळ गेला आणि मस्तक नमवून त्याने त्याला भक्तिपूर्वक प्रणाम केला. लक्ष्मणाचे स्वागत करून तो म्हणाला "हे महाभागा वीरा, निःशंकपणे ये. हे तुझेच घर आहे. आत येऊन, राजस्त्रियांना भेटून मग सुग्रीवाला भेट. अरे वीरा, तू जी आज्ञा करशील त्याप्रमाणे सर्व काही आम्ही करू." (३६-३८)

इत्युक्त्वा लक्ष्मणं भक्त्या करे गृह्य स मारुतिः ।
आनयामास नगरमध्याद्राजगृहं प्रति ॥ ३९ ॥

असे बोलून हनुमानाने भक्तीने लक्ष्मणाचा हात धरला आणि त्याला नगरातून राजवाडयाकडे आणले. (३९)

पश्यंस्तत्र महासौधान् यूथपानां समन्ततः ।
जगाम भवनं राज्ञः सुरेन्द्रभवनोपमम् ॥ ४० ॥

त्या नगरीत सगळीकडे वानर- नायकांचे भव्य प्रासाद पाहात पाहात लक्ष्मण इंद्र-भवनाप्रमाणे सुंदर असणाऱ्या त्या राजभवनात पोचला. (४०)

मध्यकक्षे गता तत्र तारा ताराधिपानना ।
सर्वाभरणसम्पन्ना मदरक्तान्तलोचना ॥ ४१ ॥

चंद्रमुखी तारा तेथे मधल्या दालनात होतीच. ती सर्व अलंकारांनी विभूषित होती आणि तिचे डोळे काहीसे आरक्त होते. (४१)

उवाच लक्ष्मणं नत्वा स्मितपूर्वाभिभाषिणी ।
एहि देवर भद्रं ते साधुस्त्वं भक्तवत्सलः ॥ ४२ ॥

लक्ष्मणाला नमस्कार करून ती गोड बोलणारी तारा स्मित करीत म्हणाली, "भाऊजी, या. तुमचे कल्याण असो. तुम्ही सज्जन आणि भक्तवत्सल आहात. (४२)

किमर्थं कोपमाकार्षीर्भक्ते भृत्ये कपीश्वरे ।
बहुकालमनाश्वासं दुःखमेवानुभूतवान् ॥ ४३ ॥

तुमचा भक्त आणि सेवक असणाऱ्या वानरराज सुग्रीवावर तुम्ही असे का बरे रागावलात ? खरे म्हणजे बराच काळ त्याला शांतता मिळालेली नव्हती. त्याने दुःखच अनुभवले होते. (४३)

इदानीं बहुदुःखौघाद्भवद्भिरभिरक्षितः ।
भवत्प्रसादात्सुग्रीवः प्राप्तसौख्यो महामतिः ॥ ४४ ॥

आता तुम्हीच त्याला मोठ्या दुःखसागरातून बाहेर काढून त्याचे रक्षण केले आहे. तुमच्याच कृपेमुळे महाबुद्धिमान सुग्रीवाला आत्ता कोठे सुख प्राप्त झालेले आहे. (४४)

कामासक्तो रघुपतेः सेवार्थं नागतो हरिः ।
आगमिष्यन्ति हरयो नानादेशगताः प्रभो ॥ ४५ ॥

सुग्रीव जातीने वानर आहे. त्यामुळे कामासक्त होऊन तो रघुपतींच्या सेवेसाठी आला नाही हे खरे. तथापि हे प्रभो, सुग्रीवाच्या आज्ञेनुसार आता नाना देशांतील वानर येथे येणार आहेत. (४५)

प्रेषिता दशसाहस्रा हरयो रघुसत्तम ।
आनेतुं वानरान् दिग्भ्यो महापर्वतसन्निभान् ॥ ४६ ॥

हे रघुश्रेष्ठा, प्रचंड पर्वताप्रमाणे असणाऱ्या वानरांना वेगवेगळ्या दिशांतून येथे आणण्यासाठी दहा हजार वानर अगोदरच पाठविले आहेत. (४६)

सुग्रीवः स्वयमागत्य सर्ववानरयूथपैः ।
वधयिष्यति दैत्यौघान् रावणं च हनिष्यति ॥ ४७ ॥

त्वयैव सहितोऽद्यैव गन्ता वानरपुङ्गवः ।
पश्यान्तर्भवनं तत्र पुत्रदारसुहृद्वृतम् ॥ ४८ ॥

दृष्ट्वा सुग्रीवमभयं दत्त्वा नय सहैव ते ।
ताराया वचनं श्रुत्वा कृशक्रोधोऽथ लक्ष्मणः ॥ ४९ ॥

जगामान्तःपुरं यत्र सुग्रीवो वानरेश्वरः ।
रुमामालिङ्ग्य सुग्रीवः पर्यङ्के पर्यवस्थितः ॥ ५० ॥

दृष्ट्वा लक्ष्मणमत्यर्थमुत्पपातातिभीतवत् ।
तं दृष्ट्वा लक्ष्मणः क्रुद्धो मदविह्वलितेक्षणम् ॥ ५१ ॥

सुग्रीवं प्राह दुर्वृत्त विस्मृतोऽसि रघूत्तमम् ।
वाली येन हतो वीरः स बाणोऽद्य प्रतीक्षते ॥ ५२ ॥

त्वमेव वालिनो मार्गं गमिष्यसि मया हतः ।
एवमत्यन्तपरुषं वदन्तं लक्ष्मणं तदा ॥ ५३ ॥

उवाच हनुमान् वीरः कथमेवं प्रभाषसे ।
त्वत्तोऽधिकतरो रामे भक्तोऽयं वानराधिपः ॥ ५४ ॥

रामकार्यार्थमनिशं जागर्ति न तु विस्मृतः ।
आगताः परितः पश्य वानराः कोटिशः प्रभो ॥ ५५ ॥

गमिष्यन्त्यचिरेणैव सीतायाः परिमार्गणम् ।
साधयिष्यति सुग्रीवो रामकार्यमशेषतः ॥ ५६ ॥

श्रुत्वा हनुमतो वाक्यं सौमित्रिर्लज्जितोऽभवत् ।
सुग्रीवोऽप्यर्घ्यपाद्याद्यैर्लक्ष्मणं समपूजयत् ॥ ५७ ॥

आलिङ्ग्य प्राह रामस्य दासोऽहं तेन रक्षितः ।
रामः स्वतेजसा लोकान् क्षणार्द्धेनैव जेष्यति ॥ ५८ ॥

सहायमात्रमेवाहं वानरैः सहितः प्रभो ।
सौमित्रिरपि सुग्रीवं प्राह किञ्चिन्मयोदितम् ॥ ५९ ॥

आणि सुग्रीव स्वतः जाऊन वानरांच्या सर्व सेनापतींच्या द्वारा दैत्यसमूहांचा नाश करील आणि रावणालाही ठार करील. (४७)

वानरश्रेष्ठ सुग्रीव आजच तुमच्याबरोबर श्रीरामांकडे येईल. तोवर तुम्ही आमचे अंतःपुर पाहा. तेथे पुत्र, पत्नी, मित्र यांनी वेढलेल्या सुग्रीवाला तुम्ही भेटा. त्याला अभय द्या आणि त्याला तुमच्याबरोबर श्रीरामांकडे घेऊन जा.'' तारेचे हे वचन ऐकल्यावर लक्ष्मणाचा क्रोध बराच कमी झाला. मग वानरांचा राजा सुग्रीव जेथे होता, त्या अंतःपुरात तो गेला. तेथे रुमेसह सुग्रीव पलंगावर विसावलेला होता. (४८-५०)

लक्ष्मणाला पाहिल्यावर अतिशय भ्याल्यासारखा सुग्रीव उडी मारून उठला. मद्याच्या धुंदीने ज्याचे डोळे गरगरत होते अशा त्या सुग्रीवाला पाहून रागावलेला लक्ष्मण म्हणाला, ''अरे दुराचाऱ्या, तू रघूत्तमांना विसरलास काय? वीर वाली ज्या बाणाने मारला गेला तो बाण आज तुझी वाट पाहात आहे. (५१-५२)

माझ्याकडून मारला जाऊन तूसुद्धा वालीच्या मार्गाने जाशील.'' अशा प्रकारे अत्यंत कठोर शब्द बोलणाऱ्या लक्ष्मणाला त्या वेळी वीर हनुमान म्हणाला, ''हे प्रभू, असे कसे बोलता ? हा वानरांचा राजा सुग्रीव खरे म्हणजे तुमच्यापेक्षा रामांचा अधिक भक्त आहे. श्रीरामांच्या कार्यासाठी हा रात्रंदिवस जागरूक असतो. तो त्यांना विसरलेला नाही. पाहा, सगळीकडून कोट्यवधी वानर येथे आलेले आहेत. (५३-५५)

आणि लौकरच ते सीतेच्या शोधासाठी जातील. सुग्रीव श्रीरामांचे कार्य पूर्णपणे पार पाडेल.'' (५६)

हनुमंताचे वाक्य ऐकून लक्ष्मण लज्जित झाला. त्यानंतर सुग्रीवानेसुद्धा अर्घ्य, पाद्य इत्यादींनी लक्ष्मणाची पूजा केली. (५७)

लक्ष्मणाला आलिंगन देऊन सुग्रीव म्हणाला, ''मी श्रीरामांचा दास आहे. त्यांनीच माझे रक्षण केले आहे. स्वतःच्या पराक्रमानेच श्रीराम सर्व लोकांना क्षणार्धातच जिंकून टाकतील. (५८)

हे प्रभो, सर्व वानरांसह मी त्यांचा केवळ नावापुरता सहायक असेन.'' तेव्हा लक्ष्मणसुद्धा सुग्रीवाला म्हणाला, ''हे महाभागा, मी जे काही तुला बोललो होतो

तत्क्षमस्व महाभाग प्रणयाद्भाषितं मया ।
गच्छामोऽद्यैव सुग्रीव रामस्तिष्ठति कानने ॥ ६० ॥

एक एवातिदुःखार्त्तो जानकीविरहात्प्रभुः ।
तथेति रथमारुह्य लक्ष्मणेन समन्वितः ॥ ६१ ॥

वानरैः सहितो राजा राममेवान्वपद्यत ॥ ६२ ॥

त्याची मला क्षमा कर. मी ते श्रीरामांच्यावरील प्रेमाने बोललो होतो. हे सुग्रीवा, आत्ताच आपण श्रीरामांकडे जाऊया. अरण्यात श्रीराम एकटेच आहेत आणि जानकीच्या विरहाने अतिशय दुःखाकुल आहेत." 'ठीक आहे' असे सुग्रीव म्हणाला. लक्ष्मणासह तो एका रथात चढला आणि इतर वानरांसह राजा सुग्रीव श्रीरामांजवळच जाण्यास निघाला. (५९-६२)

भेरीमृदङ्गैर्बहुऋक्षवानरैः
श्वेतातपत्रैर्व्यजनैश्च शोभितः ।
नीलाङ्गदाद्यैर्हनुमत्प्रधानैः
समावृतो राघवमभ्यगाद्धरिः ॥ ६३ ॥

भेरी आणि मृदुंग या वाद्यांच्या गजरात, पुष्कळ अस्वले आणि वानर, तसेच पांढरी छत्रे आणि चवऱ्या यांनी सुशोभित झालेला आणि नील, अंगद, हनुमान इत्यादी वानरप्रमुखांसमवेत सुग्रीव श्रीरामांकडे गेला. (६३)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किन्धाकाण्डे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

# षष्ठ सर्ग

## सीतेचा शोध, वानरांचा गुहेत प्रवेश आणि स्वयंप्रभेचे चरित्र

*श्रीमहादेव उवाच*

दृष्ट्वा रामं समासीनं गुहाद्वारि शिलातले ।
चैलाजिनधरं श्यामं जटामौलिविराजितम् ॥ १ ॥

विशालनयनं शान्तं स्मितचारुमुखाम्बुजम् ।
सीताविरहसन्तप्तं पश्यन्तं मृगपक्षिणः ॥ २ ॥

रथाद्दूरात्समुत्पत्य वेगात्सुग्रीवलक्ष्मणौ ।
रामस्य पादयोरग्रे पेततुर्भक्तिसंयुतौ ॥ ३ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, मृगचर्म आणि वल्कले परिधान केलेले, श्यामवर्ण, जटारूपी मुकुटाने शोभणारे, विशालनयन, शांत, स्मितयुक्त सुंदर मुख असणारे आणि पशुपक्ष्यांकडे पाहाणारे सीतेच्या विरहाने अत्यंत दुःखी झालेले श्रीराम गुहेच्या दाराशी एका शिलेवर बसलेले आहेत, हे पाहून सुग्रीव आणि लक्ष्मण दुरूनच रथातून वेगाने उडी मारून खाली उतरले आणि भक्तियुक्त अंतःकरणाने ते दोघे श्रीरामांच्या पाया पडले. (१-३)

रामः सुग्रीवमालिङ्ग्य पृष्ट्वानामयमन्तिके ।
स्थापयित्वा यथान्यायं पूजयामास धर्मवित् ॥ ४ ॥

धर्मज्ञ श्रीरामांनी सुग्रीवाला आलिंगन दिले, त्याचे कुशल विचारले आणि त्याला आपल्याजवळ बसवून घेऊन, त्याचे यथायोग्य आदरातिथ्य केले. (४)

ततोऽब्रवीद्रघुश्रेष्ठं सुग्रीवो भक्तिनम्रधीः ।
देव पश्य समायान्तीं वानराणां महाचमूम् ॥ ५ ॥

तेव्हा भक्तीने नम्र होऊन सुग्रीव रघुश्रेष्ठांना म्हणाला, "देवा, पाहा, वानरांची प्रचंड सेना येत आहे. (५)

कुलाचलाद्रिसम्भूता मेरुमन्दरसन्निभाः ।
नानाद्वीपसरिच्छैलवासिनः पर्वतोपमाः ॥ ६ ॥

असङ्ख्याताः समायान्ति हरयः कामरूपिणः ।
सर्वे देवांशसम्भूताः सर्वे युद्धविशारदाः ॥ ७ ॥

कुलाचल पर्वतावर जन्माला आलेले, देहाने मेरु किंवा मंदर पर्वताप्रमाणे असणारे, नाना बेटे, नद्या आणि पर्वत यांवर राहाणारे, पर्वताप्रमाणे प्रचंड असणारे, असे असंख्य वानर येत आहेत. ते सर्व देवांच्या अंशापासून उत्पन्न झालेले असून स्वतःच्या इच्छेप्रमाणे कोणतेही रूप धारण करू शकतात आणि ते सर्व युद्ध करण्यात तरबेज आहेत. (६-७)

अत्र केचिद्गजबलाः केचिद्दशगजोपमाः ।
गजायुतबलाः केचिदन्येऽमितबलाः प्रभो ॥ ८ ॥

हे प्रभो, या वानरांतील काही एका हत्तीचे बळ असणारे, काही दहा हत्तींचे सामर्थ्य असणारे, काही दहा हजार हत्तींचे बळ असणारे, तर इतर अपरिमित बल असणारे आहेत. (८)

केचिदञ्जनकूटाभाः केचित्कनकसन्निभाः ।
केचिद्रक्तान्तवदना दीर्घवालास्तथापरे ॥ ९ ॥

कित्येकांची कांती ही काजळाच्या पर्वताप्रमाणे आहे; काही जण सोन्याप्रमाणे पिवळे आहेत; काहींचे मुख तांबड्या रंगाचे आहे; आणि काही वानरांचे केस लांब आहेत. (९)

शुद्धस्फटिकसङ्काशाः केचिद्राक्षससन्निभाः ।
गर्जन्तः परितो यान्ति वानरा युद्धकाङ्क्षिणः ॥ १० ॥

काही वानर शुभ्र स्फटिकाप्रमाणे दिसतात, तर काही राक्षसाप्रमाणे दिसून येतात. हे सर्व वानर युद्ध करू इच्छितात. ते गर्जना करीत सर्व बाजूंनी येत आहेत. (१०)

त्वदाज्ञाकारिणः सर्वे फलमूलाशनाः प्रभो ।
ऋक्षाणामधिपो वीरो जाम्बवान्नाम बुद्धिमान् ॥ ११ ॥

हे प्रभो, हे सर्व वानर तुमची आज्ञा पालन करणारे असून ते फळे, मुळे खाऊन राहाणारे आहेत. या सर्वांच्यामध्ये अस्वलांचा राजा जांबवान नावाचा असून तो शूर आणि बुद्धिमान आहे. (११)

एष मे मन्त्रिणां श्रेष्ठः कोटिभल्लूकवृन्दपः ।
हनूमानेष विख्यातो महासत्त्वपराक्रमः ॥ १२ ॥

हा जांबवान माझ्या मंत्र्यांमध्ये श्रेष्ठ आहे. तो कोट्यवधी अस्वलांच्या समूहाचा नायक आहे. तसेच हा हनुमान महान् सामर्थ्य आणि पराक्रम असणारा म्हणून विख्यात आहे. (१२)

वायुपुत्रोऽतितेजस्वी मन्त्री बुद्धिमतां वरः ।
नलो नीलश्च गवयो गवाक्षो गन्धमादनः ॥ १३ ॥

शरभो मैन्दवश्चैव गजः पनस एव च ।
बलीमुखो दधिमुखः सुषेणस्तार एव च ॥ १४ ॥

केसरी च महासत्त्वः पिता हनुमतो बली ।
एते ते यूथपा राम प्राधान्येन मयोदिताः ॥ १५ ॥

तो वायूचा पुत्र, अतिशय तेजस्वी, माझा मंत्री आणि बुद्धिमंतामध्ये वरिष्ठ आहे. याखेरीज माझ्या वानर सैन्यात नल, नील, गवय, गवाक्ष, गंधमादन, शरभ, मैंदव, गज, पनस, बलीमुख, दधिमुख, सुषेण, तार, तसेच हनुमानाचा पिता असणारा बलवान महासामर्थ्यसंपन्न केसरी हे सर्व आहेत. हे रामा, हे माझ्या सैन्यातील समूहांचे मुख्य वानर मी तुम्हांला प्राधान्याने सांगितले आहेत. (१३-१५)

महात्मानो महावीर्याः शक्रतुल्यपराक्रमाः ।
एते प्रत्येकतः कोटिकोटिवानरयूथपाः ॥ १६ ॥

हे सर्व महात्मे, महावीर्यशाली, इंद्राप्रमाणे पराक्रम असणारे असून, त्यांतील प्रत्येक जण कोटी कोटी वानर समूहाचे नायक आहेत. (१६)

तवाज्ञाकारिणः सर्वे सर्वे देवांशसम्भवाः ।
एष वालिसुतः श्रीमानङ्गदो नाम विश्रुतः ॥ १७ ॥

हे सर्व वानर तुमची आज्ञा पाळणारे असून ते देवांच्या अंशापासून उत्पन्न झालेले आहेत. हा वालीचा अंगद नावाचा पुत्र वैभवसंपन्न आणि विख्यात आहे. (१७)

वालितुल्यबलो वीरो राक्षसानां बलान्तकः ।
एते चान्ये च बहवस्त्वदर्थे त्यक्तजीविताः ॥ १८ ॥

हा वालीप्रमाणे सामर्थ्य असणारा वीर असून तो राक्षसांच्या सैन्याचा नाश करणारा आहे. हे आणि इतर पुष्कळ वानर तुमच्यासाठी प्राण अर्पण करण्यास तयार आहेत. (१८)

योद्धारः पर्वताग्रैश्च निपुणाः शत्रुघातने ।
आज्ञापय रघुश्रेष्ठ सर्वे ते वशवर्तिनः ॥ १९ ॥

हे वानर पर्वतांची शिखरे उचलून युद्ध करतात आणि शत्रूचा वध करण्यात ते निपुण आहेत. ते सर्व तुमच्या स्वाधीन आहेत. हे रघुश्रेष्ठा, तुम्ही त्यांना आज्ञा करा." (१९)

रामः सुग्रीवमालिङ्ग्य हर्षपूर्णाश्रुलोचनः ।
प्राह सुग्रीव जानासि सर्वं त्वं कार्यगौरवम् ॥ २० ॥

तेव्हा श्रीरामांचे डोळे आनंदाने भरून आले. त्यांनी सुग्रीवाला आलिंगन देऊन म्हटले, "हे सुग्रीवा, माझ्या कार्याचे महत्त्व तुला माहीत आहेच. (२०)

मार्गणार्थं हि जानक्या नियुङ्क्ष्व यदि रोचते ।
श्रुत्वा रामस्य वचनं सुग्रीवः प्रीतमानसः ॥ २१ ॥

प्रेषयामास बलिनो वानरान् वानरर्षभः ।
दिक्षु सर्वासु विविधान्वानरान् प्रेष्य सत्वरम् ॥ २२ ॥

दक्षिणां दिशमत्यर्थं प्रयत्नेन महाबलान् ।
युवराजं जाम्बवन्तं हनूमन्तं महाबलम् ॥ २३ ॥

नलं सुषेणं शरभं मैन्दं द्विविदमेव च ।
प्रेषयामास सुग्रीवो वचनं चेदमब्रवीत् ॥ २४ ॥

तेव्हा जर तुला इष्ट वाटत असेल तर तू सीतेच्या शोधासाठी यांची योजना कर." रामांचे वचन ऐकल्यावर, मन आनंदित झालेल्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाने बलवान वानरांना सीतेच्या शोधासाठी पाठविले. सर्व दिशांना अनेक वानरांना सत्वर पाठवून, त्याने अधिक प्रयत्नपूर्वक, महाबलवान अशा युवराज अंगद, जांबवान, महाबली हनुमान, नल, सुषेण, शरभ, मैंद, द्विविद यांना दक्षिण दिशेला पाठविले. व सुग्रीव त्यांना म्हणाला, (२१-२४)

विचिन्वन्तु प्रयत्नेन भवन्तो जानकीं शुभाम् ।
मासादर्वाङ्निवर्तध्वं मच्छासनपुरःसराः ॥ २५ ॥

"माझी आज्ञा शिरोधार्थ मानून तुम्ही प्रयत्नपूर्वक शुभलक्षणी जानकीचा शोध घ्या आणि एक महिन्याच्या आत परत या. (२५)

सीतामदृष्ट्वा यदि वो मासादूर्ध्वं दिनं भवेत् ।
तदा प्राणान्तिकं दण्डं मत्तः प्राप्स्यथ वानराः ॥ २६ ॥

सीतेचा शोध लावण्यास जर एक महिन्यापेक्षा एक दिवस जरी जास्त लागला, तर हे वानरांनो, तुम्हांला माझ्याकडून प्राणांतिक दंड भोगावा लागेल." (२६)

इति प्रस्थाप्य सुग्रीवो वानरान् भीमविक्रमान् ।
रामस्य पार्श्वे श्रीरामं नत्वा चोपविवेश सः ॥ २७ ॥

अशा प्रकारे महापराक्रम असणाऱ्या वानरांना पाठवून, सुग्रीवाने श्रीरामांना नमस्कार केला आणि तो त्यांच्या शेजारी बसला. (२७)

गच्छन्तं मारुतिं दृष्ट्वा रामो वचनमब्रवीत् ।
अभिज्ञानार्थमेतन्मे ह्यङ्गुलीयकमुत्तमम् ॥ २८ ॥

मन्नामाक्षरसंयुक्तं सीतायै दीयतां रहः ।
अस्मिन् कार्ये प्रमाणं हि त्वमेव कपिसत्तम ।
जानामि सत्त्वं ते सर्वं गच्छ पन्थाः शुभस्तव ॥ २९ ॥

मारुती निघाला हे पाहून श्रीराम त्याला म्हणाले, "हे वानरश्रेष्ठा, ओळख पटण्यासाठी म्हणून माझ्या नावाच्या अक्षरांनी अंकित अशी ही माझी उत्तम अंगठी तू सीतेला एकांतात दे. हे कपिश्रेष्ठा, या कार्यात तूच सर्व समर्थ आहेस. तुझे संपूर्ण सामर्थ्य मला माहीत आहे. जा, तुझा मार्ग तुला कल्याणकारक होवो." (२८-२९)

एवं कपीनां राज्ञा ते विसृष्टाः परिमार्गणे ।
सीताया अङ्गदमुखा बभ्रमुस्तत्र तत्र ह ॥ ३० ॥

अशा प्रकारे वानरराज सुग्रीवाने सीतेच्या शोधासाठी पाठविलेले अंगद इत्यादी वानर इकडे तिकडे भ्रमण करू लागले. (३०)

भ्रमन्तो विन्ध्यगहने ददृशुः पर्वतोपमम् ।
राक्षसं भीषणाकारं भक्षयन्तं मृगान् गजान् ॥ ३१ ॥

रावणोऽयमिति ज्ञात्वा केचिद्वानरपुङ्गवाः ।
जघ्नुः किलकिलाशब्दं मुञ्चन्तो मुष्टिभिः क्षणात् ॥ ३२ ॥

फिरत असताना काही वानरांना विंध्य पर्वताच्या गहन अरण्यात, पर्वताप्रमाणे प्रचंड आणि भीषण आकार असणारा आणि जंगलातील पशू व हत्ती यांना खाणारा एक राक्षस दिसला. तो रावण आहे असे समजून काही श्रेष्ठ वानरांनी कलकलाट करीत, मुठीच्या प्रहारांनी त्याला एका क्षणात ठार केले. (३१-३२)

नायं रावण इत्युक्त्वा ययुरन्यन्महद्वनम् ।
तृषार्ताः सलिलं तत्र नाविन्दन् हरिपुङ्गवाः ॥ ३३ ॥

तो सहजासहजी मेल्यामुळे 'तो रावण नाही,' असे म्हणून ते वानर दुसऱ्या एका मोठ्या अरण्यात शिरले. परंतु तहानेने व्याकूळ झालेल्या त्या वानरश्रेष्ठांना तेथे कुठेच पाणी मिळाले नाही. (३३)

विभ्रमन्तो महारण्ये शुष्ककण्ठोष्ठतालुकाः ।
ददृशुर्गह्वरं तत्र तृणगुल्मावृतं महत् ॥ ३४ ॥

आर्द्रपक्षान् क्रौञ्चहंसान्निःसृतान्ददृशुस्ततः ।
अत्रास्ते सलिलं नूनं प्रविशामो महागुहाम् ॥ ३५ ॥

इत्युक्त्वा हनुमानग्रे प्रविवेश तमन्वयुः ।
सर्वे परस्परं धृत्वा बाहून्बाहुभिरुत्सुकाः ॥ ३६ ॥

त्या महान अरण्यामध्ये फिरत असताना त्या वानरांचे कंठ, ओठ आणि टाळू सुकून गेले. तितक्यात गवत आणि झुडुपे यांनी झाकलेली एक मोठी गुहा त्यांना तेथे दिसली. भिजलेले पंख असणारे क्रौंच, हंस इत्यादी पक्षी त्या गुहेतून बाहेर येताना त्यांना दिसले. तेव्हा 'येथे नक्की पाणी आहे; आपण या गुहेत प्रवेश करूया.' असे म्हणून हनुमान प्रथम त्या गुहेत शिरला. त्याच्या मागोमाग इतर सर्व वानर एकमेकांचे हात आपल्या हातांत धरून, मोठ्या उत्सुकतेने त्या गुहेत शिरले. (३४-३६)

अन्धकारे महद्दूरं गत्वापश्यन् कपीश्वराः ।
जलाशयान्मणिनिभतोयान् कल्पद्रुमोपमान् ॥ ३७ ॥

वृक्षान्पक्वफलैर्नम्रान्मधुद्रोणसमन्वितान् ।
गृहान् सर्वगुणोपेतान् मणिवस्त्रादिपूरितान् ॥ ३८ ॥

दिव्यभक्ष्यान्नसहितान्मानुषैः परिवर्जितान् ।
विस्मितास्तत्र भवने दिव्ये कनकविष्टरे ॥ ३९ ॥

प्रभया दीप्यमानां तु ददृशुः स्त्रियमेककाम् ।
ध्यायन्तीं चीरवसनां योगिनीं योगमास्थिताम् ॥ ४० ॥

त्या गुहेतील अंधारात पुष्कळ दूर गेल्यावर त्या कपिश्रेष्ठांना दिसले की स्फटिक मण्यासमान स्वच्छ पाणी असणारी सरोवरे; पिकलेल्या फळांनी वाकलेले कल्पवृक्षाप्रमाणे असणारे आणि मधाच्या पोळ्यांनी युक्त असे वृक्ष तेथे आहेत; सर्व गुणांनी युक्त, रत्ने, वस्त्रे इत्यादींनी भरलेली, दिव्य खाद्य, अन्न इत्यादींनी युक्त परंतु मनुष्यरहित अशी घरे आहेत. ते सर्व पाहून सर्व वानर आश्चर्यचकित झाले. तेथेच एका दिव्य भवनात सोन्याच्या आसनावर बसलेली एकटी स्त्री त्यांना दिसली. स्वतःच्या प्रभेने देदीप्यमान, वल्कल- वस्त्रे परिधान करणारी, आणि योगाभ्यासात रत होऊन ध्यान करणारी अशी ती योगिनी होती. (३७-४०)

प्रणेमुस्तां महाभागां भक्त्या भीत्या च वानराः ।
दृष्ट्वा तान्वानरान्देवी प्राह यूयं किमागताः ॥ ४१ ॥

कुतो वा कस्य दूता वा मत्स्थानं किं प्रधर्षथ ।
तच्छ्रुत्वा हनुमानाह शृणु वक्ष्यामि देवि ते ॥ ४२ ॥

त्या महाभागा स्त्रीला वानरांनी भक्तीने आणि भीतीने प्रणाम केला. त्या वानरांना पाहून ती देवी म्हणाली, 'अहो, तुम्ही का व कोठून आला आहात? तुम्ही कुणाचे दूत आहात ? तुम्ही माझ्या स्थानात जबरदस्तीने का घुसला आहात ?' ते ऐकून हनुमान म्हणाला, 'हे देवी, ऐक. मी सर्व काही तुला सांगतो. (४१-४२)

अयोध्याधिपति: श्रीमान् राजा दशरथ: प्रभु: ।
तस्य पुत्रो महाभागो ज्येष्ठो राम इति श्रुत: ॥ ४३ ॥

ऐश्वर्यसंपन्न आणि समर्थ असे महाराज दशरथ हे अयोध्येचा अधिपती होते. त्यांचे महाभागशाली ज्येष्ठ चिरंजीव श्रीराम या नावाने विख्यात आहेत. (४३)

पितुराज्ञां पुरस्कृत्य सभार्य: सानुजो वनम् ।
गतस्तत्र हृता भार्या तस्य साध्वी दुरात्मना ॥ ४४ ॥

रावणेन ततो राम: सुग्रीवं सानुजो ययौ ।
सुग्रीवो मित्रभावेन रामस्य प्रियवल्लभाम् ॥४५ ॥

मृगयध्वमिति प्राह ततो वयमुपागता: ।
ततो वनं विचिन्वतो जानकीं जलकाङ्क्षिण: ॥ ४६ ॥

प्रविष्टा गह्वरं घोरं दैवादत्र समागता: ।
त्वं वा किमर्थमत्रासि का वा त्वं वद न: शुभे ॥ ४७ ॥

पित्याची आज्ञा शिरोधार्य मानून, पत्नी व धाकटा भाऊ यांसह ते वनात गेले. तेथे त्यांची साध्वी पत्नी दुरात्म्या रावणाने हरण करून नेली. त्यानंतर लहान भावासह ते सुग्रीवाकडे गेले. श्रीरामांशी मैत्रीचा संबंध जुळल्याने, सुग्रीवाने आम्हांला आज्ञा दिली की त्यांच्या प्रिय पत्नीचा शोध करा. म्हणून आम्ही तेथून आलो आहोत. त्यानंतर वनात जानकीचा शोध घेताना, आम्हाला तहान लागली. तेव्हा आम्ही या भयंकर गुहेत शिरलो आणि दैवयोगाने येथे आलो आहोत. हे कल्याणी, तू कोण आहेस आणि येथे का राहात आहेस, ते तू आम्हांला सांग बरे." (४४-४७)

योगिनी च तथा दृष्ट्वा वानरान् प्राह हृष्टधी: ।
यथेष्टं फलमूलानि जग्ध्वा पीत्वामृतं पय: ॥ ४८ ॥

आगच्छत ततो वक्ष्ये मम वृत्तान्तमादित: ।
तथेति भुक्त्वा पीत्वा च हृष्टास्ते सर्ववानरा: ॥ ४९ ॥

देव्या: समीपं गत्वा ते बद्धाञ्जलिपुटा: स्थिता: ।
तत: प्राह हनूमन्तं योगिनी दिव्यदर्शना ॥ ५० ॥

अशा प्रकारे तहानलेल्या वानरांना पाहून ती योगिनी आनंदित मनाने म्हणाली, "प्रथम तुम्ही यथेच्छ फळे व मुळे खाऊन अमृताप्रमाणे गोड पाणी पिऊन या. मग मी प्रथमपासून माझा वृत्तांत तुम्हांला सांगेन." 'ठीक आहे' असे म्हणून खाऊन आणि पिऊन संतुष्ट झालेले ते सर्व वानर तिच्याजवळ आले आणि हात जोडून उभे राहिले. तेव्हा दिव्यदर्शन असणारी ती योगिनी हनुमंताला सांगू लागली. (४८-५०)

हेमा नाम पुरा दिव्यरूपिणी विश्वकर्मण: ।
पुत्री महेशं नृत्येन तोषयामास भामिनी ॥ ५१ ॥

"पूर्वी विश्वकर्म्याची हेमा नावाची दिव्य रूप असणारी कन्या होती. त्या तेजस्वी स्त्रीने नृत्याने श्रीमहादेवांना प्रसन्न करून घेतले. (५१)

तुष्टो महेश: प्रददाविदं दिव्यपुरं महत् ।
अत्र स्थिता सा सुदती वर्षाणामयुतायुतम् ॥ ५२ ॥

संतुष्ट झालेल्या श्रीशंकरांनी तिला राहाण्यास हे अतिशय मोठे दिव्य नगर दिले. सुंदर दात असणारी ती हेमा येथे हजारो वर्षे राहिली. (५२)

तस्या अहं सखी विष्णुतत्परा मोक्षकाङ्क्षिणी ।
नाम्ना स्वयम्प्रभा दिव्यगन्धर्वतनया पुरा ॥ ५३ ॥

गच्छन्ती ब्रह्मलोकं सा मामाहेदं तपश्चर ।
अत्रैव निवसन्ती त्वं सर्वप्राणिविवर्जिते ॥ ५४ ॥

तिची मी मैत्रीण आहे. मी दिव्य नावाच्या गंधर्वाची कन्या असून माझे नाव स्वयंप्रभा आहे. मला मोक्ष प्राप्त करून घेण्याची इच्छा आहे म्हणून मी नेहमी विष्णूच्या भक्तीत तत्पर असते. ब्रह्मलोकी जाताना हेमा मला म्हणाली होती की, 'तू येथेच सर्व प्राण्यांनी रहित अशा स्थानी राहून तपश्चर्या कर. (५३-५४)

त्रेतायुगे दाशरथिर्भूत्वा नारायणोऽव्ययः ।
भूभारहरणार्थाय विचरिष्यति कानने ॥ ५५ ॥

मार्गन्तो वानरास्तस्य भार्यामायान्ति ते गुहाम् ।
पूजयित्वाथ तान् नत्वा रामं स्तुत्वा प्रयत्नतः ॥ ५६ ॥

यातासि भवनं विष्णोर्योगिगम्यं सनातनम् ।
इतोऽहं गन्तुमिच्छामि रामं द्रष्टुं त्वरान्विता ॥ ५७ ॥

यूयं पिदध्वमक्षीणि गमिष्यथ बहिर्गुहाम् ।
तथैव चक्रुस्ते वेगाद्गताः पूर्वस्थितं वनम् ॥ ५८ ॥

सापि त्यक्त्वा गुहां शीघ्रं ययौ राघवसन्निधिम् ।
तत्र रामं ससुग्रीवं लक्ष्मणं च ददर्श ह ॥ ५९ ॥

कृत्वा प्रदक्षिणं रामं प्रणम्य बहुशः सुधीः ।
आह गद्गदया वाचा रोमाञ्चिततनूरुहा ॥६० ॥

दासी तवाहं राजेन्द्र दर्शनार्थमिहागता ।
बहुवर्षसहस्राणि तप्तं मे दुश्चरं तपः ॥ ६१ ॥

गुहायां दर्शनार्थं ते फलितं मेऽद्य तत्तपः ।
अद्य हि त्वां नमस्यामि मायायाः परतः स्थितम् ॥ ६२ ॥

सर्वभूतेषु चालक्ष्यं बहिरन्तरवस्थितम् ।
योगमायाजवनिकाच्छन्नो मानुषविग्रहः ॥ ६३ ॥

न लक्ष्यसेऽज्ञानदृशां शैलूष इव रूपधृक् ।
महाभागवतानां त्वं भक्तियोगविधित्सया ॥ ६४ ॥

अवतीर्णोऽसि भगवन् कथं जानामि तामसी ।
लोके जानातु यः कश्चित्तव तत्त्वं रघूत्तम ॥ ६५ ॥

ममैतदेव रूपं ते सदा भातु हृदालये ।
राम ते पादयुगलं दर्शितं मोक्षदर्शनम् ॥ ६६ ॥

अदर्शनं भवार्णानां सन्मार्गपरिदर्शनम् ।
धनपुत्रकलत्रादिविभूतिपरिदर्पितः ।
अकिञ्चनधनं त्वाद्य नाभिधातुं जनोऽर्हति ॥ ६७ ॥

त्रेतायुगात अविनाशी नारायण हे दशरथाचे पुत्र श्रीराम होऊन, भूमीचा भार हरण करण्यासाठी अरण्यात हिंडणार आहेत. (५५)

श्रीरामांच्या पत्नीचा शोध करीत वानर तुझ्या गुहेत येतील, तेव्हा त्यांचा सत्कार कर, श्रीरामांकडे जाऊन व त्यांना नमन करून, तू त्यांची मन:पूर्वक स्तुती कर. मग योगी लोकांनाच जाण्यास योग्य अशा विष्णूंच्या सनातन धामाला तू जाशील,' तेव्हा श्रीरामांचे दर्शन घेण्यासाठी मी त्वरेने येथून जाऊ इच्छिते. (५६-५७)

तुम्ही आता डोळे मिटा. मग तुम्ही या गुहेच्या बाहेर जाऊन पोचाल." त्या वानरांनी तसे केले. ते त्वरित पूर्वीच्याच वनात जाऊन पोहोचले. (५८)

इकडे तीसुद्धा गुहेतून बाहेर आली आणि लगेच राघवांच्याजवळ गेली. तेथे तिने सुग्रीवासह असणाऱ्या श्रीराम आणि लक्ष्मण यांना पाहिले. (५९)

त्या बुद्धिमान् स्त्रीने श्रीरामांना प्रदक्षिणा घातली आणि त्यांना वारंवार प्रणाम केला. मग शरीर रोमांचित झालेली ती गद्गद वाणीने म्हणाली, (६०)

'हे राजेंद्रा, मी तुमची दासी आहे. तुमचे दर्शन घेण्यास मी येथे आले आहे. तुमचे दर्शन व्हावे म्हणून मी गुहेत राहून कित्येक सहस्र वर्षे दुश्चर तपाचे आचरण केले आहे. ते माझे तप आज फळाला आले आहे. मायेच्या पलीकडे असणाऱ्या तसेच सर्व प्राण्यांचे बाबतीत आत बाहेर असूनही न दिसणाऱ्या अशा तुम्हांला मी नमस्कार करीत आहे. योगमायारूपी पडद्यामागे तुम्ही दडलेले आहात आणि आता तुम्ही माणसाचा देह धारण केला आहे; म्हणून नाना रूपे धारण करणारा जादुगार ज्याप्रमाणे खऱ्या रूपाने समजून येत नाही, त्याप्रमाणे अज्ञानाची दृष्टी असणाऱ्या माणसांना तुमचे खरे रूप दिसत नाही. हे भगवन, महान भगवद्- भक्तांसाठी भक्तियोग प्रस्थापित करण्याच्या इच्छेने तुम्ही अवतीर्ण झाला आहात. तमोगुणी मी तुम्हांला कशी बरे जाणू शकेन? हे रघूत्तमा, या जगात तुमचे तत्त्व जर कोणी जाणत असेल, तर तो जाणू दे. माझ्या हृदयमंदिरात मात्र तुमचे हेच रूप सदा प्रकाशत राहो. हे रामा, तुमच्या चरण-युगलाचे दर्शन म्हणजे मोक्षदर्शनच होय; त्यामुळे संसाररूपी जन्ममरणाचा नाश होतो आणि सन्मार्गाचे दर्शन होते. हे आद्य,या जगातील धन, पुत्र, पत्नी व वैभव यांनी उन्मत्त झालेला माणूस अपरिग्रही लोकांचे धन असणाऱ्या तुमची स्तुती करण्यास पात्र ठरत नाही. (६१-६७)

निवृत्तगुणमार्गाय निष्किञ्चनधनाय ते ॥ ६८ ॥

नमः स्वात्माभिरामाय निर्गुणाय गुणात्मने ।
कालरूपिणमीशानमादिमध्यान्तवर्जितम् ॥ ६९ ॥

समं चरन्तं सर्वत्र मन्ये त्वां पुरुषं परम् ।
देव ते चेष्टितं कश्चिन्न वेद नृविडम्बनम् ॥ ७० ॥

न तेऽस्ति कश्चिद्दयितो द्वेष्यो वापर एव च ।
त्वन्मायापिहितात्मानस्त्वां पश्यन्ति तथाविधम् ॥ ७१ ॥

अजस्याकर्तुरीशस्य देवतिर्यङ्नरादिषु ।
जन्मकर्मादिकं यद्यत्तदत्यन्तविडम्बनम् ॥ ७२ ॥

त्वामाहुरक्षरं जातं कथाश्रवणसिद्धये ।
केचित्कोसलराजस्य तपसः फलसिद्धये ॥ ७३ ॥

कौसल्यया प्रार्थ्यमानं जातमाहुः परे जनाः ।
दुष्टराक्षसभूभारहरणायार्थितो विभुः ॥ ७४ ॥

ब्रह्मणा नररूपेण जातोऽयमिति केचन ।
शृण्वन्ति गायन्ति च ये कथास्ते रघुनन्दन ॥ ७५ ॥

पश्यन्ति तव पादाब्जं भवार्णवसुतारणम् ।
त्वन्मायागुणबद्धाहं व्यतिरिक्तं गुणाश्रयम् ॥ ७६ ॥

कथं त्वां देव जानीयां स्तोतुं वाविषयं विभुम् ।
नमस्यामि रघुश्रेष्ठं बाणासनशरान्वितम् ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा सुग्रीवादिभिरन्वितम् ॥ ७७ ॥

एवं स्तुतो रघुश्रेष्ठः प्रसन्नः प्रणताघहृत् ।
उवाच योगिनीं भक्तां किं ते मनसि काङ्क्षितम् ॥ ७८ ॥

जो गुण-मार्गापासून निवृत्त झाला आहे, जो सर्वसंगपरित्यागी माणसाचे सर्वस्व असतो, जो स्वतःच्या स्वरूपातच रममाण झालेला असतो आणि जो निर्गुण असूनही सगुण असतो, अशा तुम्हाला माझा नमस्कार असो. जो कालस्वरूप आहे, जो सर्वांचा नियंता आहे, जो आदी, मध्य व अंत यांनी रहित आहे, जो सर्व ठिकाणी समभावाने व्यापून असतो, असे तुम्ही परम पुरुष आहात, असे मी मानते. हे देवा, मनुष्य- रूपात आल्यावर तुम्ही ज्या ज्या लीला करता त्या त्या कोणालाही कळत नाहीत. (६८-७०)

तुम्हाला कोणीही प्रिय नाही, शत्रू नाही, तसेच त्यापेक्षा वेगळा उदासीन नाही. तथापि तुमच्या मायेने ज्यांचे अंतःकरण झाकले गेले आहे, असे लोक तुम्हांला आपल्या भावनेप्रमाणे मानतात. (७१)

तुम्ही जन्मरहित, अकर्ता आणि ईश्वर आहात. देव, तिर्यक् प्राणी आणि मानव इत्यादी योनींमध्ये तुम्ही जे जन्म घेता आणि कर्म इत्यादी करता, ते सर्व त्या योनींचे अनुकरण असते, ती सर्व तुमची महान लीला होय. (७२)

असे म्हणतात की तुम्ही अविनाशी असूनही भक्तांना तुमच्या कथा ऐकण्यास मिळाव्यात, म्हणून तुम्ही अवतार घेता. तर काही जण असे म्हणतात की कोसल देशाच्या राजा दशरथांना त्यांच्या तपश्चर्येचे फळ देण्यासाठी तुम्ही अवतार घेतला आहे. (७३)

इतर लोक असे म्हणतात की कौसल्येने प्रार्थना केल्यावरून तुम्ही जन्म घेतला आहे. तर काही जण असे म्हणतात की दुष्ट राक्षसांचा भूमीला झालेला भार हरण करण्यासाठी ब्रह्मदेवांनी प्रार्थना केल्यामुळे विभू असलेले तुम्ही नररूपाने जन्माला आला आहात. हे रघुनंदना, जे लोक तुमच्या कथा गातात व ऐकतात ते तुमचे पदकमल हे संसार सागर तरून जाण्यास उत्तम नौका आहे, असे मानतात. हे देवा, तुमच्या मायेच्या गुणांनी मी बद्ध आहे; म्हणून गुणांपेक्षा वेगळ्या आणि गुणांचा आश्रय असणाऱ्या तुम्हांला मी कशी बरे जाणू शकेन ? तसेच वाणीचा विषय नसणाऱ्या आणि व्यापक असणाऱ्या तुमची स्तुती करण्यास मी कशी बरे समर्थ होईन ? म्हणून तुमचा भाऊ लक्ष्मण आणि सुग्रीव इत्यादींसह असणाऱ्या, धनुष्य व बाण धारण करणाऱ्या अशा तुम्हा रघुश्रेष्ठांना- मी नमस्कार करते . (७४-७७)

अशा प्रकारे स्वयंप्रभेकडून स्तुती केली गेली, तेव्हा शरणगतांची पापे हरण करणारे ते रघुश्रेष्ठ प्रसन्न झाले आणि आपली भक्त असणाऱ्या त्या योगिनीला ते म्हणाले, "तुझ्या मनात काय इच्छा आहे ? " (७८)

सा प्राह राघवं भक्त्या भक्तिं ते भक्तवत्सल ।
यत्र कुत्रापि जाताया निश्चलां देहि मे प्रभो ॥ ७९ ॥

भक्तिपूर्वक ती राघवांना म्हणाली, "हे भक्तवत्सल प्रभो, जेथे कोठे मी जन्माला येईन, त्या जन्मी तुम्ही मला तुमची निश्चल भक्ती द्या. (७९)

त्वद्भक्तेषु सदा सङ्गो भूयान्मे प्राकृतेषु न ।
जिह्वा मे रामरामेति भक्त्या वदतु सर्वदा ॥ ८० ॥

तसेच जन्मोजन्मी तुमच्या भक्तांशी माझी सदा संगती होवो, सामान्य संसारी माणसाशी नको. आणि माझी जिव्हा नेहमी भक्तीने 'राम राम' असा तुमच्या नावाचा उच्चार करो. (८०)

मानसं श्यामलं रूपं सीतालक्ष्मणसंयुतम् ।
धनुर्बाणधरं पीतवाससं मुकुटोज्ज्वलम् ॥ ८१ ॥

अङ्गदैर्नूपुरैर्मुक्ताहारैः कौस्तुभकुण्डलैः ।
भान्तं स्मरतु मे राम वरं नान्यं वृणे प्रभो ॥ ८२ ॥

आणि हे प्रभू रामा, माझे मन सदा तुमच्या रूपाचे स्मरण करो. तुमचे रूप सीता आणि लक्ष्मण यांच्यासह असणारे, श्यामवर्ण, धनुष्य- बाण धारण करणारे, पीतांबर परिधान करणारे, मुकुटाने विभूषित, तसेच बाहुभूषणे, नूपुर, मोत्याचे हार, कौस्तुभ मणी आणि कुंडले यांनी शोभायमान आहे. याखेरीज मी अन्य कोणताही वर मागत नाही." (८१-८२)

*श्रीराम उवाच*

भवत्वेवं महाभागे गच्छ त्वं बदरीवनम् ।
तत्रैव मां स्मरन्ती त्वं त्यक्त्वेदं भूतपञ्चकम् ।
मामेव परमात्मानमचिरात्प्रतिपद्यसे ॥ ८३ ॥

**श्रीराम म्हणाले–** "हे महाभागे, असेच होईल. आता तू बदरिकाश्रमात जा. तेथेच तू माझे स्मरण करीत असताना हे तुझे पांचभौतिक शरीर टाकून देऊन तू लौकरच मज परमात्म्यालाच प्राप्त करून घेशील." (८३)

श्रुत्वा रघूत्तमवचोऽमृतसारकल्पं
गत्वा तदैव बदरीतरुषण्डजुष्टम् ।
तीर्थं तदा रघुपतिं मनसा स्मरन्ती
त्यक्त्वा कलेवरमवाप परं पदं सा ॥ ८४ ॥

अमृताच्या साराप्रमाणे असणारे ते रघूत्तमांचे वचन ऐकल्यावर, स्वयंप्रभा त्याच वेळी बदरी वृक्षांच्या समूहांनी युक्त असणाऱ्या बदरिकाश्रमात गेली, आणि तेथे मनाने ती रघुपतींचे स्मरण करू लागली, आणि शेवटी स्वतःचे शरीर टाकून देऊन तिने परम पद प्राप्त करून घेतले. (८४)

★

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किन्धाकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

★

# सप्तम सर्ग

## वानरांचे प्रायोपवेशन आणि संपातीची भेट

*श्रीमहादेव उवाच*

अथ तत्र समासीना वृक्षषण्डेषु वानराः ।
चिन्तयन्तो विमुह्यन्तः सीतामार्गणकर्शिताः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, नंतर त्या वनात सीतेचा शोध करताना थकून गेलेले वानर सीतेचा शोध न लागल्याने दुःखी झाले. तेव्हा झाडांवर बसून ते विचार करू लागले. (१)

तत्रोवाचाङ्गदः कांश्चिद्वानरान् वानरर्षभः ।
भ्रमतां गह्वरेऽस्माकं मासो नूनं गतोऽभवत् ॥ २ ॥

त्या वेळी वानरश्रेष्ठ अंगद काही वानरांना म्हणाला, "सीतेच्या शोधासाठी आपण गिरि-कंदरांमध्ये फिरत असताना नक्कीच एक महिना होऊन गेला असणार. (२)

सीता नाधिगतास्माभिर्न कृतं राजशासनम् ।
यदि गच्छाम किष्किन्धां सुग्रीवोऽस्मान् हनिष्यति ॥३॥

आपल्याला सीता सापडली नाही. साहजिकच राजाची आज्ञा आपल्याकडून पाळली गेली नाही. तेव्हा आता जर आपण किष्किंधा नगरीत परत गेलो तर सुग्रीव आपणास नक्कीच ठार करील. (३)

विशेषतः शत्रुसुतं मां मिषान्निहनिष्यति ।
मयि तस्य कुतः प्रीतिरहं रामेण रक्षितः ॥४॥

विशेषतः त्याच्या वाली या शत्रूचा पुत्र असणाऱ्या मला तो या निमित्ताने निश्चितच ठार करील. माझ्याबद्दल त्याला प्रेम का बरे वाटावे ? माझे रक्षण तर श्रीरामांनीच केलेले आहे. (४)

इदानीं रामकार्यं मे न कृतं तन्मिषं भवेत् ।
तस्य मद्धनने नूनं सुग्रीवस्य दुरात्मनः ॥५॥

आता श्रीरामांचे कार्य मी केले नाही. तेव्हा मला ठार करण्यास त्या दुरात्म्या सुग्रीवाला खरोखर हे आयते निमित्त मिळेल. (५)

मातृकल्पां भ्रातृभार्यां पापात्मानुभवत्यसौ ।
न गच्छेयमतः पार्श्वं तस्य वानरपुङ्गवाः ॥६॥

तो पापी मनाचा सुग्रीव हा आईप्रमाणे असणाऱ्या आपल्या भावाच्या भार्येचा उपभोग घेत आहे. म्हणून हे वानरश्रेष्ठांनो, मी आता त्याच्याजवळ जाणार नाही. (६)

त्यक्ष्यामि जीवितं चात्र येन केनापि मृत्युना ।
इत्यश्रुनयनं केचिद्दृष्ट्वा वानरपुङ्गवाः ॥७॥

व्यथिताः साश्रुनयना युवराजमथाब्रुवन् ॥८॥

तेव्हा येथेच कशाही रीतीने मृत्यू ओढवून घेऊन मी माझ्या जीविताचा त्याग करीन.'' त्याच्या डोळ्यांत अश्रू आले . अंगदाला पाहून, काही श्रेष्ठ वानर व्यथित झाले, त्यांच्याही डोळ्यांत अश्रू आले आणि मग ते युवराज अंगदाला म्हणाले, (७-८)

किमर्थं तव शोकोऽत्र वयं ते प्राणरक्षकाः ।
भवामो निवसामोऽत्र गुहायां भयवर्जिताः ॥९॥

''तू येथे का बरे शोक करीत आहेस ? आम्ही सर्व जण तुझ्या प्राणांचे रक्षण करू. आपण सारेच येथे गुहेत निर्भयपणे राहू या. (९)

सर्वसौभाग्यसहितं पुरं देवपुरोपमम् ।
शनैः परस्परं वाक्यं वदतां मारुतात्मजः ॥१०॥

श्रुत्वाङ्गदं समालिङ्ग्य प्रोवाच नयकोविदः ।
विचार्यते किमर्थं ते दुर्विचारो न युज्यते ॥११॥

या गुहेत जे नगर आहे ते सर्व भोगसामग्रींनी भरलेले असून ते देवांच्या अमरावती नगरीप्रमाणे आहे.'' परस्परांशी हळूहळू बोलणाऱ्या त्या वानरांचे हे वचन नीती जाणणाऱ्या हनुमानाने ऐकले. तेव्हा अंगदाला दृढ आलिंगन देऊन त्याने म्हटले, ''तू असा विचार का करीत आहेस बरे? वाईट विचार करणे हे तुला शोभत नाही. (१०-११)

राज्ञोऽत्यन्तप्रियस्त्वं हि तारापुत्रोऽतिवल्लभः ।
रामस्य लक्ष्मणात्प्रीतिस्त्वयि नित्यं प्रवर्धते ॥१२॥

कारण तू तारेचा अतिशय लाडका पुत्र आहेस आणि म्हणून तू राजा सुग्रीवालासुद्धा अतिशय प्रिय आहेस. आणि श्रीरामांची तुझ्यावरील प्रीती ही त्यांच्या लक्ष्मणावरील प्रेमापेक्षाही अधिक असून ती वाढत आहे. (१२)

अतो न राघवाद्भीतिस्तव राज्ञो विशेषतः ।
अहं तव हिते सक्तो वत्स नान्यं विचारय ॥१३॥

म्हणून तुला श्रीराघवांकडून भीती नाही. आणि विशेषतः राजा सुग्रीवाकडून तुला मुळीच भीती नाही. तसेच, बाळा अंगदा, मी तुझे हित करण्यात सतत तत्पर आहे. म्हणून तू अन्य कशाचाही विचार करू नकोस. (१३)

गुहावासश्च निर्भेद्य इत्युक्तं वानरैस्तु यत् ।
तदेतद्रामबाणानामभेद्यं किं जगत्त्रये ॥१४॥

तसेच येथे राहणे, ही गुहा अभेद्य असल्याने निर्भय आहे, असे जे काही वानर म्हणतात ते योग्य नाही. कारण या तिन्ही जगात असे काय आहे की जे श्रीरामांच्या बाणांना अभेद्य आहे? (१४)

ये त्वां दुर्बोधयन्त्येते वानरा वानरर्षभ ।
पुत्रदारादिकं त्यक्त्वा कथं स्थास्यन्ति ते त्वया ॥ १५ ॥

अन्यद्गुह्यतमं वक्ष्ये रहस्यं शृणु मे सुत ।
रामो न मानुषो देवः साक्षान्नारायणोऽव्ययः ॥ १६ ॥

सीता भगवती माया जनसम्मोहकारिणी ।
लक्ष्मणो भुवनाधारः साक्षाच्छेषः फणीश्वरः ॥ १७ ॥

ब्रह्मणा प्रार्थिताः सर्वे रक्षोगणविनाशने ।
मायामानुषभावेन जाता लोकैकरक्षकाः ॥ १८ ॥

वयं च पार्षदाः सर्वे विष्णोर्वैकुण्ठवासिनः ।
मनुष्यभावमापन्ने स्वेच्छया परमात्मनि ॥ १९ ॥

वयं वानररूपेण जातास्तस्यैव मायया ।
वयं तु तपसा पूर्वमाराध्य जगतां पतिम् ॥ २० ॥

तेनैवानुगृहीताः स्मः पार्षदत्वमुपागताः ।
इदानीमपि तस्यैव सेवां कृत्वैव मायया ॥ २१ ॥

पुनर्वैकुण्ठमासाद्य सुखं स्थास्यामहे वयम् ।
इत्यङ्गदमथाश्वास्य गता विन्ध्यं महाचलम् ॥ २२ ॥

विचिन्वन्तोऽथ शनकैर्जानकीं दक्षिणाम्बुधेः ।
तीरे महेन्द्राख्यगिरेः पवित्रं पादमाययुः ॥ २३ ॥

दृष्ट्वा समुद्रं दुष्पारमगाधं भयवर्धनम् ।
वानरा भयसन्त्रस्ताः किं कुर्म इति वादिनः ॥ २४ ॥

निषेदुरुदधेस्तीरे सर्वे चिन्तासमन्विताः ।
मन्त्रयामासुरन्योन्यमङ्गदाद्या महाबलाः ॥ २५ ॥

भ्रमतो मे वने मासो गतोऽत्रैव गुहान्तरे ।
न दृष्टो रावणो वाद्य सीता वा जनकात्मजा ॥ २६ ॥

आणखी असे की हे वानर श्रेष्ठा, हे जे वानर तुला चुकीचा सल्ला देत आहेत ते वानर स्वतःचे पुत्र, पत्नी इत्यादींचा त्याग करून, तुझ्याबरोबर कसे बरे राहतील? (१५)

बाळा, आणखी अत्यंत गुप्त असे एक रहस्य मी तुला सांगतो. ते तू ऐक. राम हे सामान्य मनुष्य नाहीत. तर ते साक्षात अविनाशी असे परमेश्वर नारायण आहेत. (१६)

सीता ही सर्व लोकांना मोहित करणारी भगवती माया आहे आणि लक्ष्मण म्हणजे सर्व जगाला आधार देणारा साक्षात नागराज शेष आहे. (१७)

ब्रह्मदेवाने प्रार्थना केल्यामुळे हे सर्व राक्षस-समुदायांचा नाश करण्यासाठी माया-मनुष्य रूपाने जन्माला आले आहेत. त्यांतील प्रत्येक जण तिन्ही लोकांचे रक्षण करण्यास समर्थ आहे. (१८)

वैकुंठात वास करणाऱ्या विष्णूचे आपण सर्व वानरगण पार्षद आहोत. परमात्मा हा स्वतःच्या इच्छेने मानवी रूपात आला आहे, तेव्हा त्याच्याच मायेने आपण सर्व जण वानर रूपाने जन्माला आलो आहोत. पूर्वी आपण जगांच्या स्वामीची तपस्येद्वारे आराधना केली होती; तेव्हा त्यानेच आपणांवर अनुग्रह केल्याने आपण त्याचे पार्षद झालेलो आहोत. तेव्हा आत्तासुद्धा मायेच्या प्रेरणेनुसार त्या विष्णूंचीच सेवा करूनच शेवटी आपण वैकुंठात जाऊन सुखाने राहाणार आहोत." अशा प्रकारे अंगदाचे सांत्वन करून, ते सर्व वानर विंध्य नावाच्या महापर्वतावर गेले. (१९-२२)

त्यानंतर सावकाशपणे जानकीचा शोध घेत ते वानर दक्षिण समुद्राच्या तीरावरील महेंद्र नावाच्या पर्वताच्या पवित्र पायथ्याशी येऊन पोचले. (२३)

तेथे पार करण्यास कठीण, अथांग आणि भीतिदायक समुद्र पाहून, ते सर्व वानर भयाने त्रस्त झाले. 'आता आपण काय करायचे?' असे परस्परांशी बोलत, ते सर्व जण चिंताग्रस्त होऊन समुद्राच्या किनाऱ्यावर बसून राहिले. मग अंगद इत्यादी महाबलवान वानर परस्परांशी विचार विनिमय करू लागले- "अहो, सीतेच्या शोधासाठी वनात हिंडता हिंडता त्या गुहेतच एक महिना निघून गेला आहे. आजपर्यंत आपणास रावणही दिसला नाही आणि जनककन्या सीतासुद्धा आपणास दिसली नाही. (२४-२६)

सुग्रीवस्तीक्ष्णदण्डोऽस्मान्निहन्त्येव न संशयः ।
सुग्रीववधतोऽस्माकं श्रेयः प्रायोपवेशनम् ॥ २७ ॥

सुग्रीव हा भयंकर शिक्षा देणारा आहे. तो आपणास ठार करेल, यात संदेह नाही. तेव्हा सुग्रीवाकडून वध करून घेण्यापेक्षा आपण प्रायोपवेशन करून मरून जाणे हे अधिक श्रेयस्कर आहे." (२७)

इति निश्चित्य तत्रैव दर्भानास्तीर्य सर्वतः ।
उपाविवेशुस्ते सर्वे मरणे कृतनिश्चयाः ॥ २८ ॥

अशा प्रकारे प्रायोपवेशन करण्याचा निश्चय करून, सगळीकडे दर्भ पसरून, मरून जाण्याचा निश्चय करून ते सर्व वानर तेथे बसून राहिले. (२८)

एतस्मिन्नन्तरे तत्र महेन्द्राद्रिगुहान्तरात् ।
निर्गत्य शनकैरागाद्गृध्रः पर्वतसन्निभः ॥ २९ ॥

दरम्यानच्या काळात, महेंद्र पर्वताच्या एका गुहेतून बाहेर पडून एक पर्वतप्राय शरीराचे गिधाड हळूहळू तेथे आले. (२९)

दृष्ट्वा प्रायोपवेशेन स्थितान्वानरपुङ्गवान् ।
उवाच शनकैर्गृध्रः प्राप्तो भक्ष्योऽद्य मे बहुः ॥ ३० ॥

श्रेष्ठ वानर प्रायोपवेशनास बसले आहेत हे पाहून ते गिधाड हळू आवाजात म्हणू लागले, "आज मला पुष्कळ भक्ष्य प्राप्त झाले आहे. (३०)

एकैकशः क्रमात्सर्वान् भक्षयामि दिने दिने ।
श्रुत्वा तद्गृध्रवचनं वानरा भीतमानसाः ॥ ३१ ॥

आता रोज या सर्वांना एकेक करून मी खाईन."ते गिधाडाचे वचन ऐकल्यावर त्या वानरांची मने भीतीने ग्रस्त झाली. (३१)

भक्षयिष्यति नः सर्वानसौ गृध्रो न संशयः ।
रामकार्यं च नास्माभिः कृतं किञ्चिद्धरीश्वराः ॥३२ ॥

सुग्रीवस्यापि च हितं न कृतं स्वात्मनामपि ।
वृथानेन वधं प्राप्ता गच्छामो यमसादनम् ॥ ३३ ॥

ते वानर आपापसात बोलू लागले- "हे गिधाड आम्हा सर्वांना खाऊन टाकील यात संशय नाही. हे वानर प्रमुखांनो, आपण श्रीरामांचे कोणतेही कार्य केले नाही. तसेच सुग्रीवाचेही काही कार्य आपण केले नाही आणि आपलेही हित आपण साधले नाही. आता मात्र या गिधाडाकडून फुकटच आपण मारले जाऊ आणि यमसदनास जाऊ . (३२-३३)

अहो जटायुर्धर्मात्मा रामस्यार्थे मृतः सुधीः ।
मोक्षं प्राप दुरावापं योगिनामप्यरिन्दमः ॥ ३४ ॥

अहो, तो जटायू किती बुद्धिमान् आणि धर्मात्मा होता ! तो श्रीरामांच्या कार्यासाठी मरण पावला. आणि योगिजनांनासुद्धा मिळण्यासाठी कठीण असा मोक्ष त्या शत्रूचे दमन करणाऱ्या जटायूला मिळाला ." (३४)

सम्पातिस्तु तदा वाक्यं श्रुत्वा वानरभाषितम् ।
के वा यूयं मम भ्रातुः कर्णपीयूषसन्निभम् ॥ ३५ ॥

जटायुरिति नामाद्य व्याहरन्तः परस्परम् ।
उच्यतां वो भयं मा भून्मत्तः प्लवगसत्तमाः ॥ ३६ ॥

त्या वेळी वानरांनी उच्चारलेली ती वाक्ये ऐकून संपाती म्हणाला, "हे वानरश्रेष्ठांनो, माझ्या कानांना अमृताप्रमाणे वाटणारे, माझ्या भावाचे जटायू हे नाव आत्ता परस्परांशी बोलताना उच्चारणारे तुम्ही कोण आहात ? माझ्यापासून कोणतेही भय न बाळगता तुम्ही हकीगत सांगा." (३५-३६)

तमुवाचाङ्गदः श्रीमानुत्थितो गृध्रसन्निधौ ।
रामो दाशरथिः श्रीमान् लक्ष्मणेन समन्वितः ॥ ३७ ॥

सीतया भार्यया सार्धं विचचार महावने ।
तस्य सीता हृता साध्वी रावणेन दुरात्मना ॥ ३८ ॥

तेव्हा श्रीमान् अंगद उठला आणि त्या गिधाडाजवळ जाऊन म्हणाला "राजा दशरथांचे पुत्र श्रीमान श्रीराम हे लक्ष्मणासह आणि सीता या पत्नीसह घोर वनामध्ये फिरत होते. त्या वेळी त्यांची साध्वी सीता ही दुरात्म्या रावणाने हरण करून नेली. (३७-३८)

मृगयां निर्गते रामे लक्ष्मणे च हृता बलात् ।
रामरामेति क्रोशन्ती श्रुत्वा गृध्रः प्रतापवान् ॥ ३९ ॥

जटायुर्नाम पक्षीन्द्रो युद्धं कृत्वा सुदारुणम् ।
रावणेन हतो वीरो राघवार्थं महाबलः ॥ ४० ॥

राम आणि लक्ष्मण हे दोघेही मृगयेसाठी गेले असताना बळजबरीने रावणाने तिला पळविले. तेव्हा ती 'हे रामा, हे रामा,' असा आक्रोश करीत होती. तिचा आक्रोश ऐकून, प्रतापी पक्षिराज अशा जटायू नावाच्या गिधाडाने श्रीरामांसाठी रावणाबरोबर फार घनघोर युद्ध केले. परंतु तो महाबलवान वीर रावणाकडून मारला गेला. (३९-४०)

रामेण दग्धो रामस्य सायुज्यमगमत्क्षणात् ।
रामः सुग्रीवमासाद्य सख्यं कृत्वाग्निसाक्षिकम् ॥ ४१ ॥

नंतर स्वतः श्रीरामांनी त्याचा दहन-संस्कार केला. तो तत्काळ श्रीरामांमध्ये लीन झाला. त्याने सायुज्य मुक्ती मिळविली. त्यानंतर श्रीराम सुग्रीवाजवळ आले आणि त्यांनी अग्नीला साक्षी ठेवून सुग्रीवाशी मैत्री केली. (४१)

सुग्रीवचोदितो हत्वा वालिनं सुदुरासदम् ।
राज्यं ददौ वानराणां सुग्रीवाय महाबलः ॥ ४२ ॥

पुढे सुग्रीवाच्या प्रेरणेने महाबळी श्रीरामांनी जिंकण्यास अत्यंत कठीण असणाऱ्या वालीला ठार करून सुग्रीवाला वानरांचे राज्य दिले. (४२)

सुग्रीवः प्रेषयामास सीतायाः परिमार्गणे ।
अस्मान्वानरवृन्दान्वै महासत्त्वान्महाबलः ॥ ४३ ॥

नंतर महाबलवान् सुग्रीवाने सीतेचा शोध करण्यासाठी आम्हा महापराक्रमी वानरांच्या समूहांना पाठविले आहे. (४३)

मासादर्वाङ्निवर्तध्वं नोचेत्प्राणान्हरामि वः ।
इत्याज्ञया भ्रमन्तोऽस्मिन्वने गह्वरमध्यगाः ॥ ४४ ॥

सुग्रीवाने आम्हांला सांगितले की 'एक महिन्याच्या आत तुम्ही सर्व परत या. तसे न घडल्यास मी तुमचे प्राण हरण करीन.' सुग्रीवाच्या अशा आज्ञेने आम्ही वनात हिंडत असता एका गुहेत गेलो. (४४)

गतो मासो न जानीमः सीतां वा रावणं च वा ।
मर्तुं प्रायोपविष्टाः स्मस्तीरे लवणवारिधेः ॥ ४५ ॥

एक महिना निघून गेला आणि आम्हांला सीतेचा किंवा रावणाचा काहीच पत्ता लागलेला नाही. म्हणून या खाऱ्या समुद्राच्या तीरावर आम्ही प्रायोपवेशन करून मरून जाण्यास बसलो आहोत. (४५)

यदि जानासि हे पक्षिन्सीतां कथय नः शुभाम् ।
अङ्गदस्य वचः श्रुत्वा सम्पातिर्हृष्टमानसः ॥ ४६ ॥

हे गृध्रपक्ष्या, सुलक्षणी सीतेबद्दल तुला काही माहिती असल्यास ती तू आम्हांला सांग." अंगदाचे वचन ऐकून संपातीचे मन संतुष्ट झाले. (४६)

उवाच मत्प्रियो भ्राता जटायुः प्लवगेश्वराः ।
बहुवर्षसहस्रान्ते भ्रातृवार्ता श्रुता मया ॥ ४७ ॥

तो म्हणाला "हे वानरश्रेष्ठांनो, जटायू हा माझा फार लाडका भाऊ होता. हजारो वर्षांनी मला आज भावाची वार्ता ऐकावयास मिळाली आहे. (४७)

वाक्साहाय्यं करिष्येऽहं भवतां प्लवगेश्वराः ।
भ्रातुः सलिलदानाय नयध्वं मां जलान्तिकम् ॥ ४८ ॥

हे वानरश्रेष्ठ हो, मी तुम्हांला माहिती देऊन तोंडी साहाय्य करीन. पण तत्पूर्वी आधी माझ्या बंधूला जलांजली देण्यासाठी मला तुम्ही पाण्याजवळ न्या. (४८)

पश्चात्सर्वं शुभं वक्ष्ये भवतां कार्यसिद्धये ।
तथेति निन्युस्ते तीरं समुद्रस्य विहङ्गमम् ॥ ४९ ॥

त्यानंतर तुमच्या कार्यसिद्धीसाठी जे कल्याणकारक असेल ते सर्व मी तुम्हांला सांगेन." 'ठीक आहे' असे म्हणून त्या वानरांनी संपाती पक्ष्याला समुद्राच्या तीरावर नेले. (४९)

सोऽपि तत्सलिले स्नात्वा भ्रातुर्दत्त्वा जलाञ्जलिम् ।
पुनः स्वस्थानमासाद्य स्थितो नीतो हरीश्वरैः ।
सम्पातिः कथयामास वानरान्परिहर्षयन् ॥ ५० ॥

तेथे त्याने समुद्राच्या पाण्यात स्नान केले व मग भावाला जलांजली दिली. त्यानंतर श्रेष्ठ वानरांनी त्याला पुनः त्याच्या पूर्वीच्या स्थानी नेले. तेथे तो व्यवस्थित बसला आणि वानरांना आनंदित करीत सांगू लागला. (५०)

लङ्का नाम नगर्यास्ते त्रिकूटगिरिमूर्धनि ।
तत्राशोकवने सीता राक्षसीभिः सुरक्षिता ॥ ५१ ॥

"त्रिकूट नावाच्या पर्वताच्या माथ्यावर लंका नावाची नगरी आहे. तेथे राक्षसिणीच्या पहाऱ्यात सीता अशोक वनात राहात आहे. (५१)

समुद्रमध्ये सा लङ्का शतयोजनदूरतः ।
दृश्यते मे न सन्देहः सीता च परिदृश्यते ॥ ५२ ॥

येथून शंभर योजने अंतरावर समुद्रामध्ये ती लंका आहे. तरी ती सीता मला येथून दिसत आहे, तुम्ही यात शंका बाळगू नका. (५२)

गृध्रत्वाद्दूरदृष्टिर्मे नात्र संशयितुं क्षमम् ।
शतयोजनविस्तीर्णं समुद्रं यस्तु लङ्घयेत् ॥ ५३ ॥

स एव जानकीं दृष्ट्वा पुनरायास्यति ध्रुवम् ।
अहमेव दुरात्मानं रावणं हन्तुमुत्सहे ।
भ्रातुर्हन्तारमेकाकी किन्तु पक्षविवर्जितः ॥ ५४ ॥

मी गिधाड असल्याने मला दूरवरचे दिसणारी दृष्टी आहे. म्हणून या बाबतीत शंका घेणे योग्य नाही. तुमच्यापैकी जो कुणी शत योजने विस्तीर्ण असा हा समुद्र ओलांडून जाईल, तोच निश्चितपणे जानकीची भेट घेऊन पुनः परत येईल. माझ्या भावाचा वध करणाऱ्या त्या दुरात्म्या रावणाला मी एकट्यानेच ठार करण्यास उत्सुक आहे. परंतु काय करू ? मला पंख नाहीत. (५३-५४)

यतध्वमतियत्नेन लङ्घितुं सरितां पतिम् ।
ततो हन्ता रघुश्रेष्ठो रावणं राक्षसाधिपम् ॥ ५५ ॥

हे वानरांनो, तुम्ही अतिशय प्रयत्नपूर्वक समुद्र ओलांडण्याचा प्रयत्न करा. तेव्हा रघुश्रेष्ठ राम राक्षसराज रावणाला ठार करू शकतील. (५५)

उल्लङ्घ्य सिन्धुं शतयोजनायतं
लङ्कां प्रविश्याथ विदेहकन्यकाम् ।
दृष्ट्वा समाभाष्य च वारिधिं पुन-
स्तर्तुं समर्थः कतमो विचार्यताम् ॥ ५६ ॥

शंभर योजने विस्तार असणाऱ्या समुद्राचे उल्लंघन करून, लंकेत प्रवेश करायचा आणि विदेह राजकन्या सीतेला भेटून व तिच्याशी बोलून, नंतर पुनः समुद्र ओलांडून परत येण्यास तुमच्यापैकी कोण समर्थ आहे, याचा तुम्ही विचार करा." (५६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किन्धाकाण्डे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

# अष्टम सर्ग

## संपातीची आत्मकथा

*श्रीमहादेव उवाच*

अथ ते कौतुकाविष्टाः सम्पातिं सर्ववानराः ।
पप्रच्छुर्भगवन् ब्रूहि स्वमुदन्तं त्वमादितः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, (संपातीचे बोलणे ऐकल्यावर) त्या सर्व वानरांना मोठे कुतूहल वाटले आणि ते संपातीला म्हणाले, "हे भगवन, तू पहिल्यापासून तुझा स्वतःचा सर्व वृत्तांत सांग." (१)

सम्पातिः कथयामास स्ववृत्तान्तं पुरा कृतम् ।
अहं पुरा जटायुश्च भ्रातरौ रूढयौवनौ ॥ २ ॥

बलेन दर्पितावावां बलजिज्ञासया खगौ ।
सूर्यमण्डलपर्यन्तं गन्तुमुत्पतितौ मदात् ॥ ३ ॥

तेव्हा पूर्वी आपण काय केले होते इत्यादी स्वतःचा वृत्तांत संपाती सांगू लागला. "पूर्वीच्या काळी मी आणि जटायू हे आम्ही दोघे भाऊ भर तारुण्यात आलो असताना, स्वतःच्या सामर्थ्यामुळे उन्मत्त झालो होतो. नंतर आपले सामर्थ्य किती आहे हे जाणून घेण्याच्या इच्छेने आम्ही गर्वाने आकाशातून उडत सूर्यबिंबापर्यंत जाण्यासाठी उड्डाण केले. (२-३)

बहुयोजनसाहस्त्रं गतौ तत्र प्रतापितः ।
जटायुस्तं परित्रातुं पक्षैराच्छाद्य मोहतः ॥ ४ ॥

स्थितोऽहं रश्मिभिर्दग्धपक्षोऽस्मिन्विन्ध्यमूर्धनि ।
पतितो दूरपतनान्मूर्च्छितोऽहं कपीश्वराः ॥ ५ ॥

दिनत्रयात्पुनः प्राणसहितो दग्धपक्षकः ।
देशं वा गिरिकूटान्वा न जाने भ्रान्तमानसः ॥ ६ ॥

शनैरुन्मील्य नयने दृष्ट्वा तत्राश्रमं शुभम् ।
शनैः शनैराश्रमस्य समीपं गतवानहम् ॥ ७ ॥

चन्द्रमा नाम मुनिराड् दृष्ट्वा मां विस्मितोऽवदत् ।
सम्पाते किमिदं तेऽद्य विरूपं केन वा कृतम् ॥ ८ ॥

जानामि त्वामहं पूर्वमत्यन्तं बलवानसि ।
दग्धौ किमर्थं ते पक्षौ कथ्यतां यदि मन्यसे ॥ ९ ॥

ततः स्वचेष्टितं सर्वं कथयित्वातिदुःखितः ।
अब्रवं मुनिशार्दूलं दह्येऽहं दाववह्निना ॥ १० ॥

कथं धारयितुं शक्तो विपक्षो जीवितं प्रभो ।
इत्युक्तोऽथ मुनिर्वीक्ष्य मां दयार्द्रविलोचनः ॥ ११ ॥

शृणु वत्स वचो मेऽद्य श्रुत्वा कुरु यथेप्सितम् ।
देहमूलमिदं दुःखं देहः कर्मसमुद्भवः ॥ १२ ॥

कर्म प्रवर्तते देहेऽहंबुद्ध्या पुरुषस्य हि ।
अहङ्कारस्त्वनादिः स्यादविद्यासम्भवो जडः ॥ १३ ॥

चिच्छायया सदा युक्तस्तप्तायःपिण्डवत्सदा ।
तेन देहस्य तादात्म्याद्देहश्चेतनवान्भवेत् ॥ १४ ॥

देहोऽहमिति बुद्धिः स्यादात्मनोऽहङ्कृतेर्बलात् ।
तन्मूल एष संसारः सुखदुःखादिसाधकः ॥ १५ ॥

अनेक सहस्त्र योजने आम्ही उड्डाण केले. त्यानंतर जटायू हा सूर्याच्या उष्णतेने होरपळू लागला. त्याचे रक्षण करण्यासाठी दयेने मी त्याला माझ्या पंखांनी झाकून टाकल्यामुळे सूर्याच्या किरणांनी माझे दोन्ही पंख जळून गेले आणि मी विंध्यपर्वताच्या या शिखरावर पडलो. वानरश्रेष्ठांनो, खूप उंचीवरून खाली पडल्यामुळे मी मूर्च्छित झालो. (४-५)

पुढे तीन दिवसांनंतर मी शुद्धीवर आलो. परंतु पंख जळून गेल्यामुळे माझे मन भ्रमिष्ट झाले होते आणि त्यामुळे तो देश कोणता आणि आजूबाजूंची पर्वतांची शिखरे कोणती हे मला काहीच उमजेनासे झाले . (६)

मी हळूहळू डोळे उघडले. तेव्हा मला एक पवित्र आश्रम दिसला. मी सावकाश त्या आश्रमाजवळ गेलो. (७)

तेथे आश्रमात राहाणारे चंद्रमा नावाचे मुनिराज मला पाहून विस्मित झाले आणि म्हणाले, "अरे संपाती, हे काय ? तुझे रूप कुणी बरे विद्रूप केले आहे ? (८)

मी तुला पूर्वी ओळखत होतो. तू पूर्वी अत्यंत बलवान होतास. तुझे पंख कशामुळे जळून गेले ? जर तुला योग्य वाटेल तर तू सर्व काही मला सांग." (९)

तेव्हा मी त्यांना माझे सर्व कृत्य सांगितले आणि अतिशय दुःखी होऊन त्या मुनिश्रेष्ठाला म्हणालो, "मी आता दावाग्नीत शिरून जळून मरतो. (१०)

कारण हे प्रभो, पंख नसणारा मी कसा बरे माझ्या जीवनाचे रक्षण करू शकेन?" मी असे म्हटल्यावर त्या मुनींनी दयार्द्र दृष्टीने माझ्याकडे पाहिले आणि म्हटले. (११)

'वत्सा, आता माझे वचन ऐक आणि मग जशी तुझी इच्छा असेल तसे तू कर. या दुःखाचे मूळ हा देह असून तो कर्मांमुळे उत्पन्न होतो. (१२)

देह म्हणजे मी, अशी बुद्धी झाली की पुरुषाची कर्मे प्रवृत्त होतात. अहंकार हा अनादी व अचेतन असून तो अविद्येपासून निर्माण होतो. (१३)

अग्नीने तप्त झालेला लोखंडाचा गोळा ज्या प्रमाणे अग्नीसारखे कार्य करतो, त्या प्रमाणे हा अहंकार सदा चिदाभासाने व्याप्त असून, त्याचे देहाशी तादात्म्य झाले की देह हा चैतन्याने युक्त होतो. (१४)

त्या अहंकाराच्या सामर्थ्यानेच 'मी देह आहे' अशी बुद्धी आत्म्याला होते. आणि त्या तादात्म्यामुळेच सुख-दुःखे देणारा हा जन्म-मरणरूप संसार उत्पन्न होतो व तो प्राण्यांना भोगावा लागतो. (१५)

सप्तमे मासि रोमाणि शिर: केशास्तथैव च ।
विभक्तावयवत्वं च सर्वं सम्पद्यतेऽष्टमे ॥ ३० ॥

सातव्या महिन्यात अंगावरील बारीक लव आणि डोक्यावरील केस निर्माण होतात. मग आठव्या महिन्यात सर्वच अवयव स्पष्ट आणि विभक्त असे होतात. (३०)

जठरे वर्धते गर्भ: स्त्रिया एवं विहङ्गम ।
पञ्चमे मासि चैतन्यं जीव: प्राप्नोति सर्वश: ॥ ३१ ॥

हे गृध्र पक्ष्या, या प्रमाणे स्त्रीच्या उदरात गर्भ वाढत जातो. पाचव्या महिन्यात जीवाला संपूर्णपणे चेतनशक्ती प्राप्त होते. (३१)

नाभिसूत्राल्परन्ध्रेण मातृभुक्तान्नसारत: ।
वर्धते गर्भग: पिण्डो न म्रियेत स्वकर्मत: ॥ ३२ ॥

बेंबीत असणाऱ्या नाळेच्या सूक्ष्म छिद्रातून येणाऱ्या, आईने खालेल्या अन्नाच्या सारामुळे गर्भातील पिंड वाढत राहातो. स्वत:च्या कर्मामुळे तो मरत नाही. (३२)

स्मृत्वा सर्वाणि जन्मानि पूर्वकर्माणि सर्वश: ।
जठरानलतप्तोऽयमिदं वचनमब्रवीत् ॥ ३३ ॥

गर्भात असताना त्याला आपले पूर्वीचे सर्व जन्म आणि पूर्वीची सर्व कर्मे आठवतात. आईच्या जठराग्नीने तापलेला तो जीव असे म्हणू लागतो. (३३)

नानायोनिसहस्त्रेषु जायमानोऽनुभूतवान् ।
पुत्रदारादिसम्बन्धं कोटिश: पशुबान्धवान् ॥ ३४ ॥

'आजपर्यंत नाना प्रकारच्या हजारो योनींमध्ये जन्म घेऊन मी कोट्यवधी पुत्र, पत्नी इत्यादींचे संबंध त्याचप्रमाणे पशू व बांधव यांचा अनुभव घेतला आहे. (३४)

कुटुम्बभरणासक्त्या न्यायान्यायैर्धनार्जनम् ।
कृतं नाकरवं विष्णुचिन्तां स्वप्नेऽपि दुर्भग: ॥ ३५ ॥

कुटुंबाचे पोषण करण्याच्या आसक्तीने मी न्याय्य मार्गाने अथवा अन्याय्य मार्गाने धनार्जन केले. परंतु दुर्भाग्यामुळे मी स्वप्नातसुद्धा विष्णूचे चिंतन केले नाही. (३५)

इदानीं तत्फलं भुञ्जे गर्भदु:खं महत्तरम् ।
अशाश्वते शाश्वतवद्देहे तृष्णासमन्वित: ॥ ३६ ॥

म्हणून आता त्याचे फळ म्हणून गर्भवासातील फार मोठे दु:ख मी भोगीत आहे. आणि नश्वर देहाला शाश्वताप्रमाणे मानून त्याच्या तृष्णेने युक्त होऊन मी बसलो आहे. (३६)

अकार्याण्येव कृतवान्न कृतं हितमात्मन: ।
इत्येवं बहुधा दु:खमनुभूय स्वकर्मत: ॥ ३७ ॥

पूर्वी करू नयेत ती कुकर्मे मी केली, पण स्वत:चे कोणतेही हित मात्र केले नाही आणि याच कारणाने मी स्वत:च्या कर्मांनीच नाना प्रकारचे दु:ख भोगत आलो आहे. (३७)

कदा निष्क्रमणं मे स्याद्गर्भान्निरयसन्निभात् ।
इत ऊर्ध्वं नित्यमहं विष्णुमेवानुपूजये ॥ ३८ ॥

आता या नरकसदृश अशा गर्भातून मी केव्हा बरे बाहेर पडेन, हे मला माहीत नाही . यानंतर मात्र मी नित्य विष्णूचीच उपासना करीन.' (३८)

इत्यादि चिन्तयञ्जीवो योनियन्त्रप्रपीडित: ।
जायमानोऽतिदु:खेन नरकात्पातकी यथा ॥ ३९ ॥

इत्यादी विचार करणारा तो जीव योनीच्या चिमट्याने पीडित होऊन, ज्याप्रमाणे नरकातून पातकी माणूस बाहेर पडतो त्याप्रमाणे तो अतिशय कष्टाने योनीतून बाहेर पडून जन्माला येतो . (३९)

पूतिव्रणान्निपतित: कृमिरेष इवापर: ।
ततो बाल्यादिदु:खानि सर्व एवं विभुञ्जते ॥ ४० ॥

पुवाने भरलेल्या व्रणातून एखादा कृमी बाहेर पडावा, त्या प्रमाणे तो योनीतून बाहेर पडतो. त्यानंतर बालपण इत्यादी अवस्थांतील सर्वच दु:खे तो भोगतो. सर्व प्राण्यांना ही सर्व दु:खे भोगावी लागतातच. (४०)

त्वया चैवानुभूतानि सर्वत्र विदितानि च ।
न वर्णितानि मे गृध्र यौवनादिषु सर्वत: ॥ ४१ ॥

हे गिधाडा, त्यानंतर तारुण्य इत्यादी अवस्थांतील सर्व दु:खे तू अनुभवली आहेसच आणि ती सर्वांना विदित आहेतच. म्हणून मी त्यांचे वर्णन केलेले नाही. (४१)

एवं देहोऽहमित्यस्मादध्यासान्निरयादिकम् ।
गर्भवासादिदुःखानि भवन्त्यभिनिवेशतः ॥ ४२ ॥

अशा प्रकारे 'मी देह आहे' या खोट्या कल्पनेने येणाऱ्या देहाभिमानाच्या अभिनिवेशामुळे नरक इत्यादीतील दुःखे आणि गर्भवास इत्यादी दुःखे जीवाला भोगावी लागतात. (४२)

तस्माद्देहद्वयादन्यमात्मानं प्रकृतेः परम् ।
ज्ञात्वा देहादिममतां त्यक्त्वात्मज्ञानवान् भवेत् ॥ ४३ ॥

म्हणून आत्मा हा स्थूल आणि सूक्ष्म या दोन देहांपेक्षा भिन्न आहे आणि तो प्रकृतीच्या पलीकडे आहे हे जाणून, देह इत्यादींवरील ममता टाकून देऊन, माणसाने आत्मज्ञानाने संपन्न व्हावयास हवे. (४३)

जाग्रदादिविनिर्मुक्तं सत्यज्ञानादिलक्षणम् ।
शुद्धं बुद्धं सदा शान्तमात्मानमवधारयेत् ॥ ४४ ॥

आत्मा हा जागृती इत्यादी अवस्थांनी रहित, सत्य आणि ज्ञान हे स्वरूप असणारा, शुद्ध, बुद्ध आणि सदा शांत आहे, असे जाणावे. (४४)

चिदात्मनि परिज्ञाते नष्टे मोहेऽज्ञसम्भवे ।
देहः पततु वारब्धकर्मवेगेन तिष्ठतु ॥ ४५ ॥

योगिनो न हि दुःखं वा सुखं वाज्ञानसम्भवम् ।
तस्माद्देहेन सहितो यावत्प्रारब्धसङ्क्षयः ॥ ४६ ॥

तावत्तिष्ठ सुखेन त्वं धृतकञ्चुकसर्पवत् ।
अन्यद्वक्ष्यामि ते पक्षिन् शृणु मे परमं हितम् ॥ ४७ ॥

चेतनस्वरूप आत्म्याला जाणल्यावर आणि अज्ञानापासून उत्पन्न होणारा मोह नष्ट झाल्यावर, मग प्रारब्ध कर्मांच्या सामर्थ्याने हा देह पडो अथवा राहो, योगी पुरुषाला अज्ञानापासून निर्माण होणारे कोणतेही सुख किंवा दुःख यांची बाधा होत नाही. म्हणून जोपर्यंत तुझ्या प्रारब्ध कर्मांचा नाश होत नाही, तोपर्यंत तू कात सांभाळणाऱ्या सापाप्रमाणे, तुझा देह सांभाळीत सुखाने राहा. हे गृध्र पक्ष्या, तुला अतिशय हितकारक असणारी आणखी एक गोष्ट मी सांगतो, ती ऐक. (४५-४७)

त्रेतायुगे दाशरथिर्भूत्वा नारायणोऽव्ययः ।
रावणस्य वधार्थाय दण्डकानागमिष्यति ॥ ४८ ॥

सीतया भार्यया सार्धं लक्ष्मणेन समन्वितः ।
तत्राश्रमे जनकजां भ्रातृभ्यां रहिते वने ॥ ४९ ॥

रावणश्चोरवन्नीत्वा लङ्कायां स्थापयिष्यति ।
तस्याः सुग्रीवनिर्देशाद्वानराः परिमार्गणे ॥ ५० ॥

आगमिष्यन्ति जलधेस्तीरं तत्र समागमः ।
त्वया तैः कारणवशाद्भविष्यति न संशयः ॥ ५१ ॥

त्रेतायुगात राजा दशरथांचे पुत्र राम बनून, अव्यय असे नारायण रावणाच्या वधासाठी दंडकारण्यात येतील. ते श्रीराम आपली पत्नी सीता व भाऊ लक्ष्मण यांच्यासह असतील. तेथे ते दोघे भाऊ हजर नसताना वनातील आश्रमामधून रावण एकाद्या चोराप्रमाणे सीतेला पळवून नेऊन लंकेमध्ये ठेवील. त्यानंतर सुग्रीवाच्या आज्ञेने त्या सीतेचा शोध करण्यासाठी काही वानर समुद्राच्या तीरावर येतील. तेथे काही निमित्ताने त्यांच्याबरोबर तुझी भेट होईल, यात संशय नाही. (४८-५१)

तदा सीतास्थितिं तेभ्यः कथयस्व यथार्थतः ।
तदैव तव पक्षौ द्वावुत्पत्स्येते पुनर्नवौ ॥ ५२ ॥

त्या वेळी तू त्यांना सीतेचा पत्ता बरोबर सांग. त्याच वेळी तुला दोन नवीन पंख फुटतील." (५२)

*सम्पातिरुवाच*

बोधयामास मां चन्द्रनामा मुनिकुलेश्वरः ।
पश्यन्तु पक्षौ मे जातौ नूतनावतिकोमलौ ॥ ५३ ॥

**संपाती म्हणाला** – हे वानरांनो, अशा प्रकारे त्या चंद्र नावाच्या मुनिकुळातील श्रेष्ठांनी मला उपदेश केला. (त्या वेळेपासून मी शांत होऊन तुमची वाट पाहात राहिलो.) बघा, आता मला हे दोन नवीन आणि अतिशय कोमल असे पंख फुटले आहेत. (५३)

स्वस्ति वोऽस्तु गमिष्यामि सीतां द्रक्ष्यथ निश्चयम् ।
यत्नं कुरुध्वं दुर्लङ्घ्यसमुद्रस्य विलङ्घने ॥ ५४ ॥

तुमचे कल्याण होवो. मी आता जातो. तुम्हांला सीता निश्चितपणे सापडेल यात शंका नाही. तेव्हा आता ओलांडण्यास कठीण अशा समुद्राचे उल्लंघन करण्यासाठी प्रयत्न करा. (५४)

यन्नामस्मृतिमात्रतोऽपरिमितं
संसारवारांनिधिं
तीर्त्वा गच्छति दुर्जनोऽपि परमं
विष्णोः पदं शाश्वतम् ।
तस्यैव स्थितिकारिणस्त्रिजगतां
रामस्य भक्ताः प्रिया
यूयं किं न समुद्रमात्रतरणे
शक्ताः कथं वानराः ॥ ५५ ॥

अरे वानरांनो, ज्यांच्या नावाच्या केवळ स्मरणाने दुर्जन माणूससुद्धा अपरंपार असा संसाररूपी सागर तरून जाऊन विष्णूंचे परम व शाश्वत असे पद प्राप्त करून घेतो, त्याच तीनही लोकांचे पालन करणाऱ्या, श्रीरामांचे तुम्ही प्रिय भक्त आहात. तेव्हा हा क्षुल्लक समुद्र तरून जाण्यात तुम्ही का व कसे बरे समर्थ होणार नाही ?" (५५)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किन्धाकाण्डेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

# नवम सर्ग

## समुद्र उल्लंघून जाण्यासंबंधी वानरांची चर्चा

*श्रीमहादेव उवाच*

गते विहायसा गृध्रराजे वानरपुङ्गवाः ।
हर्षेण महताविष्टाः सीतादर्शनलालसाः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, गिधाडांचा राजा संपाती आकाशमार्गाने निघून गेल्यावर, सीतेची भेट घेण्याची अतिशय उत्कंठा असणारे ते श्रेष्ठ वानर तिचा पत्ता लागल्याने अतिशय आनंदित झाले. (१)

ऊचुः समुद्रं पश्यन्तो नक्रचक्रभयङ्करम् ।
तरङ्गादिभिरुन्नद्धमाकाशमिव दुर्ग्रहम् ॥ २ ॥

परस्परमवोचन्वै कथमेनं तरामहे ।
उवाच चाङ्गदस्तत्र शृणुध्वं वानरोत्तमाः ॥ ३ ॥

पण मगरी आणि भोवरे यांच्यामुळे भयंकर असणारा, लाटा इत्यादींनी सतत उसळत राहाणारा, आणि आकाशाप्रमाणे दुर्लंघ्य असा समुद्र त्या वानरांनी पाहिला. तेव्हा ते एकमेकांना म्हणू लागले, 'हा समुद्र आपण कसा बरे तरून जाऊ शकू ?' त्यावेळी तेथे अंगद म्हणाला, "हे वानरश्रेष्ठांनो, मी काय म्हणतो ते ऐका. (२-३)

भवन्तोऽत्यन्तबलिनः शूराश्च कृतविक्रमाः ।
को वात्र वारिधिं तीर्त्वा राजकार्यं करिष्यति ॥ ४ ॥

तुम्ही सर्वजण बलवान शूरवीर असून तुम्ही आत्तापर्यंत अनेक पराक्रम केलेले आहेत. तेव्हा येथे तुमच्या मध्ये असा कोण आहे की जो हा समुद्र तरून जाऊन, सुग्रीव राजाचे कार्य पूर्ण करील ? (४)

एतेषां वानराणां स प्राणदाता न संशयः ।
तदुत्तिष्ठतु मे शीघ्रं पुरतो यो महाबलः ॥ ५ ॥

तो या सर्व वानरांना जीवदान देईल यात संशय नाही. म्हणून तुमच्यापैकी असा जो कोणी महाबलवान आहे त्याने चट्दिशी येऊन माझ्यापुढे यावे. (५)

वानराणां च सर्वेषां रामसुग्रीवयोरपि ।
स एव पालको भूयान्नात्र कार्या विचारणा ॥ ६ ॥

तो वानरच सर्व वानरांचा तसेच राम व सुग्रीव यांचा रक्षक ठरेल. या बाबतीत मुळीच विचार करण्याचे कारण नाही." (६)

इत्युक्ते युवराजेन तूष्णीं वानरसैनिकाः ।
आसन्नोचुः किञ्चिदपि परस्परविलोकिनः ॥ ७ ॥

युवराज अंगदाने असे म्हटल्यावर, वानर सैनिक गप्प बसून राहिले. आणि परस्परांकडे पाहात, ते काहीही बोलले नाहीत. (७)

अङ्गद उवाच

उच्यतां वै बलं सर्वैः प्रत्येकं कार्यसिद्धये ।
केन वा साध्यते कार्यं जानीमस्तदनन्तरम् ॥ ८ ॥

**अंगद म्हणाला**- "आता तुम्हांपैकी प्रत्येकाने या कार्याच्या सिद्धीसाठी आपले सामर्थ्य किती आहे, हे सांगावे. त्यानंतर हे कार्य कोणाकडून साधले जाईल, हे आम्हांला कळू शकेल." (८)

अङ्गदस्य वचः श्रुत्वा प्रोचुर्वीरा बलं पृथक् ।
योजनानां दशारभ्य दशोत्तरगुणं जगुः ॥ ९ ॥

अंगदाचे वचन ऐकल्यावर वानर-वीरांनी स्वतंत्रपणे आपापले सामर्थ्य कथन केले. दहा योजनांपासून सुरवात करून क्रमाने दहा योजनांच्या दहा दहा योजने अधिक उड्डाण होईल असे त्या वानरांनी सांगितले. (९)

शतादर्वाग्जाम्बवांस्तु प्राह मध्ये वनौकसाम् ।
पुरा त्रिविक्रमे देवे पादं भूमानलक्षणम् ॥ १० ॥

त्रिःसप्तकृत्वोऽहमगां प्रदक्षिणविधानतः ।
इदानीं वार्धकग्रस्तो न शक्नोमि विलङ्घितुम् ॥ ११ ॥

वनात राहाणाऱ्या प्राण्यांपैकी त्या जांबवान अस्वलाने आपली शक्ती शंभर योजनांपेक्षा काही कमी अंतर इतके जाण्याची आहे, असे सांगितले. तो पुढे म्हणाला, "पूर्वी जेव्हा श्रीविष्णूंनी वामन अवतार घेतला होता, तेव्हा त्या वामनाचे एक पाऊल पृथ्वीएवढ्या मापाचे होते. त्या वेळी मी एकवीस वेळा त्याला प्रदक्षिणा घातल्या होत्या. परंतु आता मी वार्धक्याने ग्रस्त असल्याने समुद्राचे उल्लंघन करू शकणार नाही." (१०-११)

अङ्गदोऽप्याह मे गन्तुं शक्यं पारं महोदधेः ।
पुनर्लङ्घनसामर्थ्यं न जानाम्यस्ति वा न वा ॥ १२ ॥

तेव्हा अंगदसुद्धा म्हणाला, "या महासागराच्या पलीकडे मला जाता येईल. परंतु पुनः परत येण्याचे सामर्थ्य माझ्याजवळ आहे की नाही, हे मात्र मला माहीत नाही." (१२)

तमाह जाम्बवान्वीरस्त्वं राजा नो नियामकः ।
न युक्तं त्वां नियोक्तुं मे त्वं समर्थोऽसि यद्यपि ॥ १३ ॥

तेव्हा वीर जांबवान त्याला म्हणाला, "तू वीर आहेस. आणि तू हे कार्य करण्यास समर्थ असलास तरी या कार्यासाठी तुझी योजना करणे, हे मला योग्य वाटत नाही. कारण तू आमचा नायक आहेस आणि नियामक आहेस." (१३)

अङ्गद उवाच

एवं चेत्पूर्ववत्सर्वे स्वप्स्यामो दर्भविष्टरे ।
केनापि न कृतं कार्यं जीवितुं च न शक्यते ॥ १४ ॥

**अंगद म्हणाला**- "असे जर असेल तर आपण सर्वजण पूर्वीप्रमाणे कुशासनांवर प्रायोपवेशन करण्यास पडून राहू. कारण हे कार्य कुणाकडूनही झाले नाही तर अशा स्थितीत जिवंत राहाणे, हेही आपणांस शक्य होणार नाही." (१४)

तमाह जाम्बवान्वीरो दर्शयिष्यामि ते सुत ।
येनास्माकं कार्यसिद्धिर्भविष्यत्यचिरेण च ॥ १५ ॥

तेव्हा वीर जांबवान त्याला म्हणाला, "वत्सा, ज्याच्याकडून आपली कार्य-सिद्धी झटपट होईल, असा वानर- वीर मी तुला दाखवितो." (१५)

इत्युक्त्वा जाम्बवान्प्राह हनूमन्तमवस्थितम् ।
हनूमन्किं रहस्तूष्णीं स्थीयते कार्यगौरवे ॥ १६ ॥

प्राप्तेऽज्ञेनेव सामर्थ्यं दर्शयाद्य महाबल ।
त्वं साक्षाद्वायुतनयो वायुतुल्यपराक्रमः ॥ १७ ॥

असे बोलून जांबवान तेथे जवळच उभ्या असलेल्या हनुमंताला म्हणाला, 'अरे हनुमाना, हे महान कार्य उपस्थित झाले असताना, एखाद्या अज्ञानी माणसाप्रमाणे तू बाजूला एकटाच गप्प का उभा राहिला आहेस ? अरे सामर्थ्यसंपन्न हनुमाना, तू साक्षात वायूचा पुत्र आहेस आणि वायूप्रमाणेच तुझा पराक्रम आहे. तेव्हा आज तू आपले सामर्थ्य दाखव. (१६-१७)

रामकार्यार्थमेव त्वं जनितोऽसि महात्मना ।
जातमात्रेण ते पूर्वं दृष्ट्वोद्यन्तं विभावसुम् ॥ १८ ॥

पक्वं फलं जिघृक्षामीत्युत्प्लुतं बालचेष्टया ।
योजनानां पञ्चशतं पतितोऽसि ततो भुवि ॥ १९॥

अरे महात्म्या, वायूने तुला श्रीरामांचे कार्य करण्यासाठीच जन्माला घातले आहे. पूर्वी जन्माला येताच उगवणारा सूर्य पाहून, 'हे पिकले फळ मी घेतो,' असा विचार करून, तू बाललीला करीत पाचशे योजने उड्डाण करून मग जमिनीवर पडला होतास. (१८-१९)

अतस्त्वद्बलमाहात्म्यं को वा शक्नोति वर्णितुम् ।
उत्तिष्ठ कुरु रामस्य कार्यं नः पाहि सुव्रत ॥ २० ॥

म्हणून तुझ्या सामर्थ्याचे माहात्म्य वर्णन करण्यास कोण बरे समर्थ आहे ? तेव्हा, हे सुव्रता, ऊठ. रामाचे कार्य कर आणि आमचे रक्षण कर." (२०)

श्रुत्वा जाम्बवतो वाक्यं हनूमानतिहर्षितः ।
चकार नादं सिंहस्य ब्रह्माण्डं स्फोटयन्निव ॥ २१ ॥

जांबवानाचे हे वाक्य ऐकून हनुमान अतिशय आनंदित झाला. आणि जणू ब्रह्मांड फोडणारा असा प्रचंड सिंहनाद त्याने केला. (२१)

बभूव पर्वताकारस्त्रिविक्रम इवापरः ।
लङ्घयित्वा जलनिधिं कृत्वा लङ्कां च भस्मसात् ॥ २२ ॥

रावणं सकुलं हत्वानेष्ये जनकनन्दिनीम् ।
यद्वा बद्ध्वा गले रज्वा रावणं वामपाणिना ॥ २३ ॥

लङ्कां सपर्वतां धृत्वा रामस्याग्रे क्षिपाम्यहम् ।
यद्वा दृष्ट्वैव यास्यामि जानकीं शुभलक्षणाम् ॥ २४ ॥

तो पर्वताच्या आकाराचा झाला. जणू तो दुसरा वामन आहे असे वाटत होते. तो गर्जना करू लागला, "अरे वानरांनो, हा समुद्र उल्लंघून, लंकेला भस्मसात् करतो आणि कुळासकट रावणाला ठार करून मी जनकाच्या कन्येला परत आणतो किंवा तुम्ही म्हणाल तर रावणाच्या गळ्यात दोर बांधून आणि डाव्या हाताने पर्वतासकट लंका पकडून मी त्याला श्रीरामांच्या पुढे उभा करतो, किंवा शुभलक्षणी जानकीला जिवंत पाहूनच परत येतो." (२२-२४)

श्रुत्वा हनुमतो वाक्यं जाम्बवानिदमब्रवीत् ।
दृष्ट्वैवागच्छ भद्रं ते जीवन्तीं जानकीं शुभाम् ॥ २५ ॥

हनुमंताचे वाक्य ऐकून जांबवान असे म्हणाला, "हनुमाना, तुझे कल्याण होवो. शुभलक्षणी जानकीला जिवंत पाहूनच तू परत ये. (२५)

पश्चाद्रामेण सहितो दर्शयिष्यसि पौरुषम् ।
कल्याणं भवताद्भद्र गच्छतस्ते विहायसा ॥ २६ ॥

मग श्रीरामांबरोबर लंकेत जाऊन तू तुझे सामर्थ्य दाखव. हे कल्याणा, आकाशमार्गाने जाणाऱ्या तुझे कल्याण असो. (२६)

गच्छन्तं रामकार्यार्थं वायुस्त्वामनुगच्छतु ।
इत्याशीर्भिः समामन्त्र्य विसृष्टः प्लवगाधिपैः ॥ २७ ॥

श्रीरामांच्या कार्यासाठी जाणाऱ्या तुझ्या मागोमाग वायुदेवता तुझ्याबरोबर येवो." अशा प्रकारे आशीर्वाद देऊन त्या वानरश्रेष्ठांनी हनुमानाला निरोप दिला. (२७)

महेन्द्राद्रिशिरो गत्वा बभूवाद्भुतदर्शनः ॥ २८ ॥

मग मारुती महेंद्र पर्वताच्या शिखरावर गेला. तेथे त्याने अद्‌भुत रूप धारण केले. (२८)

महानगेन्द्रप्रतिमो महात्मा
सुवर्णवर्णोऽरुणचारुवक्त्रः ।
महाफणीन्द्राभसुदीर्घबाहु-
र्वातात्मजोऽदृश्यत सर्वभूतैः ॥ २९ ॥

त्या वेळी महान पर्वतराजाप्रमाणे असणारा, सुवर्णवर्ण, बाल सूर्याप्रमाणे लाल आणि सुंदर मुख असणारा, महान सर्पराजाप्रमाणे दीर्घ बाहू असणारा, असा तो महात्मा वायुपुत्र हनुमान सर्व प्राण्यांना दिसला. (२९)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

## किष्किन्धाकाण्ड समाप्त

ॐ

# अध्यात्मरामायण

## सुन्दरकाण्ड

## प्रथम सर्ग

### हनुमानाचे समुद्र-उल्लंघन आणि त्याचा लंकेत प्रवेश

*श्रीमहादेव उवाच*

शतयोजनविस्तीर्णं समुद्रं मकरालयम् ।
लिलङ्घयिषुरानन्दसन्दोहो मारुतात्मजः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, आनंदाचा डोह असणाऱ्या हनुमानाने शंभर योजने विस्तृत असणाऱ्या आणि मगरींचे वसति-स्थान असणाऱ्या समुद्र उल्लंघून जाण्याची तयारी केली. (१)

ध्यात्वा रामं परात्मानमिदं वचनमब्रवीत् ।
पश्यन्तु वानराः सर्वे गच्छन्तं मां विहायसा ॥ २ ॥

अमोघं रामनिर्मुक्तं महाबाणमिवाखिलाः ।
पश्याम्यद्यैव रामस्य पत्नीं जनकनन्दिनीम् ॥ ३ ॥

नंतर परमात्मा श्रीरामांचे स्मरण करून हनुमान म्हणाला, "अरे वानरांनो, श्रीरामांनी सोडलेल्या अमोघ व प्रचंड बाणाप्रमाणे आकाशमार्गाने जाणाऱ्या मला तुम्ही आता सर्व जण बघा. मी आजच जनकाची कन्या असणाऱ्या श्रीरामांच्या पत्नीला भेटेन. (२-३)

कृतार्थोऽहं कृतार्थोऽहं पुनः पश्यामि राघवम् ।
प्राणप्रयाणसमये यस्य नाम सकृत्स्मरन् ॥ ४ ॥

नरस्तीर्त्वा भवाम्भोधिमपारं याति तत्पदम् ।
किं पुनस्तस्य दूतोऽहं तदङ्गाङ्गुलिमुद्रिकः ॥ ५ ॥

तमेव हृदये ध्यात्वा लङ्घयाम्यल्पवारिधिम् ।
इत्युक्त्वा हनुमान्बाहू प्रसार्यायतवालधिः ॥ ६ ॥

ऋजुग्रीवोर्ध्वदृष्टिः सन्नाकुञ्चितपदद्वयः ।
दक्षिणाभिमुखस्तूर्णं पुप्लुवेऽनिलविक्रमः ॥ ७ ॥

अशा रीतीने कृतार्थ व कृतकृत्य होऊन मी पुनः श्रीराघवांचे दर्शन घेईन. प्राणप्रयाणाच्या वेळी ज्यांचे नाव एकदाच स्मरण करणारा माणूस हा अपार भवसागर तरून, श्रीरामांचे श्रेष्ठ स्थानी जातो, अशा त्या श्रीरामांचा मी दूत आहे. त्यांच्या बोटातील मुद्रिका माझ्याजवळ आहे. श्रीरामांचेच ध्यान माझ्या हृदयात करीत मी हा तुच्छ समुद्र ओलांडून जाईन. त्यात काय मोठे " ? असे बोलून हनुमानाने आपले बाहू पसरले, शेपटी सरळ लांब केली, मान सरळ केली, दृष्टी वर केली आणि दोन्ही पाय जवळ घेतले, दक्षिणेकडे तोंड केले आणि वायूप्रमाणे पराक्रमी असणाऱ्या हनुमानाने लगेच उड्डाण केले . (४-७)

आकाशात्त्वरितं देवैर्वीक्ष्यमाणो जगाम सः ।
दृष्ट्वानिलसुतं देवा गच्छन्तं वायुवेगतः ॥ ८ ॥

परीक्षणार्थं सत्त्वस्य वानरस्येदमब्रुवन् ।
गच्छत्येष महासत्त्वो वानरो वायुविक्रमः ॥ ९ ॥

देवगण पाहात असताना तो हनुमान आकाशातून त्वरेने जात होता. त्या वेळी वायुवेगाने जाणाऱ्या पवनसुत हनुमानाला पाहून, त्याच्या सामर्थ्याची परीक्षा पाहण्यास देव आपापसात म्हणू लागले-"वायूसारखा पराक्रमी आणि महासामर्थ्यसंपन्न, असा हा वानर जात आहे. (८-९)

लङ्कां प्रवेष्टुं शक्तो वा न वा जानीमहे बलम् ।
एवं विचार्य नागानां मातरं सुरसाभिधाम् ॥ १० ॥

परंतु तो लंकेत प्रवेश करण्यास समर्थ होईल की नाही हे कळत नाही. म्हणून याच्या सामर्थ्याची परीक्षा घ्यावयास हवी." अशा कुतूहलाने देवतांचा समूह सुरसा

अब्रवीद्देवतावृन्दः कौतूहलसमन्वितः ।
गच्छ त्वं वानरेन्द्रस्य किञ्चिद्विघ्नं समाचर ॥ ११ ॥

ज्ञात्वा तस्य बलं बुद्धिं पुनरेहि त्वरान्विता ।
इत्युक्ता सा ययौ शीघ्रं हनुमद्विघ्नकारणात् ॥ १२ ॥

नावाच्या नागांच्या मातेला म्हणाला, "सुरसे, तू आता जा आणि त्या श्रेष्ठ वानराच्या मार्गात काही तरी विघ्न आण. त्याचे बळ आणि बुद्धी हे जाणून घेऊन तू त्वरेने परत ये." देवांनी असे सांगितल्यावर, हनुमानाच्या मार्गात विघ्न आणण्यासाठी सुरसा त्वरित निघाली. (१०-१२)

आवृत्य मार्गं पुरतः स्थित्वा वानरमब्रवीत् ।
एहि मे वदनं शीघ्रं प्रविशस्व महामते ॥ १३ ॥

देवैस्त्वं कल्पितो भक्ष्यः क्षुधासम्पीडितात्मनः ।
तामाह हनुमान्मातरहं रामस्य शासनात् ॥ १४ ॥

गच्छामि जानकीं द्रष्टुं पुनरागम्य सत्वरः ।
रामाय कुशलं तस्याः कथयित्वा त्वदाननम् ॥ १५ ॥

निवेक्ष्ये देहि मे मार्गं सुरसायै नमोऽस्तु ते ।
इत्युक्ता पुनरेवाह सुरसा क्षुधितास्म्यहम् ॥ १६ ॥

प्रविश्य गच्छ मे वक्त्रं नो चेत्त्वां भक्षयाम्यहम् ।
इत्युक्तो हनुमानाह मुखं शीघ्रं विदारय ॥ १७ ॥

प्रविश्य वदनं तेऽद्य गच्छामि त्वरयान्वितः ।
इत्युक्त्वा योजनायामदेहो भूत्वा पुरः स्थितः ॥ १८ ॥

हनुमानाचा मार्ग अडवून आणि त्याच्यापुढे उभी राहून ती म्हणाली, "हे महाबुद्धिमान वानरा, ये आणि माझ्या तोंडात शीघ्र प्रवेश कर. भुकेने माझा जीव अगदी व्याकूळ झाला आहे. म्हणून देवांनीच तुला माझे भक्ष्य म्हणून तुझी योजना केली असावी." तेव्हा हनुमान तिला म्हणाला, "हे माते, मी श्रीरामांच्या आज्ञेने जानकीला भेटण्यासाठी जात आहे. भेटून सत्वर परत येतो, तिचे कुशल श्रीरामांना सांगून, मग मी तुझ्या तोंडात प्रवेश करतो. माझा रस्ता सोड. हे सुरसे, तुला माझा नमस्कार असो." हनुमान असे बोलल्यावर सुरसा त्याला पुनः म्हणाली, "मी अतिशय भुकेली आहे. तेव्हा तू सत्वर माझ्या तोंडात प्रवेश कर आणि मग जा. तू असे केले नाहीस तर मी तुला खाऊन टाकीन." तिने असे म्हटल्यावर हनुमान तिला म्हणाला, "तू पटकन तोंड उघड. आत्ताच तुझ्या तोंडात प्रवेश करून मी त्वरेने पुढे जातो." असे म्हणून आपला देह एक योजन लांब रुंद करून हनुमान तिच्या पुढे उभा राहिला. (१३-१८)

दृष्ट्वा हनूमतो रूपं सुरसा पञ्चयोजनम् ।
मुखं चकार हनुमान् द्विगुणं रूपमादधत् ॥ १९ ॥

हनुमानाचे ते रूप पाहून सुरसेने आपले मुख पाच योजने विस्तृत केले. तेव्हा हनुमानाने आपले रूप त्याच्या दुप्पट केले. (१९)

ततश्चकार सुरसा योजनानां च विंशतिम् ।
वक्त्रं चकार हनुमांस्त्रिंशद्योजनसम्मितम् ॥ २० ॥

त्यानंतर सुरसेने आपले तोंड वीस योजने लांब रुंद केले. तेव्हा हनुमानाने आपले शरीर तीस योजने लांब रुंद केले. (२०)

ततश्चकार सुरसा पञ्चाशद्योजनायतम् ।
वक्त्रं तदा हनूमांस्तु बभूवाङ्गुष्ठसन्निभः ॥ २१ ॥

मग सुरसेने आपले मुख पन्नास योजने विस्तृत केले. तेव्हा हनुमान पटकन अंगठ्या एवढ्या आकाराचा झाला. (२१)

प्रविश्य वदनं तस्याः पुनरेत्य पुरः स्थितः ।
प्रविष्टो निर्गतोऽहं ते वदनं देवि ते नमः ॥ २२ ॥

नंतर तिच्या मुखात प्रवेश करून, तिने तोंड बंद करण्यापूर्वी चट्दिशी पुनः बाहेर येऊन हनुमान तिच्यापुढे उभा राहिला आणि म्हणाला, "हे देवी, तुझ्या तोंडात प्रवेश करून मी पुनः बाहेर आलो आहे. आता तुला नमस्कार असो." (२२)

एवं वदन्तं दृष्ट्वा सा हनूमन्तमथाब्रवीत् ।
गच्छ साधय रामस्य कार्यं बुद्धिमतां वर ॥ २३ ॥

अशा प्रकारे त्याचे बोलणे ऐकून सुरसा हनुमंताला म्हणाली, "हे बुद्धिमंतामध्ये श्रेष्ठा, तू आता जा आणि श्रीरामांचे कार्य सिद्ध करून घे. (२३)

देवैः सम्प्रेषिताहं ते बलं जिज्ञासुभिः कपे ।
दृष्ट्वा सीतां पुनर्गत्वा रामं द्रक्ष्यसि गच्छ भोः ॥ २४ ॥

हे वानरा, तुझे बळ जाणून घेण्यासाठी देवांनी मला पाठविले होते. सीतेला भेटून आणि पुनः परत येऊन तू श्रीरामांना भेटशील. तू जा आता." (२४)

इत्युक्त्वा सा ययौ देवलोकं वायुसुतः पुनः ।
जगाम वायुमार्गेण गरुत्मानिव पक्षिराट् ॥ २५ ॥

असे सांगून ती देवलोकाला निघून गेली. त्यानंतर पुनः वायुसुत हनुमान पक्षिराज गरुडाप्रमाणे वायुमार्गाने पुढे गेला. (२५)

समुद्रोऽप्याह मैनाकं मणिकाञ्चनपर्वतम् ।
गच्छत्येष महासत्त्वो हनूमान्मारुतात्मजः ॥ २६ ॥

रामस्य कार्यसिद्ध्यर्थं तस्य त्वं सचिवो भव ।
सगरैर्वर्द्धितो यस्मात्पुराहं सागरोऽभवम् ॥ २७ ॥

त्यावेळी रत्ने आणि कांचन यांनी युक्त मैनाक पर्वताला समुद्र म्हणाला, "बघ, श्रीरामांचे कार्य सिद्ध करण्यासाठी हा महाशक्तिशाली मारुत- पुत्र हनुमान जात आहे. तू त्याचा सहायक हो. पूर्वीच्या काळी सगर नावाच्या राजाच्या पुत्रांनी मला वाढविले; म्हणून मला सागर म्हणतात. (२६-२७)

तस्यान्वये बभूवासौ रामो दाशरथिः प्रभुः ।
तस्य कार्यानुसिद्ध्यर्थं गच्छत्येष महाकपिः ॥ २८ ॥

त्या सगराच्या वंशातच दशरथ-तनय, प्रभू श्रीराम जन्माला आले आहेत. आणि हा महान वानर त्यांच्या कार्याची सिद्धी करण्यासाठी जात आहे. (२८)

त्वमुत्तिष्ठ जलात्तूर्णं त्वयि विश्रम्य गच्छतु ।
स तथेति प्रादुरभूज्जलमध्यान्महोन्नतः ॥ २९ ॥

नानामणिमयैः श्रृङ्गैस्तस्योपरि नराकृतिः ।
प्राह यान्तं हनूमन्तं मैनाकोऽहं महाकपे ॥ ३० ॥

तेव्हा तू पाण्यातून झटदिशी वर ऊठ. तुझ्या माथ्यावर विश्रांती घेऊन या वानराला जाऊ दे." 'ठीक आहे', असे म्हणून, नाना रत्नांनी युक्त अशा आपल्या शिखरांसह तो पाण्यामधून अतिशय उंच होऊन प्रकट झाला. त्या शिखरावर माणसाचे रूप धारण करून तो जाणाऱ्या हनुमंताला म्हणाला, "हे महावानरा, मी मैनाक पर्वत आहे. (२९-३०)

समुद्रेण समादिष्टस्त्वद्विश्रामाय मारुते ।
आगच्छामृतकल्पानि जग्ध्वा पक्वफलानि मे ॥ ३१ ॥

विश्रम्यात्र क्षणं पश्चाद्गमिष्यसि यथासुखम् ।
एवमुक्तोऽथ तं प्राह हनूमान्मारुतात्मजः ॥ ३२ ॥

हे मारुती, तुला विश्रांती द्यावी अशी समुद्राने मला आज्ञा केली आहे. तेव्हा ये, आणि अमृताप्रमाणे असणारी माझ्या शिखरावरील पिकलेली फळे खाऊन, येथेच क्षणभर विश्रांती घेऊन, नंतर तू सुखाने पुढे जा." असे त्याने म्हटल्यावर मारुतपुत्र हनुमान त्याला म्हणाला- (३१-३२)

गच्छतो रामकार्यार्थं भक्षणं मे कथं भवेत् ।
विश्रामो वा कथं मे स्याद्गन्तव्यं त्वरितं मया ॥ ३३ ॥

"श्रीरामांच्या कार्यासाठी मी जात असताना मला खाणे कसे बरे सुचेल ? किंवा मी विश्रांती तरी कशी घेऊ ? कारण मला ताबडतोब जायचे आहे." (३३)

इत्युक्त्वा स्पृष्टशिखरः कराग्रेण ययौ कपिः ।
किञ्चिद्दूरं गतस्यास्य छायां छायाग्रहोऽग्रहीत् ॥ ३४ ॥

असे बोलून आपल्या बोटाने मैनाक पर्वताच्या शिखराला स्पर्श करून मारुती पुढे गेला. तो थोडेसे दूर गेल्यावर छायाग्रहाने त्याच्या छायेला पकडले. (३४)

सिंहिका नाम सा घोरा जलमध्ये स्थिता सदा ।
आकाशगामिनां छायामाक्रम्याकृष्य भक्षयेत् ॥ ३५ ॥

तो छायाग्रह म्हणजे सिंहिका नावाची एक भयंकर राक्षसी होती. ती नेहमी पाण्यामध्ये राहात असे. आकाशातून जाणाऱ्या प्राण्यांची छाया पकडून ती त्यांना खेचून घेई आणि त्यांना खाऊन टाकी. (३५)

तया गृहीतो हनुमांश्चिन्तयामास वीर्यवान् ।
केनेदं मे कृतं वेगरोधनं विघ्नकारिणा ॥ ३६ ॥

तिने पकडल्यावर सामर्थ्यसंपन्न हनुमानाने विचार केला की, "माझ्या मार्गात विघ्न निर्माण करणाऱ्या कुणी बरे माझ्या वेगाला रोखून धरले आहे ? (३६)

दृश्यते नैव कोऽप्यत्र विस्मयो मे प्रजायते ।
एवं विचिन्त्य हनूमानधो दृष्टिं प्रसारयत् ॥ ३७ ॥

येथे तर कुणीही दिसत नाही. त्यामुळे मला फार आश्चर्य वाटत आहे." असा विचार करून हनुमंताने आपली दृष्टी खालच्या बाजूला टाकली. (३७)

तत्र दृष्ट्वा महाकायां सिंहिकां घोररूपिणीम् ।
पपात सलिले तूर्णं पद्भ्यामेवाहनद्रुषा ॥ ३८ ॥

तेव्हा तेथे त्याला धिप्पाड शरीराची आणि भयंकर रूप असणारी सिंहिका दिसली. लगेच त्याने पाण्यात उडी मारली आणि रागाने तिला दोन्ही पायांनी लाथा घालून ठार केले. (३८)

पुनरुत्प्लुत्य हनुमान्दक्षिणाभिमुखो ययौ ।
ततो दक्षिणमासाद्य कूलं नानाफलद्रुमम् ॥ ३९ ॥

नानापक्षिमृगाकीर्णं नानापुष्पलतावृतम् ।
ततो ददर्श नगरं त्रिकूटाचलमूर्धनि ॥ ४० ॥

नंतर पुन: वर आकाशात उड्डाण करून हनुमान दक्षिणेकडे तोंड करून निघाला आणि तो समुद्राच्या दक्षिण तीरावर पोचला. त्या तीरावर फळांनी भरलेले नाना प्रकारचे वृक्ष होते. नानाप्रकारचे पशू व पक्षी यांनी ते तीर भरलेले होते. तसेच ते विविध प्रकारच्या पुष्पलतांनी युक्त होते. त्यानंतर त्रिकूट पर्वताच्या माथ्यावर त्याला एक नगर दिसले. (३९-४०)

प्राकारैर्बहुभिर्युक्तं परिखाभिश्च सर्वत: ।
प्रवेक्ष्यामि कथं लङ्कामिति चिन्तापरोऽभवत् ॥ ४१ ॥

ते नगर अनेक तटांनी युक्त होते; ते तट सर्व बाजूंनी खंदकांनी वेढले होते. तेव्हा 'या लंका नगरीत कसा बरे प्रवेश करता येईल,' अशी चिंता मारुतीला लागली. (४१)

रात्रौ वेक्ष्यामि सूक्ष्मोऽहं लङ्कां रावणपालिताम् ।
एवं विचिन्त्य तत्रैव स्थित्वा लङ्कां जगाम स: ॥ ४२ ॥

रावणाने पालन केलेल्या या लंकेत मी सूक्ष्म रूप धारण करून रात्रीच्या वेळी प्रवेश करीन, असा विचार करून, तो रात्र होईपर्यंत तेथेच थांबला आणि मग रात्र पडल्यावर लंकेकडे जाण्यास निघाला. (४२)

धृत्वा सूक्ष्मं वपुर्द्वारं प्रविवेश प्रतापवान् ।
तत्र लङ्कापुरी साक्षाद्राक्षसीवेषधारिणी ॥ ४३ ॥

सूक्ष्म रूप धारण करून प्रतापी हनुमानाने लंकेच्या द्वारात प्रवेश केला. तेथे प्रत्यक्ष लंका नगरी ही राक्षसीचा वेष धारण करून उभी होती. (४३)

प्रविशन्तं हनूमन्तं दृष्ट्वा लङ्का व्यतर्जयत् ।
कस्त्वं वानररूपेण मामनादृत्य लङ्किनीम् ॥ ४४ ॥

प्रविश्य चोरवद्रात्रौ किं भवान्कर्तुमिच्छति ।
इत्युक्त्वा रोषताम्राक्षी पादेनाभिजघान तम् ॥ ४५ ॥

हनुमान प्रवेश करीत आहे हे पाहिल्यावर लंकेने त्याला दटावले. "मज लंकिनीचा अनादर करून, रात्री चोराप्रमाणे प्रवेश करणारा, वानराचे रूप धारण केलेला तू कोण आहेस? तुला काय पाहिजे ?" असे बोलून क्रोधाने डोळे लाल करून तिने त्या हनुमानाला आपल्या लाथेने तडाखा दिला. (४४-४५)

हनुमानपि तां वाममुष्टिनावज्ञयाहनत् ।
तदैव पतिता भूमौ रक्तमुद्वमती भृशम् ॥ ४६ ॥

तेव्हा हनुमानानेसुद्धा आपल्या डाव्या हाताचा ठोसा तिला लगावला. तत्काळ खूप रक्त ओकीत ती जमिनीवर पडली. (४६)

सिहिंका नाम सा घोरा जलमध्ये स्थिता सदा ।
आकाशगामिनां छायामाक्रम्याकृष्य भक्षयेत् ॥ ३५ ॥

तया गृहीतो हनुमांश्चिन्तयामास वीर्यवान् ।
केनेदं मे कृतं वेगरोधनं विघ्नकारिणा ॥ ३६ ॥

दृश्यते नैव कोऽप्यत्र विस्मयो मे प्रजायते ।
एवं विचिन्त्य हनूमानधो दृष्टिं प्रसारयत् ॥ ३७ ॥

तत्र दृष्ट्वा महाकायां सिंहिकां घोररूपिणीम् ।
पपात सलिले तूर्णं पद्भ्यामेवाहनद्रुषा ॥ ३८ ॥

पुनरुत्प्लुत्य हनुमान्दक्षिणाभिमुखो ययौ ।
ततो दक्षिणमासाद्य कूलं नानाफलद्रुमम् ॥ ३९ ॥

नानापक्षिमृगाकीर्णं नानापुष्पलतावृतम् ।
ततो ददर्श नगरं त्रिकूटाचलमूर्धनि ॥ ४० ॥

प्राकारैर्बहुभिर्युक्तं परिखाभिश्च सर्वतः ।
प्रवेक्ष्यामि कथं लङ्कामिति चिन्तापरोऽभवत् ॥ ४१ ॥

रात्रौ वेक्ष्यामि सूक्ष्मोऽहं लङ्कां रावणपालिताम् ।
एवं विचिन्त्य तत्रैव स्थित्वा लङ्कां जगाम सः ॥ ४२ ॥

धृत्वा सूक्ष्मं वपुर्द्वारं प्रविवेश प्रतापवान् ।
तत्र लङ्कापुरी साक्षाद्राक्षसीवेषधारिणी ॥ ४३ ॥

प्रविशन्तं हनूमन्तं दृष्ट्वा लङ्का व्यतर्जयत् ।
कस्त्वं वानररूपेण मामनाहत्य लङ्किनीम् ॥ ४४ ॥

प्रविश्य चोरवद्रात्रौ किं भवान्कर्तुमिच्छति ।
इत्युक्त्वा रोषताम्राक्षी पादेनाभिजघान तम् ॥ ४५ ॥

हनुमानपि तां वाममुष्टिनावज्ञयाहनत् ।
तदैव पतिता भूमौ रक्तमुद्वमती भृशम् ॥ ४६ ॥

तो छायाग्रह म्हणजे सिंहिका नावाची एक भयंकर राक्षसी होती. ती नेहमी पाण्यामध्ये राहात असे. आकाशातून जाणाऱ्या प्राण्यांची छाया पकडून ती त्यांना खेचून घेई आणि त्यांना खाऊन टाकी. (३५)

तिने पकडल्यावर सामर्थ्यसंपन्न हनुमानाने विचार केला की, "माझ्या मार्गात विघ्न निर्माण करणाऱ्या कुणी बरे माझ्या वेगाला रोखून धरले आहे ? (३६)

येथे तर कुणीही दिसत नाही. त्यामुळे मला फार आश्चर्य वाटत आहे." असा विचार करून हनुमंताने आपली दृष्टी खालच्या बाजूला टाकली. (३७)

तेव्हा तेथे त्याला धिप्पाड शरीराची आणि भयंकर रूप असणारी सिंहिका दिसली. लगेच त्याने पाण्यात उडी मारली आणि रागाने तिला दोन्ही पायांनी लाथा घालून ठार केले. (३८)

नंतर पुन: वर आकाशात उड्डाण करून हनुमान दक्षिणेकडे तोंड करून निघाला आणि तो समुद्राच्या दक्षिण तीरावर पोचला. त्या तीरावर फळांनी भरलेले नाना प्रकारचे वृक्ष होते. नानाप्रकारचे पशू व पक्षी यांनी ते तीर भरलेले होते. तसेच ते विविध प्रकारच्या पुष्पलतांनी युक्त होते. त्यानंतर त्रिकूट पर्वताच्या माथ्यावर त्याला एक नगर दिसले. (३९-४०)

ते नगर अनेक तटांनी युक्त होते; ते तट सर्व बाजूंनी खंदकांनी वेढले होते. तेव्हा 'या लंका नगरीत कसा बरे प्रवेश करता येईल,' अशी चिंता मारुतीला लागली. (४१)

रावणाने पालन केलेल्या या लंकेत मी सूक्ष्म रूप धारण करून रात्रीच्या वेळी प्रवेश करीन, असा विचार करून, तो रात्र होईपर्यंत तेथेच थांबला आणि मग रात्र पडल्यावर लंकेकडे जाण्यास निघाला. (४२)

सूक्ष्म रूप धारण करून प्रतापी हनुमानाने लंकेच्या द्वारात प्रवेश केला. तेथे प्रत्यक्ष लंका नगरी ही राक्षसीचा वेष धारण करून उभी होती. (४३)

हनुमान प्रवेश करीत आहे हे पाहिल्यावर लंकेने त्याला दटावले. "मज लंकिनीचा अनादर करून, रात्री चोराप्रमाणे प्रवेश करणारा, वानराचे रूप धारण केलेला तू कोण आहेस? तुला काय पाहिजे ?" असे बोलून क्रोधाने डोळे लाल करून तिने त्या हनुमानाला आपल्या लाथेने तडाखा दिला. (४४-४५)

तेव्हा हनुमानानेसुद्धा आपल्या डाव्या हाताचा ठोसा तिला लगावला. तत्काळ खूप रक्त ओकीत ती जमिनीवर पडली. (४६)

उत्थाय प्राह सा लङ्का हनूमन्तं महाबलम् ।
हनूमन् गच्छ भद्रं ते जिता लङ्का त्वयानघ ॥ ४७॥

मग उठून उभी राहून ती लंका महाबली हनुमानाला म्हणाली, "हे हनुमाना, तू जा. तुझे कल्याण होवो. हे पुण्यशीला, तू लंकेला जिंकले आहेस. (४७)

पुराहं ब्रह्मणा प्रोक्ता ह्यष्टाविंशतिपर्यये ।
त्रेतायुगे दाशरथी रामो नारायणोऽव्यय: ॥ ४८॥

जनिष्यते योगमाया सीता जनकवेश्मनि ।
भूभारहरणार्थाय प्रार्थितोऽयं मया क्वचित् ॥ ४९॥

पूर्वी मला ब्रह्मदेवांनी सांगितले होते की 'अठ्ठाविसाव्या चार युगाच्या पर्यायांतील त्रेतायुगामध्ये, अविनाशी नारायण हे दशरथाचे पुत्र श्रीराम या स्वरूपात जन्माला येतील; त्यांची योगमाया ही जनकाच्या घरी सीता होऊन जन्म घेईल. कारण पूर्वी भूमीचा भार हरण करण्याची प्रार्थना मी नारायणाला केली होती. (४८-४९)

सभार्यो राघवो भ्रात्रा गमिष्यति महावनम् ।
तत्र सीतां महामायां रावणोऽपहरिष्यति ॥ ५०॥

श्रीराम आपली पत्नी व भाऊ यांचेसह घोर अरण्यात जातील. तेथे महामाया सीतेचे अपहरण रावण करील. (५०)

पश्चाद्रामेण साचिव्यं सुग्रीवस्य भविष्यति ।
सुग्रीवो जानकीं द्रष्टुं वानरान्प्रेषयिष्यति ॥ ५१॥

त्यानंतर श्रीरामांबरोबर सुग्रीवाचे सख्य होईल. आणि जानकीला शोधण्यासाठी सुग्रीव आपल्या वानरांना पाठवील. (५१)

तत्रैको वानरो रात्रावागमिष्यति तेऽन्तिकम् ।
त्वया च भर्त्सित: सोऽपि त्वां हनिष्यति मुष्टिना ॥ ५२॥

त्यांतील एक वानर रात्रीच्या वेळी तुझ्याजवळ येईल. तू त्याची निर्भर्त्सना करशील, तेव्हा तोसुद्धा तुझ्यावर मुष्टिप्रहार करील. (५२)

तेनाहता त्वं व्यथिता भविष्यसि यदानघे ।
तदैव रावणस्यान्तो भविष्यति न संशय: ॥ ५३॥

हे निष्पाप स्त्रिये, त्या वानराने मुष्टिप्रहार केल्याने जेव्हा तू व्याकूळ होशील, तेव्हाच रावणाचा अंत होईल, यात संशय नाही.' (५३)

तस्मात्त्वया जिता लङ्का जितं सर्वं त्वयानघ ।
रावणान्त:पुरवरे क्रीडाकाननमुत्तमम् ॥ ५४॥

"ज्या अर्थी हे पावना, तू मज लंकेला जिंकले आहेस, त्या अर्थी तू आता सर्वांनाच जिंकले आहेस. आता मी सांगते ते ऐक. रावणाच्या श्रेष्ठ अंत:पुरात क्रीडा करण्यासाठी एक उत्तम उपवन आहे. (५४)

तन्मध्येऽशोकवनिका दिव्यपादपसङ्कुला ।
अस्ति तस्यां महावृक्ष: शिंशपा नाम मध्यग: ॥ ५५॥

त्याच्या मध्यभागी दिव्य वृक्षांनी भरलेले अशोकवन आहे. त्याच्या मध्यभागी अशोकाचा एक विशाल वृक्ष आहे. (५५)

तत्रास्ते जानकी घोरराक्षसीभि: सुरक्षिता ।
दृष्ट्वैव गच्छ त्वरितं राघवाय निवेदय ॥ ५६॥

तेथे भयंकर राक्षसींच्या पहाऱ्यात सीता आहे. तिला भेटून तू त्वरित परत जा आणि श्रीराघवांना तिची वार्ता सांग. (५६)

धन्याहमप्यद्य चिराय राघव-
स्मृतिर्ममासीद्भवपाशमोचनी ।
तद्भक्तसङ्गोऽप्यतिदुर्लभो मम
प्रसीदतां दाशरथि: सदा हृदि ॥ ५७॥

बऱ्याच काळानंतर, संसाराचे पाशातून मुक्त करणारी श्रीरामांची स्मृती मला आली आहे. तसेच त्यांच्या भक्ताचा अतिशय दुर्लभ असा संग मला प्राप्त झाला म्हणून मी आज धन्य झाले. माझ्या हृदयात असणारे दशरथपुत्र श्रीराम माझ्यावर सदा प्रसन्न असोत." (५७)

उल्लङ्घितेऽब्धौ पवनात्मजेन
धरासुतायाश्च दशाननस्य ।
पुस्फोर वामाक्षि भुजश्च तीव्रं
रामस्य दक्षाङ्गमतीन्द्रियस्य ॥ ५८ ॥

पवनसुत हनुमानाने समुद्र ओलांडला. त्या क्षणीच भूमिकन्या सीता आणि रावण यांचा डावा डोळा आणि बाहू हे जोराने स्फुरण पावू लागले, तर अतींद्रिय अशा श्रीरामांचे उजवे अंग स्फुरण पावू लागले. (५८)

—★—

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुंदरकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

—★—

# द्वितीय सर्ग

## हनुमानाचे अशोकवनात गमन आणि रावणाने सीतेला भीती दाखवणे

*श्रीमहादेव उवाच*

ततो जगाम हनुमान् लङ्कां परमशोभनाम् ।
रात्रौ सूक्ष्मतनुर्भूत्वा बभ्राम परितः पुरीम् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**— हे पार्वती, त्यानंतर अतिशय शोभिवंत असणाऱ्या लंकेत हनुमान शिरला आणि सूक्ष्म शरीर धारण करून तो रात्रीच्या वेळी लंका नगरीत सर्वत्र फिरू लागला. (१)

सीतान्वेषणकार्यार्थी प्रविवेश नृपालयम् ।
तत्र सर्वप्रदेशेषु विविच्य हनुमान्कपिः ॥ २ ॥

नापश्यज्जानकीं स्मृत्वा ततो लङ्काभिभाषितम् ।
जगाम हनुमान् शीघ्रमशोकवनिकां शुभाम् ॥ ३ ॥

सीतेचा शोध घेण्याचे कार्य करण्याची इच्छा असल्याने त्याने राजवाड्यात प्रवेश केला. तेथे सर्व ठिकाणी शोध केल्यावरसुद्धा जेव्हा हनुमानाला सीता दिसली नाही, तेव्हा त्याला लंकेचे शब्द आठवले आणि मग तो त्वरेने मनोहर अशा अशोकवाटिकेत गेला. (२-३)

सुरपादपसम्बाधां रत्नसोपानवापिकाम् ।
नानापक्षिमृगाकीर्णां स्वर्णप्रासादशोभिताम् ॥ ४ ॥

फलैरानम्रशाखाग्रपादपैः परिवारिताम् ।
विचिन्वन् जानकीं तत्र प्रतिवृक्षं मरुत्सुतः ॥ ५ ॥

ती अशोक वाटिका कल्पवृक्षांनी भरलेली होती. तेथे रत्नांच्या पायऱ्या असणाऱ्या विहिरी होत्या. नाना प्रकारचे पक्षी आणि पशू तेथे फिरत होते. ती एका सुवर्ण-प्रासादाने शोभिवंत झाली होती. फळांच्या भारामुळे ज्यांच्या शाखांची टोके खाली लवलेली होती अशा वृक्षांनी ती वेढलेली होती. तेथे प्रत्येक वृक्षाच्या खाली जानकी आहे का, असा शोध वायुसुताने घेतला. (४-५)

ददर्शाभ्रंलिहं तत्र चैत्यप्रासादमुत्तमम् ।
दृष्ट्वा विस्मयमापन्नो मणिस्तम्भशतान्वितम् ॥ ६ ॥

तेथे त्याला एक उत्तम देव मंदिर दिसले; त्याचे शिखर आकाशाला भिडलेले होते आणि त्याला रत्नजडित शेकडो खांब होते. ते पाहून हनुमान आश्चर्यचकित झाला. (६)

समतीत्य पुनर्गत्वा किञ्चिद्दूरं स मारुतिः ।
ददर्श शिंशपावृक्षमत्यन्तनिबिडच्छदम् ॥ ७ ॥

अदृष्टातपमाकीर्णं स्वर्णवर्णविहङ्गमम् ।
तन्मूले राक्षसीमध्ये स्थितां जनकनन्दिनीम् ॥ ८ ॥

ते मंदिर ओलांडून पुनः पुढे काहीसे दूर गेल्यावर, मारुतीला एक अशोक वृक्ष दिसला; त्या वृक्षाची पाने अतिशय घनदाट होती; त्याच्या खाली सूर्याचे ऊन येत नव्हते; आणि वृक्ष सोनेरी पक्ष्यांनी भरलेला होता. त्या वृक्षाच्या मुळाशी जनक-कन्या सीता वीर हनुमानाला दिसली; ती राक्षसींच्या वेढ्यात असली तरी; पृथ्वीवरील देवतेप्रमाणे दिसत होती; तिने एक वेणी घातली होती.

ददर्श हनुमान् वीरो देवतामिव भूतले ।
एकवेणीं कृशां दीनां मलिनाम्बरधारिणीम् ॥ ९ ॥

भूमौ शयानां शोचन्तीं रामरामेति भाषिणीम् ।
त्रातारं नाधिगच्छन्तीमुपवासकृशां शुभाम् ॥ १० ॥

आणि मळके वस्त्र परिधान केले होते; कृश आणि दीन अशी ती जमिनीवर पडून, 'राम राम' म्हणत शोक करीत होती; कोणी आपले रक्षण करील असे तिला वाटत नव्हते; ती उपवासाने कृश झाली असली तरीही सुंदर होती. (७-१०)

शाखान्तच्छदमध्यस्थो ददर्श कपिकुञ्जरः ।
कृतार्थोऽहं कृतार्थोऽहं दृष्ट्वा जनकनन्दिनीम् ॥ ११ ॥

मयैव साधितं कार्यं रामस्य परमात्मनः ।
ततः किलकिलाशब्दो बभूवान्तःपुराद्बहिः ॥ १२ ॥

वृक्षाच्या फांदीच्या पानामध्ये दडलेल्या कपिश्रेष्ठाने जनक नंदिनीला पाहिले. "आज आपण कृतार्थ झालो, परमात्म्या श्रीरामांचे कार्य माझ्याकडूनच घडले," असे त्याला वाटले. त्याच वेळी रावणाच्या अंतःपुरातून हलकल्लोळ येऊ लागला. (११-१२)

किमेतदिति सँल्लीनो वृक्षपत्रेषु मारुतिः ।
आयान्तं रावणं तत्र स्त्रीजनैः परिवारितम् ॥ १३ ॥

हे काय असेल बरे ? असा विचार करीत मारुती झाडाच्या पानांआड दडून राहिला. तेव्हा तेथे स्त्रियांसमवेत बाहेर येणारा रावण त्याला दिसला. (१३)

दशास्यं विंशतिभुजं नीलाञ्जनचयोपमम् ।
दृष्ट्वा विस्मयमापन्नः पत्रखण्डेष्वलीयत ॥ १४ ॥

त्या रावणाला दहा तोंडे व वीस भुजा होत्या. काजळाच्या राशीप्रमाणे त्याचे शरीर काळे होते. त्याला पाहून मारुती विस्मित झाला आणि त्या दुष्टाचे तोंडही पाहणे टाळण्यासाठी तो पानांच्या आड लपून बसला. (१४)

रावणो राघवेणाशु मरणं मे कथं भवेत् ।
सीतार्थमपि नायाति रामः किं कारणं भवेत् ॥ १५ ॥

इत्येवं चिन्तयन्नित्यं राममेव सदा हृदि ।
तस्मिन्दिनेऽपररात्रौ रावणो राक्षसाधिपः ॥ १६ ॥

स्वप्ने रामेण सन्दिष्टः कश्चिदागत्य वानरः ।
कामरूपधरः सूक्ष्मो वृक्षाग्रस्थोऽनुपश्यति ॥ १७ ॥

श्रीराघवांच्या हातून मला लवकर मरण कसे बरे येईल ? सीतेसाठीसुद्धा श्रीराम अद्यापि येथे आले नाहीत, याचे काय कारण असेल बरे ? असे सदा श्रीरामांचेच मनात चिंतन करणाऱ्या राक्षसराज रावणाने त्याच दिवशी मध्यरात्रीनंतर एक स्वप्न पाहिले होते. त्या स्वप्नांत श्रीरामांचा संदेश घेऊन कोणी एक वानर आला होता, आणि इच्छेप्रमाणे रूप धारण करणारा तो सूक्ष्म शरीराने झाडाच्या शेंड्यावर बसून सर्व काही पाहात होता, असे त्याला दिसले होते. (१५-१७)

इति दृष्ट्वाद्भुतं स्वप्नं स्वात्मन्येवानुचिन्त्य सः ।
स्वप्नः कदाचित्सत्यः स्यादेवं तत्र करोम्यहम् ॥ १८ ॥

जानकीं वाक्शरैर्विद्ध्वा दुःखितां नितरामहम् ।
करोमि दृष्ट्वा रामाय निवेदयतु वानरः ॥ १९ ॥

असे अद्‌भुत स्वप्न पाहिल्यावर त्याने मनात विचार केला की कदाचित हे स्वप्न सत्य होईल. तेव्हा त्या बाबतीत मी आता असे करतो की, (अशोक वनात जाऊन) जानकीला माझ्या वाग्बाणांनी विद्ध करून अतिशय दुःखी करतो, मग ते पाहून तो वानर श्रीरामांना निवेदन करील. (१८-१९)

इत्येवं चिन्तयन्सीतासमीपमगमद्द्रुतम् ।
नूपुराणां किङ्किणीनां श्रुत्वा शिञ्जितमङ्गना ॥ २० ॥

सीता भीता लीयमाना स्वात्मन्येव सुमध्यमा ।
अधोमुख्यश्रुनयना स्थिता रामार्पितान्तरा ॥ २१ ॥

असा विचार करीत तो त्वरित सीतेच्याजवळ गेला. त्या वेळी (रावणाबरोबर असणाऱ्या राक्षसींच्या) नूपुरांचा आणि किंकिणींचा आवाज ऐकल्यावर, सुंदर कटी असणारी सीता भ्याली आणि स्वतःला सावरून घेऊन ती अधोमुख बसली. त्या वेळी तिच्या डोळ्यांत अश्रू आले होते आणि तिचे मन श्रीरामांच्या ठिकाणी लागले होते. (२०-२१)

रावणोऽपि तदा सीतामालोक्याह सुमध्यमे ।
मां दृष्ट्वा किं वृथा सुभ्रु स्वात्मन्येव विलीयसे॥ २२ ॥

रामो वनचराणां हि मध्ये तिष्ठति सानुजः ।
कदाचिद्दृश्यते कैश्चित्कदाचिन्नैव दृश्यते ॥ २३ ॥

मया तु बहुधा लोकाः प्रेषितास्तस्य दर्शने ।
न पश्यन्ति प्रयत्नेन वीक्षमाणाः समन्ततः ॥ २४ ॥

किं करिष्यसि रामेण निःस्पृहेण सदा त्वयि ।
त्वया सदालिङ्गितोऽपि समीपस्थोऽपि सर्वदा॥ २५ ॥

हृदयेऽस्य न च स्नेहस्त्वयि रामस्य जायते ।
त्वत्कृतान्सर्वभोगांश्च त्वद्गुणानपि राघवः ॥ २६ ॥

भुञ्जानोऽपि न जानाति कृतघ्नो निर्गुणोऽधमः ।
त्वमानीता मया साध्वी दुःखशोकसमाकुला ॥ २७ ॥

इदानीमपि नायाति भक्तिहीनः कथं व्रजेत् ।
निःसत्त्वो निर्ममो मानी मूढः पण्डितमानवान्॥ २८ ॥

नराधमं त्वद्विमुखं किं करिष्यसि भामिनि ।
त्वय्यतीव समासक्तं मां भजस्वासुरोत्तमम् ॥ २९ ॥

त्या वेळी रावणानेसुद्धा सीतेला पाहून म्हटले, "हे सुंदरी, मला पाहून तू उगीचच अंग सावरून बसली आहेस. (२२)

आपल्या लहान भावासह राम वनचरांच्यामध्ये राहात आहे. कधी तो काही लोकांना दिसतो तर कधी तो दिसत नाही . (२३)

त्याला पाहण्यासाठी मी अनेक जणांना पाठविले होते. परंतु पुष्कळ प्रयत्न करूनही, सगळीकडे शोधूनसुद्धा तो त्यांना दिसला नाही. (२४)

जो तुझ्या बाबतीत सदा उदासीन आहे, तो तुझ्या काय कामाचा ? जरी तो नेहमी तुझ्याजवळ होता आणि तू त्याला सदा आलिंगन देत होतीस, तरी त्याच्या हृदयात तुझ्याविषयी प्रेम निर्माण झाले नाही. तुझ्याकडून प्राप्त झालेले सर्व भोग आणि तुझे गुण या सर्वांचा जरी तो उपभोग घेत होता, तरी त्या कृतघ्न, गुणरहित आणि अधम रामाला त्यांची जाणीव नाही. तुला मी पळवून आणले. तू साध्वी स्त्री दुःखमग्न आणि शोकमग्न झाली तरीसुद्धा तो अद्यापि इकडे येत नाही. तुझ्याविषयी त्याला प्रीती नसल्यामुळे तो कसा बरे इकडे येईल ? तो संपूर्णपणे शक्तिहीन, ममताशून्य, अभिमानी, मूर्ख आणि स्वतःला पंडित समजणारा आहे. (२५-२८)

हे सुंदरी, तुझ्याशी विन्मुख झालेल्या त्या नराधमाशी तुला काय करायचे आहे ?* याउलट मी असुरश्रेष्ठ तुझ्या ठिकाणी अतिशय आसक्त आहे. तू माझा अंगीकार कर. (२९)

* येथे २३ व्या श्लोकापासून २८ व्या श्लोकापर्यंत रावणाने अध्याहृतपणाने निंदेच्या मिषाने भगवान रामांची स्तुती केली आहे. तिचे तात्पर्य असे आहे :- राम आपल्या भावासह वनवासी तपस्वी लोकांमध्ये राहात आहे. त्यांतील काही तपस्व्यांना तो कधी ध्यान धारणा इत्यादींच्या द्वारा दिसून येतो, तर कधी तो ध्यान धारणा करूनही दिसून येत नाही (२३). त्याचा साक्षात्कार करून घेण्यास मी अनेकदा माझी इंद्रिये त्याच्या ठिकाणी लावली होती; परंतु खूप प्रयत्न करूनसुद्धा मला साक्षात्कार कधीच झाला नाही (२४). (तू साक्षात् योगमाया आहेस; परब्रह्म रामाबरोबर तुझा सदा सहवास आहे. आणि त्याच्याशी तुझे तादात्म्य सुद्धा आहे. परंतु ) तो मात्र सदा निःस्पृह आणि असंग असतो; उदासीन असतो. (२५). निःस्पृह आणि असंग असल्याने, त्या परब्रह्मरूप रामाला मायारूपी तुझ्याकडून कधीही बंधन येत नाही आणि तुझ्या- मायेच्या- गुणांत अथवा भोगांत तो अडकत नाही (२६). सांख्यमताचे लोक त्याला उपचाराने भोक्ता असेही म्हणतात. तथापि त्यांच्या मतानुसार **जहात्येनां भुक्तभोगामजोऽन्य** या श्रुतीला अनुसरून तो 'मी भोक्ता आहे' असा अभिमान धारण करीत नाही. अशा प्रकारे तो कृतघ्न (केलेल्या कर्मांचा नाश करणारा), निर्गुण (सत्त्व, रज, व तम या तीन गुणांनी रहित) आणि अधम (जो धमत नाही म्हणजे शब्दांचा विषय होत नाही म्हणजे अशब्द असासुद्धा) आहे (२७). त्याची मायेवर प्रीती नाही; म्हणून तो आत्तापर्यंत आला नाही. याचेद्वारा रावण स्वतः म्हणतो की अजूनसुद्धा राम माझ्या हृदयात येत नाही; कारण मी भक्तिहीन असल्याने माझे हृदय त्याच्यापर्यंत कसे बरे पोचेल ? तो निर्गुण, ममतारहित, अमानी, मूढ (म्= शिव+ उ=ब्रह्मदेव, ताभ्यां ऊढः ध्यानविषयाप्रत नेलेला म्हणजे शिव आणि ब्रह्मदेव यांना ध्येय म्हणून असणारा) आणि विद्वानांकडून सन्मानित असा आहे (२८).आणखी असे की नराधम (=नराः अधमाः यस्मात् सः नराधमः ) म्हणजे ज्याच्यापेक्षा माणसे अधम आहेत म्हणजे पुरुषोत्तम. विन्मुख याचा अर्थ मायेला पराङ्मुख.

देवगन्धर्वनागानां यक्षकिन्नरयोषिताम् ।
भविष्यसि नियोक्त्री त्वं यदि मां प्रतिपद्यसे ॥ ३० ॥

रावणस्य वचः श्रुत्वा सीतामर्षसमन्विता ।
उवाचाधोमुखी भूत्वा निधाय तृणमन्तरे ॥ ३१ ॥

राघवाद्बिभ्यता नूनं भिक्षुरूपं त्वया धृतम् ।
रहिते राघवाभ्यां त्वं शुनीव हविरध्वरे ॥ ३२ ॥

हृतवानसि मां नीच तत्फलं प्राप्स्यसेऽचिरात् ।
यदा रामशराघातविदारितवपुर्भवान् ॥ ३३ ॥

ज्ञास्यसेऽमानुषं रामं गमिष्यसि यमान्तिकम् ।
समुद्रं शोषयित्वा वा शरैर्बद्ध्वाथ वारिधिम् ॥ ३४ ॥

हन्तुं त्वां समरे रामो लक्ष्मणेन समन्वितः ।
आगमिष्यत्यसन्देहो द्रक्ष्यसे राक्षसाधम ॥ ३५ ॥

त्वां सपुत्रं सहबलं हत्वा नेष्यति मां पुरम् ।
श्रुत्वा रक्षःपतिः क्रुद्धो जानक्याः परुषाक्षरम् ॥ ३६ ॥

वाक्यं क्रोधसमाविष्टः खड्गमुद्यम्य सत्वरः ।
हन्तुं जनकराजस्य तनयां ताम्रलोचनः ॥ ३७ ॥

मन्दोदरी निवार्याह पतिं पतिहिते रता ।
त्यजैनां मानुषीं दीनां दुःखितां कृपणां कृशाम् ॥ ३८ ॥

देवगन्धर्वनागानां बह्व्यः सन्ति वराङ्गनाः ।
त्वामेव वरयन्त्युच्चैर्मदमत्तविलोचनाः ॥ ३९ ॥

ततोऽब्रवीद्दशग्रीवो राक्षसीर्विकृताननाः ।
यथा मे वशगा सीता भविष्यति सकामना ।
तथा यतध्वं त्वरितं तर्जनादरणादिभिः ॥ ४० ॥

जर तू माझा स्वीकार करशील तर तू देव, गंधर्व नाग, यक्ष आणि किन्नर यांच्या स्त्रियांवर अधिकार गाजवशील." (३०)

रावणाचे वचन ऐकल्यावर सीतेला अतिशय क्रोध आला. अधोमुख होऊन आणि मध्ये तृण ठेवून* ती म्हणाली. (३१)

"अरे नीचा, निःसंशय श्रीराघवांना भ्याल्यामुळे तू खरोखर भिक्षूचे रूप धारण केलेस आणि एखादी कुत्री ज्या प्रमाणे यज्ञातून हवी घेऊन जाते, त्या प्रमाणे श्रीराम व लक्ष्मण हे दोघेही उपस्थित नसताना, तू माझे अपहरण केलेस. लौकरच त्याचे फळ तुला भोगावे लागेल. ज्या वेळी रामांच्या बाणाच्या प्रहारांनी तुझे शरीर विदीर्ण होऊन, तू यमसदनास जाशील, त्या वेळी श्रीराम हे अमानव कसे आहेत, हे तुला कळेल. अरे अधम राक्षसा, समुद्राला कोरडा करून अथवा समुद्रावर बाणांनी सेतू बांधून, लक्ष्मणासह श्रीराम तुला युद्धात ठार करण्यास येतील, हे तू लौकरच पाहाशील, यात शंका नाही. (३२-३५)

तुझे पुत्र आणि सैन्य यांच्यासह तुला ठार करून श्रीराम मला अयोध्या नगरीला घेऊन जातील." जानकीचे कठोर शब्द असणारे हे वाक्य ऐकून राक्षसांचा राजा रावण क्रुद्ध झाला आणि डोळे लाल झाले. तो सत्वर तलवार उपसून जनक राजाच्या कन्येला ठार करण्यास सिद्ध झाला. (३६-३७)

तितक्यात पतीचे हित करण्यात तत्पर असलेल्या महाराणी मंदोदरीने आपल्या पतीला अडविले आणि ती म्हणाली, "या दीन, दुःखी, भयभीत, कृश अशा मानवी स्त्रीला सोडून द्या. (३८)

देव, गंधर्व आणि नाग यांच्या अनेक सुंदर स्त्रिया आहेत आणि तारुण्यमदाने ज्यांचे डोळे धुंद झाले आहेत अशा त्या स्त्रिया तुम्हांलाच वरण्यास फार उत्सुक आहेत." (३९)

तेव्हा विकराल तोंडे असणाऱ्या राक्षसींना रावण म्हणाला, "भीती किंवा आदर इत्यादी कोणत्याही उपायाने ही सीता माझी अभिलाषा धरून त्वरित मला वश होईल असे काही तरी प्रयत्न करा . (४०)

* पतिव्रता स्त्रीने परपुरुषाबरोबर प्रत्यक्ष वार्तालाप करावयाचा नसतो. जर काही अनिवार्य प्रसंग आलाच, तरीसुद्धा एखादी जड वा अचेतन वस्तू मध्ये ठेवावयास हवी. या नियमाला अनुसरूनच सीतेने मध्ये तृण ठेवले.

द्विमासाभ्यन्तरे सीता यदि मे वशगा भवेत् ।
तदा सर्वसुखोपेता राज्यं भोक्ष्यति सा मया ॥ ४१ ॥

दोन महिन्यांच्या आत जर सीता मला वश झाली तर सर्व सुखे प्राप्त करून घेऊन ती माझ्यासह राज्याचा उपभोग घेईल. (४१)

यदि मासद्वयादूर्ध्वं मच्छय्यां नाभिनन्दति ।
तदा मे प्रातराशाय हत्वा कुरुत मानुषीम् ॥ ४२ ॥

आणि जर दोन महिन्यानंतर तिने माझ्या शय्येवर येण्याचे मान्य केले नाही, तर या मानव स्त्रीला ठार करून माझ्या सकाळच्या न्याहारीची व्यवस्था करा." (४२)

इत्युक्त्वा प्रययौ स्त्रीभी रावणोऽन्तःपुरालयम् ।
राक्षस्यो जानकीमेत्य भीषयन्त्यः स्वतर्जनैः ॥ ४३ ॥

असे बोलून आपल्या स्त्रियांसह रावण अंतःपुरातील निवासाकडे निघून गेला. इकडे जानकीजवळ येऊन राक्षसी आपापल्या विविध उपायांनी तिला भिववू लागल्या. (४३)

तत्रैका जानकीमाह यौवनं ते वृथा गतम् ।
रावणेन समासाद्य सफलं तु भविष्यति ॥ ४४ ॥

तेव्हा त्यातील एक राक्षसी जानकीला म्हणाली, "तुझे तारुण्य फुकट जात आहे. रावणाचा स्वीकार केल्याने ते तारुण्य सफल होईल." (४४)

अपरा चाह कोपेन किं विलम्बेन जानकि ।
इदानीं छेद्यतामङ्गं विभज्य च पृथक् पृथक् ॥ ४५ ॥

अन्या तु खड्गमुद्यम्य जानकीं हन्तुमुद्यता ।
अन्या करालवदना विदार्यास्यमभीषयत् ॥ ४६ ॥

दुसरी राक्षसी क्रोधाने म्हणाली, "अग जानकी, रावणाचे म्हणणे मान्य करण्यास कशाला फुकट विलंब करतेस ?" तिसरी राक्षसी तरवार उगारून जानकीला ठार करण्यास तयार होऊन म्हणाली, " आता हिचे शरीर तोडून त्याचे वेगवेगळे तुकडे करू या." तर आणखी एक भयंकर तोंड असणारी राक्षसी आपले तोंड उघडून जानकीला भिववू लागली. (४५-४६)

एवं तां भीषयन्तीस्ता राक्षसीर्विकृताननाः ।
निवार्य त्रिजटा वृद्धा राक्षसी वाक्यमब्रवीत् ॥ ४७ ॥

अशा प्रकारे सीतेला भिवविणाऱ्या त्या विकृत तोंडाच्या राक्षसींचे निवारण करून त्रिजटा नावाची एक म्हातारी राक्षसी म्हणाली. (४७)

शृणुध्वं दुष्टराक्षस्यो मद्वाक्यं वो हितं भवेत् ॥ ४८ ॥

"हे दुष्ट राक्षसींनो, माझे वचन ऐका. त्यामुळे तुमचे हित होईल. (४८)

न भीषयध्वं रुदतीं नमस्कुरुत जानकीम् ।
इदानीमेव मे स्वप्ने रामः कमललोचनः ॥ ४९ ॥

आरुह्यैरावतं शुभ्रं लक्ष्मणेन समागतः ।
दग्ध्वा लङ्कापुरीं सर्वां हत्वा रावणमाहवे ॥ ५० ॥

आरोप्य जानकीं स्वाङ्के स्थितो दृष्टोऽगमूर्धनि ।
रावणो गोमयह्रदे तैलाभ्यक्तो दिगम्बरः ॥ ५१ ॥

अगाहत्पुत्रपौत्रैश्च कृत्वा वदनमालिकाम् ।
बिभीषणस्तु रामस्य सन्निधौ हृष्टमानसः ॥ ५२ ॥

सेवां करोति रामस्य पादयोर्भक्तिसंयुतः ।
सर्वथा रावणं रामो हत्वा सकुलमञ्जसा ॥ ५३ ॥

या रडणाऱ्या जानकीला तुम्ही भिववू नका. तुम्ही तिला नमस्कार करा. लक्ष्मणासह पांढऱ्या शुभ्र ऐरावतावर आरोहण करून, कमलनयन श्रीराम आत्ताच माझ्या स्वप्नात आले होते. संपूर्ण लंकापुरी जाळून टाकून, युद्धामध्ये रावणाचा वध करून आणि जानकीला आपल्या मांडीवर बसवून, पर्वताच्या शिखरावर बसलेले श्रीराम मला स्वप्नात दिसले. याउलट तेलाने माखलेला, वस्त्ररहित रावण गळ्यात रुंडमाळा घालून, आपल्या पुत्रपौत्रांसह शेणाच्या खड्ड्यात बुडाला आहे व संतुष्ट मनाचा बिभीषण श्रीरामांजवळ बसून भक्तिपूर्वक राभांच्या पायांची सेवा करीत आहे, असे मी पाहिले. तेव्हा कुळासकट रावणाचा संपूर्ण नाश विनासायास करून बिभीषणाला लंकेचे आधिपत्य देऊन, आणि

विभीषणायाधिपत्यं दत्त्वा सीतां शुभाननाम् ।
अङ्के निधाय स्वपुरीं गमिष्यति न संशयः ॥ ५४ ॥

शुभवदना सीतेला मांडीवर बसवून श्रीराम स्वतःच्या नगरीला जातील, यात संशय नाही." (४९-५४)

त्रिजटाया वचः श्रुत्वा भीतास्ता राक्षसस्त्रियः ।
तूष्णीमासंस्तत्र तत्र निद्रावशमुपागताः ॥ ५५ ॥

त्रिजटेचे वचन ऐकल्यावर, भ्यालेल्या त्या राक्षस स्त्रिया गप्प बसल्या आणि हळू हळू झोपी गेल्या. (५५)

तर्जिता राक्षसीभिः सा सीता भीतातिविह्वला ।
त्रातारं नाधिगच्छन्ती दुःखेन परिमूर्च्छिता ॥ ५६ ॥

राक्षसींच्या भिवविण्यामुळे भ्यालेली सीता अतिशय विव्हल झाली. आपले रक्षण करणारा येथे कोणी नाही असे वाटून अतिशय दुःखाने ती मूर्च्छित पडली. (५६)

अश्रुभिः पूर्णनयना चिन्तयन्तीदमब्रवीत् ।
प्रभाते भक्षयिष्यन्ति राक्षस्यो मां न संशयः ।
इदानीमेव मरणं केनोपायेन मे भवेत् ॥ ५७ ॥

मग शुद्धीवर आल्यावर अश्रूंनी डोळे भरलेली आणि चिंता करणारी ती असे म्हणाली, "सकाळी या राक्षसी मला खाऊन टाकतील, यात संशय नाही. तेव्हा कोणत्या उपायाने मला आत्ताच मरण येईल बरे ?" (५७)

एवं सुदुःखेन परिप्लुता सा
विमुक्तकण्ठं रुदती चिराय ।
आलम्ब्य शाखां कृतनिश्चया मृतौ
न जानती किञ्चिदुपायमङ्गना ॥ ५८ ॥

अशा प्रकारे तिने जरी मरणाचा निश्चय केला होता, तरी त्यासाठी कोणताही उपाय न सापडल्याने ती सुंदरी वृक्षाची फांदी पकडून अतिशय दुःखाने बराच काळ मुक्त कंठाने रडत राहिली. (५८)

★

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुन्दरकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

★

# तृतीय सर्ग

## जानकीची भेट, अशोकवनाचा विध्वंस आणि ब्रह्मपाशात बंधन

*श्रीमहादेव उवाच*

उद्बन्धनेन वा मोक्ष्ये शरीरं राघवं विना ।
जीवितेन फलं किं स्यान्मम रक्षोऽधिमध्यतः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, रडताना सीतेने विचार केला की 'आता गळफास लावून मी शरीराचा त्याग करते. राक्षसींच्या गराड्यात रामाविना माझ्या जगण्याचा काय उपयोग आहे बरे ? (१)

दीर्घा वेणी ममात्यर्थमुद्बन्धाय भविष्यति ।
एवं निश्चितबुद्धिं तां मरणायाथ जानकीम् ॥ २ ॥

विलोक्य हनुमान्किञ्चिद्विचार्यैतदभाषत ।
शनैः शनैः सूक्ष्मरूपो जानक्याः श्रोत्रगं वचः ॥ ३ ॥

गळफास लावण्यास ही माझी लांब वेणी मला अतिशय उपयोगी पडेल.' अशा प्रकारे मरण्याचा निश्चय केलेल्या जानकीला पाहून, हनुमानाने थोडा विचार केला आणि सूक्ष्मरूपाने त्याने जानकीच्या कानापर्यंत पोचेल अशा मंद आवाजात हळूहळू बोलण्यास प्रारंभ केला. (२-३)

इक्ष्वाकुवंशसम्भूतो राजा दशरथो महान् ।
अयोध्याधिपतिस्तस्य चत्वारो लोकविश्रुताः ॥ ४ ॥

"इक्ष्वाकूच्या वंशात उत्पन्न झालेले, अयोध्या नगरीचे अधिपती, राजा दशरथ हे महान प्रतापी होते. त्यांचे चार पुत्र जगात विख्यात आहेत. (४)

पुत्रा देवसमाः सर्वे लक्षणैरुपलक्षिताः ।
रामश्च लक्ष्मणश्चैव भरतश्चैव शत्रुहा ॥ ५ ॥

राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न असे ते सर्व पुत्र शुभ लक्षणांनी युक्त आणि देवतुल्य आहेत. (५)

ज्येष्ठो रामः पितुर्वाक्याद्दण्डकारण्यमागतः ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया भार्यया सह ॥ ६ ॥

त्यांतील ज्येष्ठ पुत्र श्रीराम हे लक्ष्मण या भावासह आणि पत्नी सीता हिच्यासह पित्याच्या आज्ञेने दंडकारण्यात आले. (६)

उवास गौतमीतीरे पञ्चवट्यां महामनाः ।
तत्र नीता महाभागा सीता जनकनन्दिनी ॥ ७ ॥

रहिते रामचन्द्रेण रावणेन दुरात्मना ।
ततो रामोऽतिदुःखार्तो मार्गमाणोऽथ जानकीम् ॥ ८ ॥

जटायुषं पक्षिराजमपश्यत्पतितं भुवि ।
तस्मै दत्त्वा दिवं शीघ्रमृष्यमूकमुपागमत् ॥ ९ ॥

सुग्रीवेण कृता मैत्री रामस्य विदितात्मनः ।
तद्भार्याहारिणं हत्वा वालिनं रघुनन्दनः ॥ १० ॥

राज्येऽभिषिच्य सुग्रीवं मित्रकार्यं चकार सः ।
सुग्रीवस्तु समानाय्य वानरान्वानरप्रभुः ॥ ११ ॥

प्रेषयामास परितो वानरान्परिमार्गणे ।
सीतायास्तत्र चैकोऽहं सुग्रीवसचिवो हरिः ॥ १२ ॥

थोर मनाचे श्रीराम गौतमी नदीच्या तीरावरील पंचवटीमध्ये राहात होते. तेथे असताना, श्रीरामचंद्र जेव्हा आश्रमात नव्हते, तेव्हा दुरात्म्या रावणाने महाभागा जनककन्या सीतेला पळवून नेले. त्यानंतर अतिशय दुःखविव्हल होऊन, जानकीचा शोध करणाऱ्या श्रीरामांना जमिनीवर मरणोन्मुख होऊन पडलेला पक्षिराज जटायू दिसला. त्या जटायूला स्वर्गात पोचवून, श्रीराम त्वरित ऋष्यमूक पर्वताजवळ आले. आत्मरूप जाणणाऱ्या श्रीरामांना स्वतःची परिस्थिती सांगून सुग्रीवाने त्यांच्याशी मैत्री केली. सुग्रीवाच्या भार्येचे हरण करणाऱ्या वालीचा वध करून व सुग्रीवाला राज्याभिषेक करून, रघुनंदन श्रीरामांनी आपल्या मित्राचे कार्य केले. मग वानरराज सुग्रीवाने अनेक वानरांना एकत्र बोलावून सीतेच्या शोधासाठी त्यांना सगळीकडे पाठविले. त्या वानरांपैकी मी एक वानर आहे आणि मी सुग्रीवाचा मंत्री आहे. (७-१२)

सम्पातिवचनाच्छीघ्रमुल्लङ्घ्य शतयोजनम् ।
समुद्रं नगरीं लङ्कां विचिन्वञ्जानकीं शुभाम् ॥ १३ ॥

शनैरशोकवनिकां विचिन्वञ् शिंशपातरुम् ।
अद्राक्षं जानकीमत्र शोचन्तीं दुःखसम्प्लुताम् ॥ १४ ॥

रामस्य महिषीं देवीं कृतकृत्योऽहमागतः ।
इत्युक्त्वोपरराामाथ मारुतिर्बुद्धिमत्तरः ॥ १५ ॥

त्यानंतर संपातीच्या कथनानुसार शत योजने विस्तीर्ण असणारा समुद्र सत्वर ओलांडून लंकापुरीत येऊन, मी शुभलक्षणी जानकीचा शोध करू लागलो. नंतर हळूहळू अशोकवनात शोध घेताना मला एक अशोकाचा वृक्ष दिसला आणि त्या वृक्षाखाली दुःखात बुडालेली, शोक करणारी, श्रीरामांची पट्टराणी देवी जानकी मला दिसली. तिला पाहिल्यावर मी आता कृतकृत्य होऊन गेलो आहे." असे बोलून तो अतिशय बुद्धिमान मारुती गप्प बसला. (१३-१५)

सीता क्रमेण तत्सर्वं श्रुत्वा विस्मयमाययौ ।
किमिदं मे श्रुतं व्योम्नि वायुना समुदीरितम् ॥ १६ ॥

क्रमाने ते सर्व ऐकल्यावर सीतेला विस्मय वाटला. 'मी हे काय ऐकले ? हे वचन आकाशात वायूने उच्चारले काय ? की हे स्वप्न आहे ? की माझ्या मनाला

स्वप्नो वा मे मनोभ्रान्तिर्यदि वा सत्यमेव तत् ।
निद्रा मे नास्ति दुःखेन जानाम्येतत्कुतो भ्रमः ॥ १७ ॥

भ्रम झाला आहे ? की हे सर्व खरेच आहे ? दुःखामुळे मला झोप येत नाही; तेव्हा हे स्वप्न असणार नाही आणि मला हे सर्व नीट कळले आहे; मग हा भ्रम तरी कसा असेल बरे ? (१६-१७)

येन मे कर्णपीयूषं वचनं समुदीरितम् ।
स दृश्यतां महाभागः प्रियवादी ममाग्रतः ॥ १८ ॥

माझ्या कानांना अमृताप्रमाणे वाटणारे हे वचन ज्या कुणी उच्चारले आहे, त्या प्रिय बोलणाऱ्या महाभागाने माझ्यापुढे येऊन मला दर्शन द्यावे.' (१८)

श्रुत्वा तज्जानकीवाक्यं हनुमान्पत्रखण्डतः ।
अवतीर्य शनैः सीतापुरतः समवस्थितः ॥ १९ ॥

ते जानकीचे वचन ऐकल्यावर, हनुमान पानांच्या समूहातून सावकाश खाली उतरून सीतेच्या पुढे उभा राहिला. (१९)

कलविङ्कप्रमाणाङ्गो रक्तास्यः पीतवानरः ।
ननाम शनकैः सीतां प्राञ्जलिः पुरतः स्थितः ॥ २० ॥

चिमणीच्या आकाराचे शरीर असणाऱ्या, लाल तोंड असणाऱ्या, पीतवर्णी वानराने सीतेपुढे उभा राहून हात जोडून तिला प्रणाम केला. (२०)

दृष्ट्वा तं जानकी भीता रावणोऽयमुपागतः ।
मां मोहयितुमायातो मायया वानराकृतिः ॥ २१ ॥

इत्येवं चिन्तयित्वा सा तूष्णीमासीदधोमुखी ।
पुनरप्याह तां सीतां देवि यत्त्वं विशङ्कसे ॥ २२ ॥

नाहं तथाविधो मातस्त्यज शङ्कां मयि स्थिताम् ।
दासोऽहं कोसलेन्द्रस्य रामस्य परमात्मनः ॥ २३ ॥

सचिवोऽहं हरीन्द्रस्य सुग्रीवस्य शुभप्रदे ।
वायोः पुत्रोऽहमखिलप्राणभूतस्य शोभने ॥ २४ ॥

त्याला पाहून जानकी भ्याली. 'मला फसविण्यास हा रावणच मायेने वानराचा आकार धारण करून माझ्यापुढे आला आहे' असा विचार करून व खाली तोंड करून ती गप्पच बसून राहिली. तेव्हा हनुमान पुन्हा म्हणाला, "हे देवी, तुला जशी शंका येत आहे तसा मी नाही. हे माते, माझ्याविषयी तुझ्या मनात जी शंका आली आहे, ती काढून टाक. कोसलाधिपती परमात्म्या श्रीरामांचा मी दास आहे. आणि हे कल्याणकारी देवी, मी वानरराज सुग्रीवाचा मंत्री आहे. तसेच हे शोभने, सर्वांना प्राणभूत असणाऱ्या वायूचा मी पुत्र आहे." (२१-२४)

तच्छ्रुत्वा जानकी प्राह हनूमन्तं कृताञ्जलिम् ।
वानराणां मनुष्याणां सङ्गतिर्घटते कथम् ॥ २५ ॥

यथा त्वं रामचन्द्रस्य दासोऽहमिति भाषसे ।
तामाह मारुतिः प्रीतो जानकीं पुरतः स्थितः ॥ २६ ॥

ते ऐकल्यावर, हात जोडून आपल्यापुढे उभ्या असणाऱ्या हनुमानाला जानकी म्हणाली, "मी रामचंद्रांचा दास आहे, असे तू सांगतोस, तर वानर आणि मनुष्य यांची मैत्री कशी काय घडून येईल ?" तेव्हा तिच्यापुढे उभा असणारा मारुती आनंदाने तिला म्हणाला. (२५-२६)

ऋष्यमूकमगाद्रामः शबर्या नोदितः सुधीः ।
सुग्रीवो ऋष्यमूकस्थो दृष्टवान् रामलक्ष्मणौ ॥ २७ ॥

"शबरीने सांगितल्यावरून अतिशय बुद्धिमान श्रीराम हे ऋष्यमूक पर्वताजवळ आले. ऋष्यमूक पर्वतावर राहणाऱ्या सुग्रीवाने श्रीराम व लक्ष्मणांना (दुरून जाताना) पाहिले. (२७)

भीतो मां प्रेषयामास ज्ञातुं रामस्य हृद्गतम् ।
ब्रह्मचारिवपुर्धृत्वा गतोऽहं रामसन्निधिम् ॥ २८ ॥

त्यांना पाहून भ्यालेल्या सुग्रीवाने श्रीरामांचे हृद्गत जाणून घेण्यासाठी मला पाठविले. तेव्हा ब्रह्मचारी बटूचे रूप धारण करून मी श्रीरामांजवळ गेलो. (२८)

ज्ञात्वा रामस्य सद्भावं स्कन्धोपरि निधाय तौ ।
नीत्वा सुग्रीवसामीप्यं सख्यं चाकरवं तयोः ॥ २९ ॥

श्रीरामांचा शुद्ध भाव पाहिल्यावर, त्या दोघांना माझ्या खांद्यावर बसवून आणि सुग्रीवाजवळ नेऊन, मी त्या दोघांचे सख्य घडवून आणले. (२९)

सुग्रीवस्य हृता भार्या वालिना तं रघूत्तमः ।
जघानैकेन बाणेन ततो राज्येऽभ्यषेचयत् ॥ ३० ॥

सुग्रीवं वानराणां स प्रेषयामास वानरान् ।
दिग्भ्यो महाबलान्वीरान् भवत्याः परिमार्गणे ॥ ३१ ॥

सुग्रीवाची बायको वालीने हरण केली होती. त्याला रामांनी एका बाणाने ठार केले. मग वानरांच्या राजपदावर रामांनी सुग्रीवाचा अभिषेक केला. त्यानंतर तुझा शोध घेण्यासाठी त्याने महाबली वीर वानरांना दाही दिशांना पाठविले. (३०-३१)

गच्छन्तं राघवो दृष्ट्वा मामभाषत सादरम् ॥ ३२ ॥

त्वयि कार्यमशेषं मे स्थितं मारुतनन्दन ।
ब्रूहि मे कुशलं सर्वं सीतायै लक्ष्मणस्य च ॥ ३३ ॥

त्या वेळी शोधासाठी निघालेल्या मला पाहून राघव आदरपूर्वक मला म्हणाले, "हे पवनपुत्रा, माझे सर्व कार्य तुझ्यावर अवलंबून आहे. तू माझे आणि लक्ष्मणाचे सर्व कुशल सीतेला सांग. (३२-३३)

अङ्गुलीयकमेतन्मे परिज्ञानार्थमुत्तमम् ।
सीतायै दीयतां साधु मन्नामाक्षरमुद्रितम् ॥ ३४ ॥

तसेच सीतेला ओळख पटावी म्हणून, माझ्या नावाची अक्षरे कोरलेली ही माझी सुंदर अंगठी तू सीतेला काळजीपूर्वक दे." (३४)

इत्युक्त्वा प्रददौ मह्यं कराग्रादङ्गुलीयकम् ।
प्रयत्नेन मयानीतं देवि पश्याङ्गुलीयकम् ॥ ३५ ॥

असे बोलून आपल्या बोटातून अंगठी उतरवून ती त्यांनी मला दिली. हे देवी, ती अंगठी मी प्रयत्नपूर्वक आणली आहे. ती तू बघ." (३५)

इत्युक्त्वा प्रददौ देव्यै मुद्रिकां मारुतात्मजः ।
नमस्कृत्य स्थितो दूराद्बद्धाञ्जलिपुटो हरिः ॥ ३६ ॥

असे म्हणून मारुतीने सीता देवीला ती मुद्रिका दिली आणि तिला नमस्कार करून व हात जोडून, तो दूर उभा राहिला. (३६)

दृष्ट्वा सीता प्रमुदिता रामनामाङ्कितां तदा ।
मुद्रिकां शिरसा धृत्वा स्रवदानन्दनेत्रजा ॥ ३७ ॥

त्या वेळी रामनामाने अंकित असणारी ती मुद्रिका पाहून सीता अतिशय आनंदित झाली आणि ती अंगठी मस्तकी धारण केल्यावर तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रू येऊ लागले. (३७)

कपे मे प्राणदाता त्वं बुद्धिमानसि राघवे ।
भक्तोऽसि प्रियकारी त्वं विश्वासोऽस्ति तवैव हि ॥ ३८ ॥

(नंतर सीता म्हणाली,) "हे वानरा, तू माझा प्राणदाता आहेस. तू बुद्धिमान् आहेस. तू श्रीराघवांचा भक्त आणि त्यांचे प्रिय करणारा आहेस. त्यांनासुद्धा तुझाच पूर्ण विश्वास वाटतो. (३८)

नो चेन्मत्सन्निधिं चान्यं पुरुषं प्रेषयेत्कथम् ।
हनूमन्दृष्टमखिलं मम दुःखादिकं त्वया ॥ ३९ ॥

तसे नसते तर त्यांनी अन्य परपुरुषाला माझ्याजवळ कसे बरे पाठविले असते ? अरे हनुमाना, माझे दुःख इत्यादी सर्व काही तू पाहिले आहेस. (३९)

सर्वं कथय रामाय यथा मे जायते दया ।
मासद्वयावधि प्राणाः स्थास्यन्ति मम सत्तम ॥ ४० ॥

हे सर्व तू श्रीरामांना सांग. म्हणजे त्यांना माझी दया येईल. हे साधुश्रेष्ठा, आता दोन महिन्यांच्या अवधीपर्यंतच माझे प्राण राहातील. (४०)

नागमिष्यति चेद्रामो भक्षयिष्यति मां खलः ।
अतः शीघ्रं कपीन्द्रेण सुग्रीवेण समन्वितः ॥ ४१ ॥

वानरानीकपैः सार्धं हत्वा रावणमाहवे ।
सपुत्रं सबलं रामो यदि मां मोचयेत्प्रभुः ॥ ४२ ॥

तत्तस्य सदृशं वीर्यं वीर वर्णय वर्णितम् ।
यथा मां तारयेद्रामो हत्वा शीघ्रं दशाननम् ॥ ४३ ॥

तथा यतस्व हनुमन्वाचा धर्ममवाप्नुहि ।
हनूमानपि तामाह देवि दृष्टो यथा मया ॥ ४४ ॥

रामः सलक्ष्मणः शीघ्रमागमिष्यति सायुधः ।
सुग्रीवेण ससैन्येन हत्वा दशमुखं बलात् ॥ ४५ ॥

समानेष्यति देवि त्वामयोध्यां नात्र संशयः ।
तमाह जानकी रामः कथं वारिधिमाततम् ॥ ४६ ॥

तीर्त्वायास्यत्यमेयात्मा वानरानीकपैः सह ।
हनूमानाह मे स्कन्धावारुह्य पुरुषर्षभौ ॥ ४७ ॥

आयास्यतः ससैन्यश्च सुग्रीवो वानरेश्वरः ।
विहायसा क्षणेनैव तीर्त्वा वारिधिमाततम् ॥ ४८ ॥

निर्दहिष्यति रक्षौघांस्त्वत्कृते नात्र संशयः ।
अनुज्ञां देहि मे देवि गच्छामि त्वरयान्वितः ॥ ४९ ॥

द्रष्टुं रामं सह भ्रात्रा त्वरयामि तवान्तिकम् ।
देवि किञ्चिदभिज्ञानं देहि मे येन राघवः ॥ ५० ॥

विश्वसेन्मां प्रयत्नेन ततो गन्ता समुत्सुकः ।
ततः किञ्चिद्विचार्याथ सीता कमललोचना ॥ ५१ ॥

त्या काळात जर श्रीराम आले नाहीत तर तो दुष्ट रावण मला खाऊन टाकील. म्हणून वानरराज सुग्रीवासहित आणि वानरसैन्यातील मुख्यांसह येथे लवकर येऊन, जर रामांनी युद्धात पुत्र व सैन्य यांसह रावणाचा वध केला आणि जर मला येथून सोडवले, तरच हे वीरा, ते कृत्य त्यांच्या पराक्रमास साजेलसे होईल. माझे म्हणणे श्रीरामांना अशा युक्तीने सांग की, त्यामुळे रावणाला मारून राम मला घेऊन जातील; असा तू प्रयत्न कर. असे करून तू वाणीचे पुण्य प्राप्त करून घे." तेव्हा हनुमानसुद्धा तिला म्हणाला, "हे देवी, मी रामांना भेटलो की तुझ्या म्हणण्याप्रमाणे करीन. तुझ्याबद्दल जे पाहिले तेही सांगेन म्हणजे सैन्यासह सुग्रीव आणि लक्ष्मण यांना घेऊन तसेच स्वतःची शस्त्रे घेऊन राम सत्वर इकडे येतील, आणि स्वतःच्या सामर्थ्याने रावणाचा वध करून, हे देवी, ते तुला अयोध्येला नेतील, यात संशय नाही." तेव्हा जानकी त्याला म्हणाली, "राम हे अमेयात्मा आहेत. वानर सैन्यातील सेनाप्रमुखांसह विस्तृत समुद्र ओलांडून येथे कसे येतील ?" हनूमानाने उत्तर दिले, "ते दोघे पुरुषश्रेष्ठ माझ्या खांद्यावर बसून येतील, तर वानरराज सुग्रीव हा आपल्या सैन्यासह एका क्षणात आकाश मार्गाने विशाल समुद्र पार करून येथे येईल आणि तुझ्यासाठी तो सर्व राक्षस समूहांना जाळून टाकील, यांत संशय नाही. हे देवी, आता मला अनुज्ञा दे म्हणजे श्रीरामांना व लक्ष्मणाला भेटण्यासाठी मी आता त्वरित जाईन. आणि मी त्यांना त्वरेने तुझ्याजवळ घेऊन येण्याचा प्रयत्न करीन. हे देवी, तू मला काही तरी तुझी खूण दे की ज्यामुळे राघवांचा माझ्यावर विश्वास बसेल. प्रयत्नपूर्वक मी त्या खुणेचे रक्षण करीन आणि मोठ्या उत्साहाने रामांजवळ जाईन." त्यानंतर कमलनयन सीतेने थोडा विचार केला. (४१-५१)

विमुच्य केशपाशान्ते स्थितं चूडामणिं ददौ ।
अनेन विश्वसेद्रामस्त्वां कपीन्द्र सलक्ष्मणः ॥ ५२ ॥

तिने आपल्या केशपाशात असणारा चूडामणी बाहेर काढून त्याला दिला व ती त्याला म्हणाली, "हे कपिश्रेष्ठा, लक्ष्मणासह श्रीराम या खुणेमुळे तुझ्यावर विश्वास ठेवतील. (५२)

अभिज्ञानार्थमन्यच्च वदामि तव सुव्रत ।
चित्रकूटगिरौ पूर्वमेकदा रहसि स्थितः ।
मदङ्के शिर आधाय निद्राति रघुनन्दनः ॥ ५३ ॥

हे सुव्रता, ओळख पटविण्यासाठी म्हणून आणखी एक गोष्ट मी तुला सांगते. पूर्वी एकदा चित्रकूट पर्वतावर असताना एकांत स्थानी रघुनंदन माझ्या मांडीवर मस्तक ठेवून झोपले होते. (५३)

ऐन्द्रः काकस्तदागत्य नखैस्तुण्डेन चासकृत् ।
मत्पादाङ्गुष्ठमारक्तं विददारामिषाशया ॥ ५४ ॥

त्या वेळी इंद्राचा पुत्र (जयंत) कावळ्याच्या रूपाने तेथे आला आणि मांसाच्या लोभाने त्याने माझ्या पायाचा लालबुंद अंगठा चोचीने फोडला. (५४)

ततो रामः प्रबुद्ध्याथ दृष्ट्वा पादं कृतव्रणम् ।
केन भद्रे कृतं चैतद्विप्रियं मे दुरात्मना ॥ ५५ ॥

त्यानंतर श्रीराम जेव्हा जागे झाले तेव्हा जखमी झालेला माझा पाय पाहून त्यांनी विचारले, " हे कल्याणी, कोणा दुष्टात्म्याने अत्यंत अप्रिय असे हे कर्म केले आहे ? " (५५)

इत्युक्त्वा पुरतोऽपश्यद्वायसं मां पुनः पुनः ।
अभिद्रवन्तं रक्ताक्तनखतुण्डं चुकोप ह ॥ ५६ ॥

ते असे बोलत होते, तितक्यात ज्याचे तोंड व नखे रक्ताने माखलेली होती, असा तो कावळा पुन्हा माझ्याकडे येत होता, तो त्यांना समोर दिसला. त्याला पाहून श्रीरामांना फार क्रोध आला. (५६)

तृणमेकमुपादाय दिव्यास्त्रेणाभियोज्य तत् ।
चिक्षेप लीलया रामो वायसोपरि तज्ज्वलत् ॥ ५७ ॥

श्रीरामांनी एक गवताची काडी घेऊन, तिच्यावर दिव्यास्त्राची योजना केली आणि ती ज्वलंत काडी त्यांनी लीलेने त्या कावळ्यावर फेकली. (५७)

अभ्यद्रवद्वायसश्च भीतो लोकान् भ्रमन्पुनः ।
इन्द्रब्रह्मादिभिश्चापि न शक्यो रक्षितुं तदा ॥ ५८ ॥

तेव्हा घाबरलेला कावळा पळत सुटला आणि तिन्ही लोकात भटकू लागला. परंतु त्या वेळी इंद्र, ब्रह्मदेव इत्यादींसुद्धा त्याचे रक्षण करू शकले नाहीत. (५८)

रामस्य पादयोरग्रेऽपतद्भीत्या दयानिधेः ।
शरणागतमालोक्य रामस्तमिदमब्रवीत् ॥ ५९ ॥

अमोघमेतदस्त्रं मे दत्त्वैकाक्षमितो व्रज ।
सव्यं दत्त्वा गतः काक एवं पौरुषवानपि ॥ ६० ॥

उपेक्षते किमर्थं मामिदानीं सोऽपि राघवः ।
हनूमानपि तामाह श्रुत्वा सीतानुभाषितम् ॥ ६१ ॥

तेव्हा तो भीत भीत दयानिधान अशा श्रीरामांच्या पाया पडला. तो शरण आला असे पाहून श्रीराम त्याला म्हणाले, 'माझे हे अस्त्र कधीही व्यर्थ जात नाही. तेव्हा तू आपला एक डोळा देऊन निघून जा.' तेव्हा आपला डावा डोळा देऊन तो कावळा तेथून निघून गेला. अशा प्रकारचे सामर्थ्य असूनही राघव आत्ता का बरे माझी उपेक्षा करीत आहेत ?' सीतेचे हे भाषण ऐकल्यावर, हनुमानसुद्धा तिला म्हणाला. (५९-६१)

देवि त्वां यदि जानाति स्थितामत्र रघूत्तमः ।
करिष्यति क्षणाद्भस्म लङ्कां राक्षसमण्डिताम् ॥ ६२ ॥

"हे देवी, तू येथे आहेस, हे जर रघूत्तम रामांना कळले तर ते राक्षसांनी भूषित केलेल्या या लंकेचे क्षणात भस्म करून टाकतील. " (६२)

जानकी प्राह तं वत्स कथं त्वं योत्स्यसेऽसुरैः ।
अतिसूक्ष्मवपुः सर्वे वानराश्च भवादृशाः ॥ ६३ ॥

तेव्हा जानकी त्याला म्हणाली,"वत्सा, अतिशय लहान शरीर असणारा तू कसा बरे असुरांशी लढशील ? इतर सर्व वानरही तुझ्यासारखेच असणार." (६३)

श्रुत्वा तद्वचनं देव्यै पूर्वरूपमदर्शयत् ।
मेरुमन्दरसङ्काशं रक्षोगणविभीषणम् ॥ ६४ ॥

तिचे वचन ऐकल्यावर, हनुमानाने मेरु - मंदर-पर्वताप्रमाणे असणारे आणि राक्षस समूहांना भयभीत करून टाकणारे स्वतःचे पूर्वीचे रूप जानकीला दाखविले. (६४)

दृष्ट्वा सीता हनूमन्तं महापर्वतसन्निभम् ।
हर्षेण महताविष्टा प्राह तं कपिकुञ्जरम् ॥ ६५ ॥

एखाद्या प्रचंड पर्वताप्रमाणे विशाल शरीर असणाऱ्या हनुमंताला पाहून सीता अतिशय आनंदाने भरून गेली आणि ती त्या वानरश्रेष्ठाला म्हणाली. (६५)

समर्थोऽसि महासत्त्व द्रक्ष्यन्ति त्वां महाबलम् ।
राक्षस्यस्ते शुभः पन्था गच्छ रामान्तिकं द्रुतम् ॥ ६६ ॥

"हे महाशक्तिसंपन्न मारुती, तू समर्थ आहेस. आता महाबलवान अशा तुला या राक्षसी पाहातील. तू लवकर रामांकडे जा. तुझा मार्ग शुभ होवो." (६६)

बुभुक्षितः कपिः प्राह दर्शनात्पारणं मम ।
भविष्यति फलैः सर्वैस्तव दृष्टौ स्थितैर्हि मे ॥ ६७ ॥

त्या वेळी हनुमानाला भूक लागली होती. तो सीतेला म्हणाला, "देवी, तुझे दर्शन घेणे हेच माझे व्रत होते आणि ते पूर्ण झाले आहे. तेव्हा तुझ्या दृष्टीसमोर जी फळे आहेत ती खाऊन मी माझे पारणे फेडीन." (६७)

तथेत्युक्तः स जानक्या भक्षयित्वा फलं कपिः।
ततः प्रस्थापितोऽगच्छज्जानकीं प्रणिपत्य सः ।
किञ्चिद्दूरमथो गत्वा स्वात्मन्येवान्वचिन्तयत् ॥ ६८ ॥

'ठीक आहे' असे जानकीने म्हटल्यावर, हनुमानाने फळे खाल्ली. नंतर तिने निरोप दिल्यावर जानकीला प्रणाम करून तो निघाला. त्यानंतर काहीसे दूर गेल्यावर तो स्वतःच्याच मनाशी विचार करू लागला. (६८)

कार्यार्थमागतो दूतः स्वामिकार्याविरोधतः ।
अन्यत्किञ्चिदसम्पाद्य गच्छत्यधम एव सः ॥ ६९ ॥

'आपल्या स्वामींचे कार्य करण्यासाठी आलेला दूत स्वामी- कार्याला विरोधी होणार नाही असे अन्य काही कार्य न करताच जर परत गेला, तर तो दूत अधम प्रतीचा होय. (६९)

अतोऽहं किञ्चिदन्यच्च कृत्वा दृष्ट्वाथ रावणम् ।
सम्भाष्य च ततो रामदर्शनार्थं व्रजाम्यहम् ॥ ७० ॥

म्हणून मी अन्य काही कार्य करून, त्यानंतर रावणाला भेटून, त्याच्याशी संभाषण करून, मग रामांना भेटण्यासाठी परत जाईन.' (७०)

इति निश्चित्य मनसा वृक्षखण्डान्महाबलः ।
उत्पाट्याशोकवनिकां निर्वृक्षामकरोत्क्षणात् ॥ ७१ ॥

मनात असा निश्चय करून महाबली हनुमानाने झाडेच्या झाडे उपटून टाकून एका क्षणात ती अशोकवाटिका वृक्ष-रहित करून टाकली. (७१)

सीताश्रयनगं त्यक्त्वा वनं शून्यं चकार सः ।
उत्पाटयन्तं विपिनं दृष्ट्वा राक्षसयोषितः ॥ ७२ ॥

अपृच्छञ् जानकीं कोऽसौ वानराकृतिरुद्भटः ॥ ७३ ॥

सीता ज्या वृक्षाच्या आश्रयाने बसली होती तो वृक्ष सोडून त्याने ते संपूर्ण अशोकवन उध्वस्त केले. वृक्ष उपटून मारुती वन उजाड करीत असल्याचे पाहून, तेथल्या राक्षस स्त्रियांनी जानकीला विचारले, "वानराचा आकार असणारा हा कोण अपार पराक्रमी वीर आहे?"(७२-७३)

*जानक्युवाच*

भवत्य एव जानन्ति मायां राक्षसनिर्मिताम् ।
नाहमेनं विजानामि दुःखशोकसमाकुला ॥ ७४ ॥

**जानकी म्हणाली** – "हे बायांनो, राक्षसांनी निर्माण केलेली ही माया तुम्हांलाच माहीत असणार. दुःख व शोक यांनी भरलेल्या मला हा कोण आहे, हे कसे माहीत असणार ?" (७४)

इत्युक्तास्त्वरितं गत्वा राक्षस्यो भयपीडिताः ।
हनूमता कृतं सर्वं रावणाय न्यवेदयन् ॥ ७५ ॥

सीतेने असे सांगितल्यावर, भयभीत झालेल्या त्या राक्षस स्त्रिया त्वरित रावणाजवळ गेल्या आणि हनुमंताने केलेली सर्व खोडी त्यांनी रावणाला निवेदन केली. (७५)

देव कश्चिन्महासत्त्वो वानराकृतिदेहभृत् ।
सीतया सह सम्भाष्य ह्यशोकवनिकां क्षणात् ।
उत्पाट्य चैत्यप्रासादं बभञ्जामितविक्रमः ॥ ७६ ॥

(त्या रावणाला सांगू लागल्या,) "महाराज, वानराच्या आकाराप्रमाणे देह धारण करणारा कोणी एक महासामर्थ्यसंपन्न असणारा प्राणी येथे आला आहे. सीतेबरोबर संभाषण करून झाल्यावर, एका क्षणात वृक्ष उपटून त्याने अशोकवनिका उजाड केली आहे, आणि

प्रासादरक्षिणः सर्वान्हत्वा तत्रैव तस्थिवान् ।
तच्छ्रुत्वा तूर्णमुत्थाय वनभङ्गं महाप्रियम् ॥ ७७ ॥

किङ्करान्प्रेषयामास नियुतं राक्षसाधिपः ।
निभग्नचैत्यप्रासादप्रथमान्तरसंस्थितः ॥ ७८ ॥

हनुमान्पर्वताकारो लोहस्तम्भकृतायुधः ।
किञ्चिल्लाङ्गूलचलनो रक्तास्यो भीषणाकृतिः ॥ ७९ ॥

आपतन्तं महासङ्घं राक्षसानां ददर्श सः ।
चकार सिंहनादं च श्रुत्वा ते मुमुहुर्भृशम् ॥ ८० ॥

हनूमन्तमथो दृष्ट्वा राक्षसा भीषणाकृतिम् ।
निर्जघ्नुर्विविधास्त्रौघैः सर्वराक्षसघातिनम् ॥ ८१ ॥

तत उत्थाय हनुमान्मुद्गरेण समन्ततः ।
निष्पिपेष क्षणादेव मशकानिव यूथपः ॥ ८२ ॥

निहतान्किङ्कराञ् श्रुत्वा रावणः क्रोधमूर्च्छितः ।
पञ्च सेनापतींस्तत्र प्रेषयामास दुर्मदान् ॥ ८३ ॥

हनूमानपि तान्सर्वांल्लोहस्तम्भेन चाहनत् ।
ततः क्रुद्धो मन्त्रिसुतान्प्रेषयामास सप्त सः ॥ ८४ ॥

आगतानपि तान्सर्वान्पूर्ववद्वानरेश्वरः ।
क्षणान्निःशेषतो हत्वा लोहस्तम्भेन मारुतिः ॥ ८५ ॥

पूर्वस्थानमुपाश्रित्य प्रतीक्षन् राक्षसान् स्थितः ।
ततो जगाम बलवान्कुमारोऽक्षः प्रतापवान् ॥ ८६ ॥

तमुत्पपात हनुमान् दृष्ट्वाकाशे समुद्गरः ।
गगनात्त्वरितो मूर्ध्नि मुद्गरेण व्यताडयत् ॥ ८७ ॥

हत्वा तमक्षं निःशेषं बलं सर्वं चकार सः ॥ ८८ ॥

ततः श्रुत्वा कुमारस्य वधं राक्षसपुङ्गवः ।
क्रोधेन महताविष्ट इन्द्रजेतारमब्रवीत् ॥ ८९ ॥

अमर्याद पराक्रमी असणाऱ्या त्याने तेथील देवालयही फोडून टाकले आहे, आणि प्रासादाच्या रक्षणासाठी असणाऱ्या सर्व रक्षकांना ठार करून तो तेथेच बसला आहे.'' वनाच्या विध्वंसाचा तो अत्यंत अप्रिय समाचार ऐकल्यावर रावण झटक्यात उठला आणि त्या राक्षसांच्या राजाने दहा लाख सेवकांना (मारुतीच्या पारिपत्यासाठी) पाठविले. त्या वेळी इकडे पर्वताप्रमाणे आकार असणारा, एक लोखंडी खांब शस्त्र म्हणून वापरणारा, थोडीशी शेपटी हालविणारा, लाल तोंडाचा, भयानक आकार असणारा हनुमान भग्न केलेल्या मंदिराच्या पुढल्या भागात बसला होता. (७६-७९)

राक्षसांचा प्रचंड समूह आपल्यावर चालून येत आहे, हे त्याने पाहिले. तेव्हा त्याने प्रचंड सिंहनाद केला. तो ऐकून राक्षस मूर्च्छित झाले. (८०)

त्यानंतर सर्व राक्षसांना मारणाऱ्या व भयंकर आकार असणाऱ्या हनुमंताला पाहून राक्षसांनी विविध अस्त्रांनी त्याच्यावर प्रहार केले. (८१)

तेव्हा हनुमान उठला आणि हत्तीच्या कळपाच्या प्रमुखाने ज्या प्रमाणे माश्यांना चिरडून टाकावे, त्या प्रमाणे हनुमानाने आपल्या मुद्गराने सर्व बाजूला असणाऱ्या राक्षसांना एका क्षणात चिरडून टाकले. (८२)

आपले सेवक मारले गेले, हे ऐकल्यावर रावण क्रोधाने बेभान झाला आणि त्याने तेथे आपले पाच मदोन्मत्त सेनापती पाठविले. (८३)

त्या सर्वांनाच हनुमानाने लोखंडी खांबाने मारून टाकले. तेव्हा रागावलेल्या रावणाने मंत्र्यांच्या सात पुत्रांना पाठविले. (८४)

त्या सर्वांना वानरश्रेष्ठ मारुतीने एका क्षणात पूर्वीप्रमाणे आपल्या लोखंडी खांबाने संपूर्णपणे नष्ट करून टाकले आणि मग आपल्या पूर्वीच्या ठिकाणाचा आश्रय घेऊन तो अन्य राक्षस येण्याची वाट पाहात बसला. त्या वेळी बलवान आणि प्रतापी असा राजकुमार अक्ष हा तेथे आला. (८५-८६)

त्याला पाहिल्यावर, मुद्गर घेऊन हनुमानाने आकाशात उड्डाण केले आणि आकाशातूनच त्याने वेगाने अक्षाच्या मस्तकावर मुद्गराचा तडाखा दिला. (८७)

अक्षाचा वध करून मारुतीने त्याच्या सैन्याचाही समूळ नाश केला. (८८)

तेव्हा राजकुमाराचा वध झाला, हे ऐकल्यानंतर राक्षसश्रेष्ठ रावण अतिशय क्रुद्ध झाला आणि तो इंद्रजिताला म्हणाला. (८९)

पुत्र गच्छाम्यहं तत्र यत्रास्ते पुत्रहा रिपुः ।
हत्वा तमथवा बद्ध्वा आनयिष्यामि तेऽन्तिकम्॥ ९० ॥

"हे पुत्रा, माझ्या पुत्राचा वध करणाऱ्या शत्रूजवळ जातो आणि त्याला ठार करून अथवा बांधून मी तुझ्याजवळ आणतो." (९०)

इन्द्रजित्पितरं प्राह त्यज शोकं महामते ।
मयि स्थिते किमर्थं त्वं भाषसे दुःखितं वचः ॥ ९१ ॥

तेव्हा इंद्रजित पित्याला म्हणाला, "हे महाबुद्धिमान तात, तुम्ही शोक टाकून द्या. मी येथे असताना तुम्ही दुःखपूर्ण वचन का बरे बोलत आहात? (९१)

बद्ध्वानेष्ये द्रुतं तात वानरं ब्रह्मपाशतः ।
इत्युक्त्वा रथमारुह्य राक्षसैर्बहुभिर्वृतः ॥ ९२ ॥

जगाम वायुपुत्रस्य समीपं वीरविक्रमः ।
ततोऽतिगर्जितं श्रुत्वा स्तम्भमुद्यम्य वीर्यवान् ॥ ९३ ॥

उत्पपात नभोदेशं गरुत्मानिव मारुतिः ।
ततो भ्रमन्तं नभसि हनूमन्तं शिलीमुखैः ॥ ९४ ॥

विद्ध्वा तस्य शिरोभागमिषुभिश्चाष्टभिः पुनः ।
हृदयं पादयुगलं षड्भिरेकेन वालधिम् ॥ ९५ ॥

भेदयित्वा ततो घोरं सिंहनादमथाकरोत् ।
ततोऽतिहर्षाद्धनुमान् स्तम्भमुद्यम्य वीर्यवान् ॥ ९६ ॥

जघान सारथिं साश्वं रथं चाचूर्णयत्क्षणात् ।
ततोऽन्यं रथमादाय मेघनादो महाबलः ॥ ९७ ॥

शीघ्रं ब्रह्मास्त्रमादाय बद्ध्वा वानरपुङ्गवम् ।
निनाय निकटं राज्ञो रावणस्य महाबलः ॥ ९८ ॥

बाबा, त्या वानराला त्वरित ब्रह्मपाशाने बांधून मी घेऊन येतो." असे बोलून तो एका रथावर चढला, आणि अनेक राक्षसांसमवेत तो महापराक्रमी वीर वायुपुत्राजवळ गेला. मग इंद्रजिताने केलेली प्रचंड गर्जना ऐकल्यावर पराक्रमी मारुतीने हाताने लोखंडी खांब उचलून, गरुडाप्रमाणे आकाशात उड्डाण केले. त्यानंतर आकाशात भ्रमण करणाऱ्या हनुमंताला पाहिल्यावर इंद्रजिताने काही बाणांनी त्याच्यावर प्रहार केले. नंतर पुन्हा आठ बाणांनी त्याचा शिरोभाग विद्ध केला. सहा बाणांनी त्याचे हृदय आणि दोन्ही पाय विद्ध केले. तसेच एका बाणाने शेपटीचा भेद करून, इंद्रजिताने भयानक सिंहनाद केला. मग पराक्रमी हनुमानाने अतिशय उत्साहाने खांब उचलून त्या इंद्रजिताच्या सारथ्याचा वध केला आणि एका क्षणात घोड्यांसह रथाचे चूर्ण केले. तेव्हा महाबलवान इंद्रजिताने दुसरा रथ घेऊन त्यावर आरोहण केले आणि सत्वर ब्रह्मास्त्र सोडून त्याने वानरश्रेष्ठाला बांधून रावणाच्याजवळ नेले. (९२-९८)

यस्य नाम सततं जपन्ति ये-
ऽज्ञानकर्मकृतबन्धनं क्षणात् ।
सद्य एव परिमुच्य तत्पदं
यान्ति कोटिरविभासुरं शिवम् ॥ ९९ ॥

तस्यैव रामस्य पदाम्बुजं सदा
हृत्पद्ममध्ये सुनिधाय मारुतिः ।
सदैव निर्मुक्तसमस्तबन्धनः
किं तस्य पाशैरितरैश्च बन्धनैः ॥ १०० ॥

ज्या श्रीरामांच्या नावाचा सतत जप करणारे भक्तजन क्षणात अज्ञानाने निर्माण केलेल्या कर्मांनी आलेले बंधन तत्काळ तोडून टाकून, कोटिसूर्याप्रमाणे प्रकाशमान असणाऱ्या, कल्याणकारक अशा श्रीरामांच्या स्थानी जातात, त्याच रामांची चरणकमळे सदा आपल्या हृदयामध्ये ठेवल्यामुळे मारुती नेहमीच सर्वच बंधनांतून मुक्त झालेला होता. त्याला ब्रह्मपाशांनी तसेच इतर बंधनांनी काय होणार बरे ? (९९-१००)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुन्दरकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

# चतुर्थ सर्ग

## हनुमान आणि रावण यांचा संवाद आणि लंकादहन

*श्रीमहादेव उवाच*

यान्तं कपीन्द्रं धृतपाशबन्धनं
विलोकयन्तं नगरं विभीतवत् ।
अताडयन्मुष्टितलैः सुकोपनाः
पौराः समन्तादनुयान्त ईक्षितुम् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, ब्रह्मपाशात पकडला गेलेला तो कपिश्रेष्ठ निर्भय मनाने परंतु वरवर भ्याल्याप्रमाणे, लंकानगरी पाहात पाहात जात होता, तेव्हा अतिशय रागावलेले आणि त्याला पाहाण्यास सर्व बाजूंनी एकत्र येऊन त्याच्या मागोमाग जाणारे नगरवासी राक्षस त्याला बुक्क्यांनी मारू लागले. (१)

ब्रह्मास्त्रमेनं क्षणमात्रसङ्गमं
कृत्वा गतं ब्रह्मवरेण सत्वरम् ।
ज्ञात्वा हनूमानपि फल्गुरज्जुभि-
र्धृतो ययौ कार्यविशेषगौरवात् ॥ २ ॥

ब्रह्मदेवाने मारुतीला दिलेल्या वरामुळे ब्रह्मास्त्राने त्याच्या देहाला क्षणमात्र स्पर्श केला आणि ते सत्वर निघून गेले, ही गोष्ट हनुमानाला कळली असूनसुद्धा काही विशिष्ट महत्त्वाचे कार्य पार पाडावयाचे असल्यामुळे, हनुमान साध्या दोऱ्यांनी बांधलेल्या स्थितीत जात होता. (२)

सभान्तरस्थस्य च रावणस्य तं
पुरो निधायाह बलारिजित्तदा ।
बद्धो मया ब्रह्मवरेण वानरः
समागतोऽनेन हता महासुराः ॥ ३ ॥

राजसभेमध्ये बसलेल्या रावणापुढे त्या हनुमानाला उभे करून, इंद्रजित रावणाला म्हणाला, "ब्रह्मदेवाच्या वराच्या सामर्थ्याने बांधलेला हा वानर पकडून मी येथे आणला आहे. मोठमोठ्या राक्षसांना याने ठार केले आहे. (३)

यद्युक्तमत्रार्य विचार्य मन्त्रिभि-
र्विधीयतामेष न लौकिको हरिः ।
ततो विलोक्याह स राक्षसेश्वरः
प्रहस्तमग्रे स्थितमञ्जनाद्रिभम् ॥ ४ ॥

महाराज, मंत्र्यांबरोबर विचार करून याचे बाबतीत जे योग्य आहे, ते तुम्ही करा. कारण हा वानर सामान्य नाही." त्यानंतर मारुतीकडे पाहिल्यावर, तो राक्षसराज समोर बसलेल्या, काजळाच्या पर्वताप्रमाणे कृष्णवर्ण असणाऱ्या प्रहस्त राक्षसाला म्हणाला. (४)

प्रहस्त पृच्छैनमसौ किमागतः
किमत्र कार्यं कुत एव वानरः ।
वनं किमर्थं सकलं विनाशितं
हताः किमर्थं मम राक्षसा बलात् ॥ ५ ॥

"अरे प्रहस्ता, या वानराला विचार की हा येथे का आला आहे ? त्याचे येथे काय काम आहे ? हा वानर कोठून आला? याने संपूर्ण अशोकवन का नष्ट करून टाकले ? तसेच माझ्या राक्षसांना याने बळजबरीने का बरे ठार केले ?" (५)

ततः प्रहस्तो हनुमन्तमादरात्
पप्रच्छ केन प्रहितोऽसि वानर ।
भयं च ते मास्तु विमोक्ष्यसे मया
सत्यं वदस्वाखिलराजसन्निधौ ॥ ६ ॥

तेव्हा आदरपूर्वक प्रहस्ताने हनुमंताला प्रश्न केला, "अरे वानरा, तुला कोणी इकडे पाठविले आहे ? तू घाबरू नकोस. या राजराजेश्वर रावणाजवळ सत्य सांग, मी तुला सोडवीन." (६)

ततोऽतिहर्षात्पवनात्मजो रिपुं
निरीक्ष्य लोकत्रयकण्टकासुरम् ।
वक्तुं प्रचक्रे रघुनाथसत्कथां
क्रमेण रामं मनसा स्मरन्मुहुः ॥ ७ ॥

त्यानंतर तिन्ही लोकांना कंटकभूत असणाऱ्या असूर शत्रूला नीट पाहिल्यानंतर, मनात रामांचे वारंवार स्मरण करून, अतिशय आनंदाने, हनुमानाने श्रीरामांची सुंदर कथा क्रमाने सांगण्यास प्रारंभ केला. (७)

श्रृणु स्फुटं देवगणाद्यमित्र हे
रामस्य दूतोऽहमशेषहृत्स्थिते: ।
यस्याखिलेशस्य हृताधुना त्वया
भार्या स्वनाशाय शुनेव सद्धवि: ॥ ८ ॥

(तो म्हणाला,) "देवादिकांचा शत्रू असणाऱ्या हे रावणा, नीट ऐक. ज्या प्रमाणे एकादा कुत्रा यज्ञातील हवी चोरून नेतो, त्या प्रमाणे तू स्वत:चा नाश करून घेण्यासाठी, ज्या सर्वेश्वर श्रीरामांची भार्या हरण करून आणली आहेस, त्या सर्वांच्या अंत:करणात स्थित असणाऱ्या श्रीरामांचा मी दूत आहे. (८)

स राघवोऽभ्येत्य मतङ्गपर्वतं
सुग्रीवमैत्रीमनलस्य सन्निधौ ।
कृत्वैकबाणेन निहत्य वालिनं
सुग्रीवमेवाधिपतिं चकार तम् ॥ ९ ॥

ते श्रीराघव मतंग पर्वतावर आले आणि अग्नीच्या साक्षीने त्यांनी सुग्रीवाशी मैत्री केली. नंतर एका बाणाने वालीचा वध करून, रामांनी सुग्रीवाला वानरांचा अधिपती केले आहे. (९)

स वानराणामधिपो महाबली
महाबलैर्वानरयूथकोटिभि: ।
रामेण सार्धं सह लक्ष्मणेन भो:
प्रवर्षणेऽमर्षयुतोऽवतिष्ठते ॥ १० ॥

अरे रावणा, तो महाबलवान वानरांचा राजा सुग्रीव महाबलवान अशा कोट्यवधी वानरांच्या समूहाबरोबर आणि श्रीराम व लक्ष्मण यांच्यासह क्रोधयुक्त होऊन, सध्या प्रवर्षण नावाच्या पर्वतावर राहात आहे. (१०)

सञ्चोदितास्तेन महाहरीश्वरा
धरासुतां मार्गयितुं दिशो दश ।
तत्राहमेक: पवनात्मज: कपि:
सीतां विचिन्वञ्छनकै: समागत: ॥ ११ ॥

पृथ्वीकन्या सीतेचा शोध घेण्यासाठी त्याने दाही दिशांना मोठमोठे वानरश्रेष्ठ पाठविले आहेत. त्यांच्यापैकी मी एक वानर आहे. मी वायूचा पुत्र आहे. सीतेचा शोध करीत मी हळूहळू येथे आलो आहे. (११)

दृष्टा मया पद्मपलाशलोचना
सीता कपित्वाद्विपिनं विनाशितम् ।
दृष्ट्वा ततोऽहं रभसा समागता-
न्मां हन्तुकामान् धृतचापसायकान् ॥ १२ ॥

मया हतास्ते परिरक्षितं वपु:
प्रियो हि देहोऽखिलदेहिनां प्रभो ।
ब्रह्मास्त्रपाशेन निबध्य मां तत:
समागमन्मेघनिनादनामक: ॥ १३ ॥

कमलदलाप्रमाणे नेत्र असणाऱ्या सीतेला मी भेटलो आहे. वानर जातीच्या हूड स्वभावाला अनुसरून मी अशोकवनाचा विध्वंस केला आहे. त्यानंतर मला ठार मारण्यासाठी धनुष्य बाण घेऊन वेगाने येणारे राक्षस जेव्हा मला दिसले, तेव्हा मी त्यांना ठार केले आणि माझ्या शरीराचे रक्षण केले. कारण, हे प्रभो, सर्व प्राण्यांना स्वत:चा देह प्रिय असतो. त्यानंतर मेघनाद नावाच्या राक्षसाने ब्रह्मास्त्राच्या पाशाने मला बांधून येथे आणले आहे. (१२-१३)

स्पृष्ट्वैव मां ब्रह्मवरप्रभावत-
स्त्यक्त्वा गतं सर्वमवैमि रावण ।
तथाप्यहं बद्ध इवागतो हितं
प्रवक्तुकाम: करुणारसार्द्रधी: ॥ १४ ॥

हे रावणा, ब्रह्मदेवाने दिलेल्या वराच्या प्रभावामुळे ते ब्रह्मास्त्र मला फक्त स्पर्श करून निघून गेले आहे, हे जरी मला माहीत होते तरीसुद्धा माझी बुद्धी करुणापूर्ण असल्यामुळे, तुला हितकारक गोष्ट सांगण्याच्या इच्छेने, एखाद्या बंद्याप्रमाणे मी येथे आलो आहे. (१४)

विचार्य लोकस्य विवेकतो गतिं
न राक्षसीं बुद्धिमुपैहि रावण ।
दैवीं गतिं संसृतिमोक्षहैतुकीं
समाश्रयात्यन्तहिताय देहिन: ॥ १५ ॥

हे रावणा, विवेक केल्यामुळे लोकांना चांगली गती मिळते म्हणून तू राक्षसी बुद्धीचा अंगीकार करू नकोस. प्राण्यांचे अतिशय हित करणारी आणि त्यांना संसारातून मुक्त करणारी अशी जी दैवी बुद्धी आहे, तिचा तू आश्रय घे. (१५)

त्वं ब्रह्मणो ह्युत्तमवंशसम्भवः
पौलस्त्यपुत्रोऽसि कुबेरबान्धवः ।
देहात्मबुद्ध्यापि च पश्य राक्षसो
नास्यात्मबुद्ध्या किमु राक्षसो नहि ॥ १६ ॥

तू ब्रह्मदेवांच्या उत्तम वंशात जन्माला आला आहेस. तू पुलस्त्य-पुत्र विश्रवाचा पुत्र असून कुबेराचा बंधू आहेस. हे बघ ! देह म्हणजेच आत्मा, अशा देहात्मबुद्धीने जरी पाहिले तरी तू राक्षस नाहीस, मग देह हा आत्म्यापेक्षा वेगळा आहे, अशा आत्मबुद्धीने पाहिले तर तू राक्षस नाहीसच, हे काय सांगावयास हवे ? (१६)

शरीरबुद्धीन्द्रियदुःखसन्तति-
र्न ते न च त्वं तव निर्विकारतः ।
अज्ञानहेतोश्च तथैव सन्तते-
रसत्त्वमस्याः स्वपतो हि दृश्यवत् ॥ १७ ॥

तू संपूर्णपणे निर्विकार असल्याने शरीर, बुद्धी, इंद्रिये आणि दुःखाचे ओघ हे तुझे गुण नाहीत, तसेच ते म्हणजे तू स्वतः नाहीस. ते सर्व अज्ञानामुळे वाटते. स्वप्नातील दृश्य जसे असत्य असते, तसे हे सर्व पदार्थ असत् आहेत. (१७)

इदं तु सत्यं तव नास्ति विक्रिया
विकारहेतुर्न च तेऽद्वयत्वतः ।
यथा नभः सर्वगतं न लिप्यते
तथा भवान्देहगतोऽपि सूक्ष्मकः ।
देहेन्द्रियप्राणशरीरसङ्गत-
स्त्वात्मेति बुद्ध्याखिलबन्धभाग्भवेत् ॥ १८ ॥

हे सत्य आहे की तुझ्या आत्मरूपात कोणताही विकार होत नाही. कारण आत्मा हा अद्वितीय असल्यामुळे त्याचे ठिकाणी विकारांचे कोणतेही कारण असत नाही. ज्या प्रमाणे आकाश सर्वत्र असले तरी ते कोणत्याही गुणदोषांनी लिप्त होत नाही, त्या प्रमाणे तू देहात राहात असलास, तरी सूक्ष्म असा आत्मा असल्यामुळे तू कशानेही लिप्त होत नाहीस. देह, इंद्रिये, प्राण आणि शरीर यांच्याशी आत्म्याचे मीलन झाले आहे, अशा बुद्धीनेच माणूस सर्व बंधनांत सापडतो. (१८)

चिन्मात्रमेवाहमजोऽहमक्षरो
ह्यानन्दभावोऽहमिति प्रमुच्यते ।
देहोऽप्यनात्मा पृथिवीविकारजो
न प्राण आत्मानिल एष एव सः ॥ १९ ॥

मी फक्त चैतन्य, जन्मरहित, अविनाशी आणि आनंद-स्वरूप आहे. अशा बुद्धीने प्राणी संसारातून मुक्त होऊन जातो. पृथ्वीच्या विकारापासून उत्पन्न झालेला देह हा आत्मा नाही. तसेच प्राण म्हणजेही आत्मा नव्हे, कारण प्राण हा नुसता अचेतन वायूच आहे. (१९)

मनोऽप्यहङ्कारविकार एव नो
न चापि बुद्धिः प्रकृतेर्विकारजा ।
आत्मा चिदानन्दमयोऽविकारवा-
न्देहादिसङ्घाद्व्यतिरिक्त ईश्वरः ॥ २० ॥

अहंकाराचा विकार असणारे मन हेसुद्धा आत्मा नाहीच; त्याच प्रमाणे प्रकृतीच्या विकारांपासून उत्पन्न होणारी बुद्धी हीसुद्धा आत्मा नाही. आत्मा हा तर चिदानंद-स्वरूप, विकाररहित, देह इत्यादी समुदायापेक्षा वेगळा, आणि त्यांचा स्वामी किंवा ईश्वर आहे. (२०)

निरञ्जनो मुक्त उपाधितः सदा
ज्ञात्वैवमात्मानमितो विमुच्यते ।
अतोऽहमात्यन्तिकमोक्षसाधनं
वक्ष्ये शृणुष्वावहितो महामते ॥ २१ ॥

तो आत्मा निरंजन, आणि उपाधीतून सदा मुक्त आहे. अशा प्रकारच्या आत्म्याला जाणल्यावर, प्राणी संसारातून मुक्त होऊन जातो. म्हणून हे महाबुद्धिमाना, मी तुझ्यासाठी आत्यंतिक मोक्षाचे साधन सांगतो, ते तू लक्षपूर्वक ऐक . (२१)

विष्णोर्हि भक्तिः सुविशोधनं धिय-
स्ततो भवेज्ज्ञानमतीव निर्मलम् ।
विशुद्धतत्त्वानुभवो भवेत्ततः
सम्यग्विदित्वा परमं पदं व्रजेत् ॥ २२ ॥

विष्णूची भक्ती ही बुद्धीला अतिशय शुद्ध करणारी आहे; त्यानंतर अतिशय निर्मळ असे आत्मज्ञान होते. त्यानंतर विशुद्ध आत्मतत्त्वाचा अनुभव येईल. अशा प्रकारे योग्य प्रकारे आत्म्याला जाणल्यावर मनुष्य परमपदाप्रत जातो. (२२)

अतो भजस्वाद्यहरिं रमापतिं
रामं पुराणं प्रकृते: परं विभुम् ।
विसृज्य मौर्ख्यं हृदि शत्रुभावनां
भजस्व रामं शरणागतप्रियम् ।
सीतां पुरस्कृत्य सपुत्रबान्धवो
रामं नमस्कृत्य विमुच्यसे भयात् ॥ २३ ॥

म्हणून प्रकृतीच्या पलीकडे असणाऱ्या, पुराण पुरुष, सर्वव्यापक, आदिनारायण, लक्ष्मीपती रामाची भक्ती कर. तुझ्या हृदयातील शत्रुभावनारूपी मूर्खपणा टाकून देऊन, शरणागत माणसाविषयी प्रेम असणाऱ्या श्रीरामांचा आश्रय घे. सीतेला पुढे करून, पुत्र आणि बांधव यांच्यासह तू रामांना नमस्कार कर म्हणजे तू भयातून सुटशील. (२३)

रामं परात्मानमभावयञ्जनो
भक्त्या हृदिस्थं सुखरूपमद्वयम् ।
कथं परं तीरमवाप्नुयाज्जनो
भवाम्बुधेर्दु:खतरङ्गमालिन: ॥ २४ ॥

जो माणूस आपल्या हृदयात असणाऱ्या, अद्वितीय, सुखस्वरूप, परमात्मा अशा रामांचे भक्तीने ध्यान करीत नाही, तो दु:खरुपी तरंगांनी भरलेल्या संसार सागराच्या पलीकडील तीराला कसा बरे पोचेल? (२४)

नो चेत्त्वमज्ञानमयेन वह्निना
ज्वलन्तमात्मानमरक्षितारिवत् ।
नयस्यधोऽध: स्वकृतैश्च पातकै-
र्विमोक्षशङ्का न च ते भविष्यति ॥ २५ ॥

अशा प्रकारे जर तू रामांचे ध्यान केले नाहीस, तर अज्ञानरूपी अग्नीने जळणाऱ्या स्वत:ला एखाद्या शत्रूप्रमाणे तू सुरक्षित ठेवू शकणार नाहीस. उलट आपण केलेल्या पापांनी तू स्वत:ला अधोगतीला नेत राहशील. मग तुझ्या मोक्षाची कोणतीच शक्यता राहाणार नाही.” (२५)

श्रुत्वामृतास्वादसमानभाषितं
तद्वायुसूनोर्दशकन्धरोऽसुर: ।
अमृष्यमाणोऽतिरुषा कपीश्वरं
जगाद रक्तान्तविलोचनो ज्वलन् ॥ २६ ॥

वायुसुताचे अमृताच्या आस्वादाप्रमाणे असणारे ते भाषण रावणाला सहन झाले नाही; म्हणून अतिशय रागाने त्याचे डोळे लाल बुंद झाले. त्याच्या अंगाचा भडका उडाला आणि तो हनुमानाला म्हणाला. (२६)

कथं ममाग्रे विलपस्यभीतवत्
प्लवङ्गमानामधमोऽसि दुष्टधी: ।
क एष राम: कतमो वनेचरो
निहन्मि सुग्रीवयुतं नराधमम् ॥ २७ ॥

“अरे दुष्ट बुद्धी असणाऱ्या वानरा, तू अधम वानर आहेस. बेडरपणे तू माझ्यापुढे कशी बरे फालतू बडबड करीत आहेस ? हा राम तरी असा कोण आहे ? आणि तो वनचर सुग्रीव तरी असा कोण आहे ? सुग्रीवासहित त्या नराधम रामाला मी ठार करीन. (२७)

त्वां चाद्य हत्वा जनकात्मजां ततो
निहन्मि रामं सहलक्ष्मणं तत: ।
सुग्रीवमग्रे बलिनं कपीश्वरं
सवानरं हन्म्यचिरेण वानर ।
श्रुत्वा दशग्रीववच: स मारुति-
र्विवृद्धकोपेन दहन्निवासुरम् ॥ २८ ॥

अरे वानरा, आज प्रथम तुला ठार मारून, नंतर जनककन्या सीतेचा वध करून, त्यानंतर लक्ष्मणासकट रामाला मी ठार करीन आणि मग बलवान वानरराज सुग्रीवाला त्याच्या वानरांसकट लगेच ठार मारून टाकीन.” रावणाचे ते बोलणे ऐकल्यावर, आपल्या रागाने जणू त्या रावणाला जाळीत मारुती बोलला. (२८)

न मे समा रावणकोटयोऽधम
रामस्य दासोऽहमपारविक्रम: ।
श्रुत्वातिकोपेन हनूमतो वचो
दशाननो राक्षसमेवमब्रवीत् ॥ २९ ॥

“अरे नीचा, कोट्यवधी रावणसुद्धा माझी बरोबरी करू शकत नाहीत. मी श्रीरामांचा दास आहे आणि माझ्या पराक्रमाला कोणतीच सीमा नाही.” हनुमंताचे हे बोलणे ऐकल्यावर, अतिशय रागाने रावणाने जवळच उभ्या असणाऱ्या एक राक्षसाला म्हटले, “अरे, या वानराचे तुकडे

पार्श्वे स्थितं मारय खण्डशः कपिं
पश्यन्तु सर्वेऽसुरमित्रबान्धवाः ।
निवारयामास ततो बिभीषणो
महासुरं सायुधमुद्यतं वधे ।
राजन्वधार्हो न भवेत्कथञ्चन
प्रतापयुक्तैः परराजवानरः ॥ ३० ॥

तुकडे करून याचा वध कर आणि हे सर्व असुर, त्यांचे मित्र आणि बांधव यांना पाहू दे." त्या वेळी शस्त्र उगारून मारुतीचा वध करण्यास उद्युक्त झालेल्या त्या प्रचंड राक्षसाचे बिभीषणाने निवारण केले. आणि तो रावणाला म्हणाला, "हे राजन् , दुसऱ्या राजाकडून दूत म्हणून आलेला हा वानर कोणत्याही प्रकाराने ठार करणे योग्य ठरत नाही. (२९-३०)

हतेऽस्मिन्वानरे दूते वार्तां को वा निवेदयेत् ।
रामाय त्वं यमुद्दिश्य वधाय समुपस्थितः ॥ ३१ ॥

जर दूत म्हणून आलेल्या या वानराचा वध केला गेला, तर तू ज्यांच्या वधाला तयार झाला आहेस, त्या रामांना सर्व वार्ता कोण बरे निवेदन करील? (३१)

अतो वधसमं किञ्चिदन्यच्चिन्तय वानरे ।
सचिह्नो गच्छतु हरिर्यं दृष्ट्वायास्यति द्रुतम् ॥ ३२ ॥

राम: सुग्रीवसहितस्ततो युद्धं भवेत्तव ।
बिभीषणवचः श्रुत्वा रावणोऽप्येतदब्रवीत् ॥ ३३ ॥

म्हणून या वानराच्या बाबतीत वधासारखीच दुसरी कोणती तरी शिक्षा देण्याचा तू विचार कर. त्या शिक्षेची खूण घेऊन हा वानर परत जाऊ दे, म्हणजे त्याला पाहून सुग्रीवासह राम येथे त्वरित येतील. मग त्यांच्याशी तुझे युद्ध होईल." बिभीषणाचे हे वचन ऐकल्यावर रावणसुद्धा म्हणाला. (३२-३३)

वानराणां हि लाङ्गूले महामानो भवेत्किल ।
अतो वस्त्रादिभिः पुच्छं वेष्टयित्वा प्रयत्नतः ॥ ३४ ॥

वह्निना योजयित्वैनं भ्रामयित्वा पुरेऽभितः ।
विसर्जयत पश्यन्तु सर्वे वानरयूथपाः ॥ ३५ ॥

"आपल्या शेपटीचा वानरांना मोठा अभिमान नक्कीच असतो. तेव्हा प्रयत्नपूर्वक याचे शेपूट वस्त्रे इत्यादींनी लपेटून टाका आणि मग त्या शेपटीला आग लावा. नंतर या वानराला आपल्या नगरात सगळीकडे फिरवा आणि त्याला सोडून द्या. तो परत गेल्यावर सर्व वानर समूहांचे प्रमुख त्याची दुर्दशा बघू देत." (३४-३५)

तथेति शणपट्टैश्च वस्त्रैरन्यैरनेकशः ।
तैलाक्तैर्वेष्टयामासुर्लाङ्गूलं मारुतेर्दृढम् ॥ ३६ ॥

" ठीक आहे" असे म्हणून तागाच्या फडक्यांनी आणि तेलाने भिजलेल्या नाना प्रकारच्या अन्य वस्त्रांनी राक्षसांनी मारुतीचे शेपूट घट्ट बांधून टाकले. (३६)

पुच्छाग्रे किञ्चिदनलं दीपयित्वाथ राक्षसाः ।
रज्जुभिः सुदृढं बद्ध्वा धृत्वा तं बलिनोऽसुराः ॥ ३७ ॥

समन्ताद् भ्रामयामासुश्चोरोऽयमिति वादिनः ।
तूर्यघोषैर्घोषयन्तस्ताडयन्तो मुहुर्मुहुः ॥ ३८ ॥

त्याच्या शेपटीच्या टोकाला थोडासा अग्नी लावला. नंतर त्या बलवान राक्षसांनी मारुतीला दोऱ्यांनी घट्ट बांधून टाकले; त्याला धरून, त्याला वरचेवर बडवून काढीत, आणि वाद्यांच्या घोषात 'हा चोर आहे' असे ओरडत, बलवान राक्षस त्याला लंका नगरीत सगळीकडे फिरवू लागले. (३७-३८)

हनूमतापि तत्सर्वं सोढं किञ्चिच्चिकीर्षुणा ।
गत्वा तु पश्चिमद्वारसमीपं तत्र मारुतिः ॥ ३९ ॥

सूक्ष्मो बभूव बन्धेभ्यो निःसृतः पुनरप्यसौ ।
बभूव पर्वताकारस्तत उत्प्लुत्य गोपुरम् ॥ ४० ॥

काही तरी अद्भूत कृत्य करण्याची इच्छा धरून हनुमंताने ते सर्व सहन केले. पुढे नगराच्या पश्चिम द्वाराजवळ येताच तेथे मारुतीने सूक्ष्म रूप धारण केले, तेव्हा तो त्या बंधनांतून मुक्त झाला. मग तो पुनः पर्वताच्या आकाराचा झाला. नंतर त्याने नगराच्या गोपुरावर उडी मारली. तेथे एक खांब उपटून, त्याने एका क्षणात त्या सर्व रक्षकांना ठार केले. मग उरलेल्या कार्याचा विचार

तत्रैकं स्तम्भमादाय हत्वा तान् रक्षिण: क्षणात् ।
विचार्य कार्यशेषं स प्रासादाग्राद् गृहाद् गृहम् ॥ ४१ ॥

उत्प्लुत्योत्प्लुत्य सन्दीप्तपुच्छेन महता कपि: ।
ददाह लङ्कामखिलां साट्टप्रासादतोरणाम् ॥ ४२ ॥

करून, एका प्रासादावरून दुसऱ्या प्रासादावर, एका घरावरून दुसऱ्या घरावर सतत उड्या मारीत मारीत, आपल्या पेटलेल्या प्रचंड शेपटीने त्या हनुमानाने प्रासाद,तोरणे आणि वेशी या सर्वांसह संपूर्ण लंका नगरीला आग लावली. (३९-४२)

हा तात पुत्र नाथेति क्रन्दमाना: समन्तत: ।
व्याप्ता: प्रासादशिखरेऽप्यारूढा दैत्ययोषित: ॥ ४३ ॥

देवता इव दृश्यन्ते पतन्त्य: पावकेऽखिला: ।
बिभीषणगृहं त्यक्त्वा सर्वं भस्मीकृतं पुरम् ॥ ४४ ॥

प्रासादांच्या माथ्यावर चढलेल्या, आणि 'अहो बाबा, अरे पोरा, अहो नाथ' असा आक्रोश करीत आगीत पडणाऱ्या त्या सर्व दैत्य स्त्रियांसुद्धा देवतांप्रमाणे दिसत होत्या. बिभीषणाचे घर सोडून मारुतीने सर्व लंकानगर भस्मसात करून टाकले. (४३-४४)

तत उत्प्लुत्य जलधौ हनूमान्मारुतात्मज: ।
लाङ्गूलं मज्जयित्वान्त: स्वस्थचित्तो बभूव स: ॥ ४५ ॥

त्यानंतर हनुमानाने समुद्रात उडी घेतली आणि त्यात आपली शेपूट विझवून तो स्वस्थचित्त झाला. (४५)

वायो: प्रियसखित्वाच्च सीतया प्रार्थितोऽनल: ।
न ददाह हरे: पुच्छं बभूवात्यन्तशीतल: ॥ ४६ ॥

वायू हा प्रिय मित्र असल्यामुळे आणि सीतेने प्रार्थना केल्यामुळे, अग्नीने हनुमानाची शेपूट जाळली नाही. उलट तो अग्नी त्याला अत्यंत शीतल झाला. (४६)

यन्नामसंस्मरणधूतसमस्तपापा-
स्तापत्रयानलमपीह तरन्ति सद्य: ।
तस्यैव किं रघुवरस्य विशिष्टदूत:
सन्तप्यते कथमसौ प्रकृतानलेन ॥ ४७ ॥

ज्यांच्या नामस्मरणाने मनुष्यांची सर्व पापे धुऊन जातात आणि ते ताबडतोब या जगात त्रिविध तापरूपी अग्नी पार करून जातात, त्याच रघुनाथांचा विशेष दूत असणारा तो हनुमान सामान्य अग्नीकडून कसा बरे जाळला जाईल ? (४७)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुन्दरकाण्डे चतुर्थ: सर्ग: ॥ ४ ॥

# पंचम सर्ग

## हनुमान् सीतेचा निरोप घेतो व श्रीरामचंद्रांना तिचा संदेश सांगतो

*श्रीमहादेव उवाच*

तत: सीतां नमस्कृत्य हनूमानब्रवीद्वच: ।
आज्ञापयतु मां देवि भवती रामसन्निधिम् ॥ १ ॥

गच्छामि रामस्त्वां द्रष्टुमागमिष्यति सानुज: ।
इत्युक्त्वा त्रि:परिक्रम्य जानकीं मारुतात्मज: ॥ २ ॥

प्रणम्य प्रस्थितो गन्तुमिदं वचनमब्रवीत् ।
देवि गच्छामि भद्रं ते तूर्णं द्रक्ष्यसि राघवम् ॥ ३ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**— हे पार्वती, नंतर सीतेजवळ जाऊन व नमस्कार करून हनुमान तिला म्हणाला, "हे देवी, तू मला आज्ञा दे. आता मी श्रीरामांजवळ जाईन. धाकट्या भावासह श्रीराम तुला भेटण्यास लौकरच येथे येतील." असे बोलून, जानकीला तीन प्रदक्षिणा करून, पवनसुताने जानकीला पुन: प्रणाम केला आणि जाताना तो परत एकदा असे बोलला, "हे देवी, मी आता जात आहे. तुझे कल्याण होवो. दहा हजार वानरांच्या कोटी समूहांसह असणाऱ्या सुग्रीवासकट श्रीराम आणि लक्ष्मण तुला लौकरच येथे

लक्ष्मणं च ससुग्रीवं वानरायुतकोटिभिः ।
ततः प्राह हनूमन्तं जानकी दुःखकर्शिता ॥ ४ ॥

त्वां दृष्ट्वा विस्मृतं दुःखमिदानीं त्वं गमिष्यसि ।
इतः परं कथं वर्ते रामवार्ताश्रुतिं विना ॥ ५ ॥

*मारुतिरुवाच*

यद्येवं देवि मे स्कन्धमारोह क्षणमात्रतः ।
रामेण योजयिष्यामि मन्यसे यदि जानकि ॥ ६ ॥

*सीतोवाच*

रामः सागरमाशोष्य बद्ध्वा वा शरपञ्जरैः ।
आगत्य वानरैः सार्धं हत्वा रावणमाहवे ॥ ७ ॥

मां नयेद्यदि रामस्य कीर्तिर्भवति शाश्वती ।
अतो गच्छ कथं चापि प्राणान्सन्धारयाम्यहम् ॥ ८ ॥

इति प्रस्थापितो वीरः सीतया प्रणिपत्य ताम् ।
जगाम पर्वतस्याग्रे गन्तुं पारं महोदधेः ॥ ९ ॥

तत्र गत्वा महासत्त्वः पादाभ्यां पीडयन् गिरिम् ।
जगाम वायुवेगेन पर्वतश्च महीतलम् ॥ १० ॥

गतो महीसमानत्वं त्रिंशद्योजनमुच्छ्रितः ।
मारुतिर्गगनान्तःस्थो महाशब्दं चकार सः ॥ ११ ॥

तं श्रुत्वा वानराः सर्वे ज्ञात्वा मारुतिमागतम् ।
हर्षेण महताविष्टाः शब्दं चक्रुर्महास्वनम् ॥ १२ ॥

शब्देनैव विजानीमः कृतकार्यः समागतः ।
हनूमानेव पश्यध्वं वानरा वानरर्षभम् ॥ १३ ॥

एवं ब्रुवत्सु वीरेषु वानरेषु स मारुतिः ।
अवतीर्य गिरेर्मूर्ध्नि वानरानिदमब्रवीत् ॥ १४ ॥

दृष्टा सीता मया लङ्का धर्षिता च सकानना ।
सम्भाषितो दशग्रीवस्ततोऽहं पुनरागतः ॥ १५ ॥

दिसतील." तेव्हा दुःखाने कृश झालेली जानकी हनुमंताला म्हणाली. (१-४)

"तुला भेटल्यावर मी माझे दुःख विसरले होते. आता तू जात आहेस. यापुढे रामांची वार्ता ऐकल्याशिवाय मी कशी बरे राहू?" (५)

**मारुती म्हणाला–** "हे देवी, असे जर असेल, आणि तुला मान्य असेल तर तू माझ्या खांद्यावर आरूढ हो. मी एका क्षणात तुझी श्रीरामांशी भेट घडवून आणतो." (६)

**सीता म्हणाली –** "सागराला शुष्क करून किंवा त्याला बाणांच्या पिंजऱ्यात बद्ध करून, वानरांचे सह येथे येऊन आणि युद्धात रावणाचा वध करून, जर राम मला परत नेतील तर श्रीरामांची शाश्वत कीर्ती होईल. तेव्हा तू आता जा. ते येईपर्यंत मी कसे तरी प्राण धारण करीन." (७-८)

अशा प्रकारे सीतेने जाण्यास निरोप दिल्यावर तो वीर तिला प्रणाम करून, महासागर पार करून जाण्यासाठी पर्वताच्या शिखरावर गेला. (९)

तेथे गेल्यावर महासामर्थ्यसंपन्न मारुतीने आपल्या पायांनी त्या पर्वताला खाली दाबले व तो वायुवेगाने निघाला. त्या वेळी मारुतीने दाबल्यामुळे तीस योजने उंच असणारा तो पर्वत जमिनीत घुसून सपाट झाला. इकडे आकाशामधून जाणाऱ्या त्या मारुतीने प्रचंड आवाज केला. (१०-११)

तो आवाज ऐकून, 'मारुती येत आहे' हे कळल्यामुळे सर्व वानर मोठ्या आनंदाने भरून गेले आणि ते प्रचंड आवाज करू लागले. (१२)

(ते म्हणू लागले,) "या आवाजावरूनच आपणास कळत आहे की हनुमान आपली कामगिरी पूर्ण करूनच परत येत आहे. हे वानरांनो, पाहा, पाहा, हा वानरश्रेष्ठ हनुमान पाहा." (१३)

ते वानरवीर असे बोलत असतानाच, मारुती पर्वताच्या शिखरावर उतरला आणि वानरांना म्हणाला. (१४)

"मी सीतेला भेटलो, मी उपवनांसह लंकेचा विध्वंस केला. रावणाबरोबर संभाषण करून, मी परत आलो आहे. (१५)

इदानीमेव गच्छामो रामसुग्रीवसन्निधिम् ।
इत्युक्ता वानराः सर्वे हर्षेणालिङ्ग्य मारुतिम् ॥ १६ ॥

आत्ता, लगेच आपण श्रीराम व सुग्रीव यांच्याजवळ जाऊया." हनुमंताने असे म्हटल्यावर, सर्व वानरांनी आनंदाने मारुतीला आलिंगन दिले. (१६)

केचिच्चुचुम्बुर्लाङ्गूलं ननृतुः केचिदुत्सुकाः ।
हनूमता समेतास्ते जग्मुः प्रस्त्रवणं गिरिम् ॥ १७ ॥

काही वानरांनी त्याच्या शेपटीचे चुंबन घेतले. तर इतर वानर अतिशय उत्साहाने नाचू लागले. मग हनुमंताला बरोबर घेऊन ते प्रस्त्रवण पर्वताकडे गेले. (१७)

गच्छन्तो ददृशुर्वीरा वनं सुग्रीवरक्षितम् ।
मधुसंज्ञं तदा प्राहुरङ्गदं वानरर्षभाः ॥ १८ ॥

वानर जेव्हा जात होते, तेव्हा सुग्रीवाने रक्षण केलेले मधू नावाचे वन त्या वीरांनी वाटेत पाहिले; त्यानंतर ते श्रेष्ठ वानर अंगदाला म्हणाले. (१८)

क्षुधिताः स्मो वयं वीर देह्यनुज्ञां महामते ।
भक्षयामः फलान्यद्य पिबामोऽमृतवन्मधु ॥ १९ ॥

"हे वीरा, आम्ही भुकेलेले आहोत. हे महाबुद्धिमान हनुमंता, आम्हांला अनुज्ञा दे. म्हणजे आज आम्ही या मधु वनातील फळे खाऊन अमृताप्रमाणे असणारा मध आम्ही पिऊ. (१९)

सन्तुष्टा राघवं द्रष्टुं गच्छामोऽद्यैव सानुजम् ॥ २० ॥

अशा प्रकारे संतुष्ट होऊन आपण कनिष्ठ बंधूसह असणाऱ्या रामांना भेटण्यास जाऊ." (२०)

*अङ्गद उवाच*

हनूमान्कृतकार्योऽयं पिबतैतत्प्रसादतः ।
जक्षध्वं फलमूलानि त्वरितं हरिसत्तमाः ॥ २१ ॥

**अंगद म्हणाला**—"हे श्रेष्ठ वानरांनो, या हनुमानाने आपले कार्य पूर्ण केले आहे. त्याच्या कृपेमुळे तुम्ही त्वरेने फळे आणि मुळे खा आणि मधू प्या." (२१)

ततः प्रविश्य हरयः पातुमारेभिरे मधु ।
रक्षिणस्ताननादृत्य दधिवक्त्रेण नोदितान् ॥ २२ ॥

नंतर त्या वनात प्रवेश करून आणि दधिमुखाने पाठविलेल्या त्या वनरक्षकांना न जुमानता, वानरांनी मध पिण्यास प्रारंभ केला. (२२)

पिबतस्ताडयामासुर्वानरान्वानरर्षभाः ।
ततस्तान्मुष्टिभिः पादैश्चूर्णयित्वा पपुर्मधु ॥ २३ ॥

तेथील वनरक्षक वानर मध पिणाऱ्या वानरांना मारू लागले. तेव्हा त्या श्रेष्ठ वानरांनी त्या वनरक्षकांना बुक्यांनी आणि लाथांनी खूप बडविले आणि ते पुनः मध पिऊ लागले. (२३)

ततो दधिमुखः क्रुद्धः सुग्रीवस्य स मातुलः ।
जगाम रक्षिभिः सार्धं यत्र राजा कपीश्वरः ॥ २४ ॥

तेव्हा सुग्रीवाचा मामा असणारा तो दधिमुख रागावला आणि वनरक्षक वानरांसह वानरराज सुग्रीवाकडे गेला. (२४)

गत्वा तमब्रवीद्देव चिरकालाभिरक्षितम् ।
नष्टं मधुवनं तेऽद्य कुमारेण हनूमता ॥ २५ ॥

तेथे जाऊन तो त्या सुग्रीवाला म्हणाला, "हे राजन, तू चिरकाळ ज्या मधुवनाचे रक्षण केले होतेस, त्या तुझ्या मधुवनाची आज युवराज अंगद व हनुमान यांनी नासाडी केली आहे." (२५)

श्रुत्वा दधिमुखेनोक्तं सुग्रीवो हृष्टमानसः ।
दृष्ट्वागतो न सन्देहः सीतां पवननन्दनः ॥ २६ ॥

दधिमुखाने सांगितलेली वार्ता ऐकून सुग्रीवाचे मन आनंदित झाले. तो म्हणाला, "पवनसुत हनुमान सीतेला भेटून आला आहे, यात शंका नाही. (२६)

नो चेन्मधुवनं द्रष्टुं समर्थः को भवेन्मम ।
तत्रापि वायुपुत्रेण कृतं कार्यं न संशयः ॥ २७ ॥

नाहीतर माझ्या मधुवनाकडे दृष्टी पाहण्यास कोण धजावेल बरे ? तसेच ते कार्य वायुसुत हनुमानानेच केले असणार यात संशय नाही." (२७)

श्रुत्वा सुग्रीववचनं हृष्टो रामस्तमब्रवीत् ।
किमुच्यते त्वया राजन्वचः सीताकथान्वितम् ॥ २८ ॥

सुग्रीवाचे वचन ऐकल्यावर आनंदाने श्रीराम त्याला म्हणाले, "हे राजा, तू सीतेबद्दल काय बोललास बरे ?" (२८)

सुग्रीवस्त्वब्रवीद्वाक्यं देव दृष्टावनीसुता ।
हनूमत्प्रमुखाः सर्वे प्रविष्टा मधुकाननम् ॥ २९ ॥

भक्षयन्ति स्म सकलं ताडयन्ति स्म रक्षिणः ।
अकृत्वा देवकार्यं ते द्रष्टुं मधुवनं मम ॥ ३० ॥

न समर्थास्ततो देवी दृष्टा सीतेति निश्चितम् ।
रक्षिणो वो भयं मास्तु गत्वा ब्रूत ममाज्ञया ॥ ३१ ॥

वानरानङ्गदमुखानानयध्वं ममान्तिकम् ।
श्रुत्वा सुग्रीववचनं गत्वा ते वायुवेगतः ॥ ३२ ॥

हनूमत्प्रमुखानूचुर्गच्छतेश्वरशासनात् ।
द्रष्टुमिच्छति सुग्रीवः सरामो लक्ष्मणान्वितः ॥ ३३ ॥

युष्मानतीव हृष्टास्ते त्वरयन्ति महाबलाः ।
तथेत्यम्बरमासाद्य ययुस्ते वानरोत्तमाः ॥३४ ॥

तेव्हा सुग्रीव म्हणाला, "हे देवा, असे दिसते की भूमिकन्या सीतेचा शोध लागला आहे; कारण हनुमानादी सर्व वानर माझ्या मधुवनात शिरले आहेत, तेथील सर्व फळे खात आहेत आणि वनरक्षकांना बडवीत आहेत. देवा, तुमचे कार्य केल्याशिवाय माझ्या मधुवनाकडे पाहण्याससुद्धा ते धजावणार नाहीत. तेव्हा देवी सीता सापडली आहे, हे निश्चित आहे. हे वनरक्षकांनो, तुम्ही भिऊ नका. परत तेथे जाऊन तुम्ही माझी आज्ञा त्या वानरांना सांगा, आणि त्यांना माझ्याजवळ घेऊन या." सुग्रीवाचे हे वचन ऐकल्यावर, ते वनरक्षक वायुवेगाने गेले आणि हनुमान इत्यादी प्रमुख वानरांना म्हणाले, "सुग्रीव राजाच्या आज्ञेनुसार तुम्ही सत्वर निघा. श्रीराम आणि लक्ष्मण यांना व सुग्रीवाला तुम्हांला भेटण्याची इच्छा आहे. हे महाबलवान वीरांनो, त्या तिघांना अतिशय आनंद झाला आहे. तुम्हांला त्वरा करून येण्यास सांगितले आहे." "ठीक आहे" असे म्हणून त्या श्रेष्ठ वानरांनी आकाशात उड्डाण केले आणि ते जाण्यास निघाले. (२९-३४)

हनूमन्तं पुरस्कृत्य युवराजं तथाङ्गदम् ।
रामसुग्रीवयोरग्रे निपेतुर्भुवि सत्वरम् ॥ ३५ ॥

त्यानंतर हनुमंत आणि युवराज अंगद यांना पुढे करून सर्व वानरांनी पटकन श्रीराम आणि सुग्रीव यांच्यापुढे जमिनीवर लोटांगण घातले. (३५)

हनूमान् राघवं प्राह दृष्टा सीता निरामया ।
साष्टाङ्गं प्रणिपत्याग्रे रामं पश्चाद्धरीश्वरम् ॥ ३६ ॥

हनुमान राघवांना म्हणाला, "मी सीतेला भेटलो आहे. ती कुशल आहे." आणि त्याने राघवांना आणि नंतर वानरराज सुग्रीवाला साष्टांग नमस्कार केला. (३६)

कुशलं प्राह राजेन्द्र जानकी त्वां शुचान्विता ।
अशोकवनिकामध्ये शिंशपामूलमाश्रिता ॥ ३७ ॥

राक्षसीभिः परिवृता निराहारा कृशा प्रभो ।
हा राम राम रामेति शोचन्ती मलिनाम्बरा ॥ ३८ ॥

एकवेणी मया दृष्टा शनैराश्वासिता शुभा ।
वृक्षशाखान्तरे स्थित्वा सूक्ष्मरूपेण ते कथाम् ॥ ३९ ॥

जन्मारभ्य तवात्यर्थं दण्डकागमनं तथा ।
दशाननेन हरणं जानक्या रहिते त्वयि ॥ ४० ॥

"हे राजेंद्रा, शोकमग्न जानकीने तुम्हांला आपले कुशल सांगण्यास मला सांगितले आहे. ती अशोकवाटिकेमध्ये एका अशोक वृक्षाखाली बसलेली आहे. हे प्रभो, ती राक्षसींनी वेढलेली असून निराहार असल्याने कृश झाली आहे. 'हा राम, राम, राम' असा ती सारखा शोक करीत आहे. तिची वस्त्रे मलिन आहेत. तिने एकच वेणी घातली होती. ती मला दिसली. तिचे मी हळूहळू सांत्वन केले. सूक्ष्म रूपाने वृक्षाच्या फांदीवरील पानांमध्ये दडून मी तुमची कथा तिला सांगितली. तुमच्या जन्मापासून प्रारंभ करून मी म्हटले, तुम्ही दंडकारण्यात आलात, तुम्ही आश्रमात नसताना रावणाने जानकीचे

सुग्रीवेण यथा मैत्री कृत्वा वालिनिबर्हणम् ।
मार्गणार्थं च वैदेह्याः सुग्रीवेण विसर्जिताः ॥ ४१ ॥

महाबला महासत्त्वा हरयो जितकाशिनः ।
गताः सर्वत्र सर्वे वै तत्रैकोऽहमिहागतः ॥ ४२ ॥

अहं सुग्रीवसचिवो दासोऽहं राघवस्य हि ।
दृष्टा यज्जानकी भाग्यात्प्रयासः फलितोऽद्य मे ॥ ४३ ॥

हरण केले; तुम्ही सुग्रीवाशी मैत्री केली, वालीचा वध केला. नंतर वैदेहीचा शोध करण्यास सुग्रीवाने वानरांना पाठविले. महाबली, महापराक्रमी, विजयशाली वानर सर्वत्र गेले; त्यांपैकी एकटा मी येथे आलो आहे. मी सुग्रीवाचा सचिव असून श्रीराघवांचा दास आहे, भाग्यामुळे मला जानकी दिसली; त्यामुळे माझा प्रयास आज सफल झाला आहे. (३७-४३)

इत्युदीरितमाकर्ण्य सीता विस्फारितेक्षणा ।
केन वा कर्णपीयूषं श्रावितं मे शुभाक्षरम् ॥ ४४ ॥

यदि सत्यं तदायातु मद्दर्शनपथं तु सः ।
ततोऽहं वानराकारः सूक्ष्मरूपेण जानकीम् ॥ ४५ ॥

प्रणम्य प्राञ्जलिर्भूत्वा दूरादेव स्थितः प्रभो ।
पृष्टोऽहं सीतया कस्त्वमित्यादि बहुविस्तरम् ॥ ४६ ॥

मया सर्वं क्रमेणैव विज्ञापितमरिन्दम ।
पश्चान्मयार्पितं देव्यै भवद्दत्ताङ्गुलीयकम् ॥ ४७ ॥

माझे असे वचन ऐकल्यावर सीतेने आपले डोळे उघडले आणि ती म्हणाली, 'माझ्या कानांना अमृताप्रमाणे असणारे हे शुभ वचन मला कुणी ऐकवले बरे ? (४४)

हे जर सर्व सत्य असेल तर असे बोलणाऱ्याला मला पाहू दे.' हे प्रभो, तेव्हा सूक्ष्मरूपाने वानराच्या रूपात मी तिला प्रणाम केला आणि हात जोडून मी तिच्यापुढे दूरच उभा राहिलो. तेव्हा 'तू कोण ?' इत्यादी पुष्कळ गोष्टी तिने मला विचारल्या. (४५-४६)

हे अरिदमना, मी सर्व गोष्टी तिला क्रमाने सांगितल्या. त्यानंतर तुम्ही दिलेली अंगठी मी देवी सीतेला अर्पण केली. (४७)

तेन मामतिविश्वस्ता वचनं चेदमब्रवीत् ।
यथा दृष्टास्मि हनुमन्पीड्यमाना दिवानिशम् ॥ ४८ ॥

राक्षसीनां तर्जनैस्तत्सर्वं कथय राघवे ।
मयोक्तं देवि रामोऽपि त्वच्चिन्तापरिनिष्ठितः ॥ ४९ ॥

परिशोचत्यहोरात्रं त्वद्वार्तां नाधिगम्य सः ।
इदानीमेव गत्वाहं स्थितिं रामाय ते ब्रुवे ॥ ५० ॥

त्यामुळे तिचा माझ्यावर अतिशय विश्वास बसला. मग ती मला असे म्हणाली "हे हनुमंता, राक्षसींकडून होणाऱ्या रात्रंदिवसाच्या छळाने मी पीडित झाले आहे, हे तू पाहिले आहेस; ते सर्व तू राघवांना सांग.' तेव्हा मी म्हटले, 'हे देवी, श्रीरामसुद्धा तुझी कोणतीच वार्ता न कळल्यामुळे चिंताग्रस्त होऊन रात्रंदिवस शोक करीत आहेत. तेव्हा मी आत्ताच जाऊन, त्यांना तुझी अवस्था सांगतो. (४८-५०)

रामः श्रवणमात्रेण सुग्रीवेण सलक्ष्मणः ।
वानरानीकपैः सार्धमागमिष्यति तेऽन्तिकम् ॥ ५१ ॥

ती वार्ता ऐकताच श्रीराम हे सुग्रीव, लक्ष्मण आणि वानर- सेनापती यांच्यासह तुझ्याकडे येतील. (५१)

रावणं सकुलं हत्वा नेष्यति त्वां स्वकं पुरम् ।
अभिज्ञां देहि मे देवि यथा मां विश्वसेद्विभुः ॥ ५२ ॥

आणि कुळासकट रावणाचा वध करून ते तुला स्वतःच्या नगरीला नेतील. तेव्हा हे देवी, मला अशी एकादी खूण दे की जिच्यामुळे प्रभू श्रीरामांचा माझ्यावर विश्वास बसेल.' (५२)

इत्युक्त्वा सा शिरोरत्नं चूडापाशे स्थितं प्रियम् ।
दत्त्वा काकेन यद्वृत्तं चित्रकूटगिरौ पुरा ॥ ५३ ॥

मी तिला असे म्हटल्यावर, आपल्या केशपाशातील आवडता चूडामणी तिने मला दिला. तसेच पूर्वी चित्रकूट पर्वतावर जी कावळ्याची कथा घडली होती, तीसुद्धा तिने मला सांगितली. नंतर अश्रुपूर्ण नेत्रांनी ती मला म्हणाली, 'राघवांना माझे कुशल सांग आणि

तदप्याहाश्रुपूर्णाक्षी कुशलं ब्रूहि राघवम् ।
लक्ष्मणं ब्रूहि मे किञ्चिद्दुरुक्तं भाषितं पुरा ॥ ५४ ॥

तत्क्षमस्वाज्ञभावेन भाषितं कुलनन्दन ।
तारयेन्मां यथा रामस्तथा कुरु कृपान्वितः ॥ ५५ ॥

लक्ष्मणाला सांग की हे कुलनंदना, मी तुला जे काही वाईट बोलले ते गैरसमजाने बोलले होते, त्याबद्दल तू मला क्षमा कर. माझ्यावर दयाळू होऊन राम मला नेतील, असे तू कर.' (५३-५५)

इत्युक्त्वा रुदती सीता दुःखेन महतावृता ।
मयाप्याश्वासिता राम वदता सर्वमेव ते ॥ ५६ ॥

असे बोलून अतिशय दुःखाने व्याकूळ झालेली सीता रडू लागली. तेव्हा तुमचा सर्व वृत्तांत तिला सांगून मीसुद्धा तिचे सांत्वन केले . (५६)

ततः प्रस्थापितो राम त्वत्समीपमिहागतः ।
तदागमनवेलायामशोकवनिकां प्रियाम् ॥ ५७ ॥

उत्पाट्य राक्षसांस्तत्र बहून्हत्वा क्षणादहम् ।
रावणस्य सुतं हत्वा रावणेनाभिभाष्य च ॥ ५८ ॥

लङ्कामशेषतो दग्ध्वा पुनरप्यागमं क्षणात् ।
श्रुत्वा हनूमतो वाक्यं रामोऽत्यन्तप्रहृष्टधीः ॥ ५९ ॥

नंतर तिचा निरोप घेऊन मी हे श्रीरामा, तुमच्या जवळ येथे येण्यास निघालो, त्या वेळी रावणाला प्रिय असणाऱ्या अशोक वाटिकेचा विध्वंस करून टाकला आणि एका क्षणात तेथील पुष्कळ राक्षसांना ठार केले. रावणाच्या एका पुत्राला मी मारले. रावणाशी संभाषण केले आणि लंकेचे संपूर्ण दहन करून मी क्षणात पुनः इकडे आलो आहे.'' हनुमंताचे हे वचन ऐकून रामांचे मन अतिशय आनंदित झाले. (५७-५९)

हनूमंस्ते कृतं कार्यं देवैरपि सुदुष्करम् ।
उपकारं न पश्यामि तव प्रत्युपकारिणः ॥ ६० ॥

श्रीराम हनुमंताला म्हणाले, ''हे हनुमाना, देवांनासुद्धा अतिशय दुष्कर असणारे कार्य तू केले आहेस. तुझे उपकार कसे फेडू, हे मला कळत नाही. (६०)

इदानीं ते प्रयच्छामि सर्वस्वं मम मारुते ।
इत्यालिङ्ग्य समाकृष्य गाढं वानरपुङ्गवम् ॥ ६१ ॥

हे मारुती, आता मी तुला माझे सर्वस्व देत आहे.'' असे बोलून त्याला जवळ घेऊन श्रीरामांनी त्या वानरश्रेष्ठाला गाढ आलिंगन दिले. (६१)

सार्द्रनेत्रो रघुश्रेष्ठः परां प्रीतिमवाप सः ।
हनूमन्तमुवाचेदं राघवो भक्तवत्सलः ॥ ६२ ॥

रघुश्रेष्ठ श्रीरामांच्या डोळ्यांत पाणी आले. त्यांना हनुमानाविषयी फार प्रेम वाटले. मग भक्तवत्सल राघव हनुमानाला म्हणाले. (६२)

परिरम्भो हि मे लोके दुर्लभः परमात्मनः ।
अतस्त्वं मम भक्तोऽसि प्रियोऽसि हरिपुङ्गव ॥ ६३ ॥

'हे वानरश्रेष्ठा, परमात्मा असणाऱ्या माझे आलिंगन मिळणे हे या जगात फार दुर्लभ आहे. तुला ते मिळाले म्हणून तू माझा भक्त आहेस आणि मला प्रिय आहेस. '' (६३)

यत्पादपद्मयुगलं तुलसीदलाद्यैः
सम्पूज्य विष्णुपदवीमतुलां प्रयान्ति ।
तेनैव किं पुनरसौ परिरब्धमूर्ती
रामेण वायुतनयः कृतपुण्यपुञ्जः ॥ ६४ ॥

हे पार्वती, ज्यांच्या चरणकमल युगलांची तुलसीदल इत्यादींनी पूजा करून, भक्त लोक अनुपम अशा विष्णुपदाची प्राप्ती करून घेतात, त्याच श्रीरामांनी ज्याला दृढ आलिंगन दिले, अशा त्या अनेक पुण्य कर्मांची राशी असणाऱ्या पवनतनयाबद्दल जास्त काय सांगावे ? (६४)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुन्दरकाण्डे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

## सुन्दरकाण्ड समाप्त

ॐ

# अध्यात्मरामायण

## युद्धकाण्ड

## प्रथम सर्ग

### वानरसेनेचे प्रस्थान

*श्रीमहादेव उवाच*

यथावद्भाषितं वाक्यं श्रुत्वा रामो हनूमतः ।
उवाचानन्तरं वाक्यं हर्षेण महतावृतः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, हनुमंताने सीतेविषयी जे पाहिले होते ते जसेच्या तसे सांगितले. ते ऐकल्यावर, अतिशय आनंदाने श्रीराम बोलले. (१)

कार्यं कृतं हनुमता देवैरपि सुदुष्करम् ।
मनसापि यदन्येन स्मर्तुं शक्यं न भूतले ॥ २ ॥

"हनुमंताने जे कार्य केलेले आहे ते करणे हे देवांनाही दुष्कर आहे आणि त्याचे मनानेसुद्धा स्मरण करणे हे या भूतलावरील अन्य कुणालाही शक्य नाही. (२)

शतयोजनविस्तीर्णं लङ्घयेत्कः पयोनिधिम् ।
लङ्कां च राक्षसैर्गुप्तां को वा धर्षयितुं क्षमः ॥ ३ ॥

शंभर योजने विस्तृत असणारा समुद्र उल्लंघून जाईल असा दुसरा कोण आहे बरे ? तसेच राक्षसांकडून रक्षिली गेलेली लंका उध्वस्त करण्यास दुसरा कोण बरे समर्थ आहे ? (३)

भृत्यकार्यं हनुमता कृतं सर्वमशेषतः ।
सुग्रीवस्येदृशो लोके न भूतो न भविष्यति ॥ ४ ॥

सेवक म्हणून हनुमंताने सुग्रीवाचे सर्व कार्य पूर्णपणे केले आहे. हनुमानासमान असा कोणी या जगात नाही आणि पुढे होणारही नाही. (४)

अहं च रघुवंशश्च लक्ष्मणश्च कपीश्वरः ।
जानक्या दर्शनेनाद्य रक्षिताः स्मो हनूमता ॥ ५ ॥

जानकीची भेट घेऊन या हनुमंताने आज नक्कीच मी, माझा रघुवंश, लक्ष्मण आणि वानरराज सुग्रीव यांचे रक्षण केले आहे. (५)

सर्वथा सुकृतं कार्यं जानक्याः परिमार्गणम् ।
समुद्रं मनसा स्मृत्वा सीदतीव मनो मम ॥ ६ ॥

जानकीचा शोध करण्याचे कार्य आता चांगल्याप्रकारे पार पडले आहे. तथापि समुद्राची आठवण मनात आल्यावर, माझे मन जणू खचून जात आहे. (६)

कथं नक्रझषाकीर्णं समुद्रं शतयोजनम् ।
लङ्घयित्वा रिपुं हन्यां कथं द्रक्ष्यामि जानकीम् ॥ ७ ॥

मगर आणि सुसरी यांनी भरलेला आणि शंभर योजने विस्तीर्ण असलेला समुद्र उल्लंघून जाऊन मी शत्रूला कसा मारू ? आणि जानकीला कसा भेटू ?" (७)

श्रुत्वा तु रामवचनं सुग्रीवः प्राह राघवम् ।
समुद्रं लङ्घयिष्यामो महानक्रझषाकुलम् ॥ ८ ॥

श्रीरामांचे वचन ऐकल्यावर सुग्रीव राघवांना म्हणाला, "प्रचंड नक्र आणि मगरी यांनी भरलेला समुद्र आपण नक्कीच उल्लंघन करून जाऊ . (८)

लङ्कां च विधमिष्यामो हनिष्यामोऽद्य रावणम् ।
चिन्तां त्यज रघुश्रेष्ठ चिन्ता कार्यविनाशिनी ॥ ९ ॥

तसेच आपण लंकेचा विध्वंस करू आणि लगेच रावणाचाही वध करू. हे रघुश्रेष्ठा, चिंता सोडा. कारण चिंता ही कार्याचा नाश करणारी असते. (९)

एतान्पश्य महासत्त्वान् शूरान्वानरपुङ्गवान् ।
त्वत्प्रियार्थं समुद्युक्तान्प्रवेष्टुमपि पावकम् ॥ १० ॥

हे श्रीरामा, हे महापराक्रमी, शूर, वानरश्रेष्ठ पाहा. तुमचे प्रिय करण्यासाठी ते अग्नीतसुद्धा प्रवेश करण्यास तयार आहेत. (१०)

समुद्रतरणे बुद्धिं कुरुष्व प्रथमं ततः ।
दृष्ट्वा लङ्कां दशग्रीवो हत इत्येव मन्महे ॥ ११ ॥

म्हणून प्रथम समुद्र कसा पार करावयाचा याचा विचार करा. मग लंका पाहिल्यावर दशानन रावण मेलाच असे आम्ही समजतो. (११)

नहि पश्याम्यहं कश्चित्त्रिषु लोकेषु राघव ।
गृहीतधनुषो यस्ते तिष्ठेदभिमुखो रणे ॥ १२ ॥

हे राघवा, धनुष्य घेऊन युद्धास सज्ज झाल्यावर तुमच्यापुढे रणांगणात उभा ठाकेल असा कोणीही त्रैलोक्यातसुद्धा मला दिसत नाही. (१२)

सर्वथा नो जयो राम भविष्यति न संशयः ।
निमित्तानि च पश्यामि तथाभूतानि सर्वशः ॥ १३ ॥

हे रामा, आपला संपूर्ण जय होणार यात काहीही संशय नाही. आपला विजय सुचविणारी तशा प्रकारची शुभ चिन्हे मला सगळीकडे दिसत आहेत." (१३)

सुग्रीववचनं श्रुत्वा भक्तिवीर्यसमन्वितम् ।
अङ्गीकृत्याब्रवीद्रामो हनूमन्तं पुरःस्थितम् ॥ १४ ॥

भक्ती आणि सामर्थ्य यांनी भरलेले ते सुग्रीवाचे वचन ऐकल्यावर, त्याचा स्वीकार करून, पुढे उभ्या असलेल्या हनुमंताला श्रीराम म्हणाले. (१४)

येन केन प्रकारेण लङ्घयामो महार्णवम् ।
लङ्कास्वरूपं मे ब्रूहि दुःसाध्यं देवदानवैः ॥ १५ ॥

"अरे मारुती, आपण कोणत्याही प्रकाराने हा महासागर उल्लंघून जाऊच. पण तत्पूर्वी देव आणि दानव यांनाही प्रवेश करण्यास कठीण असणाऱ्या लंकेचे स्वरूप तू मला सांग. (१५)

ज्ञात्वा तस्य प्रतीकारं करिष्यामि कपीश्वर ।
श्रुत्वा रामस्य वचनं हनूमान्विनयान्वितः ॥ १६ ॥

उवाच प्राञ्जलिर्देव यथा दृष्टं ब्रवीमि ते ।
लङ्का दिव्या पुरी देव त्रिकूटशिखरे स्थिता ॥ १७ ॥

ते कळल्यावर, हे कपिश्रेष्ठा, त्याचा उपाय मी शोधीन." रामांचे वचन ऐकल्यावर, हनुमान विनयपूर्वक आणि हात जोडून रामांना म्हणाला, "हे देवा, जसे मी पाहिले आहे तसे तुम्हांला सांगतो. हे देवा, ती दिव्य लंकापुरी त्रिकूट पर्वताच्या शिखरावर वसलेली आहे. (१६-१७)

स्वर्णप्राकारसहिता स्वर्णाट्टालकसंयुता ।
परिखाभिः परिवृता पूर्णाभिर्निर्मलोदकैः ॥ १८ ॥

तिला सोन्याचे तट आहेत. सोन्याचे बुरुज आहेत. स्वच्छ पाण्याने भरलेल्या खंदकांनी ती सर्व बाजूंनी वेढलेली आहे. (१८)

नानोपवनशोभाढ्या दिव्यवापीभिरावृता ।
गृहैर्विचित्रशोभाढ्यैर्मणिस्तम्भमयैः शुभैः ॥ १९ ॥

नाना उपवनांनी ती शोभासंपन्न आहे. तिच्यामध्ये अनेक दिव्य वापी आहेत. चित्रविचित्र शोभेने समृद्ध, मणिस्तंभयुक्त आणि सुंदर घरे त्या लंकेत आहेत. (१९)

पश्चिमद्वारमासाद्य गजवाहाः सहस्रशः ।
उत्तरे द्वारि तिष्ठन्ति साश्ववाहाः सपत्तयः ॥ २० ॥

तिष्ठन्त्यर्बुदसङ्ख्याकाः प्राच्यामपि तथैव च ।
रक्षिणो राक्षसा वीरा द्वारं दक्षिणमाश्रिताः ॥ २१ ॥

तिच्या पश्चिम द्वाराला लागून हजारो गजवाहक, उत्तरद्वाराजवळ पायदळ सेनेसह घोडेस्वार, तसेच पूर्वेकडील दाराशी दहा कोटी रक्षक वीर आणि दक्षिणेकडील दारातही तितकेच रक्षकवीर आहेत. (२०-२१)

मध्यकक्षेऽप्यसङ्ख्याता गजाश्वरथपत्तयः ।
रक्षयन्ति सदा लङ्कां नानास्त्रकुशलाः प्रभो ॥ २२ ॥

हे प्रभो, (लंकेच्या) मध्यभागी, असंख्य गज, अश्व, रथ आणि पायदळ असून अनेक शस्त्रास्त्रांत कुशल असलेले सैनिक लंकेचे सदा रक्षण करतात. (२२)

सङ्क्रमैर्विविधैर्लङ्का शतघ्नीभिश्च संयुता ।
एवं स्थितेऽपि देवेश शृणु मे तत्र चेष्टितम् ॥ २३ ॥

लंकेमध्ये जाण्याचे मार्ग नाना प्रकारच्या पुलांनी तसेच तोफांनी युक्त आहेत. परंतु हे देवेश्वरा, असे सर्व असतानासुद्धा मी तेथे काय केले, ते तुम्ही ऐका. (२३)

दशाननबलौघस्य चतुर्थांशो मया हतः ।
दग्ध्वा लङ्कां पुरीं स्वर्णप्रासादो धर्षितो मया ॥ २४ ॥

रावणाच्या सैन्याचा एक चतुर्थांश भाग मी ठार केला आहे. लंका नगरी जाळून, मी रावणाचा सोन्याचा प्रासाद उध्वस्त केला आहे. (२४)

शतघ्न्यः सङ्क्रमाश्चैव नाशिता मे रघूत्तम ।
देव त्वद्दर्शनादेव लङ्का भस्मीकृता भवेत् ॥ २५ ॥

हे रघूत्तमा, तोफा आणि पूल मी नष्ट केले आहेत. हे देवा, मला वाटते तुमची दृष्टी पडताच उरलेली लंका जळून जाईल. (२५)

प्रस्थानं कुरु देवेश गच्छामो लवणाम्बुधेः ।
तीरं सह महावीरैर्वानरौघैः समन्ततः ॥ २६ ॥

हे देवेश्वरा, जाण्यासाठी प्रस्थान ठेवा. थोर वीर असणाऱ्या वानरांच्या समूहासह आपण सर्व बाजूंनी समुद्राच्या तीरावर जाऊ या." (२६)

श्रुत्वा हनूमतो वाक्यमुवाच रघुनन्दनः ।
सुग्रीव सैनिकान्सर्वान्प्रस्थानायाभिनोदय ॥ २७ ॥

इदानीमेव विजयो मुहूर्तः परिवर्तते ।
अस्मिन्मुहूर्ते गत्वाहं लङ्कां राक्षससङ्कुलाम् ॥ २८ ॥

सप्राकारां सुदुर्धर्षां नाशयामि सरावणाम् ।
आनेष्यामि च सीतां मे दक्षिणाक्षि स्फुरत्यधः ॥ २९ ॥

हनुमानाचे वचन ऐकल्यावर रघुनंदन म्हणाले, "अरे सुग्रीवा, सर्व सैनिकांना कूच करण्याची आज्ञा दे. कारण आत्ताच विजय (नावाचा) मुहूर्त आहे. याच मुहूर्तावर, राक्षसांनी भरलेल्या, तटबंदी असणाऱ्या, अतिशय दुर्गम अशा लंकेत जाऊन, रावणासकट तिचा मी नाश करीन आणि सीतेला परत आणीन. या वेळी माझा उजवा डोळा खालच्या बाजूने लवत आहे. (२७-२९)

प्रयातु वाहिनी सर्वा वानराणां तरस्विनाम् ।
रक्षन्तु यूथपाः सेनामग्रे पृष्ठे च पार्श्वयोः ॥ ३० ॥

वेगवान आणि बलिष्ठ वानरांची संपूर्ण सेना कूच करू दे. जे गटाधिकारी असतील त्यांनी आपल्या आपल्या गटाचे मागे, पुढे व दोन्ही बाजूंनी रक्षण करावे. (३०)

हनूमन्तमथारुह्य गच्छाम्यग्रेऽङ्गदं ततः ।
आरुह्य लक्ष्मणो यातु सुग्रीव त्वं मया सह ॥ ३१ ॥

हनुमंताच्या खांद्यावर आरोहण करून मी सर्वात पुढे जाईन, नंतर माझ्यामागे अंगदाच्या खांद्यावर चढून लक्ष्मण येऊ दे. हे सुग्रीवा, तू मात्र माझ्याबरोबर चल. (३१)

गजो गवाक्षो गवयो मैन्दो द्विविद एव च ।
नलो नीलः सुषेणश्च जाम्बवांश्च तथापरे ॥ ३२ ॥

सर्वे गच्छन्तु सर्वत्र सेनायाः शत्रुघातिनः ।
इत्याज्ञाप्य हरीन् रामः प्रतस्थे सहलक्ष्मणः ॥ ३३ ॥

गज, गवाक्ष, गवय, मैंद तसेच द्विविद, नल, नील, सुषेण, जांबवान् तसेच शत्रूचा वध करणारे इतर सर्व वानर आणि सेनेचे अधिपती हे सैन्याच्या सर्व बाजूंनी जाऊ देत." वानरांना अशी आज्ञा करून श्रीराम लक्ष्मणासह निघाले. (३२-३३)

सुग्रीवसहितो हर्षात्सेनामध्यगतो विभुः ।
वारणेन्द्रनिभाः सर्वे वानराः कामरूपिणः ॥ ३४ ॥

क्ष्वेलन्तः परिगर्जन्तो जग्मुस्ते दक्षिणां दिशम् ।
भक्षयन्तो ययुः सर्वे फलानि च मधूनि च ॥ ३५ ॥

सुग्रीवासह प्रभू राम हे आनंदाने सेनेच्या मध्यभागी चालत होते. गजराजाप्रमाणे असणारे आणि इच्छेप्रमाणे रूप धारण करणारे, आणि उड्या मारीत गर्जना करीत असणारे ते सर्व वानर दक्षिण दिशेने निघाले. वाटेत फळे खात आणि मध पीत ते सर्व जात होते. (३४-३५)

ब्रुवन्तो राघवस्याग्रे हनिष्यामोऽद्य रावणम् ।
एवं ते वानरश्रेष्ठा गच्छन्त्यतुलविक्रमाः ॥ ३६ ॥

"श्रीरामांच्या देखतच आज आम्ही रावणाला मारतो." असे बोलत ते अतुल पराक्रमी वानरश्रेष्ठ जात होते. (३६)

हरिभ्यामुह्यमानौ तौ शुशुभाते रघूत्तमौ ।
नक्षत्रैः सेवितौ यद्वच्चन्द्रसूर्याविवाम्बरे ॥ ३७ ॥

हनुमान आणि अंगद यांच्या खांद्यावरून जाणारे ते दोन रघूत्तम श्रीराम आणि लक्ष्मण हे आकाशात नक्षत्रांकडून सेवा केल्या जाणाऱ्या चंद्रसूर्याप्रमाणे शोभत होते. (३७)

आवृत्य पृथिवीं कृत्स्नां जगाम महती चमूः ।
प्रस्फोटयन्तः पुच्छाग्रानुद्वहन्तश्च पादपान् ॥ ३८ ॥

शैलानारोहयन्तश्च जग्मुर्मारुतवेगतः ।
असङ्ख्याताश्च सर्वत्र वानराः परिपूरिताः ॥ ३९ ॥

संपूर्ण पृथ्वीला झाकून टाकून ती प्रचंड सेना चालली होती. काही वानर आपल्या शेपटीची टोके आपटीत होते. काही वृक्ष उपटून हातात घेऊन जात होते. काही पर्वतावर चढले होते. अशा प्रकारे ते वानर वायुवेगाने जात होते. पृथ्वीवर सर्वत्र असंख्य वानर भरून गेले होते. (३८-३९)

हृष्टास्ते जग्मुरत्यर्थं रामेण परिपालिताः ।
गता चमूर्दिवारात्रं क्वचिन्नासज्जत क्षणम् ॥ ४० ॥

श्रीरामांनी रक्षिलेले ते वानर अतिशय आनंदाने जात होते. ती सर्व वानर सेना रात्रंदिवस चालत होती. एक क्षणभरही ती कुठे थांबली नाही. (४०)

काननानि विचित्राणि पश्यन्मलयसह्ययोः ।
ते सह्यं समतिक्रम्य मलयं च तथा गिरिम् ॥ ४१ ॥

आययुश्चानुपूर्व्येण समुद्रं भीमनिःस्वनम् ।
अवतीर्य हनूमन्तं रामः सुग्रीवसंयुतः ॥ ४२ ॥

सलिलाभ्याशमासाद्य रामो वचनमब्रवीत् ।
आगताः स्मो वयं सर्वे समुद्रं मकरालयम् ॥ ४३ ॥

मलय आणि सह्य या पर्वतावरील विचित्र अरण्ये पाहात श्रीराम सेनेसह चालत होते. नंतर सह्य आणि मलय पर्वतांना ओलांडून, ते सर्व जण भयंकर गर्जना करणाऱ्या समुद्राजवळ येऊन पोचले. त्यानंतर हनुमंताच्या खांद्यावरून उतरून श्रीराम सुग्रीवासह सागराच्या पाण्याजवळ गेले आणि म्हणाले, "मगरींचे वसतिस्थान असणाऱ्या या समुद्राजवळ आपण सर्वजण येऊन पोचलेलो आहोत. (४१-४३)

इतो गन्तुमशक्यं नो निरुपायेन वानराः ।
अत्र सेनानिवेशोऽस्तु मन्त्रयामोऽस्य तारणे ॥ ४४ ॥

हे वानरांनो, आता काही तरी उपाय शोधल्याशिवाय यापुढे जाणे आपणांस अशक्य आहे. तेव्हा येथेच सैन्याची छावणी करूया. आणि समुद्र कसा तरून जावयाचा याचा विचार करूया." (४४)

श्रुत्वा रामस्य वचनं सुग्रीवः सागरान्तिके ।
सेनां न्यवेशयत्क्षिप्रं रक्षितां कपिकुञ्जरैः ॥ ४५ ॥

रामांचे वचन ऐकल्यावर सुग्रीवाने सागराजवळच त्वरित सैन्याची छावणी ठोकली. मोठमोठे वानर तिचे रक्षण करू लागले. (४५)

ते पश्यन्तो विषेदुस्तं सागरं भीमदर्शनम् ।
महोन्नततरङ्गाढ्यं भीमनक्रभयङ्करम् ॥ ४६ ॥

भयंकर दिसणारा, अतिशय उंच अशा लाटा येत असलेला आणि भयानक सुसरी इत्यादींनी भयंकर वाटणारा तो सागर पाहून सर्व जण विषण्ण झाले. (४६)

अगाधं गगनाकारं सागरं वीक्ष्य दुःखिताः ।
तरिष्यामः कथं घोरं सागरं वरुणालयम् ॥ ४७ ॥

आकाशाप्रमाणे अनंत व अगाध असा सागर पाहून ते दुःखी कष्टी झाले, ते विचार करू लागले की 'वरुणाचे निवासस्थान असणारा हा भयानक समुद्र आपण कसा बरे तरून जाणार ? (४७)

हन्तव्योऽस्माभिरद्यैव रावणो राक्षसाधमः ।
इति चिन्ताकुलाः सर्वे रामपार्श्वे व्यवस्थिताः ॥४८॥

आणि त्या राक्षसाधम रावणाला तर आजच ठार करावयाचे आहे.' अशा चिंतेने व्याकूळ झालेले सर्वजण श्रीरामांच्या बाजूला बसले होते. (४८)

रामः सीतामनुस्मृत्य दुःखेन महतावृतः ।
विलप्य जानकीं सीतां बहुधा कार्यमानुषः ॥ ४९ ॥

सीतेची आठवण काढून श्रीराम अतिशय दुःखी झाले होते. तसेच विशिष्ट कार्य करण्यासाठी त्यांनी मनुष्याचे रूप धारण केले असल्यामुळे, ते जनककन्या सीतेसाठी नाना प्रकारे शोक करू लागले. (४९)

अद्वितीयश्चिदात्मैकः परमात्मा सनातनः ।
यस्तु जानाति रामस्य स्वरूपं तत्त्वतो जनः ॥५०॥

तं न स्पृशति दुःखादि किमुतानन्दमव्ययम् ।
दुःखहर्षभयक्रोधलोभमोहमदादयः ॥५१॥

अज्ञानलिङ्गान्येतानि कुतः सन्ति चिदात्मनि ।
देहाभिमानिनो दुःखं न देहस्य चिदात्मनः ॥५२॥

खरे म्हणजे श्रीराम हे अद्वितीय, चैतन्य-स्वरूप, एकमेव, सनातन, परमात्मा आहेत. जो माणूस रामांचे हे स्वरूप तत्त्वतः खरेखुरे जाणतो, त्याला दुःख इत्यादींचा स्पर्श होतच नाही. मग आनंदस्वरूप, अविनाशी रामांना दुःख इत्यादींचा स्पर्श कसा होईल बरे? (कारण) दुःख,हर्ष, भय, क्रोध, लोभ, मोह, मद इत्यादी सर्व अज्ञानाची चिन्हे आहेत; ती ज्ञानस्वरूप रामांच्या ठिकाणी कशी बरे असतील? देहाचा अभिमान बाळगणाऱ्यालाच देहाचे दुःख होते; ते दुःख चिदात्म्याला मुळीच होत नाही. (५०-५२)

सम्प्रसादे द्वयाभावात्सुखमात्रं हि दृश्यते ।
बुद्ध्याद्यभावात्संशुद्धे दुःखं तत्र न दृश्यते ।
अतो दुःखादिकं सर्वं बुद्धेरेव न संशयः ॥५३॥

समाधीच्या स्थितीत (आत्मसाक्षात्कार झाला असताना,) द्वैताचा अभाव होत असल्याने, तेथे केवळ सुखच दिसून येते. त्या आत्मसाक्षात्काराच्या स्थितीत बुद्धी इत्यादींचा अभाव असल्यामुळे, दुःख कधीही दिसून येत नाही, म्हणून दुःख इत्यादी सर्व काही बुद्धीचेच गुणधर्म आहेत, यात संशय राहात नाही. (५३)

रामः परात्मा पुरुषः पुराणो
नित्योदितो नित्यसुखो निरीहः ।
तथापि मायागुणसङ्गतोऽसौ
सुखीव दुःखीव विभाव्यतेऽबुधैः ॥ ५४ ॥

श्रीराम हे पुराणपुरुष, परमात्मा, नित्य प्रकाशमान, नित्य सुखस्वरूपी आणि कामनारहित आहेत. तथापि मायेच्या गुणांशी संग झाल्यामुळे ते सुखी अगर दुःखी आहेत, असे अज्ञानी माणसांना वाटत असते. (५४)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

# द्वितीय सर्ग

## रावणाकडून बिभीषणाचा धिक्कार

*श्रीमहादेव उवाच*

लङ्कायां रावणो दृष्ट्वा कृतं कर्म हनूमता ।
दुष्करं दैवतैर्वापि ह्रिया किञ्चिदवाङ्मुखः ॥ १ ॥

आहूय मन्त्रिणः सर्वानिदं वचनमब्रवीत् ।
हनूमता कृतं कर्म भवद्भिर्दृष्टमेव तत् ॥ २ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, तिकडे लंकेमध्ये हनुमानाने देवतांनासुद्धा दुष्कर असणारे कर्म केले आहे हे पाहून, रावणाने आपल्या सर्व मंत्र्यांना बोलावले आणि लज्जेने आपले मस्तक किंचित खाली वाकवून तो त्यांना म्हणाला, "हनुमानाने केलेले सर्व कर्म तुम्ही पाहिलेले आहेच. (१-२)

प्रविश्य लङ्कां दुर्धर्षां दृष्ट्वा सीतां दुरासदाम् ।
हत्वा च राक्षसान्वीरानक्षं मन्दोदरीसुतम् ॥ ३ ॥

दग्ध्वा लङ्कामशेषेण लङ्घयित्वा च सागरम् ।
युष्मान्सर्वानतिक्रम्य स्वस्थोऽगात्पुनरेव सः ॥ ४ ॥

किं कर्तव्यमितोऽस्माभिर्यूयं मन्त्रविशारदाः ।
मन्त्रयध्वं प्रयत्नेन यत्कृतं मे हितं भवेत् ॥ ५ ॥

रावणस्य वचः श्रुत्वा राक्षसास्तमथाब्रुवन् ।
देव शङ्का कुतो रामात्तव लोकजितो रणे ॥ ६ ॥

इन्द्रस्तु बद्ध्वा निक्षिप्तः पुत्रेण तव पत्तने ।
जित्वा कुबेरमानीय पुष्पकं भुज्यते त्वया ॥ ७ ॥

यमो जितः कालदण्डाद्भयं नाभूत्तव प्रभो ।
वरुणो हुङ्कृतेनैव जितः सर्वेऽपि राक्षसाः ॥ ८ ॥

मयो महासुरो भीत्या कन्यां दत्त्वा स्वयं तव ।
त्वद्वशे वर्ततेऽद्यापि किमुतान्ये महासुराः ॥ ९ ॥

हनूमद्धर्षणं यत्तु तदवज्ञाकृतं च नः ।
वानरोऽयं किमस्माकमस्मिन्पौरुषदर्शने ॥ १० ॥

इत्युपेक्षितमस्माभिर्धर्षणं तेन किं भवेत् ।
वयं प्रमत्ताः किं तेन वञ्चिताः स्मो हनूमता ॥ ११ ॥

जानीमो यदि तं सर्वे कथं जीवन् गमिष्यति ।
आज्ञापय जगत्कृत्स्नमवानरममानुषम् ॥ १२ ॥

कृत्वायास्यामहे सर्वे प्रत्येकं वा नियोजय ।
कुम्भकर्णस्तदा प्राह रावणं राक्षसेश्वरम् ॥ १३ ॥

आरब्धं यत्त्वया कर्म स्वात्मनाशाय केवलम् ।
न दृष्टोऽसि तदा भाग्यात्त्वं रामेण महात्मना ॥ १४ ॥

प्रवेश करणे सुद्धा अवघड आहे अशा लंकेत प्रवेश करून, जी दृष्टीस पडणे कठीण अशा सीतेला भेटून, मंदोदरीचा पुत्र अक्ष व राक्षस वीर यांनाही ठार करून, लंकेला संपूर्णपणे जाळून टाकून, सागर ओलांडून आणि तुम्हा सर्वांना तुच्छ ठरवून, तो हनुमान सुखरूप परत गेला आहे. (३-४)

तुम्ही सर्वजण विचार करण्यात तरबेज आहात. तेव्हा आता यापुढे आपण काय करावयास हवे आणि जे केले असता माझे हित होईल, त्या गोष्टीचा तुम्ही काळजीपूर्वक विचार करा." (५)

रावणाचे वचन ऐकल्यानंतर ते राक्षस मंत्री त्याला म्हणाले, "महाराज, युद्धात सर्व लोकांना जिंकणाऱ्या तुम्हांला रामापासून कसली भीती आहे ? (६)

तुमच्या इंद्रजित नामक पुत्राने इंद्रालासुद्धा बांधून आपल्या राजधानीच्या नगरात टाकले होते आणि तुम्ही स्वतः कुबेराला जिंकून, त्याचे पुष्पक विमान आणून, त्याचा उपभोग घेत आहात. (७)

हे प्रभो, तुम्ही यमाला जिंकले आहे. त्यामुळे कालदंडाची भीतीसुद्धा तुम्हांला नाही. तसेच केवळ हुंकार टाकून तुम्ही वरुणाला तसेच इतर सर्व राक्षसांना जिंकले आहे. मय या महा असुराने तुम्हांला भिऊन स्वतःच तुम्हांला आपली कन्या दिली आणि तो अद्यापिही तुम्हांला वश होऊन राहिला आहे. मग अन्य महान असुरांचे ते काय? हनुमानाने जो काही आपल्याला त्रास दिला तो केवळ आपण त्याची उपेक्षा केल्यामुळे ' हा तर साधा वानर आहे. त्याला आमचा पराक्रम दाखवून काय उपयोग ?' असा विचार करून आम्ही त्याची उपेक्षा केली होती. नाही तर तो आमची अवज्ञा कशी काय करू शकला असता ? आम्ही निष्काळजी राहिलो. तेव्हा आम्हांला हनुमंताने फसविले. त्याला काय महत्त्व द्यायचे ? तो असे काही करील हे आम्हा सर्वांना कळले असते तर तो जिवंतपणी कसा जाऊ शकला असता ? तुम्ही आम्हांला आज्ञा करा. संपूर्ण जग वानररहित आणि मानवरहित करून आम्ही सर्वजण परत येऊ. अथवा आम्हांपैकी कोणाही एकाकडे हे कार्य सोपवा." त्या वेळी राक्षसराज रावणाला कुंभकर्ण म्हणाला, "अरे रावणा, जे कार्य तू सुरू केले आहेस, ते केवळ तुझ्या नाशालाच कारणीभूत होणार आहे. (सीतेला हरण करण्याच्या वेळी) केवळ तुझे नशीब म्हणून महात्म्या रामाची दृष्टी तुझ्यावर पडली नाही. (१०-१४)

यदि पश्यति रामस्त्वां जीवन्नायासि रावण ।
रामो न मानुषो देव: साक्षान्नारायणोऽव्ययः ॥ १५ ॥

हे रावणा, जर त्यावेळी रामाने तुला पाहिले असते तर तू जिवंत परत आला नसतास. राम हा सामान्य मनुष्य नाही, तर तो साक्षात् अविनाशी नारायण देव आहे. (१५)

सीता भगवती लक्ष्मी रामपत्नी यशस्विनी ।
राक्षसानां विनाशाय त्वयानीता सुमध्यमा ॥ १६ ॥

रामाची यशस्विनी पत्नी सीता ही साक्षात भगवती लक्ष्मी आहे. आम्हा राक्षसांचा नाश करण्यासाठीच तू त्या सुंदर स्त्रीला पळवून आणले आहेस. (१६)

विषपिण्डमिवागीर्य महामीनो यथा तथा ।
आनीता जानकी पश्चात्त्वया किं वा भविष्यति ॥ १७ ॥

ज्या प्रमाणे एखादा मोठा मासा विषाचा गोळा गिळतो आणि मरतो त्या प्रमाणे तू जानकीला पळवून आणले आहेस. तर आणखी काय होणार ? (१७)

यद्यप्यनुचितं कर्म त्वया कृतमजानता ।
सर्वं समं करिष्यामि स्वस्थचित्तो भव प्रभो ॥ १८ ॥

जरी तू नकळत अनुचित कर्म केले आहेस तरी मी सर्व काही ठीक करीन. हे राजा, तू स्वस्थ राहा." (१८)

कुम्भकर्णवच: श्रुत्वा वाक्यमिद्रजिदब्रवीत् ।
देहि देव ममानुज्ञां हत्वा रामं सलक्ष्मणम् ।
सुग्रीवं वानरांश्चैव पुनर्यास्यामि तेऽन्तिकम् ॥ १९ ॥

कुंभकर्णाचे वचन ऐकल्यावर इंद्रजित म्हणाला, "महाराज, मला आज्ञा द्या. लक्ष्मणासह राम, सुग्रीव आणि सर्व वानर या सर्वांचा वध करून मी पुन्हा तुमच्याजवळ येईन." (१९)

तत्रागतो भागवतप्रधानो
बिभीषणो बुद्धिमतां वरिष्ठ: ।
श्रीरामपादद्वय एकतान:
प्रणम्य देवारिमुपोपविष्ट: ॥ २० ॥

तितक्यात भगवद्-भक्तांत अग्रगण्य, बुद्धिमंतांमध्ये श्रेष्ट, असा बिभीषण तेथे आला. श्रीरामांच्या पायांशी त्याच्या मनाची वृत्ती एकतान झाली होती. तो देवशत्रू रावणाला नमस्कार करून बसला. (२०)

विलोक्य कुम्भश्रवणादिदैत्या-
न्मत्तप्रमत्तानतिविस्मयेन ।
विलोक्य कामातुरमप्रमत्तो
दशाननं प्राह विशुद्धबुद्धि: ॥ २१ ॥

उन्मत्त अशा कुंभकर्ण इत्यादी दैत्यांकडे अतिशय आश्चर्याने पाहून आणि कामातुर रावणाकडे दृष्टी टाकून, सावध असणारा व निर्मळ बुद्धी असणारा तो बिभीषण शांतपणे रावणाला म्हणाला. (२१)

न कुम्भकर्णेन्द्रजितौ च राजं-
स्तथा महापार्श्वमहोदरौ तौ ।
निकुम्भकुम्भौ च तथातिकाय:
स्थातुं न शक्ता युधि राघवस्य ॥ २२ ॥

"हे राजन, कुंभकर्ण, इंद्रजित, महापार्श्व, महोदर, निकुंभ, कुंभ तसाच अतिकाय यांपैकी कोणीही युद्धामध्ये रामांच्यापुढे उभे राहण्यास समर्थ नाही. (२२)

सीताभिधानेन महाग्रहेण
ग्रस्तोऽसि राजन् न च ते विमोक्ष: ।
तामेव सत्कृत्य महाधनेन
दत्त्वाभिरामाय सुखी भव त्वम् ॥ २३ ॥

हे राजा, सीता नावाच्या महाग्रहाने तुला ग्रासले आहे; त्यातून तुझी सुटका होणार नाही. म्हणून त्या सीतेचाच सत्कार करून आणि विपुल धन देऊन, तू तिला रामांना परत देऊन सुखी हो. (२३)

यावन्न रामस्य शिता: शिलीमुखा
लङ्कामभिव्याप्य शिरांसि रक्षसाम् ।
छिन्दन्ति तावद्रघुनायकस्य भो-
स्तां जानकीं त्वं प्रतिदातुमर्हसि ॥ २४ ॥

लंकेला व्यापून, सर्व राक्षसांची मस्तके रामांच्या तीक्ष्ण बाणांनी जोपर्यंत तोडली जात नाहीत, तोपर्यंतच अरे रावणा, तू त्या रघुनायकाला ती जानकी परत करावीस, हेच योग्य आहे. (२४)

यावन्नगाभाः कपयो महाबला
हरीन्द्रतुल्या नखदंष्ट्रयोधिनः ।
लङ्कां समाक्रम्य विनाशयन्ति ते
तावद् द्रुतं देहि रघूत्तमाय ताम् ॥ २५ ॥

पर्वताप्रमाणे असणाऱ्या, महाबलवान श्रेष्ठ सिंहासारख्या पराक्रमी, नखे व दाढा यांनी युद्ध करणाऱ्या त्या वानरांनी लंकेवर आक्रमण करून जोपर्यंत ती नष्ट करून टाकलेली नाही, तोपर्यंतच तू रघूत्तम श्रीरामांना सीता सत्वर परत देऊन टाक. (२५)

जीवन्न रामेण विमोक्ष्यसे त्वं
गुप्तः सुरेन्द्रैरपि शङ्करेण ।
न देवराजाङ्कगतो न मृत्योः
पाताललोकानपि सम्प्रविष्टः ॥२६ ॥

(तू असे केले नाहीस तर) अगदी देवदेवांनीसुद्धा तुझे रक्षण केले किंवा शंकराने रक्षण केले, किंवा तू देवराज इंद्राच्या किंवा यमाच्या मांडीवर जाऊन बसलास, अथवा पाताळामध्ये जरी तू प्रवेश करून बसलास, तरी तू श्रीरामांच्या हातून जिवंत सुटणार नाहीस." (२६)

शुभं हितं पवित्रं च बिभीषणवचः खलः ।
प्रतिजग्राह नैवासौ म्रियमाण इवौषधम् ॥ २७ ॥

ज्या प्रमाणे मरायला टेकलेला माणूस औषध घेत नाही, त्या प्रमाणे त्या दुष्ट रावणाने बिभीषणाचे कल्याणकारक, हितकारक आणि पवित्र असे म्हणणे मानले नाही. (२७)

कालेन नोदितो दैत्यो बिभीषणमथाब्रवीत् ।
मद्दत्तभोगैः पुष्टाङ्गो मत्समीपे वसन्नपि ॥ २८ ॥

प्रतीपमाचरत्येष ममैव हितकारिणः ।
मित्रभावेन शत्रुर्मे जातो नास्त्यत्र संशयः ॥ २९ ॥

काळाकडून प्रेरणा मिळालेला तो दैत्य रावण नंतर बिभीषणाला म्हणाला, "पाहा, मी दिलेल्या भोगांनी शरीर पुष्ट झालेला हा बिभीषण माझ्याजवळ राहात असून सुद्धा तो माझ्याविरुद्ध आचरण करीत आहे. मित्ररूपाने हा माझा शत्रू झाला आहे, यात संशय नाही. (२८-२९)

अनार्येण कृतघ्नेन सङ्गतिर्मे न युज्यते ।
विनाशमभिकाङ्क्षन्ति ज्ञातीनां ज्ञातयः सदा ॥ ३० ॥

या नीच आणि कृतघ्न बिभीषणाशी माझी संगत असणे योग्य नाही. प्रायः असे दिसून येते की नातेवाईकच नातेवाईकांच्या नाशाची इच्छा करीत असतात. (३०)

योऽन्यस्त्वेवंविधं ब्रूयाद्वाक्यमेकं निशाचरः ।
हन्मि तस्मिन् क्षणे एव धिक् त्वां रक्षःकुलाधमम् ॥ ३१ ॥

दुसऱ्या कुणी राक्षसाने जर अशा प्रकारचे एक वाक्य उच्चारले तर मी त्याला त्याच क्षणात ठार करीन. हे राक्षस कुळातील अधमा, तुझा धिक्कार असो." (३१)

रावणेनैवमुक्तः सन्परुषं स बिभीषणः ।
उत्पपात सभामध्याद्गदापाणिर्महाबलः ॥ ३२ ॥

अशा प्रकारे रावणाने कठोर वचन उच्चारल्यानंतर तो महाबळी बिभीषण हातात गदा घेऊन, त्या राजसभेमधून एकदम वर उडाला. (३२)

चतुर्भिर्मन्त्रिभिः सार्धं गगनस्थोऽब्रवीद्वचः ।
क्रोधेन महताविष्टो रावणं दशकन्धरम् ।
मा विनाशमुपैहि त्वं प्रियवादिनमेव माम् ॥ ३३ ॥

धिक्करोषि तथापि त्वं ज्येष्ठो भ्राता पितुः समः ।
कालो राघवरूपेण जातो दशरथालये ॥ ३४ ॥

आणि आपल्या चार मंत्र्यांसह आकाशातच स्थिर होऊन आणि अतिशय क्रोधाने तो रावणाला म्हणाला, "अरे रावणा, तू स्वतःच्या नाशाप्रत जाऊ नकोस. तुझ्या कल्याणाची गोष्ट सांगणाऱ्याचा तू धिक्कार करीत आहेस. ठीक आहे. ज्येष्ठ भाऊ हा पित्यासमान असतो. (म्हणून मी काही वाईट बोलत नाही.) तुझा साक्षात काळ राघवांच्या रूपाने दशरथाच्या घरी जन्माला आला आहे. (३३-३४)

काली सीताभिधानेन जाता जनकनन्दिनी ।
तावुभावागतावत्र भूमेर्भारापनुत्तये ॥ ३५ ॥

आणि महाशक्ती काली ही सीता या नावाने जनकाची कन्या म्हणून जन्माला आली आहे. भूमीचा भार दूर करण्यासाठी ते दोघे येथे आले आहेत. (३५)

तेनैव प्रेरितस्त्वं तु न शृणोषि हितं मम ।
श्रीराम: प्रकृते: साक्षात्परस्तात्सर्वदा स्थित: ॥ ३६ ॥

त्या कालरूपी रामांनीच प्रेरणा दिल्यामुळे तू माझे हितकारक वचन ऐकत नाहीस. श्रीराम हे साक्षात परमात्मा असून ते सर्वदा प्रकृतीच्या पलीकडे असतात. (३६)

बहिरन्तश्च भूतानां सम: सर्वत्र संस्थित: ।
नामरूपादिभेदेन तत्तन्मय इवामल: ॥ ३७ ॥

ते प्राण्यांच्या आत-बाहेर सर्वत्र समरूपाने स्थित असतात. जरी ते मूलत: निर्मळ आहेत, तरी नाम आणि रूप यांच्या भेदामुळे ते जणू नामरूपात्मक आहेत, असे दिसतात. (३७)

यथा नानाप्रकारेषु वृक्षेष्वेको महानल: ।
तत्तदाकृतिभेदेन भिद्यतेऽज्ञानचक्षुषाम् ॥ ३८ ॥

पञ्चकोशादिभेदेन तत्तन्मय इवाबभौ ।
नीलपीतादियोगेन निर्मल: स्फटिको यथा ॥ ३९ ॥

ज्या प्रमाणे अज्ञानी माणसांच्या दृष्टीने नाना प्रकारच्या वृक्षांमध्ये असणारा एकच महान अग्नी हा त्या त्या वृक्षाच्या आकारभेदाने भिन्न आहे असे वाटते, किंवा निर्मळ असणारा स्फटिक मणी हा नील, पीत, इत्यादी प्रकारच्या वस्तूंच्या सान्निध्याने त्या त्या रंगाचा भासतो, त्या प्रमाणे (अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय अशा) पांच कोशांच्या भेदामुळे आत्मा हा त्या त्या कोशाच्या स्वरूपात आहे असे भासते. (३८-३९)

स एव नित्यमुक्तोऽपि स्वमायागुणबिम्बित: ।
काल: प्रधानं पुरुषोऽव्यक्तं चेति चतुर्विध: ॥ ४० ॥

ते परमात्मा राम जरी नित्य मुक्त आहेत तरी स्वत:च्या मायेच्या गुणांमध्ये प्रतिबिंबित झाल्यावर ते काल, प्रधान, पुरुष, आणि अव्यक्त अशा चार प्रकारचे होतात, असे भासते. (४०)

प्रधानपुरुषाभ्यां स जगत्कृत्स्नं सृजत्यज: ।
कालरूपेण कलनां जगत: कुरुतेऽव्यय: ॥ ४१ ॥

ते परमात्मा स्वत: जन्मरहित असूनही प्रधान (प्रकृती) आणि पुरुष यांच्या द्वारा तो संपूर्ण जग निर्माण करतात. तसेच ते स्वत: अविनाशी असूनही काळाच्या रूपाने जगाचा संहार करतात. (४१)

कालरूपी स भगवान् रामरूपेण मायया ॥ ४२ ॥

ब्रह्मणा प्रार्थितो देवस्त्वद्वधार्थमिहागत: ।
तदन्यथा कथं कुर्यात्सत्यसंकल्प ईश्वर: ॥ ४३ ॥

ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेमुळे काळरूपी ते भगवान रामांच्या रूपाने स्वत:च्या मायेसह तुझ्या वधासाठी येथे आले आहेत. ईश्वर हा सत्यसंकल्प असतो. तेव्हा ते आपली प्रतिज्ञा कशी बरे मोडतील ? (४२-४३)

हनिष्यति त्वां रामस्तु सपुत्रबलवाहनम् ।
हन्यमानं न शक्नोमि द्रष्टुं रामेण रावण ॥ ४४ ॥

त्वां राक्षसकुलं कृत्स्नं ततो गच्छामि राघवम् ।
मयि याते सुखी भूत्वा रमस्व भवने चिरम् ॥ ४५ ॥

म्हणून श्रीराम हे तुला तुझे पुत्र, सैन्य आणि वाहने यांच्या सकट ठार करतील. हे रावणा, रामांकडून सर्व राक्षस कुळासह तुला ठार केलेले मी पाहू शकणार नाही. म्हणून मी आत्ताच राघवांकडे जात आहे. मी गेल्यावर तू सुखी होऊन पुष्कळ काळ भोगांत रममाण होऊन आपल्या महालात राहा." (४४-४५)

बिभीषणो रावणवाक्यत: क्षणा-
द्विसृज्य सर्वं सपरिच्छदं गृहम् ।
जगाम रामस्य पदारविन्दयो:
सेवाभिकाङ्क्षी परिपूर्णमानस: ॥ ४६ ॥

अशा प्रकारे रावणाच्या बोलण्यामुळे आपल्या घरादाराचा त्याग करून, बिभीषण एका क्षणातच रामांच्या चरणकमळांची सेवा करण्याच्या इच्छेने प्रसन्न मनाने रामांकडे जाण्यास निघाला. (४६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे द्वितीय: सर्ग: ॥ २ ॥

# तृतीय सर्ग

## बिभीषणाची शरणागती, समुद्राचा त्रास आणि सेतू बांधण्याचा प्रारंभ

*श्रीमहादेव उवाच*

बिभीषणो महाभागश्चतुर्भिर्मन्त्रिभिः सह ।
आगत्य गगने रामसम्मुखे समवस्थितः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, त्यानंतर महाभाग्यवंत बिभीषण हा चार मंत्र्यांसह श्रीरामांजवळ येऊन आकाशातच त्यांच्यासमोर उपस्थित झाला. (१)

उच्चैरुवाच भोः स्वामिन् राम राजीवलोचन ।
रावणस्यानुजोऽहं ते दारहर्तुर्बिभीषणः ॥ २ ॥

नाम्ना भ्रात्रा निरस्तोऽहं त्वामेव शरणं गतः ।
हितमुक्तं मया देव तस्य चाविदितात्मनः ॥ ३ ॥

आणि तो मोठ्यांदा म्हणाला, "हे कमलनयन, स्वामी, रामा, तुमच्या पत्नीचे हरण करणाऱ्या रावणाचा धाकटा भाऊ मी बिभीषण आहे. भावाने मला हाकलून दिले आहे. म्हणून मी तुम्हांलाच शरण आलो आहे. हे देवा, स्वतःला न ओळखणाऱ्या रावणाला मी त्याच्या हिताची गोष्ट सांगितली . (२-३)

सीतां रामाय वैदेहीं प्रेषयेति पुनः पुनः ।
उक्तोऽपि न शृणोत्येव कालपाशवशं गतः ॥ ४ ॥

'वैदेही सीतेला रामांकडे पाठव.' असे मी त्याला पुनः पुनः सांगितले. तरी काळाच्या पाशात सापडलेला तो माझे काही ऐकतच नाही. (४)

हन्तुं मां खड्गमादाय प्राद्रवद्राक्षसाधमः ।
ततोऽचिरेण सचिवैश्चतुर्भिः सहितो भयात् ॥ ५ ॥

त्वामेव भवमोक्षाय मुमुक्षुः शरणं गतः ।
बिभीषणवचः श्रुत्वा सुग्रीवो वाक्यमब्रवीत् ॥ ६ ॥

मला ठार करण्यासाठी तो अधम राक्षस खड्ग घेऊन धावून आला. तेव्हा भिऊन मी लगेच चार मंत्र्यांसह, त्याच्या आणि संसाराच्या पाशातून सुटण्याच्या इच्छेने तुम्हांलाच शरण आलो आहे." बिभीषणाचे हे वचन ऐकल्यावर सुग्रीव असे बोलला. (५-६)

विश्वासार्हो न ते राम मायावी राक्षसाधमः ।
सीताहर्तुर्विशेषेण रावणस्यानुजो बली ॥ ७ ॥

"हे श्रीराम, हा मायावी अधम राक्षस विश्वास ठेवण्यास पात्र नाही. कारण सीतेचे हरण करणाऱ्या रावणाचा हा धाकटा भाऊ असून बलवानही दिसत आहे. (७)

मन्त्रिभिः सायुधैरस्मान् विवरे निहनिष्यति ।
तदाज्ञापय मे देव वानरैर्हन्यतामयम् ॥ ८ ॥

सशस्त्र अशा मंत्र्यांसह आलेला हा बिभीषण आपणास केव्हाही एकांत स्थानी ठार करील. तेव्हा हे देवा मला आज्ञा करा. वानरांकडून याला मी ठार मारतो. (८)

ममैवं भाति ते राम बुद्ध्या किं निश्चितं वद ।
श्रुत्वा सुग्रीववचनं रामः सस्मितमब्रवीत् ॥ ९ ॥

हे रामा, मला तर असे वाटते की, आता तुमच्या मनात काय आहे ते तुम्ही मला अवश्य सांगा." सुग्रीवाचे वचन ऐकल्यावर श्रीराम स्मित करून म्हणाले. (९)

यदीच्छामि कपिश्रेष्ठ लोकान्सर्वान्सहेश्वरान् ।
निमिषार्धेन संहन्यां सृजामि निमिषार्धतः ॥ १० ॥

"हे कपिश्रेष्ठा, मला वाटले तर मी अर्ध्या निमिषात लोकपालांसह सर्व लोकांचा संहार करून टाकीन आणि अर्ध्या क्षणात मी सर्वांना पुनः उत्पन्न करू शकेन. (१०)

अतो मयाभयं दत्तं शीघ्रमानय राक्षसम् ॥ ११ ॥

म्हणून तू चिंता करू नकोस. मी या बिभीषणाला आता अभय दिले आहे. तू शीघ्र या राक्षसाला घेऊन ये. (११)

सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते ।
अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद्व्रतं मम ॥ १२ ॥

'मी तुझाच आहे', असे एकदाच म्हणून व मला शरण येऊन जो अभय मागतो, त्या सर्व प्राण्यांना मी अभय देतो, असे माझे व्रत आहे." (१२)

रामस्य वचनं श्रुत्वा सुग्रीवो हृष्टमानसः ।
बिभीषणमथानाय्य दर्शयामास राघवम् ॥ १३ ॥

श्रीरामांचे वचन ऐकल्यावर, आनंदित झालेल्या सुग्रीवाने बिभीषणाला आणले आणि त्याची रामांशी भेट घडविली. (१३)

बिभीषणस्तु साष्टाङ्गं प्रणिपत्य रघूत्तमम् ।
हर्षगद्गदया वाचा भक्त्या च परयान्वितः ॥ १४ ॥

रामं श्यामं विशालाक्षं प्रसन्नमुखपंकजम् ।
धनुर्बाणधरं शान्तं लक्ष्मणेन समन्वितम् ॥ १५ ॥

कृताञ्जलिपुटो भूत्वा स्तोतुं समुपचक्रमे ॥ १६ ॥

बिभीषणाने रघूत्तमांना साष्टांग नमस्कार केला. तो परम भक्तीने भरून गेला होता. नंतर श्यामवर्ण, विशाल डोळे असणाऱ्या, प्रसन्न मुखकमल असणाऱ्या, धनुष्य व बाण धारण करणाऱ्या, लक्ष्मणासहित असणाऱ्या व शांत अशा रामांपुढे हात जोडून उभे राहून, हर्षाने गद्‌गद झालेल्या वाणीने बिभीषणाने त्यांची स्तुती करण्यास प्रारंभ केला. (१४-१६)

*बिभीषण उवाच*

नमस्ते राम राजेन्द्र नमः सीतामनोरम ।
नमस्ते चण्डकोदण्ड नमस्ते भक्तवत्सल ॥ १७ ॥

**बिभीषण म्हणाला –** "हे राजेंद्रा, सीतेचे मन रमविणाऱ्या, प्रचंड धनुष्य धारण करणाऱ्या, हे भक्तवत्सल रामा, तुम्हांला नमस्कार असो. (१७)

नमोऽनन्ताय शान्ताय रामायामिततेजसे ।
सुग्रीवमित्राय च ते रघूणां पतये नमः ॥ १८ ॥

अनंत, शांत, अमर्याद तेज असणाऱ्या श्रीरामांना नमस्कार असो. सुग्रीवाचा मित्र आणि रघुकुळाचा स्वामी अशा हे रामा, तुम्हांला नमस्कार असो. (१८)

जगदुत्पत्तिनाशानां कारणाय महात्मने ।
त्रैलोक्यगुरवेऽनादिगृहस्थाय नमो नमः ॥ १९ ॥

जगाची उत्पत्ती व नाश यांचे कारण असणाऱ्या, त्रैलोक्याचा गुरू असणाऱ्या, अनादी काळापासून गृहस्थाश्रमी असणाऱ्या,* अशा महात्म्या रामांना पुनः पुनः नमस्कार असो. (१९)

त्वमादिर्जगतां राम त्वमेव स्थितिकारणम् ।
त्वमेव निधनस्थानं स्वेच्छाचारस्त्वमेव हि ॥ २० ॥

हे श्रीरामा, तुम्ही सर्व जगांचे आदिकारण आहात. तुम्हीच त्यांच्या स्थितीचे कारण आहात. तुम्हीच शेवटी त्यांच्या नाशाचे स्थान आहात. तसेच तुम्हीच स्वतःच्या इच्छेप्रमाणे आचार करणारे आहात. (२०)

चराचराणां भूतानां बहिरन्तश्च राघव ।
व्याप्यव्यापकरूपेण भवान् भाति जगन्मयः ॥ २१ ॥

हे राघवा, स्थावर व जंगम सर्व प्राण्यांच्या आत व बाहेर, व्याप्य आणि व्यापक या रूपाने तुम्हीच असून, तुम्हीच जगन्मय आहात, असे वाटते. (२१)

त्वन्मायया हृतज्ञाना नष्टात्मानो विचेतसः ।
गतागतं प्रपद्यन्ते पापपुण्यवशात्सदा ॥ २२ ॥

तुमच्या मायेमुळे ज्यांचे ज्ञान हरण केले गेले आहे आणि ज्यांची बुद्धी नष्ट झाली आहे व ज्यांचे मन विपरीत प्रवृत्ति-मार्गाकडे लागले आहे, असे लोक आपल्या पाप-पुण्यांना वश होऊन सतत या संसारात येरझाऱ्या करीत असतात. (२२)

तावत्सत्यं जगद्भाति शुक्तिकारजतं यथा ।
यावन्न ज्ञायते ज्ञानं चेतसानन्यगामिना ॥ २३ ॥

जोपर्यंत अनन्यगामी चित्ताने तुम्हा परमात्म्याला जाणले जात नाही, तोपर्यंत शिंपेवर भासणाऱ्या रुप्याप्रमाणे हे जग सत्य भासते. (२३)

* प्रकृतिरूपी पत्नीशी भगवंताचा अनादी संबंध आहे. म्हणून तो अनादी असा गृहस्थाश्रमी आहे.

त्वदज्ञानात्सदा युक्ताः पुत्रदारगृहादिषु ।
रमन्ते विषयान्सर्वानन्ते दुःखप्रदान्विभो ॥ २४ ॥

हे विभू, तुमचे ज्ञान न झाल्यामुळे प्राणी पुत्र, पत्नी, गृह इत्यादींच्या ठिकाणी आसक्त होऊन, शेवटी दुःख देणाऱ्या सर्व विषयांत सतत रमून जातात. (२४)

त्वमिन्द्रोऽग्निर्यमो रक्षो वरुणश्च तथानिलः ।
कुबेरश्च तथा रुद्रस्त्वमेव पुरुषोत्तम ॥२५॥

हे पुरुषोत्तमा, तुम्हीच इंद्र, अग्नी, यम, निर्ऋती, वरुण तसेच वायू आहात. तसेच तुम्हीच कुबेर आणि रुद्र आहात. (२५)

त्वमणोरप्यणीयांश्च स्थूलात् स्थूलतरः प्रभो ।
त्वं पिता सर्वलोकानां माता धाता त्वमेव हि ॥ २६ ॥

हे प्रभो, तुम्हीच अणूपेक्षा अणू व स्थूलापेक्षा अधिक स्थूल आहात. तुम्हीच सर्व लोकांचे पिता व माता आहात. तुम्हीच सर्व लोकांचे पोषण करणारे आहात. (२६)

आदिमध्यान्तरहितः परिपूर्णोऽच्युतोऽव्ययः ।
त्वं पाणिपादरहितश्चक्षुःश्रोत्रविवर्जितः ॥ २७ ॥

तुम्ही आदी, मध्य व अंत यांनी रहित आहात. तुम्ही परिपूर्ण, अच्युत आणि अव्यय आहात. तुम्ही हात-पाय रहित आहात. तसेच तुम्ही डोळे व कान यांनी रहित आहात. (२७)

श्रोता द्रष्टा ग्रहीता च जवनस्त्वं खरान्तक ।
कोशेभ्यो व्यतिरिक्तस्त्वं निर्गुणो निरुपाश्रयः ॥ २८ ॥

खर राक्षसाचा नाश करणाऱ्या हे रामा, तुम्ही श्रोता, द्रष्टा व ग्रहण करणारे असून, तुम्ही वेगवान आहात. तुम्ही अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय अशा पाच कोशांपेक्षा वेगळे असून, तुम्ही निर्गुण आणि आश्रयरहित आहात. (२८)

निर्विकल्पो निर्विकारो निराकारो निरीश्वरः ।
षड्भावरहितोऽनादिः पुरुषः प्रकृतेः परः ॥ २९ ॥

तुम्ही निर्विकल्प, निर्विकार, निराकार असून तुम्ही निरीश्वर (=प्रेरक ईश्वर नसणारे) आहात. (उत्पत्ती, वृद्धी, परिणाम, भय, जीर्णता आणि नाश या) सहा विकारांनी रहित, अनादी आणि प्रकृतीच्या पलीकडील पुरुष तुम्ही आहात. (२९)

मायया गृह्यमाणस्त्वं मनुष्य इव भाव्यसे ।
ज्ञात्वा त्वां निर्गुणमजं वैष्णवा मोक्षगामिनः ॥ ३० ॥

मायेच्या योगाने धारण केलेल्या रूपात तुम्ही मनुष्य असल्यासारखे दिसता. पण तुम्ही निर्गुण, अज आहात, असे जाणून विष्णूचे भक्त मोक्षाप्रत जातात. (३०)

अहं त्वत्पादसद्भक्तिनिःश्रेणीं प्राप्य राघव ।
इच्छामि ज्ञानयोगाख्यं सौधमारोढुमीश्वर ॥ ३१ ॥

हे राघवा, तुमच्या चरणांची उत्तम भक्तिरूप शिडी प्राप्त करून घेऊन, हे ईश्वरा, ज्ञानयोग नाव असणाऱ्या प्रासादावर चढून जाण्याची माझी इच्छा आहे. (३१)

नमः सीतापते राम नमः कारुणिकोत्तम ।
रावणारे नमस्तुभ्यं त्राहि मां भवसागरात् ॥ ३२ ॥

हे सीतापते, हे श्रेष्ठ करुणावंता, हे रावणाच्या शत्रो, तुम्हांला नमस्कार असो. तुम्ही संसारसागरातून माझे रक्षण करा." (३२)

ततः प्रसन्नः प्रोवाच श्रीरामो भक्तवत्सलः ।
वरं वृणीष्व भद्रं ते वाञ्छितं वरदोऽस्म्यहम् ॥ ३३ ॥

(बिभीषणाने केलेली स्तुती ऐकल्यानंतर) भक्तवत्सल श्रीराम प्रसन्न होऊन म्हणाले, "हे बिभीषणा, तुझे कल्याण होवो. तू कोणताही वर माग. तुझ्या इच्छेप्रमाणे मी तुला वर देईन." (३३)

*बिभीषण उवाच*

धन्योऽस्मि कृतकृत्योऽस्मि कृतकार्योऽस्मि राघव ।
त्वत्पाददर्शनादेव विमुक्तोऽस्मि न संशयः ॥ ३४ ॥

**बिभीषण म्हणाला–** "हे राघवा, तुमच्या पायांच्या दर्शनानेच मी धन्य झालो आहे. कृतकार्य झालो आहे, कृतकृत्य झालो आहे आणि मी मुक्त झालो आहे, यात संशय नाही. (३४)

नास्ति मत्सदृशो धन्यो नास्ति मत्सदृशः शुचिः ।
नास्ति मत्सदृशो लोके राम त्वन्मूर्तिदर्शनात् ॥ ३५ ॥

हे रामा, तुमचे दर्शन झाल्यामुळे, माझ्यासारखा धन्य, शुद्ध आणि भाग्यवान या जगात अन्य कुणीही नाही. (३५)

कर्मबन्धविनाशाय त्वज्ज्ञानं भक्तिलक्षणम् ।
त्वद्ध्यानं परमार्थं च देहि मे रघुनन्दन ॥ ३६ ॥

हे रघुनन्दना, माझ्या कर्मबंधनाचा नाश होण्यासाठी, भक्तिस्वरूप असे तुमचे ज्ञान आणि तुमच्या परमार्थ स्वरूपाचा साक्षात्कार घडविणारे तुमचे ध्यान तुम्ही मला द्या. (३६)

न याचे राम राजेन्द्र सुखं विषयसम्भवम् ।
त्वत्पादकमले सक्ता भक्तिरेव सदास्तु मे ॥ ३७ ॥

हे राजेंद्रा रामा, विषयांपासून निर्माण होणारे सुख मी तुमच्याकडे मागत नाही. तुमच्या चरणकमळांच्या ठिकाणी माझी भक्ती जडून राहो, अशी माझी मागणी आहे." (३७)

ओमित्युक्त्वा पुनः प्रीतो रामः प्रोवाच राक्षसम् ।
शृणु वक्ष्यामि ते भद्रं रहस्यं मम निश्चितम् ॥ ३८ ॥

"ठीक आहे" असे म्हणून संतुष्ट झालेले श्रीराम पुनः बिभीषणाला म्हणाले, "तुझे कल्याण होवो. आता मी तुला माझे रहस्य स्पष्टपणे सांगतो, ते ऐक. (३८)

मद्भक्तानां प्रशान्तानां योगिनां वीतरागिणाम् ।
हृदये सीतया नित्यं वसाम्यत्र न संशयः ॥ ३९ ॥

अतिशय शांत, भक्तियोगी आणि आसक्ती रहित असणाऱ्या अशा माझ्या भक्तांच्या हृदयांत मी सीतेसह सदा राहातो, या बाबतीत संशय नाही. (३९)

तस्मात्त्वं सर्वदा शान्तः सर्वकल्मषवर्जितः ।
मां ध्यात्वा मोक्ष्यसे नित्यं घोरसंसारसागरात् ॥ ४० ॥

तेव्हा सर्व काळी शांत आणि सर्व पापांनी रहित होऊन तू माझे नित्य ध्यान केलेस तर तू या भयंकर संसार-सागरातून मुक्त होशील. (४०)

स्तोत्रमेतत्पठेद्यस्तु लिखेद्यः शृणुयादपि ।
मत्प्रीतये ममाभीष्टं सारूप्यं समवाप्नुयात् ॥ ४१ ॥

शिवाय मला प्रसन्न करण्यासाठी जो कोणी तू केलेले हे स्तोत्र वाचेल, लिहील अगर ऐकेल, तो मला प्रिय असणारे सारूप्य प्राप्त करून घेईल." (४१)

इत्युक्त्वा लक्ष्मणं प्राह श्रीरामो भक्तभक्तिमान् ।
पश्यत्विदानीमेवैष मम सन्दर्शने फलम् ॥ ४२ ॥

असे सांगून आपल्या भक्तांवर प्रेम करणारे श्रीराम लक्ष्मणाला म्हणाले, "माझ्या दर्शनाने मिळणारे फळ हा बिभीषण आत्ताच पाहू दे. (४२)

लङ्काराज्येऽभिषेक्ष्यामि जलमानय सागरात् ।
यावच्चन्द्रश्च सूर्यश्च यावत्तिष्ठति मेदिनी ॥ ४३ ॥

यावन्मम कथा लोके तावद्राज्यं करोत्वसौ ।
इत्युक्त्वा लक्ष्मणेनाम्बु ह्यानाय्य कलशेन तम् ॥ ४४ ॥

लङ्काराज्याधिपत्यार्थमभिषेकं रमापतिः ।
कारयामास सचिवैर्लक्ष्मणेन विशेषतः ॥ ४५ ॥

आत्ताच मी याला लंकेच्या राज्यावर अभिषेक करतो. लक्ष्मणा, तू समुद्रातून पाणी घेऊन ये. जोपर्यंत चंद्र, सूर्य आणि पृथ्वी हे राहतील तसेच जोपर्यंत माझी कथा या जगात टिकून राहील, तोपर्यंत हा बिभीषण लंकेचे राज्य करो." असे म्हणून लक्ष्मणाकडून कलशातून पाणी आणवून घेऊन, त्या लक्ष्मीपती रामांनी बिभीषणाच्या मंत्र्यांकडून आणि विशेषतः लक्ष्मणाकडून, बिभीषणाला लंकेवरील राज्याच्या आधिपत्यासाठी अभिषेक करविला. (४३-४५)

साधु साध्विति ते सर्वे वानरास्तुष्टुवुर्भृशम् ।
सुग्रीवोऽपि परिष्वज्य बिभीषणमथाब्रवीत् ॥ ४६ ॥

"छान ! छान!" असे म्हणून त्या सर्व वानरांनी आनंदाने प्रशंसा केली. नंतर सुग्रीवानेसुद्धा बिभीषणाला आलिंगन देऊन म्हटले. (४६)

बिभीषण वयं सर्वे रामस्य परमात्मनः ।
किङ्करास्तत्र मुख्यस्त्वं भक्त्या रामपरिग्रहात् ।
रावणस्य विनाशे त्वं साहाय्यं कर्तुमर्हसि ॥ ४७ ॥

"अरे बिभीषणा, आम्ही सर्व जण परमात्म्या रामांचे सेवक आहोत. तू आता भक्तीने रामांचा आश्रय घेतल्यामुळे , आम्हा सर्वांमध्ये तू आता मुख्य झाला आहेस. तेव्हा रावणाचा नाश करण्यासाठी तू साहाय्य करावेस." (४७)

*बिभीषण उवाच*

अहं कियान्सहायत्वे रामस्य परमात्मनः ।
किं तु दास्यं करिष्येऽहं भक्त्या शक्त्या ह्यमायया ॥ ४८ ॥

**बिभीषण म्हणाला**– "परमात्म्या रामांना मी काय साहाय्य करणार ? तथापि भक्तीने, माझ्या शक्तीप्रमाणे आणि निष्कपटपणाने मी रामांची सेवा मात्र करीन." (४८)

दशग्रीवेण सन्दिष्टः शुको नाम महासुरः ।
संस्थितो ह्यम्बरे वाक्यं सुग्रीवमिदमब्रवीत् ॥ ४९ ॥

इतक्यात रावणाने निरोप देऊन पाठविलेला शुक नावाचा महान असुर तेथे येऊन आकाशातून, सुग्रीवाला म्हणाला. (४९)

त्वामाह रावणो राजा भ्रातरं राक्षसाधिपः ।
महाकुलप्रसूतस्त्वं राजासि वनचारिणाम् ॥ ५० ॥

"राक्षसांचा अधिपती राजा रावण हा भावाप्रमाणे असणाऱ्या तुला सांगत आहे की, 'तू महान कुळात जन्मलेला आहेस आणि वनचर वानरांचा तू राजा आहेस. (५०)

मम भ्रातृसमानस्त्वं तव नास्त्यर्थविप्लवः ।
अहं यदहरं भार्यां राजपुत्रस्य किं तव ॥ ५१ ॥

तू मला भावाप्रमाणे आहेस. तुझ्या कोणत्याही गोष्टीचा नाश माझ्याकडून आत्तापर्यंत झालेला नाही. जर आता मी एखाद्या राजपुत्राच्या पत्नीचे हरण केले असेल, तर त्याच्याशी तुझा काय संबंध आहे ? (५१)

किष्किन्धां याहि हरिभिर्लङ्का शक्या न दैवतैः ।
प्राप्तुं किं मानवैरल्पसत्त्वैर्वानरयूथपैः ॥ ५२ ॥

तेव्हा तू आपल्या वानरांसह किष्किंधेला परत जा. देवतांनासुद्धा लंका जिंकता येणे शक्य झाले नाही मग अल्प सामर्थ्य असणारे मानव आणि वानरसमूहांचे नायक यांची गोष्ट ती काय ? " (५२)

तं प्रापयन्तं वचनं तूर्णमुत्प्लुत्य वानराः ।
प्रापद्यन्त तदा क्षिप्रं निहन्तुं दृढमुष्टिभिः ॥ ५३ ॥

शुक संदेश सांगत होता, तोच वानर उड्या मारत त्याच्यावर जोराने मुष्टीचे प्रहार करण्यासाठी, चटदिशी त्याच्याजवळ पोचले. (५३)

वानरैर्हन्यमानस्तु शुको राममथाब्रवीत् ।
न दूतान् घ्नन्ति राजेन्द्र वानरान्वारय प्रभो ॥ ५४ ॥

तेव्हा वानरांच्या बुक्क्या खात शुक रामांना म्हणाला, "हे राजेंद्रा, शहाणे लोक दूतांना ठार करीत नाहीत. हे प्रभो, तू या वानरांचे निवारण कर." (५४)

रामः श्रुत्वा तदा वाक्यं शुकस्य परिदेवितम् ।
मा वधिष्टेति रामस्तान्वारयामास वानरान् ॥ ५५ ॥

त्या वेळी शुकाचे दुःखपूर्ण शब्द ऐकल्यावर, "त्याला ठार करू नका." असे म्हणून रामांनी वानरांचे निवारण केले. (५५)

पुनरम्बरमासाद्य शुकः सुग्रीवमब्रवीत् ।
ब्रूहि राजन्दशग्रीवं किं वक्ष्यामि व्रजाम्यहम् ॥ ५६ ॥

तेव्हा पुनः आकाशात जाऊन शुक सुग्रीवाला म्हणाला, "हे राजा, रावणाला तुझा काय संदेश देऊ, ते मला सांग. मी आता जात आहे." (५६)

*सुग्रीव उवाच*

यथा वाली मम भ्राता तथा त्वं राक्षसाधम ।
हन्तव्यस्त्वं मया यत्नात्सपुत्रबलवाहनः ॥ ५७ ॥

**सुग्रीव म्हणाला**– "तू रावणाला असे सांग की जसा वाली हा माझा भाऊ, तसा हे अधम राक्षसा, तू माझा भाऊ आहेस. तथापि वालीप्रमाणेच पुत्र, सैन्य आणि वाहने यांच्यासह तू माझ्याकडून ठार मारला जाण्यास योग्य आहेस. (५७)

ब्रूहि मे रामचन्द्रस्य भार्यां हृत्वा क्व यास्यसि ।
ततो रामाज्ञया धृत्वा शुकं बद्ध्वान्वरक्षयत् ॥ ५८ ॥

रामचंद्रांच्या पत्नीचे हरण करून तू आता कुठे जाशील, ते मला सांग.'' असे बोलल्यानंतर रामांच्या आज्ञेने शुकाला धरून आणि बांधून टाकून, त्याला वानरांच्या संरक्षणाखाली ठेवले. (५८)

शार्दूलोऽपि ततः पूर्वं दृष्ट्वा कपिबलं महत् ।
यथावत्कथयामास रावणाय स राक्षसः ॥ ५९ ॥

शुक राक्षस येण्यापूर्वीच शार्दूल नावाच्या राक्षसाने सुद्धा वानरांचे प्रचंड सैन्य पाहिले होते आणि त्या राक्षसाने परत लंकेत जाऊन ते रावणाला सांगितले होते. (५९)

दीर्घचिन्तापरो भूत्वा निःश्वसन्नास मन्दिरे ।
ततः समुद्रमावेक्ष्य रामो रक्तान्तलोचनः ॥ ६० ॥

ते ऐकल्यावर अतिशय चिंतेत पडललेला रावण मोठमोठे निःश्वास टाकीत आपल्या महालात बसला होता. त्याच वेळी इकडे समुद्राकडे पाहिल्यावर रामांचे डोळे रागाने लाल झाले . (६०)

पश्य लक्ष्मण दुष्टोऽसौ वारिधिर्मामुपागतम् ।
नाभिनन्दति दुष्टात्मा दर्शनार्थं ममानघ ॥ ६१ ॥

(श्रीराम क्रोधाने लक्ष्मणाला म्हणाले,) ''लक्ष्मणा, पाहा, पाहा, हा समुद्र किती दुष्ट आहे. मी याच्या तीरावर आलो आहे. परंतु लक्ष्मणा, हा दुष्ट मनाचा समुद्र माझ्या दर्शनासाठी आला नाही आणि त्याने माझे अभिनंदनही केलेले नाही. (६१)

जानाति मानुषोऽयं मे किं करिष्यति वानरैः ।
अद्य पश्य महाबाहो शोषयिष्यामि वारिधिम् ॥ ६२ ॥

'हा राम एक मानव आहे. तेव्हा वानरांच्या साहाय्याने हा आपले काय वाईट करणार ?' असे त्याला वाटत आहे. हे महाबाहो लक्ष्मणा, बघ, आज मी या समुद्राला कोरडा करून टाकतो. (६२)

पादेनैव गमिष्यन्ति वानरा विगतज्वराः ।
इत्युक्त्वा क्रोधताम्राक्ष आरोपितधनुर्धरः ॥ ६३ ॥

तूणीराद्बाणमादाय कालाग्निसदृशप्रभम् ।
सन्धाय चापमाकृष्य रामो वाक्यमथाब्रवीत् ॥ ६४ ॥

पश्यन्तु सर्वभूतानि रामस्य शरविक्रमम् ।
इदानीं भस्मसात्कुर्यां समुद्रं सरितां पतिम् ॥ ६५ ॥

एवं ब्रुवति रामे तु सशैलवनकानना ।
चचाल वसुधा द्यौश्च दिशश्च तमसावृताः ॥ ६६ ॥

चुक्षुभे सागरो वेलां भयाद्योजनमत्यगात् ।
तिमिनक्रझषा मीनाः प्रतप्ताः परितत्रसुः ॥ ६७ ॥

एतस्मिन्नन्तरे साक्षात्सागरो दिव्यरूपधृक् ।
दिव्याभरणसम्पन्नः स्वभासा भासयन् दिशः ॥ ६८ ॥

स्वान्तःस्थदिव्यरत्नानि कराभ्यां परिगृह्य सः ।
पादयोः पुरतः क्षिप्त्वा रामस्योपायनं बहु ॥ ६९ ॥

दण्डवत्प्रणिपत्याह रामं रक्तान्तलोचनम् ।
त्राहि त्राहि जगन्नाथ राम त्रैलोक्यरक्षक ॥ ७० ॥

म्हणजे वानर सहजपणे विनायास पायी पायीच समुद्र पार करून जातील.'' असे बोलून रामांनी क्रोधाने डोळे लाल केले आणि धनुष्यावर दोरी चढविली. कालाग्नीप्रमाणे तेज असणारा एक बाण भात्यातून काढून घेऊन तो त्यांनी धनुष्याला जोडला आणि नंतर धनुष्याची प्रत्यंचा खेचून ते म्हणाले. ''रामाच्या बाणाचा पराक्रम सर्व प्राणी बघू देत. नद्यांचा पती असणाऱ्या समुद्राला मी आता भस्मसात करून टाकतो.'' रामांनी असे म्हणताच पर्वत, वने आणि अरण्ये यांच्यासह पृथ्वी हलू लागली आणि आकाश व दिशा हे अंधाराने भरून गेले. सागर खवळला आणि भीतीने आपला किनारा ओलांडून तो एक योजन पुढे आला. मोठे मत्स्य, मगरी, सुसरी, मासे हे संत्रस्त होऊन भयभीत झाले. तितक्यात दिव्य अलंकारांनी संपन्न, दिव्य रूप धारण केलेला, स्वतःच्या तेजाने दिशांना प्रकाशित करणारा असा साक्षात सागर रामांकडे आला आणि आपल्या ठिकाणी असणारी दिव्य रत्ने दोन्ही हातात घेऊन, नाना प्रकारचा नजराणा म्हणून त्याने ती रामांच्या पायांपुढे ठेवली. ज्याचे डोळे रागाने लाल झालेले होते अशा रामांना दंडवत प्रणाम करून तो म्हणाला, ''हे जगन्नाथा, हे त्रैलोक्यरक्षका, हे रामा, माझे रक्षण करा. (६३-७०)

जडोऽहं राम ते सृष्टः सृजता निखिलं जगत् ।
स्वभावमन्यथा कर्तुं कः शक्तो देवनिर्मितम् ॥ ७१ ॥

स्थूलानि पञ्चभूतानि जडान्येव स्वभावतः ।
सृष्टानि भवतैतानि त्वदाज्ञां लङ्घयन्ति न ॥ ७२ ॥

तामसादहमो राम भूतानि प्रभवन्ति हि ।
कारणानुगमात्तेषां जडत्वं तामसं स्वतः ॥ ७३ ॥

निर्गुणस्त्वं निराकारो यदा मायागुणान्प्रभो ।
लीलयाङ्गीकरोषि त्वं तदा वैराजनामवान् ॥ ७४ ॥

गुणात्मनो विराजश्च सत्त्वाद्देवा बभूविरे ।
रजोगुणात्प्रजेशाद्या मन्योर्भूतपतिस्तव ॥ ७५ ॥

त्वामहं मायया छन्नं लीलया मानुषाकृतिम् ॥ ७६ ॥

जडबुद्धिर्जडो मूर्खः कथं जानामि निर्गुणम् ।
दण्ड एव हि मूर्खाणां सन्मार्गप्रापकः प्रभो ॥ ७७ ॥

भूतानाममरश्रेष्ठ पशूनां लगुडो यथा ।
शरणं ते व्रजामीश शरण्यं भक्तवत्सल ।
अभयं देहि मे राम लङ्कामार्गं ददामि ते ॥ ७८ ॥

*श्रीराम उवाच*

अमोघोऽयं महाबाणः कस्मिन्देशे निपात्यताम् ।
लक्ष्यं दर्शय मे शीघ्रं बाणस्यामोघपातिनः ॥ ७९ ॥

रामस्य वचनं श्रुत्वा करे दृष्ट्वा महाशरम् ।
महोदधिर्महातेजा राघवं वाक्यमब्रवीत् ॥ ८० ॥

रामोत्तरप्रदेशे तु द्रुमकुल्य इति श्रुतः ।
प्रदेशस्तत्र बहवः पापात्मानो दिवानिशम् ॥ ८१ ॥

बाधन्ते मां रघुश्रेष्ठ तत्र ते पात्यतां शरः ।
रामेण सृष्टो बाणस्तु क्षणादाभीरमण्डलम् ॥ ८२ ॥

हत्वा पुनः समागत्य तूणीरे पूर्ववत्स्थितः ।
ततोऽब्रवीद्रघुश्रेष्ठं सागरो विनयान्वितः ॥ ८३ ॥

हे रामा, संपूर्ण जग निर्माण करताना, तुम्ही मला (जल) जड स्वरूपात निर्माण केले आहे आणि देवाने निर्माण केलेला स्वभाव बदलून टाकण्यास कोण बरे समर्थ आहे? (७१)

पाच स्थूल भूते ही स्वभावतःच जड आहेत. ती तुम्हीच उत्पन्न केली आहेत. तुमच्या आज्ञेचे उल्लंघन ती करीत नाहीत. (७२)

हे रामा, तामस अहंकारापासूनच ही जड भूते निर्माण होत असतात. कारणाला अनुसरून, त्या भूतांच्या ठिकाणी तमोरूप जडत्व स्वतःसिद्ध असते. (७३)

हे प्रभो, निर्गुण आणि निराकार असणारे तुम्ही जेव्हा लीलेने मायेच्या गुणांचा अंगीकार करता, तेव्हा तुमचे नाव वैराज असते. (७४)

त्या गुणयुक्त विराटातील सत्त्वगुणापासून देव उत्पन्न झाले, रजोगुणापासून प्रजापती इत्यादी उद्भूत झाले आणि तुमच्या तमोगुणात्मक क्रोधापासून भूतपती रुद्र निर्माण झाला आहे. (७५)

मायेने झाकला जाऊन लीलेने मनुष्यरूप धारण करणाऱ्या तुमच्या निर्गुण स्वरूपाला जड बुद्धी, अचेतन आणि मूर्ख असणारा मी कसा बरे जाणू शकेन ? हे प्रभो, ज्या प्रमाणे पशूंना योग्य मार्गावर आणण्यासाठी लाठी उपयोगी पडते, त्या प्रमाणे हे देवश्रेष्ठा, माझ्यासारख्या मूर्ख प्राण्यांना सन्मार्गावर नेणारा दंडच आहे. हे भक्तवत्सला, ईश्वरा, शरणगतांचे रक्षण करणाऱ्या तुम्हांला मी शरण आलो आहे. हे रामा, तुम्ही मला अभय द्या. मी तुम्हांला लंकेत जाण्यासाठी मार्ग देतो." (७६-७८)

**श्रीराम म्हणाले –** "माझा हा महान बाण अमोघ आहे. तेव्हा तो कोणत्या ठिकाणी सोडावा ? व्यर्थ न जाणाऱ्या बाणाला हे समुद्रा, तू चटदिशी एखादे लक्ष्य दाखव." (७९)

रामांचे वचन ऐकून आणि रामांच्या हातातील तो प्रचंड बाण पाहून तो महातेजस्वी महासागर राघवांना बोलला. (८०)

"हे रामा, माझ्या उत्तर प्रदेशी द्रुमकुल्य नावाचा एक प्रसिद्ध प्रदेश आहे. तेथे पापी मनाचे अनेक लोक राहातात. ते रात्रंदिवस मला त्रास देत असतात. हे रघुश्रेष्ठा, तेथे तुमचा बाण टाका." त्यानंतर रामांनी सोडलेला तो बाण एका क्षणात आभीर मंडळाचा वध करून, पुनः परत आला आणि पूर्वीप्रमाणे तो भात्यात येऊन राहिला. त्यानंतर सागर विनयपूर्वक रघुश्रेष्ठांना म्हणाला. (८१-८३)

नलः सेतुं करोत्वस्मिन् जले मे विश्वकर्मणः ।
सुतो धीमान् समर्थोऽस्मिन् कार्ये लब्धवरो हरिः ॥ ८४ ॥

"विश्वकर्म्याच्या नल नावाच्या पुत्राने माझ्या पाण्यात सेतू तयार करावा. वर प्राप्त झाल्यामुळे तो बुद्धिमान वानर हे काम करण्यास समर्थ आहे. (८४)

कीर्तिं जानन्तु ते लोकाः सर्वलोकमलापहाम् ।
इत्युक्त्वा राघवं नत्वा ययौ सिन्धुरदृश्यताम् ॥ ८५ ॥

तसे केल्यावर सर्व लोकांच्या पापाचे हरण करणारी तुमची कीर्ती सर्व लोकांना कळून येईल." असे सांगून, राघवांना नमस्कार करून, सागर अंतर्धान पावला. (८५)

ततो रामस्तु सुग्रीवलक्ष्मणाभ्यां समन्वितः ।
नलमाज्ञापयच्छीघ्रं वानरैः सेतुबन्धने ॥ ८६ ॥

त्यानंतर सुग्रीव आणि लक्ष्मण यांच्यासह रामांनी वानरांच्या मदतीने सेतू बांधण्याची आज्ञा नलाला दिली. (८६)

ततोऽतिहृष्टः प्लवगेन्द्रयूथपै-
र्महानगेन्द्रप्रतिमैर्युतो नलः ।
बबन्ध सेतुं शतयोजनायतं
सुविस्तृतं पर्वतपादपैर्दृढम् ॥ ८७ ॥

अतिशय आनंदित झालेल्या नलाने तेव्हा प्रचंड पर्वताप्रमाणे महान शरीर असणाऱ्या श्रेष्ठ वानरांच्या आणि वानर यूथपतींच्या साहाय्याने, पर्वत आणि वृक्ष यांचा वापर करून, शंभर योजने लांब, अतिविस्तृत आणि बळकट असा सेतू बांधला. (८७)

★

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

★

# चतुर्थ सर्ग

## समुद्रतरण, लंका निरीक्षण, आणि रावण व शुक यांचा संवाद

*श्रीमहादेव उवाच*

सेतुमारभमाणस्तु तत्र रामेश्वरं शिवम् ।
संस्थाप्य पूजयित्वाह रामो लोकहिताय च ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**–हे पार्वती, सेतू बांधण्याचा आरंभ करताना, रामेश्वर नावाच्या शिवलिंगाची स्थापना करून व त्याची पूजा करून, लोकांच्या हितासाठी राम म्हणाले. (१)

प्रणमेत्सेतुबन्धं यो दृष्ट्वा रामेश्वरं शिवम् ।
ब्रह्महत्यादिपापेभ्यो मुच्यते मदनुग्रहात् ॥ २ ॥

"रामेश्वर शिवाचे दर्शन घेऊन जो कोणी माणूस सेतुबंधाला प्रणाम करेल, तो माझ्या कृपेने ब्रह्महत्या इत्यादी पापांतून मुक्त होऊन जाईल. (२)

सेतुबन्धे नरः स्नात्वा दृष्ट्वा रामेश्वरं हरम् ।
सङ्कल्पनियतो भूत्वा गत्वा वाराणसीं नरः ॥ ३ ॥

आनीय गङ्गासलिलं रामेशमभिषिच्य च ।
समुद्रे क्षिप्ततद्भारो ब्रह्म प्राप्नोत्यसंशयम् ॥ ४ ॥

सेतुबंधाच्या ठिकाणी स्नान करून, रामेश्वर महादेवाचे दर्शन घेऊन, मग नियत संकल्प करून, वाराणसीला जाऊन, तेथून गंगा नदीचे पाणी आणून, त्या पाण्याने रामेश्वराला अभिषेक करून व उरलेले पाणी पात्रासह जो कोणी समुद्रामध्ये सोडील, तो निःसंशयपणे ब्रह्म प्राप्त करून घेईल." (३-४)

कृतानि प्रथमेनाह्ना योजनानि चतुर्दश ।
द्वितीयेन तथा चाह्ना योजनानि तु विंशतिः ॥ ५ ॥

तृतीयेन तथा चाह्ना योजनान्येकविंशतिः ।
चतुर्थेन तथा चाह्ना द्वाविंशतिरिति श्रुतम् ॥ ६ ॥

सेतू बांधताना नलाने पहिल्या दिवशी चौदा योजने, दुसऱ्या दिवशी वीस योजने, तिसऱ्या दिवशी एकवीस योजने, चौथ्या दिवशी बावीस योजने लांब सेतू बांधला, असे ऐकिवात आहे. (५-६)

पश्चिमेन त्रयोविंशद्योजनानि समन्ततः ।
बबन्ध सागरे सेतुं नलो वानरसत्तमः ॥ ७॥

पाचवे दिवशी नलाने तेवीस योजने सेतू बांधला. अशा प्रकारे त्या समुद्रात सगळीकडे वानरश्रेष्ठ नलाने सेतू बांधला. (७)

तैनेव जग्मुः कपयो योजनानां शतं द्रुतम् ।
असङ्ख्याताः सुवेलाद्रिं रुरुधुः प्लवगोत्तमाः ॥ ८॥

आणि त्या सेतूवरूनच असंख्य वानर त्वरेने शंभर योजने विस्तीर्ण असलेला सागर ओलांडून पलीकडे गेले आणि मग तेथे वानरश्रेष्ठांनी सुवेल (त्रिकूट) पर्वताला वेढा घातला. (८)

आरुह्य मारुतिं रामो लक्ष्मणोऽप्यङ्गदं तथा ।
दिदृक्षू राघवो लङ्कामारुरोहाचलं महत् ॥ ९॥

लंका पाहाण्याच्या इच्छेने श्रीराम मारुतीच्या खांद्यावर चढले आणि लक्ष्मण अंगदाच्या खांद्यावर चढला अशा प्रकारे ते दोघेही त्या महान पर्वतावर चढले. (९)

दृष्ट्वा लङ्कां सुविस्तीर्णां नानाचित्रध्वजाकुलाम् ।
चित्रप्रासादसम्बाधां स्वर्णप्राकारतोरणाम् ॥ १०॥

परिखाभिः शतघ्नीभिः सङ्क्रमैश्च विराजिताम् ।
प्रासादोपरि विस्तीर्णप्रदेशे दशकन्धरः ॥ ११॥

मन्त्रिभिः सहितो वीरैः किरीटदशकोज्ज्वलः ।
नीलाद्रिशिखराकारः कालमेघसमप्रभः ॥ १२॥

रत्नदण्डैः सितच्छत्रैरनेकैः परिशोभितः ।
एतस्मिन्नन्तरे बद्धो मुक्तो रामेण वै शुकः ॥ १३॥

वानरैस्ताडितः सम्यग् दशाननमुपागतः ।
प्रहसन् रावणः प्राह पीडितः किं परैः शुक ॥ १४॥

मग अतिशय विस्तीर्ण, नाना प्रकारच्या चित्रविचित्र ध्वजांनी भरलेली, एकमेकाजवळ असणाऱ्या चित्रविचित्र प्रासादांनी युक्त, सोन्याचे प्राकार आणि तोरणे असणारी, तसेच खंदक तोफा आणि पूल यांनी शोभायमान असणारी लंका त्यांनी पाहिली. राज-प्रासादाच्या वरील विस्तीर्ण भागावर वीर मंत्र्यांसह रावण बसलेला होता. दहा किरीटांनी तो तेजःपुंज दिसत होता. नील पर्वताच्या शिखराप्रमाणे त्याचा आकार होता. काळ्या मेघाप्रमाणे त्याची अंगकांती होती. रत्नजडित दंड असणाऱ्या अनेक पांढऱ्या छत्रांनी तो अतिशय शोभत होता. इतक्यात वानरांनी शुकाला भरपूर मारून बांधले होते. त्याला रामांनी मुक्त केले, तो रावणाजवळ आला. त्याला पाहून रावण हसत हसत म्हणाला, अरे शुका, तुला शत्रूंनी फार त्रास दिला काय?" (१०-१४)

रावणस्य वचः श्रुत्वा शुको वचनमब्रवीत् ।
सागरस्योत्तरे तीरेऽब्रवं ते वचनं यथा ।
तत उत्प्लुत्य कपयो गृहीत्वा मां क्षणात्ततः ॥ १५॥

मुष्टिभिर्नखदन्तैश्च हन्तुं लोप्तुं प्रचक्रमुः ।
ततो मां राम रक्षेति क्रोशन्तं रघुपुङ्गवः ॥ १६॥

विसृज्यतामिति प्राह विसृष्टोऽहं कपीश्वरैः ।
ततोऽहमागतो भीत्या दृष्ट्वा तद्वानरं बलम् ॥ १७॥

रावणाचे वचन ऐकल्यावर शुक म्हणाला, "सागराच्या उत्तर तीरावर जाऊन, मी तुमचा संदेश जसाच्या तसा सांगितला; तेव्हा एका क्षणात वानरांनी उंच उड्या मारल्या आणि मला पकडले आणि मग बुक्क्यांनी, नखांनी व दातांनी ते मला त्रास देऊ लागले. शेवटी मला ठार मारू लागले. "हे रामा, माझे रक्षण कर" असे मी ओरडू लागलो. तेव्हा "सोडा रे त्याला" असे राम म्हणाले. मग वानरश्रेष्ठांनी मला सोडले. ते वानर सैन्य पाहून भिऊन मी येथे आलो. (१५-१७)

राक्षसानां बलौघस्य वानरेन्द्रबलस्य च ।
नैतयोर्विद्यते सन्धिर्देवदानवयोरिव ॥ १८॥

ज्या प्रमाणे देव-दानवांत संधी होणे शक्य नाही त्याप्रमाणे राक्षस-सेना व वानर-सेना यामध्ये संधी होणे शक्य नाही, असे मला वाटते. (१८)

पुरप्राकारमायान्ति क्षिप्रमेकतरं कुरु ।
सीतां वास्मै प्रयच्छाशु युद्धं वा दीयतां प्रभो ॥ १९ ॥

तेव्हा हे प्रभो, लौकरच ते वानर आपल्या नगरीच्या तटावर येतील, आता तुम्ही दोनपैकी कोणतीही एक गोष्ट लगेच करा. एक सीता तरी त्या रामांना सत्वर देऊन टाका अथवा रामांबरोबर युद्धाला तयार व्हा. (१९)

मामाह रामस्त्वं ब्रूहि रावणं मद्वचः शुक ।
यद्बलं च समाश्रित्य सीतां मे हृतवानसि ॥ २० ॥

तद्दर्शय यथाकामं ससैन्यः सहबान्धवः ।
श्वःकाले नगरीं लङ्कां सप्राकारां सतोरणाम् ॥ २१ ॥

राक्षसं च बलं पश्य शरैर्विध्वंसितं मया ।
घोररोषमहं मोक्ष्ये बलं धारय रावण ॥ २२ ॥

राम मला म्हणाले, 'अरे शुका, तू रावणाला माझा निरोप सांग की ज्या सामर्थ्याचा आधार घेऊन, तू माझ्या सीतेचे अपहरण केले आहेस, ते सामर्थ्य आता तू तुझ्या इच्छेप्रमाणे सर्व सैन्य आणि सर्व बंधू यांच्यासह मला दाखव. उद्याच्या उद्याच प्राकार व तोरणे यांचेसह लंकापुरी आणि तुझे राक्षस सैन्य मी बाणांनी नष्ट केलेले तू पाहशील. अरे रावणा, मी माझ्या भयंकर क्रोधाचा तुझ्यावर प्रयोग करीन. तेव्हा तू आपले सामर्थ्य राखून ठेव.' (२०-२२)

इत्युक्त्वोपररामाथ रामः कमललोचनः ।
एकस्थानगता यत्र चत्वारः पुरुषर्षभाः ॥ २३ ॥

श्रीरामो लक्ष्मणश्चैव सुग्रीवश्च बिभीषणः ।
एत एव समर्थास्ते लङ्कां नाशयितुं प्रभो ॥ २४ ॥

उत्पाट्य भस्मीकरणे सर्वे तिष्ठन्तु वानराः ।
तस्य यादृग् बलं दृष्टं रूपं प्रहरणानि च ॥ २५ ॥

वधिष्यति पुरं सर्वमेकस्तिष्ठन्तु ते त्रयः ।
पश्य वानरसेनां तामसङ्ख्यातां प्रपूरिताम् ॥ २६ ॥

असे बोलून ते कमलनयन राम गप्प बसले. हे प्रभो, लंकेचा नाश करण्यास सर्व वानर तूर्त बाजूला राहू देत (कारण त्यांना फारसे महत्त्व नाही). श्रीराम, लक्ष्मण, सुग्रीव आणि बिभीषण हे चार पुरुषश्रेष्ठ एकाच स्थानी आले आहेत.ते चौघे लंकेला मुळासकट उपटून टाकून तिला भस्मसात् करण्यास अगदी समर्थ आहेत किंबहुना त्या रामांचे जे बळ, रूप आणि शस्त्रे मी पाहिली आहेत. त्यावरून कळून येते की ते लक्ष्मण, सुग्रीव आणि बिभीषण हे तिघेही जरी बाजूला राहिले तरी एकटे श्रीराम तुझे सर्व नगर नष्ट करून टाकतील. असंख्य वानरांनी भरलेली आणि सगळीकडे पसरलेली ही वानरांची सेना पाहा. (२३-२६)

गर्जन्ति वानरास्तत्र पश्य पर्वतसन्निभाः ।
न शक्यास्ते गणयितुं प्राधान्येन ब्रवीमि ते ॥ २७ ॥

पर्वताप्रमाणे आकार असणारे वानर तेथे गर्जना करीत आहेत, ते पाहा. त्या वानरांची मोजदाद करणेही शक्य नाही. तथापि त्यातील काही मुख्य वानरांबद्दल मी तुम्हांला सांगतो ऐक. (२७)

एष योऽभिमुखो लङ्कां नदंस्तिष्ठति वानरः ।
यूथपानां सहस्त्राणां शतेन परिवारितः ॥ २८ ॥

सुग्रीवसेनाधिपतिर्नीलो नामाग्निनन्दनः ।
एष पर्वतशृङ्गाभः पद्मकिञ्जल्कसन्निभः ॥ २९ ॥

स्फोटयत्यभिसंरब्धो लाङ्गूलं च पुनः पुनः ।
युवराजोऽङ्गदो नाम वालिपुत्रोऽतिवीर्यवान् ॥ ३० ॥

हा जो वानर लंकेकडे तोंड करून गर्जना करीत उभा आहे आणि जो शेकडो, हजारो वानर-सेनापतींच्या समवेत आहे, तो नील नावाचा अग्नीचा पुत्र असून, तो सुग्रीव सेनेचा मुख्य सेनापती आहे. आणि हा जो पर्वताच्या शिखराप्रमाणे विशाल देह असणारा, कमळाच्या केसरांप्रमाणे तेज असणारा, आणि जो रागाने वारंवार आपली शेपटी आपटत आहे, तो अतिशय सामर्थ्य-संपन्न असा अंगद नावाचा वालीचा पुत्र असून तो युवराज आहे . (२८-३०)

येन दृष्टा जनकजा रामस्यातीववल्लभा ।
हनूमानेष विख्यातो हतो येन तवात्मजः ॥ ३१ ॥

रामांना अतिशय प्रिय असणाऱ्या जनककन्या सीतेला ज्याने भेट दिली आणि ज्याने तुमच्या पुत्राला ठार केले तो हा प्रसिद्ध हनुमान आहे. (३१)

श्वेतो रजतसङ्काशो महाबुद्धिपराक्रमः ।
तूर्णं सुग्रीवमागम्य पुनर्गच्छति वानरः ॥ ३२ ॥

यस्त्वेष सिंहसङ्काशः पश्यत्यतुलविक्रमः ।
रम्भो नाम महासत्त्वो लङ्कां नाशयितुं क्षमः ॥ ३३ ॥

चांदीप्रमाणे शुभ्र वर्णाचा, महान बुद्धी व महान् पराक्रम असणारा असा जो सुग्रीवाकडे त्वरित जाऊन पुनः परत जात आहे, आणि जो सिंहाप्रमाणे अतुलनीय पराक्रम करणारा वानर इकडे पाहात आहे, तो रंभ नावाचा महासामर्थ्य असणारा वानर आहे. तो एकटाच लंकेचा नाश करण्यास समर्थ आहे. (३२-३३)

एष पश्यति वै लङ्कां दिधक्षन्निव वानरः ।
शरभो नाम राजेन्द्र कोटियूथपनायकः ॥ ३४ ॥

हे राजेंद्रा, लंकेला जणू जाळून टाकण्याच्या इच्छेने जो लंकेकडे पाहात आहे, तो शरभ नावाचा वानर कोटी वानर-सेनापतींचा नायक आहे. (३४)

पनसश्च महावीर्यो मैन्दश्च द्विविदस्तथा ।
नलश्च सेतुकर्तासौ विश्वकर्मसुतो बली ॥ ३५ ॥

महापराक्रमी पनस, मैंद, तसेच द्विविद आणि सेतू बांधणारा, बलवान असा विश्वकर्म्याचा पुत्र नल, असे अन्य मुख्य वानर आहेत. (३५)

वानराणां वर्णने वा सङ्ख्याने वा क ईश्वरः ।
शूराः सर्वे महाकायाः सर्वे युद्धाभिकाङ्क्षिणः ॥ ३६ ॥

या सर्व वानरांचे वर्णन करण्यास अथवा त्यांची गणती करण्यास कोण समर्थ आहे ? हे सर्व वानर शूर आणि धिप्पाड असून ते सर्वच युद्ध करण्यासाठी उत्सुक झालेले आहेत. (३६)

शक्ताः सर्वे चूर्णयितुं लङ्कां रक्षोगणैः सह ।
एतेषां बलसङ्ख्यानं प्रत्येकं वच्मि ते शृणु ॥ ३७ ॥

सर्व राक्षस-समूहांसह लंकेचा चुराडा करण्यास ते समर्थ आहेत. यांतील प्रत्येकाच्या हाताखाली असणाऱ्या सैन्याची संख्या मी तुला सांगतो ती तू ऐक. (३७)

एषां कोटिसहस्राणि नव पञ्च च सप्त च ।
तथा शङ्खसहस्राणि तथार्बुदशतानि च ॥ ३८ ॥

प्रत्येकाच्या नियंत्रणाखाली एकवीस हजार कोटी, हजारो शंख[१] , आणि शेकडो अर्बुद [२] सैन्य आहे. (३८)

सुग्रीवसचिवानां ते बलमेतत्प्रकीर्तितम् ।
अन्येषां तु बलं नाहं वक्तुं शक्तोऽस्मि रावण ॥ ३९ ॥

हे रावणा, हे मी तुला सुग्रीवाच्या मंत्र्यांचे सैन्य सांगितले आहे. याखेरीज इतरांचे सैन्य किती आहे, हे मी सांगू शकत नाही. (३९)

रामो न मानुषः साक्षादादिनारायणः परः ।
सीता साक्षाज्जगद्धेतुश्चिच्छक्तिर्जगदात्मिका ॥ ४० ॥

श्रीराम हे सामान्य माणूस नाहीत. ते साक्षात आदिनारायण परमात्मा आहेत आणि सीता ही जगाचे साक्षात कारण असणारी जगद्-रूपिणी चिच्छक्ती आहे. (४०)

ताभ्यामेव समुत्पन्नं जगत्स्थावरजङ्गमम् ।
तस्माद्रामश्च सीता च जगतस्तस्थुषश्च तौ ॥ ४१ ॥

पितरौ पृथिवीपाल तयोर्वैरी कथं भवेत् ।
अजानता त्वयानीता जगन्मातैव जानकी ॥ ४२ ॥

त्या दोघांचेपासूनच हे स्थावर जंगम विश्व उत्पन्न झाले आहे. म्हणून राम आणि सीता हे दोघे या जगाचे माता पिता आहेत. हे पृथिवी-पते, त्यांचा शत्रू असा कोण व कसा असू शकेल ? अजाणतेपणाने ज्या सीतेला तू पळवून आणले आहेस, ती जानकी जगन्माता आहे. (४१-४२)

---

१. एकावर तेरा शून्य देऊन होणारी संख्या म्हणजे शंख.

२. एक अर्बुद म्हणजे दहा कोटी.

क्षणनाशिनि संसारे शरीरे क्षणभङ्गुरे ।
पञ्चभूतात्मके राजंश्चतुर्विंशतितत्त्वके ॥ ४३ ॥

मलमांसास्थिदुर्गन्धभूयिष्ठेऽहंङ्कृतालये ।
कैवास्था व्यतिरिक्तस्य काये तव जडात्मके ॥ ४४ ॥

यत्कृते ब्रह्महत्यादिपातकानि कृतानि ते ।
भोगभोक्ता तु यो देहः स देहोऽत्र पतिष्यति ॥ ४५ ॥

पुण्यपापे समायातो जीवेन सुखदुःखयोः ।
कारणे देहयोगादिनात्मनः कुरुतोऽनिशम् ॥ ४६ ॥

यावद्देहोऽस्मि कर्तास्मीत्यात्माहंकुरुतेऽवशः ।
अध्यासात्तावदेव स्याज्जन्मनाशादिसम्भवः ॥ ४७ ॥

तस्मात्त्वं त्यज देहादावभिमानं महामते ।
आत्मातिनिर्मलः शुद्धो विज्ञानात्माचलोऽव्ययः ॥ ४८ ॥

स्वाज्ञानवशतो बन्धं प्रतिपद्य विमुह्यति ।
तस्मात्त्वं शुद्धभावेन ज्ञात्वात्मानं सदा स्मर ॥ ४९ ॥

विरतिं भज सर्वत्र पुत्रदारगृहादिषु ।
निरयेष्वपि भोगः स्याच्छ्ववशूकरतनावपि ॥ ५० ॥

देहं लब्ध्वा विवेकाढ्यं द्विजत्वं च विशेषतः ।
तत्रापि भारते वर्षे कर्मभूमौ सुदुर्लभम् ॥ ५१ ॥

को विद्वानात्मसात्कृत्वा देहं भोगानुगो भवेत् ।
अतस्त्वं ब्राह्मणो भूत्वा पौलस्त्यतनयश्च सन् ॥ ५२ ॥

अज्ञानीव सदा भोगाननुधावसि किं मुधा ।
इतः परं वा त्यक्त्वा त्वं सर्वसङ्गं समाश्रय ॥ ५३ ॥

राममेव परात्मानं भक्तिभावेन सर्वदा ।
सीतां समर्प्य रामाय तत्पादानुचरो भव ॥ ५४ ॥

हे राजन्, क्षणोक्षणी नष्ट होणाऱ्या या संसारात, शरीर हे क्षणभंगुर, पाच भूतांनी बनलेले आणि चोवीस [३] तत्त्वांचा समूह असणारे आहे. मल, मांस, अस्थी व दुर्गंधी पदार्थ यांचाच जास्त भरणा असणाऱ्या, अहंकाराचे आश्रय-स्थान, अचेतन आणि तुझ्या आत्म्यापेक्षा वेगळे असणाऱ्या अशा या शरीराची तू कसली आस्था बाळगीत आहेस ? (४३-४४)

ज्या देहासाठी तू ब्रह्महत्त्या इत्यादी पातके केली आहेस आणि जो देह भोग भोगणारा आहे, तो देह मरणोत्तर येथेच पडणार आहे. (४५)

सुख- दुःखांची कारणे असणारी पुण्य-पापे तर जीवाबरोबर येतात आणि देहाशी संबंध असल्यामुळे ही पुण्य-पापे रात्रंदिवस जीवात्म्याला सुख-दुःखे देत असतात. (४६)

जोपर्यंत अज्ञानामुळे उत्पन्न होणाऱ्या अध्यासामुळे 'मी देह आहे, मी कर्ता आहे' असा अभिमान आत्मा करतो, तोपर्यंत अध्यासामुळे त्याला जन्म, मरण, इत्यादी असहायपणे भोगावे लागतात. (४७)

म्हणून हे बुद्धिमान रावणा, तू देह इत्यादी वरील अभिमान सोडून दे. मुळात आत्मा हा अतिशय निर्मळ, शुद्ध, विज्ञान-स्वरूप, निश्चल आणि निर्विकार आहे. (४८)

परंतु आपल्या अज्ञानामुळे तो आत्मा जन्म-मरणादी बंधनांत पडून मोहित होतो. म्हणून तू शुद्ध भावाने आत्म्याला जाणून नेहमी त्याचे स्मरण ठेव. (४९)

पुत्र, पत्नी, घरदार इत्यादी सर्वांविषयी वैराग्य धारण कर. कारण कुत्रा, डुक्कर इत्यादी योनींमध्येसुद्धा तसेच नरकांतसुद्धा भोग हे मिळत असतातच. (५०)

खरे म्हणजे हा देह प्राप्त झाल्यावर, विशेषतः विवेकाने युक्त असे द्विजत्व प्राप्त झाल्यावर, तसेच कर्मभूमी असणाऱ्या या भारत वर्षात अतिशय दुर्लभ असा जन्म प्राप्त झाला असता, कोणता शहाणा माणूस देहाला आत्मा मानून भोगांच्या मागे लागेल ? तेव्हा तू स्वतः ब्राह्मण असून आणि त्यातही पुलस्त्यनंदन विश्रवा ऋषींचा पुत्र असतानासुद्धा, एखाद्या अज्ञानी माणसाप्रमाणे तू सदा भोगांच्या मागे फुकटच का लागला आहेस? यापुढे तरी सर्व आसक्तीचा त्याग करून,अत्यंत भक्तीने नेहमी परमात्म्या रामांचा आश्रय घे. त्यांना सीता अर्पण करून त्यांच्या पायांची सेवा करणारा सेवक बन. (५१-५४)

३. प्रकृती, बुद्धी, अहंकार, अकरा इंद्रिये, पाच भूते आणि त्यांचे पाच विषय या सर्वांना मिळून चोवीस तत्त्वे असे म्हटले जाते.

विमुक्तः सर्वपापेभ्यो विष्णुलोकं प्रयास्यसि ।
नो चेद्गमिष्यसेऽधोऽधः पुनरावृत्तिवर्जितः ।
अङ्गीकुरुष्व मद्वाक्यं हितमेव वदामि ते ॥ ५५ ॥

असे जर तू केलेस तर तू सर्व पापांतून मुक्त होऊन विष्णु-लोकाला जाशील आणि असे जर तू केले नाहीस तर तुला पुन्हा असे दुर्लभ मानव-शरीर मिळू शकणार नाही. तू उत्तरोत्तर अधोलोकांप्रत जाशील. मग तेथून पुनः वर येणे तुला शक्य होणार नाही. मी तुला हिताची गोष्ट सांगत आहे. या माझ्या बोलण्याचा तू स्वीकार कर. (५५)

सत्सङ्गतिं कुरु भजस्व हरिं शरण्यं
श्रीराघवं मरकतोपलकान्तिकान्तम् ।
सीतासमेतमनिशं धृतचापबाणं
सुग्रीवलक्ष्मणबिभीषणसेविताङ्घ्रिम् ॥ ५६ ॥

अरे रावणा, तू सतत सत्संगती कर. जे शरणागतांचे रक्षण करतात, मरकत-मण्याप्रमाणे ज्यांची अंगकांती सुंदर आहे, ज्यांच्या समवेत सीता आहे, जे धनुष्य व बाण धारण करतात, तसेच सुग्रीव, लक्ष्मण आणि बिभीषण हे ज्यांची चरणसेवा करतात, अशा त्या विष्णु-रूप श्रीराघवांची तू रात्रंदिवस भक्ती कर." (५६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

# पंचम सर्ग

## शुकाचे पूर्वचरित्र, माल्यवानाने रावणाला समजावणे आणि वानर व राक्षस यांचे युद्ध

*श्रीमहादेव उवाच*

श्रुत्वा शुकमुखोद्गीतं वाक्यमज्ञाननाशनम् ।
रावणः क्रोधताम्राक्षो दहन्निव तमब्रवीत् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, शुकाच्या मुखातून बाहेर पडलेले, अज्ञानाचा नाश करणारे ते वचन ऐकल्यावर, क्रोधाने जणू जळणारा आणि रागाने डोळे लाल झालेला रावण शुकाला म्हणाला. (१)

अनुजीव्य सुदुर्बुद्धे गुरुवद्भाषसे कथम् ।
शासिताहं त्रिजगतां त्वं मां शिक्षन्न लज्जसे ॥ २ ॥

"अतिशय दुष्ट बुद्धी असणाऱ्या हे शुका, माझ्या तुकड्यांवर वाढलेला तू माझा सेवक असून, एखाद्या गुरूप्रमाणे माझ्याशी कसे बोलतोस ? मी तिन्ही लोकांचे शासन करणारा आहे. मला उपदेश करताना तुला लाज कशी वाटत नाही ? (२)

इदानीमेव हन्मि त्वां किन्तु पूर्वकृतं तव ।
स्मरामि तेन रक्षामि त्वां यद्यपि वधोचितम् ॥ ३ ॥

खरे म्हणजे आत्ताच मी तुझा वध केला असता. तथापि तू पूर्वी माझ्यासाठी जे काही चांगले केले आहेस ते माझ्या लक्षात आहे. म्हणून जरी तू वध करण्यास योग्य आहेस, तरी मी तुला जीवदान देत आहे. (३)

इतो गच्छ विमूढ त्वमेवं श्रोतुं न मे क्षमम् ।
महाप्रसाद इत्युक्त्वा वेपमानो गृहं ययौ ॥ ४ ॥

अरे मूर्खा, तू आता येथून चालता हो. अशा प्रकारचे तुझे भाषण मला ऐकवत नाही." "तेव्हा आपली मोठी कृपा आहे," असे बोलून शुक हा भीतीने कापत कापत आपल्या घरी गेला. पूर्वजन्मी शुक हासुद्धा वेद जाणणारा आणि श्रेष्ठ ब्रह्मवेत्ता असा ब्राह्मण होता. तो वानप्रस्थाश्रमाच्या नियमांना धरून आपली धर्म-कर्मे करीत एका वनामध्ये राहात होता. (४-५)

शुकोऽपि ब्राह्मणः पूर्वं ब्रह्मिष्ठो ब्रह्मवित्तमः ।
वानप्रस्थविधानेन वने तिष्ठन् स्वकर्मकृत् ॥ ५ ॥

देवानामभिवृद्ध्यर्थं विनाशाय सुरद्विषाम् ।
चकार यज्ञविततिमविच्छिन्नां महामतिः ॥ ६ ॥

देवांच्या अभिवृद्धीसाठी आणि देवांचा द्वेष करणाऱ्या दैत्यांच्या नाशासाठी, त्या महाबुद्धिमान शुकाने अखंडितपणे अनेक यज्ञ केले होते. (६)

राक्षसानां विरोधोऽभूच्छुको देवहितोद्यतः ।
वज्रदंष्ट्र इति ख्यातस्तत्रैको राक्षसो महान् ॥ ७ ॥

देवांचे हित करण्यात तत्पर असणाऱ्या शुकाला राक्षसांचा विरोध होऊ लागला. त्या वेळी तेथे वज्रदंष्ट्र नावाचा एक प्रख्यात असा महान राक्षस होता. (७)

अन्तरं प्रेप्सुरातिष्ठच्छुकापकरणोद्यतः ।
कदाचिदागतोऽगस्त्यस्तस्याश्रमपदं मुनेः ॥ ८ ॥

शुकाचा अपकार करण्याकरता उत्सुक असणारा वज्रदंष्ट्र योग्य संधीची वाट पाहात थांबला होता. एकदा त्या शुक मुनीच्या आश्रमस्थानी अगस्त्य नावाचे ऋषी आले. (८)

तेन सम्पूजितोऽगस्त्यो भोजनार्थं निमन्त्रितः ।
गते स्नातुं मुनौ कुम्भसम्भवे प्राप्य चान्तरम् ॥ ९ ॥

अगस्त्यरूपधृक् सोऽपि राक्षसः शुकमब्रवीत् ।
यदि दास्यसि मे ब्रह्मन् भोजनं देहि सामिषम् ॥ १० ॥

शुकाने अगस्तींची पूजा केली आणि त्यांना भोजनासाठी आमंत्रण दिले. नंतर अगस्त्य स्नानासाठी गेले. ती संधी साधून, त्या राक्षसानेसुद्धा अगस्त्यांचे रूप धारण करून शुकाला म्हटले, "हे ब्राह्मणा, जर तू मला भोजन देणार असशील, तर मला मांसयुक्त भोजन दे. (९-१०)

बहुकालं न भुक्तं मे मांसं छागाङ्गसम्भवम् ।
तथेति कारयामास मांसभोज्यं सविस्तरम् ॥ ११ ॥

बरेच दिवस झाले मी बोकडाच्या शरीरांतील मांस खाल्लेले नाही." 'ठीक आहे' असे म्हणून शुकाने पुष्कळ मांसयुक्त पदार्थ तयार करवून घेतले. (११)

उपविष्टे मुनौ भोक्तुं राक्षसोऽतीव सुन्दरम् ।
शुकभार्यावपुर्धृत्वा तां चान्तर्मोहयन् खलः ॥ १२ ॥

नरमांसं ददौ तस्मै सुपक्वं बहुविस्तरम् ।
दत्त्वैवान्तर्दधे रक्षस्ततो दृष्ट्वा चुकोप सः ॥ १३ ॥

अमेध्यं मानुषं मांसमगस्त्यः शुकमब्रवीत् ।
अभक्ष्यं मानुषं मांसं दत्तवानसि दुर्मते ॥ १४ ॥

मह्यं त्वं राक्षसो भूत्वा तिष्ठ त्वं मानुषाशनः ।
इति शप्तः शुको भीत्या प्राहागस्त्यं मुने त्वया ॥ १५ ॥

इदानीं भाषितं मेऽद्य मांसं देहीति विस्तरम् ।
तथैव दत्तं भो देव किं मे शापं प्रदास्यसि ॥ १६ ॥

नंतर खरे अगस्त्य मुनी जेवावयास बसले असता, त्या दुष्ट राक्षसाने शुकाच्या पत्नीला आश्रमाच्या आतल्या बाजूला मूर्च्छित केले आणि त्या शुक पत्नीचे अतिशय सुंदर रूप धारण करून, चांगले शिजविलेले, नाना प्रकारचे नरमांसाचे पदार्थ त्याने अगस्त्यांना वाढले. ते पदार्थ वाढून तो राक्षस अंतर्धान पावला. आपल्यापुढे वाढलेले ते अपवित्र व अभक्ष्य माणसाचे मांस पाहून अगस्त्य अत्यंत क्रुद्ध झाले. ते शुकाला म्हणाले, "अरे दुष्ट बुद्धीच्या मुने, तू मला अभक्ष्य असे मानवाचे मांस दिले आहेस. म्हणून तू माणसांना खाणारा राक्षस होऊन राहा." अशा प्रकारे अगस्त्यांचा शाप मिळालेला शुक घाबरून जाऊन त्यांना म्हणाला, "हे मुनी, तुम्हीच मला आत्ता सांगितले होते की, आज मला नाना प्रकारचे मांस भोजनास दे. त्याप्रमाणे मी ते दिले आहे. तेव्हा हे देवा, तुम्ही मला का बरे शाप देत आहात?" (१२-१६)

श्रुत्वा शुकस्य वचनं मुहूर्तं ध्यानमास्थितः ।
ज्ञात्वा रक्षःकृतं सर्वं ततः प्राह शुकं सुधीः ॥ १७ ॥

शुकाचे वचन ऐकल्यावर महाबुद्धिमान अगस्त्यांनी थोडा वेळ ध्यान केले, तेव्हा त्यांना कळून आले की ते सर्व एका राक्षसाचे कृत्य होते. मग अतिशय बुद्धिवान अगस्त्य शुकाला म्हणाले . (१७)

तवापकारिणा सर्वं राक्षसेन कृतं त्विदम् ।
अविचार्यैव मे दत्तः शापस्ते मुनिसत्तम ॥ १८ ॥

"हे मुनिश्रेष्ठा, तुझ्यावर अपकार करू इच्छिणाऱ्या एका राक्षसाने हे सर्व केले आहे आणि मी विचार न करताच तुला शाप दिला. (१८)

तथापि मे वचोऽमोघमेवमेव भविष्यति ।
राक्षसं वपुरास्थाय रावणस्य सहायकृत् ॥ १९ ॥

तिष्ठ तावद्यदा रामो दशाननवधाय हि ।
आगमिष्यति लङ्कायाः समीपं वानरैः सह ॥ २० ॥

प्रेषितो रावणेन त्वं चारो भूत्वा रघूत्तमम् ।
दृष्ट्वा शापाद्विनिर्मुक्तो बोधयित्वा च रावणम् ॥ २१ ॥

तत्त्वज्ञानं ततो मुक्तः परं पदमवाप्स्यसि ।
इत्युक्तोऽगस्त्यमुनिना शुको ब्राह्मणसत्तमः ॥ २२ ॥

बभूव राक्षसः सद्यो रावणं प्राप्य संस्थितः ।
इदानीं चाररूपेण दृष्ट्वा रामं सहानुजम् ॥ २३ ॥

रावणं तत्त्वविज्ञानं बोधयित्वा पुनर्द्रुतम् ।
पूर्ववद्ब्राह्मणो भूत्वा स्थितो वैखानसैः सह ॥ २४ ॥

तरीसुद्धा माझे वचन खोटे ठरणार नाही. तेव्हा हे असेच होईल. राक्षसाचे शरीर धारण करून तू रावणाला साहाय्य करीत राहा. तसे तू करीत असताना श्रीराम रावणाच्या वधासाठी वानरांसह लंकेजवळ येतील. तत्पूर्वी रावणाने पाठविल्यामुळे त्याचा दूत होऊन जेव्हा तू रघूत्तमांना पाहाशील, तेव्हा तू शापातून मुक्त होशील. त्याच वेळी रावणाला तत्त्वज्ञानाचा उपदेश केल्यानंतर, तू मुक्त होऊन परम पद प्राप्त करून घेशील." अगस्त्य मुनींनी असे म्हटल्यावर, तो ब्राह्मणश्रेष्ठ शुक राक्षस झाला आणि लगेच रावणाकडे जाऊन तो त्याच्या आश्रयाने राहू लागला. आता या वेळी तो दूत रूपात असताना लक्ष्मणासह रामांचे दर्शन शुकाला झाले आणि रावणाला तत्त्वज्ञानाचा उपदेश केल्यावर, तो चट्दिशी पूर्वीप्रमाणे ब्राह्मण झाला आणि इतर वानप्रस्थी लोकांबरोबर राहू लागला. (१९-२४)

ततः समागमद्वृद्धो माल्यवान् राक्षसो महान् ।
बुद्धिमान्नीतिनिपुणो राज्ञो मातुः प्रियः पिता ॥ २५ ॥

नंतर इकडे रावणाच्या आईचा प्रिय पिता, बुद्धिमान, नीति-निपुण आणि वृद्ध असा माल्यवान नावाचा राक्षस रावणाजवळ आला. (२५)

प्राह तं राक्षसं वीरं प्रशान्तेनान्तरात्मना ।
शृणु राजन्वचो मेऽद्य श्रुत्वा कुरु यथेप्सितम् ॥ २६ ॥

राक्षस वीर रावणाला तो अतिशय शांत चित्ताने म्हणाला, "हे राजा, तू माझे म्हणणे अतिशय शांत चित्ताने ऐकून घे आणि मग तुझी जशी इच्छा असेल तसे तू कर. (२६)

यदा प्रविष्टा नगरीं जानकी रामवल्लभा ।
तदादि पुर्यां दृश्यन्ते निमित्तानि दशानन ॥ २७ ॥

घोराणि नाशहेतूनि तानि मे वदतः शृणु ।
खरस्तनितनिर्घोषा मेघा अतिभयङ्कराः ॥ २८ ॥

शोणितेनाभिवर्षन्ति लङ्कामुष्णेन सर्वदा ।
रुदन्ति देवलिङ्गानि स्विद्यन्ति प्रचलन्ति च ॥ २९ ॥

हे रावणा, जेव्हापासून रामांची पत्नी जानकी या नगरीत प्रविष्ट झाली आहे, तेव्हापासून नगरीत जे भयंकर व नाशाचे कारण असणारे शकुन दिसू लागले आहेत, ते मी सांगतो ऐक. अत्यंत भयानक मेघ विजेच्या कडकडाटांसह गर्जना करीत आहेत आणि ते सर्वकाळ लंकेवर गरम रक्ताची वृष्टी करीत आहेत. देवतांच्या मूर्ती रडत आहेत. त्या घामेजून जात आहेत आणि आपल्या जागेवरून हलत आहेत. (२७-२९)

कालिका पाण्डुरैर्दन्तैः प्रहसत्यग्रतः स्थिता ।
खरा गोषु प्रजायन्ते मूषका नकुलैः सह ॥ ३० ॥

मार्जारेण तु युध्यन्ति पन्नगा गरुडेन तु ।
करालो विकटो मुण्डः पुरुषः कृष्णपिङ्गलः ॥ ३१ ॥

कालो गृहाणि सर्वेषां काले काले त्ववेक्षते ।
एतान्यन्यानि दृश्यन्ते निमित्तान्युद्भवन्ति च ॥ ३२ ॥

अतः कुलस्य रक्षार्थं शान्तिं कुरु दशानन ।
सीतां सत्कृत्य सधनां रामायाशु प्रयच्छ भोः ॥ ३३ ॥

रामं नारायणं विद्धि विद्वेषं त्यज राघवे ।
यत्पादपोतमाश्रित्य ज्ञानिनो भवसागरम् ॥ ३४ ॥

तरन्ति भक्तिपूतान्तास्ततो रामो न मानुषः ।
भजस्व भक्तिभावेन रामं सर्वहृदालयम् ॥ ३५ ॥

यद्यपि त्वं दुराचारो भक्त्या पूतो भविष्यसि ।
मद्वाक्यं कुरु राजेन्द्र कुलकौशलहेतवे ॥ ३६ ॥

तत्तु माल्यवतो वाक्यं हितमुक्तं दशाननः ।
न मर्षयति दुष्टात्मा कालस्य वशमागतः ॥ ३७ ॥

मानवं कृपणं राममेकं शाखामृगाश्रयम् ।
समर्थं मन्यसे केन हीनं पित्रा मुनिप्रियम् ॥ ३८ ॥

रामेण प्रेषितो नूनं भाषसे त्वमनर्गलम् ।
गच्छ वृद्धोऽसि बन्धुस्त्वं सोढं सर्वं त्वयोदितम् ॥ ३९ ॥

इतो मत्कर्णपदवीं दहत्येतद्वचस्तव ।
इत्युक्त्वा सर्वसचिवैः सहितः प्रस्थितस्तदा ॥ ४० ॥

प्रासादाग्रे समासीनः पश्यन्वानरसैनिकान् ।
युद्धायायोजयत्सर्वराक्षसान्समुपस्थितान् ॥ ४१ ॥

कालिका देवी ही राक्षसांच्या पुढे उभी राहून आपले पांढरे दात विचकीत भेसूर हसते. गाईच्या पोटी गाढव जन्म घेत आहेत. उंदीर हे मुंगुस व मांजरे यांच्याबरोबर, आणि साप हे गरुडाबरोबर युद्ध करीत आहेत. एक भयानक विक्राळ , मुंडन केलेला, काळसर पिंगट रंगाचा, पुरुषाचा आकार धारण केलेला असा काल पुरुष वेळोवेळी सर्व राक्षसांच्या घरांमध्ये डोकावून पाहात आहे. अशा प्रकारचे तसेच अन्य काही अपशकुन निर्माण होत आहेत आणि ते दिसून येत आहेत. (३०-३२)

म्हणून हे रावणा, कुळाच्या रक्षणासाठी शांती कर. अरे रावणा, सीतेचा सत्कार करून तिला द्रव्यासह ताबडतोब रामांना परत देऊन टाक. (३३)

श्रीराम हे प्रत्यक्ष नारायण आहेत, हे तू जाणून घे. राघवांच्या बाबतीतील तुझा द्वेषभाव सोडून दे. ज्या अर्थी या रघुनाथांच्या चरणरूपी नावेचा आधार घेऊन भक्तीमुळे पवित्र अंत:करण झालेले ज्ञानीजन भवसागर पार करून जातात, त्या अर्थी ते श्रीराम हे कोणी सामान्य माणूस नाहीत. म्हणून सर्वांच्या हृदयांत वास करणाऱ्या श्रीरामांचे तू भक्तिभावाने भजन कर. (३४-३५)

जरी तू दुराचारी असलास, तरी रामांच्या भक्तीने तू पवित्र होशील. तेव्हा हे राजेंद्रा, आपल्या कुळाचे कुशल व्हावे, या हेतूने तू माझे वचन मान्य कर." (३६)

तथापि माल्यवानाने सांगितले ते हितकारक बोलणे दशाननाला सहन झाले नाही; कारण तो दुष्ट मनाचा राक्षस काळाच्या अधीन झाला होता. (३७)

(रावण म्हणाला,) "ज्याने वानरांचा आधार घेतला आहे, ज्याला बापाने टाकले आहे, जो मुनिजनांना प्रिय आहे, अशा एकट्या दीन मानव रामाला, हे माल्यवाना, तू कोणत्या कारणाने इतका समर्थ समजत आहेस? (३८)

मला वाटते, रामाने तुला माझ्याकडे पाठविले आहे, म्हणून तू असे निरर्गल बोलत आहेस. जा, जा, तू वृद्ध आहेस आणि माझा नातेवाईक आहेस. म्हणून तू बोललेले सर्व काही मी सहन केले आहे. (३९)

खरे तर इकडे हे तुझे वचन माझ्या कानांना जाळत आहे." असे बोलून, सर्व सचिवांसह रावण तेव्हा तेथून निघून गेला. (४०)

नंतर आपल्या राज-प्रासादाच्या गच्चीवर बसून, वानर सैनिकांना पाहात आपल्याजवळ उपस्थित असणाऱ्या सर्व राक्षसांना त्याने युद्धासाठी सज्ज होण्याची आज्ञा केली. (४१)

रामोऽपि धनुरादाय लक्ष्मणेन समाहृतम् ।
दृष्ट्वा रावणमासीनं कोपेन कलुषीकृतः ॥ ४२ ॥

किरीटिनं समासीनं मन्त्रिभिः परिवेष्टितम् ।
शशाङ्कार्धनिभेनैव बाणेनैकेन राघवः ॥ ४३ ॥

श्वेतच्छत्रसहस्राणि किरीटदशकं तथा ।
चिच्छेद निमिषार्धेन तदद्भुतमिवाभवत् ॥ ४४ ॥

लज्जितो रावणस्तूर्णं विवेश भवनं स्वकम् ।
आहूय राक्षसान् सर्वान्प्रहस्तप्रमुखान् खलः ॥ ४५ ॥

वानरैः सह युद्धाय नोदयामास सत्वरः ।
ततो भेरीमृदङ्गाद्यैः पणवानकगोमुखैः ॥ ४६ ॥

महिषोष्ट्रैः खरैः सिंहैर्द्वीपिभिः कृतवाहनाः ।
खड्गशूलधनुःपाशयष्टितोमरशक्तिभिः ॥ ४७ ॥

लक्षिताः सर्वतो लङ्कां प्रतिद्वारमुपाययुः ।
तत्पूर्वमेव रामेण नोदिता वानरर्षभाः ॥ ४८ ॥

उद्यम्य गिरिशृङ्गाणि शिखराणि महान्ति च ।
तरूंश्चोत्पाट्य विविधान्युद्धाय हरियूथपाः ॥ ४९ ॥

प्रेक्षमाणा रावणस्य तान्यनीकानि भागशः ।
राघवप्रियकामार्थं लङ्कामारुरुहुस्तदा ॥ ५० ॥

ते द्रुमैः पर्वताग्रैश्च मुष्टिभिश्च प्लवङ्गमाः ।
ततः सहस्त्रयूथाश्च कोटियूथाश्च यूथपाः ॥ ५१ ॥

कोटीशतयुताश्चान्ये रुरुधुर्नगरं भृशम् ।
आप्लवन्तः प्लवन्तश्च गर्जन्तश्च प्लवङ्गमाः ॥ ५२ ॥

रामो जयत्यतिबलो लक्ष्मणश्च महाबलः ।
राजा जयति सुग्रीवो राघवेणानुपालितः ॥ ५३ ॥

इत्येवं घोषयन्तश्च समं युयुधिरेऽरिभिः ।
हनूमानङ्गदश्चैव कुमुदो नील एव च ॥ ५४ ॥

नलश्च शरभश्चैव मैन्दो द्विविद एव च ।
जाम्बवान्दधिवक्त्रश्च केसरी तार एव च ॥ ५५ ॥

गच्चीवर बसलेल्या रावणाला पाहून, क्रोधाने क्षुब्ध झालेल्या रामांनीसुद्धा लक्ष्मणाने आणून दिलेले धनुष्य हातात घेतले. (४२)

मंत्र्यांनी सर्व बाजूंनी वेढलेला असा रावण मस्तकावर मुकुट धारण करून बसलेला होता. त्या वेळी अर्ध चंद्राप्रमाणे आकार आणि तेज असणाऱ्या एका बाणाने रामांनी अर्ध्या निमिषात हजारो शुभ्र छत्रे तसेच रावणाचे दहा किरीट तोडून टाकले. ते एखाद्या अद्‌भुत गोष्टीप्रमाणे झाले. (४३-४४)

तेव्हा लज्जित झालेला रावण चट्‌दिशी उठून स्वतःच्या महालात निघून गेला. त्यानंतर प्रहस्तादी सर्व राक्षसांना बोलावून, त्यांना त्या दुष्टाने वानरांबरोबर सत्वर युद्ध सुरू करण्याची आज्ञा केली. तेव्हा भेरी, मृदुंग, पणव, आनक, गोमुख इत्यादी वाद्यांच्या गजरात, रेडे, उंट, गाढवे, सिंह, वाघ, हत्ती इत्यादी वाहनांवर आरूढ होऊन, खड्ग, शूल, धनुष्य, पाश, सोटे, तोमर आणि शक्ती अशी आयुधे घेऊन, ते सर्व राक्षस सर्व बाजूंनी लंकेच्या प्रत्येक प्रवेशद्वाराजवळ गेले. तत्पूर्वीच श्रीरामांनी वानरश्रेष्ठांना युद्धाला निघण्याची आज्ञा दिली होती . (४५-४८)

त्यानुसार पर्वतांची शिखरे, मोठमोठे शिलाखंड, आणि नाना प्रकारचे वृक्ष उपटून घेऊन, ते वानर सेनापती युद्धासाठी निघाले होते. रावणाच्या अनेक तुकड्या तुकड्यांनी येणाऱ्या सैन्याला पाहून, रामांचे प्रिय कार्य करण्याच्या इच्छेने त्या वानरांनी लंकेवर चाल केली. (४९-५०)

काही वानरांनी हातात वृक्ष आणि पर्वत शिखरे घेतली होती. तर काहींनी मुठी वळवून ठेवल्या होत्या. त्यातील काही वानर हे हजार वानरांचा समूह, काही कोटी समूह, काही शतकोटी वानरांचा समूह यांचे सेनापती होते. वर- खाली उड्या मारीत व गर्जना करीत त्या वानरांनी सर्व लंका नगरीला संपूर्ण वेढा घातला. (५१-५२)

'अतिशय बलवान अशा रामांचा विजय असो; महाबलवान लक्ष्मणाचा विजय असो; आणि राघवाने रक्षिलेल्या सुग्रीवाचा विजय असो', अशा घोषणा करीत ते वानर शत्रूंबरोबर लढू लागले. हनुमान, अंगद, कुमुद, नील, नल, शरभ, मैंद, द्विविद, जांबवान, दधिमुख, केसरी, तार तसेच अन्य सर्व बलवान वानर आणि सेनापती यांनी लंकेच्या सर्व द्वारांवर उड्या

अन्ये च बलिनः सर्वे यूथपाश्च प्लवङ्गमाः ।
द्वाराण्युत्प्लुत्य लङ्कायाः सर्वतो रुरुधुर्भृशम् ।
तदा वृक्षैर्महाकायाः पर्वताग्रैश्च वानराः ॥ ५६ ॥

निजघ्नुस्तानि रक्षांसि नखैर्दन्तैश्च वेगिताः ।
राक्षसाश्च तदा भीमा द्वारेभ्यः सर्वतो रुषा ॥ ५७ ॥

निर्गत्य भिन्दिपालैश्च खड्गैः शूलैः परश्वधैः ।
निजघ्नुर्वानरानीकं महाकाया महाबलाः ॥ ५८ ॥

राक्षसांश्च तथा जघ्नुर्वानरा जितकाशिनः ।
तदा बभूव समरो मांसशोणितकर्दमः ॥ ५९ ॥

रक्षसां वानराणां च सम्बभूवाद्भुतोपमः ।
ते हयैश्च गजैश्चैव रथैः काञ्चनसन्निभैः ॥ ६० ॥

रक्षोव्याघ्रा युयुधिरे नादयन्तो दिशो दश ।
राक्षसाश्च कपीन्द्राश्च परस्परजयैषिणः ॥ ६१ ॥

राक्षसान्वानरा जघ्नुर्वानरांश्चैव राक्षसाः ।
रामेण विष्णुना दृष्टा हरयो दिविजांशजाः ॥ ६२ ॥

बभूवुर्बलिनो हृष्टास्तदा पीतामृता इव ।
सीताभिमर्शपापेन रावणेनाभिपालितान् ॥ ६३ ॥

हतश्रीकान्हतबलान् राक्षसान् जघ्नुरोजसा ।
चतुर्थांशावशेषेण निहतं राक्षसं बलम् ॥ ६४ ॥

स्वसैन्यं निहतं दृष्ट्वा मेघनादोऽथ दुष्टधीः ।
ब्रह्मदत्तवरः श्रीमानन्तर्धानं गतोऽसुरः ॥ ६५ ॥

सर्वास्त्रकुशलो व्योम्नि ब्रह्मास्त्रेण समन्ततः ।
नानाविधानि शस्त्राणि वानरानीकमर्दयन् ॥ ६६ ॥

ववर्ष शरजालानि तदद्भुतमिवाभवत् ।
रामोऽपि मानयन्ब्राह्ममस्त्रमस्त्रविदां वरः ॥ ६७ ॥

क्षणं तूष्णीमुवासाथ ददर्श पतितं बलम् ।
वानराणां रघुश्रेष्ठश्चुकोपानलसन्निभः ॥ ६८ ॥

मारल्या. त्यांनी सर्व बाजूंनी लंकेला वेढून टाकले. त्या वेळी प्रचंड देहाच्या वानरांनी वृक्ष, पर्वतांची शिखरे, नखे आणि दात यांच्या द्वारा राक्षसांवर प्रहार करण्यास प्रारंभ केला. तेव्हा लंकेच्या सर्व दारांतून वेगाने बाहेर पडून भयंकर राक्षसांनी रागारागाने गोफणी, खड्ग, शूल,परशू यांचे द्वारा वानर सैन्यावर प्रहार केले. उलट प्रचंड शरीर असणाऱ्या, महाबलवान आणि जयशील वानरांनी राक्षसांवर हल्ला केला. अशा प्रकारे तेव्हा राक्षस आणि वानर यांच्यामध्ये ज्याला अद्भुत म्हणता येईल, असे युद्ध झाले आणि त्यात मांस आणि रक्त यांचा चिखल झाला. गर्जनांनी दाही दिशा निनादून टाकीत, ते राक्षस-श्रेष्ठ घोडे, हत्ती यांवर बसून आणि सोन्यासारख्या तेजस्वी रथांत बसून युद्ध करीत होते. त्यावेळी राक्षस तसेच वानरश्रेष्ठ हे परस्परांवर विजय मिळवू इच्छित होते. (५३-६१)

वानर राक्षसांना मारीत होते, तर राक्षस वानरांना मारीत होते. देवांच्या अंशापासून उत्पन्न झालेले ते वानर विष्णुरूपी रामांची दृष्टी पडल्याने अतिशय बलवान झाले होते आणि जणू अमृताचे पान केल्याप्रमाणे ते आनंदित झाले होते. सीतेचे हरण करताना तिला स्पर्श केल्यामुळे ज्याला पाप लागले होते, अशा रावणाकडून पालन केल्या गेलेल्या, निस्तेज आणि बलहीन झालेल्या राक्षसांना ते वानर आपल्या पराक्रमाने ठार करत होते. हळू हळू राक्षसांचे बहुतेक सैन्य नष्ट झाले; फक्त त्या सैन्याचा चौथा भाग शिल्लक राहिला. (६२-६४)

आपले सैन्य ठार केले जात आहे, हे पाहिल्यानंतर, ब्रह्मदेवांनी ज्याला वर दिला होता, जो वीरश्रीने संपन्न होता, असा मेघनाद नावाचा दुष्टबुद्धी राक्षस युद्धभूमीवरून अंतर्धान पावला. (६५)

तो सर्व प्रकारची अस्त्रे चालविण्यात कुशल होता. आकाशात जाऊन ब्रह्मास्त्राच्या द्वारा वानर सैन्याला पीडा देत, तो सर्व बाजूंनी नाना प्रकारची शस्त्रे आणि बाणांची जाळी यांचा वर्षाव करू लागला. ते एखाद्या अद्भुत गोष्टीप्रमाणे झाले. त्या वेळी अस्त्रवेत्त्यांमध्ये श्रेष्ठ असे श्रीरामसुद्धा ब्रह्मास्त्राला मान देण्यासाठी क्षणभर स्वस्थ राहिले. जेव्हा ब्रह्मास्त्रामुळे वानरांचे सैन्य मरत आहे हे रघुश्रेष्ठांनी पाहिले तेव्हा ते रागाने अग्नीप्रमाणे लाल झाले. (६६-६८)

चापमानय सौमित्रे ब्रह्मास्त्रेणासुरं क्षणात् ।
भस्मीकरोमि मे पश्य बलमद्य रघूत्तम ॥ ६९ ॥

ते म्हणाले, "हे लक्ष्मणा, माझे धनुष्य आण. माझ्या ब्रह्मास्त्राने मी या राक्षसाला क्षणात भस्मसात करून टाकतो. हे रघूत्तम लक्ष्मणा, तू आज माझे सामर्थ्य पाहा." (६९)

मेघनादोऽपि तच्छ्रुत्वा रामवाक्यमतन्द्रितः ।
तूर्णं जगाम नगरं मायया मायिकोऽसुरः ॥ ७० ॥

ते रामांचे वचन ऐकल्यावर, मेघनादसुद्धा सावध झाला आणि तो कपटी असुर मायेने चटदिशी लंका नगरीत निघून गेला. (७०)

पतितं वानरानीकं दृष्ट्वा रामोऽतिदुःखितः ।
उवाच मारुतिं शीघ्रं गत्वा क्षीरमहोदधिम् ॥ ७१ ॥

तत्र द्रोणगिरिर्नाम दिव्यौषधिसमुद्भवः ।
तमानय द्रुतं गत्वा सञ्जीवय महामते ॥ ७२ ॥

वानरौघान्महासत्त्वान्कीर्तिस्ते सुस्थिरा भवेत् ।
आज्ञा प्रमाणमित्युक्त्वा जगामानिलनन्दनः ॥ ७३ ॥

वानरांचे सैन्य मरून पडलेले पाहून, अतिशय दुःखी होऊन, श्रीराम मारुतीला म्हणाले, "तू त्वरित क्षीरसागराकडे जा. तेथे अनेक दिव्य औषधी ज्याच्यावर उत्पन्न झाल्या आहेत असा द्रोणगिरी नावाचा पर्वत आहे. पटकन जाऊन तो पर्वत तू घेऊन ये आणि हे महाबुद्धिमंता, या महासामर्थ्यसंपन्न वानरसमूहांना तू जिवंत कर. असे केल्याने तुझी कीर्ती कायमची राहील." "तुमची आज्ञा प्रमाण." असे बोलून वायुपुत्र मारुती तेथून निघून गेला. (७१-७३)

आनीय च गिरिं सर्वान्वानरान्वानरर्षभः ।
जीवयित्वा पुनस्तत्र स्थापयित्वाययौ द्रुतम् ॥ ७४ ॥

द्रोणगिरी पर्वत आणून, सर्व वानरांना जिवंत करून, पुनः पूर्ववत तो पर्वत जागच्या जागी ठेवून, वानरश्रेष्ठ मारुती त्वरेने परत आला. (७४)

पूर्ववद्भैरवं नादं वानराणां बलौघतः ।
श्रुत्वा विस्मयमापन्नो रावणो वाक्यमब्रवीत् ॥ ७५ ॥

पुनः पूर्वीप्रमाणेच वानरांच्या सैन्यसमूहातून येऊ लागलेला भयानक नाद ऐकून, विस्मयचकित झालेला रावण म्हणाला, (७५)

राघवो मे महान् शत्रुः प्राप्तो देवविनिर्मितः ।
हन्तुं तं समरे शीघ्रं गछन्तु मम यूथपाः ॥ ७६ ॥

"देवांनी निर्माण केलेला माझा मोठा शत्रू, राघव येथे आला आहे. त्याला युद्धात ठार करण्यास माझ्या सेनापतींनी शीघ्र कूच करावे. (७६)

मन्त्रिणो बान्धवाः शूरा ये च मत्प्रियकाङ्क्षिणः ।
सर्वे गच्छन्तु युद्धाय त्वरितं मम शासनात् ॥ ७७ ॥

तसेच जे कोणी माझे मंत्री, बांधव असतील, आणि जे कोणी माझे प्रिय करू इच्छिणारे शूरवीर असतील, त्या सर्वांनी माझी आज्ञा मान्य करून युद्ध करण्यास त्वरित जावे. (७७)

ये न गच्छन्ति युद्धाय भीरवः प्राणविप्लवात् ।
तान्हनिष्याम्यहं सर्वान्मच्छासनपराङ्मुखान् ॥ ७८ ॥

जे कोणी भित्रे राक्षस भीतीने युद्ध करण्यास जाणार नाहीत, त्या माझी आज्ञा मोडणाऱ्या सर्वांना मी ठार करीन." (७८)

तच्छ्रुत्वा भयसन्त्रस्ता निर्जग्मू रणकोविदाः ।
अतिकायः प्रहस्तश्च महानादमहोदरौ ॥ ७९ ॥

देवशत्रुर्निकुम्भश्च देवान्तकनरान्तकौ ।
अपरे बलिनः सर्वे ययुर्युद्धाय वानरैः ॥ ८० ॥

ते रावणाचे वचन ऐकल्यावर, भीतीने त्रस्त झालेले, युद्धनिपुण राक्षस युद्ध करण्यास बाहेर पडले. अतिकाय, प्रहस्त, महानाद, महोदर, देवशत्रू, निकुंभ, देवांतक व नरांतक तसेच अन्य सर्व बलवान राक्षस वानरांबरोबर युद्ध करण्यास निघाले. (७९-८०)

एते चान्ये च बहवः शूराः शतसहस्रशः ।
प्रविश्य वानरं सैन्यं ममन्थुर्बलदर्पिताः ॥ ८१ ॥

हे राक्षस तसेच इतर पुष्कळ शूर आणि बलाने उन्मत्त झालेले शेकडो- हजारो राक्षस वानर-सैन्यात घुसून वानरांचा नाश करू लागले. (८१)

भुशुण्डीभिन्दिपालैश्च बाणैः खड्गैः परश्वधैः ।
अन्यैश्च विविधैरस्त्रैर्निजघ्नुर्हरियूथपान् ॥ ८२ ॥

भुशुंडी, गोफणी, बाण, खड्गे, परशू, तसेच अन्य विविध अस्त्रे यांच्या द्वारा वानर-सेनापतींना ते मारू लागले. (८२)

े पादपैः पर्वताग्रैर्नखदंष्ट्रैश्च मुष्टिभिः ।
ाणैर्विमोचयामासुः सर्वराक्षसयूथपान् ॥ ८३ ॥

तर वृक्ष, पर्वत शिखरे, नखे, दात, बुक्क्या यांच्या द्वारा ते वानर सर्व राक्षस नायकांना ठार करू लागले. (८३)

मेण निहताः केचित्सुग्रीवेण तथापरे ।
ूमता चाङ्गदेन लक्ष्मणेन महात्मना ।
ूथपैर्वानराणां ते निहताः सर्वराक्षसाः ॥ ८४ ॥

काही राक्षसांना रामांनी ठार केले. काहींना सुग्रीवाने मारून टाकले, तर इतर राक्षसांना हनुमान, अंगद आणि महात्मा लक्ष्मण यांनी ठार केले. इतर काही राक्षसांना वानरसेनापतींनी ठार केले. अशा प्रकारे ते सर्व राक्षस मारले गेले. (८४)

मतेजः समाविश्य वानरा बलिनोऽभवन् ।
मशक्तिविहीनानामेवं शक्तिः कुतो भवेत् ॥ ८५ ॥

रामांचे तेज अंगात भरल्याने ते वानर अतिशय बलिष्ठ झाले होते. रामाच्या शक्तीने रहित असणाऱ्या प्राण्यांच्या ठिकाणी असली शक्ती कोठून बरे असणार? (८५)

र्वेश्वरः सर्वमयो विधाता
मायामनुष्यत्वविडम्बनेन ।
दा चिदानन्दमयोऽपि रामो
युद्धादिलीलां वितनोति मायाम् ॥ ८६ ॥

जरी राम हे सदा सर्वांचा ईश्वर, सर्वमय, सर्वांचे विधाते आणि नेहमी चिदानंदमय आहेत, तरीसुद्धा मायेमुळे मनुष्याप्रमाणे आचरण करीत, आपली युद्ध इत्यादी लीला करीत ते आपल्या मायेचा विस्तार करीत असतात. (८६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

# षष्ठ सर्ग

## लक्ष्मणाची मूर्च्छा, राम-रावण-युद्ध, हनुमंताने औषधी आणणे आणि रावण-कालनेमि-संवाद

*श्रीमहादेव उवाच*

ुत्वा युद्धे बलं नष्टमतिकायमुखं महत् ।
ावणो दुःखसन्तप्तः क्रोधेन महतावृतः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, अतिकायादिकांचे आपले मोठे सैन्य युद्धात नष्ट झाले आहे, हे ऐकल्यावर, रावण दुःखाने संतप्त झाला आणि अतिशय क्रुद्ध झाला. (१)

ाायेन्द्रजितं लङ्कारक्षणार्थं महाद्युतिः ।
यं जगाम युद्धाय रामेण सह राक्षसः ॥ २ ॥

मग लंकेच्या रक्षणासाठी इंद्रजिताला ठेवून, तो महातेजस्वी रावण रामांबरोबर युद्ध करण्यास स्वतःच निघाला. (२)

ंयं स्यन्दनमारुह्य सर्वशस्त्रास्त्रसंयुतम् ।
मेवाभिदुद्राव राक्षसेन्द्रो महाबलः ॥ ३ ॥

सर्व शस्त्रे आणि अस्त्रे यांनी सुसज्ज केलेल्या एका दिव्य रथावर आरूढ होऊन, महाबली राक्षसराज रावण रामांवरच चाल करून गेला. (३)

वानरान्बहुशो हत्वा बाणैराशीविषोपमैः ।
पातयामास सुग्रीवप्रमुखान्यूथनायकान् ॥ ४ ॥

सर्पाप्रमाणे असणाऱ्या बाणांनी पुष्कळ वानरांना मारून, रावणाने सुग्रीवादी सेनानायकांना जमिनीवर पाडले. (४)

गदापाणिं महासत्त्वं तत्र दृष्ट्वा बिभीषणम् ।
उत्ससर्ज महाशक्तिं मयदत्तां बिभीषणे ॥ ५ ॥

तेथे हातात गदा घेतलेल्या महापराक्रमी बिभीषणाला पाहून, रावणाने मय राक्षसाने दिलेली महाशक्ती बिभीषणावर सोडली. (५)

तामापतन्तीमालोक्य बिभीषणविघातिनीम् ।
दत्ताऽभयोऽयं रामेण वधार्हो नायमासुरः ॥ ६ ॥

इत्युक्त्वा लक्ष्मणो भीमं चापमादाय वीर्यवान् ।
बिभीषणस्य पुरतः स्थितोऽकम्प इवाचलः ॥ ७ ॥

बिभीषणाचा नाश करण्यास पुढे पुढे येणारी ती शक्ती पाहिल्यावर, 'त्याला रामांनी अभय दिले आहे. हा बिभीषण वध होण्यास योग्य नाही,' असे म्हणून महावीर्यशाली लक्ष्मण आपले भयंकर धनुष्य घेऊन, बिभीषणाच्या पुढे एखाद्या पर्वताप्रमाणे स्थिर उभा राहिला. (६-७)

सा शक्तिर्लक्ष्मणतनुं विवेशामोघशक्तितः ।
यावन्त्यः शक्तयो लोके मायायाः सम्भवन्ति हि ॥ ८ ॥

तासामाधारभूतस्य लक्ष्मणस्य महात्मनः ।
मायाशक्त्या भवेत्किं वा शेषांशस्य हरेस्तनोः ॥ ९ ॥

अमोघ सामर्थ्य असल्यामुळे ती महाशक्ती लक्ष्मणाच्या शरीरात घुसली. या जगात मायेपासून उत्पन्न झालेल्या जितक्या शक्ती आहेत, त्या सर्वांचा आधारभूत विष्णू आहे; आणि शेषाचा अंशावतार असणारा महात्मा लक्ष्मण हा तर विष्णुस्वरूपच होता; त्यामुळे त्या मायाशक्तीचे लक्ष्मणापुढे काय चालणार ? (८-९)

तथापि मानुषं भावमापन्नस्तदनुव्रतः ।
मूर्च्छितः पतितो भूमौ तमादातुं दशाननः ॥ १० ॥

हस्तैस्तोलयितुं शक्तो न बभूवातिविस्मितः ।
सर्वस्य जगतः सारं विराजं परमेश्वरम् ॥ ११ ॥

कथं लोकाश्रयं विष्णुं तोलयेल्लघुराक्षसः ।
ग्रहीतुकामं सौमित्रिं रावणं वीक्ष्य मारुतिः ॥ १२ ॥

आजघानोरसि क्रुद्धो वज्रकल्पेन मुष्टिना ।
तेन मुष्टिप्रहारेण जानुभ्यामपतद्भुवि ॥ १३ ॥

तथापि या वेळी मनुष्य-भावाचा अंगीकार करून लक्ष्मण मनुष्य स्वरूपास अनुसरून वागला आणि म्हणून तो मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. तेव्हा पकडण्यासाठी गेलेला रावण त्याला आपल्या हातांनी उचलू शकला नाही. त्याला अतिशय विस्मय वाटला. सर्व जगाचे सार, लोकांचा आधार, विराट, परमेश्वर अशा विष्णूला एक फडतूस राक्षस कसा बरे उचलू शकेल ? सुमित्रा-पुत्र लक्ष्मणाला घेऊन जाऊ इच्छिणाऱ्या रावणाला पाहून, क्रुद्ध झालेल्या मारुतीने वज्राप्रमाणे कठीण असणाऱ्या आपल्या मुष्टीने त्याच्या छातीवर प्रहार केला. त्या मुष्टीच्या प्रहाराने रावण गुडघ्यावर खाली जमिनीवर आदळला. (१०-१३)

आस्यैश्च नेत्रश्रवणैरुद्वमन् रुधिरं बहु ।
विघूर्णमाननयनो रथोपस्थ उपाविशत् ॥ १४ ॥

आणि आपली तोंडे, डोळे आणि कान यांतून पुष्कळ रक्त ओकत आणि गरागरा डोळे फिरवीत तो आपल्या रथाच्या मागील भागात जाऊन बसला. (१४)

अथ लक्ष्मणमादाय हनुमान् रावणार्दितम् ।
आनयद्रामसामीप्यं बाहुभ्यां परिगृह्य तम् ॥ १५ ॥

त्यानंतर रावणाकडून घायाळ झालेल्या लक्ष्मणाला आपल्या दोन बाहूंनी उचलून घेऊन, हनुमंताने रामांजवळ आणले. (१५)

हनूमतः सुहृत्त्वेन भक्त्या च परमेश्वरः ।
लघुत्वमगमद्देवो गुरूणां गुरुरप्यजः ॥ १६ ॥

जन्मरहित, प्रकाशरूप असा परमेश्वर हा जरी जड पदार्थांपेक्षा अधिक जड होता, तरी तो हनुमंताच्या प्रेमामुळे व भक्तीमुळे अगदी हलका झाला होता. (१६)

सा शक्तिरपि तं त्यक्त्वा ज्ञात्वा नारायणांशजम्।
रावणस्य रथं प्रागाद्रावणोऽपि शनैस्ततः ॥ १७॥

संज्ञामवाप्य जग्राह बाणासनमथो रुषा ।
राममेवाभिदुद्राव दृष्ट्वा रामोऽपि तं क्रुधा ॥ १८॥

आरुह्य जगतां नाथो हनूमन्तं महाबलम् ।
रथस्थं रावणं दृष्ट्वा अभिदुद्राव राघवः ॥ १९॥

ज्याशब्दमकरोत्तीव्रं वज्रनिष्पेषनिष्ठुरम् ।
रामो गम्भीरया वाचा राक्षसेन्द्रमुवाच ह ॥ २०॥

राक्षसाधम तिष्ठाद्य क्व गमिष्यसि मे पुरः ।
कृत्वापराधमेवं मे सर्वत्र समदर्शिनः ॥२१॥

येन बाणेन निहता राक्षसास्ते जनालये ।
तेनैव त्वां हनिष्यामि तिष्ठाद्य मम गोचरे ॥ २२॥

श्रीरामस्य वचः श्रुत्वा रावणो मारुतात्मजम् ।
वहन्तं राघवं सङ्ख्ये शरैस्तीक्ष्णैरताडयत् ॥ २३॥

हतस्यापि शरैस्तीक्ष्णैर्वायुसूनोः स्वतेजसा ।
व्यवर्धत पुनस्तेजो ननर्द च महाकपिः ॥ २४॥

ततो दृष्ट्वा हनूमन्तं सव्रणं रघुसत्तमः ।
क्रोधमाहारयामास कालरुद्र इवापरः ॥ २५॥

साश्वं रथं ध्वजं सूतं शस्त्रौघं धनुरञ्जसा ।
छत्रं पताकां तरसा चिच्छेद शितसायकैः ॥ २६॥

ततो महाशरेणाशु रावणं रघुसत्तमः ।
विव्याध वज्रकल्पेन पाकारिरिव पर्वतम् ॥ २७॥

रामबाणहतो वीरश्चचाल च मुमोह च ।
हस्तान्निपतितश्चापस्तं समीक्ष्य रघूत्तमः ॥ २८॥

लक्ष्मण नारायणाचा अंश म्हणून उत्पन्न झाला आहे हे जाणून, आणि मग त्याला सोडून देऊन, ती शक्ती रावणाच्या रथाकडे परत गेली. त्यानंतर इकडे रावणसुद्धा हळूहळू शुद्धीवर आला. लगेच त्याने रागाने धनुष्य घेतले आणि पुनः रामांवरच चाल केली. त्याला पाहून रामसुद्धा क्रुद्ध झाले. मग रथात बसून येणाऱ्या रावणाला पाहून, जगाचा नाथ असलेले राघव महाबळी हनुमंताच्या खांद्यावर चढून रावणाकडे धावले. (१७-१९)

वज्रालासुद्धा चूर्ण करू शकेल असा आपल्या प्रत्यंचेचा अतिशय तीव्र आणि कठोर शब्द रामांनी केला. आणि मग गंभीर वाणीने राम राक्षसराज रावणाला म्हणाले. (२०)

"अरे अधम राक्षसा, थांब.सर्वत्र समदर्शी असणाऱ्या माझा अशा प्रकारे अपराध करून, आता तू माझ्या समोरून कुठे बरे जाऊ शकशील ? (२१)

आता तू असाच माझ्यापुढे उभा राहा. जनस्थानात ज्या बाणाने मी तुझ्या त्या खर इत्यादी राक्षसांना ठार केले होते, त्याच बाणाने आज मी तुला ठार करणार आहे. (२२)

श्रीरामांचे वचन ऐकल्यावर, राघवांना खांद्यावरून वाहून नेणाऱ्या मारुतीवर रावणाने तीक्ष्ण बाणांनी प्रहार केले . (२३)

त्या तीक्ष्ण बाणांचे प्रहार झाले तरी वायुसुत मारुतीचे तेज रामांच्या तेजामुळे पुन्हा वाढतच गेले आणि तो महान वानर गर्जना करू लागला. (२४)

त्यानंतर जखमी झालेल्या हनुमंताला पाहिल्यावर, दुसऱ्या कालरुद्राप्रमाणे दिसणाऱ्या रघुश्रेष्ठ रामांना भयंकर क्रोध आला. (२५)

आणि आपल्या तीक्ष्ण बाणांनी रामांनी सहजपणे रावणाचे घोड्यांसह रथ, ध्वज, सारथी, शस्त्रसमूह, धनुष्य, छत्र आणि पताका हे सर्व तोडून टाकले. (२६)

नंतर इंद्राने ज्या प्रमाणे आपल्या वज्राने पर्वतांना विद्ध केले होते, त्याप्रमाणे रघुश्रेष्ठ रामांनी वज्राप्रमाणे असणाऱ्या एका महान बाणाने रावणाला त्वरित विद्ध केले . (२७)

रामांच्या बाणाने घायाळ झालेला तो वीर रावण कापू लागला, त्याला मूर्च्छा आली आणि त्याच्या हातातून धनुष्य गळून पडले. तेव्हा त्या स्थितीतील रावणाला पाहून रघूत्तमांनी एका अर्धचंद्राकार बाणाने त्याचा सूर्याप्रमाणे

अर्धचन्द्रेण चिच्छेद तत्किरीटं रविप्रभम् ।
अनुजानामि गच्छ त्वमिदानीं बाणपीडित: ॥ २९ ॥

तेजस्वी असणारा मुकुट तोडून टाकला व म्हटले "हे रावणा, तू आता माझ्या बाणाने घायाळ झाला आहेस. तेव्हा तू आता परत जा. माझी तुला अनुज्ञा आहे. (२८-२९)

प्रविश्य लङ्कामाश्वास्य श्व: पश्यसि बलं मम ।
रामबाणेन संविद्धो हतदर्पोऽथ रावण: ॥ ३० ॥

महत्या लज्जया युक्तो लङ्कां प्राविशदातुर: ।
रामोऽपि लक्ष्मणं दृष्ट्वा मूर्च्छितं पतितं भुवि ॥ ३१ ॥

मानुषत्वमुपाश्रित्य लीलयानुशुशोच ह ।
तत: प्राह हनूमन्तं वत्स जीवय लक्ष्मणम् ॥ ३२ ॥

महौषधी: समानीय पूर्ववद्वानरानपि ।
तथेति राघवेणोक्तो जगामाशु महाकपि: ॥ ३३ ॥

हनूमान्वायुवेगेन क्षणात्तीर्त्वा महोदधिम् ।
एतस्मिन्नन्तरे चारा रावणाय न्यवेदयन् ॥ ३४ ॥

लंकेत प्रवेश करून विश्रांती घे. मग उद्या तू पुन: माझे सामर्थ्य पाहाशील." त्यानंतर रामांच्या बाणाने विद्ध झालेला, ताठा नष्ट होऊन, व्याकूळ झालेला, रावण अतिशय लज्जित होऊन लंकेत आला. इकडे मूर्च्छित होऊन पडलेल्या लक्ष्मणाला पाहून, रामसुद्धा मनुष्य-स्वभावाचा आश्रय घेऊन लीलेने शोक करू लागले. त्यानंतर ते हनूमंताला म्हणाले, "वत्सा, पूर्वीप्रमाणेच (द्रोणगिरी पर्वतावरून) महौषधी आणून या लक्ष्मणाला तसेच अन्य वानरांनासुद्धा तू जिवंत कर." राघवांचे वचनानंतर 'ठीक आहे', असे म्हणून एका क्षणात महासागर ओलांडून हनुमान वायुवेगाने निघून गेला. दरम्यानच्या काळात, गुप्तहेरांनी रावणाला सांगितले की, (३०-३४)

रामेण प्रेषितो देव हनूमान् क्षीरसागरम् ।
गतो नेतुं लक्ष्मणस्य जीवनार्थं महौषधी: ॥ ३५ ॥

"महाराज, लक्ष्मणाला जिवंत करण्यास महौषधी आणण्यासाठी रामांनी पाठविलेला हनुमान क्षीरसमुद्राकडे गेला आहे." (३५)

श्रुत्वा तच्चारवचनं राजा चिन्तापरोऽभवत् ।
जगाम रात्रावेकाकी कालनेमिगृहं क्षणात् ॥ ३६ ॥

ते गुप्तहेरांचे वचन ऐकल्यावर, राजा रावण अतिशय चिंतातुर झाला. मग त्याच रात्री एका क्षणात तो एकटाच कालनेमीच्या घरी गेला. (३६)

गृहागतं समालोक्य रावणं विस्मयान्वित: ।
कालनेमिरुवाचेदं प्राञ्जलिर्भयविह्वल: ।
अर्घ्यादिकं तत: कृत्वा रावणस्याग्रत: स्थित: ॥ ३७ ॥

आपल्या घरी आलेल्या रावणाला पाहून कालनेमी आश्चर्यचकित झाला. मग त्याला अर्घ्य इत्यादी देऊन, रावणाच्यापुढे हात जोडून उभे राहून, भयाने विव्हळ झालेला कालनेमी म्हणाला. (३७)

किं ते करोमि राजेन्द्र किमागमनकारणम् ।
कालनेमिमुवाचेदं रावणो दु:खपीडित: ॥ ३८ ॥

"हे राजेंद्रा, तुमच्या आगमनाचे कारण काय ? मी तुमची काय सेवा करू ?" तेव्हा दु:खी झालेला रावण कालनेमीला म्हणाला, (३८)

ममापि कालवशत: कष्टमेतदुपस्थितम् ।
मया शक्त्या हतो वीरो लक्ष्मण: पतितो भुवि ॥ ३९ ॥

कालवशेकरून माझ्यावरसुद्धा संकट कोसळले आहे. माझ्या शक्तीचा प्रहार झालेला तो वीर लक्ष्मण जमिनीवर पडलेला आहे. (३९)

तं जीवयितुमानेतुमोषधीर्हनुमान् गत: ।
यथा तस्य भवेद्विघ्नस्तथा कुरु महामते ॥ ४० ॥

आता त्याला जिवंत करण्यासाठी म्हणून औषधी आणण्यास हनुमान गेला आहे. तेव्हा हे महाबुद्धिमंता, असे काही तरी करा की ज्यामुळे त्याच्या कार्यात विघ्न येईल. (४०)

मायया मुनिवेषेण मोहयस्व महाकपिम् ।
कालात्ययो यथा भूयात्तथा कृत्वैहि मन्दिरे ॥ ४१ ॥

कपटाने मुनीचा वेष धारण करून त्या महावानराला तू मोहित कर. ज्यामुळे औषधीच्या प्रयोगाचा काळ निघून जाईल, असे काही तरी करून तू मग परत ये." (४१)

रावणस्य वच: श्रुत्वा कालनेमिरुवाच तम् ।
रावणेश वचो मेऽद्य श्रृणु धारय तत्त्वत: ॥ ४२ ॥

रावणाचे वचन ऐकून कालनेमी त्याला म्हणाला, "हे रावण महाराज, आता तुम्ही माझे वचन ऐका आणि ते खरे आहे असे समजून ध्यानी घ्या. (४२)

प्रियं ते करवाण्येव न प्राणान् धारयाम्यहम् ।
मारीचस्य यथारण्ये पुराभून्मृगरूपिण: ॥ ४३ ॥

तथैव मे न सन्देहो भविष्यति दशानन ।
हता: पुत्राश्च पौत्राश्च बान्धवा राक्षसाश्च ते ॥ ४४ ॥

मी तुमचे प्रिय करीनच. त्यासाठी मी माझ्या प्राणांचीसुद्धा पर्वा करणार नाही. पण त्यामुळे काय होणार? हे रावणा, पूर्वी दंडकारण्यात मृगाचे रूप धारण केलेल्या मारीचाची जशी अवस्था झाली होती, तशीच माझीसुद्धा अवस्था होणार यात संशय नाही. आणखी असे पाहा. तुमचे पुत्र, पौत्र, बांधव आणि अन्य राक्षस आत्तापर्यंत मारले गेले आहेत. (४३-४४)

घातयित्वासुरकुलं जीवितेनापि किं तव ।
राज्येन वा सीतया वा किं देहेन जडात्मना ॥ ४५ ॥

अशा प्रकारे राक्षसांच्या कुळाचा नाश करवून, तुमच्या जगण्याचा काय उपयोग आहे ? किंवा राज्य, सीता अथवा जडस्वरूप देह यांचा तुम्हांला काय उपयोग होणार आहे? (४५)

सीतां प्रयच्छ रामाय राज्यं देहि बिभीषणे ।
वनं याहि महाबाहो रम्यं मुनिगणाश्रयम् ॥ ४६ ॥

त्यापेक्षा हे महाबाहो, सीता श्रीरामांना परत देऊन टाका. बिभीषणाला राज्य द्या. मुनि-समूहांचा आश्रय असणाऱ्या रम्य अशा तपोवनात तुम्ही जा. (४६)

स्नात्वा प्रात:शुभजले कृत्वा सन्ध्यादिका:क्रिया: ।
तत एकान्तमाश्रित्य सुखासनपरिग्रह: ॥ ४७ ॥

विसृज्य सर्वत: सङ्गमितरान्विषयान्बहि: ।
बहि:प्रवृत्ताक्षगणं शनै: प्रत्यक् प्रवाहय ॥ ४८ ॥

तेथे प्रात:काळी निर्मल पाण्यात स्नान करून, संध्या इत्यादी नित्य कर्मे करून, नंतर एकांत स्थानी तुम्ही सुखासनावर बसा. सर्व प्रकारे आसक्ती सोडून, अन्य विषयांना मनात प्रवेश न देता बाहेरच ठेवून, बाहेर प्रवृत्त होणाऱ्या इंद्रियांच्या समूहाला तुम्ही हळूहळू आत वळवून घ्या. (४७- ४८)

प्रकृतेर्भिन्नमात्मानं विचारय सदानघ ।
चराचरं जगत्कृत्स्नं देहबुद्धीन्द्रियादिकम् ॥ ४९ ॥

आब्रह्मस्तम्बपर्यन्तं दृश्यते श्रूयते च यत् ।
सैषा प्रकृतिरित्युक्ता सैव मायेति कीर्तिता ॥ ५० ॥

हे निष्पाप रावणा, प्रकृतीपेक्षा आत्मा भिन्न आहे, असा नेहमी विचार करा. ब्रह्मदेवांपासून ते सूक्ष्म कीटकापर्यंत देह, बुद्धी, इंद्रिये इत्यादी सर्व स्थावर जंगमात्मक असे जे जग पाहिले जाते व ऐकले जाते, त्या सर्वाला प्रकृती असे म्हटले जाते आणि त्या प्रकृतीलाच माया असेही म्हटले जाते. (४९-५०)

सर्गस्थितिविनाशानां जगद्वृक्षस्य कारणम् ।
लोहितश्वेतकृष्णादिप्रजा: सृजति सर्वदा ॥ ५१ ॥

जगरूपी वृक्षाची उत्पत्ती, स्थिती आणि विनाश यांचे कारण असणारी ही प्रकृती सात्त्विक, राजस,तामस इत्यादी प्रकारची प्रजा नेहमी उत्पन्न करते. (५१)

कामक्रोधादिपुत्राद्यान्हिंसातृष्णादिकन्यका: ।
मोहयत्यनिशं देवमात्मानं स्वैर्गुणैर्विभुम् ॥ ५२ ॥

तसेच ती काम, क्रोध इत्यादी पुत्र आणि हिंसा, तृष्णा इत्यादी कन्या निर्माण करते आणि ती माया स्वत:च्या गुणांनी सर्वव्यापक अशा आत्मदेवाला रात्रंदिवस मोहित करते . (५२)

नजस्व रामं परिपूर्णमेकं
विहाय वैरं निजभक्तियुक्तः ।
ृदा सदा भावितभावरूप-
मनामरूपं पुरुषं पुराणम् ॥ ६३ ॥

तुम्ही रामांबरोबरचे वैर सोडून द्या आणि त्यांच्यावरील स्वतःच्या भक्तीने युक्त व्हा. मग परिपूर्ण, अद्वितीय, नामरूपरहित, पुराण पुरुष अशा त्या रामांच्या सगुण रूपाची आपल्या हृदयात भावना करून त्यांना भजत राहा." (६३)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

# सप्तम सर्ग

## कालनेमीचे कपट, हनुमानाकडून त्याचा वध, लक्ष्मण जिवंत होणे आणि रावणाने कुंभकर्णास जागे करणे

*श्रीमहादेव उवाच*

ालनेमिवचः श्रुत्वा रावणोऽमृतसन्निभम् ।
नज्वाल क्रोधताम्राक्षः सर्पिरद्भिरिवाग्निमत् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, तापलेल्या तुपात पाणी पडल्यास जसे तडतडते, त्याप्रमाणे कालनेमीचे अमृततुल्य वचन ऐकल्यावर, रागाने डोळे लाल झालेला रावण जळफळू लागला. (१)

नेहन्मि त्वां दुरात्मानं मच्छासनपराङ्मुखम् ।
रैः किञ्चिद्गृहीत्वा त्वं भाषसे रामकिंकरः ॥ २ ॥

(तो म्हणाला,) "माझ्या आज्ञेच्या विरुद्ध वागणाऱ्या, दुष्टात्म्या, तुला मी आत्ताच ठार करीन. मला वाटते की शत्रूकडून काही तरी लाच घेऊन, रामाचा सेवक होऊन, तू अशा प्रकारे बोलत आहेस." (२)

ालनेमिरुवाचेदं रावणं देव किं क्रुधा ।
ा रोचते मे वचनं यदि गत्वा करोमि तत् ॥ ३ ॥

तेव्हा कालनेमी रावणाला म्हणाला, "महाराज, रागावून काय उपयोग आहे ? जर तुम्हांला माझे वचन आवडले नसेल तर मी जाऊन, तुम्ही सांगाल ते करीन."(३)

त्युक्त्वा प्रययौ शीघ्रं कालनेमिर्महासुरः ।
ोदितो रावणेनैव हनूमद्विघ्नकारणात् ॥ ४ ॥

असे सांगून, रावणाने पाठवलेला तो महासुर कालनेमी हनुमानाच्या कार्यात विघ्न आणण्याच्या हेतूने त्वरित तेथून निघाला. (४)

ा गत्वा हिमवत्पार्श्वं तपोवनमकल्पयत् ।
त्र शिष्यैः परिवृतो मुनिवेषधरः खलः ॥ ५ ॥

ाच्छतो मार्गमासाद्य वायुसूनोर्महात्मनः ।
तो गत्वा ददर्शाथ हनूमानाश्रमं शुभम् ॥ ६ ॥

हिमालय पर्वताच्या एका बाजूवर जाऊन वायुपुत्र महात्म्या हनुमानाचा जाण्याचा मार्ग लक्षात घेऊन, त्याच्या वाटेत त्याने एक तपोवन तयार केले आणि तो दुष्ट राक्षस मुनीचा वेष धारण करून तेथे बसला. सभोवती शिष्य होते. तेथून जात असताना वाटेत हनुमानाला तो सुंदर आश्रम दिसून आला. (५-६)

चन्तयामास मनसा श्रीमान्पवननन्दनः ।
रा न दृष्टमेतन्मे मुनिमण्डलमुत्तमम् ॥ ७ ॥

श्रीमान पवनसुत हनुमान मनात विचार करू लागला- 'हे उत्तम असे आश्रमस्थान मला पूर्वी दिसले नव्हते. (७)

ार्गो विभ्रंशितो वा मे भ्रमो वा चित्तसम्भवः ।
द्वाविश्याश्रमपदं दृष्ट्वा मुनिमशेषतः ॥ ८ ॥

माझा मार्ग चुकला की काय ? की माझ्या मनांत काही भ्रम निर्माण झाला आहे ? हे कळत नाही. या आश्रमस्थानात प्रवेश करून, मुनींचे दर्शन घेऊन, आणि

पीत्वा जलं ततो यामि द्रोणाचलमनुत्तमम् ।
इत्युक्त्वा प्रविवेशाथ सर्वतो योजनायतम् ॥ ९ ॥

आश्रमं कदलीशालखर्जूरपनसादिभिः ।
समावृतं पक्कफलैर्नम्रशाखैश्च पादपैः ॥ १० ॥

वैरभावविनिर्मुक्तं शुद्धं निर्मललक्षणम् ।
तस्मिन्महाश्रमे रम्ये कालनेमिः स राक्षसः ॥ ११ ॥

इन्द्रयोगं समास्थाय चकार शिवपूजनम् ।
हनूमानभिवाद्याह गौरवेण महासुरम् ॥ १२ ॥

भगवन् रामदूतोऽहं हनूमान्नाम नामतः ।
रामकार्येण महता क्षीराब्धिं गन्तुमुद्यतः ॥ १३ ॥

तृषा मां बाधते ब्रह्मन्नुदकं कुत्र विद्यते ।
यथेच्छं पातुमिच्छामि कथ्यतां मे मुनीश्वर ॥ १४ ॥

तच्छ्रुत्वा मारुतेर्वाक्यं कालनेमिस्तमब्रवीत् ।
कमण्डलुगतं तोयं मम त्वं पातुमर्हसि ॥ १५ ॥

भुङ्क्ष्व चेमानि पक्कानि फलानि तदनन्तरम् ।
निवसस्व सुखेनात्र निद्रामेहि त्वरास्तु मा ॥ १६ ॥

भूतं भव्यं भविष्यं च जानामि तपसा स्वयम् ।
उत्थितो लक्ष्मणः सर्वे वानरा रामवीक्षिताः ॥ १७ ॥

तच्छ्रुत्वा हनुमानाह कमण्डलुजलेन मे ।
न शाम्यत्यधिका तृष्णा ततो दर्शय मे जलम् ॥ १८ ॥

तथेत्याज्ञापयामास बटुं मायाविकल्पितम् ।
बटो दर्शय विस्तीर्णं वायुसूनोर्जलाशयम् ॥ १९ ॥

निमील्य चाक्षिणी तोयं पीत्वागच्छ ममान्तिकम् ।
उपदेक्ष्यामि ते मन्त्रं येन द्रक्ष्यसि चौषधीः ॥ २० ॥

पाणी पिऊन मग मी अतिशय उत्तम अशा द्रोण पर्वताकडे जाईन.' असा विचार करून त्याने त्या आश्रमात प्रवेश केला. तो आश्रम लांबी रूंदीच्या सर्व बाजूंनी एक योजन विस्तृत होता. केळी, सागवान, खजूर, फणस इत्यादी पिकलेल्या फळांनी ज्यांच्या फांद्या वाकलेल्या होत्या, अशा वृक्षांनी तो संपन्न होता. (८-१०)

तो आश्रम वैर-भावनेने रहित असून पवित्र व निर्मळ होता. त्या रम्य अशा मोठ्या आश्रमात तो कालनेमि राक्षस इंद्रजाल विद्येचा आश्रय घेऊन शिवाचे पूजन करीत होता. हनुमानाने त्या महाराक्षसाला आदरपूर्वक वंदन केले आणि म्हटले. (११-१२)

" हे भगवन, हनुमान नावाचा मी रामांचा दूत आहे. रामांचे एक महान कार्य करण्यास मी क्षीरसागराकडे जाण्यास निघालो आहे. (१३)

हे ब्रह्मन्, तहानेने मी व्याकूळ झालो आहे. यथेच्छ पाणी पिण्याची माझी इच्छा आहे. हे मुनीश्वरा, मला सांग की पाणी कुठे आहे ?" (१४)

मारुतीचे हे वाक्य ऐकल्यावर कालनेमी त्याला म्हणाला, "माझ्या कमंडलूतील पाणी पिण्यास हरकत नाही. (१५)

त्यानंतर ही पिकलेली फळे तू खा. येथे सुखाने राहा. थोडीशी झोप घे. फार घाई करू नकोस. (१६)

माझ्या स्वतःच्या तपोबलाने मी भूत, वर्तमान आणि भविष्य सर्व काही जाणतो आणि आता मला कळले आहे की लक्ष्मण हा सावध होऊन उठला आहे आणि रामाच्या दृष्टिक्षेपामुळे सर्व वानरही जिवंत झाले आहेत." (१७)

ते ऐकून हनुमान म्हणाला, "मला फार तहान लागली आहे. ती कमंडलूतील पाण्याने शांत होणार नाही. तेव्हा तू मला जलाशय दाखव." (१८)

"ठीक आहे," असे म्हणून मायेने निर्माण केलेल्या बटूला कालनेमीने आज्ञा केली, 'अरे बटू,या वायुपुत्राला विस्तीर्ण जलाशय दाखव." (१९)

(मग कालनेमी मारुतीला म्हणाला,) "अरे हनुमाना, डोळे मिटून तू पाणी पी आणि माझ्याजवळ ये. मी तुला एका मंत्राचा उपदेश करीन. त्यामुळे तुला औषधी दिसतील." (२०)

ते दर्शितं शीघ्रं बटुना सलिलाशयम् ।
श्य हनुमांस्तोयमपिबन्मीलितेक्षणः ॥ २१ ॥

"ठीक आहे," असे मारुती म्हणाला. मग बटूने मारुतीला जलाशय दाखविला. त्यात शिरून मारुती डोळे मिटून पाणी पिऊ लागला. (२१)

त्रागत्य मकरी महामाया महाकपिम् ।
सत्तं महावेगान्मारुतिं घोररूपिणी ॥ २२ ॥

तितक्यात महाभयंकर रूप असणारी महामाया अशी एक सुसर तेथे आली आणि ती मारुतीला अतिशय वेगाने गिळू लागली. (२२)

ददर्श हनुमान् ग्रसन्तीं मकरीं रुषा ।
ामास हस्ताभ्यां वदनं सा ममार ह ॥ २३ ॥

तेव्हा डोळे उघडल्यावर मारुतीला दिसले की एक सुसर आपणास गिळत आहे. तेव्हा क्रोधाने मारुतीने आपल्या हातांनी तिचे तोंड फाडले. त्यामुळे ती तत्काळ मरून गेली. (२३)

ऽन्तरिक्षे ददृशे दिव्यरूपधराङ्गना ।
ग्रमालीति विख्याता हनूमन्तमथाब्रवीत् ॥ २४ ॥

तेव्हा आकाशात एक दिव्य रूप धारण करणारी स्त्री दिसू लागली. ती धान्यमाली या नावाने विख्यात होती. त्या वेळी ती हनूमंताला म्हणाली. (२४)

ग्रसादादहं शापाद्विमुक्तास्मि कपीश्वर ।
हं मुनिना पूर्वमप्सराः कारणान्तरे ॥ २५ ॥

"हे वानरश्रेष्ठा, तुझ्या कृपेमुळे मी शापातून मुक्त झाले आहे. पूर्वी मी एक अप्सरा होते. काही कारणाने एका मुनीने शाप दिला होता म्हणून मी सुसर झाले होते. (२५)

ग्रमे यस्तु ते दृष्टः कालनेमिर्महासुरः ।
ाप्रहितो मार्गे विघ्नं कर्तुं तवानघ ॥ २६ ॥

या आश्रमात जो मुनिवेष धारण केलेला पुरुष तू पाहिला आहेस, तो कालनेमी नावाचा महान असुर आहे. हे पुण्यशील वानरा, तुझ्या मार्गात विघ्न निर्माण करण्यास त्याला रावणाने पाठविलेला आहे. (२६)

त्रेषधरो नासौ मुनिर्विप्रविहिंसकः ।
दुष्टं गच्छ शीघ्रं द्रोणाचलमनुत्तमम् ॥ २७ ॥

मुनीचा वेष धारण करणारा तो खरा मुनी नाही, तर तो ब्राह्मणांची हिंसा करणारा आहे. त्या दुष्टाचा वध कर आणि तू झटपट अतिउत्तम अशा द्रोण पर्वताकडे जा. (२७)

ाम्यहं ब्रह्मलोकं त्वत्स्पर्शाद्धतकल्मषा ।
क्त्वा सा ययौ स्वर्गं हनूमानप्यथाश्रमम् ॥ २८ ॥

तुझ्या स्पर्शाने माझी पापे नष्ट झाली आहेत. मी आता ब्रह्मलोकी जाईन," असे सांगून ती स्वर्गलोकी निघून गेली. मारुतीसुद्धा आश्रमाकडे परत गेला. (२८)

तं तं समालोक्य कालनेमिरभाषत ।
विलम्बेन महता तव वानरसत्तम ॥ २९ ॥

तो परत आलेला पाहून कालनेमी त्याला म्हणाला, "हे वानरश्रेष्ठा, इतका उशीर का ? (२९)

ा मत्तो मन्त्रांस्त्वं देहि मे गुरुदक्षिणाम् ।
क्तो हनुमान्मुष्टिं दृढं बद्ध्वाह राक्षसम् ॥ ३० ॥

तू माझ्याकडून त्वरित मंत्र घे आणि मला गुरुदक्षिणा दे." त्याने असे म्हटल्यावर, हनुमानाने आपली मूठ घट्ट आवळून त्या राक्षसाला म्हटले. (३०)

ा दक्षिणामेतामित्युक्त्वा निजघान तम् ।
ज्य मुनिवेषं स कालनेमिर्महासुरः ॥ ३१ ॥

ा वायुपुत्रेण नानामायाविधानतः ।
ायिकदूतोऽसौ हनूमान्मायिनां रिपुः ॥ ३२ ॥

"घे ही दक्षिणा," असे बोलून त्याने एक मुष्टिप्रहार केला. तेव्हा मुनिवेष टाकून तो महासुर कालनेमी वायुपुत्राबरोबर नाना प्रकारच्या मायावी प्रकारांनी लढू लागला. परंतु हनुमान हा महामायेच्या स्वामींचा (रामांचा) दूत होता. शिवाय तो मायावी राक्षसांचा शत्रू होता. (३१-३२)

जघान मुष्टिना शीर्ष्णि भग्नमूर्धा ममार सः ।
ततः क्षीरनिधिं गत्वा दृष्ट्वा द्रोणं महागिरिम् ॥ ३३ ॥

अदृष्ट्वा चौषधीस्तत्र गिरिमुत्पाट्य सत्वरः ।
गृहीत्वा वायुवेगेन गत्वा रामस्य सन्निधिम् ॥ ३४ ॥

उवाच हनुमान् राममानीतोऽयं महागिरिः ।
यद्युक्तं कुरु देवेश विलम्बो नात्र युज्यते ॥ ३५ ॥

हनुमानाने कालनेमीच्या मस्तकावर बुक्की मारली. डोके फुटून तो कालनेमी मरण पावला. त्यानंतर क्षीरसागरी गेल्यावर त्याला द्रोण नावाचा महापर्वत दिसला. पण तेथे त्याला आवश्यक त्या औषधी दिसल्या नाहीत. तेव्हा त्याने तो पर्वत उपटून घेतला आणि तो वायुवेगाने सत्वर रामांजवळ पोचला आणि म्हणाला, "हे देवेश्वरा, हा महापर्वतच मी आणला आहे. जे योग्य असेल ते करा. या बाबतीत विलंब करणे योग्य नाही." (३३-३५)

श्रुत्वा हनूमतो वाक्यं रामः सन्तुष्टमानसः ।
गृहीत्वा चौषधीः शीघ्रं सुषेणेन महामतिः ॥ ३६ ॥

चिकित्सां कारयामास लक्ष्मणाय महात्मने ।
ततः सुप्तोत्थित इव बुद्ध्वा प्रोवाच लक्ष्मणः ॥ ३७ ॥

हनुमंताचे वाक्य ऐकल्यावर, रामांचे मन संतुष्ट झाले. मग त्या महाबुद्धिमान रामांनी सुषेणाकडून चट्दिशी औषधी तोडून घेतल्या आणि त्याच्याकडून महात्म्या लक्ष्मणावर उपचार करविला. तेव्हा झोपेतून उठलेल्या माणसाप्रमाणे जागे होऊन लक्ष्मण म्हणू लागला. (३६-३७)

तिष्ठ तिष्ठ क्व गन्तासि हन्मीदानीं दशानन ।
इति ब्रुवन्तमालोक्य मूर्ध्न्यवघ्राय राघवः ॥ ३८ ॥

मारुतिं प्राह वत्साद्य त्वत्प्रसादान्महाकपे ।
निरामयं प्रपश्यामि लक्ष्मणं भ्रातरं मम ॥ ३९ ॥

"अरे रावणा, थांब, थांब. जातोस कुठे? मी आत्ताच तुला ठार करतो." असे बोलणाऱ्या लक्ष्मणाला पाहून राघवांनी त्याच्या मस्तकाचे अवघ्राण केले आणि मग त्यांनी मारुतीला म्हटले, "वत्सा, महावानरा, आज तुझ्याच कृपेमुळे लक्ष्मणाला मी सुखरूप पाहात आहे." (३८-३९)

इत्युक्त्वा वानरैः सार्धं सुग्रीवेण समन्वितः ।
बिभीषणमतेनैव युद्धाय समवस्थितः ॥ ४० ॥

असे बोलून वानरांसह सुग्रीवाला बरोबर घेऊन, बिभीषणाच्या संमतीनेच, श्रीराम पुनः युद्ध करण्यास सिद्ध झाले. (४०)

पाषाणैः पादपैश्चैव पर्वताग्रैश्च वानराः ।
युद्धायाभिमुखा भूत्वा ययुः सर्वे युयुत्सवः ॥ ४१ ॥

युद्ध करण्यासाठी ते सर्व वानर पाषाण, वृक्ष, आणि पर्वतशिखरे घेऊन, युद्धाभिमुख होऊन चालू लागले. (४१)

रावणो विव्यथे रामबाणैर्विद्धो महासुरः ।
मातङ्ग इव सिंहेन गरुडेनेव पन्नगः ॥ ४२ ॥

इकडे, ज्याप्रमाणे सिंहाकडून हत्ती किंवा गरुडाकडून सर्प विद्ध होऊन व्याकूळ होतो, त्या प्रमाणे रामांच्या बाणांनी विद्ध झालेला महाराक्षस रावण हा अगदी व्याकूळ झालेला होता. (४२)

अभिभूतोऽगमद्राजा राघवेण महात्मना ।
सिंहासने समाविश्य राक्षसानिदमब्रवीत् ॥ ४३ ॥

म्हणून महात्म्या राघवांकडून पराभूत झालेला राजा रावण लंकापुरीत परत गेला. तेथे आपल्या सिंहासनावर बसून तो राक्षसांना असे म्हणाला. (४३)

मानुषेणैव मे मृत्युमाह पूर्वं पितामहः ।
मानुषो हि न मां हन्तुं शक्तोऽस्ति भुवि कश्चन ॥ ४४ ॥

"माणसाकडूनच मला मृत्यू येईल, असे पूर्वी मला पितामह ब्रह्मदेवांनी सांगितले होते. परंतु जो मला ठार करण्यास समर्थ होईल असा या पृथ्वीवर कोणीही मनुष्य नाही. (४४)

ततो नारायणः साक्षान्मानुषोऽभून्न संशयः ।
रामो दाशरथिर्भूत्वा मां हन्तुं समुपस्थितः ॥ ४५ ॥

म्हणून साक्षात नारायणच मनुष्य झाला आहे. दशरथपुत्र राम होऊन तो माझा वध करण्यास आला आहे, यात संशय नाही. (४५)

नरण्येन यत्पूर्वं शप्तोऽहं राक्षसेश्वर ।
पत्स्यते च मद्वंशे परमात्मा सनातनः ॥ ४६ ॥

। त्वं पुत्रपौत्रैश्च बान्धवैश्च समन्वितः ।
नेष्यसे न सन्देह इत्युक्त्वा मां दिवं गतः ॥ ४७ ॥

एव रामः संजातो मदर्थे मां हनिष्यति ।
म्भकर्णस्तु मूढात्मा सदा निद्रावशं गतः ॥ ४८ ॥

विबोध्य महासत्त्वमानयन्तु ममान्तिकम् ।
युक्तास्ते महाकायास्तूर्णं गत्वा तु यत्नतः ॥ ४९ ॥

बोध्य कुम्भश्रवणं निन्यू रावणसन्निधिम् ।
स्कृत्य स राजानमासनोपरि संस्थितः ॥ ५० ॥

ाह रावणो राजा भ्रातरं दीनया गिरा ।
म्भकर्ण निबोध त्वं महत्कष्टमुपस्थितम् ॥ ५१ ॥

ेण निहताः शूराः पुत्राः पौत्राश्च बान्धवाः ।
कर्तव्यमिदानीं मे मृत्युकाल उपस्थिते ॥ ५२ ॥

दाशरथी रामः सुग्रीवसहितो बली ।
ुद्रं सबलस्तीर्त्वा मूलं नः परिकृन्तति ॥ ५३ ॥

राक्षसा मुख्यतमास्ते हता वानरैर्युधि ।
नराणां क्षयं युद्धे न पश्यामि कदाचन ॥ ५४ ॥

ायस्व महाबाहो यदर्थं परिबोधितः ।
तुरर्थे महासत्त्व कुरु कर्म सुदुष्करम् ॥ ५५ ॥

वा तद्रावणेन्द्रस्य वचनं परिदेवितम् ।
भकर्णो जहासोच्चैर्वचनं चेदमब्रवीत् ॥ ५६ ॥

मन्त्रविचारे ते गदितं यन्मया नृप ।
द्य त्वामुपगतं फलं पापस्य कर्मणः ॥ ५७ ॥

पूर्वकाळी अनरण्याने मला जो शाप दिला होता की, 'राक्षसराज, माझ्या वंशात सनातन परमात्मा जन्माला येणार आहे आणि त्याच्याकडून तुझे पुत्र, पौत्र आणि बांधव यांच्यासह तू ठार मारला जाशील, यात संशय नाही, असे मला सांगून तो स्वर्गाला गेला होता.' (४६-४७)

तोच हा राम मला ठार करण्यासाठी जन्माला आला आहे, आणि तो नक्कीच माझा वध करील. कुंभकर्ण हा तर मूर्ख असून तो नेहमीच झोपलेला असतो. (४८)

त्या महापराक्रमी कुंभकर्णाला जागे करून तुम्ही त्याला माझ्याजवळ घेऊन या. " रावणाने असे सांगताच, ते प्रचंड देहाचे राक्षस त्वरेने गेले आणि फार प्रयत्नांनी कुंभकर्णाला जागे करून, त्यांनी रावणाजवळ नेले. रावण राजाला नमस्कार करून तो एका आसनावर बसला. (४९-५०)

राजा रावण त्या भावाला दीनवाणीने म्हणाला, "हे कुंभकर्णा, माझ्यावर फार मोठे संकट कोसळले आहे, हे तू जाणून घे व त्याचा विचार कर. (५१)

माझे शूर असे पुत्र, पौत्र आणि बांधव यांना रामाने ठार केले आहे. आता माझा मृत्युकाळ जवळ आला. मी आता काय करू ? (५२)

हा बलवान दशरथपुत्र राम सुग्रीवासहित आपले सैन्य घेऊन, समुद्र ओलांडून, इकडे आला आहे. आणि तो आमचा समूळ नाश करील. (५३)

आमच्याकडील जे मुख्य मुख्य राक्षस होते, ते सगळे युद्धामध्ये वानरांकडून मारले गेले आहेत. परंतु या युद्धात वानरांचा नाश झाल्याचे मात्र मला कधीच दिसून आलेले नाही. (५४)

हे महाबाहो कुंभकर्णा, तू यांचा नाश कर. त्यासाठीच तुला मी झोपेतून जागे केले आहे. हे महासामर्थ्यसंपन्न कुंभकर्णा, आपल्या भावासाठी हे अतिशय दुष्कर असे कार्य तू कर." (५५)

राजा रावणाचे ते दु:खपूर्ण शब्द ऐकल्यावर, कुंभकर्ण मोठमोठ्यांदा हसला आणि म्हणाला. (५६)

"हे राजा, पूर्वी विचार -विनिमय करीत असताना, मी जे काही तुला सांगितले होते, तेच तुझ्या पाप-कर्माचे फळ आज तुझ्याजवळ आले आहे. (५७)

पूर्वमेव मया प्रोक्तो रामो नारायणः परः ।
सीता च योगमायेति बोधितोऽपि न बुध्यसे ॥ ५८ ॥

मी पूर्वीच तुला सांगितले होते की राम हा साक्षात परमात्मा नारायण आहे आणि सीता ही योगमाया आहे. त्या वेळी मी तुला असा बोध केला असूनसुद्धा तू ते लक्षात घेतले नाहीस. (५८)

एकदाहं वने सानौ विशालायां स्थितो निशि ।
दृष्टो मया मुनिः साक्षान्नारदो दिव्यदर्शनः ॥ ५९ ॥

एकदा मी रात्रीच्या वेळी एका वनामध्ये एका विशाल पर्वतशिखरावरील शिलेवर बसलो होतो. तेथे दिव्यदृष्टी असणारे साक्षात नारद मुनी मला भेटले होते. (५९)

तमब्रवं महाभाग कुतो गन्तासि मे वद ।
इत्युक्तो नारदः प्राह देवानां मन्त्रणे स्थितः ॥ ६० ॥

मी त्यांना म्हटले, 'अहो महाभाग, तुम्ही कोठून आलात, ते मला सांगा.' मी असे विचारल्यावर नारद म्हणाले, ' जेथे देवांचा गुप्त विचार-विनिमय चालला होता, तेथे मी होतो. (६०)

तत्रोत्पन्नमुदन्तं ते वक्ष्यामि शृणु तत्त्वतः ।
युवाभ्यां पीडिता देवाः सर्वे विष्णुमुपागताः ॥ ६१ ॥

तेथे जो वृत्तांत घडला तो मी तुला खराखुरा सांगतो, ऐक. तुम्हा दोघांकडून (म्हणजे रावण व कुंभकर्ण या दोघांकडून) त्रस्त झालेले सर्व देव विष्णूंकडे गेले होते. (६१)

ऊचुस्ते देवदेवेशं स्तुत्वा भक्त्या समाहिताः ।
जहि रावणमक्षोभ्यं देव त्रैलोक्यकण्टकम् ॥ ६२ ॥

त्या देवदेवेश्वरांची एकाग्र भक्तीने स्तुती करून ते त्यांना म्हणाले, 'हे देवा, तिन्ही लोकांचा शत्रू आणि अजिंक्य अशा रावणाचा वध करा. (६२)

मानुषेण मृतिस्तस्य कल्पिता ब्रह्मणा पुरा ।
अतस्त्वं मानुषो भूत्वा जहि रावणकण्टकम् ॥ ६३ ॥

माणसाच्या हातून त्या रावणाला मरण येणार आहे, असे ब्रह्मदेवांनी पूर्वीच ठरवून दिले आहे. म्हणून तुम्ही माणूस होऊन रावणरूपी शत्रूचा नाश करा." (६३)

तथेत्याह महाविष्णुः सत्यसङ्कल्प ईश्वरः ।
जातो रघुकुले देवो राम इत्यभिविश्रुतः ॥ ६४ ॥

'ठीक आहे' असे सत्य संकल्प असणारे ईश्वर महाविष्णू म्हणाले. 'तेच देव आता रघुकुळात जन्म घेऊन राम या नावाने विख्यात झाले आहेत. (६४)

स हनिष्यति वः सर्वानित्युक्त्वा प्रययौ मुनिः ।
अतो जानीहि रामं त्वं परं ब्रह्म सनातनम् ॥ ६५ ॥

तुम्हां सर्वांचा ते वध करतील.' असे सांगून नारद मुनी निघून गेले. म्हणून हे रावणा, राम हे सनातन परब्रह्म आहेत, हे लक्षात घे. (६५)

त्यज वैरं भजस्वाद्य मायामानुषविग्रहम् ।
भजतो भक्तिभावेन प्रसीदति रघूत्तमः ॥ ६६ ॥

म्हणून रामांबरोबरचे वैर सोडून दे. मायेने मनुष्य देह धारण केलेल्या रामांची आता तू भक्ती कर. भक्तिभावाने भजणाऱ्या पुरुषावर रघूत्तम प्रसन्न होतात. (६६)

भक्तिर्जनित्री ज्ञानस्य भक्तिर्मोक्षप्रदायिनी ।
भक्तिहीनेन यत्किञ्चित्कृतं सर्वमसत्समम् ॥ ६७ ॥

भक्ती ही ज्ञानाची जननी आहे. भक्ती ही मोक्ष देणारी आहे. भक्तिरहित माणसाने जे काही केलेले असते, ते सर्व न केल्यातच जमा होते. (६७)

अवताराः सुबहवो विष्णोर्लीलानुकारिणः ।
तेषां सहस्त्रसदृशो रामो ज्ञानमयः शिवः ॥ ६८ ॥

विष्णूंनी आत्तापर्यंत पुष्कळ अवतार घेतले आहेत. आणि तदनुरूप त्यांनी अनेक लीला केल्या आहेत. अशा हजारो अवतारासमान हे ज्ञानस्वरूप आणि कल्याणकारक राम आहेत. (६८)

रामं भजन्ति निपुणा मनसा वचसानिशम् ।
अनायासेन संसारं तीर्त्वा यान्ति हरे: पदम् ॥ ६९ ॥

भक्तीमध्ये निपुण असणारे जे लोक मनाने आणि वाचेने रात्रंदिवस रामांचे भजन करतात, ते विनासायास संसार-सागर तरून जाऊन हरीचे पदी पोचतात. (६९)

ये राममेव सततं भुवि शुद्धसत्त्वा
ध्यायन्ति तस्य चरितानि पठन्ति सन्त: ।
मुक्तास्त एव भवभोगमहाहिपाशै:
सीतापते: पदमनन्तसुखं प्रयान्ति ॥ ७० ॥

शुद्ध चित्त असणारे जे साधू पुरुष या जगात सतत रामांचेच ध्यान करतात आणि त्या रामांची चरित्रे पठण करतात, तेच संसारातील भोगरूपी महासर्पाचे पाशांतून मुक्त होतात आणि शेवटी सीतापती रामांच्या अनंत सुखाने युक्त असणाऱ्या स्थानी जाऊन पोचतात. (७०)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे सप्तम: सर्ग: ॥ ७ ॥

# अष्टम सर्ग

## कुंभकर्णाचा वध

*श्रीमहादेव उवाच*

कुम्भकर्णवच: श्रुत्वा भ्रुकुटीविकटानन: ।
दशग्रीवो जगादेदमासनादुत्पतन्निव ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, कुंभकर्णाचे वचन ऐकल्यावर, भुवया वर चढवून रावणाने आपले तोंड विकृत आणि भयंकर केले. तो आसनावरून जणू उडी मारतो की काय असे वाटले. तो म्हणाला. (१)

त्वमानीतो न मे ज्ञानबोधनाय सुबुद्धिमान् ।
मया कृतं समीकृत्य युध्यस्व यदि रोचते ॥ २ ॥

"तू फार शहाणा आहेस हे मला माहीत आहे. परंतु मला ज्ञानाचा उपदेश करण्यासाठी मी तुला येथे बोलावून घेतलेले नाही. मी आत्तापर्यंत जे काही केले ते तुला रुचत असेल, तर तू युद्ध कर. (२)

नोचेद्गच्छ सुषुप्त्यर्थं निद्रा त्वां बाधतेऽधुना ।
ावणस्य वच: श्रुत्वा कुम्भकर्णो महाबल: ॥ ३ ॥

ष्टोऽयमिति विज्ञाय तूर्णं युद्धाय निर्ययौ ।
 लङ्घयित्वा प्राकारं महापर्वतसन्निभ: ॥ ४ ॥

नेर्ययौ नगरात्तूर्णं भीषयन्हरिसैनिकान् ।
 ननाद महानादं समुद्रमभिनादयन् ॥ ५ ॥

नाही तर तू सरळ झोपायला जा. कारण तुला आता झोप सतावीत असेल." रावणाचे ते वचन ऐकल्यावर, 'हा रावण क्रुद्ध झाला आहे' हे ओळखून महाबलवान कुंभकर्ण तत्काळ युद्धासाठी बाहेर पडला. प्रचंड पर्वताप्रमाणे शरीर असलेला तो लंका नगरीचा तट ओलांडून नगरातून बाहेर पडला (कारण अतिशय प्रचंड शरीर असल्याने तो नगरीच्या लहान वेशीतून बाहेर जाऊ शकत नव्हता) आणि मग वानर सैनिकांना भिववीत, समुद्राला नादाने भेदून टाकणारी, अशी मोठी गर्जना त्याने केली . (३-५)

ानरान्कालयामास बाहुभ्यां भक्षयन् रुषा ।
ुम्भकर्णं तदा दृष्ट्वा सपक्षमिव पर्वतम् ॥ ६ ॥

द्रुवुर्वानरा: सर्वे कालान्तकमिवाखिला: ।
मन्तं हरिवाहिन्यां मुद्गरेण महाबलम् ॥ ७ ॥

क्रोधाने दोन्ही हातांनी वानरांना धरून, त्यांना खाऊन टाकीत तो वानरांना नष्ट करू लागला. त्या वेळी कुंभकर्ण पंख असणाऱ्या प्रत्यक्ष पर्वताप्रमाणे दिसत होता. आणि यमराज दिसल्यावर ज्या प्रमाणे सर्व लोक पळू लागतात, त्या प्रमाणे त्या कुंभकर्णाला पाहून सर्व वानर पळू लागले. त्या वेळी महाबलवान कुंभकर्ण हातात मुद्गर

कालयन्तं हरीन्वेगाद्भक्षयन्तं समन्ततः ।
चूर्णयन्तं मुद्गरेण पाणिपादैरनेकधा ॥ ८ ॥

कुम्भकर्णं तदा दृष्ट्वा गदापाणिर्बिभीषणः ।
ननाम चरणं तस्य भ्रातुर्ज्येष्ठस्य बुद्धिमान् ॥ ९ ॥

बिभीषणोऽहं भ्रातुर्मे दयां कुरु महामते ।
रावणस्तु मया भ्रातर्बहुधा परिबोधितः ॥ १० ॥

सीतां देहीति रामाय रामः साक्षाज्जनार्दनः ।
न शृणोति च मां हन्तुं खड्गमुद्यम्य चोक्तवान् ॥ ११ ॥

धिक् त्वां गच्छेति मां हत्वा पदा पापिभिरावृतः ।
चतुर्भिर्मन्त्रिभिः सार्धं रामं शरणमागतः ॥ १२ ॥

तच्छ्रुत्वा कुम्भकर्णोऽपि ज्ञात्वा भ्रातरमागतम् ।
समालिङ्ग्य च वत्स त्वं जीव रामपदाश्रयात् ॥ १३ ॥

कुलसंरक्षणार्थाय राक्षसानां हिताय च ।
महाभागवतोऽसि त्वं पुरा मे नारदाच्छ्रुतम् ॥ १४ ॥

गच्छ तात ममेदानीं दृश्यते न च किञ्चन ।
मदीयो वा परो वापि मदमत्तविलोचनः ॥ १५ ॥

इत्युक्तोऽश्रुमुखो भ्रातुश्चरणावभिवन्द्य सः ।
रामपार्श्वमुपागत्य चिन्तापर उपस्थितः ॥ १६ ॥

कुम्भकर्णोऽपि हस्ताभ्यां पादाभ्यां पेषयन्हरीन् ।
चचार वानरीं सेनां कालयन् गन्धहस्तिवत् ॥ १७ ॥

दृष्ट्वा तं राघवः क्रुद्धो वायव्यं शस्त्रमादरात् ।
चिक्षेप कुम्भकर्णाय तेन चिच्छेद रक्षसः ॥ १८ ॥

समुद्गरं दक्षहस्तं तेन घोरं ननाद सः ।
स हस्तः पतितो भूमावनेकानर्दयन्कपीन् ॥ १९ ॥

घेऊन वानर सैन्यात फिरत होता आणि संधी मिळताच वानरांना ठार करीत, आजबाजूला सापडतील त्या वानरांना वेगाने खाऊन टाकीत होता. तसेच आपला मुद्गर व आपले हातपाय यांचे द्वारा नाना प्रकारांनी तो वानरांचे चूर्ण करीत होता. कुंभकर्णाला तेव्हा पाहिल्यावर, हातात गदा घेतलेल्या बुद्धिमान बिभीषणाने आपल्या थोरल्या भावाच्या चरणांना वंदन केले. (६-९)

(मग बिभीषण कुंभकर्णाला म्हणाला,) "हे महा बुद्धिमंता, मी तुझा भाऊ बिभीषण आहे. माझ्यावर दया कर. हे बंधो, मी रावणाला नाना प्रकारांनी बोध केला की बाबा रे, राम हे साक्षात जनार्दन आहेत. तू रामांना सीता परत देऊन टाक. पण त्याने माझे ऐकले नाही. उलट मला ठार मारण्यास तलवार उगारून तो मला म्हणाला, 'तुझा धिक्कार असो. तू येथून चालता हो.' असे बोलून पापी मंत्र्यांनी वेढलेल्या त्याने मला पायाने लाथ मारली. तेव्हा माझ्या चार मंत्र्यांसह मी रामांना शरण आलो."(१०-१२)

ते ऐकल्यावर आपला भाऊ बिभीषण जवळ आला आहे, हे कुंभकर्णाला कळले. मग बिभीषणाला आलिंगन देऊन तो म्हणाला, "अरे वत्सा, रामांच्या चरणांचा आश्रय घेऊन तू आपल्या कुळाच्या संरक्षणासाठी आणि राक्षसांच्या हितासाठी जिवंत राहा. तू महान् भगवद्भक्त आहेस, असे मी पूर्वी नारदांकडून ऐकलेले आहे. (१३-१४)

बाबा रे, तू जा आता. रणाच्या मदाने माझे डोळे धुंद झाले असल्यामुळे, कोण आपला आणि कोण परका हे मला आता काहीच दिसेनासे झाले आहे." (१५)

कुंभकर्णाने असे सांगितल्यावर, बिभीषणाच्या मुखावर अश्रू ओघळू लागले. नंतर बंधूच्या चरणांना वंदन करून, चिंताग्रस्त झालेला बिभीषण रामांजवळ येऊन उभा राहिला. (१६)

इकडे हातांनी व पायांनी वानरांना चिरडीत आणि गर्जना करीत एखाद्या मदमस्त हत्तीप्रमाणे कुंभकर्ण वानरांच्या सैन्यात फिरू लागला. (१७)

त्या कुंभकर्णाला पाहून राघव रागावले. त्यांनी वायव्य अस्त्र घेतले आणि ते दक्षतेने कुंभकर्णावर सोडले. त्या अस्त्राने मुद्गर घेतलेल्या राक्षसाचा उजवा हात तोडून टाकला. त्यामुळे तो भयंकर गर्जना करू लागला. अनेक वानरांना चिरडून टाकीत तो तुटलेला हात जमिनीवर पडला. (१८-१९)

पर्यन्तमाश्रिताः सर्वे वानरा भयवेपिताः ।
रामराक्षसयोर्युद्धं पश्यन्तः पर्यवस्थिताः ॥ २० ॥

रामांच्या जवळपास उभे असणारे सर्व वानर भीतीने कापू लागले आणि श्रीराम व कुंभकर्ण यांचे युद्ध पाहात उभे राहिले. (२०)

कुम्भकर्णश्छिन्नहस्तः शालमुद्यम्य वेगतः ।
समरे राघवं हन्तुं दुद्राव तमथोऽच्छिनत् ॥ २१ ॥

शालेन सहितं वामहस्तमैन्द्रेण राघवः ।
छिन्नबाहुमथायान्तं नर्दन्तं वीक्ष्य राघवः ॥ २२ ॥

द्वावर्धचन्द्रौ निशितावादायास्य पदद्वयम् ।
चिच्छेद पतितौ पादौ लङ्काद्वारि महास्वनौ ॥ २३ ॥

हात तुटलेल्या कुंभकर्णाने एक शाल वृक्ष उगारून, रामांना ठार करण्यास तो वेगाने त्यांच्याकडे धावला. तेव्हा राघवांनी इंद्र-अस्त्राने त्याचा डावा हात शालवृक्षासह तोडून टाकला. नंतर दोन्ही बाहू तुटलेले असूनसुद्धा तो गर्जना करीत आपल्याकडे येत आहे, हे पाहून राघवांनी दोन अर्धचंद्राकार तीक्ष्ण बाण घेऊन त्यांचे द्वारा त्याचे दोन्ही पाय तोडून टाकले. तेव्हा ते पाय धाड्दिशी लंकेच्या द्वारात जाऊन पडले. (२१-२३)

निकृत्तपाणिपादोऽपि कुम्भकर्णोऽतिभीषणः ।
वडवामुखवद्वक्त्रं व्यादाय रघुनन्दनम् ॥ २४ ॥

अभिदुद्राव निनदन्राहुश्चन्द्रमसं यथा ।
अपूरयच्छिताग्रैश्च सायकैस्तद्रघूत्तमः ॥ २५ ॥

ज्या प्रमाणे राहू हा चंद्राकडे धावतो, त्या प्रमाणे दोन्ही हात आणि दोन्ही पाय तुटले होते, तरीसुद्धा तो महाभयंकर कुंभकर्ण राक्षस वडवानलाप्रमाणे आपले विस्तीर्ण तोंड वासून गर्जना करीत रघुनंदनांकडे धावू लागला; तेव्हा तीक्ष्ण टोके असणाऱ्या अनेक बाणांनी रघूत्तम रामांनी कुंभकर्णाचे तोंड भरून टाकले. (२४-२५)

शरपूरितवक्त्रोऽसौ चुक्रोशातिभयङ्करः ।
अथ सूर्यप्रतीकाशमैन्द्रं शरमनुत्तमम् ॥ २६ ॥

वज्राशनिसमं रामश्चिक्षेपासुरमृत्यवे ।
स तत्पर्वतसङ्काशं स्फुरत्कुण्डलदंष्ट्रकम् ॥ २७ ॥

चकर्त रक्षोऽधिपतेः शिरो वृत्रमिवाशनिः ।
तच्छिरः पतितं लङ्काद्वारि कायो महोदधौ ॥ २८ ॥

त्याचे तोंड बाणांनी भरून गेले होते, तो अतिभयंकर राक्षस आक्रोश करू लागला. त्यानंतर सूर्याप्रमाणे तेजस्वी असणारा अतिशय उत्तम असा, वज्र किंवा विद्युत्पाताप्रमाणे असणारा तो ऐंद्र बाण रामांनी त्या कुंभकर्ण असुराच्या वधासाठी सोडला. ज्या प्रमाणे इंद्राच्या वज्राने वृत्रासुराचे शिर तोडले, त्या प्रमाणे ज्यावर कुंडले आणि दाढा चमकत होत्या असे ते राक्षसाधिपती कुंभकर्णाचे पर्वताप्रमाणे असणारे मस्तक तुटले. ते लंकेच्या द्वारात जाऊन पडले आणि कुंभकर्णाचे धड महासागरात पडले. (२६-२८)

शिरोऽस्य रोधयद्द्वारं कायो नक्राद्यचूर्णयत् ।
ततो देवाः सऋषयो गन्धर्वाः पन्नगाः खगाः ॥ २९ ॥

सिद्धा यक्षा गुह्यकाश्च अप्सरोभिश्च राघवम् ।
ईडिरे कुसुमासारैर्वर्षन्तश्चाभिनन्दिताः ॥ ३० ॥

त्याच्या मस्तकाने लंकेचे द्वार बंद करून टाकले तर त्याच्या धडाने सागरातील नक्र इत्यादी जलचरांचे चूर्ण करून टाकले. तेव्हा ऋषींचेसह देव आणि अप्सरांसहित गंधर्व, नाग, पक्षी, सिद्ध, यक्ष आणि गुह्यक हे सर्व अतिशय आनंदित झाले आणि फुलांचा वर्षाव करीत ते राघवांची स्तुती करू लागले. (२९-३०)

आजगाम तदा रामं द्रष्टुं देवमुनीश्वरः ।
नारदो गगनात्तूर्णं स्वभासा भासयन्दिशः ॥ ३१ ॥

त्या वेळी स्वतःच्या तेजाने दिशांना प्रकाशित करीत, देवमहर्षी नारद रामांचे दर्शन घेण्यास आकाशातून त्वरेने खाली पृथ्वीवर आले. (३१)

रामिन्दीवरश्यामुदाराङ्गं धनुर्धरम् ।
ईषत्ताम्रविशालाक्षमैन्द्रास्त्राञ्चितबाहुकम् ॥ ३२ ॥

दयार्द्रदृष्ट्या पश्यन्तं वानराञ्छरपीडितान् ।
दृष्ट्वा गद्‌गदया वाचा भक्त्या स्तोतुं प्रचक्रमे ॥ ३३ ॥

नंतर जे नीलकमलाप्रमाणे श्याम वर्ण होते, ज्यांचे शरीर मनोहर होते, ज्यांनी धनुष्य धारण केले होते, ज्यांचे विशाल डोळे किंचित् लाल झाले होते, ज्यांनी एका हाताने ऐंद्र अस्त्र पकडले होते, जे आपल्या दयार्द्र दृष्टीने बाणांनी त्रस्त झालेल्या वानरांकडे पाहात होते, अशा त्या रामांना पाहिल्यावर, नारदांनी भक्तीने गद्‌गद झालेल्या वाणीने स्तुती करण्यास प्रारंभ केला. (३२-३३)

*नारद उवाच*

देवदेव जगन्नाथ परमात्मन् सनातन ।
नारायणाखिलाधार विश्वसाक्षिन्नमोऽस्तु ते ॥ ३४ ॥

**नारद म्हणाले–** "हे देवाधिदेवा, हे जगन्नाथा, हे सनातन परमात्म्या, हे सर्वांचा आधार असणाऱ्या नारायणा, हे विश्वसाक्षिन , तुम्हांला नमस्कार असो. (३४)

विशुद्धज्ञानरूपोऽपि त्वं लोकानतिवञ्चयन् ।
मायया मनुजाकारः सुखदुःखादिमानिव ॥ ३५ ॥

जरी तुम्ही विशुद्ध ज्ञानस्वरूप आहात, तरी मायेने मनुष्यरूप धारण करून तुम्ही जणू सुखी- दुःखी होता असे भासवत लोकांना मोहवीत आहात. (३५)

त्वं मायया गुह्यमानः सर्वेषां हृदि संस्थितः ।
स्वयंज्योतिःस्वभावस्त्वं व्यक्त एवामलात्मनाम् ॥ ३६ ॥

मायेमुळे झाकले गेलेले तुम्ही अंतर्यामी रूपाने सर्वांच्या हृदयांत स्थित आहात. तुम्ही स्वयंप्रकाशी आहात. ज्यांचे चित्त शुद्ध झाले आहे, अशा लोकांना तुम्ही स्पष्टपणे दिसता. (३६)

उन्मीलयन् सृजस्येतन्नेत्रे राम जगत्त्रयम् ।
उपसंह्रियते सर्वं त्वया चक्षुर्निमीलनात् ॥ ३७ ॥

हे श्रीरामा, जेव्हा तुम्ही तुमचे डोळे उघडता तेव्हा तुम्ही हे त्रैलोक्य निर्माण करता आणि जेव्हा तुम्ही डोळे मिटता तेव्हा तुमच्याकडून या सर्व त्रैलोक्याचा नाश केला जातो. (३७)

यस्मिन्सर्वमिदं भाति यतश्चैतच्चराचरम् ।
यस्मान्न किञ्चिल्लोकेऽस्मिंस्तस्मै ते ब्रह्मणे नमः ॥ ३८ ॥

ज्यांच्या ठिकाणी हे स्थावर जंगमात्मक जग भासते, ज्यांच्यापासून या जगाची उत्पत्ती, स्थिती व नाश होतात आणि ज्यांच्याखेरीज या जगात अन्य काहीही नाही, असे ब्रह्म तुम्ही आहात, त्या तुम्हांला नमस्कार असो. (३८)

प्रकृतिं पुरुषं कालं व्यक्ताव्यक्तस्वरूपिणम् ।
यं जानन्ति मुनिश्रेष्ठास्तस्मै रामाय ते नमः ॥ ३९ ॥

तुम्हांला मुनिश्रेष्ठ प्रकृती, पुरुष, काल तसेच व्यक्त आणि अव्यक्त असे म्हणतात, त्या तुम्हांला, रामांना नमस्कार असो. (३९)

विकाररहितं शुद्धं ज्ञानरूपं श्रुतिर्जगौ ।
त्वां सर्वजगदाकारमूर्तिं चाप्याह सा श्रुतिः ॥ ४० ॥

विकारांनी रहित, शुद्ध आणि ज्ञानरूप असे तुम्ही आहात, असे श्रुती सांगते आणि ती श्रुती असेसुद्धा सांगते की तुम्ही सर्व जगदाकार स्वरूपाचे आहात. (४०)

विरोधो दृश्यते देव वैदिको वेदवादिनाम् ।
निश्चयं नाधिगच्छन्ति त्वत्प्रसादं विना बुधाः ॥ ४१ ॥

अशा प्रकारे हे देवा, वेदाची चर्चा करणाऱ्या लोकांमध्ये वेदाचे मत सांगताना वेद-वचनांचे बाबतीत विरोध दिसून येतो. परंतु तुमची कृपा झाल्याशिवाय विद्वानांना तुमच्या स्वरूपाचा निश्चय करता येत नाही.(४१)

मायया क्रीडतो देव न विरोधो मनागपि ।
रश्मिजालं रवेर्यद्वद्दृश्यते जलवद् भ्रमात् ॥ ४२ ॥

परंतु हे देवा, तुम्ही मायेच्या योगाने क्रीडा करता म्हणून श्रुतींमधील वाक्यात वाटतो तसा थोडासुद्धा विरोध येत नाही. ज्या प्रमाणे सूर्याच्या किरणांचा समूह हा भ्रमामुळे

ान्तिज्ञानात्तथा राम त्वयि सर्वं प्रकल्प्यते ।
नसोऽविषयो देव रूपं ते निर्गुणं परम् ॥ ४३ ॥

थं दृश्यं भवेद्देव दृश्याभावे भजेत्कथम् ।
तस्त्वावतारेषु रूपाणि निपुणा भुवि ॥ ४४ ॥

जन्ति बुद्धिसम्पन्नास्तरन्त्येव भवार्णवम् ।
ामक्रोधादयस्तत्र बहवः परिपन्थिनः ॥ ४५ ॥

ोषयन्ति सदा चेतो मार्जारा मूषकं यथा ।
त्रन्नाम स्मरतां नित्यं त्वद्रूपमपि मानसे ॥ ४६ ॥

त्रत्पूजानिरतानां ते कथामृतपरात्मनाम् ।
त्रद्भक्तसङ्गिनां राम संसारो गोष्पदायते ॥ ४७ ॥

तस्ते सगुणं रूपं ध्यात्वाहं सर्वदा हृदि ।
ुक्तश्चरामि लोकेषु पूज्योऽहं सर्वदैवतैः ॥ ४८ ॥

ाम त्वया महत्कार्यं कृतं देवहितेच्छया ।
ुम्भकर्णवधेनाद्य भूभारोऽयं गतः प्रभो ॥ ४९ ॥

त्रो हनिष्यति सौमित्रिरिन्द्रजेतारमाहवे ।
ानिष्यसेऽथ राम त्वं परश्वो दशकन्धरम् ॥ ५० ॥

श्यामि सर्वं देवेश सिद्धैः सह नभोगतः ।
अनुगृह्णीष्व मां देव गमिष्यामि सुरालयम् ॥ ५१ ॥

इत्युक्त्वा राममामन्त्र्य नारदो भगवानृषिः ।
ययौ देवैः पूज्यमानो ब्रह्मलोकमकल्मषम् ॥ ५२ ॥

भ्रातरं निहतं श्रुत्वा कुम्भकर्णं महाबलम् ।
ावणः शोकसन्तप्तो रामेणाक्लिष्टकर्मणा ॥ ५३ ॥

मूर्च्छितः पतितो भूमावुत्थाय विललाप ह ।
पितृव्यं निहतं श्रुत्वा पितरं चातिविह्वलम् ॥ ५४ ॥

पाण्याप्रमाणे दिसतो, त्या प्रमाणे हे श्रीरामा, भ्रांति-ज्ञानामुळे तुमच्या ठिकाणी सर्व जग कल्पिले जाते. हे देवा, तुमचे श्रेष्ठ निर्गुण रूप हे मनाचा विषय होत नाही, (निर्गुण रूप हे मनाला आकलन होत नाही.) (४२-४३)

तर असे ते निर्गुण रूप कसे बरे दृश्य होईल ? आणि जर ते दृश्य होत नसेल तर त्याची भक्ती कोण व कशी बरे करेल ? म्हणून बुद्धि -संपन्न आणि हुशार लोक हे पृथ्वीवरील तुमच्या अवतारांतील रूपांची भक्ती करतात आणि ते संसारसागर तरून जातात. भक्ति-मार्गात काम, क्रोध इत्यादी बरेच शत्रू आहेत. मांजर ज्या प्रमाणे उंदराला भयभीत करते, त्याप्रमाणे ते काम इत्यादी माणसाच्या मनाला भयभीत करतात. हे श्रीरामा, जे लोक तुमच्या नामाचे नित्य स्मरण करतात, जे तुमच्या रूपाचे मनात ध्यान करतात, जे तुमच्या पूजेत रत असतात, तुमचे कथामृत सेवन करण्यात ज्यांचे मन गढलेले असते आणि जे तुमच्या भक्तांची संगती करतात, त्यांना हा संसार चिखलात उमटलेल्या गाईच्या पावलाप्रमाणे तुच्छ वाटतो. (४४-४७)

म्हणून हे रामा, सदा सर्वदा माझ्या हृदयात तुमच्या सगुण रूपाचे ध्यान करून मुक्त झालेला मी सर्व लोकांत फिरत असतो आणि मी सर्व देवांनाही पूजनीय झालो आहे. (४८)

हे रामा, देवांचे हित करण्याच्या इच्छेने तुम्ही फार महान कार्य केले आहे. हे प्रभो, कुंभकर्णाचा वध झाल्यामुळे आज भूमीचा भार नाहीसा झाला आहे. (४९)

उद्या युद्धात लक्ष्मण इंद्रजिताचा वध करील आणि त्यानंतर परवा दिवशी हे रामा, तुम्ही रावणाला ठार कराल. (५०)

हे देवेश्वरा, हे सर्व काही मी सिद्धांसह आकाशात राहून पाहीन. हे देवा, माझ्यावर कृपा करा. आता मी स्वर्ग लोकात जातो. ” (५१)

असे बोलून आणि रामांचा निरोप घेऊन, देवांचे कडून पूजिले जाणारे भगवान नारद मुनी निष्कलंक अशा ब्रह्मलोकाला निघून गेले. (५२)

आपल्या महाबलवान अशा कुंभकर्ण भावाला फारसे कष्ट न करता रामांनी ठार केले, हे ऐकल्यावर रावण अतिशय शोकाकुल झाला आणि मूर्च्छित होऊन तो जमिनीवर पडला. मग शुद्धीवर आल्यावर उठून तो विलाप करू लागला. इकडे आपला चुलता कुंभकर्ण ठार झाला

इन्द्रजित्प्राह शोकार्तं त्यज शोकं महामते ।
मयि जीवति राजेन्द्र मेघनादे महाबले ॥ ५५ ॥

दुःखस्यावसरः कुत्र देवान्तक महामते ।
व्येतु ते दुःखमखिलं स्वस्थो भव महीपते ॥ ५६ ॥

सर्वं समीकरिष्यामि हनिष्यामि च वै रिपून् ।
गत्वा निकुम्भिलां सद्यस्तर्पयित्वा हुताशनम् ॥ ५७ ॥

लब्ध्वा रथादिकं तस्मादजेयोऽहं भवाम्यरेः ।
इत्युक्त्वा त्वरितं गत्वा निर्दिष्टं हवनस्थलम् ॥ ५८ ॥

रक्तमाल्याम्बरधरो रक्तगन्धानुलेपनः ।
निकुम्भिलास्थले मौनी हवनायोपचक्रमे ॥ ५९ ॥

बिभीषणोऽथ तच्छ्रुत्वा मेघनादस्य चेष्टितम् ।
प्राह रामाय सकलं होमारम्भं दुरात्मनः ॥ ६० ॥

समाप्यते चेद्धोमोऽयं मेघनादस्य दुर्मतेः ।
तदाजेयो भवेद्राम मेघनादः सुरासुरैः ॥ ६१ ॥

अतः शीघ्रं लक्ष्मणेन घातयिष्यामि रावणिम् ।
आज्ञापय मया सार्धं लक्ष्मणं बलिनां वरम् ।
हनिष्यति न सन्देहो मेघनादं तवानुजः ॥ ६२ ॥

*श्रीरामचन्द्र उवाच*

अहमेवागमिष्यामि हन्तुमिन्द्रजितं रिपुम् ।
आग्नेयेन महास्त्रेण सर्वराक्षसघातिना ॥ ६३ ॥

बिभीषणोऽपि तं प्राह नासावन्यैर्निहन्यते ।
यस्तु द्वादश वर्षाणि निद्राहारविवर्जितः ॥ ६४ ॥

तेनैव मृत्युर्निर्दिष्टो ब्रह्मणास्य दुरात्मनः ।
लक्ष्मणस्तु अयोध्याया निर्गम्यायात्त्वया सह ॥ ६५ ॥

आणि आपला पिता रावण अतिशय विव्हल झाला आहे हे ऐकल्यावर, इंद्रजित आपल्या शोकाकुल पित्याला म्हणाला, "हे महाबुद्धिमंता, तुम्ही शोक करणे सोडून द्या. हे महाबुद्धिवाना, देवांचा अंत करणाऱ्या हे राजेंद्रा, मी महाबलवान मेघनाद जिवंत असताना, तुम्हांला दुःख करायचे कारण काय ? हे पृथ्वीपते, तुमचे सर्व दुःख नष्ट होवो. तुम्ही स्वस्थ व्हा. (५३-५६)

मी सर्व काही सरळ व्यवस्थित करीन. मी सर्व शत्रूंना ठार मारीन. आता ताबडतोब निकुंभिला* स्थानी जाऊन, अग्नीला हवनांनी तृप्त करून, रथ इत्यादी प्राप्त करून घेतल्यावर, मी शत्रूला अजिंक्य होईन." असे बोलून तो नियोजित यज्ञशाळेत निघून गेला. (५७-५८)

लाल फुलांच्या माळा व लाल वस्त्रे परिधान करून आणि रक्तचंदनाचा लाल लेप लावून, त्या निकुंभिलेच्या स्थानी, त्याने मौन धारण करून हवन करण्यास प्रारंभ केला. (५९)

मेघनादाच्या त्या कृत्याची माहिती बिभीषणाला लागली. तेव्हा तो रामांना म्हणाला, "हे रामा, जर त्या दुरात्म्या, दुष्टबुद्धी मेघनादाने सुरू केलेला हा होम निर्विघ्नपणे समाप्त झाला, तर तो देव आणि असुर यांना अजिंक्य होईल. (६०-६१)

म्हणून मी ताबडतोब लक्ष्मणाकडून रावणपुत्र मेघनादाचा वध करवून घेतो. तेव्हा बलवानांमधील श्रेष्ठ अशा लक्ष्मणाला माझ्याबरोबर येण्याची आज्ञा द्या. तुमचा धाकटा भाऊ लक्ष्मण हा मेघनादाला ठार करेल, यात संशय नाही." (६२)

**श्रीरामचंद्र म्हणाले**– "सर्व राक्षसांचा घात करू शकणाऱ्या आग्नेय या महान् अस्त्राने इंद्रजिताला ठार करण्यास मीच स्वतः येतो." (६३)

तेव्हा बिभीषण म्हणाला, "हा मेघनाद अन्य कुणाकडूनही ठार केला जाऊ शकणार नाही. जो कोणी बारा वर्षे निद्रा व आहार सोडून राहिला असेल, त्याच्याकडूनच या दुरात्म्याचा मृत्यू होईल, असे ब्रह्मदेवानेच निश्चित केलेले आहे. हे रघूत्तम रामा, हा लक्ष्मण अयोध्येतून बाहेर

* निकुंभिला हे लंकेजवळचे एक स्थान अथवा गुहा.

तदादि निद्राहारादीन्न जानाति रघूत्तम ।
सेवार्थं तव राजेन्द्र ज्ञातं सर्वमिदं मया ॥ ६६ ॥

पडून तुमच्याबरोबर आला आहे. तेव्हापासून तो तुमच्या सेवेत मग्न असल्याने त्याला आहार व निद्रा माहीतच नाहीत. हे राजेंद्रा, हे सर्व मला ज्ञात आहे . (६४-६६)

तदाज्ञापय देवेश लक्ष्मणं त्वरया मया ।
हनिष्यति न सन्देहः शेषः साक्षाद्धराधरः ॥ ६७ ॥

म्हणून हे देवेश्वरा, माझ्याबरोबर येण्यास लक्ष्मणाला चट्दिशी आज्ञा द्या. हा लक्ष्मण त्या मेघनादाला नक्कीच ठार करील यात संशय नाही. कारण तो पृथ्वीला धारण करणारा साक्षात शेष नाग आहे. (६७)

त्वमेव साक्षाज्जगतामधीशो
नारायणो लक्ष्मण एव शेषः ।
युवां धराभारनिवारणार्थं
जातौ जगन्नाटकसूत्रधारौ ॥ ६८ ॥

हे श्रीरामा, तुम्हीच सर्व जगतांचे अधिपती नारायण आहात आणि लक्ष्मण हा शेष नाग आहे. जगरूपी नाटकाचे सूत्रधार असणारे तुम्ही दोघे भूमीचा भार हरण करण्यासाठी मनुष्यरूपाने जन्माला आलेले आहात." (६८)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

# नवम सर्ग

## मेघनादाचा वध

*श्रीमहादेव उवाच*

बिभीषणवचः श्रुत्वा रामो वाक्यमथाब्रवीत् ।
जानामि तस्य रौद्रस्य मायां कृत्स्नां बिभीषण ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, बिभीषणाचे म्हणणे ऐकल्यावर श्रीराम म्हणाले, "अरे बिभीषणा, त्या महाभयंकर दैत्याची संपूर्ण माया मी जाणतो. (१)

स हि ब्रह्मास्त्रविच्छूरो मायावी च महाबलः ।
जानामि लक्ष्मणस्यापि स्वरूपं मम सेवनम् ॥ २ ॥

ज्ञात्वैवासमहं तूष्णीं भविष्यत्कार्यगौरवात् ।
इत्युक्त्वा लक्ष्मणं प्राह रामो ज्ञानवतां वरः ॥ ३ ॥

गच्छ लक्ष्मण सैन्येन महता जहि रावणिम् ।
हनूमत्प्रमुखैः सर्वैर्यूथपैः सह लक्ष्मण ॥ ४ ॥

तो मेघनाद ब्रह्मास्त्र जाणणारा, शूर, मायावी आणि महाबलशाली आहे. तसेच लक्ष्मणाचे स्वरूप आणि तो करीत असलेली माझी सेवा, हे दोन्हीही मला माहीत आहेत. (लक्ष्मणाने माझ्या सेवेसाठी निद्रा व आहार सोडले आहेत.) हे सगळे माहीत असूनही, भविष्य कालीन इंद्रजित वधाचे महत्त्वाचे कार्य लक्षात घेऊन मी त्याला खाण्यापिण्याचा किंवा झोप घेण्याचा आग्रह केला नव्हता." असे बोलून ज्ञानी माणसांतील श्रेष्ठ असे राम लक्ष्मणाला म्हणाले, 'अरे लक्ष्मणा, हनुमान इत्यादी वानर समूहांचे सर्व नायक आणि मोठी सेना यांना बरोबर घेऊन तू जा आणि मेघनादाला ठार कर. (२-४)

जाम्बवानृक्षराजोऽयं सह सैन्येन संवृतः ।
बिभीषणश्च सचिवैः सह त्वामभियास्यति ॥ ५ ॥

सर्व सैन्यासह हा अस्वलांचा राजा जांबवान आणि मंत्र्यांसह बिभीषण हे तुझ्याबरोबर येतील. (५)

अभिज्ञस्तस्य देशस्य जानाति विवराणि सः ।
रामस्य वचनं श्रुत्वा लक्ष्मणः सबिभीषणः ॥ ६ ॥

बिभीषण तो प्रदेश जाणणारा आहे, तसेच तेथील लपून राहण्याच्या गुहा त्याला माहीत आहेत." रामांचे वचन ऐकल्यावर, लक्ष्मण हा बिभीषणासह जाण्यास तयार झाला. भयंकर पराक्रम असणाऱ्या लक्ष्मणाने आपले दुसरे एक

जग्राह कार्मुकं श्रेष्ठमन्यद्भीमपराक्रम : ।
रामपादाम्बुजं स्पृष्ट्वा हृष्टः सौमित्रिरब्रवीत् ॥ ७ ॥

उत्तम धनुष्य घेतले. नंतर रामांच्या पदकमलांना स्पर्श करून आनंदित होऊन लक्ष्मण म्हणाला. (६-७)

अद्य मत्कार्मुकान्मुक्ताः शरा निर्भिद्य रावणिम् ।
गमिष्यन्ति हि पातालं स्नातुं भोगवतीजले ॥ ८ ॥

"आज माझ्या धनुष्यावरून सुटलेले हे बाण इंद्रजिताचे भेदन करून, पाताळातील भोगवती नदीच्या पाण्यात स्नान करण्यास जातील." (८)

एवमुक्त्वा स सौमित्रिः परिक्रम्य प्रणम्य तम् ।
इन्द्रजिन्निधनाकाङ्क्षी ययौ त्वरितविक्रमः ॥ ९ ॥

अशा प्रकारे बोलून, लक्ष्मणाने रामांना प्रदक्षिणा घालून प्रणाम केला आणि इंद्रजिताच्या वधाच्या इच्छेने तो वेगाने निघाला. (९)

वानरैर्बहुसाहस्त्रैर्हनूमान्पृष्ठतोऽन्वगात् ।
बिभीषणश्च सहितो मन्त्रिभिस्त्वरितं ययौ ॥ १० ॥

अनेक सहस्त्र वानरांबरोबर हनुमान लक्ष्मणाच्या मागोमाग चालू लागला. मंत्र्यांसह बिभीषणसुद्धा त्वरेने निघाला. (१०)

जाम्बवत्प्रमुखा ऋक्षाः सौमित्रिं त्वरयान्वयुः ।
गत्वा निकुम्भिलादेशं लक्ष्मणो वानरैः सह ॥ ११ ॥

अपश्यद्बलसङ्घातं दूराद्राक्षसङ्कुलम् ।
धनुरायम्य सौमित्रिर्यत्तोऽभूद्भूरिविक्रमः ॥ १२ ॥

जांबवान इत्यादी अस्वलेसुद्धा त्वरेने लक्ष्मणाच्या मागोमाग निघाली. वानरांसह लक्ष्मण जेव्हा निकुंभिला प्रदेशात पोचला, तेव्हा राक्षसांची गर्दी त्याला दुरूनच दिसली. महापराक्रमी लक्ष्मण धनुष्य सज्ज करून तयार झाला. (११-१२)

अङ्गदेन च वीरेण जाम्बवान् राक्षसाधिपः ।
तदा बिभीषणः प्राह सौमित्रिं पश्य राक्षसान् ॥ १३ ॥

वीर अंगदासह जांबवानसुद्धा तयार झाला. त्या वेळी राक्षसांचा अधिपती बिभीषण लक्ष्मणाला म्हणाला, "लक्ष्मणा, हे राक्षस बघ. (१३)

यदेतद्राक्षसानीकं मेघश्यामं विलोक्यते ।
अस्यानीकस्य महतो भेदने यत्नवान् भव ॥ १४ ॥

हे जे मेघाप्रमाणे काळे असे राक्षसांचे सैन्य दिसून येत आहे, त्या प्रचंड सैन्याचा नाश करण्याचा प्रयत्न कर. (१४)

राक्षसेन्द्रसुतोऽप्यस्मिन् भिन्ने दृश्यो भविष्यति ।
अभिद्रवाशु यावद्वै नैतत्कर्म समाप्यते ॥ १५ ॥

हे सैन्य नष्ट झाल्यावर मगच मेघनाद तुला दिसू लागेल. जोपर्यंत मेघनादाने सुरू केलेले हवन पूर्ण झालेले नाही, तोपर्यंतच तू ताबडतोब त्याच्यावर चालून जा. (१५)

जहि वीर दुरात्मानं हिंसापरमधार्मिकम् ।
बिभीषणवचः श्रुत्वा लक्ष्मणः शुभलक्षणः ॥ १६ ॥

ववर्ष शरवर्षाणि राक्षसेन्द्रसुतं प्रति ।
पाषाणैः पर्वताग्रैश्च वृक्षैश्च हरियूथपाः ॥ १७ ॥

निर्जघ्नुः सर्वतो दैत्यांस्तेऽपि वानरयूथपान् ।
परश्वधैः शितैर्बाणैरसिभिर्यष्टितोमरैः ॥ १८ ॥

निर्जघ्नुर्वानरानीकं तदा शब्दो महानभूत् ।
स सम्प्रहारस्तुमुलः संजज्ञे हरिरक्षसाम् ॥ १९ ॥

हे वीरा, हिंसापरायण, अधार्मिक, दुरात्मा अशा मेघनादाला तू त्वरेने ठार कर." हे बिभीषणाचे वचन ऐकल्यावर शुभ लक्षणे असणाऱ्या लक्ष्मणाने मेघनादावर बाणांचा वर्षाव केला. तर वानर समूहांच्या नायकांनी पाषाण, पर्वतशिखरे आणि वृक्ष यांनी दैत्यांवर सर्व बाजूंनी प्रहार केले. तेव्हा त्या राक्षसांनी सुद्धा परशू, तीक्ष्ण बाण, तलवारी आणि तोमर यांनी वानर-समूहांचे नायक व वानर सैन्य यांच्यावर हल्ला केला. त्या वेळी फार कोलाहल झाला. अशा प्रकारे वानर आणि राक्षस यांच्यामध्ये तुमुल युद्ध सुरु झाले. (१६-१९)

इन्द्रजित्स्वबलं सर्वमर्द्यमानं विलोक्य सः ।
निकुम्भिलां च होमं च त्यक्त्वा शीघ्रं विनिर्गतः ॥ २० ॥

आपले सर्व सैन्य सगळीकडून मारले जात आहे हे पाहून, इंद्रजित निकुंभिला आणि होमहवन सोडून सत्वर बाहेर आला. (२०)

रथमारुह्य सधनुः क्रोधेन महतागमत् ।
समाह्वयन् स सौमित्रिं युद्धाय रणमूर्धनि ॥ २१ ॥

अतिशय क्रोधाने धनुष्य घेऊन आणि रथावर आरूढ होऊन तो रणांगणात आला व युद्धासाठी लक्ष्मणाला आव्हान देत म्हणाला. (२१)

सौमित्रे मेघनादोऽहं मया जीवन्न मोक्ष्यसे ।
तत्र दृष्ट्वा पितृव्यं स प्राह निष्ठुरभाषणम् ॥ २२ ॥

"अरे लक्ष्मणा, मी मेघनाद आहे. माझ्याकडून तू आता जिवंत सुटणार नाहीस." आणि तेथेच आपल्या चुलत्याला-बिभीषणाला पाहून तो निष्ठुर शब्द बोलला. (२२)

इहैव जातः संवृद्धः साक्षाद् भ्राता पितुर्मम ।
यस्त्वं स्वजनमुत्सृज्य परभृत्यत्वमागतः ॥ २३ ॥

"अरे काका, तू इथेच लंकेमध्ये जन्मलास आणि वाढलास. तू माझ्या पित्याचा सख्खा भाऊ आहेस. परंतु आता मात्र तू स्वजनांना सोडून देऊन, शत्रूची सेवा पत्करलेली आहेस. (२३)

कथं द्रुह्यसि पुत्राय पापीयानसि दुर्मतिः ।
इत्युक्त्वा लक्ष्मणं दृष्ट्वा हनूमत्पृष्ठतः स्थितम् ॥ २४ ॥

तुझ्या पुत्राप्रमाणेच असलेल्या माझा तू कसा बरे द्रोह करीत आहेस ? तू पापी आणि दुष्ट बुद्धीचा आहेस." बिभीषणाला असे बोलून हनुमानाच्या खांद्यावर बसलेल्या लक्ष्मणाला त्याने पाहिले. (२४)

उद्यदायुधनिस्त्रिंशे रथे महति संस्थितः ।
महाप्रमाणमुद्यम्य घोरं विस्फारयन्धनुः ॥ २५ ॥

अद्य वो मामका बाणाः प्राणान्पास्यन्ति वानराः ।
ततः शरं दाशरथिः सन्धायामित्रकर्षणः ॥ २६ ॥

ससर्ज राक्षसेन्द्राय क्रुद्धः सर्प इव श्वसन् ।
इन्द्रजिद्रक्तनयनो लक्ष्मणं समुदैक्षत ॥ २७ ॥

तेव्हा अनेक आयुधे आणि तलवारी सज्ज करून ठेवलेल्या रथात बसलेल्या मेघनादाने प्रचंड आकाराचे एक धनुष्य उचलून त्याचा भयंकर टणत्कार करून तो म्हणाला, "अरे वानरांनो, आज माझे बाण तुमच्या प्राणांचे प्राशन करतील." त्या वेळी रागाने फूत्कार टाकणाऱ्या सापाप्रमाणे असणाऱ्या आणि शत्रूचे दमन करणाऱ्या लक्ष्मणाने धनुष्यावर बाणाचे संधान करून, तो राक्षसश्रेष्ठ इंद्रजितावर सोडला. तेव्हा रागाने डोळे लाल झालेल्या इंद्रजिताने लक्ष्मणाकडे पाहिले. (२५-२७)

शक्राशनिसमस्पर्शैर्लक्ष्मणेनाहतः शरैः ।
मुहूर्तमभवन्मूढः पुनः प्रत्याहृतेन्द्रियः ॥ २८ ॥

लक्ष्मणाने सोडलेल्या आणि इंद्राच्या वज्राप्रमाणे कठीण असणाऱ्या बाणांचा प्रहार होताच, इंद्रजित एक क्षणभर मूर्च्छित पडला, पण तो पुनः शुद्धीवर आला. (२८)

ददर्शावस्थितं वीरं वीरो दशरथात्मजम् ।
सोऽभिचक्राम सौमित्रिं क्रोधसंरक्तलोचनः ॥ २९ ॥

वीर लक्ष्मण आपणापुढे उभा ठाकला आहे, असे त्या वीर इंद्रजिताला दिसले. तेव्हा रागाने डोळे लाल झालेला इंद्रजित लक्ष्मणावर धावून गेला. (२९)

शरान्धनुषि सन्धाय लक्ष्मणं चेदमब्रवीत् ।
यदि ते प्रथमे युद्धे न दृष्टो मे पराक्रमः ॥ ३० ॥

अद्य त्वां दर्शयिष्यामि तिष्ठेदानीं व्यवस्थितः ।
इत्युक्त्वा सप्तभिर्बाणैरभिविव्याध लक्ष्मणम् ॥ ३१ ॥

दशभिश्च हनूमन्तं तीक्ष्णधारैः शरोत्तमैः ।
ततः शरशतेनैव सम्प्रयुक्तेन वीर्यवान् ॥ ३२ ॥

आणि धनुष्याला बाण जोडून तो लक्ष्मणाला म्हणाला, "जरी पहिल्या युद्धात तुला दिसला नाही, तरी आत्ता मी तुला माझा पराक्रम दाखवतो. माझ्यापुढे तू आता नीट उभा राहा." असे सांगून त्याने सात बाणांनी

क्रोधद्विगुणसंरब्धो निर्बिभेद बिभीषणम् ।
लक्ष्मणोऽपि तथा शत्रुं शरवर्षैरवाकिरत् ॥ ३३ ॥

तस्य बाणैः सुसंविद्धं कवचं काञ्चनप्रभम् ।
व्यशीर्यत रथोपस्थे तिलशः पतितं भुवि ॥ ३४ ॥

ततः शरसहस्रेण सङ्क्रुद्धो रावणात्मजः ।
बिभेद समरे वीरं लक्ष्मणं भीमविक्रमम् ॥ ३५ ॥

व्यशीर्यतापतद्दिव्यं कवचं लक्ष्मणस्य च ।
कृतप्रतिकृतान्योन्यं बभूवतुरभिद्रुतौ ॥ ३६ ॥

अभीक्ष्णं निःश्वसन्तौ तौ युध्येतां तुमुलं पुनः ।
शरसंवृतसर्वाङ्गौ सर्वतो रुधिरोक्षितौ ॥ ३७ ॥

सुदीर्घकालं तौ वीरावन्योन्यं निशितैः शरैः ।
अयुध्येतां महासत्त्वौ जयाजयविवर्जितौ ॥ ३८ ॥

एतस्मिन्नन्तरे वीरो लक्ष्मणः पञ्चभिः शरैः ।
रावणेः सारथिं साश्वं रथं च समचूर्णयत् ॥ ३९ ॥

चिच्छेद कार्मुकं तस्य दर्शयन्हस्तलाघवम् ।
सोऽन्यत्तु कार्मुकं भद्रं सज्यं चक्रे त्वरान्वितः ॥ ४० ॥

तच्चापमपि चिच्छेद लक्ष्मणस्त्रिभिराशुगैः ।
तमेव छिन्नधन्वानं विव्याधानेकसायकैः ॥ ४१ ॥

पुनरन्यत्समादाय कार्मुकं भीमविक्रमः ।
इन्द्रजिल्लक्ष्मणं बाणैः शितैरादित्यसन्निभैः ॥ ४२ ॥

बिभेद वानरान्सर्वान्बाणैरापूरयन्दिशः ।
तत ऐन्द्रं समादाय लक्ष्मणो रावणिं प्रति ॥ ४३ ॥

सन्धायाकृष्य कर्णान्तं कार्मुकं दृढनिष्ठुरम् ।
उवाच लक्ष्मणो वीरः स्मरन् रामपदाम्बुजम् ॥ ४४ ॥

लक्ष्मणाला विद्ध केले, तसेच तीक्ष्ण धार असणाऱ्या दहा उत्तम बाणांनी त्याने हनुमानाला विद्ध केले. त्यानंतर वीर्यशाली आणि रागाने ज्याचा उत्साह द्विगुणित झाला होता, अशा इंद्रजिताने अचूक सोडलेल्या शंभर बाणांनी बिभीषणाला विद्ध केले. लक्ष्मणानेसुद्धा त्याचप्रकारे शत्रूवर बाणांचा वर्षाव केला. (३०-३३)

सोन्याप्रमाणे चमकणारे इंद्रजिताचे चिलखत लक्ष्मणाच्या बाणांनी चांगलेच विद्ध झाल्यामुळे ते फुटले आणि त्याचे तिळाएवढे तुकडे होऊन ते रथाच्या मागील भागात पडून तेथून जमिनीवर पडले. (३४)

तेव्हा क्रुद्ध झालेल्या इंद्रजिताने भयंकर पराक्रमी, वीर अशा लक्ष्मणाला युद्धामध्ये हजारो बाणांनी विद्ध केले. त्यामुळे लक्ष्मणाचे दिव्य कवचही फुटले आणि ते खाली पडले. अशा प्रकारे परस्परांचा प्रतिकार करीत ते दोघे एकमेकावर धावून जाऊन लढू लागले. (३५-३६)

आणि वारंवार निःश्वास टाकणाऱ्या त्या दोघांचे पुनः तुंबळ युद्ध झाले. दोघांची सर्व अंगे सर्व बाजूंनी बाणांनी झाकली गेली आणि ते दोघेही रक्तात न्हाऊन गेले. (३७)

ते दोघे महापराक्रमी वीर दीर्घ काळपर्यंत एकमेकांवर तीक्ष्ण बाण टाकून लढत राहिले. पण कुणाचाही जय अथवा पराजय झाला नाही. (३८)

दरम्यानच्या काळात वीर लक्ष्मणाने पाच बाणांनी इंद्रजिताचा सारथी आणि घोड्यासहित रथ, यांचे चूर्ण करून टाकले. (३९)

आणि आपल्या हाताची चलाखी दाखवीत लक्ष्मणाने त्याचे धनुष्य तोडून टाकले. तेव्हा मेघनादाने दुसरे एक उत्तम धनुष्य त्वरेने सज्ज केले. (४०)

ते धनुष्यसुद्धा लक्ष्मणाने तीन बाणांनी तोडून टाकले आणि ज्याचे धनुष्य तुटले होते अशा मेघनादाला सुद्धा अनेक बाणांनी विद्ध केले. (४१)

तेव्हा पुनः दुसरे नवीन धनुष्य घेऊन, सूर्याप्रमाणे चमकणाऱ्या धारदार बाणांनी, प्रचंड पराक्रम असणाऱ्या इंद्रजिताने लक्ष्मणाला विद्ध केले. तसेच बाणांनी दिशा भरून टाकीत त्याने वानरांनाही विद्ध केले. तेव्हा ऐंद्र बाण धनुष्यावर चढवून व तो इंद्रजितावर रोखून, अतिशय बळकट अशा आपल्या धनुष्याची दोरी त्याने कानापर्यंत ओढली आणि रामांच्या चरणकमळांचे स्मरण करीत वीर लक्ष्मण म्हणाला. (४२-४४)

धर्मात्मा सत्यसन्धश्च रामो दाशरथिर्यदि ।
त्रिलोक्यामप्रतिद्वन्द्वस्तदेनं जहि रावणिम् ॥ ४५ ॥

"जर दशरथपुत्र राम धर्मात्मा, सत्यप्रतिज्ञ आणि तिन्ही लोकात प्रतिद्वंद्वीरहित वीर असेल, तर हे बाणा, तू या रावणपुत्र इंद्रजिताला ठार कर." (४५)

इत्युक्त्वा बाणमाकर्णाद्विकृष्य तमजिह्मगम् ।
लक्ष्मणः समरे वीरः ससर्जेन्द्रजितं प्रति ॥ ४६ ॥

असे बोलून, तो सरळ लक्ष्याचा वेध घेणारा बाण कानापर्यंत ओढून, वीर लक्ष्मणाने इंद्रजितावर सोडला. (४६)

स शरः सशिरस्त्राणं श्रीमज्ज्वलितकुण्डलम् ।
प्रमथ्येन्द्रजितः कायात्पातयामास भूतले ॥ ४७ ॥

ज्यावर चमचमणारी कांतिमान कुंडले होती, असे इंद्रजिताचे शोभिवंत मस्तक शिरस्त्राणासह धडापासून वेगळे करून, त्या बाणाने ते जमिनीवर पाडले. (४७)

ततः प्रमुदिता देवाः कीर्तयन्तो रघूत्तमम् ।
ववर्षुः पुष्पवर्षाणि स्तुवन्तश्च मुहुर्मुहुः ॥ ४८ ॥

तेव्हा आनंदित झालेले देव हे रघूत्तम लक्ष्मणाचे गुणगान करीत आणि वारंवार त्याची स्तुती करीत, त्याच्यावर पुष्पवृष्टी करू लागले. (४८)

जहर्ष शक्रो भगवान्सह देवैर्महर्षिभिः ।
आकाशेऽपि च देवानां शुश्रुवे दुन्दुभिस्वनः ॥ ४९ ॥

देव आणि महर्षी यांच्यासह भगवान इंद्र अतिशय हर्षित झाला आणि आकाशातसुद्धा देवांच्या दुंदुभींचा निनाद ऐकू येऊ लागला. (४९)

विमलं गगनं चासीत्स्थिराभूद्विश्वधारिणी ।
निहतं रावणिं दृष्ट्वा जयजल्पसमन्वितः ॥ ५० ॥

इंद्रजित मारला गेला, हे पाहून आकाश स्वच्छ झाले, जगाला धारण करणारी पृथ्वी स्थिर झाली आणि सर्वत्र जयजयकार होऊ लागला. (५०)

गतश्रमः स सौमित्रिः शङ्खमापूरयद्रणे ।
सिंहनादं ततः कृत्वा ज्याशब्दमकरोद्विभुः ॥ ५१ ॥

श्रम दूर झाल्यावर लक्ष्मणाने शंख फुंकून त्या नादाने रणांगण भरून टाकले आणि त्यानंतर सिंहाप्रमाणे गर्जना करून, त्या प्रभू लक्ष्मणाने धनुष्याच्या दोरीचा टणत्कार केला. (५१)

तेन नादेन संहृष्टा वानराश्च गतश्रमाः ।
वानरेन्द्रैश्च सहितः स्तुवद्भिर्हृष्टमानसैः ॥ ५२ ॥

लक्ष्मणः परितुष्टात्मा ददर्शाभ्येत्य राघवम् ।
हनूमद्राक्षसाभ्यां च सहितो विनयान्वितः ॥ ५३ ॥

ववन्दे भ्रातरं रामं ज्येष्ठं नारायणं विभुम् ।
त्वत्प्रसादाद्रघुश्रेष्ठ हतो रावणिराहवे ॥ ५४ ॥

त्या नादाने वानर अतिशय हृष्ट झाले आणि त्यांचे श्रमही दूर झाले. त्यानंतर ज्यांची मने आनंदित झाली होती आणि जे लक्ष्मणाची स्तुती करीत होते अशा वानर श्रेष्ठांसह तसेच हनुमान व बिभीषण यांना बरोबर घेऊन, अतिशय संतुष्ट झालेल्या लक्ष्मणाने रामांजवळ जाऊन त्यांचे दर्शन घेतले आणि मग त्याने विनयपूर्वक साक्षात प्रभू नारायणस्वरूप आपल्या श्रीराम या ज्येष्ठ भावाला वंदन केले आणि म्हटले, "हे रघुश्रेष्ठा, केवळ तुमच्या कृपाप्रसादामुळे इंद्रजित युद्धात ठार झाला." (५२-५४)

श्रुत्वा तल्लक्ष्मणाद्भक्त्या तमालिङ्ग्य रघूत्तमः ।
मूर्ध्न्यवघ्राय मुदितः सस्नेहमिदमब्रवीत् ॥ ५५ ॥

लक्ष्मणाने भक्तिपूर्वक उच्चारलेले ते वाक्य ऐकून आनंदित झालेल्या रघूत्तमांनी त्याला आलिंगन दिले, त्याच्या मस्तकाचे अवघ्राण केले आणि प्रेमपूर्वक म्हटले. (५५)

साधु लक्ष्मण तुष्टोऽस्मि कर्म ते दुष्करं कृतम् ।
मेघनादस्य निधने जितं सर्वमरिन्दम ॥ ५६ ॥

"हे लक्ष्मणा, छान ! छान ! उत्तम ! मी तुझ्यावर संतुष्ट झालो आहे. तू फार दुष्कर असे कर्म केले आहेस. मेघनादाचे निधन झाल्यामुळे, हे शत्रुमर्दना, आपण जणू काही सर्व जिंकले आहे. (५६)

अहोरात्रैस्त्रिभिर्वीरः कथञ्चिद्विनिपातितः ।
निःसपत्नः कृतोऽस्म्यद्य निर्यास्यति हि रावणः ॥ ५७ ॥

पुत्रशोकान्मया योद्धुं तं हनिष्यामि रावणम् ॥ ५८ ॥

तीन दिवस आणि तीन रात्री युद्ध करून तू कसे का होईना त्या वीर मेघनादाला ठार केले आहेस, त्यामुळे आज तू मला शत्रुरहित केले आहेस. आता पुत्राच्या शोकामुळे व्याकूळ झालेला रावण माझ्याशी युद्ध करण्यास नक्कीच लंकेतून बाहेर येईल. तेव्हा मी त्या रावणाचा वध करीन." (५७-५८)

मेघनादं हतं श्रुत्वा लक्ष्मणेन महाबलम् ।
रावणः पतितो भूमौ मूर्च्छितः पुनरुत्थितः ।
विललापातिदीनात्मा पुत्रशोकेन रावणः ॥ ५९ ॥

इकडे लक्ष्मणाकडून महाबलवान मेघनाद मारला गेला, हे ऐकल्यावर रावण मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. त्यानंतर शुद्धीवर येऊन तो पुनः उठला आणि पुत्र शोकाने त्यांचे मन अतिशय दीन झाल्यामुळे, तो विलाप करू लागला. (५९)

पुत्रस्य गुणकर्माणि संस्मरन्पर्यदेवयत् ।
अद्य देवगणाः सर्वे लोकपाला महर्षयः ॥ ६० ॥

हतमिन्द्रजितं ज्ञात्वा सुखं स्वप्स्यन्ति निर्भयाः ।
इत्यादि बहुशः पुत्रलालसो विललाप ह ॥ ६१ ॥

आपल्या पुत्राचे गुण आणि कर्मे आठवून तो शोक करीत म्हणाला, " इंद्रजित मारला गेला, हे कळल्यावर आज देवांचे सर्व समूह, सर्व लोकपाल आणि सर्व महर्षी भयरहित होऊन सुखाने झोपतील." अशा प्रकारे नाना पद्धतींनी त्या रावणाने पुत्रावरील प्रेमामुळे पुष्कळ विलाप केला. (६०-६१)

ततः परमसंक्रुद्धो रावणो राक्षसाधिपः ।
उवाच राक्षसान्सर्वान्निनाशयिषुराहवे ॥ ६२ ॥

स पुत्रवधसन्तप्तः शूरः क्रोधवशं गतः ।
संवीक्ष्य रावणो बुद्ध्या हन्तुं सीतां प्रदुद्रुवे ॥ ६३ ॥

त्यानंतर राक्षसांचा राजा रावण अतिशय क्रुद्ध झाला आणि त्याने युद्धामध्ये जणू सर्व राक्षसांचा नाश करण्याच्या इच्छेने त्यांना युद्धाला जाण्याची आज्ञा दिली. त्यानंतर पुत्राच्या वधाने संतप्त झालेल्या आणि क्रोधाच्या आहारी गेलेल्या त्या शूर रावणाने स्वतःच्या बुद्धीने काहीसा विचार केला आणि सीतेचा वध करण्यास तो धावत निघाला . (६२-६३)

खड्गपाणिमथायान्तं क्रुद्धं दृष्ट्वा दशाननम् ।
राक्षसीमध्यगा सीता भयशोकाकुलाभवत् ॥ ६४ ॥

रागावलेला रावण हातात खड्ग घेऊन आपल्याकडे येत आहे, हे पाहून राक्षसींच्या वेढ्यात बसलेली सीता भयभीत आणि शोकाकुल झाली. (६४)

एतस्मिन्नन्तरे तस्य सचिवो बुद्धिमान् शुचिः ।
सुपार्श्वो नाम मेधावी रावणं वाक्यमब्रवीत् ॥ ६५ ॥

तितक्यात त्या रावणाचा एक बुद्धिमान, शुद्ध आचरणाचा, आणि विचारी सुपार्श्व नावाचा सचिव रावणाला म्हणाला. (६५)

ननु नाम दशग्रीव साक्षाद्वैश्रवणानुजः ।
वेदविद्याव्रतस्नातः स्वकर्मपरिनिष्ठितः ॥ ६६ ॥

अनेकगुणसम्पन्नः कथं स्त्रीवधमिच्छसि ।
अस्माभिः सहितो युद्धे हत्वा रामं च लक्ष्मणम् ।
प्राप्स्यसे जानकीं शीघ्रमित्युक्तः स न्यवर्तत ॥ ६७ ॥

"हे रावणा, खरोखर तुम्ही साक्षात कुबेराचे धाकटे भाऊ आहात, वेदविद्येचे व्रत तुम्ही घेतले आहे. स्वधर्म आचरण्यात पटाईत आहात. शिवाय अनेक गुणांनी संपन्न आहात. अशा स्थितीत तुम्हांला एका स्त्रीचा वध करण्याची इच्छा कशी बरे झाली ? आम्हा सर्वांना बरोबर घेऊन तुम्ही युद्धात राम व लक्ष्मण यांचा वध करा म्हणजे तुम्हांला सीता लगेच प्राप्त होईल." असे सुपार्श्वाने म्हटल्यावर, रावण परत फिरला. (६६-६७)

ततो दुरात्मा सुहृदा निवेदितं
वचः सुधर्म्यं प्रतिगृह्य रावणः ।
गृहं जगामाशु शुचा विमूढधीः
पुनः सभां च प्रययौ सुहृद्वृतः ॥ ६८ ॥

हितचिंतकाचे ते धर्मानुकूल वचन दुरात्म्या रावणाने मान्य केले. आणि तो चट्‌दिशी आपल्या राजवाड्यात परत गेला. नंतर शोकामुळे बुद्धी मूढ होऊन तो आपल्या सुहृदांसह पुनः राजसभेत गेला. (६८)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

# दशम सर्ग

## रावणाच्या यज्ञाचा विध्वंस व त्याने मंदोदरीची समजूत घालणे

*श्रीमहादेव उवाच*

स विचार्य सभामध्ये राक्षसैः सह मन्त्रिभिः ।
निर्ययौ येऽवशिष्टास्तै राक्षसैः सह राघवम् ॥ १ ॥

शलभः शलभैर्युक्तः प्रज्वलन्तमिवानलम् ।
ततो रामेण निहताः सर्वे ते राक्षसा युधि ॥ २ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, सभेमध्ये राक्षस- मंत्र्यांबरोबर विचार करून, ज्या प्रमाणे एखादा पतंग अन्य पतंगासह पेटत्या अग्नीकडे धावतो, त्या प्रमाणे जे काही राक्षस उरले होते त्यांना बरोबर घेऊन रावण राघवांवर चालून गेला. तेव्हा रामांनी त्या सर्व राक्षसांचा वध केला. (१-२)

स्वयं रामेण निहतस्तीक्ष्णबाणेन वक्षसि ।
व्यथितस्त्वरितं लङ्कां प्रविवेश दशाननः ॥ ३ ॥

नंतर स्वतः रामांनी एका तीक्ष्ण बाणाने रावणाच्या वक्षःस्थळावर प्रहार केला असता, व्याकूळ झालेला रावण त्वरित पुनः लंकेमध्ये प्रविष्ट झाला. (३)

दृष्ट्वा रामस्य बहुशः पौरुषं चाप्यमानुषम् ।
रावणो मारुतेश्चैव शीघ्रं शुक्रान्तिकं ययौ ॥ ४ ॥

रामांचे आणि मारुतीचे फार मोठे अतिमानवी शौर्य पाहून, रावण त्वरित शुक्राचार्यांचे जवळ गेला. (४)

नमस्कृत्य दशग्रीवः शुक्रं प्राञ्जलिरब्रवीत् ।
भगवन् राघवेणैवं लङ्का राक्षसयूथपैः ॥ ५ ॥

विनाशिता महादैत्या निहताः पुत्रबान्धवाः ।
कथं मे दुःखसन्दोहस्त्वयि तिष्ठति सद्गुरौ ॥ ६ ॥

शुक्राला नमस्कार करून व हात जोडून रावण त्याला म्हणाला, "हे भगवन, राघवाने अशा प्रकारे राक्षस समूहांच्या नायकांसह लंका नष्ट करून टाकली आहे आणि मोठमोठे दैत्य, माझे पुत्र व बांधव यांना ठार केले आहे. आपल्यासारखे सद्‌गुरू असताना, माझ्यावर हा दुःखांचा समूह कसा बरे कोसळला आहे ?" (५-६)

इति विज्ञापितो दैत्यगुरुः प्राह दशाननम् ।
होमं कुरु प्रयत्नेन रहसि त्वं दशानन ॥ ७ ॥

रावणाने असा प्रश्न केल्यावर दैत्यांचा गुरू शुक्र रावणाला म्हणाला, "हे रावणा, तू प्रयत्नपूर्वक एकांतात एक होम कर. (७)

यदि विघ्नो न चेद्धोमे तर्हि होमानलोत्थितः ॥ ८ ॥

महान् रथश्च वाहाश्च चापतूणीरसायकाः ।
सम्भविष्यन्ति तैर्युक्तस्त्वमजेयो भविष्यसि ॥ ९ ॥

जर तुझ्या होमात काही विघ्न आले नाही तर त्या होमाच्या अग्नीतून एक प्रचंड रथ, घोडे, धनुष्य, भाता आणि बाण उत्पन्न होतील. त्यांनी तू युक्त झालास, तर तू अजिंक्य होशील. (८-९)

गृहाण मन्त्रान्मद्दत्तान् गच्छ होमं कुरु द्रुतम् ।
इत्युक्तस्त्वरितं गत्वा रावणो राक्षसाधिपः ॥ १० ॥

गुहां पातालसदृशीं मन्दिरे स्वे चकार ह ।
लङ्काद्वारकपाटादि बद्ध्वा सर्वत्र यत्नतः ॥ ११ ॥

होमद्रव्याणि सम्पाद्य यान्युक्तान्याभिचारिके ।
गुहां प्रविश्य चैकान्ते मौनी होमं प्रचक्रमे ॥ १२ ॥

उत्थितं धूममालोक्य महान्तं रावणानुजः ।
रामाय दर्शयामास होमधूमं भयाकुलः ॥ १३ ॥

पश्य राम दशग्रीवो होमं कर्तुं समारभत् ।
यदि होमः समाप्तः स्यात्तदाजेयो भविष्यति ॥ १४ ॥

अतो विघ्नाय होमस्य प्रेषयाशु हरीश्वरान् ।
तथेति रामः सुग्रीवसम्मतेनाङ्गदं कपिम् ॥ १५ ॥

हनूमत्प्रमुखान्वीरानादिदेश महाबलान् ।
प्राकारं लङ्घयित्वा ते गत्वा रावणमन्दिरम् ॥ १६ ॥

दशकोट्यः प्लवङ्गानां गत्वा मन्दिररक्षकान् ।
चूर्णयामासुरश्वांश्च गजांश्च न्यहनन् क्षणात् ॥ १७ ॥

ततश्च सरमा नाम प्रभाते हस्तसंज्ञया ।
बिभीषणस्य भार्या सा होमस्थानमसूचयत् ॥ १८॥

गुहापिधानपाषाणमङ्गदः पादघट्टनैः ।
चूर्णयित्वा महासत्त्वः प्रविवेश महागुहाम् ॥ १९ ॥

दृष्ट्वा दशाननं तत्र मीलिताक्षं दृढासनम् ।
ततोऽङ्गदाज्ञया सर्वे वानरा विविशुर्द्रुतम् ॥ २० ॥

तत्र कोलाहलं चक्रुस्ताडयन्तश्च सेवकान् ।
सम्भारांश्चिक्षिपुस्तस्य होमकुण्डे समन्ततः ॥ २१ ॥

मी देतो ते मंत्र घे. जा आता. चट्दिशी होम कर." शुक्राने असे सांगितले असता, राक्षसराज रावण तेथून त्वरेने निघाला. (१०)

आपल्या महालात त्याने पातळासारखी एक गुहा तयार केली. नंतर प्रयत्नपूर्वक लंकेची सगळीकडची दारे, कवाडे इत्यादी बंद करून आणि अभिचार कर्मासाठी शास्त्रात सांगितलेली सर्व होम- द्रव्ये संपादन केली, मग गुहेत प्रवेश करून, मौन धारण करून, त्याने एकांतात होम करण्यास प्रारंभ केला. (११-१२)

त्या होमातून उठणारा तो प्रचंड धूर बिभीषणाने पाहिला. तेव्हा भयभीत होऊन त्याने तो रामांना दाखविला. (१३)

(आणि तो म्हणाला,) "हे रामा, पाहा, रावणाने होम करण्यास आरंभ केला आहे. हा होम जर निर्विघ्नपणे पूर्ण होईल, तर रावण अजेय होईल. (१४)

म्हणून रावणाच्या होमात विघ्न करण्यासाठी तुम्ही श्रेष्ठ वानरांना त्वरित पाठवून द्या." "ठीक आहे" असे म्हणून सुग्रीवाच्या संमतीने रामांनी अंगद आणि हनुमान इत्यादी महाबलवान वानर वीर यांना आज्ञा केली. त्या प्रमाणे मग ते लंकेचा तट ओलांडून रावणाच्या महालाकडे गेले. (१५-१६)

दहा कोटी वानर तेथे गेले आणि त्यांनी महालाच्या रक्षकांचे चूर्ण केले आणि एका क्षणात त्यांनी घोडे व हत्ती यांनाही ठार केले. (१७)

त्यानंतर प्रात:काल होताच, सरमा नावाच्या बिभीषणाच्या भार्येने हाताने खूण करून रावणाच्या होमाचे स्थान वानरांना दाखविले . (१८)

गुहेच्या तोंडावर ठेवलेल्या पाषाणाचे अंगदाने आपल्या पायाच्या प्रहारांनी चूर्ण केले आणि तो महापराक्रमी अंगद त्या प्रचंड गुहेत शिरला. (१९)

तेथे डोळे मिटून, दृढ आसन घालून बसलेल्या रावणाला पाहिल्यानंतर अंगदाच्या आज्ञेने सर्व वानर चट्दिशी गुहेत शिरले. (२०)

गुहेत उपस्थित असणाऱ्या सेवकांना बदडून काढीत वानरांनी कोलाहल केला आणि इकडे तिकडे असलेली होमाची द्रव्य-सामग्री त्यांनी त्या होमकुंडात फेकून दिली. (२१)

स्रुवमाच्छिद्य हस्ताच्च रावणस्य बलाद्रुषा ।
तेनैव सञ्जघानाशु हनूमान् प्लवगाग्रणी: ॥ २२ ॥

रागावलेल्या वानराग्रणी हनुमानाने बळजबरीने रावणाच्या हातातून स्रुवा हिसकावून घेतली आणि तिनेच तो रावणाला मारू लागला. (२२)

घ्नन्ति दन्तैश्च काष्ठैश्च वानरास्तमितस्तत: ।
न जहौ रावणो ध्यानं हतोऽपि विजिगीषया ॥ २३ ॥

इकडून तिकडून सर्व बाजूंनी वानर आपल्या दातांनी रावणाला चावू लागले आणि लाकडांनी त्याला चोपू लागले. तथापि शत्रूवर विजय मिळविण्याच्या इच्छेमुळे असा मार बसला, तरी रावणाने आपले ध्यान सोडले नाही. (२३)

प्रविश्यान्त:पुरे वेश्मन्यङ्गदो वेगवत्तर: ।
समानयत्केशबन्धे धृत्वा मन्दोदरीं शुभाम् ॥ २४ ॥

इकडे अंगद अतिशय वेगाने (रावणाच्या) अंत:पुरातील महालात शिरला आणि शुभलक्षणा मंदोदरीची वेणी पकडून तो तिला त्या गुहेत घेऊन आला. (२४)

रावणस्यैव पुरतो विलपन्तीमनाथवत् ।
विददाराङ्गदस्तस्या: कञ्चुकं रत्नभूषितम् ॥ २५ ॥

रावणाच्या पुढेच ती मंदोदरी अनाथ स्त्री असल्याप्रमाणे विलाप करू लागली, तेव्हा अंगदाने रत्नाने भूषित अशी तिची चोळी फाडली. (२५)

मुक्ता विमुक्ता: पतिता: समन्ताद्रत्नसञ्चयै: ।
श्रोणिसूत्रं निपतितं त्रुटितं रत्नचित्रितम् ॥ २६ ॥

त्या चोळीवरील तुटलेले मोती रत्नांच्या समूहांसह इतस्तत: गळून पडले. तसेच तिचा रत्नखचित कंबरपट्टा सुद्धा तुटून खाली पडला. (२६)

कटिप्रदेशाद्विस्रस्ता नीवी तस्यैव पश्यत: ।
भूषणानि च सर्वाणि पतितानि समन्तत: ॥ २७ ॥

रावण पाहात असतांनाच, तिच्या साडीची निरी ढिली होऊन ती कटिप्रदेशावरून खाली घसरली. आणि तिचे सर्व अलंकार सगळीकडे विखरून पडले. (२७)

देवगन्धर्वकन्याश्च नीता हृष्टै: प्लवङ्गमै: ।
मन्दोदरी रुरोदाथ रावणस्याग्रतो भृशम् ॥ २८ ॥

आनंदित झालेल्या वानरांनी रावणाच्या भार्या असणाऱ्या किंवा त्याच्या बंदीत असणाऱ्या देव आणि गंधर्व यांच्या कन्यांनाही गुहेत नेले. तेव्हा रावणाच्यापुढे मंदोदरी मोठ्यांदा रडू लागली. (२८)

क्रोशन्ती करुणं दीना जगाद दशकन्धरम् ।
निर्लज्जोऽसि परैरेवं केशपाशे विकृष्यते ॥ २९ ॥

भार्या तवैव पुरत: किं जुहोषि न लज्जसे ।
हन्यते पश्यतो यस्य भार्या पापैश्च शत्रुभि: ॥ ३० ॥

मर्तव्यं तेन तत्रैव जीवितान्मरणं वरम् ।
हा मेघनाद ते माता क्लिश्यते बत वानरै: ॥ ३१ ॥

दीन होऊन करुण स्वरात आक्रोश करीत मंदोदरी रावणाला म्हणाली, "तुम्ही अगदी निर्लज्ज आहात. तुमचीच बायको तुमच्याच पुढे परक्याकडून वेणी धरून खेचली जात आहे. तरीसुद्धा तुम्ही कसे बरे होम करीत बसला आहात? तुम्हांला लाज कशी वाटत नाही ? डोळ्यांदेखत ज्याची पत्नी पापी शत्रूकडून त्रस्त केली जाते, त्याने तेथेच तत्काळ मरून जावयास हवे. जगण्यापेक्षा मरण हेच त्याला अधिक चांगले आहे. हाय रे मेघनादा, अरेरे, तुझी ही आई वानरांकडून क्लेश भोगीत आहे. (२९-३१)

त्वयि जीवति मे दु:खमीदृशं च कथं भवेत् ।
भार्या लज्जा च सन्त्यक्ता भर्त्रा मे जीविताशया ॥ ३२ ॥

अरे पुत्रा, तू जिवंत असतास तर मला असले दु:ख कसे बरे झाले असते ? स्वत:चे जीवन रक्षण करण्यासाठी माझ्या पतीने आपली भार्या आणि आपली लज्जा, हे दोन्हीही सोडून दिले आहेत." (३२)

श्रुत्वा तद्देवितं राजा मन्दोदर्या दशाननः ।
उत्तस्थौ खड्गमादाय त्यज देवीमिति ब्रुवन् ॥ ३३ ॥

जघानाङ्गदमव्यग्रः कटिदेशे दशाननः ।
तदोत्सृज्य ययुः सर्वे विध्वंस्य हवनं महत् ॥ ३४ ॥

मंदोदरीचा तो दुःखमय विलाप ऐकून राजा रावण खड्ग घेऊन उभा राहिला आणि " अरे, सोड माझ्या राणीला." असे म्हणत त्याने नेमका अंगदाच्या कटिप्रदेशावर प्रहार केला. तेव्हा तेथे असणाऱ्या विपुल हवन-सामुग्रीचा विध्वंस करून, सगळे वानर ते स्थान सोडून निघून गेले. (३३-३४)

रामपार्श्वमुपागम्य तस्थुः सर्वे प्रहर्षिताः ॥ ३५ ॥

आणि अतिशय आनंदित झालेले ते वानर रामांजवळ येऊन उभे राहिले. (३५)

रावणस्तु ततो भार्यामुवाच परिसान्त्वयन् ।
दैवाधीनमिदं भद्रे जीवता किं न दृश्यते ।
त्यज शोकं विशालाक्षि ज्ञानमालम्ब्य निश्चितम् ॥ ३६ ॥

त्यानंतर आपल्या भार्येचे सांत्वन करीत रावण तिला म्हणाला, "हे कल्याणी, हे जे सर्व काही घडले ते दैवाच्या अधीन होते. जिवंत असणाऱ्या प्राण्याला या जगात काय काय पाहावे लागत नाही ? विशालनयने, हे सत्य जाणून घेऊन तू शोक करणे सोडून दे. (३६)

अज्ञानप्रभवः शोकः शोको ज्ञानविनाशकृत् ।
अज्ञानप्रभवाहन्धीः शरीरादिष्वनात्मसु ॥ ३७ ॥

अज्ञानामुळे शोक उत्पन्न होतो. शोक हा ज्ञानाचा नाश करणारा आहे. शरीर इत्यादी जड पदार्थांवर 'मी 'अशी बुद्धी अज्ञानानेच निर्माण होते. (३७)

तन्मूलः पुत्रदारादिसम्बन्धः संसृतिस्ततः ।
हर्षशोकभयक्रोधलोभमोहस्पृहादयः ॥ ३८ ॥

अज्ञानप्रभवा ह्येते जन्ममृत्युजरादयः ।
आत्मा तु केवलं शुद्धो व्यतिरिक्तो ह्यलेपकः ॥ ३९ ॥

आनन्दरूपो ज्ञानात्मा सर्वभावविवर्जितः ।
न संयोगो वियोगो वा विद्यते केनचित्सतः ॥ ४० ॥

त्या अहंकारामुळेच पुत्र, पत्नी इत्यादींचा संबंध तसेच त्यापासूनच संसार उत्पन्न होतो. हर्ष, शोक, भय, क्रोध, लोभ, मोह, स्पृहा इत्यादी तसेच हे जन्म, मृत्यू, जरा इत्यादी अज्ञानापासूनच उत्पन्न होतात. याउलट आत्मा हा या सर्वांपेक्षा वेगळा, एकमात्र, शुद्ध, अलिप्त लेपरहित, आनंदरूप, ज्ञानस्वरूप, आणि सर्व भावांनी रहित असा आहे; सत्-अस्तित्व हे स्वरूप असणाऱ्या आत्म्याचा कुणाशीही, कशाशीही संयोग अगर वियोग होत नाही. (३८-४०)

एवं ज्ञात्वा स्वमात्मानं त्यज शोकमनिन्दिते ।
इदानीमेव गच्छामि हत्वा रामं सलक्ष्मणम् ॥ ४१ ॥

आगमिष्यामि नोचेन्मां दारयिष्यति सायकैः ।
श्रीरामो वज्रकल्पैश्च ततो गच्छामि तत्पदम् ॥ ४२ ॥

हे प्रिये, स्वतःच्या आत्म्याचे असे स्वरुप जाणून तू शोक करणे सोडून दे. हा मी लगेच जातो आणि लक्ष्मणासह रामाला ठार करून परत येतो. असे घडले नाही तर तो श्रीराम आपल्या वज्रासारख्या बाणांनी मला छिन्न भिन्न करील. तसे घडले तर मी त्या रामाच्या पदी जाईन. (४१-४२)

तदा त्वया मे कर्तव्या क्रिया मच्छासनात्प्रिये ।
सीतां हत्वा मया सार्धं त्वं प्रवेक्ष्यसि पावकम् ॥ ४३ ॥

हे प्रिये, त्या वेळी तू माझ्या आज्ञेने एक काम कर. सीतेला ठार करून माझ्या मृतदेहाबरोबर तू अग्नीमध्ये प्रवेश कर." (४३)

एवं श्रुत्वा वचस्तस्य रावणस्यातिदुःखिता ।
उवाच नाथ मे वाक्यं शृणु सत्यं तथा कुरु ॥ ४४ ॥

रावणाचे अशा प्रकारे बोलणे ऐकल्यावर अतिशय दुःखी झालेली ती मंदोदरी म्हणाली, "हे नाथा, मी तुम्हांला खरे सांगते, ते ऐका. आणि मग हवे ते करा. (४४)

शक्यो न राघवो जेतुं त्वया चान्यैः कदाचन ।
रामो देववरः साक्षात्प्रधानपुरुषेश्वरः ॥ ४५ ॥

तुमच्याकडून अगर अन्य कुणाकडून रामाला जिंकले जाणे, हे कधीही शक्य होणार नाही. कारण देवाधिदेव राम हे साक्षात प्रकृती आणि पुरुष यांचे स्वामी आहेत. (४५)

मत्स्यो भूत्वा पुरा कल्पे मनुं वैवस्वतं प्रभुः ।
ररक्ष सकलापद्भ्यो राघवो भक्तवत्सलः ॥ ४६ ॥

पूर्वीच्या कल्पात मत्स्य होऊन भक्तवत्सल प्रभू राघवांनी सर्व संकटातून वैवस्वत मनूचे रक्षण केले होते. (४६)

रामः कूर्मोऽभवत्पूर्वं लक्षयोजनविस्तृतः ।
समुद्रमथने पृष्ठे दधार कनकाचलम् ॥ ४७ ॥

पूर्वी राम हे एक लक्ष योजने विस्तार असणारे कूर्म झाले होते. आणि समुद्र मंथनाचे वेळी त्यांनी आपल्या पाठीवर सुमेरू या सुवर्णपर्वताला धारण केले होते. (४७)

हिरण्याक्षोऽतिदुर्वृत्तो हतोऽनेन महात्मना ।
क्रोडरूपेण वपुषा क्षोणीमुद्धरता क्वचित् ॥ ४८ ॥

एकादा वराहाचे रूप धारण करून पृथ्वीला वर उचलून काढताना याच महात्म्या रामांनी अती दुराचारी हिरण्याक्षाला ठार केले होते. (४८)

त्रिलोककण्टकं दैत्यं हिरण्यकशिपुं पुरा ।
हतवान्नारसिंहेन वपुषा रघुनन्दनः ॥ ४९ ॥

पूर्वी नरसिंहाचे शरीर धारण करून रामांनी त्रैलोक्याला त्रासदायक झालेल्या हिरण्यकशिपू दैत्याचा वध केला होता. (४९)

विक्रमैस्त्रिभिरेवासौ बलिं बद्ध्वा जगत्त्रयम् ।
आक्रम्यादात्सुरेन्द्राय भृत्याय रघुसत्तमः ॥ ५० ॥

वामन अवतारात बळीला बांधून आणि तीन पावलांनी तिन्ही लोक व्यापून याच रामांनी आपला सेवक जो इंद्र त्याला राज्य दिले होते. (५०)

राक्षसाः क्षत्रियाकारा जाता भूमेर्भरावहाः ।
तान्हत्वा बहुशो रामो भुवं जित्वा ह्यदान्मुनेः ॥ ५१ ॥

एके काळी क्षत्रियांच्या स्वरूपात जन्माला आलेले राक्षस हे भूमीला भारभूत झाले, तेव्हा रामांनी परशुरामाचे रूप धारण करून त्या क्षत्रियांना अनेक वेळा नष्ट केले आणि पृथ्वी जिंकून ती त्यांनी कश्यप नावाच्या मुनींना देऊन टाकली. (५१)

स एव साम्प्रतं जातो रघुवंशे परात्परः ।
भवदर्थे रघुश्रेष्ठो मानुषत्वमुपागतः ॥ ५२ ॥

तेच परात्पर परमात्मा सध्या रघुवंशामध्ये उत्पन्न झाले आहेत. तुमच्यासाठी त्या रघुश्रेष्ठांनी मानवाचे रूप धारण केले आहे. (५२)

तस्य भार्या किमर्थं वा हृता सीता वनाद्बलात् ।
मम पुत्रविनाशार्थं स्वस्यापि निधनाय च ॥ ५३ ॥

माझ्या पुत्रांच्या नाशासाठी आणि तुमच्या स्वतःच्या मरणासाठी, तुम्ही त्या रामांची भार्या सीता वनातून बळजबरीने कशासाठी बरे अपहरण करून आणलीत? (५३)

इतः परं वा वैदेहीं प्रेषयस्व रघूत्तमे ।
बिभीषणाय राज्यं तु दत्त्वा गच्छामहे वनम् ॥ ५४ ॥

आता तरी वैदेहीला रामांकडे परत पाठवा आणि बिभीषणाला राज्य देऊन आपण वनात जाऊ." (५४)

मन्दोदरीवचः श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् ।
कथं भद्रे रणे पुत्रान् भ्रातृन् राक्षसमण्डलम् ॥ ५५ ॥

घातयित्वा राघवेण जीवामि वनगोचरः ।
रामेण सह योत्स्यामि रामबाणैः सुशीघ्रगैः ॥ ५६ ॥

मंदोदरीचे वचन ऐकल्यावर रावण म्हणाला, "अग भद्रे, युद्धामध्ये पुत्र, भाऊ व राक्षस यांचा वध राघवांकडून झाल्यावर मी वनात जाऊन कसा बरे जिवंत राहू? आता मी रामांबरोबर युद्ध करणारच आणि रामांच्या शीघ्रगामी बाणांनी मी विदीर्ण होऊन मरून गेल्यावर विष्णूच्या परमपदाला जाईन. राघव हे विष्णू आहेत आणि जानकी या लक्ष्मी आहेत हे मला नक्की माहीत आहे. आणि ते माहीत असल्यामुळेच, रामांच्या हातून मरण

विदार्यमाणो यास्यामि तद्विष्णोः परमं पदम् ।
जानामि राघवं विष्णुं लक्ष्मीं जानामि जानकीम् ।
ज्ञात्वैव जानकी सीता मयानीता वनाद्बलात् ॥ ५७ ॥

रामेण निधनं प्राप्य यास्यामीति परं पदम् ।
विमुच्य त्वां तु संसाराद्गमिष्यामि सह प्रिये ॥ ५८ ॥

मिळाल्यावर मी परम पदाला जाईन, असा विचार करून मी सीतेला वनातून बळजबरीने हरण करून आणले होते. हे प्रिये , आता तुला सोडून मी अन्य राक्षसांसह या संसारातून निघून जाईन. (५५-५८)

परानन्दमयी शुद्धा सेव्यते या मुमुक्षुभिः ।
तां गतिं तु गमिष्यामि हतो रामेण संयुगे ॥ ५९ ॥

मुमुक्षु लोक परमानंदमय आणि शुद्ध अशा गतीचे सेवन करतात, तीच गती युद्धात रामांनी ठार केल्यावर मला मिळेल. (५९)

प्रक्षाल्य कल्मषाणीह मुक्तिं यास्यामि दुर्लभाम् ॥ ६० ॥

आपली पापे धुऊन टाकून मी दुर्लभ अशा मुक्तीला पोहोचेन. (६०)

क्लेशादिपञ्चकतरङ्गयुतं भ्रमाढ्यं
दारात्मजाप्तधनबन्धुझषाभियुक्तम् ।
और्वानलाभनिजरोषमनङ्गजालं
संसारसागरमतीत्य हरिं व्रजामि ॥ ६१ ॥

ज्यामध्ये अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश हे पाच क्लेशरूपी तरंग उठत आहेत, जो भ्रमरूपी भोवऱ्यांनी भरलेला आहे, ज्यात पत्नी, पुत्र, आप्त, धन, बंधू हेच मत्स्य इत्यादी जलचर आहेत, ज्यामध्ये स्वतःचा क्रोध हाच वडवानल आहे आणि ज्यात मदनरूपी जाळे पसरलेले आहे, असा संसारसागर ओलांडून मी हरीकडे जाईन." (६१)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥

# एकादश सर्ग

## राम- रावण- संग्राम आणि रावणाचा वध

*श्रीमहादेव उवाच*

इत्युक्त्वा वचनं प्रेम्णा राज्ञीं मन्दोदरीं तदा ।
रावणः प्रययौ योद्धुं रामेण सह संयुगे ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले—** हे पार्वती, अशा प्रकारे त्या वेळी महाराणी मंदोदरीला प्रेमपूर्वक सांगून, रावण रामांबरोबर युद्ध करण्यास रणभूमीकडे निघून गेला. (१)

दृढं स्यन्दनमास्थाय वृतो घोरैर्निशाचरैः ।
चक्रैः षोडशभिर्युक्तं सवरूथं सकूबरम् ॥ २ ॥

पिशाचवदनैर्घोरैः खरैर्युक्तं भयावहम् ।
सर्वास्त्रशस्त्रसहितं सर्वोपस्करसंयुतम् ॥ ३ ॥

निश्चक्रामाथ सहसा रावणो भीषणाकृतिः ।
आयान्तं रावणं दृष्ट्वा भीषणं रणकर्कशम् ॥ ४ ॥

भयंकर राक्षसांनी वेढलेला तो रावण एका बळकट रथावर चढला. सोळा चाकांनी युक्त असणाऱ्या त्या रथाला वरूथ* आणि कूबर** होते; पिशांच्चासारखी तोंडे असणारी भयानक गाढवे त्याला जोडली होती, तो रथ भय निर्माण करणारा होता; तो सर्व प्रकारच्या अस्त्रांनी आणि शस्त्रांनी सुसज्ज होता; तसेच अन्य प्रकारच्या सर्व युद्धसामग्रीने भरलेला होता. अशा रथात आरोहण करून भयानक रूप असणारा रावण त्वेषाने लंकेतून बाहेर पडला. रणांगणात कठोर असणारा भयानक रावण येत

*रथाच्या रक्षणासाठी बनविलेले लोखंड इत्यादींचे आच्छादन वा छप्पर. ** ज्याला जू बांधले जाते तो रथाचा भाग.

सन्त्रस्ताभूत्तदा सेना वानरी रामपालिता ॥ ५ ॥

आहे, हे पाहून रामांनी रक्षिलेली ती वानरसेना तेव्हा अतिशय भयभीत झाली. (२-५)

हनूमानथ चोत्प्लुत्य रावणं योद्धुमाययौ ।
आगत्य हनुमान् रक्षोवक्षस्यतुलविक्रमः ॥ ६ ॥

मुष्टिबन्धं दृढं बद्ध्वा ताडयामास वेगतः ।
तेन मुष्टिप्रहारेण जानुभ्यामपतद्रथे ॥ ७ ॥

त्या वेळी हनुमान उडी मारून रावणाशी युद्ध करण्यास आला. आल्याबरोबर अतुलनीय पराक्रम असणाऱ्या हनुमानाने हाताची मूठ घट्ट आवळून वेगाने रावणाच्या वक्षःस्थळावर प्रहार केला. त्या मुष्टीच्या प्रहाराने रावण रथातच गुडघ्यांवर पडला. (६-७)

मूर्च्छितोऽथ मुहूर्तेन रावणः पुनरुत्थितः ।
उवाच च हनूमन्तं शूरोऽसि मम सम्मतः ॥ ८ ॥

नंतर मूर्च्छित झालेला रावण थोड्या वेळाने पुनः सावध होऊन उठला आणि हनुमंताला म्हणाला, "तू शूर आहेस, हे मला मान्य आहे." (८)

हनूमानाह तं धिङ्मां यस्त्वं जीवसि रावण ।
त्वं तावन्मुष्टिना वक्षो मम ताडय रावण ॥ ९ ॥

तेव्हा हनुमान त्याला म्हणाला, "अरे रावणा, माझा धिक्कार असो. कारण माझा मुष्टि-प्रहार लागूनही तू जिवंत राहिला आहेस. आता हे रावणा, तू तुझ्या मुठीने माझ्या वक्षःस्थळावर प्रहार कर. (९)

पश्चान्मया हतः प्राणान्मोक्ष्यसे नात्र संशयः ।
तथेति मुष्टिना वक्षो रावणेनापि ताडितः ॥ १० ॥

त्यानंतर मी पुनः प्रहार केल्यावर तू प्राण सोडशील यात संशय नाही." "ठीक आहे," असे म्हणून रावणानेसुद्धा (हनुमानाच्या) छातीवर मुष्टीचा प्रहार केला. (१०)

विघूर्णमाननयनः किञ्चित्कश्मलमाययौ ।
संज्ञामवाप्य कपिराड् रावणं हन्तुमुद्यतः ॥ ११ ॥

रावणाचा ठोसा लागताच मारुतीचे डोळे गरगरू लागले आणि तो काही काळ बेशुद्ध पडला. नंतर शुद्धीवर आल्यावर हनुमान रावणाला मारण्यास सिद्ध झाला. (११)

ततोऽन्यत्र गतो भीत्या रावणो राक्षसाधिपः ।
हनूमानङ्गदश्चैव नलो नीलस्तथैव च ॥ १२ ॥

चत्वारः समवेत्याग्रे दृष्ट्वा राक्षसपुङ्गवान् ।
अग्निवर्णं तथा सर्परोमाणं खड्गरोमकम् ॥ १३ ॥

तथा वृश्चिकरोमाणं निर्जघ्नुः क्रमशोऽसुरान् ।
चत्वारश्चतुरो हत्वा राक्षसान् भीमविक्रमान् ।
सिंहनादं पृथक् कृत्वा रामपार्श्वमुपागताः ॥ १४ ॥

तेव्हा राक्षसराज रावण भीतीने दुसरीकडे निघून गेला. तितक्यात हनुमान, अंगद, नल तसेच नील हे चौघेजण एकत्र आले. त्यांना आपल्यापुढे उभे असलेले अग्निवर्ण, सर्परोमा, खड्गरोमा तसेच वृश्चिकरोमा असे चार राक्षसश्रेष्ठ दिसले. तेव्हा त्या चार वानरवीरांनी महापराक्रमी असणाऱ्या त्या चार राक्षसांना क्रमाने ठार केले, आणि वेगवेगळे सिंहनाद करीत ते चौघे रामांजवळ आले. (१२-१४)

ततः क्रुद्धो दशग्रीवः सन्दश्य दशनच्छदम् ॥ १५ ॥

विवृत्य नयने क्रूरो राममेवान्वधावत ।
दशग्रीवो रथस्थस्तु रामं वज्रोपमैः शरैः ॥ १६ ॥

आजघान महाघोरैर्धाराभिरिव तोयदः ।
रामस्य पुरतः सर्वान्वानरानपि विव्यथे ॥ १७ ॥

नंतर क्रूर रावण रागावला, आणि दात-ओठ खात डोळे वटारून तो रामांकडेच धावला. मेघ ज्या प्रमाणे महाभयंकर पाण्याच्या धारांनी तडाखे देतो, त्या प्रमाणे रथस्थ रावणाने वज्राप्रमाणे असणाऱ्या बाणांनी रामांवर प्रहार केले, आणि रामांच्यापुढे उभे असणाऱ्या सर्व वानरांनासुद्धा त्याने विद्ध केले. (१५-१७)

ततः पावकसङ्काशैः शरैः काञ्चनभूषणैः ।
अभ्यवर्षद्रणे रामो दशग्रीवं समाहितः ॥ १८ ॥

तेव्हा रामांनी अग्नीप्रमाणे तेजस्वी आणि सोन्याने भूषित अशा बाणांनी रावणावर वर्षाव केला. (१८)

रथस्थं रावणं दृष्ट्वा भूमिष्ठं रघुनन्दनम् ।
आहूय मातलिं शक्रो वचनं चेदमब्रवीत् ॥ १९ ॥

रावण रथात बसलेला आहे आणि राम जमिनीवर उभे आहेत, हे पाहून इकडे स्वर्गात इंद्राने मातली नावाच्या सारथ्याला बोलावून घेऊन सांगितले. (१९)

रथेन मम भूमिष्ठं शीघ्रं याहि रघूत्तमम् ।
त्वरितं भूतलं गत्वा कुरु कार्यं ममानघ ॥ २० ॥

"हे मातले, माझा रथ घेऊन तू ताबडतोब जमिनीवर उभ्या असणाऱ्या रघूत्तमाकडे जा. झट्दिशी पृथ्वीतलावर जाऊन तू माझे हे काम कर." (२०)

एवमुक्तोऽथ तं नत्वा मातलिर्देवसारथिः ।
ततो हयैश्च संयोज्य हरितैः स्यन्दनोत्तमम् ॥ २१ ॥

स्वर्गाज्जयार्थं रामस्य ह्युपचक्राम मातलिः ।
प्राञ्जलिर्देवराजेन प्रेषितोऽस्मि रघूत्तम ॥ २२ ॥

इंद्राने असे सांगितल्यानंतर, त्याला नमस्कार करून, देवसारथी मातलीने आपल्या उत्तम रथाला हिरव्या रंगाचे घोडे जोडले आणि रामांच्या जयासाठी तो स्वर्गातून निघून रामांजवळ आला आणि श्रीरामापुढे हात जोडून उभे राहून तो म्हणाला, "हे रघूत्तमा, देवराज इंद्राने मला तुमच्याकडे पाठविले आहे. (२१-२२)

रथोऽयं देवराजस्य विजयाय तव प्रभो ।
प्रेषितश्च महाराज धनुरैन्द्रं च भूषितम् ॥ २३ ॥

अभेद्यं कवचं खड्गं दिव्यतूणीयुगं तथा ।
आरुह्य च रथं राम रावणं जहि राक्षसम् ॥ २४ ॥

मया सारथिना देव वृत्रं देवपतिर्यथा ।
इत्युक्तस्तं परिक्रम्य नमस्कृत्य रथोत्तमम् ॥ २५ ॥

आरुरोह रथं रामो लोकाँल्लक्ष्म्या नियोजयन् ।
ततोऽभवन्महायुद्धं भैरवं रोमहर्षणम् ॥ २६ ॥

महात्मनो राघवस्य रावणस्य च धीमतः ।
आग्नेयेन च आग्नेयं दैवं दैवेन राघवः ॥ २७ ॥

अस्त्रं राक्षसराजस्य जघान परमास्त्रवित् ।
ततस्तु ससृजे घोरं राक्षसं चास्त्रमस्त्रवित् ।
क्रोधेन महताविष्टो रामस्योपरि रावणः ॥ २८ ॥

हे प्रभो, हा देवराज इंद्राचा रथ तुम्हांला विजय मिळावा म्हणून पाठविला आहे. तसेच हे महाराज, अतिशय शोभिवंत असे ऐंद्र धनुष्य, अभेद्य कवच, खड्ग आणि दिव्य भात्यांची जोडी हेही इंद्राने पाठविले आहेत. तेव्हा हे रामा, मी सारथी असताना ज्या प्रमाणे इंद्राने वृत्रासुराला ठार केले, त्या प्रमाणे तुम्ही या रथावर आरूढ होऊन राक्षस रावणाचा वध करा." मातलीने असे म्हटल्यावर, त्या उत्तम रथाला प्रदक्षिणा घालून व त्याला नमस्कार करून, लोकांना आनंद देत, राम त्या रथावर आरूढ झाले. त्यानंतर महात्मा राघव आणि बुद्धिमान् रावण यांच्यामध्ये अतिशय भीषण व रोमांचकारी महायुद्ध सुरू झाले. त्या श्रेष्ठ अस्त्रवेत्त्या राघवाने रावणाच्या आग्नेयास्त्राला आग्नेयास्त्राने आणि दैवास्त्राला दैवास्त्राने तोडून टाकले. तेव्हा अतिशय क्रोधाने पछाडलेल्या त्या अस्त्रवेत्या रावणाने रामांवर एक भयानक राक्षस -अस्त्र सोडले. (२३-२८)

रावणस्य धनुर्मुक्ताः सर्पा भूत्वा महाविषाः ।
शराः काञ्चनपुङ्खाभा राघवं परितोऽपतन् ॥ २९ ॥

ज्यांचे पुंख (मागील भाग) सोन्याप्रमाणे चमकत होते, असे रावणाच्या धनुष्यातून सुटलेले बाण भयंकर विष असणारे साप होऊन, रामांच्या सर्व बाजूंना पडू लागले. (२९)

तैः शरैः सर्पवदनैर्वमद्भिरनलं मुखैः ।
दिशश्च विदिशश्चैव व्याप्तास्तत्र तदाभवन् ॥ ३० ॥

त्या वेळी तोंडातून आग ओकणाऱ्या त्या सर्पमुखी बाणांनी तेथे सर्व दिशा- उपदिशा व्यापून गेल्या. (३०)

राम: सर्पांस्ततो दृष्ट्वा समन्तात्परिपूरितान् ।
सौपर्णमस्त्रं तद्घोरं पुर: प्रावर्तयद्रणे ॥ ३१ ॥

तेव्हा सर्व बाजू या सापांनी भरून गेल्या आहेत, हे पाहिल्यावर रामांनी रणांगणावर पुढील बाजूस भयानक गरुड अस्त्र सोडले. (३१)

रामेण मुक्तास्ते बाणा भूत्वा गरुडरूपिण: ।
चिच्छिदु: सर्पबाणांस्तान्समन्तात्सर्पशत्रव: ॥ ३२ ॥

रामांनी सोडलेले आणि सापांचे शत्रू असणारे ते बाण गरुड रूप धारण करून सर्वत्र भरून गेलेल्या त्या सर्पबाणांना तोडून टाकू लागले. (३२)

अस्त्रे प्रतिहते युद्धे रामेण दशकन्धर: ।
अभ्यवर्षत्ततो रामं घोराभि: शरवृष्टिभि: ॥ ३३ ॥

अशा प्रकारे युद्धामध्ये आपले अस्त्र रामांकडून निरुपयोगी झालेले पाहिल्यानंतर रावणाने रामांवर भयानक शरवृष्टी केली. (३३)

तत: पुन: शरानीकै राममक्लिष्टकारिणम् ।
अर्दयित्वा तु घोरेण मातलिं प्रत्यविध्यत ॥ ३४ ॥

त्या शरवृष्टीचा विनासायास प्रतिकार करणाऱ्या रामांना नंतर पुन्हा शरांच्या समूहांनी पीडा देऊन रावणाने मातलीला घायाळ केले. (३४)

ातयित्वा रथोपस्थे रथकेतुं च काञ्चनम् ।
्न्द्रानश्वानभ्यहनद्रावण: क्रोधमूर्च्छित: ॥ ३५ ॥

तसेच क्रोधाने बेभान झालेल्या रावणाने रामांच्या रथावरील सुवर्ण- ध्वज तोडून टाकून तो रथाच्या मागील बाजूस पाडला आणि इंद्राच्या घोड्यांना जर्जर केले. (३५)

त्रेषेदुर्देवगन्धर्वाश्चारणा: पितरस्तथा ।
ार्त्ताकारं हरिं दृष्ट्वा व्यथिताश्च महर्षय: ॥ ३६ ॥

रामांना व्यथित झालेले पाहून देव, गंधर्व, चारण तसेच पितर आणि महर्षी दु:खी झाले. (३६)

यथिता वानरेन्द्राश्च बभूवु: सबिभीषणा: ।
शास्यो विंशतिभुज: प्रगृहीतशरासन: ॥ ३७ ॥

दृशे रावणस्तत्र मैनाक इव पर्वत: ।
मस्तु भ्रुकुटिं बद्ध्वा क्रोधसंरक्तलोचन: ॥ ३८ ॥

ोपं चकार सदृशं निर्दहन्निव राक्षसम् ।
नुरादाय देवेन्द्रधनुराकारमद्भुतम् ॥ ३९ ॥

हीत्वा पाणिना बाणं कालानलसमप्रभम् ।
र्दहन्निव चक्षुर्भ्यां ददृशे रिपुमन्तिके ॥ ४० ॥

तसेच बिभीषणासकट सर्व वानरश्रेष्ठ व्यथित झाले. त्या वेळी दहा तोंडे, वीस बाहू असणारा आणि हातात धनुष्य बाण घेऊन बसलेला रावण तेथे मैनाक पर्वताप्रमाणे दिसत होता. रागाने डोळे लाल झालेल्या रामांनी आपल्या भुवया चढविल्या आणि राक्षस रावणाला जणू जाळून टाकेल असा क्रोध धारण केला. नंतर इंद्राच्या धनुष्याच्या आकाराचे दुसरे एक अद्भुत धनुष्य घेऊन आणि कालाग्नीप्रमाणे प्रभा असणारा एक बाण हातात घेऊन, जवळ असणाऱ्या शत्रूला जणू डोळ्यांनीच जाळीत रामांनी रावणाकडे पाहिले. (३७-४०)

ाक्रमं दर्शयितुं तेजसा प्रज्वलन्निव ।
ाक्रमे कालरूपी सर्वलोकस्य पश्यत: ॥ ४१ ॥

त्यानंतर सर्व लोकांच्या देखत तेजाने जणू प्रज्वलित झालेल्या अशा त्या कालरूपी रामांनी आपला पराक्रम दाखविण्यास प्रारंभ केला. (४१)

कृष्य चापं रामस्तु रावणं प्रतिविध्य च ।
यिन्वानरानीकं कालान्तक इवाबभौ ॥ ४२ ॥

धनुष्याची दोरी खेचून रामांनी रावणाला विद्ध केले. त्या वेळी वानरसैन्याला आनंदित करणारे श्रीराम कालांतकासारखे शोभू लागले. (४२)

क्रुद्धं रामस्य वदनं दृष्ट्वा शत्रुं प्रबाधतः ।
तत्रसुः सर्वभूतानि चचाल च वसुन्धरा ॥ ४३ ॥

रामं दृष्ट्वा महारौद्रमुत्पातांश्च सुदारुणान् ।
त्रस्तानि सर्वभूतानि रावणं चाविशद्भयम् ॥ ४४ ॥

विमानस्थाः सुरगणाः सिद्धगन्धर्वकिन्नराः ।
ददृशुः सुमहायुद्धं लोकसंवर्तकोपमम् ।
ऐन्द्रमस्त्रं समादाय रावणस्य शिरोऽच्छिनत् ॥ ४५ ॥

मूर्धानो रावणस्याथ बहवो रुधिरोक्षिताः ।
गगनात्प्रपतन्ति स्म तालादिव फलानि हि ॥ ४६ ॥

न दिनं न च वै रात्रिर्न सन्ध्या न दिशोऽपि वा ।
प्रकाशन्ते न तद्रूपं दृश्यते तत्र सङ्गरे ॥ ४७ ॥

ततो रामो बभूवाथ विस्मयाविष्टमानसः ।
शतमेकोत्तरं छिन्नं शिरसां चैकवर्चसाम् ॥ ४८ ॥

न चैव रावणः शान्तो दृश्यते जीवितक्षयात् ।
ततः सर्वास्त्रविद्धीरः कौसल्यानन्दवर्धनः ॥ ४९ ॥

अस्त्रैश्च बहुभिर्युक्तश्चिन्तयामास राघवः ।
यैर्यैर्बाणैर्हता दैत्या महासत्त्वपराक्रमाः ॥ ५० ॥

त एते निष्फलं याता रावणस्य निपातने।
इति चिन्ताकुले रामे समीपस्थो बिभीषणः ॥ ५१ ॥

उवाच राघवं वाक्यं ब्रह्मदत्तवरो ह्यसौ ।
विच्छिन्ना बाहवोऽप्यस्य विच्छिन्नानि शिरांसिच ॥५२ ॥

उत्पत्स्यन्ति पुनः शीघ्रमित्याह भगवानजः ।
नाभिदेशेऽमृतं तस्य कुण्डलाकारसंस्थितम् ॥ ५३ ॥

तच्छोषयानलास्त्रेण तस्य मृत्युस्ततो भवेत् ।
बिभीषणवचः श्रुत्वा रामः शीघ्रपराक्रमः ॥ ५४ ॥

शत्रूवर चाल करून जाणाऱ्या रामांचे रागावलेले मुख पाहून सर्व प्राणी भयाने त्रस्त झाले आणि पृथ्वी कंप पावू लागली. (४३)

अती रौद्ररूप धारण केलेल्या रामांना पाहून तसेच त्या वेळी होणारे अतिशय दारुण उत्पात पाहून सर्व प्राणी त्रस्त झाले आणि रावणाचे मन भयभीत झाले. (४४)

त्या वेळी विमानांत बसून देवांचे समूह, सिद्ध, गंधर्व, किन्नर हे जगाच्या प्रलयासारखे ते राम-रावणांचे फार प्रचंड युद्ध पांहात होते. रामांनी ऐंद्र अस्त्र सोडून रावणाचे शिर तोडून टाकले. (४५)

तेव्हा ज्या प्रमाणे एखाद्या तालवृक्षावरून फळे खाली पडावीत त्या प्रमाणे रक्ताने बरबटलेली रावणाची मस्तके आकाशातून खाली पडली. (४६)

त्या वेळी ना दिवस, ना रात्र, ना संध्याकाळ, ना दिशा काहीच कळेनासे झाले. रणांगणावर त्या रावणाचे रूपही नीट दिसेनासे झाले. (असे कित्येक दिवस चालू राहिले.) (४७)

तेव्हा मात्र रामांचे मन विस्मयाने भरून गेले. ते स्वतःशी म्हणाले, 'समान तेज असणारी रावणाची एकशे एक शिरे मी तोडून टाकली. (४८)

तरीसुद्धा प्राणनाश होऊन हा रावण मृत झालेला दिसत नाही.' त्या वेळी सर्व अस्त्रे जाणणारे, धीर कौसल्यानंदन राम पुष्कळ अस्त्रांनी युक्त असूनही विचार करू लागले की, ज्या ज्या माझ्या बाणांनी प्रचंड सामर्थ्य व पराक्रम असणारे दैत्य मारले गेले होते, ते सर्व बाण रावणाचा वध करण्यास कसे निष्फळ ठरले ? अशा प्रकारे राम चिंताकुल झाले असताना जवळच असणारा बिभीषण रामांना म्हणाला की, "ब्रह्मदेवाने या रावणाला एक वर दिला आहे: जरी याचे बाहू तोडले गेले आणि जरी याची मस्तके तोडली गेली तरी तीच चट्दिशी पुनः उत्पन्न होतील, त्याचे कारण असे की त्या रावणाच्या नाभिप्रदेशात अमृत-कलश ठेवलेला आहे. (४९-५३)

आग्नेय अस्त्राने ते अमृत तुम्ही शुष्क करा. तरच त्याचा मृत्यू होईल." बिभीषणाचे वचन ऐकल्यावर, शीघ्र पराक्रमी रामांनी आपल्या धनुष्यावर अग्नी-अस्त्राची योजना करून त्या राक्षसाची नाभी विद्ध केली आणि

पावकास्त्रेण संयोज्य नाभिं विव्याध रक्षसः ।
अनन्तरं च चिच्छेद शिरांसि च महाबलः ॥ ५५ ॥

बाहूनपि च संरब्धो रावणस्य रघूत्तमः ।
ततो घोरां महाशक्तिमादाय दशकन्धरः ॥ ५६ ॥

बिभीषणवधार्थाय चिक्षेप क्रोधविह्वलः ।
चिच्छेद राघवो बाणैस्तां शितैर्हेमभूषितैः ॥ ५७ ॥

त्यानंतर क्षुब्ध झालेल्या महाबलवान रघूत्तमांनी रावणाची शिरे तोडली. तसेच बाहूसुद्धा तोडून टाकले. (तरी रावणाचे एक मुख शिल्लक राहिले होते.) तेव्हा क्रोधाने संतप्त झालेल्या रावणाने एक महाभयंकर महाशक्ती घेतली आणि बिभीषणाचा वध करण्यास ती फेकली. तेव्हा राघवांनी सुवर्णमंडित तीक्ष्ण बाणांनी ती शक्ती तोडून टाकली. (५४-५७)

दशग्रीवशिरश्छेदात्तदा तेजो विनिर्गतम् ।
म्लानरूपो बभूवाथ छिन्नैः शीर्षैर्भयङ्करैः ॥ ५८ ॥

त्या वेळी रावणाची मस्तके तुटून गेल्यामुळे त्याचे तेज निघून गेले होते आणि त्यामुळे ती शिरे तुटल्यामुळे तो विद्रूप झाला होता. (५८)

एकेन मुख्यशिरसा बाहुभ्यां रावणो बभौ ।
रावणस्तु पुनः क्रुद्धो नानाशस्त्रास्त्रवृष्टिभिः ॥ ५९ ॥

ववर्ष रामं तं रामस्तथा बाणैर्ववर्ष च ।
ततो युद्धमभूद्घोरं तुमुलं लोमहर्षणम् ॥ ६० ॥

तेव्हा रावणाचे एक मुख्य मस्तक आणि दोन बाहू राहिले. त्यानंतर पुनः रागावून रावणाने नाना प्रकारच्या शस्त्र आणि अस्त्र यांचा रामांवर वर्षाव केला. रामांनीसुद्धा त्या प्रमाणेच रावणावर बाणांचा वर्षाव केला. अशा प्रकारे त्यानंतर पुनः त्या दोघांचे तुंबळ रोमांचकारी युद्ध सुरू झाले. (५९-६०)

अथ संस्मारयामास मातली राघवं तदा ।
विसृजास्त्रं वधायास्य ब्राह्मं शीघ्रं रघूत्तमम् ॥ ६१ ॥

त्या वेळी मातलीने राघवांना स्मरण करून दिले. तो म्हणाला, "हे रघूत्तमा, या रावणाच्या वधासाठी शीघ्र ब्रह्मास्त्र सोडा. (६१)

विनाशकालः प्रथितो यः सुरैः सोऽद्य वर्तते ।
उत्तमाङ्गं न चैतस्य छेत्तव्यं राघव त्वया ॥ ६२ ॥

नैव शीर्ष्णि प्रभो वध्यो वध्य एव हि मर्मणि ।
ततः संस्मारितो रामस्तेन वाक्येन मातलेः ॥ ६३ ॥

जग्राह स शरं दीप्तं निःश्वसन्तमिवोरगम् ।
यस्य पार्श्वे तु पवनः फले भास्करपावकौ ॥ ६४ ॥

शरीरमाकाशमयं गौरवे मेरुमन्दरौ ।
पर्वस्वपि च विन्यस्ता लोकपाला महौजसः ॥ ६५ ॥

जाज्वल्यमानं वपुषा भातं भास्करवर्चसा ।
तमुग्रमस्त्रं लोकानां भयनाशनमद्भुतम् ॥ ६६ ॥

अभिमन्त्र्य ततो रामस्तं महेषुं महाभुजः ।
वेदप्रोक्तेन विधिना सन्दधे कार्मुके बली ॥ ६७ ॥

या रावणाच्या विनाशाचा जो काळ देवांनी निश्चित केला आहे, तो आज आत्ता आलेला आहे. हे राघवा, या रावणाचे मस्तक तुम्ही तोडू नका; कारण, हे प्रभो, मस्तक तोडल्याने हा मरणार नाही, तर याच्या मर्मावर आघात केल्यामुळे हा मरणार आहे." अशा प्रकारे मातलीच्या वाक्याने स्मरण करून दिल्यावर रामांनी फूत्कार टाकणाऱ्या सापाप्रमाणे असणारा एक तेजस्वी बाण घेतला. त्या बाणाच्या पार्श्वभागी वायू होता, त्याच्या फाळावर (पुढील भागी) सूर्य आणि अग्नी होते; जडपणात तो मेरू व मंदार होता; त्याच्या पर्व-भागावर महातेजस्वी लोकपाल ठेवलेले होते, त्याचे शरीर आकाशमय होते; त्याचे शरीर देदीप्यमान असून तो सूर्याप्रमाणे तेजस्वी होता आणि मग लोकांची भीती नष्ट करणारे ते भयंकर अस्त्र महाबाहू रामांनी वेदोक्त विधीने अभिमंत्रित करून धनुष्याला जोडले. (६२-६७)

तस्मिन्सन्धीयमाने तु राघवेण शरोत्तमे ।
सर्वभूतानि वित्रेसुश्चचाल च वसुन्धरा ॥ ६८ ॥

जेव्हा राम तो उत्तम बाण जोडत होते, तेव्हा सर्व प्राणी संत्रस्त झाले आणि पृथ्वी कंप पावू लागली. (६८)

स रावणाय सङ्क्रुद्धो भृशमानम्य कार्मुकम् ।
चिक्षेप परमायत्तस्तमस्त्रं मर्मघातिनम् ॥ ६९ ॥

त्यानंतर रागावलेल्या रामांनी आपले धनुष्य खूप वाकविले आणि अतिशय काळजीपूर्वक मर्माचा घात करणारे ते अस्त्र रावणावर सोडले. (६९)

स वज्र इव दुर्द्धर्षो वज्रपाणिविसर्जितः ।
कृतान्त इव घोरास्यो न्यपतद्रावणोरसि ॥ ७० ॥

आणि इंद्राने सोडलेल्या वज्राप्रमाणे अतिशय असह्य असणारा आणि कृतांतकालाप्रमाणे भयंकर मुख असणारा तो बाण रावणाच्या वक्षःस्थळावर पडला. (७०)

स निमग्नो महाघोरः शरीरान्तकरः परः ।
बिभेद हृदयं तूर्णं रावणस्य महात्मनः ॥ ७१ ॥

शरीराचा नाश करणारा, अतिशय महाभयंकर असा तो बाण रावणाच्या हृदयात घुसला आणि त्याने तत्काळ महासमर्थ रावणाचे हृदय फाडून टाकले. (७१)

रावणस्याहरत्प्राणान्विवेश धरणीतले ।
स शरो रावणं हत्वा रामतूणीरमाविशत् ॥ ७२ ॥

त्या बाणाने रावणाचे प्राण हरण केले आणि तो पृथ्वीतलात घुसला. नंतर रावणाचा वध करून तो बाण पुनः परत रामांच्या भात्यात येऊन स्थिर झाला. (७२)

तस्य हस्तात्पपाताशु सशरं कार्मुकं महत् ।
गतासुर्भ्रमिवेगेन राक्षसेन्द्रोऽपतद्भुवि ॥ ७३ ॥

(रामांचा बाण लागल्यानंतर) रावणाच्या हातातून बाणासकट भलेमोठे धनुष्य लगेच खाली पडले आणि तो भोवळ येऊन वेगाने गतप्राण होऊन जमिनीवर पडला. (७३)

तं दृष्ट्वा पतितं भूमौ हतशेषाश्च राक्षसाः ।
हतनाथा भयत्रस्ता दुद्रुवुः सर्वतोदिशम् ॥ ७४ ॥

त्याला जमिनीवर पडलेला पाहून, उरलेले राक्षस स्वामी मेल्याने अनाथ होऊन भयभीत झाले आणि सर्व दिशांना पळून गेले. (७४)

दशग्रीवस्य निधनं विजयं राघवस्य च ।
ततो विनेदुः संहृष्टा वानरा जितकाशिनः ॥ ७५ ॥

वदन्तो रामविजयं रावणस्य च तद्वधम् ।
अथान्तरिक्षे व्यनदत्सौम्यस्त्रिदशदुन्दुभिः ॥ ७६ ॥

तेव्हा आनंदित झालेले जयशाली वानर 'रामांचा विजय झाला आणि रावणाचा वध झाला' असे शब्द उच्चारीत मोठा घोष करू लागले. तितक्यात अंतरिक्षामध्ये देवांच्या दुंदुभीचा गंभीर नाद होऊ लागला. (७५-७६)

पपात पुष्पवृष्टिश्च समन्ताद्राघवोपरि ।
तुष्टुवुर्मुनयः सिद्धाश्चारणाश्च दिवौकसः ॥ ७७ ॥

सर्व बाजूंनी राघवांवर पुष्पांची वृष्टी होऊ लागली. मुनी, सिद्ध, चारण आणि स्वर्गात राहाणारे देव रामांची स्तुती करू लागले. (७७)

अथान्तरिक्षे ननृतुः सर्वतोऽप्सरसो मुदा ।
रावणस्य च देहोत्थं ज्योतिरादित्यवत्स्फुरत् ॥ ७८ ॥

प्रविवेश रघुश्रेष्ठं देवानां पश्यतां सताम् ।
देवा ऊचुरहो भाग्यं रावणस्य महात्मनः ॥ ७९ ॥

वयं तु सात्त्विका देवा विष्णोः कारुण्यभाजनाः ।
भयदुःखादिभिर्व्याप्ताः संसारे परिवर्तिनः ॥ ८० ॥

त्याच वेळी आकाशात सर्वत्र अप्सरा आनंदाने नाचू लागल्या. इकडे सूर्याप्रमाणे चमकणारी एक तेजस्वी ज्योत रावणाच्या देहातून बाहेर पडून ती सर्व देवाच्या देखत श्रीरामांत प्रविष्ट झाली. ते पाहून देव म्हणू लागले, "या महात्म्या रावणाचे काय मोठे भाग्य आहे हो ! विष्णूच्या दयेला पात्र असणारे आम्ही सात्त्विक देव भय, दुःख इत्यादींनी व्याप्त होऊन, या संसारात फिरत असतो. या उलट हा रावण राक्षस, क्रूर, ब्रह्मघाती, अतिशय तामस स्वभावाचा,

अयं तु राक्षसः क्रूरो ब्रह्महातीव तामसः ।
परदाररतो विष्णुद्वेषी तापसहिंसकः ॥ ८१ ॥

परस्त्रीच्या ठिकाणी रत, विष्णूंचा द्वेष करणारा, आणि तापसांची हिंसा करणारा होता. (७८-८१)

पश्यत्सु सर्वभूतेषु राममेव प्रविष्टवान् ।
एवं ब्रुवत्सु देवेषु नारदः प्राह सुस्मितः ॥ ८२ ॥

असे असूनही, सर्व प्राण्यांच्या देखत तो रामांमध्ये प्रविष्ट झाला." देव अशा प्रकारे बोलत असताना, हसत हसत नारद म्हणाले. (८२)

शृणुतात्र सुरा यूयं धर्मतत्त्वविचक्षणाः ।
रावणो राघवद्वेषादनिशं हृदि भावयन् ॥ ८३ ॥

भृत्यैः सह सदा रामचरितं द्वेषसंयुतः ।
श्रुत्वा रामात्स्वनिधनं भयात्सर्वत्र राघवम् ॥ ८४ ॥

पश्यन्ननुदिनं स्वप्ने राममेवानुपश्यति ।
क्रोधोऽपि रावणस्याशु गुरुबोधाधिकोऽभवत् ॥ ८५ ॥

" हे देवांनो, तुम्ही धर्माचे तत्त्व जाणणारे आहात. तर ऐका. द्वेषामुळे हा रावण रात्रंदिवस आपल्या मनात रामांचे चिंतन करीत असे. द्वेषाने युक्त असणारा तो सतत सेवकांकडून रामांचे चरित्र ऐकत असे. रामांचे हातून आपले मरण आहे हे ऐकल्यावर, भीतीमुळे सर्वत्र आणि स्वप्नातसुद्धा दररोज रामांनाच पाहात असे. अशा प्रकारे रावणाचा द्वेषसुद्धा त्याला गुरूच्या उपदेशापेक्षा अधिक उपयोगी पडला. (८३-८५)

रामेण निहतश्चान्ते निर्धूताशेषकल्मषः ।
रामसायुज्यमेवाप रावणो मुक्तबन्धनः ॥ ८६ ॥

शेवटी रावण हा रामांकडून ठार मारला गेला. त्याची सर्व पापे धुऊन गेली. तो बंधनातून सुटला आणि त्याला रामांच्या ठिकाणी सायुज्य मुक्तीच प्राप्त झाली. (८६)

पापिष्ठो वा दुरात्मा परधनपर-
दारेषु सक्तो यदि स्या-
न्नित्यं स्नेहाद्भयाद्वा रघुकुलतिलकं
भावयन्सम्परेतः ।
भूत्वा शुद्धान्तरङ्गो भवशतजनिता-
नेकदोषैर्विमुक्तः
सद्यो रामस्य विष्णोः सुरवरविनुतं
याति वैकुण्ठमाद्यम् ॥ ८७ ॥

एखादा माणूस जरी जास्तीत जास्त पापी, दुष्ट मनाचा, परधन आणि परस्त्री यांचे ठिकाणी रत असूनही, जर तो प्रेमाने किंवा भयाने नित्य रामांचे चिंतन करीत मरण पावला तर तो शुद्ध अंत:करणाचा होऊन, पूर्वीच्या शेकडो जन्मात उत्पन्न झालेल्या अनेक दोषांतून मुक्त होतो आणि तो तत्काळ देवश्रेष्ठांनी स्तुती केलेल्या अशा विष्णुरूपी रामांच्या वैकुंठ नावाच्या आद्यस्थानी जाऊन पोचतो. (८७)

हत्वा युद्धे दशास्यं त्रिभुवनविषमं
वामहस्तेन चापं
भूमौ विष्टभ्य तिष्ठन्नितरकरधृतं
भ्रामयन्बाणमेकम् ।
आरक्तोपान्तनेत्रः शरदलितवपुः
सूर्यकोटिप्रकाशो
वीरश्रीबन्धुराङ्गस्त्रिदशपतिनुतः
पातु मां वीररामः ॥ ८८ ॥

तिन्ही जगांना कंटकभूत अशा रावणाचा युद्धात वध केल्यावर जे श्रीराम डाव्या हाताने धरलेले धनुष्य जमिनीवर टेकवून उभे आहेत आणि उजव्या हातात धरलेला एक बाण फिरवीत आहेत, ज्यांच्या डोळ्यांच्या कडा लाल आहेत, ज्यांचे शरीर बाणांनी जखमी झाले आहे, ज्यांची अंगकांती ही कोटी सूर्याप्रमाणे देदीप्यमान आहे, ज्यांचे शरीर वीरश्रीमुळे सुंदर दिसत आहे आणि जे इंद्रादी देवतांकडून स्तविले जात आहेत, असे ते वीर राम माझे रक्षण करोत." (८८)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे एकादशः सर्गः ॥ ११ ॥

# द्वादश सर्ग

## बिभीषणाचा राज्याभिषेक आणि सीतेची अग्निपरीक्षा

*श्रीमहादेव उवाच*

रामो बिभीषणं दृष्ट्वा हनूमन्तं तथाङ्गदम् ।
लक्ष्मणं कपिराजं च जाम्बवन्तं तथा परान् ॥ १ ॥

परितुष्टेन मनसा सर्वानेवाब्रवीद्वचः ।
भवतां बाहुवीर्येण निहतो रावणो मया ॥ २ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, बिभीषण, हनुमंत तसेच अंगद, लक्ष्मण, कपिराज सुग्रीव, जांबवान तसेच इतरही वानरवीर यांचेकडे पाहून, संतुष्ट मनाने राम त्या सर्वांना म्हणाले, "तुमच्या बाहूंच्या सामर्थ्यामुळे माझ्याकडून रावण मारला गेला आहे. (१-२)

कीर्तिः स्थास्यति वः पुण्या यावच्चन्द्रदिवाकरौ ।
कीर्तयिष्यन्ति भवतां कथां त्रैलोक्यपावनीम् ॥ ३ ॥

मयोपेतां * कलिहरां यास्यन्ति परमां गतिम् ।
एतस्मिन्नन्तरे दृष्ट्वा रावणं पतितं भुवि ॥ ४ ॥

मन्दोदरीमुखाः सर्वाः स्त्रियो रावणपालिताः ।
पतिता रावणस्याग्रे शोचन्त्यः पर्यदेवयन् ॥ ५ ॥

जोपर्यंत चंद्र आणि सूर्य आहेत तोपर्यंत तुमची पुण्यपावन कीर्ती जगात टिकून राहील. जे कोणी माझ्यासहित त्रैलोक्याला पावन करणाऱ्या आणि कलीतील दोषांचे हरण करणाऱ्या तुमच्या कथेचे कीर्तन करतील, ते परम गतीला जातील." दरम्यानच्या काळात, रावण जमिनीवर मृत होऊन पडलेला आहे असे पाहून, रावणाने ज्यांचे पालन केले होते अशा मंदोदरी इत्यादी रावणाच्या सर्व स्त्रिया रावणाच्या पुढे पडून शोक करू लागल्या. (३-५)

बिभीषणः शुशोचार्तः शोकेन महतावृतः ।
पतितो रावणस्याग्रे बहुधा पर्यदेवयत् ॥ ६ ॥

त्या वेळी बिभीषणसुद्धा अतिशय दुःखाने व्याकूळ होऊन रावणाच्या पुढे पडून नाना प्रकारांनी विलाप करू लागला. (६)

रामस्तु लक्ष्मणं प्राह बोधयस्व बिभीषणम् ।
करोतु भ्रातृसंस्कारं किं विलम्बेन मानद ॥ ७ ॥

तेव्हा राम लक्ष्मणाला म्हणाले, "हे लक्ष्मणा, बिभीषणाला सांग की आता त्याने भावाचे और्ध्वदेहिक संस्कार करावेत. कारण आता विलंब का ? (७)

स्त्रियो मन्दोदरीमुख्याः पतिता विलपन्ति च ।
निवारयतु ताः सर्वा राक्षसी रावणप्रियाः ॥ ८ ॥

रावणाच्या मंदोदरी इत्यादी स्त्रिया रावणापुढे पडून विलाप करीत आहेत. त्यांचे तू निवारण कर ." (८)

एवमुक्तोऽथ रामेण लक्ष्मणोऽगाद्बिभीषणम् ।
उवाच मृतकोपान्ते पतितं मृतकोपमम् ॥ ९ ॥

रामांनी असे सांगितल्यावर लक्ष्मण बिभीषणाकडे गेला आणि मृत रावणाजवळ मृतवत पडलेल्या बिभीषणाला सांगू लागला. (९)

शोकेन महताविष्टं सौमित्रिरिदमब्रवीत् ।
यं शोचसि त्वं दुःखेन कोऽयं तव बिभीषण ॥ १० ॥

अतिशय शोकमग्न झालेल्या बिभीषणाला लक्ष्मण म्हणाला, "अरे बिभीषणा, ज्याच्यासाठी तू दुःखाने शोक करीत आहेस, तो तुझा कोण आहे?(१०)

* या श्लोकात **मयोपेताम्** या पाठाऐवजी **जयोपेताम्** हा जो पाठ भेद आहे, तो अधिक चांगला वाटतो. **जयोपेताम्** हा शब्द **कथाम्** शब्दाचे विशेषण आहे. जयोपेता म्हणजे जयाने, विजयाने युक्त असा अर्थ आहे.

त्वं वास्य कतमः सृष्टेः पुरेदानीमतः परम् ।
यद्वत्तोयौघपतिताः सिकता यान्ति तद्वशाः ॥ ११ ॥

संयुज्यन्ते वियुज्यन्ते तथा कालेन देहिनः ।
यथा धानासु वै धाना भवन्ति न भवन्ति च ॥ १२ ॥

एवं भूतेषु भूतानि प्रेरितानीशमायया ।
त्वं चेमे वयमन्ये च तुल्याः कालवशोद्भवाः ॥ १३ ॥

जन्म होण्यापूर्वी तू याचा कोण होतास ? आत्ता कोण आहेस ? आणि यानंतरही तू याचा कोण असणार ? ज्या प्रमाणे पाण्याच्या प्रवाहात पडलेले वाळूचे कण हे त्या पाण्याबरोबर एकत्र येतात व पुन्हा वेगळे होतात, त्या प्रमाणे काळाच्या ओघात देहधारी प्राणी एकत्र येतात आणि वियुक्त होतात. ज्या प्रमाणे धान्याच्या बीजापासून धान्याची अन्य बीजे उत्पन्न होतात आणि नष्ट होऊन जातात, त्या प्रमाणे ईश्वराच्या मायेने प्रेरित झालेले प्राणी अन्य प्राण्यांपासून निर्माण होतात आणि नष्ट होऊन जातात. तू, हे, आम्ही आणि इतर लोकसुद्धा समानपणे काळाला वश होऊन उत्पन्न होत असतात. (११-१३)

जन्ममृत्यू यदा यस्मात्तदा तस्माद्भविष्यतः ।
ईश्वरः सर्वभूतानि भूतैः सृजति हन्त्यजः ॥ १४ ॥

आत्मसृष्टैरस्वतन्त्रैर्निरपेक्षोऽपि बालवत् ।
देहेन देहिनो जीवा देहाद्देहोऽभिजायते ॥ १५ ॥

बीजादेव यथा बीजं देहान्य इव शाश्वतः ।
देहिदेहविभागोऽयमविवेककृतः पुरा ॥ १६ ॥

जेव्हा आणि ज्यापासून हे जन्म आणि मृत्यू होणार असतात तेव्हा आणि त्यापासूनच ते होत राहातात. जन्मरहित असा ईश्वर हा मात्र कशाचीही इच्छा नसतानासुद्धा, एखाद्या बालकाप्रमाणे कोणतीही अपेक्षा न धरता स्वतःच निर्माण केलेल्या व स्वतंत्र नसणाऱ्या अशा प्राण्यांचेकडून सर्व प्राणी उत्पन्न करतो. तसेच नष्टही करतो. देहाच्या योगानेच जीव हे देहधारी होतात. ज्या प्रमाणे बीजापासून दुसरे बीज निर्माण होते, त्या प्रमाणे माता-पित्यांच्या देहापासून देह हा उत्पन्न होत असतो. या उलट जीव हा देहापेक्षा वेगळा असून तो नित्य - शाश्वत- आहे. खरे सांगायचे तर देहधारी जीव आणि देह असा विभागसुद्धा अज्ञानाचा नाश होत नाही, तोपर्यंत अविवेकाने केला गेला आहे. (१४-१६)

नानात्वं जन्म नाशश्च क्षयो वृद्धिः क्रिया फलम् ।
द्रष्टुराभान्त्यतद्धर्मा यथाग्नेर्दारुविक्रियाः ॥ १७ ॥

ज्या प्रमाणे लाकडाचे (लांबी, रुंदी, इत्यादी) गुणधर्म हे मुळात अग्नीचे नसतानाही ते अग्नीमध्ये पाहाणाऱ्या माणसाला अग्नीच्या ठिकाणी भासू लागतात, त्या प्रमाणे देहाचे वेगळेपण, जन्म, नाश, क्षय, वृद्धी, कर्म आणि कर्माचे फळ हे गुणधर्म मुळात जीवाचे नसतानाही ते द्रष्ट्या जीवाचे आहेत, असे भासू लागते. (१७)

त इमे देहसंयोगादात्मना भान्त्यसद्ग्रहात् ।
यथा यथा तथा चान्यद्ध्यायतोऽसत्सदाग्रहात् ॥ १८ ॥

ज्या प्रमाणे देहाशी जीवात्म्याचा संयोग झाला असताना, ते देहाचे गुणधर्म चुकीच्या समजुतीमुळे जीवाचे आहेत असे भासू लागते, त्या प्रमाणे सत्य अशा आत्म्याचे ज्ञान झाल्यावर, त्याचे ध्यान करीत राहणाऱ्या माणसाला हे कळून येते की ते देहाचे गुण असत् आहेत. (म्हणजे ते जीवाचे गुण नाहीत, ते जीवापेक्षा वेगळे आहेत.) (१८)

प्रसुप्तस्यानहम्भावात्तदा भाति न संसृतिः ।
जीवतोऽपि तथा तद्वद्विमुक्तस्यानहङ्कृतेः ॥ १९ ॥

झोपेत अहंकाराचा अभाव होत असल्यामुळे झोपलेल्या माणसाला तेव्हा संसार भासत नाही; त्या प्रमाणे अहंकाररहित मुक्त पुरुष हा जरी जिवंत असला तरी त्याला प्रपंचाचे भान होत नाही. (१९)

तस्मान्मायामनोधर्मं जह्यहम्ममताभ्रमम् ।
रामभद्रे भगवति मनो धेह्यात्मनीश्वरे ॥ २० ॥

सर्वभूतात्मनि परे मायामानुषरूपिणि ।
बाह्येन्द्रियार्थसम्बन्धात्त्याजयित्वा मनः शनैः ॥ २१ ॥

म्हणून, हे बिभीषणा, तू अहंता आणि ममता या स्वरूपाचा भ्रम आणि मायेमुळे निर्माण होणारे मनाचे गुणधर्म टाकून दे. बाह्य पदार्थ आणि बाह्य इंद्रिये यांच्याशी असणारा मनाचा संबंध तू हळू हळू सोडून दे आणि स्वत:चा आत्मा सर्वांतर्यामी असे जे परमेश्वर म्हणजेच मायेने मनुष्यरूप धारण केलेले भगवान रामभद्र आहेत, त्यांच्या ठिकाणी तू तुझे मन हळू हळू स्थिर कर. (२०-२१)

तत्र दोषान्दर्शयित्वा रामानन्दे नियोजय ।
देहबुद्ध्या भवेद्भ्राता पिता माता सुहृत्प्रियः ॥ २२ ॥

बाह्य विषयांत दोष आहेत, हे मनाला दाखवून देऊन, ते मन तू रामांच्या स्वरूपभूत अशा आनंदात मग्न कर. मी म्हणजे आत्मा हा देह आहे या बुद्धीमुळेच माणसाच्या बाबतीत भाऊ, बाप, आई, मित्र किंवा प्रिय माणूस अशी ही नाती निर्माण होतात. (२२)

विलक्षणं यदा देहाज्जानात्यात्मानमात्मना ।
तदा कः कस्य वा बन्धुर्भ्राता माता पिता सुहृत् ॥ २३ ॥

देहापेक्षा आत्मा वेगळा आहे, असे जेव्हा एखादा मनुष्य मनाने जाणतो, तेव्हा कोण कुणाचा भाऊ, आई, बाप अथवा मित्र असू शकेल ? (२३)

मिथ्याज्ञानवशाज्जाता दारागारादयः सदा ।
शब्दादयश्च विषया विविधाश्चैव सम्पदः ॥ २४ ॥

मिथ्या ज्ञानामुळे माणसाच्या बाबतीत पत्नी, घर, शब्द इत्यादी विषय आणि नानाप्रकारची वैभवे ही सदा उत्पन्न होतात. (२४)

बलं कोशो भृत्यवर्गो राज्यं भूमिः सुतादयः ।
अज्ञानजत्वात्सर्वे ते क्षणसङ्गमभङ्गुराः ॥ २५ ॥

सैन्य, खजिना, सेवकवर्ग, राज्य, भूमी, पुत्र इत्यादी हे सर्व अज्ञानापासूनच उत्पन्न होत असल्याने, त्यांच्याशी होणारा संयोग हा क्षणभर टिकणारा असतो आणि ते सर्व नाशवंत आहेत. (२५)

अथोत्तिष्ठ हृदा रामं भावयन् भक्तिभावितम् ।
अनुवर्तस्व राज्यादि भुञ्जन्प्रारब्धमन्वहम् ॥ २६ ॥

म्हणून आता तू ऊठ. भक्तीने मनात चिंतन केलेल्या रामांचे ध्यान करीत आणि नेहमी प्रारब्धाचा भोग घेत, राज्य इत्यादींचे पालन कर. (२६)

भूतं भविष्यदभजन्वर्तमानमथाचरन् ।
विहरस्व यथान्यायं भवदोषैर्न लिप्यसे ॥ २७ ॥

भूत आणि भविष्य यांची चिंता न करता, केवळ वर्तमानकाळाचा विचार करून वाग. असे केल्याने तू संसारातील दोषांनी लिप्त होणार नाहीस. (२७)

आज्ञापयति रामस्त्वां यद्भ्रातुः साम्परायिकम् ।
तत्कुरुष्व यथाशास्त्रं रुदतीश्चापि योषितः ॥ २८ ॥

निवारय महाबुद्धे लङ्कां गच्छन्तु मा चिरम् ।
श्रुत्वा यथावद्वचनं लक्ष्मणस्य बिभीषणः ॥ २९ ॥

त्यक्त्वा शोकं च मोहं च रामपार्श्वमुपागमत् ।
विमृश्य बुद्ध्या धर्मज्ञो धर्मार्थसहितं वचः ॥ ३० ॥

रामस्यैवानुवृत्त्यर्थमुत्तरं पर्यभाषत ।
नृशंसमनृतं क्रूरं त्यक्तधर्मव्रतं प्रभो ॥ ३१ ॥

श्रीराम तुला आज्ञा करीत आहेत की भावाचे जे काही और्ध्वदेहिक कार्य करावयाचे आहे, ते तू यथाशास्त्र कर. अतिशय विलाप करणाऱ्या (राक्षस) स्त्रियांचे सांत्वन कर. हे महाबुद्धिमंता, त्यांना लंकेत परत जाऊ दे. उशीर करू नको.'' लक्ष्मणाचे हे यथार्थ वचन ऐकल्यावर बिभीषणाने शोक आणि मोह टाकून दिले आणि तो रामांजवळ गेला. धर्म जाणणाऱ्या बिभीषणाने धर्म आणि अर्थ यांनी युक्त असणाऱ्या रामांच्या वचनाचा स्वत:च्या बुद्धीने नीट विचार केला आणि त्यांच्या म्हणण्याप्रमाणे वागण्यासाठी त्याने धर्म व अर्थ यांनी युक्त असे उत्तर दिले, ''हे प्रभो, दुष्ट, खोटारडा, क्रूर, धर्माचरणाचा त्याग करणारा आणि परस्त्रीचे ठिकाणी आसक्त असणारा असा

नार्होऽस्मि देव संस्कर्तुं परदाराभिमर्शिनम् ।
श्रुत्वा तद्वचनं प्रीतो रामो वचनमब्रवीत् ॥ ३२ ॥

रावण होता. हे देवा, मी त्याचे और्ध्वदेहिक संस्कार करणे हे योग्य नाही." त्याचे वचन ऐकल्यावर, प्रसन्न राम असे म्हणाले. (२८-३२)

मरणान्तानि वैराणि निवृत्तं नः प्रयोजनम् ।
क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष यथा तव ॥ ३३ ॥

"वैर हे मरणापर्यंतच असते. आपले प्रयोजन तर आता पुरे झाले आहे. जसा हा रावण तुझा होता, तसाच तो माझाही होता. तेव्हा याचा और्ध्वदेहिक संस्कार तू कर." (३३)

रामाज्ञां शिरसा धृत्वा शीघ्रमेव बिभीषणः ।
सान्त्ववाक्यैर्महाबुद्धिं राज्ञीं मन्दोदरीं तदा ॥ ३४ ॥

सान्त्वयामास धर्मात्मा धर्मबुद्धिर्बिभीषणः ।
त्वरयामास धर्मज्ञः संस्कारार्थं स्वबान्धवान् ॥ ३५ ॥

रामांची आज्ञा शिरोधार्य मानून, बिभीषणाने ताबडतोब त्या वेळी महाबुद्धिमान् अशा राणी मंदोदरीचे सांत्वन केले. नंतर धर्मात्मा, धर्म-बुद्धी आणि धर्मज्ञ अशा बिभीषणाने रावणाचे और्ध्वदेहिक संस्कार करण्यासाठी आपल्या बांधवांना त्वरा करण्यास सांगितले. (३४-३५)

चित्यां निवेश्य विधिवत्पितृमेधविधानतः ।
आहिताग्नेर्यथा कार्यं रावणस्य बिभीषणः ॥ ३६ ॥

तथैव सर्वमकरोद्बन्धुभिः सह मन्त्रिभिः ।
ददौ च पावकं तस्य विधियुक्तं बिभीषणः ॥ ३७ ॥

पितृयज्ञाच्या विधीला अनुसरून विधिपूर्वक रावणाचे प्रेत चितेवर ठेवून आहिताग्नी- पुरुषाप्रमाणेच रावणाचे सर्व संस्कार बिभीषणाने आपले नातेवाईक व मंत्री यांच्यासह पार पाडले. त्यानंतर बिभीषणाने विधिवत रावणाच्या शवाला अंग्नी दिला. (३६-३७)

स्नात्वा चैवार्द्रवस्त्रेण तिलान्दर्भाभिमिश्रितान् ।
उदकेन च सम्मिश्रान्प्रदाय विधिपूर्वकम् ॥ ३८ ॥

नंतर स्नान करून, ओल्या वस्त्राने, बिभीषणाने दर्भमिश्रित तिळ पाण्यात मिसळून ते विधिपूर्वक रावणाला दिले. (३८)

प्रदाय चोदकं तस्मै मूर्ध्ना चैनं प्रणम्य च ।
ताः स्त्रियोऽनुनयामास सान्त्वमुक्त्वा पुनः पुनः ॥ ३९ ॥

आणि त्याला नमस्कार केला. त्यानंतर पुनः पुनः सांत्वनपर शब्दांनी स्त्रियांचे समाधान केले. (३९)

गम्यतामिति ताः सर्वा विविशुर्नगरं तदा ।
प्रविष्टासु च सर्वासु राक्षसीषु बिभीषणः ॥ ४० ॥

रामपार्श्वमुपागत्य तदातिष्ठद्विनीतवत् ।
रामोऽपि सह सैन्येन ससुग्रीवः सलक्ष्मणः ॥ ४१ ॥

हर्षं लेभे रिपून्हत्वा यथा वृत्रं शतक्रतुः ।
मातलिश्च तदा रामं परिक्रम्याभिवन्द्य च ॥ ४२ ॥

अनुज्ञातश्च रामेण ययौ स्वर्गं विहायसा ।
ततो हृष्टमना रामो लक्ष्मणं चेदमब्रवीत् ॥ ४३ ॥

तो म्हणाला, "आता तुम्ही जा." तेव्हा त्या सर्व स्त्रिया लंकेत गेल्या. नंतर बिभीषण रामांजवळ येऊन नम्रपणाने उभा राहिला. वृत्रासुराचा वध केल्यावर इंद्राला ज्या प्रमाणे आनंद झाला होता, त्या प्रमाणे शत्रूंचा वध केल्यावर वानर सैन्य, सुग्रीव आणि लक्ष्मण यांच्यासह रामानांसुद्धा हर्ष झाला. त्यानंतर प्रदक्षिणा व त्यांना अभिवादन करून आणि त्यांची अनुज्ञा घेऊन, मातली आकाशमार्गाने स्वर्गाला परत गेला. नंतर आनंदित मनाने राम लक्ष्मणाला म्हणाले. (४०-४३)

बिभीषणाय मे लङ्काराज्यं दत्तं पुरैव हि ।
इदानीमपि गत्वा त्वं लङ्कामध्ये बिभीषणम् ॥ ४४ ॥

"मी अगोदरच लंकेचे राज्य बिभीषणाला दिले आहे. तरी आता तू लंकेमध्ये जाऊन, ब्राह्मणांचे द्वारा मंत्रपूर्वक विधिवत बिभीषणावर अभिषेक करवून घे."

अभिषेचय विप्रैश्च मन्त्रवद्विधिपूर्वकम् ।
इत्युक्तो लक्ष्मणस्तूर्णं जगाम सह वानरैः ॥ ४५ ॥

लङ्कां सुवर्णकलशैः समुद्रजलसंयुतैः ।
अभिषेकं शुभं चक्रे राक्षसेन्द्रस्य धीमतः ॥ ४६ ॥

ततः पौरजनैः सार्धं नानोपायनपाणिभिः ।
बिभीषणः ससौमित्रिरुपायनपुरस्कृतः ॥ ४७ ॥

दण्डप्रणाममकरोद्रामस्याक्लिष्टकर्मणः ।
रामो बिभीषणं दृष्ट्वा प्राप्तराज्यं मुदान्वितः ॥ ४८ ॥

कृतकृत्यमिवात्मानममन्यत सहानुजः ।
सुग्रीवं च समालिङ्ग्य रामो वाक्यमथाब्रवीत् ॥ ४९ ॥

सहायेन त्वया वीर जितो मे रावणो महान् ।
बिभीषणोऽपि लङ्कायामभिषिक्तो मयानघ ॥ ५० ॥

ततः प्राह हनूमन्तं पार्श्वस्थं विनयान्वितम् ।
बिभीषणस्यानुमतेर्गच्छ त्वं रावणालयम् ॥ ५१ ॥

जानक्यै सर्वमाख्याहि रावणस्य वधादिकम् ।
जानक्याः प्रतिवाक्यं मे शीघ्रमेव निवेदय ॥ ५२ ॥

एवमाज्ञापितो धीमान् रामेण पवनात्मजः ।
प्रविवेश पुरीं लङ्कां पूज्यमानो निशाचरैः ॥ ५३ ॥

प्रविश्य रावणगृहं शिंशपामूलमाश्रिताम् ।
ददर्श जानकीं तत्र कृशां दीनामनिन्दिताम् ॥ ५४ ॥

राक्षसीभिः परिवृतां ध्यायन्तीं राममेव हि ।
विनयावनतो भूत्वा प्रणम्य पवनात्मजः ॥ ५५ ॥

कृताञ्जलिपुटो भूत्वा प्रह्वो भक्त्याग्रतः स्थितः ।
तं दृष्ट्वा जानकीं तूष्णीं स्थित्वा पूर्वस्मृतिं ययौ ॥ ५६ ॥

रामांनी असे म्हटल्यावर, लक्ष्मण लगेच वानरांसह लंकापुरीत गेला आणि समुद्राच्या पाण्यांनी भरलेल्या सुवर्ण कलशांनी त्याने बुद्धिमान राक्षसश्रेष्ठ अशा बिभीषणाला मंगलमय अभिषेक केला. (४४-४६)

त्यानंतर नाना प्रकारचे नजराणे घेतलेल्या नगरवासी लोकांसह, अनेक भेट-वस्तू घेऊन, लक्ष्मणासह बिभीषण रामांजवळ आला आणि त्याने विनासायास कर्म करणाऱ्या रामांना दंडवत प्रणाम केला. बिभीषणाला राज्य प्राप्त झाले हे पाहून राम आनंदित झाले आणि लक्ष्मणासह ते स्वतःला कृतकृत्य मानू लागले. त्यानंतर सुग्रीवाला आलिंगन देऊन राम त्याला म्हणाले. (४७-४९)

"हे वीरा, तुझ्या साहाय्याने मी महान रावणाला जिंकले आहे, आणि हे निष्पापा, मी बिभीषणालासुद्धा लंकेच्या राज्यावर अभिषिक्त केले आहे." (५०)

त्यानंतर विनयपूर्वक जवळच उभ्या असणाऱ्या हनुमंताला राम म्हणाले, "बिभीषणाची अनुमती घेऊन तू आता रावणाच्या प्रासादात जा. (५१)

आणि रावणाचा वध झाला इत्यादी सर्व वृत्तांत जानकीला निवेदन कर. मग जानकी जे प्रत्युत्तर देईल ते तू लौकरच परत येऊन मला सांग." (५२)

अशा प्रकारे रामांकडून आज्ञा मिळाल्यावर बुद्धिमान हनुमान राक्षसांकडून सन्मानित होत लंकापुरीत प्रविष्ट झाला. (५३)

मग रावणाच्या प्रासादात प्रवेश केल्यावर, अशोक वृक्षाच्या मुळाचा आश्रय घेतलेली, कृश, दीन, स्तुत्य, राक्षस स्त्रियांनी वेढलेली आणि रामाचेच ध्यान करीत असणारी जानकी त्याला दिसली. विनयाने नम्र होऊन, पवनसुताने तिला प्रणाम केला. नम्र होऊन व भक्तीने हात जोडून तो तिच्यापुढे उभा राहिला. त्याला पाहिल्यावर, जानकी काही काळ गप्प बसली आणि नंतर तिला पूर्वीची आठवण झाली. (५४-५६)

ज्ञात्वा तं रामदूतं सा हर्षात्सौम्यमुखी बभौ ।
स तां सौम्यमुखीं दृष्ट्वा तस्यै पवननन्दनः ।
रामस्य भाषितं सर्वमाख्यातुमुपचक्रमे ॥ ५७ ॥

तो रामांचा दूत आहे हे लक्षात आल्यावर, ती आनंदाने प्रसन्नमुखाने शोभू लागली. तिचे मुख प्रसन्न झाले आहे हे पाहून, पवनसुत रामाचा निरोप तिला सांगू लागला. (५७)

देवि रामः ससुग्रीवो बिभीषणसहायवान् ।
कुशली वानराणां च सैन्यैश्च सहलक्ष्मणः ॥ ५८ ॥

मारुती म्हणाला- "हे देवी, सुग्रीव, बिभीषण आणि लक्ष्मण यांच्या आणि वानरांच्या सैन्यासह श्रीराम कुशल आहेत. (५८)

रावणं ससुतं हत्वा सबलं सह मन्त्रिभिः ।
त्वामाह कुशलं रामो राज्ये कृत्वा बिभीषणम् ॥ ५९ ॥

पुत्र, सेना आणि मंत्री यांच्यासह रावणाचा वध करून आणि बिभीषणाला लंकेच्या राज्यावर बसवून, रामांनी तुला आता आपली खुशाली सांगितली आहे." (५९)

श्रुत्वा भर्तुः प्रियं वाक्यं हर्षगद्‌गदया गिरा ।
किं ते प्रियं करोम्यद्य न पश्यामि जगत्त्रये ॥ ६० ॥

समं ते प्रियवाक्यस्य रत्नान्याभरणानि च ।
एवमुक्तस्य वैदेह्या प्रत्युवाच प्लवङ्गमः ॥६१ ॥

आपल्या पतीचा हा प्रिय निरोप ऐकल्यावर, आनंदाने सद्‌गदित झालेल्या वाणीने सीता म्हणाली, "अरे वत्सा, मी तुझे कोणते प्रिय करू ? तुझ्या गोड शब्दांच्या सारखी या तिन्ही लोकांत कोणतीही रत्ने, आभूषणे मला आज दिसत नाहीत." असे वैदेहीने म्हटल्यावर हनुमान तिला म्हणाला. (६०-६१)

रत्नौघाद्विविधाद्वापि देवराज्याद्विशिष्यते ।
हतशत्रुं विजयिनं रामं पश्यामि सुस्थिरम् ॥६२ ॥

"माते, विजयाने प्रसन्न झालेल्या श्रीरामांना पाहणे, हे मला नाना प्रकारच्या रत्नराशींपेक्षा आणि देवांच्या राज्यापेक्षा महत्त्वाचे वाटते." (६२)

तस्य तद्वचनं श्रुत्वा मैथिली प्राह मारुतिम् ।
सर्वे सौम्या गुणाःसौम्य त्वय्येव परिनिष्ठिताः ॥ ६३ ॥

त्याचे ते वचन ऐकल्यावर मैथिली मारुतीला म्हणाली, "हे वत्सा, सर्व उत्तम गुण तुझ्याच ठिकाणी एकवटून राहिले आहेत. (६३)

रामं द्रक्ष्यामि शीघ्रं मामाज्ञापयतु राघवः ।
तथेति तां नमस्कृत्य ययौ द्रष्टुं रघूत्तमम् ॥ ६४ ॥

आता मला रामांना लवकर पाहावयाचे आहे. रामांनी मला तत्काळ तशी आज्ञा द्यावी." "ठीक आहे", असे म्हणून व तिला नमस्कार करून मारुती हा रघूत्तमांना भेटण्यास परत गेला. (६४)

जानक्या भाषितं सर्वं रामस्याग्रे न्यवेदयत् ।
यन्निमित्तोऽयमारम्भः कर्मणां च फलोदयः ॥ ६५ ॥

तां देवीं शोकसन्तप्तां द्रष्टुमर्हसि मैथिलीम् ।
एवमुक्तो हनुमता रामो ज्ञानवतां वरः ॥ ६६ ॥

मायासीतां परित्यक्तुं जानकीमनले स्थिताम् ।
आदातुं मनसा ध्यात्वा रामः प्राह बिभीषणम् ॥ ६७ ॥

जानकीचे सर्व भाषण त्याने रामांपुढे निवेदन केले. तो म्हणाला, "हे भगवन् , जिच्यासाठी युद्ध इत्यादीचा आटपिटा केला होता आणि जी या सर्व कर्मांची फलस्वरूप आहे, त्या शोकसंतप्त देवी मैथिलीला आता तुम्ही भेटणे योग्य होईल." हनुमानाने असे म्हटल्यावर, मायासीतेचा त्याग करण्याचा आणि अग्नीत स्थित असणाऱ्या खऱ्या जानकीचा स्वीकार करण्याचा, ज्ञानी पुरुषांतील श्रेष्ठ अशा रामांनी मनात विचार केला आणि मग ते बिभीषणाला म्हणाले. (६५-६७)

गच्छ राजन् जनकजामानयाशु ममान्तिकम् ।
स्नातां विरजवस्त्राढ्यां सर्वाभरणभूषिताम् ॥ ६८ ॥

"हे राजा बिभीषणा, तू आता जा, आणि स्नान घालून, निर्मल वस्त्रे परिधान केलेल्या आणि सर्व अलंकारांनी विभूषित अशा जानकीला त्वरित माझ्याजवळ घेऊन ये." (६८)

बिभीषणोऽपि तच्छ्रुत्वा जगाम सहमारुतिः ।
राक्षसीभिःसुवृद्धाभिः स्नापयित्वा तु मैथिलीम् ॥ ६९ ॥

सर्वाभरणसम्पन्नामारोप्य शिबिकोत्तमे ।
याष्टीकैर्बहुभिर्गुप्तां कञ्चुकोष्णीषिभिः शुभाम् ॥ ७० ॥

ते रामांचे वचन ऐकल्यावर, बिभीषण मारुतीसह गेला. मग वृद्ध अशा राक्षस स्त्रियांकडून मैथिलीला स्नान घालून आणि तिला वस्त्रालंकारांनी विभूषित करून, एका उत्तम पालखीत बसविण्यात आले. अंगरखे आणि मंदिल घातलेले पुष्कळ चोपदार, भालदार त्या पवित्र सीतेचे रक्षण करीत होते. (६९-७०)

तां द्रष्टुमागताः सर्वे वानरा जनकात्मजाम् ।
तान्वारयन्तो बहवः सर्वतो वेत्रपाणयः ॥ ७१ ॥

कोलाहलं प्रकुर्वन्तो रामपार्श्वमुपाययुः ।
दृष्ट्वा तां शिबिकारूढां दूरादथ रघूत्तमः ॥ ७२ ॥

बिभीषण किमर्थं ते वानरान्वारयन्ति हि ।
पश्यन्तु वानराः सर्वे मैथिलीं मातरं यथा ॥ ७३ ॥

त्या वेळी जनककन्येला पाहाण्यास सर्व वानर एकत्र जमले. त्यांना सर्व बाजूंनी रोखत आणि 'बाजूला व्हा, बाजूला व्हा' असा कोलाहल करीत ते अनेक वेत्रधारी भालदार रामांजवळ आले. मग पालखीत बसलेल्या सीतेला दूरूनच पाहून रघूत्तम बिभीषणाला म्हणाले, " बिभीषणा, हे वेत्रधारी भालदार वानरांना का बरे बाजूला करीत आहेत ? आईप्रमाणे असणाऱ्या मैथिलीला सर्व वानरांना पाहू दे. (७१-७३)

पादचारेण सायातु जानकी मम सन्निधिम् ।
श्रुत्वा तद्रामवचनं शिबिकादवरुह्य सा ॥ ७४ ॥

पादचारेण शनकैरागता रामसन्निधिम् ।
रामोऽपि दृष्ट्वा तां मायासीतां कार्यार्थनिर्मिताम् ॥ ७५ ॥

अवाच्यवादान्बहुशः प्राह तां रघुनन्दनः ।
अमृष्यमाणा सा सीता वचनं राघवोदितम् ॥ ७६ ॥

लक्ष्मणं प्राह मे शीघ्रं प्रज्वालय हुताशनम् ।
विश्वासार्थं हि रामस्य लोकानां प्रत्ययाय च ॥ ७७ ॥

आणि जानकी पायी चालत माझ्याजवळ येऊ दे." ते रामांचे वचन ऐकल्यावर, ती पालखीतून खाली उतरून सावकाशपणे पायी चालत रामांजवळ आली. मग विशिष्ट कार्यासाठी निर्मिलेल्या त्या मायासीतेला पाहून, तिच्याविषयी बोलू नयेत असे अनेक शब्द रघुनंदन बोलू लागले. राघवांनी उच्चारलेले ते शब्द सहन न होऊन, सीता लक्ष्मणाला म्हणाली, "रामांचा विश्वास बसावा आणि लोकांची खात्री पटावी यासाठी तू माझ्याकरिता अग्नी प्रज्वलित कर (म्हणजे मी अग्निदिव्य करून माझे पावित्र्य सिद्ध करीन.)" (७४-७७)

राघवस्य मतं ज्ञात्वा लक्ष्मणोऽपि तदैव हि ।
महाकाष्ठचयं कृत्वा ज्वालयित्वा हुताशनम् ॥ ७८ ॥

रामपार्श्वमुपागम्य तस्थौ तूष्णीमरिन्दमः ।
ततः सीता परिक्रम्य राघवं भक्तिसंयुता ॥ ७९ ॥

पश्यतां सर्वलोकानां देवराक्षसयोषिताम् ।
प्रणम्य देवताभ्यश्च ब्राह्मणेभ्यश्च मैथिली ॥ ८० ॥

बद्धाञ्जलिपुटा चेदमुवाचाग्निसमीपगा ।
यथा मे हृदयं नित्यं नापसर्पति राघवात् ॥ ८१ ॥

सीतेच्या या बोलण्याला राघवांची संमती आहे हे पाहून शत्रूचे दमन करणाऱ्या लक्ष्मणाने तत्काळ लाकडांची मोठी रास रचली आणि तेथे अग्नी प्रज्वलित करून, तो रामांजवळ जाऊन उभा राहिला. तेव्हा भक्तीने युक्त असणाऱ्या सीतेने राघवांना प्रदक्षिणा घातल्या. नंतर सर्व लोक, देव, आणि राक्षस स्त्रिया पाहात असतानाच देवतांना आणि ब्राह्मणांना नमस्कार करून, सीता अग्नीजवळ गेली आणि हात जोडून म्हणाली, "जर माझे मन राघवांना सोडून कधीही अन्यत्र कुठे गेले नसेल तर लोकांचा साक्षी असणारा अग्नी माझे सर्वप्रकारे रक्षण

तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः ।
एवमुक्त्वा तदा सीता परिक्रम्य हुताशनम् ॥ ८२ ॥

विवेश ज्वलनं दीप्तं निर्भयेन हृदा सती ॥ ८३ ॥

करो." असे बोलून सीतेने अग्नीला प्रदक्षिणा घातली आणि निर्भय चित्ताने पतिव्रता सीतेने त्या प्रज्वलित अग्नीमध्ये प्रवेश केला. (७८-८३)

हृष्ट्वा ततो भूतगणाः ससिद्धाः
सीतां महावह्निगतां भृशार्ताः ।
परस्परं प्राहुरहो स सीतां
रामः श्रियं स्वां कथमत्यजज्ज्ञः ॥ ८४ ॥

त्या पेटलेल्या प्रचंड अग्नीत सीता प्रविष्ट झाली आहे, हे पाहून सिद्धांसह भूतगण दुःखाने अतिशय व्याकूळ झाले. ते एकमेकांना म्हणू लागले, "अहो, राम इतके ज्ञानी असूनही स्वतःची लक्ष्मी असलेल्या सीतेचा त्याग त्यांनी का बरे केला असेल ?" (८४)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

# त्रयोदश सर्ग

**देव भगवान रामांची स्तुती करतात, सीतेसह अग्निदेव प्रगट होतो आणि अयोध्येकडे प्रस्थान होते.**

*श्रीमहादेव उवाच*

ततः शक्रः सहस्राक्षो यमश्च वरुणस्तथा ।
कुबेरश्च महातेजाः पिनाकी वृषवाहनः ॥ १ ॥

ब्रह्मा ब्रह्मविदां श्रेष्ठो मुनिभिः सिद्धचारणैः ।
ऋषयः पितरः साध्या गन्धर्वाप्सरसोरगाः ॥ २ ॥

एते चान्ये विमानाग्र्यैराजग्मुर्यत्र राघवः ।
अब्रुवन्परमात्मानं रामं प्राञ्जलयश्च ते ॥ ३ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, त्यानंतर सहस्रनयन इंद्र, यम, वरुण, कुबेर, वृषभवाहन महातेजस्वी शंकर, मुनी, सिद्ध व चारण यांच्यासह ब्रह्मवेत्त्यांमध्ये श्रेष्ठ असणारे ब्रह्मदेव, पितर, ऋषी, साध्य, गंधर्व, अप्सरा आणि नाग हे सर्व आणि इतर पुष्कळ जण हे उत्कृष्ट विमानांत बसून आले व हात जोडून परमात्म्या रामांची स्तुती करू लागले. (१-३)

कर्ता त्वं सर्वलोकानां साक्षी विज्ञानविग्रहः ।
वसूनामष्टमोऽसि त्वं रुद्राणां शङ्करो भवान् ॥ ४ ॥

"हे रामा, तुम्ही सर्व लोकांचे कर्ता, सर्वांचे साक्षी, केवळ विज्ञानस्वरूप आहात. वसूंमधील आठवे वसू आणि रुद्रांमधील भगवान शंकर आहात. (४)

आदिकर्तासि लोकानां ब्रह्मा त्वं चतुराननः ।
अश्विनौ घ्राणभूतौ ते चक्षुषी चन्द्रभास्करौ ॥ ५ ॥

तुम्हीच सर्व लोकांचे आदिकर्ता चतुर्मुख ब्रह्मदेव आहात. दोन अश्विनीकुमार हे तुमच्या नाकपुड्या आहेत आणि सूर्य व चंद्र हे तुमचे दोन नेत्र आहेत. (५)

लोकानामादिरन्तोऽसि नित्य एकः सदोदितः ।
सदा शुद्धः सदा बुद्धः सदा मुक्तोऽगुणोऽद्वयः ॥ ६ ॥

सर्व लोकांचे आदी (उत्पत्तिस्थान) आणि अंत (लयस्थान) तुम्ही आहात. तुम्ही नित्य, एकमेव आणि सदोदित (म्हणजे आविर्भाव व तिरोभाव यांनी रहित नित्य प्रकाशस्वरूप), नित्य शुद्ध, नित्य बुद्ध, नित्यमुक्त, निर्गुण आणि द्वैतरहित आहात. (६)

त्वन्मायासंवृतानां त्वं भासि मानुषविग्रहः ।
त्वन्नाम स्मरतां राम सदा भासि चिदात्मकः ॥ ७ ॥

हे रामा, जे लोक तुमच्या मायेने आच्छादित झालेले असतात, त्यांना तुम्ही मनुष्यरूप वाटता. याउलट जे लोक सदा तुमचे नामस्मरण करतात त्यांना तुम्ही सदा चैतन्यस्वरूप भासता. (७)

रावणेन हृतं स्थानमस्माकं तेजसा सह ।
त्वयाद्य निहतो दुष्टः पुनः प्राप्तं पदं स्वकम् ॥ ८ ॥

आमच्या तेजासह आमचे स्थान रावणाने हरण केले होते. तो दुष्ट रावण आज तुमच्याकडून मारला गेला आहे. त्यामुळे आमचे स्थान आम्हांला पुनः प्राप्त झाले आहे." (८)

एवं स्तुवत्सु देवेषु ब्रह्मा साक्षात्पितामहः ।
अब्रवीत्प्रणतो भूत्वा रामं सत्यपथे स्थितम् ॥ ९ ॥

अशा प्रकारे देव स्तुती करीत असताना, प्रत्यक्ष पितामह ब्रह्मदेव नम्र होऊन, सत्याच्या मार्गावर राहाणाऱ्या रामांना म्हणाले. (९)

*ब्रह्मोवाच*

वन्दे देवं विष्णुमशेषस्थितिहेतुं
त्वामध्यात्मज्ञानिभिरन्तर्हृदि भाव्यम् ।
हेयाहेयद्वन्द्वविहीनं परमेकं
सत्तामात्रं सर्वहृदिस्थं दृशिरूपम् ॥ १० ॥

**ब्रह्मदेव म्हणाले**– "हे रामा, चराचराच्या स्थितीचे कारण, अध्यात्मज्ञानी लोकांकडून नेहमी हृदयांत ध्यान केले जाणारे, त्याज्य व ग्राह्य या द्वंद्वांनी रहित, सर्वांच्या पलीकडे असणारे, एकमेव, अद्वितीय, अस्तित्वरूप, सर्वांच्या हृदयांत असणारे आणि साक्षिस्वरूप असे तुम्ही विष्णू देव आहात. तुम्हांला मी वंदन करतो. (१०)

प्राणापानौ निश्चयबुद्ध्या हृदि रुद्ध्वा
छित्त्वा सर्वं संशयबन्धं विषयौघान् ।
पश्यन्तीशं यं गतमोहा यतयस्तं
वन्दे रामं रत्नकिरीटं रविभासम् ॥ ११ ॥

मायातीतं माधवमाद्यं जगदादिं
मानातीतं मोहविनाशं मुनिवन्द्यम् ।
योगिध्येयं योगविधानं परिपूर्णं
वन्दे रामं रञ्जितलोकं रमणीयम् ॥ १२ ॥

भावाभावप्रत्ययहीनं भवमुख्यै-
र्योगासक्तैरर्चितपादाम्बुजयुग्मम् ।
नित्यं शुद्धं बुद्धमनन्तं प्रणवाख्यं
वन्दे रामं वीरमशेषासुरदावम् ॥ १३ ॥

त्वं मे नाथो नाथितकार्याखिलकारी
मानातीतो माधवरूपोऽखिलधारी ।
भक्त्या गम्यो भावितरूपो भवहारी
योगाभ्यासैर्भावितचेतःसहचारी ॥ १४ ॥

निश्चयात्मक बुद्धीने प्राण आणि अपान यांचा हृदयामध्ये निरोध करून, आणि संशयाचे सर्व बंध आणि विषय वासनांचा समूह तोडून टाकून, जे मोहरहित संन्यासी लोक ज्या ईश्वराला पाहातात, अशा त्या रत्न-किरीट-धारी आणि सूर्याप्रमाणे तेजस्वी अशा रामा, तुम्हांला मी वंदन करतो. मायेच्या अतीत, लक्ष्मीचे पती, सर्वांचे आदिकारण, जे जगाचे उत्पत्तिस्थान, प्रमाणांच्या पलीकडचे, मोहाचा नाश करणारे, मुनींना वंदनीय, योगी लोकांच्या ध्यानाचे ध्येय, योग-मार्गाचे प्रवर्तक, परिपूर्ण, लोकांना आनंदित करणारे, आणि जे सुंदर आहेत, अशा रामांना मी वंदन करतो. जे भाव म्हणजे अस्तिरूप आणि अभाव म्हणजे नास्तिरूप अशा दोन्ही प्रकारच्या प्रतीतींनी रहित आहेत, शंकर इत्यादी योगपरायण लोक ज्यांच्या पदकमल-युगलाचे पूजन करतात, जे नित्य, शुद्ध, बुद्ध व अनंत आहेत, ज्यांना ॐकार हे नाव दिले जाते आणि जे सर्व असुरांना दावानलाप्रमाणे आहेत, अशा वीर रामांना मी वंदन करतो. हे रामा, तुम्ही माझे स्वामी आहात. माझ्या प्रार्थनेप्रमाणे सर्व कार्ये करणारे आहात. तुम्ही देशकाल इत्यादी परिमाणांनी रहित आहात. तुम्ही लक्ष्मीपती माधवस्वरूप आहात. सर्व विश्वाला धारण करणारे तुम्ही आहात. तुम्ही भक्तीने प्राप्त होणारे आहात. तुमच्या रूपाचे ध्यान केले असता तुम्ही संसाराचा नाश करता आणि योगाच्या अभ्यासाने शुद्ध झालेल्या चित्तात तुम्ही विहार करता. लोकसमूहांचे तुम्ही आदी (उत्पत्तिस्थान) आणि अंत (लयस्थान) आहात. तुम्ही सर्व

त्वामाद्यन्तं लोकततीनां परमीशं
लोकानां नो लौकिकमानैरधिगम्यम् ।
भक्तिश्रद्धाभावसमेतैर्भजनीयं
वन्दे रामं सुन्दरमिन्दीवरनीलम् ॥ १५ ॥

लोकांचे परम ईश्वर आहात. लौकिक प्रमाणांनी तुम्ही कळून येणारे नाहीत. भक्ती, श्रद्धा आणि भाव यांनी युक्त असणाऱ्या माणसाकडूनच तुम्ही भजन करण्यास योग्य आहात. तुम्ही नीलकमलाप्रमाणे श्यामवर्णी आहात; अशा तुम्हाला, सुंदर रामांना मी वंदन करतो. (११-१५)

को वा ज्ञातुं त्वामतिमानं गतमानं
मायासक्तो माधव शक्तो मुनिमान्यम् ।
वृन्दारण्ये वन्दितवृन्दारकवृन्दं
वन्दे रामं भवमुखवन्द्यं सुखकन्दम् ॥ १६ ॥

हे लक्ष्मीपते, तुम्ही प्रत्यक्ष इत्यादी प्रमाणांच्या पलीकडचे व मानरहित आहात. मायेत आसक्त असणारा कोणता पुरुष तुम्हांला जाणण्यास समर्थ होईल? तुम्ही मुनी लोकांना पूज्य आहात. कृष्ण-अवताराच्या वेळी वृंदावनात तुम्ही सर्व देवसमूहाला वंदन केले होते. तरी शंकर इत्यादी देवांना तुम्ही वंदनीय आहात. तुम्ही सुखाचा कंद आहात. अशा रामा, तुम्हांला मी वंदन करतो. (१६)

नानाशास्त्रैर्वेदकदम्बैः प्रतिपाद्यं
नित्यानन्दं निर्विषयज्ञानमनादिम् ।
मत्सेवार्थं मानुषभावं प्रतिपन्नं
वन्दे रामं मरकतवर्णं मथुरेशम् ॥ १७ ॥

नाना प्रकारची शास्त्रे आणि वेद यांचे समूह ज्याचे प्रतिपादन करतात, जो नित्य आनंदस्वरूप आहे, जो निर्विषय ज्ञानस्वरूप आणि अनादी आहे, असे तुम्ही आहात. माझे कार्य करण्यासाठी तुम्ही मनुष्यरूप धारण केले आहे. पाचूप्रमाणे श्यामल वर्ण असणाऱ्या आणि मथुरेचा स्वामी* असणाऱ्या रामांना मी वंदन करतो." (१७)

श्रद्धायुक्तो यः पठतीमं स्तवमाद्यं
ब्राह्मं ब्रह्मज्ञानविधानं भुवि मर्त्यः ।
रामं श्यामं कामितकामप्रदमीशं
ध्यात्वा ध्याता पातकजालैर्विगतः स्यात् ॥ १८ ॥

भक्तांच्या इच्छित कामना पूर्ण करणारे, ब्रह्मज्ञानपूर्ण असे ब्रह्मदेवांनी केलेले हे आदिस्तोत्र जो कोणी श्रद्धासंपन्न माणूस या पृथ्वीवर पठण करतो आणि श्यामवर्ण राम या ईश्वराचे ध्यान करतो, तो ध्यान करणारा सर्व पातकांतून मुक्त होऊन जातो. (१८)

श्रुत्वा स्तुतिं लोकगुरोर्विभावसुः
स्वाङ्के समादाय विदेहपुत्रिकाम् ।
विभ्राजमानां विमलारुणद्युतिं
रक्ताम्बरां दिव्यविभूषणान्विताम् ॥ १९ ॥

लोकगुरू अशा ब्रह्मदेवांनी केलेली ही स्तुती ऐकल्यावर, जानकीला घेऊन, साक्षात अग्नी प्रकट झाला. ती सीता तेजःपुंज होती. तिची कांती निर्मळ आणि अरुणाप्रमाणे तांबूस होती. तिने लाल रंगाचे वस्त्र परिधान केले होते आणि ती दिव्य अलंकारांनी विभूषित झालेली होती. (१९)

प्रोवाच साक्षी जगतां रघूत्तमं
प्रपन्नसर्वार्तिहरं हुताशनः ।
गृहाण देवीं रघुनाथ जानकीं
पुरा त्वया मय्यवरोपितां वने ॥ २० ॥

सर्व जगांचा साक्षी असणारा अग्निदेव शरणागताची सर्व दुःखे हरण करणाऱ्या रघूत्तमांना म्हणाला, "हे रघुनाथा, पूर्वी तुम्ही तपोवनात माझ्या स्वाधीन केलेल्या या देवी जानकीचा आता स्वीकार करा. (२०)

विधाय मायाजनकात्मजां हरे
दशाननप्राणविनाशनाय च ।
हतो दशास्यः सह पुत्रबान्धवै-
र्निराकृतोऽनेन भरो भुवः प्रभो ॥ २१ ॥

हे हरी, रावणाचा विनाश करण्यासाठी तुम्ही मायामय सीता निर्माण करून, रावणाला त्याच्या पुत्र-बांधवांसह ठार केले आणि अशा प्रकारे, हे प्रभो, या योगाने तुम्ही भूमीचा भार दूर केला. (२१)

* येथे रामाला मथुरानाथ असे म्हणून श्रीराम व श्रीकृष्ण यांचे अभिन्नत्व प्रकट केलेलेआहे.

तिरोहिता सा प्रतिबिम्बरूपिणी
कृता यदर्थं कृतकृत्यतां गता ।
ततोऽतिहृष्टां परिगृह्य जानकीं
रामः प्रहृष्टः प्रतिपूज्य पावकम् ॥ २२ ॥

ज्या कार्यासाठी ती प्रतिबिंबरूपी सीता निर्माण केली गेली होती, ते कार्य पूर्ण करून व कृतकृत्य होऊन ती आता अंतर्धान पावली आहे." अग्नीचे हे भाषण ऐकल्यानंतर अतिशय आनंदित झालेल्या रामांनी अग्नीची पूजा करून, प्रसन्न झालेल्या सीतेचा स्वीकार केला. (२२)

स्वाङ्के समावेश्य सदानपायिनीं
श्रियं त्रिलोकीजननीं श्रियः पतिः ।
दृष्ट्वाथ रामं जनकात्मजायुतं
श्रिया स्फुरन्तं सुरनायको मुदा ।
भक्त्या गिरा गद्गदया समेत्य
कृताञ्जलिः स्तोतुमथोपचक्रमे ॥ २३ ॥

आपल्यापासून कधीही वियुक्त न होणाऱ्या, त्रैलोक्य जननी अशा लक्ष्मीला -सीतेला- लक्ष्मीपती रामांनी आपल्या मांडीवर बसविले. त्यानंतर आपल्या तेजाने शोभणाऱ्या आणि सीतेसह असणाऱ्या रामांना पाहिल्यावर, इंद्र हा त्यांच्याजवळ आला, त्याने हात जोडले, आणि आनंदपूर्वक भक्तीने गद्गद झालेल्या वाणीने त्याने स्तुती करण्यास प्रारंभ केला. (२३)

*इन्द्र उवाच*

भजेऽहं सदा राममिन्दीवराभं
भवारण्यदावानलाभाभिधानम् ।
भवानीहृदा भावितानन्दरूपं
भवाभावहेतुं भवादिप्रपन्नम् ॥ २४ ॥

**इंद्र म्हणाला –** "ज्यांची प्रभा नीलकमलाप्रमाणे आहे, ज्यांचे नाव हे संसाररूपी अरण्याला दावानलाप्रमाणे जाळून टाकणारे आहे, ज्यांच्या आनंदस्वरूपाचे ध्यान पार्वती आपल्या हृदयात करते, जे संसारातून सोडविणारे आहेत आणि शंकर इत्यादी देव ज्यांना शरण येतात, अशा श्रीरामांचे मी भजन करतो. (२४)

सुरानीकदुःखौघनाशैकहेतुं
नराकारदेहं निराकारमीड्यम् ।
परेशं परानन्दरूपं वरेण्यं
हरिं राममीशं भजे भारनाशम् ॥ २५ ॥

देवांच्या असंख्य दुःखांचा नाश करण्याचे जे एकमेव कारण आहेत, ज्यांनी मानवदेह धारण केला आहे, जे निराकार आहेत, जे स्तुती करण्यास योग्य आहेत, जे परमेश्वर आहेत, जे परमानंद स्वरूप आहेत, जे श्रेष्ठ आहेत, आणि ज्यांनी भूमीचा भार नष्ट केला आहे अशा विष्णुरूप ईश्वर श्रीरामांना मी भजतो. (२५)

प्रपन्नाखिलानन्ददोहं प्रपन्नं
प्रपन्नार्तिनिःशेषनाशाभिधानम् ।
तपोयोगयोगीशभावाभिभाव्यं
कपीशादिमित्रं भजे राममित्रम् ॥ २६ ॥

सदा भोगभाजां सुदूरे विभान्तं
सदा योगभाजामदूरे विभान्तम् ।
चिदानन्दकन्दं सदा राघवेशं
विदेहात्मजानन्दरूपं प्रपद्ये ॥ २७ ॥

महायोगमायाविशेषानुयुक्तो
विभासीश लीलानराकारवृत्तिः ।
त्वदानन्दलीलाकथापूर्णकर्णाः
सदानन्दरूपा भवन्तीह लोके ॥ २८ ॥

जे शरण आलेल्यांना सर्व प्रकारचा आनंद देणारे आहेत व त्यांना आधार असणारे आहेत, ज्यांचे नाव हे शरण आलेल्यांच्या संपूर्ण दुःखाचा नाश करते, तप, योग तसेच योगीश्वरांच्या भावना यांच्याद्वारा ज्यांचे चिंतन केले जाते, जे सुग्रीव इत्यादींचा मित्र आहेत, अशा सूर्यसदृश रामांना मी भजतो. भोग भोगणाऱ्या लोकांपासून जे नेहमी अतिशय दूरच असतात, योगाचा अभ्यास करणाऱ्यांच्या अगदी जवळ जे प्रकाशित असतात, जे चैतन्य व आनंद यांचा कंद आहेत, जे रघुकुळातील लोकांत श्रेष्ठ आहेत आणि विदेह कन्येला- सीतेला- जे सदा आनंद देतात, अशा रामांना मी शरण जातो. हे ईश्वर रामा, तुम्ही आपल्या महान योग मायेच्या गुणधर्मांनी युक्त होऊन, लीलेने मानवरूप धारण करून, माणसाप्रमाणे आचरण करता, असे दिसते. तुमच्या आनंदमय लीलांच्या कथांनी ज्यांचे कान पूर्ण भरून गेले आहेत, ते लोक या जगात नित्य आनंदरूप होऊन जातात. (२८)

अहं मानपानाभिमत्तप्रमत्तो
न वेदाखिलेशाभिमानाभिमान: ।
इदानीं भवत्पादपद्मप्रसादात्
त्रिलोकाधिपत्याभिमानो विनष्ट: ॥ २९ ॥

हे ईश्वरा, आजपर्यंत मी वैभवाचा अभिमान, सोम-पान यांच्या योगाने धुंद झालो होतो आणि मीच सर्वांचा स्वामी आहे, या अभिमानाने गर्विष्ठ झालो होतो. म्हणून मी तुम्हांला व अन्य कुणालाही मानत नव्हतो. परंतु आता मात्र तुमच्या चरणकमळांच्या प्रसादामुळे मी तिन्ही लोकांचा अधिपती आहे, हा माझा अभिमान नष्ट झाला आहे. (२९)

स्फुरद्रत्नकेयूरहाराभिरामं
धराभारभूतासुरानीकदावम् ।
शरच्चन्द्रवक्त्रं लसत्पद्मनेत्रं
दुरावारपारं भजे राघवेशम् ॥ ३० ॥

चमकणाऱ्या रत्नांनी जडित अशी बाहुभूषणे व हार यांनी जे सुशोभित आहेत, भूमीला भारभूत झालेल्या असुरांच्या सैन्याला जे दावानलाप्रमाणे वाटत आहेत, शरद ऋतूतील चंद्राप्रमाणे ज्यांचे मुख आहे, ज्यांचे नेत्रकमल मनोहर आहेत, ज्यांचा आदी व अंत यांचा थांग लागणे हे अत्यंत कठीण आहे, अशा राघवेंद्रांना मी भजतो. (३०)

सुराधीशनीलाभ्रनीलाङ्गकान्तिं
विराधादिरक्षोवधाल्लोकशान्तिम् ।
किरीटादिशोभं पुरारातिलाभं
भजे रामचन्द्रं रघूणामधीशम् ॥ ३१ ॥

इंद्रनील मण्याप्रमाणे किंवा नीलवर्ण मेघाप्रमाणे ज्यांची अंगकांती श्याम आहे, विराध इत्यादी राक्षसांचा वध केल्यामुळे ज्यांनी लोकांमध्ये निर्भयता स्थापन केली आहे, ज्यांना किरीट इत्यादींनी शोभा आली आहे आणि शंकरांना जे परमधन वाटतात, व जे रघुकुळाचे अधीश्वर आहेत, अशा रामचंद्रांना मी भजतो. (३१)

लसच्चन्द्रकोटिप्रकाशादिपीठे
समासीनमङ्के समाधाय सीताम् ।
स्फुरद्धेमवर्णां तडित्पुञ्जभासं
भजे रामचन्द्रं निवृत्तार्तितन्द्रम् ॥ ३२ ॥

चमकणाऱ्या कोटि-चंद्राप्रमाणे प्रकाशमान असणाऱ्या सिंहासनावर, तेजोमय सुवर्णाप्रमाणे वर्ण असणाऱ्या, विजेच्या पुंजाप्रमाणे देदीप्यमान असणाऱ्या अशा सीतेला मांडीवर घेऊन जे समाधानाने बसले आहेत, अशा आनंदस्वरूप रामचंद्रांचे मी भजन करतो. (३२)

तत: प्रोवाच भगवान्भवान्या सहितो भव: ।
रामं कमलपत्राक्षं विमानस्थो नभ:स्थले ॥ ३३ ॥

आकाशातील विमानात पार्वतीसहित बसलेल्या भगवान शंकरांनी कमलनेत्र रामांना म्हटले. (३३)

आगमिष्याम्ययोध्यायां द्रष्टुं त्वां राज्यसत्कृतम् ।
इदानीं पश्य पितरमस्य देहस्य राघव ॥ ३४ ॥

ततोऽपश्यद्विमानस्थं रामो दशरथं पुर: ।
ननाम शिरसा पादौ मुदा भक्त्या सहानुज: ॥ ३५ ॥

आलिङ्ग्य मूर्ध्न्यवघ्राय रामं दशरथोऽब्रवीत् ।
तारितोऽस्मि त्वया वत्स संसाराद्दु:खसागरात् ॥ ३६ ॥

इत्युक्त्वा पुनरालिङ्ग्य ययौ रामेण पूजित: ।
रामोऽपि देवराजं तं दृष्ट्वा प्राह कृताञ्जलिम् ॥ ३७ ॥

मत्कृते निहतान्सङ्ख्ये वानरान्पतितान् भुवि ।
जीवयाशु सुधावृष्ट्या सहस्राक्ष ममाज्ञया ॥ ३८ ॥

"हे राघवा, अयोध्येमध्ये तुमच्यावर राज्याभिषेक सोहळा होत असताना तो पाहाण्यास मी येईन. तत्पूर्वी आत्ता तुम्ही तुमच्या या देहाचे जनक जे दशरथ आहेत, त्यांचे तुम्ही दर्शन घ्या." तेव्हा रामांनी आपल्यापुढे विमानात बसलेल्या दशरथांना पाहिले. तेव्हा लक्ष्मण व रामांनी आनंदपूर्वक त्यांना भक्तीने शिरसाष्टांग नमस्कार केला. त्या वेळी रामांना आलिंगन देऊन व त्यांच्या मस्तकाचे अवघ्राण करून दशरथ रामांना म्हणाले, "हे बाळा रामा, संसाररूपी दु:खसागरातून तू मला तारून नेले आहेस." असे बोलून दशरथांनी रामांना पुन: आलिंगन दिले. त्यानंतर रामांनी पूजा केल्यावर ते निघून गेले. इकडे, हात जोडून उभ्या असणाऱ्या त्या देवराज इंद्राला पाहून रामांनीसुद्धा म्हटले. "हे इंद्रा, माझ्या आज्ञेवरून तू माझ्यासाठी युद्धात येथे जमिनीवर मरून पडलेल्या वानरांना अमृताची वृष्टी करून ताबडतोब जिवंत कर." (३४-३८)

तथेत्यमृतवृष्ट्या तान् जीवयामास वानरान् ।
ये ये मृता मृधे पूर्वं ते ते सुप्तोत्थिता इव ।
पूर्ववद्बलिनो हृष्टा रामपार्श्वमुपाययुः ॥ ३९ ॥

"ठीक आहे", असे बोलून इंद्राने अमृताचा वर्षाव करून त्या वानरांना जिवंत केले. पूर्वी युद्धात जे वानर मेले होते ते झोपेतून जागे व्हावे, त्या प्रमाणे पूर्वीप्रमाणेच बलवान् दिसत होते; ते आनंदित होऊन रामांजवळ आले. (३९)

नोत्थिता राक्षसास्तत्र पीयूषस्पर्शनादपि ।
बिभीषणस्तु साष्टाङ्गं प्रणिपत्याब्रवीद्वचः ॥ ४० ॥

तथापि अमृताचा स्पर्श होऊनसुद्धा तेथे रणभूमीवर मरून पडलेले राक्षस मात्र जिवंत होऊन उठले नाहीत.* मग बिभीषण रामांना साष्टांग प्रणिपात करून म्हणाला. (४०)

देव मामनुगृह्णीष्व मयि भक्तिर्यदा तव ।
मङ्गलस्नानमद्य त्वं कुरु सीतासमन्वितः ॥ ४१ ॥

"हे देवा, माझ्यावर अनुग्रह करा. ज्या अर्थी तुमची माझ्यावर प्रीती आहे, त्या अर्थी तुम्ही आज सीतेसह मंगल स्नान करावे, अशी माझी इच्छा आहे. (४१)

अलङ्कृत्य सह भ्राता श्वो गमिष्यामहे वयम् ।
बिभीषणवचः श्रुत्वा प्रत्युवाच रघूत्तमः ॥ ४२ ॥

मग उद्या लक्ष्मणासह अलंकृत होऊन सर्वजण अयोध्येकडे जाऊया." बिभीषणाचे वचन ऐकल्यावर, रघुनाथांनी त्याला प्रत्युत्तर दिले. (४२)

सुकुमारोऽतिभक्तो मे भरतो मामवेक्षते ।
जटावल्कलधारी स शब्दब्रह्मसमाहितः ॥ ४३ ॥

"माझा भाऊ भरत हा अतिशय सुकुमार आहे आणि माझा परम भक्त आहे. जटा आणि वल्कले धारण करून, शब्दब्रह्मात ध्यान लावून तो माझी वाट पाहात आहे. (४३)

कथं तेन विना स्नानमलङ्कारादिकं मम ।
अतः सुग्रीवमुख्यांस्त्वं पूजयाशु विशेषतः ॥ ४४ ॥

तेव्हा त्याला भेटल्याशिवाय मी कसे बरे अभ्यंग स्नान करून अलंकार इत्यादी धारण करू ? म्हणून तू आता प्रथम सुग्रीव इत्यादी मुख्य वानरांचा विशेषे करून लवकर सत्कार कर . (४४)

पूजितेषु कपीन्द्रेषु पूजितोऽहं न संशयः ।
इत्युक्तो राघवेणाशु स्वर्णरत्नाम्बराणि च ॥ ४५ ॥

ववर्ष राक्षसश्रेष्ठो यथाकामं यथारुचि ।
ततस्तान्पूजितान्दृष्ट्वा रामो रत्नैश्च यूथपान् ॥ ४६ ॥

अभिनन्द्य यथान्यायं विससर्ज हरीश्वरान् ।
बिभीषणसमानीतं पुष्पकं सूर्यवर्चसम् ॥ ४७ ॥

आरुरोह ततो रामस्तद्विमानमनुत्तमम् ।
अङ्के निधाय वैदेहीं लज्जमानां यशस्विनीम् ॥ ४८ ॥

लक्ष्मणेन सह भ्रात्रा विक्रान्तेन धनुष्मता ।
अब्रवीच्च विमानस्थः श्रीरामः सर्ववानरान् ॥ ४९ ॥

या वानरांचा सत्कार केला असता, तो माझाच सत्कार होईल यात संशय नाही." असे राघवांनी सांगितल्यावर, बिभीषणाने तत्काळ त्या वानरांच्या इच्छेप्रमाणे आणि आवडीप्रमाणे त्यांच्यावर सोने, रत्ने आणि वस्त्रे यांचा वर्षाव केला. वानरांचे समूहनायक हे त्याप्रमाणे रत्ने इत्यादींनी सन्मानिले गेले आहेत, हे पाहिल्यावर रामांनी त्यांचे यथायोग्य अभिनंदन केले आणि त्या वानरश्रेष्ठांना जाण्यासाठी रीतसर निरोप दिला. त्यानंतर बिभीषणाने आणलेल्या आणि सूर्याप्रमाणे तेजस्वी असणाऱ्या त्या अत्युत्तम पुष्पक नावाच्या विमानात राम चढले. लाजणाऱ्या आणि यशस्विनी वैदेहीला त्यांनी आपल्या मांडीवर घेतले. महापराक्रमी आणि धनुष्य धारण करणारा लक्ष्मण हासुद्धा त्यांच्या बरोबर विमानात होता.

---

* जीवदान देणे हा अमृताचा स्वाभाविक गुण आहे. म्हणून अमृताचा स्पर्श होऊनही राक्षस जिवंत न होणे यात स्वभाव विपर्यय हा दोष येतो. परंतु भगवंतांच्या इच्छेचा प्रभाव इतका प्रबळ आहे की त्यांच्यापुढे काहीही असंभवनीय नाही. भगवंतांची इच्छा नसल्याने अमृताचा प्रभावसुद्धा बाधित झाला. याखेरीज दुसरे कारण असेही असू शकते की साक्षात रामांकडून ठार मारले गेले असल्यामुळे ते राक्षस मुक्त होऊन गेले होते. त्यामुळे अमृताचा स्पर्शसुद्धा त्या राक्षसांना पुनः जिवंत करू शकला नाही.

सुग्रीवं हरिराजं च अङ्गदं च बिभीषणम् ।
मित्रकार्यं कृतं सर्वं भवद्भिः सह वानरैः ॥ ५० ॥

विमानात बसलेले श्रीराम सर्व वानर, वानरराज सुग्रीव अंगद आणि बिभीषण यांना म्हणाले, "वानरांसह तुम्ही सर्वांनी उत्तमप्रकारे मित्रकार्य केले आहे. (४५-५०)

अनुज्ञाता मया सर्वे यथेष्टं गन्तुमर्हथ ।
सुग्रीव प्रतियाह्याशु किष्किन्धां सर्वसैनिकैः ॥ ५१ ॥

आता माझ्या अनुज्ञेने तुम्ही सर्वजणांनी आपापल्या इष्टस्थानी जावे. अरे सुग्रीवा, तू सर्व वानर-सैनिकांसह त्वरित किष्किंधा नगरीला परत जा. (५१)

स्वराज्ये वस लङ्कायां मम भक्तो बिभीषण ।
न त्वां धर्षयितुं शक्ताः सेन्द्रा अपि दिवौकसः ॥ ५२ ॥

हे बिभीषणा, तू माझा भक्त आहेस. तू लंकेमध्ये स्वतःच्या राज्यात राहा. इंद्रासकट सारे देवसुद्धा तुझ्यावर आक्रमण करण्यास समर्थ होणार नाहीत. (५२)

अयोध्यां गन्तुमिच्छामि राजधानीं पितुर्मम ।
एवमुक्तास्तु रामेण वानरास्ते महाबलाः ॥ ५३ ॥

ऊचुः प्राञ्जलयः सर्वे राक्षसश्च बिभीषणः ।
अयोध्यां गन्तुमिच्छामस्त्वया सह रघूत्तम ॥ ५४ ॥

आता मी माझ्या पित्याच्या अयोध्या राजधानीप्रत जाऊ इच्छित आहे." रामांनी त्यांना असे सांगितल्यावर, ते सर्व महाबलवान वानर आणि राक्षसराज बिभीषण हे सर्व हात जोडून रामांना म्हणाले, "हे रघूत्तमा, तुमच्याबरोबर आम्हीसुद्धा अयोध्या नगरीस येऊ इच्छितो. (५३-५४)

दृष्ट्वा त्वामभिषिक्तं तु कौसल्यामभिवाद्य च ।
पश्चाद्वृणीमहे राज्यमनुज्ञां देहि नः प्रभो ॥ ५५ ॥

हे प्रभो, तुमच्यावर राज्याभिषेक झालेला पाहून आणि कौसल्येला वंदन करून, नंतर आम्ही आपापल्या राज्यात जाऊ. कृपया तुम्ही अनुज्ञा द्या." (५५)

रामस्तथेति सुग्रीवं वानरैः सबिभीषणः ।
पुष्पकं सहनूमांश्च शीघ्रमारोह साम्प्रतम् ॥ ५६ ॥

"ठीक आहे", असे सांगून रामांनी म्हटले, "अरे सुग्रीवा, सर्व वानर, बिभीषण आणि हनुमान यांना बरोबर घेऊन, तू आता लगेच या पुष्पक विमानात आरोहण कर." (५६)

ततस्तु पुष्पकं दिव्यं सुग्रीवः सह सेनया ।
बिभीषणश्च सामात्यः सर्वे चारुरुहुर्द्रुतम् ॥ ५७ ॥

तेव्हा वानरसेनेसह सुग्रीव आणि अमात्यांसह बिभीषण असे ते सर्व जण झटपट त्या दिव्य विमानात चढून बसले. (५७)

तेष्वारूढेषु सर्वेषु कौबेरं परमासनम् ।
राघवेणाभ्यनुज्ञातमुत्पपात विहायसा ॥ ५८ ॥

ते सर्व आरूढ झाल्यावर आणि रामांनी अनुज्ञा दिल्यावर, ते कुबेराचे उत्तम विमान उड्डाण करून आकाश मार्गाने निघाले. (५८)

बभौ तेन विमानेन हंसयुक्तेन भास्वता ।
प्रहृष्टश्च तदा रामश्चतुर्मुख इवापरः ॥ ५९ ॥

त्या तेजस्वी विमानामध्ये आनंदपूर्वक बसलेले राम हंसावरून जाणाऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणे शोभू लागले. (५९)

ततो बभौ भास्करबिम्बतुल्यं
कुबेरयानं तपसानुलब्धम् ।
रामेण शोभां नितरां प्रपेदे
सीतासमेतेन सहानुजेन ॥ ६० ॥

त्यानंतर तपश्चर्येच्या योगाने प्राप्त झालेले आणि सूर्यबिंबाप्रमाणे देदीप्यमान असणारे ते कुबेराचे विमान अगोदरच शोभून दिसत होते. त्यातच लक्ष्मण आणि सीता बरोबर असणाऱ्या रामांमुळे ते अधिकच शोभू लागले. (६०)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

# चतुर्दश सर्ग

## अयोध्या-यात्रा, भरद्वाज मुनींचे आतिथ्य आणि भरत भेट

*श्रीमहादेव उवाच*

पातयित्वा ततश्चक्षुः सर्वतो रघुनन्दनः ।
अब्रवीन्मैथिलीं सीतां रामः शशिनिभाननाम् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, त्यानंतर सर्व बाजूंकडे दृष्टिक्षेप करून, रघुनंदन राम चंद्रानना सीतेला म्हणाले. (१)

त्रिकूटशिखराग्रस्थां पश्य लङ्कां महाप्रभाम् ।
एतां रणभुवं पश्य मांसकर्दमपङ्किलाम् ॥ २ ॥

"हे सीते, त्रिकूट पर्वताच्या शिखरावर असलेली आणि अतिशय प्रभा असणारी ही लंका बघ. तसेच मांसाच्या चिखलाने भरून गेलेली ही रणभूमी बघ. (२)

असुराणां प्लवङ्गानामत्र वैशसनं महत् ।
अत्र मे निहतः शेते रावणो राक्षसेश्वरः ॥ ३ ॥

येथे राक्षस आणि वानर यांचा फार मोठा संहार झाला. मी मारलेला राक्षसराज रावण येथे पडला होता. (३)

कुम्भकर्णेन्द्रजिन्मुख्याः सर्वे चात्र निपातिताः ।
एष सेतुर्मया बद्धः सागरे सलिलाशये ॥ ४ ॥

कुंभकर्ण, इंद्रजित इत्यादी सर्व राक्षस येथेच पडले होते. सागरावर हा सेतू मी बांधला. (४)

एतच्च दृश्यते तीर्थं सागरस्य महात्मनः ।
सेतुबन्धमिति ख्यातं त्रैलोक्येन च पूजितम् ॥ ५ ॥

या महात्म्या विशाल सागराचे सेतुबंध नावाने प्रख्यात असणारे आणि तिन्ही लोकांकडून पूजिले जाणारे हे तीर्थ दिसून येत आहे. (५)

एतत्पवित्रं परमं दर्शनात्पातकापहम् ।
अत्र रामेश्वरो देवो मया शम्भुः प्रतिष्ठितः ॥ ६ ॥

हे अतिशय पवित्र असून, केवळ त्याच्या दर्शनानेच ते पातकांचे हरण करते. येथे रामेश्वर महादेवांची मी स्थापना केली आहे. (६)

अत्र मां शरणं प्राप्तो मन्त्रिभिश्च बिभीषणः ।
एषा सुग्रीवनगरी किष्किन्धा चित्रकानना ॥ ७ ॥

मंत्र्यांसह बिभीषण मला येथे शरण आला होता. विचित्र उपवनांनी युक्त असणारी ही सुग्रीवाची नगरी किष्किंधा आहे." (७)

तत्र रामाज्ञया ताराप्रमुखा हरियोषितः ।
आनयामास सुग्रीवः सीतायाः प्रियकाम्यया ॥ ८ ॥

तेथे सीतेला प्रसन्न करण्यासाठी, रामांच्या आज्ञेने तारा इत्यादी वानरस्त्रिया सुग्रीवाने आणवल्या. (८)

ताभिः सहोत्थितं शीघ्रं विमानं प्रेक्ष्य राघवः ।
प्राह चाद्रिमृष्यमूकं पश्य वाल्यत्र मे हतः ॥ ९ ॥

त्या स्त्रियांना बरोबर घेऊन त्यांच्यासह चट्दिशी उड्डाण करणारे ते विमान पाहून, राघव सीतेला म्हणाले, " सीते, हा ऋष्यमूक पर्वत पाहा. येथे मी वालीचा वध केला होता. (९)

एषा पञ्चवटी नाम राक्षसा यत्र मे हताः ।
अगस्त्यस्य सुतीक्ष्णस्य पश्याश्रमपदे शुभे ॥ १० ॥

जेथे मी खर, दूषण इत्यादी राक्षसांचा वध केला होता, ती ही पंचवटी नावाची जागा आहे. हे कल्याणी, अगस्त्य आणि सुतीक्ष्ण या ऋषींचीही आश्रमस्थाने तू पाहा. (१०)

एते ते तापसाः सर्वे दृश्यन्ते वरवर्णिनि ।
असौ शैलवरो देवि चित्रकूटः प्रकाशते ॥ ११ ॥

हे कांतिमती सीते, हे सर्व तापस येथे दिसत आहेत. हे देवी, हा तो सर्वश्रेष्ठ चित्रकूट पर्वत स्पष्टपणे दिसत आहे. (११)

अत्र मां कैकयीपुत्रः प्रसादयितुमागतः ।
भरद्वाजाश्रमं पश्य दृश्यते यमुनातटे ॥ १२ ॥

येथेच कैकयीपुत्र भरत मला प्रसन्न करण्यास आला होता. यमुनेच्या तीरावरील हा भरद्वाज ऋषींचा आश्रम पाहा. (१२)

एषा भागीरथी गङ्गा दृश्यते लोकपावनी ।
एषा सा दृश्यते सीते सरयूर्यूपमालिनी ॥ १३ ॥

एषा सा दृश्यतेऽयोध्या प्रणामं कुरु भामिनि ।
एवं क्रमेण सम्प्राप्तो भरद्वाजाश्रमं हरिः ॥ १४ ॥

पूर्णे चतुर्दशे वर्षे पञ्चम्यां रघुनन्दनः ।
भरद्वाजं मुनिं दृष्ट्वा ववन्दे सानुजः प्रभुः ॥ १५ ॥

पप्रच्छ मुनिमासीनं विनयेन रघूत्तमः ।
शृणोषि कच्चिद्भरतः कुशल्यास्ते सहानुजः ॥ १६ ॥

सुभिक्षा वर्ततेऽयोध्या जीवन्ति च हि मातरः ।
श्रुत्वा रामस्य वचनं भरद्वाजः प्रहृष्टधीः ॥ १७ ॥

प्राह सर्वे कुशलिनो भरतस्तु महामनाः ।
फलमूलकृताहारो जटावल्कलधारकः ॥ १८ ॥

पादुके सकलं न्यस्य राज्यं त्वां सुप्रतीक्षते ।
यद्यत्कृतं त्वया कर्म दण्डके रघुनन्दन ॥ १९ ॥

राक्षसानां विनाशं च सीताहरणपूर्वकम् ।
सर्वं ज्ञातं मया राम तपसा ते प्रसादतः ॥ २० ॥

त्वं ब्रह्म परमं साक्षादादिमध्यान्तवर्जितः ।
त्वमग्रे सलिलं सृष्ट्वा तत्र सुप्तोऽसि भूतकृत् ॥ २१ ॥

नारायणोऽसि विश्वात्मन्नराणामन्तरात्मकः ।
त्वन्नाभिकमलोत्पन्नो ब्रह्मा लोकपितामहः ॥ २२ ॥

अतस्त्वं जगतामीशः सर्वलोकनमस्कृतः ।
त्वं विष्णुर्जानकी लक्ष्मीः शेषोऽयं लक्ष्मणाभिधः ॥ २३ ॥

आत्मना सृजसीदं त्वमात्मन्येवात्ममायया ।
न सज्जसे नभोवत्त्वं चिच्छक्त्या सर्वसाक्षिकः ॥ २४ ॥

सर्व लोकांना पावन करणारी ही भागीरथी येथे दिसत आहे. हे सीते, सूर्यवंशी राजांनी केलेल्या यज्ञांच्या स्तूपांच्या समूहांनी युक्त अशी ही सरयू नदी येथे दिसत आहेत. ही अयोध्या दिसते आहे. हे सुंदरी, तिला प्रणाम कर. " अशा प्रकारे क्रमाने जाता जाता राम भरद्वाजांच्या आश्रमात पोचले. (१३-१४)

चौदा वर्ष पूर्ण झाल्यावर, पंचमी तिथीला, रघुनंदनांनी भरद्वाज मुनींना पाहिले आणि लक्ष्मणासह प्रभू रामांनी त्यांना वंदन केले. (१५)

आश्रमात बसलेल्या मुनींना रघूत्तमांनी विनयपूर्वक विचारले, "भरताविषयी तुम्ही काही ऐकले आहे काय ? शत्रुघ्न व भरत कुशल आहेत ना? (१६)

अयोध्येत सुबत्ता आहे ना ? माझ्या माता सुखरूप आहेत ना ?" रामांचे बोलणे ऐकून आनंदित झालेल्या भरद्वाजांनी उत्तर दिले, "रामा, सर्वजण कुशल आहेत. उदार मनाचा भरत हा फळे व मुळे यांचा आहार घेतो. त्याने जटा आणि वल्कले धारण केली आहे. (१७-१८)

राज्याचा संपूर्ण कारभार तुमच्या पादुकांवर सोपवून तो तुमचीच प्रतीक्षा करीत आहे. हे रघुनंदना, दंडकारण्यात तुम्ही जी कृत्ये केलीत, आणि सीतेचे हरण झाल्यावर तुम्ही जो राक्षसांचा विनाश केलात, हे रामा, ते सर्व तुमच्या कृपा-प्रसादामुळे मी तपोबळाने जाणलेले आहे. (१९-२०)

हे रामा आदी, मध्य आणि अंत यांनी रहित असे साक्षात परब्रह्म तुम्हीच आहात. सर्व भूतांना निर्माण करणारे तुम्ही आहात. प्रथम पाणी निर्माण करून नंतर तुम्ही तेथे निद्रा करता. म्हणून तुम्ही नारायण (नार म्हणजे पाणी हे ज्याचे अयन म्हणजे आश्रय आहे तो नारायण) आहात. हे विश्वात्मन, तुम्ही सर्व माणसांचे अंतरात्मा आहात. तुमच्या नाभिकमळातून उत्पन्न झालेले ब्रह्मदेव हे सर्व लोकांचे पितामह आहेत . (२१- २२)

म्हणून तुम्ही सर्व जगांचे ईश्वर आहात. तुम्ही सर्व लोकांकडून वंदिले जाता. तुम्ही साक्षात विष्णू आहात. सीता ही लक्ष्मी आहे आणि लक्ष्मण हा शेष नाग आहे. (२३)

स्वतःच्या मायेने तुम्ही स्वतःच्या ठिकाणी स्वतःच हे संपूर्ण विश्व उत्पन्न करता. परंतु आकाशाप्रमाणे तुम्ही कशानेही लिप्त होत नाही. स्वतःच्या चित्- ज्ञान- शक्तीच्या द्वारा तुम्ही सर्वांचे साक्षी असता. (२४)

बहिरन्तश्च भूतानां त्वमेव रघुनन्दन ।
पूर्णोऽपि मूढदृष्टीनां विच्छिन्न इव लक्ष्यसे ॥ २५ ॥

हे रघुनंदना, सर्व प्राण्यांच्या आत- बाहेर तुम्हीच आहात. आणि जरी तुम्ही पूर्ण म्हणजे अखंड आहात तरी लोकांना तुम्ही मर्यादित असल्यासारखे भासता. (२५)

जगत्त्वं जगदाधारस्त्वमेव परिपालकः ।
त्वमेव सर्वभूतानां भोक्ता भोज्यं जगत्पते ॥ २६ ॥

हे जगताच्या स्वामी रामा, तुम्हीच जग आहात. तुम्हीच जगाचा आधार आहात आणि तुम्हीच जगाचे पालनकर्ते आहात आणि तुम्हीच सर्व भूतांमध्ये भोक्ते आणि अन्नरूपाने भोज्य आहात. (२६)

दृश्यते श्रूयते यद्यत्स्मर्यते वा रघूत्तम ।
त्वमेव सर्वमखिलं त्वद्विनान्यन्न किञ्चन ॥ २७ ॥

हे रघूत्तमा, जे जे काही दिसून येते, ऐकले जाते किंवा स्मरले जाते ते ते सर्व काही तुम्हीच आहात. तुमच्याशिवाय कुठेही काहीही वेगळे असे नाही. (२७)

माया सृजति लोकांश्च स्वगुणैरहमादिभिः ।
त्वच्छक्तिप्रेरिता राम तस्मात्त्वय्युपचर्यते ॥ २८ ॥

हे रामा, तुमच्याच शक्तीने प्रेरणा मिळालेली माया हीच अहंकार इत्यादी स्वतःच्या गुणांनी सर्व लोक उत्पन्न करते. म्हणून सर्व काही करण्याचे कर्तृत्व हे तुमच्यावर आरोपिले जाते. (२८)

यथा चुम्बकसान्निध्याच्चलन्त्येवायसादयः ।
जडास्तथा त्वया दृष्टा माया सृजति वै जगत् ॥ २९ ॥

ज्या प्रमाणे चुंबकाच्या सान्निध्याने लोखंड इत्यादी जड- अचेतन- पदार्थ हलू लागतात, त्या प्रमाणे तुमची दृष्टी पडताच माया ही संपूर्ण जग निर्माण करते. (२९)

देहद्वयमदेहस्य तव विश्वं रिरक्षिषोः ।
विराट् स्थूलं शरीरं ते सूत्रं सूक्ष्ममुदाहृतम् ॥ ३० ॥

तुम्ही स्वतः देहरहित असूनसुद्धा तुम्ही विश्वाचे रक्षण करण्याच्या इच्छेने दोन देह धारण करता. विराट हे तुमचे स्थूल शरीर आहे तर तुमचे सूक्ष्म शरीर हे सूत्र (हिरण्य गर्भ)आहे, असे म्हटले जाते. (३०)

विराजः सम्भवन्त्येते अवताराः सहस्रशः ।
कार्यान्ते प्रविशन्त्येव विराजं रघुनन्दन ॥ ३१ ॥

हे रघुनन्दना, तुमच्या विराट शरीरापासून तुमचे हजारो अवतार उत्पन्न होतात आणि आपले कार्य पूर्ण झाल्यावर ते पुनः तुमच्या विराट शरीरातच प्रवेश करतात. (३१)

अवतारकथां लोके ये गायन्ति गृणन्ति च ।
अनन्यमनसो मुक्तिस्तेषामेव रघूत्तम ॥ ३२ ॥

हे रघूत्तमा, या जगात जे लोक अनन्य चित्त होऊन तुमच्या अवतारांच्या कथा गातात आणि वर्णन करतात त्यांनाच मुक्ती प्राप्त होते. (३२)

त्वं ब्रह्मणा पुरा भूमेर्भारहाराय राघव ।
प्रार्थितस्तपसा तुष्टस्त्वं जातोऽसि रघोः कुले ॥ ३३ ॥

हे राघवा, पूर्वी भूमीचा भार हरण करण्यास ब्रह्मदेवाने तुमची प्रार्थना केली होती. त्यांच्या तपस्येने संतुष्ट होऊन तुम्ही रघूच्या कुळात अवतार घेतला. (३३)

देवकार्यमशेषेण कृतं ते राम दुष्करम् ।
बहुवर्षसहस्राणि मानुषं देहमाश्रितः ॥ ३४ ॥

कुर्वन्दुष्करकर्माणि लोकद्वयहिताय च ।
पापहारीणि भुवनं यशसा पूरयिष्यसि ॥ ३५ ॥

हे रामा, आता तुम्ही देवांचे ते दुष्कर कार्य पूर्णपणे पार पाडले आहे. आता अनेक सहस्र वर्षे या मनुष्य देहात राहूनच, दोन्ही लोकांच्या कल्याणासाठी, तुम्ही अनेक कठीण आणि पापहारक कार्ये करून, स्वतःच्या कीर्तीने हे संपूर्ण विश्व भरून टाकाल. (३४-३५)

प्रार्थयामि जगन्नाथ पवित्रं कुरु मे गृहम् ।
स्थित्वाद्य भुक्त्वा सबलः श्वो गमिष्यसि पत्तनम् ॥ ३६ ॥

हे जगन्नाथा, आज माझे घर तुम्ही पवित्र करा, अशी माझी तुम्हांला प्रार्थना आहे. आज येथे सैन्यासह राहून, भोजन करून, मग उद्या स्वतःच्या नगरीला जा." (३६)

तथेति राघवोऽतिष्ठत्तस्मिन्नाश्रम उत्तमे ।
ससैन्यः पूजितस्तेन सीतया लक्ष्मणेन च ॥ ३७ ॥

"ठीक आहे " असे म्हणून राघव त्या उत्तम आश्रमात राहिले. त्या वेळी सीता, लक्ष्मण व सैन्य यांच्यासह त्यांचा भरद्वाजांनी सत्कार केला. (३७)

ततो रामश्चिन्तयित्वा मुहूर्तं प्राह मारुतिम् ।
इतो गच्छ हनूमंस्त्वमयोध्यां प्रति सत्वरः ॥ ३८ ॥

नंतर क्षणभर विचार करून राम मारुतीला म्हणाले, "हे हनुमंता, आता येथून तू सत्वर अयोध्येकडे जा. (३८)

जानीहि कुशली कच्चिज्जनो नृपतिमन्दिरे ।
शृङ्गवेरपुरं गत्वा ब्रूहि मित्रं गुहं मम ॥ ३९ ॥

तेथे राजमंदिरातील सर्व लोक कुशल आहेत ना, हे जाणून घे. तसेच शृंगवेरपुरात जाऊन तू गुह या माझ्या मित्राशी बोल. (३९)

जानकीलक्ष्मणोपेतमागतं मां निवेदय ।
नन्दिग्रामं ततो गत्वा भ्रातरं भरतं मम ॥ ४० ॥

दृष्ट्वा ब्रूहि सभार्यस्य सभ्रातुः कुशलं मम ।
सीतापहरणादीनि रावणस्य वधादिकम् ॥ ४१ ॥

ब्रूहि क्रमेण मे भ्रातुः सर्वं तत्र विचेष्टितम् ।
हत्वा शत्रुगणान्सर्वान्सभार्यः सहलक्ष्मणः ॥ ४२ ॥

उपयाति समृद्धार्थः सह ऋक्षहरीश्वरैः ।
इत्युक्त्वा तत्र वृत्तान्तं भरतस्य विचेष्टितम् ॥ ४३ ॥

सर्वं ज्ञात्वा पुनः शीघ्रमागच्छ मम सन्निधिम् ।
तथेति हनुमांस्तत्र मानुषं वपुरास्थितः ॥ ४४ ॥

नन्दिग्रामं ययौ तूर्णं वायुवेगेन मारुतिः ।
गरुत्मानिव वेगेन जिघृक्षन् भुजगोत्तमम् ॥ ४५ ॥

जानकी आणि लक्ष्मण यांच्यासह मी परत आलो आहे, असे तू त्याला निवेदन कर. त्यानंतर नंदिग्रामात जाऊन, माझ्या भरताला भेटून, पत्नी व भाऊ यांच्यासह माझे कुशल आहे, असे सांग. त्यानंतर सीतेचे अपहरण झाल्यापासून रावणाचा वध इत्यादी माझी सर्व हकीगत तू तेथे क्रमाने त्याला सांग आणि सर्व शत्रु- समूहाचा वध करून, कृतकृत्य होऊन, राम पत्नी व लक्ष्मण यांचेसह तसेच श्रेष्ठ अस्वले आणि वानर यांना बरोबर घेऊन येत आहेत, असे तू सांग. हा सर्व वृत्तांत तेथे सांगून, भरताचा समाचार घेऊन, पुनः सत्वर माझ्याजवळ ये." "ठीक आहे" असे म्हणून हनुमंताने तेथेच मानवी शरीर धारण केले आणि नंतर ज्या प्रमाणे गरुड सर्पाला पकडण्याच्या इच्छेने वेगाने जातो त्याप्रमाणे तो लगेच वायुवेगाने नंदिग्रामाकडे निघाला. (४०-४५)

शृङ्गवेरपुरं प्राप्य गुहमासाद्य मारुतिः ।
उवाच मधुरं वाक्यं प्रहृष्टेनान्तरात्मना ॥ ४६ ॥

प्रथम शृंगवेरपुरात पोचल्यावर, गुहाजवळ जाऊन, आनंदित मनाने मारुतीने असे गोड शब्दांत म्हटले. (४६)

रामो दाशरथिः श्रीमान्सखा ते सह सीतया ।
सलक्ष्मणस्त्वां धर्मात्मा क्षेमी कुशलमब्रवीत् ॥ ४७ ॥

"श्रीमान् धर्मात्मा, तुझे मित्र दशरथपुत्र रामांनी सीता व लक्ष्मण यांसह मी कुशल आहे, अशी आपली कुशल वार्ता तुला सांगितली आहे. (४७)

अनुज्ञातोऽद्य मुनिना भरद्वाजेन राघवः ।
आगमिष्यति तं देवं द्रक्ष्यसि त्वं रघूत्तमम् ॥ ४८ ॥

मुनि भरद्वाजांनी अनुज्ञा दिल्यावर, आजच राघव तुझ्याकडे येतील, त्या वेळी तू रघूत्तम देवांना भेटशील. " (४८)

एवमुक्त्वा महातेजाः सम्प्रहृष्टतनूरुहम् ।
उत्पपात महावेगो वायुवेगेन मारुतिः ॥ ४९ ॥

आनंदाने गुहाच्या अंगावर रोमांच आले होते. त्याला असे सांगून, महातेजस्वी आणि प्रचंड वेग असणारा मारुती वायुवेगाने आकाशात उडाला. (४९)

सोऽपश्यद्रामतीर्थं च सरयूं च महानदीम् ।
तामतिक्रम्य हनुमान्नन्दिग्रामं ययौ मुदा ॥ ५० ॥

पुढे वाटेत त्याने रामतीर्थ व महानदी सरयू पाहिली. ती नदी ओलांडून हनुमान आनंदाने नंदीग्रामात शिरला. (५०)

क्रोशमात्रे त्वयोध्यायाश्चीरकृष्णाजिनाम्बरम् ।
ददर्श भरतं दीनं कृशमाश्रमवासिनम् ॥ ५१ ॥

अयोध्येपासून एक कोस अंतरावर असणाऱ्या नंदीग्रामात वल्कले व कृष्णाजिन वापरणारा, आश्रमात राहाणारा, कृश, दीन असा भरत त्याला दिसला. (५१)

मलपङ्कविदिग्धाङ्गं जटिलं वल्कलाम्बरम् ।
फलमूलकृताहारं रामचिन्तापरायणम् ॥ ५२ ॥

पादुके ते पुरस्कृत्य शासयन्तं वसुन्धराम् ।
मन्त्रिभिः पौरमुख्यैश्च काषायाम्बरधारिभिः ॥ ५३ ॥

वृतदेहं मूर्तिमन्तं साक्षाद्धर्ममिव स्थितम् ।
उवाच प्राञ्जलिर्वाक्यं हनूमान्मारुतात्मजः ॥ ५४ ॥

भरताचे अंग अभ्यंगादी संस्कार न झाल्यामुळे मळकट झाले होते. त्याच्या डोक्यावर जटा होत्या. त्याने वल्कल वस्त्र धारण केले होते. फळे व मुळे यांचा आहार घेऊन, तो रामांचे ध्यान करण्यात मग्न होता. रामांच्या पादुका पुढे ठेवून तो पृथ्वीचे राज्य करीत होता. काषाय वस्त्र परिधान करणारे मंत्री आणि मुख्य नागरिक त्यांच्यासमवेत तो साक्षात् मूर्तिमंत धर्माप्रमाणे दिसत होता. अशा त्या भरतापुढे पवनपुत्र हनुमानाने हात जोडले आणि म्हटले. (५२-५४)

यं त्वं चिन्तयसे रामं तापसं दण्डके स्थितम् ।
अनुशोचसि काकुत्स्थः स त्वां कुशलमब्रवीत् ॥ ५५ ॥

" हे भरता, दंडकारण्यात राहाणाऱ्या ज्या तपस्वी रामांचे तू चिंतन करीत आहेस आणि ज्यांच्याविषयी तू शोक करीत आहेस, त्या काकुत्स्थ रामांनी तुला आपले कुशल कळविण्यास सांगितले आहे. (५५)

प्रियमाख्यामि ते देव शोकं त्यज सुदारुणम् ।
अस्मिन्मुहूर्त्ते भ्रात्रा त्वं रामेण सह सङ्गतः ॥ ५६ ॥

हे देवा, मी आता तुम्हांला प्रिय वार्ता सांगतो. तुम्ही आता आपला दारुण शोक टाकून द्या. याच मुहूर्तावर तुम्ही तुमच्या बंधू रामांना भेटाल. (५६)

समरे रावणं हत्वा रामः सीतामवाप्य च ।
उपयाति समृद्धार्थः ससीतः सहलक्ष्मणः ॥ ५७ ॥

युद्धामध्ये रावणाचा वध करून आणि सीतेला प्राप्त करून घेऊन, मनोरथ सफल झालेले राम हे सीता व लक्ष्मण यांचेसह जवळ येत आहेत. " (५७)

एवमुक्तो महातेजा भरतो हर्षमूर्च्छितः ।
पपात भुवि चास्वस्थः कैकयीप्रियनन्दनः ॥ ५८ ॥

मारुतीने असे सांगितल्यावर, महातेजस्वी भरत तळमळीने व आनंदातिरेकाने मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. (५८)

आलिङ्ग्य भरतः शीघ्रं मारुतिं प्रियवादिनम् ।
आनन्दजैरश्रुजलैः सिषेच भरतः कपिम् ॥ ५९ ॥

शुद्धीवर आल्यावर, गोड बोलणाऱ्या मारुतीला भरताने लगेच आलिंगन दिले आणि आनंदाश्रूंनी त्याला न्हाऊ घातले. (५९)

देवो वा मानुषो वा त्वमनुक्रोशादिहागतः ।
प्रियाख्यानस्य ते सौम्य ददामि ब्रुवतः प्रियम् ॥ ६० ॥

गवां शतसहस्त्रं च ग्रामाणां च शतं वरम् ।
सर्वाभरणसम्पन्ना मुग्धाः कन्यास्तु षोडश ॥ ६१ ॥

(मग भरत हनुमानाला म्हणाला,) "अरे तू देव आहेस की माणूस आहेस ? माझ्यावरील दयेमुळे तू येथे आला आहेस. हे साधो, प्रिय वार्ता सांगणाऱ्या तुला मी एक लक्ष गाई, उत्तम सुंदर अशी शंभर गावे, आणि सर्व अलंकारांनी युक्त अशा सोळा सुंदर कन्या देत आहे." (६०-६१)

एवमुक्त्वा पुनः प्राह भरतो मारुतात्मजम् ।
बहूनीमानि वर्षाणि गतस्य सुमहद्वनम् ॥ ६२ ॥

असे सांगून भरत हनुमानाला पुनः म्हणाला, "माझे स्वामी राम हे घोर अरण्यात गेल्याला अनेक वर्षे

श्रृणोम्यहं प्रीतिकरं मम नाथस्य कीर्तनम् ।
कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति मे ॥ ६३ ॥

एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ।
राघवस्य हरीणां च कथमासीत्समागमः ॥ ६४ ॥

तत्त्वमाख्याहि भद्रं ते विश्वसेयं वचस्तव ।
एवमुक्तोऽथ हनुमान् भरतेन महात्मना ॥ ६५ ॥

आचचक्षेऽथ रामस्य चरितं कृत्स्नशः क्रमात् ।
श्रुत्वा तु परमानन्दं भरतो मारुतात्मजात् ॥ ६६ ॥

आज्ञापयच्छत्रुहणं मुदा युक्तं मुदान्वितः ।
दैवतानि च यावन्ति नगरे रघुनन्दन ॥ ६७ ॥

नानोपहारबलिभिः पूजयन्तु महाधियः ।
सूता वैतालिकाश्चैव बन्दिनः स्तुतिपाठकाः ॥ ६८ ॥

वारमुख्याश्च शतशो निर्यान्त्वद्यैव सङ्घशः ।
राजदारास्तथामात्याः सेना हस्त्यश्वपत्तयः ॥ ६९ ॥

ब्राह्मणाश्च तथा पौरा राजानो ये समागताः ।
निर्यान्तु राघवस्याद्य द्रष्टुं शशिनिभाननम् ॥ ७० ॥

भरतस्य वचः श्रुत्वा शत्रुघ्नपरिचोदिताः ।
अलञ्चक्रुश्च नगरीं मुक्तारत्नमयोज्ज्वलैः ॥ ७१ ॥

तोरणैश्च पताकाभिर्विचित्राभिरनेकधा ।
अलङ्कुर्वन्ति वेश्मानि नानाबलिविचक्षणाः ॥ ७२ ॥

निर्यान्ति वृन्दशः सर्वे रामदर्शनलालसाः ।
हयानां शतसाहस्त्रं गजानामयुतं तथा ॥ ७३ ॥

रथानां दशसाहस्त्रं स्वर्णसूत्रविभूषितम् ।
पारमेष्ठीन्युपादाय द्रव्याण्युच्चावचानि च ॥ ७४ ॥

ततस्तु शिबिकारूढा निर्ययू राजयोषितः ।
भरतः पादुके न्यस्य शिरस्येव कृताञ्जलिः ॥ ७५ ॥

झाली आणि आज मी त्यांची आनंददायक वार्ता ऐकत आहे. आज मला एक कल्याणकारी लौकिक उक्ती अगदी सार्थ आहे असे वाटत आहे : माणूस जर जिवंत राहिला तर शंभर वर्षांनी का होईना, त्याला आनंद प्राप्त होतो. तुझे कल्याण होवो. आता तू मला सांग की राघव आणि वानर यांची भेट कशी काय झाली बरे ? तू मला खरे खरे सांग. मी तुझ्या बोलण्यावर विश्वास ठेवीन.” महात्म्या भरताने असे म्हटल्यावर, हनुमानाने त्याला रामांचे संपूर्ण चरित्र क्रमाने सांगितले. पवनपुत्राकडून ते ऐकल्यावर, भरताला परमानंद झाला. (६२-६६)

तेव्हा आनंदित झालेल्या भरताने आनंदित झालेल्या शत्रुघ्नाला आज्ञा केली, “हे रघुनंदना शत्रुघ्ना, या नगरीत जितकी दैवते आहेत त्या सर्वांची नाना प्रकारच्या पूजासामग्रींनी पूजा करा. सूत, वैतालिक, बंदीजन, स्तुतिपाठक आणि मुख्य मुख्य वारांगना यांचे शेकडो समुदाय आजच नगराच्या बाहेर पडू देत. खेरीज राजस्त्रिया तसेच अमात्य, हत्ती , घोडे आणि पायदळ यांनी युक्त सेना, ब्राह्मण, नागरिक आणि येथे एकत्र आलेले सर्व राजे लोक हे सर्व जण राघवांचा मुखचंद्र पाहाण्यास आजच अयोध्येच्या बाहेर पडू देत.” (६७-७०)

भरताचे वचन ऐकल्यावर, शत्रुघ्नाने आज्ञा दिली. त्या आज्ञेमुळे नाना प्रकारच्या कलांमध्ये कुशल असणाऱ्या नागरिकांनी आपापली घरे सुशोभित केली. तसेच उज्ज्वल मोती व रत्ने यांनी युक्त अशी नाना प्रकारची तोरणे, नाना प्रकारच्या चित्र-विचित्र पताका यांच्या द्वारे त्यांनी अयोध्या नगरी सुशोभित केली. (७१-७२)

त्या वेळी रामांच्या दर्शनाची लालसा असणारे लोक गटागटाने नगराच्या बाहेर पडले. त्यांनी आपल्याबरोबर एक लक्ष घोडे, दहा हजार हत्ती, सोन्याच्या तारांनी सुशोभित केलेले दहा हजार रथ आणि ईश्वराला अर्पण करण्यास योग्य अशा ऐश्वर्यसंपन्न लहान मोठ्या वस्तू घेतल्या होत्या. (७३-७४)

त्यानंतर पालखीत आरूढ होऊन राजस्त्रिया बाहेर पडल्या आणि रामांना भेटण्यास, शत्रुघ्नाला बरोबर घेऊन, भरत हा रामांच्या पादुका मस्तकावर धारण करून

शत्रुघ्नसहितो रामं पादचारेण निर्ययौ ।
तदैव दृश्यते दूराद्विमानं चन्द्रसन्निभम् ॥ ७६ ॥

पुष्पकं सूर्यसङ्काशं मनसा ब्रह्मनिर्मितम् ।
एतस्मिन् भ्रातरौ वीरौ वैदेह्या रामलक्ष्मणौ ॥ ७७ ॥

सुग्रीवश्च कपिश्रेष्ठो मन्त्रिभिश्च बिभीषणः ।
दृश्यते पश्यत जना इत्याह पवनात्मजः ॥ ७८ ॥

आणि हात जोडून पायी पायी निघाला. तितक्यातच ब्रह्मदेवांनी मनाने निर्माण केलेले, सूर्याप्रमाणे तेजस्वी, चंद्राची कांती असणारे पुष्पक विमान सर्वांना दुरूनच दिसून आले. त्या वेळी हनुमान म्हणाला, "लोकहो, बघा. या विमानात वैदेहीसहित राम व लक्ष्मण हे वीर बंधू, कपिश्रेष्ठ सुग्रीव आणि मंत्र्यांसहित बिभीषण बसलेले दिसून येत आहेत." (७५-७८)

ततो हर्षसमुद्भूतो निःस्वनो दिवमस्पृशत् ।
स्त्रीबालयुववृद्धानां रामोऽयमिति कीर्तनात् ॥ ७९ ॥

त्या वेळी स्त्रिया, बालके, तरुण आणि वृद्ध यांच्या तोंडून आनंदामुळे निर्माण झालेला "हे राम आले, हे राम आले" असा हा ध्वनी स्वर्गाला जाऊन भिडला. (७९)

रथकुञ्जरवाजिस्था अवतीर्य महीं गताः ।
ददृशुस्ते विमानस्थं जनाः सोममिवाम्बरे ॥ ८० ॥

रथ, हत्ती, घोडे यांवर बसून आलेले लोक खाली उतरून जमिनीवर उभे राहिले. विमानात बसलेले राम त्या लोकांना आकाशातील चंद्राप्रमाणे दिसले. (८०)

प्राञ्जलिर्भरतो भूत्वा प्रहृष्टो राघवोन्मुखः ।
ततो विमानाग्रगतं भरतो राघवं मुदा ॥ ८१ ॥

ववन्दे प्रणतो रामं मेरुस्थमिव भास्करम् ।
ततो रामाभ्यनुज्ञातं विमानमपतद्भुवि ॥ ८२ ॥

त्यानंतर अतिशय आनंदित झालेल्या भरताने आपले हात जोडून रामांकडे तोंड करून वर पाहिले. तेव्हा विमानाच्या अग्रभागी बसलेले राघव भरताला मेरु पर्वतावरील सूर्याप्रमाणे दिसले. आनंदपूर्वक नम्र होऊन भरताने श्रीरामांना वंदन केले. त्यानंतर रामांच्या अनुज्ञेने ते विमान जमिनीवर खाली उतरले. (८१-८२)

आरोपितो विमानं तद्भरतः सानुजस्तदा ।
राममासाद्य मुदितः पुनरेवाभ्यवादयत् ॥ ८३ ॥

त्यानंतर धाकटा भाऊ शत्रुघ्नासह भरताला रामांनी त्या विमानात घेतले. रामांजवळ गेल्यावर आनंदित झालेल्या भरताने रामांना पुनः वंदन केले. (८३)

समुत्थाप्य चिरादृष्टं भरतं रघुनन्दनः ।
भ्रातरं स्वाङ्कमारोप्य मुदा तं परिषस्वजे ॥ ८४ ॥

बऱ्याच काळानंतर भेटलेल्या भरताला रघुनंदनांनी स्वतःच्याजवळ बसवून त्याला आनंदाने आलिंगन दिले. (८४)

ततो लक्ष्मणमासाद्य वैदेहीं नाम कीर्तयन् ।
अभ्यवादयत प्रीतो भरतः प्रेमविह्वलः ॥ ८५ ॥

त्यानंतर प्रेमाने विव्हल झालेल्या भरताने लक्ष्मणाची भेट घेतली आणि स्वतःचे नाव उच्चारित आनंदित झालेल्या भरताने जानकीला अभिवादन केले. (८५)

सुग्रीवं जाम्बवन्तं च युवराजं तथाङ्गदम् ।
मैन्दद्विविदनीलांश्च ऋषभं चैव सस्वजे ॥ ८६ ॥

नंतर सुग्रीव, जांबवंत, युवराज अंगद, तसेच मैंद, द्विविद, नील आणि ऋषभ यांनाही भरताने आलिंगन दिले. (८६)

सुषेणं च नलं चैव गवाक्षं गन्धमादनम् ।
शरभं पनसं चैव भरतः परिषस्वजे ॥ ८७ ॥

तसेच सुषेण, नल, गवाक्ष, गंधमादन, शरभ आणि पनस यांनाही भरताने आलिंगन दिले. (८७)

सर्वे ते मानुषं रूपं कृत्वा भरतमादृताः ।
पप्रच्छुः कुशलं सौम्याः प्रहृष्टाश्च प्लवङ्गमाः ॥ ८८ ॥

अशा प्रकारे भरताकडून आदर दाखविल्या गेलेल्या त्या सौम्य व आनंदित झालेल्या वानरांनी मनुष्य रूप धारण करून भरताला त्याचे कुशल विचारले. (८८)

ततः सुग्रीवमालिङ्ग्य भरतः प्राह भक्तितः ।
त्वत्सहायेन रामस्य जयोऽभूद्रावणो हतः ॥ ८९ ॥

त्वमस्माकं चतुर्णां तु भ्राता सुग्रीव पञ्चमः ।
शत्रुघ्नश्च तदा राममभिवाद्य सलक्ष्मणम् ॥ ९० ॥

सीतायाश्चरणौ पश्चाद्ववन्दे विनयान्वितः ।
रामो मातरमासाद्य विवर्णां शोकविह्वलाम् ॥ ९१ ॥

जग्राह प्रणतः पादौ मनो मातुः प्रसादयन् ।
कैकेयीं च सुमित्रां च ननामेतरमातरौ ॥ ९२ ॥

भरतः पादुके ते तु राघवस्य सुपूजिते ।
योजयामास रामस्य पादयोर्भक्तिसंयुतः ॥ ९३ ॥

राज्यमेतन्न्यासभूतं मया निर्यातितं तव ।
अद्य मे सफलं जन्म फलितो मे मनोरथः ॥ ९४ ॥

यत्पश्यामि समायातमयोध्यां त्वामहं प्रभो ।
कोष्ठागारं बलं कोशं कृतं दशगुणं मया ॥ ९५ ॥

त्वत्तेजसा जगन्नाथ पालयस्व पुरं स्वकम् ।
इति ब्रुवाणं भरतं दृष्ट्वा सर्वे कपीश्वराः ॥ ९६ ॥

मुमुचुर्नेत्रजं तोयं प्रशशंसुर्मुदान्विताः ।
ततो रामः प्रहृष्टात्मा भरतं स्वाङ्कगं मुदा ॥ ९७ ॥

ययौ तेन विमानेन भरतस्याश्रमं तदा ।
अवरुह्य तदा रामो विमानाग्र्यान्महीतलम् ॥ ९८ ॥

अब्रवीत्पुष्पकं देवो गच्छ वैश्रवणं वह ।
अनुगच्छानुजानामि कुबेरं धनपालकम् ॥ ९९ ॥

रामो वसिष्ठस्य गुरोः पदाम्बुजं
नत्वा यथा देवगुरोः शतक्रतुः ।
दत्त्वा महार्हासनमुत्तमं गुरो-
रुपाविवेशाथ गुरोः समीपतः ॥ १०० ॥

त्यानंतर सुग्रीवाला आलिंगन देऊन, भरताने प्रेमपूर्वक म्हटले, " हे सुग्रीवा, तुझ्या सहाय्यामुळे रामांचा जय झाला आणि रावण मारला गेला. म्हणून हे सुग्रीवा, आम्हा चौघा भावांचा तू पाचवा भाऊ झाला आहेस." मग शत्रुघ्नाने विनयपूर्वक लक्ष्मणासह रामांना वंदन केले आणि त्यानंतर त्याने सीतेच्या चरणांना वंदन केले. शोकाने विव्हल आणि निस्तेज व कृश झालेल्या कौसल्या मातेजवळ जाऊन, रामांनी अतिशय नम्रपणाने तिच्या पायांना वंदन करून तिचे मन प्रसन्न केले. नंतर कैकेयी आणि सुमित्रा या इतर मातांना त्यांनी नमस्कार केला. (८९-९२)

इतका काळ आदरपूर्वक व चांगल्या प्रकारे पूजिलेल्या रामांच्या त्या पादुका भरताने भक्तिपूर्वक रामांच्या पायांत घातल्या. (९३)

(आणि मग भरत रामांना म्हणाला,) " हे रामा, माझ्याजवळ इतके दिवस ठेव म्हणून असलेले हे राज्य आज मी तुम्हांला परत करीत आहे. हे प्रभो, अयोध्येत परत आलेल्या तुम्हाला मी आज पाहात आहे; यामुळे आज माझा जन्म सफल झाला आहे आणि माझे मनोरथ आज पूर्ण झाले आहेत, हे जगन्नाथा, तुमच्या प्रतापामुळे या राज्याची कोठारे, सैन्य, कोश हे माझ्याकडून दहापट केले गेले आहेत. आता तुम्ही स्वतःच या तुमच्या नगरीचे व राज्याचे पालन करा." अशा प्रकारे बोलणाऱ्या भरताला पाहून सर्व वानर श्रेष्ठांनी डोळ्यांतून आनंदाचे अश्रू ढाळले आणि आनंदित मनाने त्यांनी भरताची प्रशंसा केली. त्यानंतर प्रसन्न चित्ताने रामांनी भरताला पुनः आपल्याजवळ घेतले आणि त्याच विमानाने राम आनंदपूर्वक भरताच्या आश्रमाकडे गेले. तेथे त्या उत्तम विमानातून राम जमिनीवर उतरले आणि पुष्पक विमानास म्हणाले की, "जा, मी तुला आज्ञा देतो. आता यानंतर तू धनपालक कुबेराची सेवा कर आणि त्याला वाहून नेत जा." (९४-९९)

त्यानंतर इंद्र ज्या प्रमाणे देवगुरू बृहस्पतीला वंदन करतो, त्या प्रमाणे रामांनी वसिष्ठ गुरूंच्या चरणकमळांना नमन केले आणि त्यांना एक अतिशय उत्तम बहुमूल्य आसन देऊन, नंतर राम स्वतः गुरूंच्याजवळ बसले. (१००)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

# पञ्चदश सर्ग

## श्रीरामांचा राज्याभिषेक

*श्रीमहादेव उवाच*

ततस्तु कैकयीपुत्रो भरतो भक्तिसंयुतः ।
शिरस्यञ्जलिमाधाय ज्येष्ठं भ्रातरमब्रवीत् ॥ १ ॥

माता मे सत्कृता राम दत्तं राज्यं त्वया मम ।
ददामि तत्ते च पुनर्यथा त्वमददा मम ॥ २ ॥

इत्युक्त्वा पादयोर्भक्त्या साष्टाङ्गं प्रणिपत्य च ।
बहुधा प्रार्थयामास कैकेय्या गुरुणा सह ॥ ३ ॥

तथेति प्रतिजग्राह भरताद्राज्यमीश्वरः ।
मायामाश्रित्य सकलां नरचेष्टामुपागतः ॥ ४ ॥

स्वाराज्यानुभवो यस्य सुखज्ञानैकरूपिणः ।
निरस्तातिशयानन्दरूपिणः परमात्मनः ॥ ५ ॥

मानुषेण तु राज्येन किं तस्य जगदीशितुः ।
यस्य भ्रूभङ्गमात्रेण त्रिलोकी नश्यति क्षणात् ॥ ६ ॥

यस्यानुग्रहमात्रेण भवन्त्याखण्डलश्रियः ।
लीलासृष्टमहासृष्टेः कियदेतद्रमापतेः ॥ ७ ॥

तथापि भजतां नित्यं कामपूरविधित्सया ।
लीलामानुषदेहेन सर्वमप्यनुवर्तते ॥ ८ ॥

ततः शत्रुघ्नवचनान्निपुणः श्मश्रुकृन्तकः ।
सम्भाराश्चाभिषेकार्थमानीता राघवस्य हि ॥ ९ ॥

पूर्वं तु भरते स्नाते लक्ष्मणे च महात्मनि ।
सुग्रीवे वानरेन्द्रे च राक्षसेन्द्रे बिभीषणे ॥ १० ॥

विशोधितजटः स्नातश्चित्रमाल्यानुलेपनः ।
महार्हवसनोपेतस्तस्थौ तत्र श्रिया ज्वलन् ॥ ११ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, त्यानंतर भक्तिसंपन्न अशा कैकेयीपुत्र भरताने आपल्या मस्तकावर हात जोडून रामांना म्हटले. (१)

"हे रामा, तुम्ही मला राज्य दिले आणि त्यामुळे माझ्या मातेचे म्हणणे खरे झाले. जे तुम्ही माझ्या स्वाधीन केले होते ते राज्य मी तुम्हांला पुनः परत देत आहे." (२)

असे बोलून, रामांच्या पायांना भक्तीने साष्टांग प्रणिपात करून, त्याने कैकेयी आणि गुरू वसिष्ठ यांच्या सह राज्य स्वीकारण्यासाठी रामांना नाना प्रकारे प्रार्थना केली. (३)

तेव्हा आपल्या मायेचा आश्रय घेऊन सर्व प्रकारच्या मानवी क्रिया करण्यास प्रवृत्त झालेल्या रामांनी "ठीक आहे" असे म्हणून, भरताकडून राज्य परत घेतले. (४)

ज्या परमात्म्या रामांना स्वाराज्याचा (स्वात्मसुखाचा) सतत अनुभव होता, सुख, ज्ञान आणि निरतिशय आनंद हेच ज्यांचे स्वरूप आहे, अशा त्या जगाच्या ईश्वराला मानवी राज्याचा काय उपयोग होता ? ज्यांच्या केवळ भ्रूभंगाने एका क्षणात त्रैलोक्य नष्ट होते, केवळ लीलेने ही प्रचंड सृष्टी उत्पन्न होते, ज्यांच्या केवळ अनुग्रहामुळे इंद्राला राज्य-लक्ष्मीची ऐश्वर्ये प्राप्त होतात, त्या लक्ष्मीपती रामांना हे अयोध्येचे मानवी राज्य किती महत्त्वाचे असणार ? तथापि आपली भक्ती करणाऱ्यांच्या कामना सदैव पूर्ण करण्याच्या इच्छेने राम लीलेने धारण केलेल्या मनुष्य देहाचे द्वारा नेहमी सर्व प्रकारचा अभिनय करीत असतात. (८)

त्यानंतर शत्रुघ्नाच्या आज्ञेवरून कुशल न्हावी आणण्यात आला. तसेच राघवांच्या राज्याभिषेकासाठी आवश्यक ती सामग्री एकत्र केली गेली. (९)

प्रथम भरताने, नंतर महात्म्या लक्ष्मणाने, त्यानंतर वानरराज सुग्रीव आणि राक्षसराज बिभीषण यांनी स्नान केले. (१०)

रामांच्या जटा कापण्यात आल्या. नंतर त्यांनी स्नान केले. रंगीबेरंगी माळा धारण करणारे, उटी लावलेले, आणि अतिशय मौल्यवान वस्त्रे परिधान केलेले राम आपल्या कांतीने देदीप्यमान होऊन विराजमान झाले. (११)

प्रतिकर्म च रामस्य लक्ष्मणश्च महामतिः ।
कारयामास भरतः सीताया राजयोषितः ॥ १२ ॥

महार्हवस्त्राभरणैरलञ्चक्रुः सुमध्यमाम् ।
ततो वानरपत्नीनां सर्वासामेव शोभना ॥ १३ ॥

अकारयत कौसल्या प्रहृष्टा पुत्रवत्सला ।
ततः स्यन्दनमादाय शत्रुघ्नवचनात्सुधीः ॥ १४ ॥

सुमन्त्रः सूर्यसङ्काशं योजयित्वाग्रतः स्थितः ।
आरुरोह रथं रामः सत्यधर्मपरायणः ॥ १५ ॥

त्यानंतर महाबुद्धिमान लक्ष्मण व भरत यांनी रामांना विभूषित केले. तसेच राजस्त्रियांनी सीतेला अतिशय मौल्यवान् वस्त्रे आणि अलंकार यांनी विभूषित केले. पुत्रवत्सल व शोभायमान अशा कौसल्येने आनंदपूर्वक सर्व वानरांच्या पत्नींचाही साज- शृंगार करवून घेतला. त्यानंतर शत्रुघ्नाच्या आज्ञेनुसार बुद्धिमान सुमंत्राने सूर्याप्रमाणे देदीप्यमान असा रथ सज्ज करून समोर आणला. तेव्हा सत्य धर्मपरायण राम त्या रथात चढले. (१२-१५)

सुग्रीवो युवराजश्च हनुमांश्च बिभीषणः ।
स्नात्वा दिव्याम्बरधरा दिव्याभरणभूषिताः ॥ १६ ॥

राममन्वीयुरग्रे च रथाश्वगजवाहनाः ।
सुग्रीवपत्न्यः सीता च ययुर्यानैः पुरं महत् ॥ १७ ॥

त्या वेळी सुग्रीव, अंगद, हनुमान, बिभीषण स्नान करून दिव्य वस्त्रालंकारांनी विभूषित झाले. नंतर रथ, घोडे, हत्ती या वाहनांवर आरोहण करून ते रामांच्या मागे-पुढे चालू लागले,आणि पालख्यांत बसून सीता आणि सुग्रीवाच्या भार्या या त्या महान अयोध्या नगरीकडे निघाल्या. (१६-१७)

वज्रपाणिर्यथा देवैर्हरिताश्वरथे स्थितः ।
प्रययौ रथमास्थाय तथा रामो महत्पुरम् ॥ १८ ॥

हिरवे घोडे जोडलेल्या रथात बसून ज्या प्रमाणे वज्रपाणी इंद्र देवांसह गमन करतो, त्या प्रमाणे राम हे रथात आरोहण करून मग महानगरीकडे निघाले. (१८)

सारथ्यं भरतश्चक्रे रत्नदण्डं महाद्युतिः ।
श्वेतातपत्रं शत्रुघ्नो लक्ष्मणो व्यजनं दधे ॥ १९ ॥

महातेजस्वी भरताने रामांच्या सारथ्याचे काम स्वीकारले होते. रत्नजडित दांडा असणारे श्वेतछत्र शत्रुघ्नाने धरले होते, तर लक्ष्मणाने पंखा घेतला होता. (१९)

चामरं च समीपस्थो न्यवीजयदरिन्दमः ।
शशिप्रकाशं त्वपरं जग्राहासुरनायकः ॥ २० ॥

रामांजवळ उभे राहून शत्रुदमन सुग्रीव हा चंद्राप्रमाणे कांती असणारी एक चवरी ढाळीत होता, तर दुसऱ्या बाजूला उभे असणाऱ्या राक्षसराज बिभीषणाने तशीच चवरी धारण केली होती. (२०)

दिविजैः सिद्धसङ्घैश्च ऋषिभिर्दिव्यदर्शनैः ।
स्तूयमानस्य रामस्य शुश्रुवे मधुरध्वनिः ॥ २१ ॥

त्या वेळी रामांची स्तुती करणाऱ्या, दिव्य दर्शन असणाऱ्या, देव व सिद्धांचे समूह आणि ऋषी यांचा मधुर ध्वनी सर्वत्र ऐकू येत होता. (२१)

मानुषं रूपमास्थाय वानरा गजवाहनाः ।
भेरीशङ्खनिनादैश्च मृदङ्गपणवानकैः ॥ २२ ॥

प्रययौ राघवश्रेष्ठस्तां पुरीं समलङ्कृताम् ।
ददृशुस्ते समायान्तं राघवं पुरवासिनः ॥ २३ ॥

मनुष्यरूप धारण करून वानर हत्तींवर आरूढ झाले होते. अशा प्रकारे भेरी, शंख, मृदंग, पणव, आनक या वाद्यांच्या निनादात राघवश्रेष्ठ राम उत्तमप्रकारे शृंगारलेल्या त्या अयोध्यानगरीत गेले. तेव्हा त्या नगरवासी लोकांनी येणाऱ्या रामांना पाहिले. (२२-२३)

दूर्वादलश्यामतनुं महार्ह-
किरीटरत्नाभरणाञ्चिताङ्गम् ।
आरक्तकञ्जायतलोचनान्तं
दृष्ट्वा ययुर्मोदमतीव पुण्याः ॥ २४ ॥
विचित्ररत्नाञ्चितसूत्रनद्ध-
पीताम्बरं पीनभुजान्तरालम् ।
अनर्घ्यमुक्ताफलदिव्यहारै-
र्विरोचमानं रघुनन्दनं प्रजाः ॥ २५ ॥
सुग्रीवमुख्यैर्हरिभिः प्रशान्तै-
र्निषेव्यमाणं रवितुल्यभासम् ।
कस्तूरिकाचन्दनलिप्तगात्रं
निवीतकल्पद्रुमपुष्पमालम् ॥ २६ ॥

ज्यांचे शरीर दूर्वादलाप्रमाणे श्याम होते, अतिशय मौल्यवान अशा किरीट आणि रत्नजडित अलंकार यांनी ज्यांचे शरीर विभूषित झाले होते, ज्यांच्या डोळ्यांच्या कडा आरक्त कमळाप्रमाणे होत्या, रंगीबेरंगी रत्नांनी जडित असा सोन्याचा कंबरपट्टा ज्यांच्या पीतांबरावर बांधला होता, ज्यांचे वक्ष:स्थळ विशाल व पुष्ट होते, मौल्यवान मोत्यांच्या दिव्य हारांनी जे शोभायमान झाले होते, अत्यंत शांत अशा सुग्रीव प्रमुख असणाऱ्या वानरांकडून ज्यांची सेवा केली जात होती, जे सूर्याप्रमाणे प्रकाशत होते, ज्यांच्या सर्वांगावर कस्तुरी व चंदन यांचा लेप लावलेला होता, ज्यांच्या कंठात कल्पवृक्षाच्या फुलांची माळ घातलेली होती, अशा त्या रघुनंदन रामांना पाहून पुण्यवान प्रजानन अतिशय आनंदित झाले. (२४-२६)

श्रुत्वा स्त्रियो राममुपागतं मुदा
प्रहर्षवेगोत्कलिताननश्रियः ।
अपास्य सर्वं गृहकार्यमाहितं
हर्म्याणि चैवारुरुहुः स्वलङ्कृताः ॥ २७ ॥

श्रीराम जवळ आले आहेत हे ऐकल्यावर, आनंदामुळे स्त्रियांच्या मुखाची कांती उज्ज्वल झाली आणि ज्या स्त्रिया घरकाम करण्यात गुंग होत्या, त्या सर्व कामे बाजूला सारून आणि स्वत: नटून-थटून रामांना पाहण्यासाठी आपल्या घरांच्या गच्च्यांवर चढून बसल्या. (२७)

दृष्ट्वा हरिं सर्वदृगुत्सवाकृतिं
पुष्पैः किरन्त्यः स्मितशोभिताननाः ।
दृग्भिः पुनर्नेत्रमनोरसायनं
स्वानन्दमूर्तिं मनसाभिरेभिरे ॥ २८ ॥

सर्वांच्या डोळ्यांना आनंद देणारी अशी ज्यांची मूर्ती होती अशा त्या रामांना पाहिल्यावर, ज्यांच्या मुखावर स्मित झळकत होते, अशा त्या स्त्रियांनी रामांवर फुलांचा वर्षाव केला आणि डोळे व मन यांना आनंद देणाऱ्या व स्वानंदाची मूर्ती असणाऱ्या रामांना नेत्रांनी हृदयात घेऊन, त्यांनी त्यांना मनाने आलिंगन दिले. (२८)

रामः स्मितस्निग्धदृशा प्रजास्तथा
पश्यन्प्रजानाथ इवापरः प्रभुः ।
शनैर्जगामाथ पितुः स्वलङ्कृतं
गृहं महेन्द्रालयसन्निभं हरिः ॥ २९ ॥

त्यानंतर जणू दुसरा प्रजापती असणारे प्रभू राम स्मितयुक्त मनोहर दृष्टीने प्रजाजनाकडे पाहात, सावकाशपणे व्यवस्थित सजविलेल्या, इंद्रभवनाप्रमाणे असणाऱ्या, आपल्या पित्याच्या राजभवनाकडे गेले. (२९)

प्रविश्य वेश्मान्तरसंस्थितो मुदा
रामो ववन्दे चरणौ स्वमातुः ।
क्रमेण सर्वाः पितृयोषितः प्रभु-
र्ननाम भक्त्या रघुवंशकेतुः ॥ ३० ॥

राजभवनात प्रवेश केलेल्या रामांनी आनंदपूर्वक आपल्या मातेच्या चरणांना वंदन केले; त्यानंतर रघुवंश-केतू प्रभू रामांनी भक्तिपूर्वक आपल्या अन्य मातांना क्रमाने नमस्कार केला. (३०)

ततो भरतमाहेदं रामः सत्यपराक्रमः ।
सर्वसम्पत्समायुक्तं रामः मन्दिरमुत्तमम् ॥ ३१ ॥

मित्राय वानरेन्द्राय सुग्रीवाय प्रदीयताम् ।
सर्वेभ्यः सुखवासार्थं मन्दिराणि प्रकल्पय ॥ ३२ ॥

मग सत्यपराक्रमी राम भरताला म्हणाले, "सर्व प्रकारच्या संपत्तींनी युक्त असा माझा उत्कृष्ट महाल माझा मित्र जो वानरराज सुग्रीव याला दे. तसेच इतर सर्वांनाही सुखाने राहाता यावे म्हणून चांगले महाल देण्याची व्यवस्था कर." (३१-३२)

रामेणैवं समादिष्टो भरतश्च तथाकरोत् ।
उवाच च महातेजाः सुग्रीवं राघवानुजः ॥ ३३ ॥

रामांनी अशी आज्ञा दिल्यावर भरताने तशी व्यवस्था केली. नंतर महातेजस्वी भरताने सुग्रीवाला म्हटले. (३३)

राघवस्याभिषेकार्थं चतुःसिन्धुजलं शुभम् ।
आनेतुं प्रेषयस्वाशु दूतांस्त्वरितविक्रमान् ॥ ३४ ॥

"राघवांच्या अभिषेकासाठी चार समुद्रांतून पवित्र पाणी आणण्यासाठी शीघ्रगामी दूतांना तू त्वरित पाठवून दे." (३४)

प्रेषयामास सुग्रीवो जाम्बवन्तं मरुत्सुतम् ।
अङ्गदं च सुषेणं च ते गत्वा वायुवेगतः ॥ ३५ ॥

जलपूर्णान् शातकुम्भकलशांश्च समानयन् ।
आनीतं तीर्थसलिलं शत्रुघ्नो मन्त्रिभिः सह ॥ ३६ ॥

राघवस्याभिषेकार्थं वसिष्ठाय न्यवेदयत् ।
ततस्तु प्रयतो वृद्धो वसिष्ठो ब्राह्मणैः सह ॥ ३७ ॥

रामं रत्नमये पीठे ससीतं संन्यवेशयत् ।
वसिष्ठो वामदेवश्च जाबालिर्गौतमस्तथा ॥ ३८ ॥

वाल्मीकिश्च तथा चक्रुः सर्वे रामाभिषेचनम् ।
कुशाग्रतुलसीयुक्तपुण्यगन्धजलैर्मुदा ॥ ३९ ॥

तेव्हा सुग्रीवाने जांबवंत, हनुमान, अंगद आणि सुषेण यांना पाठवून दिले. ते वायुवेगाने गेले आणि सुवर्णकलश पाण्याने भरून घेऊन आले. त्यांनी आणलेले तीर्थ-जल मंत्र्यांसह शत्रुघ्नाने राघवांच्या राज्याभिषेकासाठी वसिष्ठाजवळ नेले. त्यानंतर ब्राह्मणांना बरोबर घेऊन, वयोवृद्ध इंद्रियजयी अशा वसिष्ठांनी सीतेसह रामांना रत्नमय सिंहासनावर बसविले. नंतर वसिष्ठ, वामदेव, जाबाली, गौतम तसेच वाल्मीकी या सर्वांनी आनंदपूर्वक दर्भ आणि तुळशीपत्रे यांनी युक्त अशा पावन व सुगंधी जलांनी रामांवर अभिषेक केला. (३५-३९)

अभ्यषिञ्चन् रघुश्रेष्ठं वासवं वसवो यथा ।
ऋत्विग्भिर्ब्राह्मणैःश्रेष्ठैः कन्याभिः सह मन्त्रिभिः ॥ ४० ॥

सर्वौषधिरसैश्चैव दैवतैर्नभसि स्थितैः ।
चतुर्भिर्लोकपालैश्च स्तुवद्भिः सगणैस्तथा ॥ ४१ ॥

वसू नावाच्या देवांनी ज्या प्रमाणे इंद्रावर अभिषेक केला होता, त्या प्रमाणे ऋत्विज, श्रेष्ठ ब्राह्मण, कन्या आणि मंत्री यांच्यासह त्या वसिष्ठ इत्यादी महर्षींनी आकाशात असणारे देव आणि चार लोकपाल आपापल्या गणांसह रामांची स्तुती करीत असताना, सर्व औषधींच्या रसांनी रघुश्रेष्ठ रामांवर अभिषेक केला. (४०-४१)

छत्रं च तस्य जग्राह शत्रुघ्नः पाण्डुरं शुभम् ।
सुग्रीवराक्षसेन्द्रौ तौ दधतुः श्वेतचामरे ॥ ४२ ॥

त्या वेळी शत्रुघ्नाने श्रीरामांच्या मस्तकावर पवित्र व सुंदर असे श्वेत छत्र धरले होते. तर सुग्रीव व राक्षसराज बिभीषण या दोघांनी पांढऱ्या चवऱ्या धरल्या होत्या. (४२)

मालां च काञ्चनीं वायुर्ददौ वासवचोदितः ।
सर्वरत्नसमायुक्तं मणिकाञ्चनभूषितम् ॥ ४३ ॥

ददौ हारं नरेन्द्राय स्वयं शक्रस्तु भक्तितः ।
प्रजगुर्देवगन्धर्वा ननृतुश्चाप्सरोगणाः ॥ ४४ ॥

इंद्राच्या प्रेरणेमुळे वायूने रामांना सोन्याची माला दिली. स्वतः इंद्रानेसुद्धा भक्तिपूर्वक महाराज रामांना सर्व प्रकारच्या रत्नांनी युक्त आणि मणी व सुवर्ण यांनी सुशोभित असा हार दिला. देव आणि गंधर्व गायन करू लागले. अप्सरांचे समूह नृत्य करू लगाले. (४३-४४)

देवदुन्दुभयो नेदुः पुष्पवृष्टिः पपात खात् ।
नवदूर्वादलश्यामं पद्मपत्रायतेक्षणम् ॥ ४५ ॥

देवांच्या दुंदुभी वाजू लागल्या. आकाशातून रामांवर पुष्पवृष्टी झाली. नवीन दूर्वादलाप्रमाणे

रविकोटिप्रभायुक्तकिरीटेन विराजितम् ।
कोटिकन्दर्पलावण्यं पीताम्बरसमावृतम् ॥ ४६ ॥

दिव्याभरणसम्पन्नं दिव्यचन्दनलेपनम् ।
अयुतादित्यसङ्काशं द्विभुजं रघुनन्दनम् ॥ ४७ ॥

वामभागे समासीनां सीतां काञ्चनसन्निभाम् ।
सर्वाभरणसम्पन्नां वामाङ्के समुपस्थिताम् ॥ ४८ ॥

रक्तोत्पलकराम्भोजां वामेनालिङ्ग्य संस्थितम् ।
सर्वातिशयशोभाढ्यं दृष्ट्वा भक्तिसमन्वित: ॥ ४९ ॥

उमया सहितो देव: शङ्करो रघुनन्दनम् ।
सर्वदेवगणैर्युक्त: स्तोतुं समुपचक्रमे ॥ ५० ॥

श्यामवर्ण; कमल-पत्राप्रमाणे दीर्घ नयन असणारे, कोट्यवधी सूर्याप्रमाणे प्रकाशमान असणाऱ्या किरीटाने सुशोभित, कोट्यवधी मदनाप्रमाणे लावण्य- सौंदर्य- असणारे, पीतांबर परिधान केलेले, दिव्य अलंकारांनी सजलेले, दिव्य चंदनाची उटी लावलेले, हजारो सूर्याप्रमाणे तेजस्वी, सुंदर बाहू असणारे असे ते रघुनंदन राम होते. त्यांच्या डाव्या बाजूला सुवर्णवर्ण सीता बसलेली होती. सर्व अलंकारांनी युक्त असणाऱ्या तसेच आपल्या करकमलात रक्तकमल धारण करणाऱ्या आणि डाव्या मांडीवर बसलेल्या सीतेला रामांनी डाव्या हाताने धरलेले होते. अशा उत्कृष्ट शोभेने संपन्नअसणाऱ्या रघुनंदनांना पाहिल्यावर, देवांनी शंकर व पार्वतीसह भक्तिपूर्वक रामांची स्तुती करण्यास प्रारंभ केला. (४५-५०)

*श्रीमहादेव उवाच*

नमोऽस्तु रामाय सशक्तिकाय
नीलोत्पलश्यामलकोमलाय ।
किरीटहाराङ्गदभूषणाय
सिंहासनस्थाय महाप्रभाय ॥ ५१ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– "नील कमलाप्रमाणे श्यामल व कोमल शरीर असणाऱ्या, किरीट, हार व बाहु-भूषणे हे अलंकार धारण करणाऱ्या आणि आपल्या सीता या शक्तीसह सिंहासनावर बसलेल्या महातेजस्वी रामांना नमस्कार असो. (५१)

त्वमादिमध्यान्तविहीन एक:
सृजस्यवस्यत्सि च लोकजातम् ।
स्वमायया तेन न लिप्यसे त्वं
यत्स्वे सुखेऽजस्त्ररतोऽनवद्य: ॥ ५२ ॥

हे रामा, तुम्ही आदी, मध्य आणि अंत यांनी रहित आहात. तुम्ही अद्वितीय आहात. स्वत:च्या मायेच्या योगाने तुम्ही सर्व लोकांची उत्पत्ती, रक्षण आणि नाश करता; तथापि त्या कर्मांनी तुम्ही लिप्त होत नाही. कारण तुम्ही निर्दोष असून नेहमी स्वत:च्या आनंदात मग्न असता. (५२)

लीलां विधत्से गुणसंवृतस्त्वं
प्रपन्नभक्तानुविधानहेतो: ।
नानावतारै: सुरमानुषाद्यै:
प्रतीयसे ज्ञानिभिरेव नित्यम् ॥ ५३ ॥

शरण आलेल्या भक्तांना मार्ग दाखविण्याच्या हेतूने तुम्ही आपल्या मायेच्या गुणांनी आवृत होऊन, देव, मानव इत्यादी नाना अवतार धारण करून अनेक लीला करता. तरी त्या त्या वेळी तुमचे स्वरूप हे नेहमी ज्ञानी लोकांच्या प्रत्ययाला येत असते. (५३)

स्वांशेन लोकं सकलं विधाय तं
बिभर्षि च त्वं तदध: फणीश्वर: ।
उपर्यथो भान्वनिलोडुपौषधि-
प्रवर्षरूपोऽवसि नैकधा जगत् ॥ ५४ ॥

स्वत:च्या अंशाने हे सर्व जग निर्माण करून, तुम्हीच शेष नाग होऊन हे जग खालच्या बाजूने धारण करता. तसेच सूर्य, वायू, चंद्र, औषधी आणि पर्जन्य यांची रूपे धारण करून, त्याचे पालन करता. तुम्ही वरून आणि खालून या जगाचे नाना प्रकारांनी रक्षण करता. (५४)

त्वमिह देहभृतां शिखिरूपः
पचसि भुक्तमशेषमजस्त्रम् ।
पवनपञ्चकरूपसहायो
जगदखण्डमनेन बिभर्षि ॥ ५५ ॥

या जगात देहधारी प्राण्यांमध्ये जठरातील अग्निरूप होऊन, प्राण, अपान इत्यादी पाच प्राणांच्या सहाय्याने तुम्ही प्राण्यांनी खाल्लेले संपूर्ण अन्न सतत पचवीत असता. अशा प्रकारे तुम्ही सर्वदा संपूर्ण जगाचे धारण करता. (५५)

चन्द्रसूर्यशिखिमध्यगतं यत्
तेज ईश चिदशेषतनूनाम् ।
प्राभवत्तनुभृतामिव धैर्यं
शौर्यमायुरखिलं तव सत्त्वम् ॥ ५६ ॥

हे ईश्वरा, चंद्र, सूर्य आणि अग्नी यांच्या ठिकाणी जे तेज आहे, प्राण्यांच्या सर्व शरीरात जे चैतन्य आहे, त्याचप्रमाणे देहधारी प्राण्यांच्या ठिकाणी जे धैर्य, शौर्य, आयुष्य आहे, ते सर्व म्हणजे तुमच्या अस्तित्वाचा प्रभाव आहे. (५६)

त्वं विरिञ्चिशिवविष्णुविभेदात्
कालकर्मशशिसूर्यविभागात् ।
वादिनां पृथगिवेश विभासि
ब्रह्म निश्चितमनन्यदिहैकम् ॥ ५७ ॥

हे ईश्वरा, तुम्ही ब्रह्मदेव, शिव आणि विष्णू या भेदांनी तसेच काल, कर्म, चंद्र व सूर्य या विभागांमुळे जणू वेगळे आहात असे तुमच्या स्वरूपाविषयी वादविवाद करणाऱ्या लोकांना भासते. तरी एकमेव अद्वितीय ब्रह्म हे तुमच्यापेक्षा वेगळे नाही ही गोष्ट निश्चित. (५७)

मत्स्यादिरूपेण यथा त्वमेकः
श्रुतौ पुराणेषु च लोकसिद्धः ।
तथैव सर्वं सदसद्विभाग-
स्त्वमेव नान्यद्भवतो विभाति ॥ ५८ ॥

तुम्ही एकट्यानेच मत्स्य इत्यादी अवतारांच्या रूपांत अवतार घेतला होता, ही गोष्ट ज्या प्रमाणे श्रुती, पुराणे आणि जग यांमध्ये प्रसिद्ध आहे, त्या प्रमाणेच सर्व सत् आणि असत् हा विभाग तुम्हीच आहात. तुमच्यापेक्षा वेगळे असे काहीही व कुठेही दिसून येत नाही. (५८)

यद्यत्समुत्पन्नमनन्तसृष्टा-
वुत्पत्स्यते यच्च भवच्च यच्च ।
न दृश्यते स्थावरजङ्गमादौ
त्वया विनातः परतः परस्त्वम् ॥ ५९ ॥

या स्थावर जंगमात्मक अनंत सृष्टीमध्ये जे जे काही (भूतकाळात) उत्पन्न झाले आहे, जे जे काही (भविष्यकाळी) उत्पन्न होणार आहे, तसेच जे जे आत्ता उत्पन्न होत आहे, ते ते सर्व तुमच्याखेरीज अन्य काही आहे, असे दिसून येत नाही. म्हणून तुम्ही परापेक्षा म्हणजे प्रकृती इत्यादीपेक्षा पर म्हणजे श्रेष्ठ आहात. (५९)

तत्त्वं न जानन्ति परात्मनस्ते
जनाः समस्तास्तव माययातः ।
त्वद्भक्तसेवामलमानसानां
विभाति तत्त्वं परमेकमैशम् ॥ ६० ॥

तुमच्या मायेमुळे मोहित झालेले समस्त जन हे तुमचे- परमात्म्याचे- खरे स्वरूप जाणत नाहीत. म्हणून तुमच्या भक्तांची सेवा केल्यामुळे ज्यांचे मन शुद्ध झाले आहे, अशा लोकांनाच तुमचे एकमेव, अद्वितीय, श्रेष्ठ, खरे ईश्वरी स्वरूप समजून येते. (६०)

ब्रह्मादयस्ते न विदुः स्वरूपं
चिदात्मतत्त्वं बहिरर्थभावाः ।
ततो बुधस्त्वामिदमेव रूपं
भक्त्या भजन्मुक्तिमुपैत्यदुःखः ॥ ६१ ॥

बाह्य विषयांवर ज्यांचे प्रेम आहे अशा ब्रह्मदेव इत्यादी देवांना हे तुमचे चिदात्म- स्वरूपाचे ज्ञान नाही, (मग इतर लोकांबद्दल काय सांगावे?) म्हणून बुद्धिमान लोक तुमच्या याच सगुण श्यामसुंदर स्वरूपाचे भक्तिपूर्वक भजन करून, दुःखरहित होऊन, अनायास मुक्ती प्राप्त करून घेतात. (६१)

अहं भवन्नाम गृणन्कृतार्थो
वसामि काश्यामनिशं भवान्या ।
मुमूर्षमाणस्य विमुक्तयेऽहं
दिशामि मन्त्रं तव राम नाम ॥ ६२ ॥

तुमच्या नावाचा उच्चार केल्यामुळे मी कृतार्थ होऊन पार्वतीसहित काशीमध्ये रात्रंदिवस राहात असतो आणि हे रामा, मरणोन्मुख माणसांना मुक्ती मिळावी म्हणून मी त्यांना तुमच्या 'राम' या तारक मंत्राचा उपदेश करीत असतो. (६२)

इमं स्तवं नित्यमनन्यभक्त्या
शृण्वन्ति गायन्ति लिखन्ति ये वै ।
ते सर्वसौख्यं परमं च लब्ध्वा
भवत्पदं यान्तु भवत्प्रसादात् ॥ ६३ ॥

(आता तुम्हाला माझी प्रार्थना आहे की) ही मी केलेली तुमची स्तुती जे लोक अनन्य भक्तीने नित्य ऐकतील, गातील अथवा लिहितील, ते तुमच्या कृपाप्रसादामुळे संपूर्ण परमानंद प्राप्त करून घेऊन, अंती तुमच्या पदाप्रत जावोत." (६३)

*इन्द्र उवाच*

रक्षोऽधिपेनाखिलदेवसौख्यं
हृतं च मे ब्रह्मवरेण देव ।
पुनश्च सर्वं भवतः प्रसादात्
प्राप्तं हतो राक्षसदुष्टशत्रुः ॥ ६४ ॥

**इंद्र म्हणाला–** "हे देवा, ब्रह्मदेवांकडून वर मिळाल्यामुळे राक्षसराज रावणाने माझे संपूर्ण देवोचित सौख्य हरण करून घेतले होते. आता तो दुष्ट शत्रू रावण ठार झाला आहे. तुमच्या कृपाप्रसादामुळे ते सर्व सुख मला पुन: प्राप्त झाले आहे." (६४)

*देवा ऊचुः*

हृता यज्ञभागा धरादेवदत्ता
मुरारे खलेनादिदैत्येन विष्णो ।
हतोऽद्य त्वया नो वितानेषु भागाः
पुरावद्भविष्यन्ति युष्मत्प्रसादात् ॥ ६५ ॥

**देव म्हणाले–** "हे मुरारे, विष्णो, पृथ्वीवरील ब्राह्मणांनी आम्हाला दिलेले यज्ञातील भाग तो दुष्ट दैत्य रावण हरण करून नेत असे. तो आता तुमच्याकडून मारला गेला आहे. तेव्हा तुमच्या कृपाप्रसादामुळे आता ते यज्ञांतील भाग आम्हांला पूर्वीप्रमाणे मिळू लागतील." (६५)

*पितर ऊचुः*

हतोऽद्य त्वया दुष्टदैत्यो महात्मन्
गयादौ नरैर्दत्तपिण्डादिकान्नः ।
बलादत्ति हत्वा गृहीत्वा समस्ता-
निदानीं पुनर्लब्धसत्त्वा भवामः ॥ ६६ ॥

**पितर म्हणाले–** "हे महात्मन्, गया इत्यादी ठिकाणी माणसांनी आमच्यासाठी दिलेले पिंड इत्यादी अन्न बळजबरीने घेऊन आणि आम्हा सर्वांना मारून, तो दुष्ट दैत्य रावण खात असे. आता तो तुमच्याकडून मारला गेला आहे. आता आमचा भाग आम्हांला मिळाल्यावर आम्ही पुन: आमचे सामर्थ्य प्राप्त करून घेऊ." (६६)

*यक्षा ऊचुः*

सदा विष्टिकर्मण्यनेनाभियुक्ता
वहामो दशास्यं बलाद्दुःखयुक्ताः ।
दुरात्मा हतो रावणो राघवेश
त्वया ते वयं दुःखजाताद्विमुक्ताः ॥ ६७ ॥

**यक्ष म्हणाले–** "आम्ही नेहमी या रावणाकडून बळजबरीने वेठीला धरले जात होतो. तसेच आम्हांला त्याच्या पालखी इत्यादीस जुंपल्यामुळे आम्ही मोठ्या दु:खाने त्याला वाहून नेत होतो. हे राघवेशा, आता तो दुरात्मा रावण तुमच्याकडून मारला गेला आहे. म्हणून आम्ही सर्व दु:खांतून मुक्त झालो आहोत." (६७)

*गन्धर्वा ऊचुः*

वयं सङ्गीतनिपुणा गायन्तस्ते कथामृतम् ।
आनन्दामृतसन्दोहयुक्ताः पूर्णाः स्थिताः पुरा ॥ ६८ ॥

**गंधर्व म्हणाले–** "संगीतात निपुण असे आम्ही पूर्वी तुमच्या कथामृताचे गायन करीत आनंदरूपी अमृताच्या डोहात बुडवून मग्न होऊन राहात होतो. (६८)

पश्चाद्दुरात्मना राम रावणेनाभिविद्रुता: ।
तमेव गायमानाश्च तदाराधनतत्परा: ॥ ६९ ॥

स्थितास्त्वया परित्राता हतोऽयं दुष्टराक्षस: ।
एवं महोरगा: सिद्धा: किन्नरा मरुतस्तथा ॥ ७० ॥

वसवो मुनयो गावो गुह्यकाश्च पतत्त्रिण: ।
सप्रजापतयश्चैते तथा चाप्सरसां गणा: ॥ ७१ ॥

सर्वे रामं समासाद्य दृष्ट्वा नेत्रमहोत्सवम् ।
स्तुत्वा पृथक् पृथक् सर्वे राघवेणाभिवन्दिता: ॥ ७२ ॥

ययु: स्वं स्वं पदं सर्वे ब्रह्मरुद्रादयस्तथा ।
प्रशंसन्तो मुदा रामं गायन्तस्तस्य चेष्टितम् ॥ ७३ ॥

ध्यायन्तस्त्वभिषेकार्द्रं सीतालक्ष्मणसंयुतम् ।
सिंहासनस्थं राजेन्द्रं ययु: सर्वे हृदि स्थितम् ॥ ७४ ॥

त्यानंतर हे रामा, त्या दुरात्म्या रावणाने आम्हांला जिंकून घेतले म्हणून आम्ही त्याचेच गुणगान करीत, त्याच्याच आराधनेत तत्पर होऊन राहिलो. आता तो दुष्ट राक्षस तुमच्याकडून मारला गेल्यामुळे तुम्हीच आमचे रक्षण केले आहे." अशाच प्रकारे प्रजापतिसह मोठे नाग, सिद्ध, किन्नर, मरुत, वसू, मुनी, गाई, गुह्यक, पक्षी आणि अप्सरांचे समूह हे सर्वजण रामांजवळ आले आणि डोळ्यांना आनंद देणाऱ्या रामांना पाहून ते त्यांची निरनिराळ्या प्रकारे स्तुती करू लागले. त्यानंतर राघवांकडून वंदन केले गेलेले ते सर्वजण आपापल्या स्थानी निघून गेले. मग ब्रह्मदेव आणि महादेव इत्यादींनी आनंदाने रामांची प्रशंसा करीत, त्यांच्या लीलांचे गायन करीत-करीत आणि सिंहासनावर बसलेल्या, अभिषेकाने आर्द्र अशा राजराजेश्वर श्रीरामचंद्रांचे आणि सीता व लक्ष्मण यांच्यासह हृदयात विराजमान असणाऱ्या राजश्रेष्ठ रामांचे ध्यान करीत ते सर्वजण निघून गेले. (६९-७४)

खे वाद्येषु ध्वनत्सु प्रमुदितहृदयै-
र्देववृन्दै: स्तुवद्भि-
र्वर्षद्भि: पुष्पवृष्टिं दिवि मुनिनिकरै-
रीड्यमान: समन्तात् ।
राम: श्याम: प्रसन्नस्मितरुचिरमुख:
सूर्यकोटिप्रकाश:
सीतासौमित्रिवातात्मजमुनिहरिभि:
सेव्यमानो विभाति ॥ ७५ ॥

त्या वेळी आकाशात वाद्ये वाजविली जात होती. आनंदित मनाने स्तुती करणारे स्वर्गातील देवांचे समूह पुष्पवृष्टी करीत होते. सर्व बाजूंनी मुनींचे समुदाय रामाची स्तुती करीत होते. कोटिसूर्याप्रमाणे प्रकाशमान असणारा आणि प्रसन्न स्मिताने मनोहर मुख असणारा श्यामवर्णी, आणि सीता, लक्ष्मण, हनुमान्, मुनी आणि वानर यांच्याकडून सेविले जाणारे श्रीराम हे अतिशय शोभून दिसत होते. (७५)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे पंचदश: सर्ग: ॥ १५ ॥

# षोडश सर्ग

## वानरांना निरोप आणि ग्रंथाची प्रशंसा

*श्रीमहादेव उवाच*

रामेऽभिषिक्ते राजेन्द्रे सर्वलोकसुखावहे ।
वसुधा सस्यसम्पन्ना फलवन्तो महीरुहा: ॥ १ ॥

गन्धहीनानि पुष्पाणि गन्धवन्ति चकाशिरे ।
सहस्रशतमश्वानां धेनूनां च गवां तथा ॥ २ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, सर्व लोकांना सुख देणाऱ्या राजश्रेष्ठ श्रीरामांचा राज्याभिषेक झाल्यावर, पृथ्वी ही धान्याने संपन्न झाली आणि वृक्ष फलयुक्त झाले. (१)

जी फुले गंधरहित होती, ती सुगंधी होऊन शोभून दिसू लागली. राज्याभिषेकानंतर सर्व प्रथम रघुनंदनांनी एक लक्ष घोडे, एक लक्ष धेनू आणि शेकडो बैल ब्राह्मणांना दान

ददौ शतवृषान्पूर्वं द्विजेभ्यो रघुनन्दनः ।
त्रिंशत्कोटी सुवर्णस्य ब्राह्मणेभ्यो ददौ पुनः ॥ ३ ॥

वस्त्राभरणरत्नानि ब्राह्मणेभ्यो मुदा तथा ।
सूर्यकान्तिसमप्रख्यां सर्वरत्नमयीं स्रजम् ॥ ४ ॥

सुग्रीवाय ददौ प्रीत्या राघवो भक्तवत्सलः ।
अङ्गदाय ददौ दिव्ये ह्यङ्गदे रघुनन्दनः ॥ ५ ॥

चन्द्रकोटिप्रतीकाशं मणिरत्नविभूषितम् ।
सीतायै प्रददौ हारं प्रीत्या रघुकुलोत्तमः ॥ ६ ॥

अवमुच्यात्मनः कण्ठाद्धारं जनकनन्दिनी ।
अवैक्षत हरीन्सर्वान् भर्तारं च मुहुर्मुहुः ॥ ७ ॥

रामस्तामाह वैदेहीमिङ्गितज्ञो विलोकयन् ।
वैदेहि यस्य तुष्टासि देहि तस्मै वरानने ॥ ८ ॥

हनूमते ददौ हारं पश्यतो राघवस्य च ।
तेन हारेण शुशुभे मारुतिर्गौरवेण च ॥ ९ ॥

रामोऽपि मारुतिं दृष्ट्वा कृताञ्जलिमुपस्थितम् ।
भक्त्या परमया तुष्ट इदं वचनमब्रवीत् ॥ १० ॥

हनूमंस्ते प्रसन्नोऽस्मि वरं वरय काङ्क्षितम् ।
दास्यामि देवैरपि यद्दुर्लभं भुवनत्रये ॥ ११ ॥

हनूमानपि तं प्राह नत्वा रामं प्रहृष्टधीः ।
त्वन्नाम स्मरतो राम न तृप्यति मनो मम ॥ १२ ॥

अतस्त्वन्नाम सततं स्मरन् स्थास्यामि भूतले ।
यावत्स्थास्यति ते नाम लोके तावत्कलेवरम् ॥ १३ ॥

मम तिष्ठतु राजेन्द्र वरोऽयं मेऽभिकाङ्क्षितः ।
रामस्तथेति तं प्राह मुक्तस्तिष्ठ यथासुखम् ॥ १४ ॥

कल्पान्ते मम सायुज्यं प्राप्स्यसे नात्र संशयः ।
तमाह जानकी प्रीता यत्र कुत्रापि मारुते ॥ १५ ॥

म्हणून दिले. तसेच पुनः त्यांनी त्यांना तीस कोटी सुवर्ण मुद्रा दिल्या. (२-३)

तसेच रामांनी ब्राह्मणांना आनंदपूर्वक वस्त्रे, अलंकार आणि रत्ने दिली. त्यानंतर सूर्याच्या कांतीप्रमाणे तेजस्वी, सर्व रत्नांनी गुंफलेली एक माळ भक्तवत्सल राघवांनी प्रेमपूर्वक सुग्रीवाला दिली. तसेच रघुनंदनांनी दोन दिव्य बाहूभूषणे अंगदाला दिली. (४-५)

नंतर कोटिचंद्राप्रमाणे तेज असणारा आणि मणी व रत्ने यांनी विभूषित असा एक हार रघुकुलश्रेष्ठांनी प्रीतिपूर्वक सीतेला दिला. (६)

स्वतःच्या गळ्यातील तो हार उतरवून जनकनंदिनी सीता आपले पती आणि सर्व वानर यांच्याकडे वारंवार पाहू लागली. (७)

तिच्या मनातील भाव ओळखून जानकीकडे पाहात श्रीराम तिला म्हणाले, "हे सुंदरमुखी वैदेही, तू ज्याच्यावर संतुष्ट असशील, त्याला तू हा हार दे." (८)

त्या वेळी राघवांच्या देखतच, सीतेने तो हार हनुमंताला दिला. त्या हारामुळे आणि झालेल्या गौरवाने मारुती शोभून दिसू लागला. (९)

हात जोडून जवळच उभ्या असणाऱ्या मारुतीकडे पाहून, त्याच्या सर्वश्रेष्ठ भक्तीने संतुष्ट झालेले श्रीरामसुद्धा त्याला म्हणाले. (१०)

"हे हनुमाना, मी तुझ्यावर प्रसन्न आहे. तू इच्छित वर मागून घे. त्रैलोक्यात देवांनासुद्धा जे दुर्लभ असेल ते मी तुला देईन." (११)

अतिशय आनंदित झालेल्या हनुमानानेसुद्धा रामांना नमस्कार करून म्हटले, "हे रामा, तुमच्या नामाचे स्मरण करताना माझे मन तृप्तच होत नाही. (१२)

म्हणून तुमच्या नावाचे सतत स्मरण करीत मी या भूतलावर राहावे, अशी माझी इच्छा आहे. जोपर्यंत या जगात तुमचे नाव टिकून राहील, तोपर्यंत माझे शरीर टिकून राहो. हे राजेंद्रा, हा माझा इच्छित वर आहे." "ठीक आहे." असे म्हणून रामांनी त्याला सांगितले. "जीवन्मुक्त स्थितीत तू या जगात तुझ्या इच्छेप्रमाणे सुखाने राहा. (१३-१४)

नंतर कल्पाच्या शेवटी तुला माझे सायुज्य प्राप्त होईल, यात संशय नाही." त्यानंतर जानकी प्रीतिपूर्वक त्याला म्हणाली, "हे मारुती, तू जेथे कोठेही असशील तेथे सर्व भोग हे माझ्या आज्ञेने तुला प्राप्त होतील." त्या दोन्हीही

स्थितं त्वामनुयास्यन्ति भोगाः सर्वे ममाज्ञया ।
इत्युक्तो मारुतिस्ताभ्यामीश्वराभ्यां प्रहृष्टधीः ॥ १६ ॥

ईश्वरांनी असे सांगितल्यावर, मारुतीचे मन अतिशय आनंदित झाले. (१५-१६)

आनन्दाश्रुपरीताक्षो भूयो भूयः प्रणम्य तौ ।
कृच्छ्राद्ययौ तपस्तमुं हिमवन्तं महामतिः ॥ १७ ॥

त्याच्या डोळ्यांत आनंदाश्रू भरून आले होते. मारुतीने त्या दोघांना वारंवार प्रणाम केला आणि मग मोठ्या कष्टाने तो महाबुद्धिमान तपश्चर्या करण्यासाठी हिमालय पर्वताकडे निघून गेला. (१७)

ततो गुहं समासाद्य रामः प्राञ्जलिमब्रवीत् ।
सखे गच्छ पुरं रम्यं शृङ्गवेरमनुत्तमम् ॥ १८ ॥

त्यानंतर हात जोडून उभे असणाऱ्या गुहाजवळ जाऊन राम त्याला म्हणाले, "अरे मित्रा, तू अतिशय उत्तम आणि रम्य अशा तुझ्या शृंगवेर नगराकडे परत जा. (१८)

मामेव चिन्तयन्नित्यं भुङ्क्ष्व भोगान्निजार्जितान् ।
अन्ते ममैव सारूप्यं प्राप्स्यसे त्वं न संशयः ॥ १९ ॥

आणि तेथे माझे चिंतन करीत, तू स्वतःच संपादन केलेले भोग भोगत राहा. शेवटी तुला माझेच सारूप्य प्राप्त होणार, यात संशय नाही." (१९)

इत्युक्त्वा प्रददौ तस्मै दिव्यान्याभरणानि च ।
राज्यं च विपुलं दत्त्वा विज्ञानं च ददौ विभुः ॥ २० ॥

असे सांगून रामांनी त्याला दिव्य अलंकार दिले. त्याला विशाल राज्य देऊन, सामर्थ्यसंपन्न अशा रामांनी आत्मज्ञानाचा उपदेशही केला. (२०)

रामेणालिङ्गितो हृष्टो ययौ स्वभवनं गुहः ।
ये चान्ये वानराः श्रेष्ठा अयोध्यां समुपागताः ॥ २१ ॥

अमूल्याभरणैर्वस्त्रैः पूजयामास राघवः ।
सुग्रीवप्रमुखाः सर्वे वानराः सबिभीषणाः ॥ २२ ॥

यथार्हं पूजितास्तेन रामेण परमात्मना ।
प्रहृष्टमनसः सर्वे जग्मुरेव यथागतम् ॥ २३ ॥

त्यानंतर रामांनी त्याला आलिंगन दिले. गुह आनंदित झाला आणि तो घरी परत गेला. त्यानंतर जे इतर श्रेष्ठ वानर अयोध्येत आले होते, त्यांना अमूल्य अलंकार आणि वस्त्रे देऊन राघवांनी त्यांचा सत्कार केला. बिभीषणासकट, सुग्रीवादी वानरांचा त्यांच्या योग्यतेनुसार परमात्म्या रामांनी सत्कार केला, तेव्हा आनंदित मनाने ते सर्वजण आपापल्या स्थानी परत गेले. (२१-२३)

सुग्रीवप्रमुखाः सर्वे किष्किन्धां प्रययुर्मुदा ।
बिभीषणस्तु सम्प्राप्य राज्यं निहतकण्टकम् ॥ २४ ॥

रामेण पूजितः प्रीत्या ययौ लङ्कामनिन्दितः ।
राघवो राज्यमखिलं शशासाखिलवत्सलः ॥ २५ ॥

सुग्रीवादी सर्व वानर आनंदाने किष्किंधेकडे गेले. निष्कंटक राज्य प्राप्त करून घेऊन, आणि रामांकडून आदर सत्कार घेऊन, पुण्यशील बिभीषण आनंदाने लंकेकडे निघून गेला. इकडे सर्वांवर वात्सल्य करणारे राघव आपल्या संपूर्ण राज्याचे पालन करू लागले. (२४-२५)

अनिच्छन्नपि रामेण यौवराज्येऽभिषेचितः ।
लक्ष्मणः परया भक्त्या रामसेवापरोऽभवत् ॥ २६ ॥

नंतर लक्ष्मणाची इच्छा नसतानाही रामांनी त्याला यौवराज्यपदावर अभिषेक केला. अतिशय भक्तीने लक्ष्मण रामांची सेवा करण्यात तत्पर झाला. (२६)

रामस्तु परमात्मापि कर्माध्यक्षोऽपि निर्मलः ।
कर्तृत्वादिविहीनोऽपि निर्विकारोऽपि सर्वदा ॥ २७ ॥

जरी राम परमात्मा, कार्यांचे अध्यक्ष, निर्मळ स्वरूप, कर्तृत्व इत्यादींनी रहित, सर्वदा निर्विकार , आणि स्वतःच्या आनंदात संतुष्ट होते, तरीसुद्धा लोकांना उपदेश

स्वानन्देनापि तुष्टः सन् लोकानामुपदेशकृत् ।
अश्वमेधादियज्ञैश्च सर्वैर्विपुलदक्षिणैः ॥ २८ ॥

अयजत्परमानन्दो मानुषं वपुराश्रितः ।
न पर्यदेवन्विधवा न च व्यालकृतं भयम् ॥ २९ ॥

न व्याधिजं भयं चासीद्रामे राज्यं प्रशासति ।
लोके दस्युभयं नासीदनर्थो नास्ति कश्चन ॥ ३० ॥

वृद्धेषु सत्सु बालानां नासीन्मृत्युभयं तथा ।
रामपूजापराः सर्वे सर्वे राघवचिन्तकाः ॥ ३१ ॥

ववर्षुर्जलदास्तोयं यथाकालं यथारुचि ।
प्रजाः स्वधर्मनिरता वर्णाश्रमगुणान्विताः ॥ ३२ ॥

करण्यासाठी, परमानंदस्वरूप अशा रामांनी मानवी शरीराचा आश्रय घेऊन, विपुल दक्षिणांनी युक्त असे सर्व अश्वमेध इत्यादी यज्ञ केले. राम आपले राज्य चालवीत असताना, कधी विधवा स्त्रियांचे क्रंदन ऐकू आले नाही. सापामुळे होणारे भय नव्हते, रोगांपासून निर्माण होणारी भीती नव्हती, लोकांना लुटारूंचे भय नव्हते, कोणताही अनर्थ येत नव्हता, तसेच वृद्ध माणसे जिवंत असताना लहान बालकांना मृत्यूचे भय नव्हते. सर्व लोक रामांच्या पूजेत तत्पर होते. सर्व लोक राघवांचे चिंतन करीत होते. योग्यकाळी आणि लोकांच्या इच्छेप्रमाणे मेघ पाण्याची वृष्टी करीत होते. स्वतःचा वर्ण आणि आश्रम यांच्या गुणांनी युक्त असणारी प्रजा स्वतःच्या धर्मात मग्न होती. (२७-३२)

औरसानिव रामोऽपि जुगोप पितृवत्प्रजाः ।
सर्वलक्षणसंयुक्तः सर्वधर्मपरायणः ॥ ३३ ॥

दर्शवर्षसहस्त्राणि रामो राज्यमुपास्त सः ॥ ३४ ॥

स्वतः श्रीरामसुद्धा आपल्या प्रजेचे पित्याप्रमाणे पालन करीत असत. सर्व शुभ लक्षणांनी युक्त आणि सर्व धर्मात परायण अशा श्रीरामांनी दहा हजार वर्षे राज्य केले. (३३-३४)

इदं रहस्यं धनधान्यऋद्धिम-
दीर्घायुरारोग्यकरं सुपुण्यदम् ।
पवित्रमाध्यात्मिकसंज्ञितं पुरा
रामायणं भाषितमादिशम्भुना ॥ ३५ ॥

धन, धान्य आणि वैभव देणारे, दीर्घ आयुष्य आणि आरोग्य देणारे, चांगले पुण्य देणारे, पवित्र, अध्यात्म हे नाव असणारे हे रहस्ययुक्त रामायण पूर्वी शंकरांनी पार्वतीला सांगितले होते. (३५)

श्रृणोति भक्त्या मनुजः समाहितो
भक्त्या पठेद्वा परितुष्टमानसः ।
सर्वाः समाप्नोति मनोगताशिषो
विमुच्यते पातककोटिभिः क्षणात् ॥ ३६ ॥

जो मनुष्य एकाग्र मनाने भक्तिपूर्वक हे अध्यात्म रामायण ऐकतो किंवा संतुष्ट मनाने भक्तिपूर्वक वाचतो, तो मनातील सर्व इच्छांची पूर्ती करून घेतो आणि तो एका क्षणात कोट्यवधी पातकांतून मुक्त होऊन जातो. (३६)

रामाभिषेकं प्रयतः श्रृणोति यो
धनाभिलाषी लभते महद्धनम् ।
पुत्राभिलाषी सुतमार्यसम्मतं
प्राप्नोति रामायणमादितः पठन् ॥ ३७ ॥

द्रव्याची इच्छा करणारा जो माणूस एकाग्रतेने रामांच्या अभिषेकाचे वर्णन ऐकतो त्याला पुष्कळ धन प्राप्त होते. पुत्र- प्राप्तीची इच्छा करणाऱ्या माणसाने हे रामायण प्रारंभापासून वाचले, तर त्याला सज्जनांकडून मान्यता मिळणारा पुत्र प्राप्त होतो. (३७)

श्रृणोति योऽध्यात्मिकरामसंहितां
प्राप्नोति राजा भुवमृद्धसम्पदम् ।
शत्रून्विजित्यारिभिरप्रधर्षितो
व्यपेतदुःखो विजयी भवेन्नृपः ॥ ३८ ॥

जो राजा ही आध्यात्मिक रामसंहिता (अध्यात्म -रामायण) ऐकतो त्याला धन- धान्य- ऐश्वर्य - संपन्न अशा पृथ्वीचे राज्य प्राप्त होते. शत्रूंना जिंकून आणि शत्रूंचा हल्ला न होता, तो राजा दुःखरहित होऊन विजयी होतो. (३८)

स्त्रियोऽपि श्रृण्वन्त्यधिरामसंहितां
भवन्ति ता जीविसुताश्च पूजिताः ।
वन्ध्यापि पुत्रं लभते सुरूपिणं
कथामिमां भक्तियुता श्रृणोति या ॥ ३९ ॥

ज्या स्त्रियांसुद्धा आध्यात्मिक रामसंहिता म्हणजे हे अध्यात्म रामायण ऐकतात, त्यांची मुले चिरकाल जगतात, आणि त्यांचा मानसन्मान होतो आणि जी वंध्या स्त्री भक्तीने युक्त होऊन ही अध्यात्म रामायणातील कथा ऐकते, तिला सुंदर पुत्र प्राप्त होतो. (३९)

श्रद्धान्वितो यः श्रृणुयात्पठेन्नरो
विजित्य कोपं च तथा विमत्सरः ।
दुर्गाणि सर्वाणि विजित्य निर्भयो
भवेत्सुखी राघवभक्तिसंयुतः ॥ ४० ॥

क्रोधाला जिंकून आणि मत्सररहित होऊन तसेच श्रद्धायुक्त होऊन जो माणूस हे अध्यात्म रामायण ऐकतो किंवा वाचतो, तो सर्व संकटांवर मात करून, भयरहित, सुखी आणि श्रीरामांवरील भक्तीने संपन्न होतो. (४०)

सुराः समस्ता अपि यान्ति तुष्टतां
विघ्नाः समस्ता अपयान्ति श्रृण्वताम् ।
अध्यात्मरामायणमादितो नृणां
भवन्ति सर्वा अपि सम्पदः पराः ॥ ४१ ॥

जी माणसे हे अध्यात्मरामायण प्रारंभापासून ऐकतात त्यांच्यावर सर्व देव संतुष्ट होऊन जातात, त्यांची सर्व विघ्ने दूर पळून जातात आणि त्यांना सर्वश्रेष्ठ संपदा प्राप्त होतात. (४१)

रजस्वला वा यदि रामतत्परा
श्रृणोति रामायणमेतदादितः ।
पुत्रं प्रसूते ऋषभं चिरायुषं
पतिव्रता लोकसुपूजिता भवेत् ॥ ४२ ॥

रामांच्या ठिकाणी मन जडवून जर एखाद्या रजस्वला स्त्रीने शुद्धीनंतर पाचव्या दिवसापासून सोळाव्या दिवसापर्यंत हे अध्यात्मरामायण पहिल्यापासून ऐकले, तर ती दीर्घायुषी उत्तम पुत्राला जन्म देते आणि लोकांकडून पतिव्रता म्हणून तिचा सम्मान होतो. (४२)

पूजयित्वा तु ये भक्त्या नमस्कुर्वन्ति नित्यशः ।
सर्वैः पापैर्विनिर्मुक्ता विष्णोर्यान्ति परं पदम् ॥ ४३ ॥

जे कोणी लोक दररोज भक्तीने अध्यात्म-रामायणाची पूजा करून त्याला नमस्कार करतात, ते लोक सर्व पातकांतून मुक्त होऊन विष्णूच्या श्रेष्ठ पदी जातात. (४३)

अध्यात्मरामचरितं कृत्स्नं श्रृण्वन्ति भक्तितः ।
पठन्ति वा स्वयं वक्त्रात्तेषां रामः प्रसीदति ॥ ४४ ॥

जे पुरुष भक्तीने हे अध्यात्मरामचरित संपूर्णपणे ऐकतात किंवा स्वतःच्या मुखाने त्याचे पठण करतात, त्यांच्यावर राम प्रसन्न होतात. (४४)

राम एव परं ब्रह्म तस्मिंस्तुष्टेऽखिलात्मनि ।
धर्मार्थकाममोक्षाणां यद्यदिच्छति तद्भवेत् ॥ ४५ ॥

राम हेच परब्रह्म आहेत. ते सर्वात्मा राम संतुष्ट झाले असताना, धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांतील जी जी इच्छा एखाद्या माणसाला होईल, ती ती इच्छा फलद्रूप होईल. (४५)

श्रोतव्यं नियमेनैतद्रामायणमखण्डितम् ।
आयुष्यमारोग्यकरं कल्पकोट्यघनाशनम् ॥ ४६ ॥

आयुष्य आणि आरोग्य देणारे आणि कोट्यवधी कल्पातील पापांचा नाश करणारे हे अध्यात्म रामायण नियमाने खंड न पाडता ऐकत राहावे. (४६)

देवाश्च सर्वे तुष्यन्ति ग्रहाः सर्वे महर्षयः ।
रामायणस्य श्रवणे तृप्यन्ति पितरस्तथा ॥ ४७ ॥

अध्यात्म रामायणाच्या श्रवणामुळे सर्व देव, सर्व ग्रह आणि सर्व महर्षी संतुष्ट होतात, तसेच सर्व पितरही तृप्त होतात. (४७)

अध्यात्मरामायणमेतदद्भुतं
वैराग्यविज्ञानयुतं पुरातनम् ।
पठन्ति शृण्वन्ति लिखन्ति ये नरा-
स्तेषां भवेऽस्मिन्न पुनर्भवो भवेत् ॥ ४८ ॥

वैराग्य आणि विज्ञान यांनी युक्त असे हे प्राचीन, अद्भुत अध्यात्म रामायण जे पुरुष वाचतात अथवा ऐकतात किंवा लिहून काढतात, त्यांना या संसारात पुनर्जन्म प्राप्त होत नाही. (४८)

आलोड्याखिलवेदराशिमसकृ-
द्यत्तारकं ब्रह्म तद्-
रामो विष्णुरहस्यमूर्तिरिति यो
विज्ञाय भूतेश्वरः ।
उद्धृत्याखिलसारसङ्ग्रहमिदं
संक्षेपतः प्रस्फुटं
श्रीरामस्य निगूढतत्त्वमखिलं
प्राह प्रियायै भवः ॥ ४९ ॥

संपूर्ण वेद- राशींचे वारंवार मंथन करून, भूतनाथ अशा शंकरांनी 'जे तारक ब्रह्म आहे, ते रामच आहे,' 'राम हाच विष्णूची गुप्त मूर्ती आहे' असे जाणून घेतले, आणि नंतर सर्व वेदांचे सार संग्रहरूपाने एकत्र करून, शंकरांनी या ग्रंथाद्वारे श्रीरामांचे संपूर्ण गूढ तत्त्व स्पष्टपणाने पार्वतीला संक्षेपाने सांगितले. (४९)

★

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

★

## युद्धकाण्ड समाप्त

★

ॐ

# अध्यात्मरामायण

## उत्तरकाण्ड

## प्रथम सर्ग

**भगवान रामांकडे अगस्ती इत्यादी मुनीश्वर येतात आणि रावण इत्यादी राक्षसांचे पूर्वचरित्र ऐकवतात**

जयति रघुवंशतिलकः कौसल्याहृदयनन्दनो रामः ।
दशवदननिधनकारी दाशरथिः पुण्डरीकाक्षः ॥ १ ॥

कौसल्येच्या हृदयाला आनंद देणारे, रावणाचा वध करणारे, कमळाप्रमाणे डोळे असणारे, रघुवंशाचे तिलक असणारे दशरथपुत्र श्रीराम यांचा विजय असो. (१)

*पार्वत्युवाच*

अथ रामः किमकरोत्कौसल्यानन्दवर्धनः ।
हत्वा मृधे रावणादीन् राक्षसान्भीमविक्रमः ॥ २ ॥

अभिषिक्तस्त्वयोध्यायां सीतया सह राघवः ।
मायामानुषतां प्राप्य कति वर्षाणि भूतले ॥ ३ ॥

स्थितवान् लीलया देवः परमात्मा सनातनः ।
अत्यजन्मानुषं लोकं कथमन्ते रघूद्वहः ॥ ४ ॥

**पार्वती म्हणाली** – कौसल्येचा आनंद वाढविणाऱ्या, महापराक्रमी श्रीरामांनी युद्धामध्ये रावण इत्यादी राक्षसांचा वध केला; नंतर सीतेसह रामांवर अयोध्या नगरीत राज्याभिषेक झाला. त्यानंतर त्यांनी कोणते कार्य केले ? सनातन परमात्मा देव श्रीराम लीलेने मायेचे द्वारा मनुष्य-रूप धारण करून किती वर्षे या भूतलावर राहिले? तसेच शेवटी त्या रघूत्तमांनीं मनुष्य-लोक कोणत्या प्रकारे सोडला ? (२-४)

एतदाख्याहि भगवन् श्रद्दधत्या मम प्रभो ।
कथापीयूषमास्वाद्य तृष्णा मेऽतीव वर्धते ।
रामचन्द्रस्य भगवन् ब्रूहि विस्तरशः कथाम् ॥ ५ ॥

हे प्रभो, श्रद्धायुक्त असणाऱ्या मला तुम्ही हे सर्व सांगा. हे भगवन, श्रीरामांच्या कथामृताचा आस्वाद घेतल्यामुळे ती कथा पुढे ऐकण्याची माझी इच्छा अतिशय वाढत आहे. म्हणून ती कथा तुम्ही मला विस्ताराने कथन करा. (५)

*श्रीमहादेव उवाच*

राक्षसानां वधं कृत्वा राज्ये राम उपस्थिते ।
आययुर्मुनयः सर्वे श्रीराममभिवन्दितुम् ॥ ६ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– राक्षसांचा वध केल्यानंतर, श्रीराम हे राज्यावर विराजमान झाले तेव्हा, सर्व मुनी श्रीरामांना अभिवादन करण्यास तेथे आले. (६)

विश्वामित्रोऽसितः कण्वो दुर्वासा भृगुरङ्गिराः ।
कश्यपो वामदेवोऽत्रिस्तथा सप्तर्षयोऽमलाः ॥ ७ ॥

अगस्त्यः सह शिष्यैश्च मुनिभिः सहितोऽभ्यगात् ।
द्वारमासाद्य रामस्य द्वारपालमथाब्रवीत् ॥ ८ ॥

विश्वामित्र, असित, कण्व, दुर्वास, भृगू, अंगिरा, कश्यप, वामदेव, अत्री तसेच निर्मळ स्वभावाचे सप्तर्षी, आणि आपले शिष्य व इतर मुनी यांच्यासह अगस्त्य मुनी तेथे आले. राजवाड्याच्या द्वाराजवळ आल्यावर अगस्त्य, रामांच्या द्वारपालाला म्हणाले. (७-८)

ब्रूहि रामाय मुनयः समागत्य बहिःस्थिताः ।
अगस्त्यप्रमुखाः सर्वे आशीर्भिरभिनन्दितुम् ॥ ९ ॥

"अगस्त्य इत्यादी सर्व मुनी हे आशीर्वाद देऊन श्रीरामांचे अभिनंदन करण्यासाठी आले असून, ते बाहेर उभे आहेत, असे तू त्यांना सांग." (९)

प्रतीहारस्ततो राममगस्त्यवचनाद् द्रुतम् ।
नमस्कृत्याब्रवीद्वाक्यं विनयावनतः प्रभुम् ॥ १० ॥

तेव्हा अगस्त्यांचे वचन ऐकून द्वारपाल ताबडतोब रामांकडे गेला आणि त्यांना नमस्कार करून व नम्र होऊन म्हणाला. (१०)

कृताञ्जलिरुवाचेदमगस्त्यो मुनिभिः सह ।
देव त्वद्दर्शनार्थाय प्राप्तो बहिरुपस्थितः ॥ ११ ॥

"महाराज, तुमचे दर्शन घेण्यासाठी अनेक मुनींसह अगस्त्य ऋषी आले आहेत व ते बाहेर उभे आहेत." (११)

तमुवाच द्वारपालं प्रवेशय यथासुखम् ।
पूजिता विविशुर्वेश्म नानारत्नविभूषितम् ॥ १२ ॥

तेव्हा राम त्या द्वारपालाला म्हणाले, "त्यांना सन्मानाने आत घेऊन ये." नंतर सन्मानित झालेले ते मुनी नाना रत्नांनी विभूषित असणाऱ्या श्रीरामांच्या महालात प्रविष्ट झाले. (१२)

दृष्ट्वा रामो मुनीन् शीघ्रं प्रत्युत्थाय कृताञ्जलिः ।
पाद्यार्घ्यादिभिरापूज्य गां निवेद्य यथाविधि ॥ १३ ॥

मुनींना पाहाताच राम हात जोडून चट्दिशी उठून उभे राहिले आणि पाद्य, अर्घ्य इत्यादींनी पूजा-सत्कार करून, त्यांनी यथाशास्त्र प्रत्येकाला एकेक गाय दान दिली. (१३)

नत्वा तेभ्यो ददौ दिव्यान्यासनानि यथार्हतः ।
उपविष्टाः प्रहृष्टाश्च मुनयो रामपूजिताः ॥ १४ ॥

तसेच त्यांनी नमस्कार करून, मुनींच्या योग्यतेप्रमाणे त्यांना दिव्य आसने दिली. श्रीरामांकडून सत्कार झाल्यावर ते मोठ्या आनंदाने त्या आसनांवर बसले. (१४)

सम्पृष्टकुशलाः सर्वे रामं कुशलमब्रुवन् ।
कुशलं ते महाबाहो सर्वत्र रघुनन्दन ॥ १५ ॥

श्रीरामांनी विचारल्यावर त्या सर्वांनी आपापले कुशल सांगितले. नंतर ते श्रीरामांना म्हणाले, "हे महाबाहो रघुनन्दना, सर्वत्र तुमचे कुशल आहे ना ? (१५)

दिष्ट्येदानीं प्रपश्यामो हतशत्रुमरिन्दम ।
न हि भारः स ते राम रावणो राक्षसेश्वरः ॥ १६ ॥

हे शत्रुदमना, ही आनंदाची व भाग्याची गोष्ट आहे की तुम्हांला शत्रुरहित झालेले आम्ही पाहात आहोत. खरे सांगायचे झाले तर हे रामा, राक्षसराज रावण तुम्हांला फार भारी होता, असे मुळीच नव्हते. (१६)

सधनुस्त्वं हि लोकांस्त्रीन् विजेतुं शक्त एव हि ।
दिष्ट्या त्वया हताः सर्वे राक्षसा रावणादयः ॥ १७ ॥

कारण धनुष्य धारण करणारे तुम्ही तिन्ही लोक जिंकण्यास समर्थ आहातच. रावण इत्यादी सर्व राक्षसांचा तुमच्याकडून वध झाला, ही आनंदाची गोष्ट आहे. (१७)

सह्यमेतन्महाबाहो रावणस्य निबर्हणम् ।
असह्यमेतत्सम्प्राप्तं रावणेर्यन्निषूदनम् ॥ १८ ॥

हे महाबाहो, रावणाचा वध करणे ही गोष्ट तुलनेने तुम्हांला फार सोपी होती. परंतु रावणपुत्र मेघनादाचा वध करणे ही गोष्ट फारच कठीण होती. (१८)

अन्तकप्रतिमाः सर्वे कुम्भकर्णादयो मृधे ।
अन्तकप्रतिमैर्बाणैर्हतास्ते रघुसत्तम ॥ १९ ॥

कुंभकर्ण इत्यादी सर्व राक्षस युद्धामध्ये प्रत्यक्ष मृत्यूप्रमाणेच होते. हे रघुश्रेष्ठा, तुमच्या मृत्युतुल्य बाणांनी ते ठार मारले गेले. (१९)

दत्ता चेयं त्वयास्माकं पुरा ह्यभयदक्षिणा ।
हत्वा रक्षोगणान्सङ्ख्ये कृतकृत्योऽद्य जीवसि ॥ २० ॥

तुम्ही आम्हांला अगोदरच ही अभयरूपी दक्षिणा दिलेली होती. शिवाय युद्धामध्ये राक्षसांच्या समुदायांना ठार मारून तुम्ही कृतकृत्य झाला आहात." (२०)

श्रुत्वा तु भाषितं तेषां मुनीनां भावितात्मनाम् ।
विस्मयं परमं गत्वा रामः प्राञ्जलिरब्रवीत् ॥ २१ ॥

शुद्धचित्त अशा त्या मुनींचे ते भाषण ऐकल्यावर, राम अतिशय आश्चर्यचकित झाले आणि हात जोडून ते त्यांना म्हणाले. (२१)

रावणादीनतिक्रम्य कुम्भकर्णादिराक्षसान् ।
त्रिलोकजयिनो हित्वा किं प्रशंसथ रावणिम् ॥ २२ ॥

"त्रैलोक्याला जिंकणाऱ्या रावण इत्यादींना सोडून तसेच कुंभकर्ण इत्यादी राक्षसांना सोडून, तुम्ही रावण- पुत्र मेघनादाची प्रशंसा का बरे करीत आहात ?" (२२)

ततस्तद्वचनं श्रुत्वा राघवस्य महात्मनः ।
कुम्भयोनिर्महातेजा रामं प्रीत्या वचोऽब्रवीत् ॥ २३ ॥

महात्म्या राघवांचे ते वचन ऐकल्यानंतर, महा-तेजस्वी अगस्त्य प्रेमपूर्वक रामांना म्हणाले. (२३)

शृणु राम यथा वृत्तं रावणे रावणस्य च ।
जन्म कर्म वरादानं सङ्क्षेपाद्वदतो मम ॥ २४ ॥

"रामा, रावण आणि रावणपुत्र मेघनाद यांचा जन्म, कर्म तसेच त्यांना झालेली वरांची प्राप्ती ही सर्व हकीगत मी तुम्हांला संक्षेपाने सांगतो, ऐका. (२४)

पुरा कृतयुगे राम पुलस्त्यो ब्रह्मणः सुतः ।
तपस्तमुं गतो विद्वान्मेरोः पार्श्वं महामतिः ॥ २५ ॥

हे रामा, पूर्वी कृतयुगात ब्रह्मदेवाचा पुत्र, महाबुद्धिमान विद्वान पुलस्त्य हा तपश्चर्या करण्यासाठी मेरू पर्वताच्या आसमंतात गेला. (२५)

तृणबिन्दोराश्रमेऽसौ न्यवसन्मुनिपुङ्गवः ।
तपस्तेपे महातेजाः स्वाध्यायनिरतः सदा ॥ २६ ॥

तेथे तो मुनिश्रेष्ठ तृणबिंदूंच्या आश्रमात राहू लागला. आणि तो महातेजस्वी नेहमी स्वाध्यायात रत होऊन तप करू लागला. (२६)

तत्राश्रमे महारम्ये देवगन्धर्वकन्यकाः ।
गायन्त्यो ननृतुस्तत्र हसन्त्यो वादयन्ति च ॥ २७ ॥

तेथे त्या अतिशय रम्य आश्रमात देव आणि गंधर्व यांच्या कन्या एकदा गात, हसत व वाद्य वाजवीत नृत्य करू लागल्या. (२७)

पुलस्त्यस्य तपोविघ्नं चक्रुः सर्वा अनिन्दिताः ।
ततः क्रुद्धो महातेजा व्याजहार वचो महत् ॥ २८ ॥

त्या सर्व सुंदर कन्यांनी पुलस्त्याच्या तपात विघ्न निर्माण केले. तेव्हा तो महातेजस्वी पुलस्त्य रागावला आणि तो अतिशय कठोरपणे म्हणाला. (२८)

या मे दृष्टिपथं गच्छेत्सा गर्भं धारयिष्यति ।
ताः सर्वाः शापसंविग्ना न तं देशं प्रचक्रमुः ॥ २९ ॥

"जी कोणी कन्या माझ्या दृष्टिपथात येईल ती गर्भवती होईल." तेव्हा शापाने भ्यालेल्या त्या सर्व जणी त्या प्रदेशात पुन्हा आल्या नाहीत. (२९)

तृणबिन्दोस्तु राजर्षेः कन्या तन्नाशृणोद्वचः ।
विचचार मुनेरग्रे निर्भया तं प्रपश्यती ॥ ३० ॥

परंतु राजर्षी तृणबिंदूच्या कन्येने पुलस्त्याचे वचन ऐकले नव्हते. म्हणून ती एकदा निर्भयपणे त्यांच्याकडे पाहात त्याच्या समोरून फिरत होती. (३०)

बभूव पाण्डुरतनुर्व्यञ्जितान्तःशरीरजा ।
दृष्ट्वा सा देहवैवर्ण्यं भीता पितरमन्वगात् ॥ ३१ ॥

तोच तिच्या शरीरात गर्भ राहिल्याची चिन्हे प्रकट होऊन तिच्या शरीरावर पांढरेपणा आला. आपल्या शरीराचा पांढरेपणा पाहून ती भीत भीत आपल्या पित्याकडे गेली. (३१)

तृणबिन्दुश्च तां दृष्ट्वा राजर्षिरमितद्युतिः ।
ध्यात्वा मुनिकृतं सर्वमवैद्विज्ञानचक्षुषा ॥ ३२ ॥

तिला पाहून महातेजस्वी अशा राजर्षी तृणबिंदूने ध्यान केले आणि मग त्याला आपल्या ज्ञानदृष्टीने मुनींचे सर्व कृत्य कळून आले. (३२)

तां कन्यां मुनिवर्याय पुलस्त्याय ददौ पिता ।
तां प्रगृह्याब्रवीत्कन्यां बाढमित्येव स द्विजः ॥ ३३ ॥

तेव्हा राजर्षींनी ती कन्या मुनिश्रेष्ठ पुलस्त्याला दिली. तेव्हा 'ठीक आहे' असे म्हणून त्या पुलस्त्य ब्राह्मणाने त्या कन्येचा स्वीकार केला. (३३)

शुश्रूषणपरां दृष्ट्वा मुनिः प्रीतोऽब्रवीद्वचः ।
दास्यामि पुत्रमेकं ते उभयोर्वंशवर्धनम् ॥ ३४ ॥

आपली सेवा करण्यात ती तत्पर आहे हे पाहून प्रसन्न झालेला मुनी तिला म्हणाला, "आईकडील आणि पित्याकडील अशा दोन्ही वंशाची वृद्धी करणारा एक पुत्र मी तुला देईन. (३४)

ततः प्रासूत सा पुत्रं पुलस्त्याल्लोकविश्रुतम् ।
विश्रवा इति विख्यातःपौलस्त्यो ब्रह्मविन्मुनिः ॥ ३५ ॥

त्यानंतर तिने पुलस्त्याचे द्वारा त्रिलोकविख्यात पुत्राला जन्म दिला. तो पौलस्त्य ब्रह्मवेत्ता आणि मुनी असून, तो विश्रवा या नावाने विख्यात झाला. (३५)

तस्य शीलादिकं दृष्ट्वा भरद्वाजो महामुनिः ।
भार्यार्थं स्वां दुहितरं ददौ विश्रवसे मुदा ॥ ३६ ॥

त्या विश्रव्याचे शील, स्वभाव इत्यादी पाहून महामुनी भरद्वाजांनी आनंदपूर्वक आपली मुलगी त्याला दिली. (३६)

तस्यां तु पुत्रः सञ्जज्ञे पौलस्त्याल्लोकसम्मतः ।
पितृतुल्यो वैश्रवणो ब्रह्मणा चानुमोदितः ॥ ३७ ॥

ददौ तत्तपसा तुष्टो ब्रह्मा तस्मै वरं शुभम् ।
मनोऽभिलषितं तस्य धनेशत्वमखण्डितम् ॥ ३८ ॥

पुलस्त्यपुत्र विश्रव्यापासून तिला लोकप्रसिद्ध असा एक पुत्र उत्पन्न झाला. तो वैश्रवण- विश्रव्याचा पुत्र- हा आपल्या पित्यासमान होता, ब्रह्मदेवांनाही तो प्रिय होता. त्याच्या तपाने संतुष्ट झालेल्या ब्रह्मदेवांनी त्याला एक उत्तम मनोवांछित वर दिला. त्यामुळे त्याला अखंड धनेश्वरत्व प्राप्त झाले. (३७-३८)

ततो लब्धवरः सोऽपि पितरं द्रष्टुमागतः ।
पुष्पकेण धनाध्यक्षो ब्रह्मदत्तेन भास्वता ॥ ३९ ॥

ब्रह्मदेवांकडून वर मिळालेला तो कुबेर धनाध्यक्ष झाला आणि ब्रह्मदेवानींच दिलेल्या तेजस्वी अशा पुष्पक नावाच्या विमानात बसून तो आपल्या पित्याला भेटण्यास आला. (३९)

नमस्कृत्याथ पितरं निवेद्य तपसः फलम् ।
प्राह मे भगवान् ब्रह्मा दत्त्वा वरमनिन्दितम् ॥ ४० ॥

पित्याला नमस्कार करून आणि त्यांना आपल्या तपाचे फळ अर्पण करून तो म्हणाला, "तात, भगवान ब्रह्मदेवांनी मला अतिशय उत्तम वर दिलेला आहे. (४०)

निवासाय न मे स्थानं दत्तवान्परमेश्वरः ।
ब्रूहि मे नियतं स्थानं हिंसा यत्र न कस्यचित् ॥ ४१ ॥

परंतु त्यांनी मला राहाण्यासाठी कोणतेही स्थान दिलेले नाही. तेव्हा तुम्ही मला एखादे निश्चित स्थान सांगा की जेथे राहिल्यामुळे कुणाचीही हिंसा होणार नाही." (४१)

विश्रवा अपि तं प्राह लङ्का नाम पुरी शुभा ।
राक्षसानां निवासाय निर्मिता विश्वकर्मणा ॥ ४२ ॥

तेव्हा विश्रवा त्याला म्हणाला, "विश्वकर्म्याने राक्षसांना राहाण्यासाठी लंका नावाची सुंदर नगरी निर्माण केलेली आहे. (४२)

त्यक्त्वा विष्णुभयाद्दैत्या विविशुस्ते रसातलम् ।
सा पुरी दुष्प्रधर्षान्यैर्मध्येसागरमास्थिता ॥ ४३ ॥

परंतु विष्णूच्या भीतीमुळे राक्षस ती नगरी सोडून रसातळात गेले आहेत. ती नगरी सागराच्या मध्ये वसलेली असल्यामुळे ती कुणाकडूनही आक्रांत केली जाणे फार कठीण आहे. (४३)

तत्र वासाय गच्छ त्वं नान्यैः साधिष्ठिता पुरा ।
पित्रादिष्टस्त्वसौ गत्वा तां पुरीं धनदोऽविशत् ॥ ४४ ॥

तू तेथे राहाण्यासाठी जा. या पूर्वी त्या नगरीवर कुणाचाही अधिकार नव्हता." पित्याने आज्ञा केल्यावर धनद कुबेर तेथे गेला आणि त्याने त्या नगरीत प्रवेश केला. (४४)

स तत्र सुचिरं कालमुवास पितृसम्मतः ।
कस्यचित्त्वथ कालस्य सुमाली नाम राक्षसः ॥ ४५ ॥

रसातलान्मर्त्यलोकं चचार पिशिताशनः ।
गृहीत्वा तनयां कन्यां साक्षाद्देवीमिव श्रियम् ॥४६ ॥

आपल्या पित्याच्या संमतीने तो तेथे बराच काळ राहिला. नंतर काही काळ गेल्यावर मांसभक्षक सुमाली नावाचा राक्षस साक्षात लक्ष्मी देवीप्रमाणे सुंदर असणाऱ्या आपल्या मुलीला घेऊन रसातळातून वर येऊन, मर्त्य लोकात संचार करू लागला. (४५-४६)

अपश्यद्धनदं देवं चरन्तं पुष्पकेण सः ।
हिताय चिन्तयामास राक्षसानां महामनाः ॥ ४७ ॥

उवाच तनयां तत्र कैकसीं नाम नामतः ।
वत्से विवाहकालस्ते यौवनं चातिवर्तते ॥ ४८ ॥

प्रत्याख्यानाच्च भीतैस्त्वं न वरैर्गृह्यसे शुभे ।
सा त्वं वरय भद्रं ते मुनिं ब्रह्मकुलोद्भवम् ॥ ४९ ॥

स्वयमेव ततः पुत्रा भविष्यन्ति महाबलाः ।
ईदृशाः सर्वशोभाढ्या धनदेन समाः शुभे ॥ ५० ॥

तथेति साश्रमं गत्वा मुनेरग्रे व्यवस्थिता ।
लिखन्ती भुवमग्रेण पादेनाधोमुखी स्थिता ॥ ५१ ॥

तामपृच्छन्मुनिःका त्वं कन्यासि वरवर्णिनि ।
साब्रवीत्प्राञ्जलिर्ब्रह्मन् ध्यानेन ज्ञातुमर्हसि ॥ ५२ ॥

ततो ध्यात्वा मुनिः सर्वं ज्ञात्वा तां प्रत्यभाषत ।
ज्ञातं तवाभिलषितं मत्तः पुत्रानभीप्ससि ॥ ५३ ॥

दारुणायां तु वेलायामागतासि सुमध्यमे ।
अतस्ते दारुणौ पुत्रौ राक्षसौ सम्भविष्यतः ॥ ५४ ॥

साब्रवीन्मुनिशार्दूल त्वत्तोऽप्येवंविधौ सुतौ ।
तामाह पश्चिमो यस्ते भविष्यति महामतिः ॥ ५५ ॥

महाभागवतः श्रीमान् रामभक्त्येकतत्परः ।
इत्युक्ता सा तथा काले सुषुवे दशकन्धरम् ॥ ५६ ॥

रावणं विंशतिभुजं दशशीर्षं सुदारुणम् ।
तद्रक्षोजातमात्रेण चचाल च वसुन्धरा ॥ ५७ ॥

बभूवुर्नाशहेतूनि निमित्तान्यखिलान्यपि ।
कुम्भकर्णस्ततो जातो महापर्वतसन्निभः ॥ ५८ ॥

ततः शूर्पणखा नाम जाता रावणसोदरी ।
ततो बिभीषणो जातः शान्तात्मा सौम्यदर्शनः ॥ ५९ ॥

स्वाध्यायी नियताहारो नित्यकर्मपरायणः ।
कुम्भकर्णस्तु दुष्टात्मा द्विजान् सन्तुष्टचेतसः ॥ ६० ॥

कुबेर हा पुष्पक विमानातून फिरत आहे असे त्या सुमालीने एकदा पाहिले. तेव्हा त्या बुद्धिमान सुमालीने राक्षसांच्या हितासाठी विचार केला. (४७)

तो आपल्या कैकसी नावाच्या कन्येला म्हणाला, "मुली, तुझ्या विवाहाचा काळ आणि तारुण्याचा काळ व्यतीत होत आहे. हे कल्याणी, तू नकार देशील, यामुळे भ्यालेले वर तुला मागणी घालीत नाहीत. तेव्हा तू स्वतःच ब्रह्मदेवाच्या कुळात जन्मलेल्या विश्रवा मुनींना निवड. तुझे कल्याण होवो. (४८-४९)

हे शुभ लक्षणी मुली, त्यामुळे तुला अनायासेच महाबलवान् पुत्र होतील. ते पुत्र कुबेरासमान, सर्व शोभेने संपन्न असतील." "ठीक आहे" असे म्हणून विश्रवा मुनींच्या आश्रमात जाऊन, मुनींच्या पुढे उभी राहिली. त्यावेळी पायाच्या नखाग्राने जमिनीवर रेघा काढीत ती खाली तोंड करून उभी राहिली. (५०-५१)

मुनींनी तिला विचारले, "हे सुंदरी, तू कोण आहेस आणि तू अविवाहित आहेस का ?" तेव्हा ती हात जोडून म्हणाली, "हे ब्रह्मन, आपण आपल्या ध्यानाच्या योगानेच माझ्याबद्दल जाणू शकाल." (५२)

तेव्हा ध्यान करून सर्व काही जाणून घेतल्यावर, त्या मुनींनी तिला प्रत्युत्तर दिले की, "तुझी अभिलाषा मला कळली आहे. माझ्याकडून तुला पुत्र व्हावेत, अशी तुझी इच्छा आहे. (५३)

परंतु हे सुंदरी, तू अगदी कुवेळी माझ्याकडे आली आहेस. म्हणून तुला क्रूर असे दोन राक्षसपुत्र होतील."(५४)

तेव्हा ती म्हणाली, "अहो मुनिश्रेष्ठ, तुमच्यापासून होणारे पुत्रसुद्धा क्रूर असतील काय ?" त्यावर मुनी तिला म्हणाले, "त्या दोघांच्या नंतर जो पुत्र तुला होईल तो मात्र महाबुद्धिमान, परम भगवद्भक्त, ऐश्वर्य संपन्न आणि फक्त रामाची भक्ती करण्यात तत्पर असेल." मुनींनी तिला असे सांगितल्यावर तिने योग्यवेळी दहा शिरे असणाऱ्या रावणाला जन्म दिला. त्याला वीस बाहू होते, दहा मस्तके होती, तो अतिशय भयंकर होता. तो जन्माला येताच पृथ्वी चळचळा कापली, आणि सर्वप्रकारचे नाश सुचविणारे अपशकुनसुद्धा त्या वेळी झाले. त्यानंतर प्रचंड पर्वताप्रमाणे असणारा कुंभकर्ण जन्माला आला. (५५-५८)

त्यानंतर शूर्पणखा नावाची रावणाची सख्खी बहीण जन्मली. पुढे विभीषण जन्माला आला. तो शांतचित्त असणारा, सौम्य दर्शनाचा, स्वाध्याय करणारा, नियत आहार घेणारा आणि नित्य कर्मांमध्ये तत्पर असा होता.

भक्षयन्नृषिसङ्घांश्च विचचारातिदारुणः ।
रावणोऽपि महासत्त्वो लोकानां भयदायकः ।
ववृधे लोकनाशाय ह्यामयो देहिनामिव ॥ ६१ ॥

दुष्ट मनाचा आणि अतिशय भयंकर असा कुंभकर्ण संतुष्ट चित्त असणाऱ्या ब्राह्मणांना आणि ऋषिसमूहांना खाऊन टाकीत पृथ्वीवर फिरत असे. तर लोकांना भयभीत करणारा महापराक्रमी रावण देहधारी प्राण्यांचा नाश करणाऱ्या रोगाप्रमाणे लोकांच्या नाशासाठी वाढू लागला. (५९-६१)

राम त्वं सकलान्तरस्थमभितो
जानासि विज्ञानदृक्
साक्षी सर्वहृदि स्थितो हि परमो
नित्योदितो निर्मलः ।
त्वं लीलामनुजाकृतिः स्वमहिमन्
मायागुणैर्नाज्यसे
लीलार्थं प्रतिचोदितोऽद्य भवता
वक्ष्यामि रक्षोद्भवम् ॥ ६२ ॥

हे रामा, तुम्ही सर्व लोकांच्या अंतःकरणात स्थित आहात. सर्वांच्या हृदयात असणारे तुम्ही साक्षी-रूपाने आपल्या ज्ञानदृष्टीद्वारा सर्वांच्या हृदयातील सर्व काही जाणत असता. आपल्या महिम्यामध्ये स्थित असणाऱ्या हे परमेश्वरा, तुम्ही लीलेनेच हे मनुष्य रूप धारण केले आहे. तुम्ही मायेच्या गुणांनी लिप्त होत नाही. तुम्ही लीलेनेच मला प्रश्न केला म्हणून मी तुम्हांला राक्षसांच्या जन्माचा वृत्तांत सांगणार आहे. (६२)

जानामि केवलमनन्तमचिन्त्यशक्तिं
चिन्मात्रमक्षरमजं विदितात्मतत्त्वम् ।
त्वां राम गूढनिजरूपमनुप्रवृत्तो
मूढोऽप्यहं भवदनुग्रहतश्चरामि ॥ ६३ ॥

हे रामा, तुम्ही केवळ एक मात्र, अनंत आहात. तुमची शक्ती कल्पनातीत आहे. तुम्ही केवळ चैतन्यरूप, अक्षर, अजन्मा आणि आत्मतत्त्व जाणणारे आहात, हे मला माहीत आहे. मायेच्याद्वारा जरी तुम्ही आपले रूप गूढ ठेवले आहे आणि जरी मी मूर्ख असलो तरीसुद्धा तुमच्या भजनाच्या मार्गाचे अनुसरण करून, तुमच्या कृपानुग्रहामुळे मी या जगात संचार करीत आहे.'' (६३)

एवं वदन्तमिनवंशपवित्रकीर्तिः
कुम्भोद्भवं रघुपतिः प्रहसन्बभाषे ।
मायाश्रितं सकलमेतदनन्यकत्वा-
न्मत्कीर्तनं जगति पापहरं निबोध ॥ ६४ ॥

अशा प्रकारे बोलणाऱ्या अगस्त्यांना, सूर्यवंशात पवित्र कीर्ती असणारे रघुपती हसत म्हणाले, ''हे सर्व जग मायेच्या आश्रयाने असते. कारण ते माझ्याहून वेगळे नाहीच. माझ्या गुणांचे कीर्तन या जगात सर्व पापे हरण करणारे आहे, असे तुम्ही समजा.'' (६४)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

# द्वितीय सर्ग

## राक्षसांच्या राज्यस्थापनेचे विवरण

*श्रीमहादेव उवाच*
श्रीरामवचनं श्रुत्वा परमानन्दनिर्भरः ।
मुनिः प्रोवाच सदसि सर्वेषां तत्र शृण्वताम् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, श्रीरामांचे वचन ऐकल्यावर, अगस्त्य मुनी अतिशय आनंदित झाले आणि तेथे त्या राजसभेमध्ये सर्व सभासदांसमोर ते सांगू लागले. (१)

अथ वित्तेश्वरो देवस्तत्र कालेन केनचित् ।
आययौ पुष्पकारूढः पितरं द्रष्टुमञ्जसा ॥ २ ॥

''पुढे काही काळ गेल्यावर, वित्तेश्वर कुबेर हा पुष्पक विमानात बसून अकस्मात पित्याला भेटण्यास आला. (२)

दृष्ट्वा तं कैकसी तत्र भ्राजमानं महौजसम् ।
राक्षसी पुत्रसामीप्यं गत्वा रावणमब्रवीत् ॥ ३ ॥

महातेजस्वी आणि महासामर्थ्यसंपन्न अशा कुबेराला पाहून कैकसी राक्षसी आपल्या रावण या पुत्राजवळ जाऊन म्हणाली. (३)

पुत्र पश्य धनाध्यक्षं ज्वलन्तं स्वेन तेजसा ।
त्वमप्येवं यथा भूयास्तथा यत्नं कुरु प्रभो ॥ ४ ॥

"बाळा, आपल्या तेजाने तळपणाऱ्या या धनपती कुबेराला पाहा. अरे समर्थ पुत्रा, ज्या योगे तूसुद्धा असा होशील, असा काहीतरी प्रयत्न कर." (४)

तच्छ्रुत्वा रावणो रोषात् प्रतिज्ञामकरोद्द्रुतम् ।
धनदेन समो वापि ह्यधिको वाचिरेण तु ॥ ५ ॥

भविष्याम्यम्ब मां पश्य सन्तापं त्यज सुव्रते ।
इत्युक्त्वा दुष्करं कर्तुं तपः स दशकन्धरः ॥ ६ ॥

अगमत्फलसिद्ध्यर्थं गोकर्णं तु सहानुजः ।
स्वं स्वं नियममास्थाय भ्रातरस्ते तपो महत् ॥ ७ ॥

आस्थिता दुष्करं घोरं सर्वलोकैकतापनम् ।
दशवर्षसहस्त्राणि कुम्भकर्णोऽकरोत्तपः ॥ ८ ॥

ते ऐकून, रावणाने रागाने तत्काळ प्रतिज्ञा केली की, "माते, तू खेद सोड. मी लौकरच धनद कुबेरासारखा किंवा त्याहूनही अधिक मोठा ऐश्वर्यसंपन्न होईन. तू माझ्यावर कृपा-दृष्टी ठेव." असे सांगून तो इष्ट फळ प्राप्त करून घेण्यासाठी आपल्या लहान भावासह दुष्कर तप करण्यास गोकर्ण क्षेत्री गेला. तेथे आपापली व्रते पाळून, सर्व लोकांना केवळ ताप देणारे असे भयंकर व दुष्कर तप ते भाऊ करू लागले. दहा हजार वर्षेपर्यंत कुंभकर्णाने तप केले. (५-८)

विभीषणोपि धर्मात्मा सत्यधर्मपरायणः ।
पञ्चवर्षसहस्त्राणि पादेनैकेन तस्थिवान् ॥ ९ ॥

सत्य धर्मात परायण असणारा, धर्मात्मा, बिभीषणसुद्धा पाच हजार वर्षे एका पायावर उभा राहून तप करू लागला. (९)

दिव्यवर्षसहस्त्रं तु निराहारो दशाननः ।
पूर्णे वर्षसहस्त्रे तु शीर्षमग्नौ जुहाव सः ।
एवं वर्षसहस्त्राणि नव तस्यातिचक्रमुः ॥ १० ॥

एक हजार दिव्य वर्षे दशानन रावण निराहार राहिला. एक हजार वर्षे पूर्ण झाल्यावर त्याने आपले एक मस्तक तोडून त्याचे अग्नीत हवन केले. अशा प्रकारे एकेक मस्तकाचे अग्नीत हवन करताना त्याची नऊ हजार वर्षे निघून गेली. (१०)

अथ वर्षसहस्त्रं तु दशमे दशमं शिरः ।
छेत्तुकामस्य धर्मात्मा प्राप्तश्चाथ प्रजापतिः ।
वत्स वत्स दशग्रीव प्रीतोऽस्मीत्यभ्यभाषत ॥ ११ ॥

वरं वरय दास्यामि यत्ते मनसि काङ्क्षितम् ।
दशग्रीवोऽपि तच्छ्रुत्वा प्रहृष्टेनान्तरात्मना ॥ १२ ॥

नंतर दहावे सहस्त्र वर्ष संपल्यावर जेव्हा रावण आपले दहावे मस्तक तोडू लागला तेव्हा धर्मात्मा ब्रह्मदेव तेथे उपस्थित झाले आणि त्याला म्हणाले, "बाळा रावणा, मी तुझ्या तपामुळे प्रसन्न झालो आहे. तू वर माग. तुझ्या मनात जी इच्छा असेल ती मी पूर्ण करीन." ते ऐकल्यावर रावणसुद्धा मनात अतिशय संतुष्ट झाला व म्हणाला. (११-१२)

अमरत्वं वृणोमीश वरदो यदि मे भवान् ।
सुपर्णनागयक्षाणां देवतानां तथासुरैः ।
अवध्यत्वं तु मे देहि तृणभूता हि मानुषाः ॥ १३ ॥

"हे ईश्वरा, जर तू मला वर देणार असशील तर मी अमर होण्याचा वर मागत आहे. गरुड, साप, यक्ष, देव यांपैकी कोणाकडूनही मला मरण येऊ नये, असा मला वर द्या. मानव हे तर माझ्या दृष्टीने तृणवत आहेत." (१३)

तथास्त्विति प्रजाध्यक्षः पुनराह दशाननम् ।
अग्नौ हुतानि शीर्षाणि यानि तेऽसुरपुङ्गव ॥ १४ ॥

भविष्यन्ति यथापूर्वमक्षयाणि च सत्तम ॥ १५ ॥

'तथास्तु' असे म्हणून प्रजाध्यक्ष ब्रह्मदेव पुनः रावणाला म्हणाले, "हे असुरश्रेष्ठा, जी मस्तके तू अग्नीमध्ये हवन केली होतीस, ती हे साधुश्रेष्ठा, तुला पूर्वीप्रमाणे प्राप्त होतील आणि ती अक्षय होतील." (१४-१५)

एवमुक्त्वा ततो राम दशग्रीवं प्रजापतिः ।
बिभीषणमुवाचेदं प्रणतं भक्तवत्सलः ॥ १६ ॥

हे श्रीरामा, रावणाला असे सांगून, नंतर ते भक्तवत्सल प्रजापती नम्र झालेल्या बिभीषणाला म्हणाले. (१६)

बिभीषण त्वया वत्स कृतं धर्मार्थमुत्तमम् ।
तपस्ततो वरं वत्स वृणीष्वाभिमतं हितम् ॥ १७ ॥

"हे वत्सा, बिभीषणा, धर्म संपादन करण्यासाठी तू उत्तम तप केले आहेस. म्हणून हे वत्सा, तुला जो हितकर आणि इष्ट वाटत असेल असा वर माग." (१७)

बिभीषणोऽपि तं नत्वा प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् ।
देव मे सर्वदा बुद्धिर्धर्मे तिष्ठतु शाश्वती ।
मा रोचयत्वधर्मं मे बुद्धिः सर्वत्र सर्वदा ॥ १८ ॥

तेव्हा ब्रह्मदेवांना नमस्कार करून, हात जोडून बिभीषण म्हणाला, " हे देवा, माझी बुद्धी सर्वदा धर्माचे ठिकाणीच अढळ असो. माझ्या बुद्धीला सर्वदा सर्वत्र कोणत्याही अवस्थेत अधर्माचे ठिकाणी आवड उत्पन्न होऊ नये." (१८)

ततः प्रजापतिः प्रीतो बिभीषणमथाब्रवीत् ।
वत्स त्वं धर्मशीलोऽसि तथैव च भविष्यसि ॥ १९ ॥

तेव्हा प्रसन्न झालेले प्रजापती बिभीषणाला म्हणाले, "बाळा, तू धर्मशील आहेस. तू यापुढेही तसाच राहशील. (१९)

अयाचितोऽपि ते दास्ये ह्यमरत्वं बिभीषण ।
कुम्भकर्णमथोवाच वरं वरय सुव्रत ॥ २० ॥

आणि अरे बिभीषणा, जरी तू मागितलेले नाहीस, तरी मी तुला अमरत्व देत आहे." त्यानंतर प्रजापती कुंभकर्णाला म्हणाले, "अरे सुव्रता, तू वर माग." (२०)

वाण्या व्याप्तोऽथ तं प्राह कुम्भकर्णः पितामहम् ।
*स्वप्स्यामि देव षण्मासान्दिनमेकं तु भोजनम्* ॥ २१ ॥

तेव्हा (देवांनी प्रेरणा केल्यामुळे ) सरस्वती देवीने त्याच्या वाणीवर अधिष्ठान ठेवून कुंभकर्णाला मोहित केले, तो पितामहांना म्हणाला- "हे देवा, मला सहा महिने झोपायला मिळावे आणि एक दिवस भोजनासाठी जागे व्हायला मिळावे." (२१)

एवमस्त्विति तं प्राह ब्रह्मा दृष्ट्वा दिवौकसः ।
सरस्वती च तद्वक्त्रान्निर्गता प्रययौ दिवम् ॥ २२ ॥

तेव्हा देवांकडे पाहात 'असे होईल' असे ब्रह्मदेव त्याला म्हणाले. त्यानंतर कुंभकर्णाच्या मुखातून सरस्वती बाहेर पडली व स्वर्गलोकी गेली. (२२)

कुम्भकर्णस्तु दुष्टात्मा चिन्तयामास दुःखितः ।
अनभिप्रेतमेवास्यात्किं निर्गतमहो विधिः ॥ २३ ॥

दुष्ट मन असणाऱ्या कुंभकर्णाने मग दुःखित होऊन विचार केला, "अरेरे, जे मला अभिप्रेत नव्हते, तेच माझ्या मुखातून का बरे बाहेर पडले ? अरेरे ! नशीब माझे !" (२३)

सुमाली वरलब्धांस्तान् ज्ञात्वा पौत्रान् निशाचरान् ।
पातालान्निर्भयः प्रायात् प्रहस्तादिभिरन्वितः ॥ २४ ॥

आपल्या तीन राक्षस नातवंडांना वर मिळालेले आहेत, हे कळल्यावर प्रहस्तादी राक्षसांना बरोबर घेऊन, सुमाली निर्भयपणे पातळातून पृथ्वीवर आला. (२४)

दशग्रीवं परिष्वज्य वचनं चेदमब्रवीत् ।
दिष्ट्या ते पुत्र संवृत्तो वाञ्छितो मे मनोरथः ॥ २५ ॥

रावणाला आलिंगन देऊन तो म्हणाला, "मी ज्यांची इच्छा करीत होतो, तुझे तेच मनोरथ पूर्ण झाले, ही आनंदाची गोष्ट आहे. (२५)

यद्भयाच्च वयं लङ्कां त्यक्त्वा याता रसातलम् ।
तद्गतं नो महाबाहो महद्विष्णुकृतं भयम् ॥ २६ ॥

हे महाबाहो, ज्याच्या भयामुळे लंका सोडून आम्ही रसातळाला गेलो होतो, ते आमचे विष्णूपासूनचे भय आता दूर झाले आहे. (२६)

अस्माभिः पूर्वमुषिता लङ्केयं धनदेन ते ।
भ्रात्राक्रान्तामिदानीं त्वं प्रत्यानेतुमिहार्हसि ॥ २७ ॥

सान्ना वाथ बलेनापि राज्ञां बन्धुः कुत सुहृत् ।
इत्युक्तो रावणः प्राह नार्हस्येवं प्रभाषितुम् ॥ २८ ॥

ज्या लंकेत आम्ही पूर्वी राहात होतो, ती आता तुझ्या कुबेर या भावाने बळकावली आहे, आता ती लंका तू साम- नीतीने किंवा बलपूर्वक परत प्राप्त करून घ्यावयास हवीस. कुबेर हा भाऊ आहे याचा विचार तू करू नकोस. कारण राजे लोकांना बंधू किंवा हितचिंतक कुठून असणार?" सुमालीने असे म्हटल्यावर रावण त्याला म्हणाला, "आजोबा, असे बोलणे तुम्हांला शोभत नाही. (२७-२८)

वित्तेशो गुरुरस्माकमेवं श्रुत्वा तमब्रवीत् ।
प्रहस्तः प्रश्रितं वाक्यं रावणं दशकन्धरम् ॥ २९ ॥

वित्तेश कुबेर हा आमचा वडीलबंधू आहे." हे ऐकल्यावर प्रहस्त रावणाला म्हणाला. (२९)

शृणु रावण यत्नेन नैवं त्वं वक्तुमर्हसि ।
नाधीता राजधर्मास्ते नीतिशास्त्रं तथैव च ॥ ३० ॥

"रावणा, माझे बोलणे नीट ऐक. असे बोलणे तुला शोभत नाही. राजधर्म तुला माहीत नाहीत. तसेच तू नीतिशास्त्राचे अध्ययनही केलेले नाहीस. (३०)

शूराणां नहि सौभ्रात्रं शृणु मे वदतः प्रभो ।
कश्यपस्य सुता देवा राक्षसाश्च महाबलाः ॥ ३१ ॥

परस्परमयुध्यन्त त्यक्त्वा सौहृदमायुधैः ।
नैवेदानीन्तनं राजन् वैरं देवैरनुष्ठितम् ॥ ३२ ॥

वीरांचे ठायी बंधुप्रेम असत नाही. हे समर्था, मी आता जे सांगेन ते तू ऐक. कश्यपाचे पुत्र असणारे देव आणि राक्षस हे महाबलवान शूर होते. पण बंधुप्रेम सोडून देऊन त्यांनी एकमेकांबरोबर शस्त्रांनी युद्ध केले. राजा, देवांबरोबरचे हे आपले वैर काही आजच सुरू झालेले नाही." (३१-३२)

प्रहस्तस्य वचः श्रुत्वा दशग्रीवो दुरात्मनः ।
तथेति क्रोधताम्राक्षस्त्रिकूटाचलमन्वगात् ॥ ३३ ॥

दुरात्म्या प्रहस्ताचे हे वचन ऐकल्यावर 'ठीक आहे' असे रावण म्हणाला. त्याचे डोळे क्रोधाने लाल झाले आणि तो लगेच त्रिकूट पर्वतावर गेला. (३३)

दूतं प्रहस्तं सम्प्रेष्य निष्कास्य धनदेश्वरम् ।
लङ्कामाक्रम्य सचिवै राक्षसैः सुखमास्थितः ॥ ३४ ॥

प्रथम त्याने प्रहस्ताला दूत म्हणून पाठविले. नंतर लंकेवर आक्रमण करून, कुबेराला बाहेर हाकलून तो आपल्या राक्षस मंत्र्यांसह तेथे सुखाने राहू लागला. (३४)

धनदः पितृवाक्येन त्यक्त्वा लङ्कां महायशाः ।
गत्वा कैलासशिखरं तपसातोषयच्छिवम् ॥ ३५ ॥

लंका सोडून दिल्यावर पित्याच्या सांगण्यावरून महायशस्वी कुबेर कैलास पर्वताच्या शिखरावर गेला आणि तेथे त्याने तपश्चर्येने शंकराला प्रसन्न करून घेतले. (३५)

तेन सख्यमनुप्राप्य तेनैव परिपालितः ।
अलकां नगरीं तत्र निर्ममे विश्वकर्मणा ॥ ३६ ॥

दिक्पालत्वं चकारात्र शिवेन परिपालितः ।
रावणो राक्षसैः सार्धमभिषिक्तः सहानुजैः ॥ ३७ ॥

राज्यं चकारासुराणां त्रिलोकीं बाधयन् खलः ।
भगिनीं कालखञ्जाय ददौ विकटरूपिणीम् ॥ ३८ ॥

विद्युज्जिह्वाय नाम्नासौ महामायी निशाचरः ।
ततो मयो विश्वकर्मा राक्षसानां दितेः सुतः ॥ ३९ ॥

सुतां मन्दोदरीं नाम्ना ददौ लोकैकसुन्दरीम् ।
रावणाय पुनः शक्तिममोघां प्रीतमानसः ॥ ४० ॥

शकरांशी सख्य केल्यामुळे त्याला सुरक्षितता मिळाली. त्याने विश्वकर्म्याकडून कैलासावर अलका नावाची नगरी निर्माण करून घेतली. नंतर शिवांच्या संरक्षणाखाली तो दिकपालाचे, कार्य करू लागला. इकडे राक्षसांकडून अभिषिक्त झालेला दुष्ट रावण तिन्ही लोकांना पीडा देत, आपल्या धाकट्या भावांसह राक्षसांचे राज्य करू लागला. (योग्यवेळी) त्या महामायावी रावणाने आपली विक्राळ स्वरूप असणारी बहीण कालखंज वंशातील विद्युज्जिव्ह नावाच्या राक्षसाला दिली. त्यानंतर राक्षसांचा विश्वकर्मा व दितीचा पुत्र जो मय त्याने सर्व लोकांत एकमेव सुंदर असणारी मंदोदरी नावाची आपली कन्या रावणाला दिली. तसेच प्रसन्न मनाने मयाने रावणाला एक अमोघ शक्ती दिली. (३६-४०)

वैरोचनस्य दौहित्रीं वृत्रज्वालेति विश्रुताम् ।
स्वयंदत्तामुदवहत्कुम्भकर्णाय रावणः ॥ ४१ ॥

वैरोचनाच्या मुलीची मुलगी ही वृत्रज्वाला या नावाने विख्यात होती. नंतर रावणाने तिला आणून तिच्याशी कुंभकर्णाचे लग्न लावून दिले. (४१)

गन्धर्वराजस्य सुतां शैलूषस्य महात्मनः ।
बिभीषणस्य भार्यार्थे धर्मज्ञां समुदावहत् ॥ ४२ ॥

सरमां नाम सुभगां सर्वलक्षणसंयुताम् ।
ततो मन्दोदरी पुत्रं मेघनादमजीजनत् ॥ ४३ ॥

महात्मा गंधर्वराज शैलूष याची सरमा नावाची कन्या ही धर्मज्ञ, सौभाग्यसंपन्न आणि सर्व शुभ लक्षणांनी युक्त होती. रावणाने तिचा बिभीषणाशी विवाह करून दिला. त्यानंतर मंदोदरीने मेघनाद नावाच्या पुत्राला जन्म दिला . (४२-४३)

जातमात्रस्तु यो नादं मेघवत्प्रमुमोच ह ।
ततः सर्वेऽब्रुवन्मेघनादोऽयमिति चासकृत् ॥ ४४ ॥

जन्माला येताक्षणीच याने मेघाप्रमाणे गर्जना केली. म्हणून हा मेघनाद आहे असे सर्वजण वारंवार म्हणू लागले. म्हणून त्या मुलाचे नाव मेघनाद असेच पडले. (४४)

कुम्भकर्णस्ततः प्राह निद्रा मां बाधते प्रभो ।
ततश्च कारयामास गुहां दीर्घां सुविस्तराम् ॥ ४५ ॥

त्यानंतर कुंभकर्ण एकदा रावणाला म्हणाला, "हे प्रभो, मला झोप सतावत आहे." तेव्हा रावणाने त्याच्यासाठी एक लांब-रुंद विस्तृत अशी गुहा तयार करवून घेतली. (४५)

तत्र सुष्वाप मूढात्मा कुम्भकर्णो विघूर्णितः ।
निद्रिते कुम्भकर्णे तु रावणो लोकरावणः ॥ ४६ ॥

ब्राह्मणान् ऋषिमुख्यांश्च देवदानवकिन्नरान् ।
देवश्रियो मनुष्यांश्च निजघ्ने समहोरगान् ॥ ४७ ॥

तेथे मूढ बुद्धीचा कुंभकर्ण घोरत झोपून गेला. कुंभकर्ण झोपी गेल्यावर, सर्व लोकांना त्रास देणाऱ्या रावणाने ब्राह्मण, प्रमुख ऋषी, देव, दानव, किंन्नर, आणि प्रचंड सर्पांसह मानवगण यांना सतावण्यास सुरूवात केली व त्याने देवांची संपत्ती नष्ट केली. (४६-४७)

धनदोऽपि ततः श्रुत्वा रावणस्याक्रमं प्रभुः ।
अधर्मं मा कुरुष्वेति दूतवाक्यैर्न्यवारयत् ॥ ४८ ॥

रावणाची कृत्ये ऐकल्यानंतर, प्रभू कुबेराने दूतांकडून 'अधर्म करू नकोस' असे सांगून रावणाला थोपविण्याचा प्रयत्न केला. (४८)

ततः क्रुद्धो दशग्रीवो जगाम धनदालयम् ।
विनिर्जित्य धनाध्यक्षं जहारोत्तमपुष्पकम् ॥ ४९ ॥

तेव्हा रावण रागावला आणि त्याने कुबेराच्या नगरावर चाल केली आणि त्याला जिंकून, त्याने त्याचे पुष्पक हे उत्तम विमान हरण करून नेले. (४९)

ततो यमं च वरुणं निर्जित्य समरेऽसुरः ।
स्वर्गलोकमगात्तूर्णं देवराजजिघांसया ॥ ५० ॥

त्यानंतर रावणाने यम आणि वरुण यांना युद्धात जिंकून घेतले, देवराज इंद्राचा वध करण्यासाठी तो त्वरेने स्वर्गलोकावर चालून गेला. (५०)

ततोऽभवन्महद्युद्धमिन्द्रेण सह दैवतैः ।
ततो रावणमभ्येत्य बबन्ध त्रिदशेश्वरः ॥ ५१ ॥

तेव्हा देवांसह इंद्राबरोबर रावणाचे प्रचंड युद्ध झाले. रावणाजवळ येऊन देवराज इंद्राने त्याला बंदिवान केले. (५१)

तच्छ्रुत्वा सहसागत्य मेघनादः प्रतापवान् ।
कृत्वा घोरं महद्युद्धं जित्वा त्रिदशपुङ्गवान् ॥ ५२ ॥

इन्द्रं गृहीत्वा बध्वासौ मेघनादो महाबलः ।
मोचयित्वा तु पितरं गृहीत्वेन्द्रं ययौ पुरम् ॥ ५३ ॥

ती वार्ता ऐकल्यावर प्रतापी मेघनाद हा झटकन तेथे आला. त्याने देवांबरोबर भयंकर युद्ध केले; देवश्रेष्ठांना जिंकल्यावर त्याने इंद्राला पकडले व त्याला बांधून टाकले. नंतर महाबलवान मेघनादाने आपल्या पित्याला सोडविले आणि इंद्राला घेऊन तो लंका नगरीकडे निघून गेला. (५२-५३)

ब्रह्मा तु मोचयामास देवेन्द्रं मेघनादतः ।
दत्त्वा वरान्बहूंस्तस्मै ब्रह्मा स्वभवनं ययौ ॥ ५४ ॥

तेव्हा ब्रह्मदेवांनी इंद्राला मेघनादाच्या ताब्यातून सोडवून घेतले. मेघनादाला पुष्कळ वर देऊन, ब्रह्मदेव परत गेले. (५४)

रावणो विजयी लोकान्सर्वान् जित्वा क्रमेण तु ।
कैलासं तोलयामास बाहुभिः परिघोपमैः ॥ ५५ ॥

क्रमाक्रमाने सर्व लोकांना जिंकून रावण विजयी झाला. नंतर परिघाप्रमाणे असलेल्या बाहूंनी त्याने कैलास पर्वत उचलला. (५५)

तत्र नन्दीश्वरेणैवं शप्तोऽयं राक्षसेश्वरः ।
वानरैर्मानुषैश्चैव नाशं गच्छेति कोपिना ॥ ५६ ॥

तेव्हा तेथे असणाऱ्या नंदीश्वरानेच राक्षसराज रावणाला क्रोधाने असा शाप दिला, "अरे रावणा, वानर आणि मानव यांच्या हातून तुझा वध होईल." (५६)

शप्तोऽप्यगणयन् वाक्यं ययौ हैहयपत्तनम् ।
तेन बद्धो दशग्रीवः पुलस्त्येन विमोचितः ॥ ५७ ॥

असा शाप मिळाला तरी त्या शापाकडे लक्ष न देता, तो रावण हैहय राजाच्या (सहस्त्रार्जुनाच्या) नगरावर चालून गेला. त्या सहस्त्रार्जुनाने दशानन रावणाला बंदिवान केले. त्यावेळी पुलस्त्याने येऊन त्याला सोडविले. (५७)

ततोऽतिबलमासाद्य जिघांसुर्हरिपुङ्गवम् ।
धृतस्तेनैव कक्षेण वालिना दशकन्धरः ॥ ५८ ॥

त्यानंतर रावण अतिबलवान वानरराज वालीला ठार करण्याच्या इच्छेने त्याच्यावर चालून गेला. त्या वेळी वालीनेच त्या रावणाला आपल्या कवेत दाबून धरले. (५८)

भ्रामयित्वा तु चतुरः समुद्रान् रावणं हरिः ।
विसर्जयामास ततस्तेन सख्यं चकार सः ॥ ५९ ॥

वालीने चारी समुद्रांवर त्याला गरागरा फिरवून सोडून दिले. तेव्हा रावणाने वालीशी सख्य केले. (५९)

रावणः परमप्रीत एवं लोकान्महाबलः ।
चकार स्ववशे राम बुभुजे स्वयमेव तान् ॥ ६० ॥

हे रामा, अशा प्रकारे अतिशय आनंदित झालेल्या महाबलवान रावणाने सर्व लोक आपल्या अधीन करून घेतले व तो स्वतःच त्यांचा उपभोग घेऊ लागला. (६०)

एवम्प्रभावो राजेन्द्र दशग्रीवः सहेन्द्रजित् ।
त्वया विनिहतः सङ्ख्ये रावणो लोकरावणः ॥ ६१ ॥

मेघनादश्च निहतो लक्ष्मणेन महात्मना ।
कुम्भकर्णश्च निहतस्त्वया पर्वतसन्निभः ॥ ६२ ॥

हे राजेंद्रा, इंद्रजितासह रावण अशा प्रकारे प्रभावशाली झाला होता. तो लोकांना रडवणारा रावण तुमच्याकडून युद्धात मारला गेला आणि महात्म्या लक्ष्मणाने मेघनादाचा वध केला. तसेच पर्वताप्रमाणे प्रचंड असणारा कुंभकर्ण हाही तुमच्याकडून मारला गेला. (६१-६२)

भवान्नारायणः साक्षाज्जगतामादिकृद्विभुः ।
त्वत्स्वरूपमिदं सर्वं जगत्स्थावरजङ्गमम् ॥ ६३ ॥

हे रामा, सर्व जगांचा आदिकर्ता असे साक्षात सर्व व्यापक नारायण तुम्हीच आहात. हे स्थावर जंगमात्मक सर्व विश्व हे तुमचेच स्वरूप आहे. (६३)

त्वन्नाभिकमलोत्पन्नो ब्रह्मा लोकपितामहः ।
अग्निस्ते मुखतो जातो वाचा सह रघूत्तम ॥ ६४ ॥

लोकांचा पितामह ब्रह्मदेव हा नाभिकमळातून उत्पन्न झाला आहे. हे रघूत्तमा, वाग्देवीसह अग्निदेव तुमच्या मुखातून निर्माण झाला आहे. (६४)

बाहुभ्यां लोकपालौघाश्चक्षुर्भ्यां चन्द्रभास्करौ ।
दिशश्च विदिशश्चैव कर्णाभ्यां ते समुत्थिताः ॥ ६५ ॥

तुमच्या दोन बाहूंपासून लोकपालांचे समूह, डोळ्यांपासून सूर्य आणि चंद्र व कानांपासून सर्व दिशा आणि विदिशा उत्पन्न झालेल्या आहेत. (६५)

घ्राणात्प्राणः समुत्पन्नश्चाश्विनौ देवसत्तमौ ।
जङ्घाजानूरुजघनाद्भुवर्लोकादयोऽभवन् ॥ ६६ ॥

तुमच्या घ्राणेंद्रियांपासून प्राण आणि देवश्रेष्ठ अश्विनीकुमार उद्भूत झाले आहेत. तसेच तुमच्या जंघा, जानू, उरू आणि जघन यांचेपासून भुवर्लोक इत्यादी निर्माण झालेले आहेत. (६६)

कुक्षिदेशात्समुत्पन्नाश्चत्वारः सागरा हरे ।
स्तनाभ्यामिन्द्रवरुणौ वालखिल्याश्च रेतसः ॥ ६७ ॥

हे रामा, तुमच्या कुक्षिप्रदेशापासून चार समुद्र, दोन स्तनांपासून इंद्र आणि वरुण, तसेच तुमच्या वीर्यापासून बालखिल्य ऋषी उत्पन्न झालेले आहेत. (६७)

मेढ्राद्यमो गुदान्मृत्युर्मन्यो रुद्रस्त्रिलोचनः ।
अस्थिभ्यः पर्वता जाताः केशेभ्यो मेघसंहतिः ॥ ६८ ॥

तुमच्या उपस्थापासून यम, गुदापासून मृत्यू, क्रोधापासून त्रिलोचन रुद्र हे निर्माण झाले. तुमच्या अस्थींपासून पर्वत जन्माला आले आणि केसांपासून मेघांचे समुदाय निर्माण झाले. (६८)

ओषध्यस्तव रोमभ्यो नखेभ्यश्च खरादयः ।
त्वं विश्वरूपः पुरुषो मायाशक्तिसमन्वितः ॥ ६९ ॥

तुमच्या रोमांपासून औषधी, नखांपासून गर्दभ इत्यादी प्राणी झाले आहेत. अशा प्रकारे आपल्या मायाशक्तीने युक्त असे तुम्ही विश्वरूप असणारे परम पुरुष आहात. (६९)

नानारूप इवाभासि गुणव्यतिकरे सति ।
त्वामाश्रित्यैव विबुधाः पिबन्त्यमृतमध्वरे ॥ ७० ॥

प्रकृतीच्या गुणांशी संयोग झाला असता, तुम्ही नाना रूपे असल्याप्रमाणे भासू लागता. तुमचाच आश्रय घेऊन, देवांचे समूह यज्ञांमध्ये अमृताचे पान करतात. (७०)

त्वया सृष्टमिदं सर्वं विश्वं स्थावरजङ्गमम् ।
त्वामाश्रित्यैव जीवन्ति सर्वे स्थावरजङ्गमाः ॥ ७१ ॥

हे स्थावर-जंगमात्मक सर्व विश्व तुम्ही निर्माण केले आहे. तुमचाच आश्रय घेऊन सर्व स्थावर व जंगम जिवंत राहातात. (७१)

त्वद्युक्तमखिलं वस्तु व्यवहारेऽपि राघव ।
क्षीरमध्यगतं सर्पिर्यथा व्याप्याखिलं पयः ॥ ७२ ॥

हे राघवा, ज्या प्रमाणे दुधामध्ये असणारे तूप हे सर्व दूध व्यापून असते, त्या प्रमाणे व्यवहारातसुद्धा सर्व वस्तू तुमच्याकडून व्यापल्या गेल्या आहेत. (७२)

त्वद्भासा भासतेऽर्कादि न त्वं तेनावभाससे ।
सर्वगं नित्यमेकं त्वां ज्ञानचक्षुर्विलोकयेत् ॥ ७३ ॥

सूर्य इत्यादी तुमच्या प्रकाशाने प्रकाशित होतात; परंतु तुम्ही मात्र त्यांच्या योगाने प्रकाशित होत नाही. सर्व व्यापक, नित्य आणि एकमेव अद्वितीय असलेल्या तुम्हांला ज्ञान- दृष्टी असणारा माणूस पाहू शकतो. (७३)

नाज्ञानचक्षुस्त्वां पश्येदन्धदृग् भास्करं यथा ।
योगिनस्त्वां विचिन्वन्ति स्वदेहे परमेश्वरम् ॥ ७४ ॥

अतन्निरसनमुखैर्वेदशीर्षैरहर्निशम् ।
त्वत्पादभक्तिलेशेन गृहीता यदि योगिनः ॥ ७५ ॥

विचिन्वतो हि पश्यन्ति चिन्मात्रं त्वां न चान्यथा ।
मया प्रलपितं किञ्चित्सर्वज्ञस्य तवाग्रतः ।
क्षन्तुमर्हसि देवेश तवानुग्रहभागहम् ॥ ७६ ॥

अंध माणूस ज्या प्रमाणे सूर्याला पाहू शकत नाही, त्या प्रमाणे ज्ञानदृष्टी नसणारा माणूस तुम्हाला पाहू शकत नाही. (नेति, नेति, असे म्हणून) अनात्म पदार्थांचे निरसन करणाऱ्या वेदांच्या शिरोभागी असणाऱ्या उपनिषदांच्या उपदेशाद्वारा, योगी लोक स्वत:च्या देहात तुम्हांला शोधीत असतात. परंतु जर त्या योगी लोकांवर तुमच्या चरणांठायी भक्तीचा लेशमात्रही प्रभाव झाला, तर शोध घेत घेत त्या योगी लोकांना चिन्मात्र असणाऱ्या तुमचे दर्शन होते, नाही तर नाही. हे देवेशा, सर्वज्ञ अशा तुमच्यापुढे मी काही तरी बडबड केली आहे, तुम्ही मला क्षमा करा. कारण मी तुमच्या कृपानुग्रहाला पात्र आहे. (७४-७६)

दिग्देशकालपरिहीनमनन्यमेकं
चिन्मात्रमक्षरमजं चलनादिहीनम् ।
सर्वज्ञमीश्वरमनन्तगुणं व्युदस्त-
मायं भजे रघुपतिं भजतामभिन्नम् ॥ ७७ ॥

जे दिशा, देश आणि काल यांनी रहित आहेत, तसेच अनन्य , एक, चिन्मात्र, अविनाशी, अजन्मा आहेत, चलनादी क्रियांनी रहित आहेत, अशा सर्वज्ञ, सर्वेश्वर, अनंतगुणसंपन्न, मायाहीन व आपल्या भक्तांशी नित्य अभिन्न राहणाऱ्या श्रीरामांना मी भजतो." (७७)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकाण्डे द्वितीयः सर्गः ॥२॥

# तृतीय सर्ग

## वाली आणि सुग्रीव यांचे पूर्वचरित्र तसेच रावण व सनत्कुमार यांचा संवाद

*श्रीराम उवाच*

वालिसुग्रीवयोर्जन्म श्रोतुमिच्छामि तत्त्वतः ।
रवीन्द्रौ वानराकारौ जज्ञात इति नः श्रुतम् ॥ १ ॥

**श्रीराम म्हणाले**– "हे अगस्त्य मुने, वाली आणि सुग्रीव यांच्या जन्माचा यथार्थ वृत्तांत मी ऐकू इच्छितो. सूर्य आणि इंद्र हे वानररूपाने जन्माला आले होते, असे ऐकले होते." (१)

*अगस्त्य उवाच*

मेरोः स्वर्णमयस्याद्रेर्मध्यशृङ्गे मणिप्रभे ।
तस्मिन्सभास्ते विस्तीर्णा ब्रह्मणः शतयोजना ॥ २ ॥

**अगस्त्य म्हणाले**– "हे रामा, सुवर्णमय मेरू पर्वताच्या रत्नाप्रमाणे प्रकाशमान अशा मध्य शिखरावर शंभर योजने विस्तार असणारी ब्रह्मदेवांची सभा आहे. (२)

तस्यां चतुर्मुखः साक्षात्कदाचिद्योगमास्थितः ।
नेत्राभ्यां पतितं दिव्यमानन्दसलिलं बहु ॥ ३ ॥

त्या सभेत एकदा साक्षात चतुर्मुख ब्रह्मदेव ध्यानस्थ होऊन बसले होते. त्या वेळी त्यांच्या दोन्ही डोळ्यांतून पुष्कळ दिव्य आनंदाश्रू पडले. (३)

तद्गृहीत्वा करे ब्रह्मा ध्यात्वा किञ्चित्तदत्यजत् ।
भूमौ पतितमात्रेण तस्माज्जातो महाकपिः ॥ ४ ॥

ते अश्रुजल आपल्या हातात घेऊन, काही वेळ विचार करून, ब्रह्मदेवांनी ते खाली पृथ्वीवर टाकले. ते पृथ्वीवर पडताच त्यातून एक मोठा वानर जन्माला आला. (४)

तमाह द्रुहिणो वत्स किञ्चित्कालं वसात्र मे ।
समीपे सर्वशोभाढ्ये ततः श्रेयो भविष्यति ॥ ५ ॥

त्याला ब्रह्मदेव म्हणाले, "हे वत्सा, तू काही काळ येथे माझ्याजवळ या सर्व शोभासंपन्न स्थानी राहा. त्यामुळे तुझे कल्याण होईल." (५)

इत्युक्तो न्यवसत्तत्र ब्रह्मणा वानरोत्तमः ।
एवं बहुतिथे काले गते ऋक्षाधिपः सुधीः ॥ ६ ॥

कदाचित्पर्यटन्नद्रौ फलमूलार्थमुद्यतः ।
अपश्यद्दिव्यसलिलां वापीं मणिशिलान्विताम् ॥ ७ ॥

ब्रह्मदेवांनी त्याला असे सांगितल्यावर, तो वानरश्रेष्ठ तेथे राहिला. अशा प्रकारे बराच काळ लोटल्यावर, एकदा फळे- मुळे गोळा करण्यास उद्युक्त झालेला तो महाबुद्धिमान ऋक्षाधिप नावाचा वानर त्या पर्वतावर भटकत असताना, त्याला रत्नशिलांच्या पायऱ्यांनी युक्त आणि दिव्य जलाने भरलेली एक पुष्करिणी दिसली . (६-७)

पानीयं पातुमागच्छत्तत्रच्छायामयं कपिम् ।
दृष्ट्वा प्रतिकपिं मत्वा निपपात जलान्तरे ॥ ८ ॥

पाणी पिण्यास तो तेथे गेला. तेव्हा पाण्यात आपल्या प्रतिबिंबाच्या रूपात त्याला वानर दिसला. तो वानर आपला प्रतिस्पर्धी वानर आहे, असे समजून त्याने पाण्यामध्ये उडी मारली. (८)

तत्रादृष्ट्वा हरिं शीघ्रं पुनरुत्प्लुत्य वानरः ।
अपश्यत्सुन्दरीं रामामात्मानं विस्मयं गतः ॥ ९ ॥

परंतु तेथे दुसरा कोणी वानर नाही, हे पाहताच झट्दिशी उडी मारून पुनः तो पाण्याच्या बाहेर आला आणि आपण एक सुंदर रमणी झालो आहोत, हे दिसताच त्याला विस्मय वाटला. (९)

ततः सुरेशो देवेशं पूजयित्वा चतुर्मुखम् ।
गच्छन्मध्याह्नसमये दृष्ट्वा नारीं मनोरमाम् ॥ १० ॥

त्याच वेळी मध्यान्ह काळी देवश्रेष्ठ चतुर्मुख ब्रह्मदेवांचे पूजन करून देवराज इंद्र परत जात असताना, त्याला ती मनोरम स्त्री दिसली. (१०)

कन्दर्पशरविद्धाङ्गस्त्यक्तवान्वीर्यमुत्तमम् ।
तामप्राप्यैव तद्बीजं वालदेशेऽपतद्भुवि ॥ ११ ॥

तिला पाहाताच मदनाच्या बाणांनी त्याचे शरीर विद्ध झाले. त्याचे उत्तम वीर्य स्खलित झाले आणि ते त्या स्त्रीच्या केसांना स्पर्श करून जमिनीवर पडले. (११)

वाली समभवत्तत्र शक्रतुल्यपराक्रमः ।
तस्य दत्त्वा सुरेशानः स्वर्णमालां दिवं गतः ॥ १२ ॥

तेव्हा त्या वीर्यापासून इंद्राप्रमाणे पराक्रमी असणारा वाली नावाचा वानर जन्माला आला. त्याला एक सुवर्णमाला देऊन देवराज इंद्र स्वर्गलोकी परत गेला. (१२)

भानुरप्यागतस्तत्र तदानीमेव भामिनीम् ।
दृष्ट्वा कामवशो भूत्वा ग्रीवादेशेऽसृजन्महत् ॥ १३ ॥

बीजं तस्यास्ततः सद्यो महाकायोऽभवद्धरिः ।
तस्य दत्त्वा हनूमन्तं सहायार्थं गतो रविः ॥ १४ ॥

त्याच वेळी सूर्यसुद्धा तेथे आला होता. त्या सुंदर स्त्रीला पाहून कामवश होऊन, त्याने तिच्या ग्रीवा प्रदेशावर आपले प्रभावी वीर्य सोडले. त्यापासून तत्काळ एक प्रचंड शरीर असणारा वानर निर्माण झाला. त्याच्या सहाय्याला हनुमानाला देऊन सूर्य तेथून निघून गेला. (१३-१४)

पुत्रद्वयं समादाय गत्वा सा निद्रिता क्वचित् ।
प्रभातेऽपश्यदात्मानं पूर्ववद्वानराकृतिम् ॥ १५ ॥

पुढे त्या दोन्ही पुत्रांना घेऊन ती स्त्री कुठे तरी जाऊन निद्राधीन झाली. दुसरे दिवशी प्रभातसमयी झोपेतून उठल्यावर आपल्याला पूर्वी प्रमाणे वानराचे रूप प्राप्त झाले आहे, असे तिला दिसले. (१५)

फलमूलादिभिः सार्धं पुत्राभ्यां सहितः कपिः ।
नत्वा चतुर्मुखस्याग्रे ऋक्षराजः स्थितः सुधीः ॥ १६ ॥

मग फळे- मुळे इत्यादी घेऊन, तो महाबुद्धिमान् ऋक्षराज वानर आपल्या दोन पुत्रांसह ब्रह्मदेवांकडे आला आणि त्यांना नमस्कार करून, पुढे उभा राहिला. (१६)

ततोऽब्रवीत्समाश्वास्य बहुशः कपिकुञ्जरम् ।
तत्रैकं देवतादूतमाहूयामरसन्निभम् ॥ १७ ॥

तेव्हा त्या कपिश्रेष्ठाला ब्रह्मदेवांनी अनेक प्रकारे समजावून सांगितले आणि नंतर तेथे असलेल्या एका देवदूताला बोलावून घेऊन ब्रह्मदेव त्याला म्हणाले. (१७)

गच्छ दूत मयादिष्टो गृहीत्वा वानरोत्तमम् ।
किष्किन्धां दिव्यनगरीं निर्मितां विश्वकर्मणा ॥ १८ ॥

"अरे दूता, माझ्या आज्ञेने या वानरश्रेष्ठाला घेऊन तू विश्वकर्म्याने निर्माण केलेल्या दिव्य अशा किष्किंधा नगरीला जा. (१८)

सर्वसौभाग्यवलितां देवैरपि दुरासदाम् ।
तस्यां सिंहासने वीरं राजानमभिषेचय ॥ १९ ॥

ती नगरी सर्व प्रकारच्या ऐश्वर्याने संपन्न आणि देवांना सुद्धा जिंकण्यास कठीण आहे. त्या नगरीत या वीराचा सिंहासनावर राजा म्हणून अभिषेक कर. (१९)

सप्तद्वीपगता ये ये वानराः सन्ति दुर्जयाः ।
सर्वे ते ऋक्षराजस्य भविष्यन्ति वशेऽनुगाः ॥ २० ॥

सात द्वीपांत असणारे जे जे अजिंक्य असे वानर आहेत. ते सर्व वानर या ऋक्षराजाला अंकित होऊन, ते त्याचे अनुयायी होतील. (२०)

यदा नारायणः साक्षाद्रामो भूत्वा सनातनः ।
भूभारासुरनाशाय सम्भविष्यति भूतले ॥ २१ ॥

तदा सर्वे सहायार्थे तस्य गच्छन्तु वानराः ।
इत्युक्तो ब्रह्मणा दूतो देवानां स महामतिः ॥ २२ ॥

यथाज्ञप्तस्तथा चक्रे ब्रह्मणा तं हरीश्वरम् ।
देवदूतस्ततो गत्वा ब्रह्मणे तन्न्यवेदयत् ॥ २३ ॥

तदादि वानराणां सा किष्किन्धाभून्नृपाश्रयः ॥२४॥

नंतर पुढे जेव्हा सनातन असे साक्षात नारायण हे राम होऊन भूमीला भार झालेल्या असुरांच्या नाशासाठी पृथ्वीतलावर जन्माला येतील, त्या वेळी सर्व वानर त्या श्रीरामांच्या सहाय्यासाठी जातील." ब्रह्मदेवांकडून अशी आज्ञा झाल्यावर, त्या महान बुद्धिमान देवदूताने ब्रह्मदेवांनी जशी आज्ञा केली होती, त्या प्रमाणे वानरराजाची व्यवस्था केली. नंतर पुनः ब्रह्मदेवांकडे परत जाऊन देवदूताने सर्व वृत्तांत त्यांना निवेदन केला. तेव्हापासून किष्किंधा नगरी ही वानरांची राजधानी झाली. (२१-२४)

सर्वेश्वरस्त्वमेवासीरिदानीं ब्रह्मणार्थितः ।
भूमेर्भारो हृतः कृत्स्नस्त्वया लीलानृदेहिना ।
सर्वभूतान्तरस्थस्य नित्यमुक्तचिदात्मनः ॥२५॥

हे रामा, तुम्हीच सर्वांचे ईश्वर आहात. ब्रह्मदेवांनी तुमची प्रार्थना केल्यावर तुम्ही लीलेने माया- मानव- रूप धारण करून, पृथ्वीचा सर्व भार हरण केला आहे. जे सर्व

अखण्डानन्तरूपस्य कियानेष पराक्रमः ।
तथापि वर्ण्यते सद्भिर्लीलामानुषरूपिणः ॥ २६ ॥

यशस्ते सर्वलोकानां पापहत्यै सुखाय च ।
य इदं कीर्तयेन्मर्त्यो वालिसुग्रीवयोर्महत् ॥ २७ ॥

जन्म त्वदाश्रयत्वात्स मुच्यते सर्वपातकैः ॥ २८ ॥

भूतांच्या हृदयात असतात, जे नित्य मुक्त आणि चेतन स्वरूप आहेत आणि जे अखंड अनंतरूप आहेत, अशा तुम्हांला हा पराक्रम फार मोठा आहे काय ? तथापि सर्व लोकांच्या पापांचा नाश करण्यास आणि त्यांना सुख देण्यास, लीलेने मनुष्यरूप धारण करणाऱ्या तुमची कीर्ती सज्जन माणसे वर्णन करतात. जो मनुष्य वाली आणि सुग्रीव यांच्या महान जन्मकथेचे कीर्तन करतो, तो तुमचाच आश्रय घेतल्यामुळे सर्व पातकांतून मुक्त होऊन जातो. (२५-२८)

अथान्यां सम्प्रवक्ष्यामि कथां राम त्वदाश्रयाम् ।
सीता हृता यदर्थं सा रावणेन दुरात्मना ॥ २९ ॥

हे रामा, आता तुमच्याशी संबंधित असणारी आणखी एक कथा मी तुम्हांला सांगतो. तिच्यामुळेच त्या दुरात्म्या रावणाने सीतेचे हरण केले होते. (२९)

पुरा कृतयुगे राम प्रजापतिसुतं विभुम् ।
सनत्कुमारमेकान्ते समासीनं दशाननः ।
विनयावनतो भूत्वा ह्यभिवाद्येदमब्रवीत् ॥ ३० ॥

हे रामा, पूर्वी कृतयुगात एकांतात बसलेल्या सनत्कुमार या ब्रह्मदेवांच्या सामर्थ्यसंपन्न पुत्राला रावणाने नम्र होऊन अभिवादन केले आणि तो म्हणाला. (३०)

को न्वस्मिन्प्रवरो लोके देवानां बलवत्तरः ।
देवाश्च यं समाश्रित्य युद्धे शत्रुं जयन्ति हि ॥ ३१ ॥

"देव ज्याचा आश्रय घेऊन युद्धामध्ये शत्रूला जिंकतात असा या लोकांत सर्व देवांमध्ये श्रेष्ठ आणि अधिक बलवान असा कोणता देव आहे बरे ? (३१)

कं यजन्ति द्विजा नित्यं कं ध्यायन्ति च योगिनः ।
एतन्मे शंस भगवन् प्रश्नं प्रश्नविदांवर ॥ ३२ ॥

ब्राह्मण नित्य कुणाची आराधना करतात ? योगी लोक नित्य कुणाचे ध्यान करतात ? हे भगवन, प्रश्नांचे उत्तर जाणणाऱ्यांत तुम्ही श्रेष्ठ आहात; म्हणून तुम्ही या माझ्या प्रश्नाचे उत्तर मला सांगा. (३२)

ज्ञात्वा तस्य हृदिस्थं यत्तदशेषेण योगदृक् ।
दशाननमुवाचेदं शृणु वक्ष्यामि पुत्रक ॥ ३३ ॥

त्या रावणाच्या मनात जे काही होते ते संपूर्ण जाणून घेऊन, दिव्यदृष्टीचे सनत्कुमार दशाननाला म्हणाले, "पुत्रा, मी सांगतो, ऐक. (३३)

भर्ता यो जगतां नित्यं यस्य जन्मादिकं न हि ।
सुरासुरैर्नुतो नित्यं हरिर्नारायणोऽव्ययः ॥ ३४ ॥

जे जगाचा नित्य पोषणकर्ता आहेत, ज्यांना जन्म इत्यादी काही नाही, देव व असुर ज्यांची नेहमी स्तुती करतात, जे नित्य व अविनाशी आहेत असे हरी, नारायण आहेत. (३४)

यन्नाभिपङ्कजाज्जातो ब्रह्मा विश्वसृजां पतिः ।
सृष्टं येनैव सकलं जगत्स्थावरजङ्गमम् ॥ ३५ ॥

सृष्टिकर्त्यांचे स्वामी ब्रह्मदेव त्यांच्या नाभिकमळातून उत्पन्न झाला आहे. हे संपूर्ण स्थावर जंगमात्मक जग त्यांनीच निर्माण केले आहे. (३५)

तं समाश्रित्य विबुधा जयन्ति समरे रिपून् ।
योगिनो ध्यानयोगेन तमेवानुजपन्ति हि ॥ ३६ ॥

त्यांचाच आश्रय घेऊन देव युद्धामध्ये शत्रूंना जिंकतात आणि योगी लोक ध्यानयोगाचे द्वारा सतत त्यांचे चिंतन करीत असतात." (३६)

महर्षेर्वचनं श्रुत्वा प्रत्युवाच दशाननः ।
दैत्यदानवरक्षांसि विष्णुना निहतानि च ॥ ३७ ॥

महर्षींचे वचन ऐकल्यावर दशाननाने त्याला म्हटले, " अहो मुनिश्रेष्ठ, विष्णू हे दैत्य, दानव आणि राक्षस यांचा वध करतात. मरणोत्तर त्यांना कोणती गती मिळते?"

कां वा गतिं प्रपद्यन्ते प्रेत्य ते मुनिपुङ्गव ।
तमुवाच मुनिश्रेष्ठो रावणं राक्षसाधिपम् ॥ ३८ ॥

तेव्हा मुनिश्रेष्ठ सनत्कुमार त्या राक्षसराज रावणाला म्हणाले. (३७-३८)

दैवतैर्निहता नित्यं गत्वा स्वर्गमनुत्तमम् ।
भोगक्षये पुनस्तस्माद्भ्रष्टा भूमौ भवन्ति ते ॥ ३९ ॥

पूर्वार्जितैः पुण्यपापैर्म्रियन्ते चोद्भवन्ति च ।
विष्णुना ये हतास्ते तु प्राप्नुवन्ति हरेर्गतिम् ॥ ४० ॥

"सामान्य देवतांकडून ठार झालेले ते दैत्य इत्यादी नेहमी अतिशय उत्तम स्वर्गलोकात जातात आणि नंतर भोगाचा क्षय- काल येताच, त्या स्वर्गातून स्थान भ्रष्ट होऊन, ते पुनः पृथ्वीवर जन्माला येतात. पूर्वजन्मी प्राप्त करून घेतलेल्या पाप- पुण्यानुसार ते पुनः पुनः मरतात आणि पुनः जन्माला येतात. परंतु जे विष्णूंकडून ठार केले जातात, ते मात्र विष्णूंचे स्थान प्राप्त करून घेतात." (३९-४०)

श्रुत्वा मुनिमुखात्सर्वं रावणो हृष्टमानसः ।
योत्स्येऽहं हरिणा सार्धमिति चिन्तापरोऽभवत् ॥ ४१ ॥

मुनींच्या मुखातून ते सर्व ऐकल्यावर, रावणाचे मन आनंदित झाले. 'मी विष्णूंबरोबर युद्ध करीन' असा विचार करण्यात तो मग्न झाला. (४१)

मनःस्थितं परिज्ञाय रावणस्य महामुनिः ।
उवाच वत्स तेऽभीष्टं भविष्यति न संशयः ॥ ४२ ॥

रावणाच्या मनात आलेली गोष्ट जाणून मुनिश्रेष्ठ म्हणाले, "वत्सा, तुझी इच्छा अवश्य सफळ होईल, यात संशय नाही. (४२)

कञ्चित्कालं प्रतीक्षस्व सुखी भव दशानन ।
एवमुक्त्वा महाबाहो मुनिः पुनरुवाच तम् ॥ ४३ ॥

हे दशानना, तू सुखाने राहा. आणि काही काळ तू वाट पाहा." हे महाबाहो रामा, असे सांगून ते मुनी पुनः त्याला म्हणाले. (४३)

तस्य स्वरूपं वक्ष्यामि ह्यरूपस्यापि मायिनः ।
स्थावरेषु च सर्वेषु नदेषु च नदीषु च ॥ ४४ ॥

"अरे रावणा, जरी ते रूपरहित आहेत तरी त्या मायावींचे मायेने धारण केलेले रूप मी तुला वर्णन करून सांगतो. ते सर्व स्थावर पदार्थांत तसेच सर्व नद आणि नद्या यांमध्ये व्याप्त आहे. (४४)

ओङ्कारश्चैव सत्यं च सावित्री पृथिवी च सः ।
समस्तजगदाधारः शेषरूपधरो हि सः ॥ ४५ ॥

तेच ॐकार, सत्य, सावित्री आणि पृथ्वी आहेत. समस्त जगताचा आधार असणाऱ्या शेष नागाचे रूप धारण करणारेही तेच आहेत. (४५)

सर्वे देवाः समुद्राश्च कालः सूर्यश्च चन्द्रमाः ।
सूर्योदयो दिवारात्री यमश्चैव तथानिलः ॥ ४६ ॥

अग्निरिन्द्रस्तथा मृत्युः पर्जन्यो वसवस्तथा ।
ब्रह्मा रुद्रादयश्चैव ये चान्ये देवदानवाः ॥ ४७ ॥

सर्व देव, सर्व समुद्र, काल, सूर्य, चंद्र, सूर्योदय, दिवस, रात्र, यम, वायू, अग्नी, इंद्र, मृत्यू , पर्जन्य, वसू (नावाचे देव), ब्रह्मदेव, रुद्र इत्यादी देव तसेच इतर देव आणि दानव हे सर्व त्या नारायणांचेच रूप आहेत . (४६-४७)

विद्योतते ज्वलत्येष पाति चात्तीति विश्वकृत् ।
क्रीडां करोत्यव्ययात्मा सोऽयं विष्णुः सनातनः॥ ४८ ॥

विश्व निर्माण करणारे विष्णू निर्विकार असूनसुद्धा आपल्या मायेच्या आश्रयाने नाना प्रकारच्या लीला करतात. वीज होऊन ते चमकतात, अग्नी होऊन ते प्रज्वलित होतात विष्णु-रूपाने ते रक्षण करतात आणि रुद्र- रूपाने ते सर्वांचे भक्षण करतात. (४८)

तेन सर्वमिदं व्याप्तं त्रैलोक्यं सचराचरम् ।
नीलोत्पलदलश्यामो विद्युद्वर्णाम्बरावृतः ॥४९ ॥

स्थावर-जंगमात्मक हे सर्व त्रैलोक्य त्यांनी व्यापलेले आहे. नील कमळदळाप्रमाणे ते श्याम वर्णाचे आहेत. विजेच्या वर्णाप्रमाणे असणारा पीतांबर ते परिधान करतात. (४९)

शुद्धजाम्बूनदप्रख्यां श्रियं वामाङ्कसंस्थिताम् ।
सदानपायिनीं देवीं पश्यन्नालिङ्ग्य तिष्ठति ॥ ५० ॥

शुद्ध सोन्याप्रमाणे कांती असणाऱ्या, कधीही नष्ट न होणाऱ्या, आणि डाव्या मांडीवर बसलेल्या लक्ष्मीकडे पाहात पाहात ते तिला आलिंगन देऊन राहातात. (५०)

द्रष्टुं न शक्यते कैश्चिद्देवदानवपन्नगैः ।
यस्य प्रसादं कुरुते स चैनं द्रष्टुमर्हति ॥ ५१ ॥

देव, दानव आणि नाग यांपैकी कोणालाही ते दिसू शकत नाहीत. ते ज्याच्यावर कृपाप्रसाद करतात, तोच माणूस त्यांना पाहू शकतो. (५१)

न च यज्ञतपोभिर्वा न दानाध्ययनादिभिः ।
शक्यते भगवान्द्रष्टुमुपायैरितरैरपि ॥ ५२ ॥

यज्ञ, तप, दान, अध्ययन इत्यादींचे द्वारा किंवा अन्य कोणत्याही उपायांनी भगवान नारायणांना पाहता येत नाही. (५२)

तद्भक्तैस्तद्गतप्राणैस्तच्चित्तैर्धूतकल्मषैः ।
शक्यते भगवान्विष्णुर्वेदान्तामलदृष्टिभिः ॥ ५३ ॥

परंतु जे त्यांचे भक्त आहेत, ज्यांचे प्राण मन त्यांच्या ठिकाणीच लागलेले आहे, ज्यांची पापे धुऊन गेलेली आहेत आणि वेदांताच्या विचाराने ज्यांची दृष्टी निर्मळ झाली आहे, अशा पुरुषांना भगवंतांचे दर्शन होऊ शकते. (५३)

अथवा द्रष्टुमिच्छा ते शृणु त्वं परमेश्वरम् ।
त्रेतायुगे स देवेशो भविता नृपविग्रहः ॥ ५४ ॥

हितार्थं देवमर्त्यानामिक्ष्वाकूणां कुले हरिः ।
रामो दाशरथिर्भूत्वा महासत्त्वपराक्रमः ॥ ५५ ॥

आता हे रावणा, जर तुला (कोणत्याही उपायाविना) त्या परमेश्वराला पाहाण्याची इच्छा असेल, तर तू ऐक. देव आणि मानव यांच्या कल्याणासाठीच ते देवाधिदेव विष्णू त्रेतायुगात इक्ष्वाकू कुलातील दशरथाचे पुत्र बनून श्रीराम या महाबलवान अशा राजाच्या रूपात अवतार घेणार आहेत. (५४-५५)

पितुर्नियोगात्स भ्रात्रा भार्यया दण्डके वने ।
विचरिष्यति धर्मात्मा जगन्मात्रा स्वमायया ॥ ५६ ॥

पित्याच्या आज्ञेनुसार, आपला भाऊ लक्ष्मण आणि जगन्माता व स्वतःची माया अशी जी आपली भार्या सीता यांच्यासह ते धर्मात्मा राम दंडकारण्यात संचार करतील. (५६)

एवं ते सर्वमाख्यातं मया रावण विस्तरात् ।
भजस्व भक्तिभावेन सदा रामं श्रिया युतम् ॥ ५७ ॥

हे रावणा, अशा प्रकारे हे सर्व काही मी तुला विस्ताराने सांगितले आहे. तेव्हा लक्ष्मीने युक्त अशा त्या रामांचे तू सदा भक्तिभावाने भजन कर." (५७)

*अगस्त्य उवाच*

एवं श्रुत्वासुराध्यक्षो ध्यात्वा किञ्चिद्विचार्य च ।
त्वया सह विरोधेप्सुर्मुमुदे रावणो महान् ॥ ५८ ॥

**अगस्त्य म्हणाले**– "असे ऐकल्यावर, असुरराज रावणाने काही वेळ ध्यान-चिंतन केले आणि तुमच्याशी विरोध करावयाचा असा निश्चय करून तो फार आनंदित झाला. (५८)

युद्धार्थी सर्वतो लोकान् पर्यटन् समवस्थितः ।
एतदर्थं महाराज रावणोऽतीव बुद्धिमान् ।
हृतवान् जानकीं देवीं त्वयात्मवधकाङ्क्षया ॥ ५९ ॥

हे महाराज रामा, मग युद्ध करण्याची इच्छा करीत तो सर्व लोकांत सगळीकडे फिरत राहिला आणि याचसाठी तुमच्याकडून आपला वध व्हावा, या इच्छेने त्या अतिशय बुद्धिमान रावणाने जानकी देवीचे अपहरण केले." (५९)

इमां कथां यः शृणुयात्पठेद्वा
संश्रावयेद्वा श्रवणार्थिनां सदा ।
आयुष्यमारोग्यमनन्तसौख्यं
प्राप्नोति लाभं धनमक्षयं च ॥ ६० ॥

ही कथा जो कोणी पुरुष ऐकेल वा वाचेल अथवा श्रवणार्थी माणसांना सदा ऐकवेल तो दीर्घ आयुष्य, आरोग्य, अपरंपार सुख, इष्ट लाभ आणि अक्षय धन प्राप्त करून घेईल. (६०)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

# चतुर्थ सर्ग

## रामराज्याचे वर्णन आणि सीतेचा वनवास

*श्रीमहादेव उवाच*

एकदा ब्रह्मणो लोकादायान्तं नारदं मुनिम् ।
पर्यटन् रावणो लोकान्दृष्ट्वा नत्वाब्रवीद्वचः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**— हे पार्वती, निरनिराळ्या लोकांत फिरत असताना रावणाने एकदा ब्रह्मलोकातून येणाऱ्या नारद मुनींना पाहिले आणि मग त्यांना नमन करून तो म्हणाला. (१)

भगवन्ब्रूहि मे योद्धुं कुत्र सन्ति महाबलाः ।
योद्धुमिच्छामि बलिभिस्त्वं ज्ञातासि जगत्त्रयम् ॥ २ ॥

"हे भगवन, बलवान लोकांबरोबर युद्ध करण्याची माझी इच्छा आहे. तुम्हांला तिन्ही लोकांची ओळख आहे. तेव्हा माझ्याबरोबर लढू शकतील, असे महाबलवान वीर कोठे आहेत, ते मला सांगा." (२)

मुनिर्ध्यात्वाह सुचिरं श्वेतद्वीपनिवासिनः ।
महाबला महाकायास्तत्र याहि महामते ॥ ३ ॥

पुष्कळ वेळ विचार करून मुनी म्हणाले, "हे महाबुद्धिमंता, श्वेतद्वीपात राहाणारे प्राणी महाबलवान आणि प्रचंड शरीराचे आहेत. तेथे तू जा. (३)

विष्णुपूजारता ये वै विष्णुना निहताश्च ये ।
त एव तत्र सञ्जाता अजेयाश्च सुरासुरैः ॥ ४ ॥

जे लोक विष्णूंच्या पूजेत रत आहेत किंवा जे विष्णूंकडून ठार केले गेले आहेत, ते प्राणीच तेथे उत्पन्न झालेले आहेत. देव आणि असुर त्यांना जिंकू शकत नाहीत." (४)

श्रुत्वा तद्रावणो वेगान्मन्त्रिभिः पुष्पकेण तान् ।
योद्धुकामः समागत्य श्वेतद्वीपसमीपतः ॥ ५ ॥

ते ऐकून रावण आपल्या मंत्र्यांसह पुष्पक विमानाने त्यांच्याशी युद्ध करण्याच्या इच्छेने सत्वर श्वेत द्वीपाजवळ गेला. (५)

तत्प्रभाहततेजस्कं पुष्पकं नाचलत्ततः ।
त्यक्त्वा विमानं प्रययौ मन्त्रिणश्च दशाननः ॥ ६ ॥

त्या द्वीपाच्या प्रभेने तेजरहित झालेले ते पुष्पक विमान तेथून पुढे जाऊ शकले नाही. तेव्हा विमान आणि मंत्री यांना तेथेच सोडून देऊन रावण स्वतःच पुढे गेला. (६)

प्रविशन्नेव तद्द्वीपं धृतो हस्तेन योषिता ।
पृष्टश्च त्वं कुतः कोऽसि प्रेषितः केन वा वद ॥ ७ ॥

त्या द्वीपात प्रवेश करताच एका स्त्रीने रावणाला हाताने धरले आणि त्याला विचारले, "तू कोण आहेस ? आणि तुला येथे कोणी पाठविले आहे ? सांग." (७)

इत्युक्तो लीलया स्त्रीभिर्हसन्तीभिः पुनः पुनः ।
कृच्छ्राद्धस्ताद्विनिर्मुक्तस्तासां स्त्रीणां दशाननः ॥ ८ ॥

अशा प्रकारे अन्य अनेक स्त्रियांनी सहजपणे हसत हसत तीच गोष्ट त्याला पुनः पुनः विचारली. तेव्हा रावण मोठ्या कष्टाने त्या स्त्रियांच्या हातांतून निसटला. (८)

आश्चर्यमतुलं लब्ध्वा चिन्तयामास दुर्मतिः ।
विष्णुना निहतो यामि वैकुण्ठमिति निश्चितः ॥ ९ ॥

त्याला अतिशय आश्चर्य वाटले. दुष्ट बुद्धीचा रावण विचार करू लागला. विष्णूंकडून मारला गेल्यास मी निश्चितपणे वैकुंठाला जाईन. (९)

मयि विष्णुर्यथा कुप्येत्तथा कार्यं करोम्यहम् ।
इति निश्चित्य वैदेहीं जहार विपिनेऽसुरः ॥ १० ॥

तेव्हा ज्यामुळे विष्णू माझ्यावर रागावतील, असे काही कार्य मी करेन. असा निश्चय करून त्यासाठी त्या असुर रावणाने वनातून वैदेहीचे अपहरण केले. (१०)

जानन्नेव परात्मानं स जहारावनीसुताम् ।
मातृवत्पालयामास त्वत्तः काङ्क्षन्वधं स्वकम् ॥ ११ ॥

हे रामा, तुमच्या हातून आपला वध व्हावा या इच्छेने, तुम्ही परमात्मा आहात, हे माहीत असूनसुद्धा रावणाने भूमिकन्या सीतेचे अपहरण केले, आणि तिचे आपल्या मातेप्रमाणे पालन केले. (११)

राम त्वं परमेश्वरो ऽसि सकलं
जानासि विज्ञानदृग्
भूतं भव्यमिदं त्रिकालकलना-
साक्षी विकल्पोज्झितः ।
भक्तानामनुवर्तनाय सकलां
कुर्वन् क्रियासंहतिं
त्वं शृण्वन्मनुजाकृतिर्मुनिवचो
भासीश लोकार्चितः ॥ १२ ॥

हे रामा, तुम्ही परमेश्वर आहात. तुम्ही विकल्पांनी रहित आणि तिन्ही काळांत घडणाऱ्या गोष्टींचे साक्षी आहात. तुम्ही आपल्या विज्ञान-दृष्टीने भूत, भविष्य आणि वर्तमान कालातील सर्व काही जाणता. हे ईश्वरा, भक्तांना मार्ग दाखविण्यासाठी तुम्ही सर्व लीला करता, तसेच सर्व लोकांकडून पूजिले जाणारे तुम्ही मनुष्यरूपात माझ्यासारख्या मुनीचे वचन ऐकता, असे वाटते." (१२)

स्तुत्वैवं राघवं तेन पूजितः कुम्भसम्भवः ।
स्वाश्रमं मुनिभिः सार्धं प्रययौ हृष्टमानसः ॥ १३ ॥

अशा प्रकारे राघवांची स्तुती केली. श्रीरामांनी त्यांचा सत्कार केला. मग अगस्त्य आनंदित मनाने इतर मुनींसह स्वतःच्या आश्रमाकडे निघून गेले. (१३)

रामस्तु सीतया सार्धं भ्रातृभिः सह मन्त्रिभिः ।
संसारीव रमानाथो रममाणोऽवसद्गृहे ॥ १४ ॥

त्यानंतर सीता, बंधू आणि मंत्री यांच्यासह ते लक्ष्मीपती राम एखाद्या संसारी माणसाप्रमाणे घरात रममाण होत राहू लागले. (१४)

अनासक्तोऽपि विषयान्बुभुजे प्रियया सह ।
हनुमत्प्रमुखैः सद्भिर्वानरैः परिवेष्टितः ॥ १५ ॥

जरी ते अनासक्त होते, तरी आपल्या प्रिय पत्नीबरोबर ते विषयांचा भोग घेत असत. ते नेहमी हनुमानादी वानरांसमवेत असत. (१५)

पुष्पकं चागमद्राममेकदा पूर्ववत्प्रभुम् ।
प्राह देव कुबेरेण प्रेषितं त्वामहं ततः ॥ १६ ॥

एकदा पुष्पक विमान पूर्वीप्रमाणे प्रभू रामांजवळ आले आणि त्यांना म्हणाले, "हे देवा, कुबेराने मला पुनः तुमच्या सेवेसाठी पाठविले आहे. (१६)

जितं त्वं रावणेनादौ पश्चाद्रामेण निर्जितम् ।
अतस्त्वं राघवं नित्यं वह यावद्वसेद्भुवि ॥ १७ ॥

कुबेराने मला सांगितले आहे की प्रथम तुला रावणाने जिंकले होते. नंतर तुला रामांनी जिंकले. म्हणून जोपर्यंत श्रीराम भूलोकावर असतील, तोपर्यंत तू नित्य त्यांना वाहून नेत जा. (१७)

यदा गच्छेद्रघुश्रेष्ठो वैकुण्ठं याहि मां तदा ।
तच्छ्रुत्वा राघवः प्राह पुष्पकं सूर्यसन्निभम् ॥ १८ ॥

रघुश्रेष्ठ जेव्हा वैकुंठाला परत जातील, तेव्हा तू माझ्याकडे परत ये." ते ऐकल्यावर सूर्याप्रमाणे देदीप्यमान असणाऱ्या पुष्पकाला राघव म्हणाले. (१८)

यदा स्मरामि भद्रं ते तदागच्छ ममान्तिकम् ।
तिष्ठान्तर्धाय सर्वत्र गच्छेदानीं ममाज्ञया ॥ १९ ॥

"तुझे कल्याण असो. जेव्हा तुझे स्मरण करीन, तेव्हा तू माझ्याजवळ ये. आता तू जा आणि माझ्या आज्ञेने गुप्तरूपाने सर्वत्र राहा." (१९)

इत्युक्त्वा रामचन्द्रोऽपि पौरकार्याणि सर्वशः ।
भ्रातृभिर्मन्त्रिभिः सार्धं यथान्यायं चकार सः ॥ २० ॥

अशा प्रकारे पुष्पकाला सांगून श्रीरामचंद्र आपले भाऊ आणि मंत्री यांच्यासह नगरवासियांची सर्व कार्ये योग्य रीतीने करू लागले. (२०)

राघवे शासति भुवं लोकनाथे रमापतौ ।
वसुधा सस्यसम्पन्ना फलवन्तश्च भूरुहाः ॥ २१ ॥

तीन लोकांचे स्वामी असे लक्ष्मीपती राघव पृथ्वीचे पालन करीत असताना, वसुधा धनधान्याने संपन्न झाली आणि वृक्ष फळांनी लगडून गेले. (२१)

जना धर्मपराः सर्वे पतिभक्तिपराः स्त्रियः ।
नापश्यत्पुत्रमरणं कश्चिद्राजनि राघवे ॥ २२ ॥

राघव राज्य करीत होते, तेव्हा सर्व लोक धर्म - परायण झाले, स्त्रिया पति-भक्ति-परायण बनल्या आणि कुणालाही आपल्या पुत्राचे मरण पाहावे लागले नाही. (२२)

समारुह्य विमानाग्र्यं राघवः सीतया सह ।
वानरैर्भ्रातृभिः सार्धं सञ्चचारावनिं प्रभुः ॥ २३ ॥

कधी प्रभू राघव सीता, वानर आणि बंधू यांच्या सह श्रेष्ठ पुष्पक विमानात आरोहण करून पृथ्वीवर संचार करीत. (२३)

अमानुषाणि कार्याणि चकार बहुशो भुवि ।
ब्राह्मणस्य सुतं दृष्ट्वा बालं मृतमकालतः ॥ २४ ॥

शोचन्तं ब्राह्मणं चापि ज्ञात्वा रामो महामतिः ।
तपस्यन्तं वने शूद्रं हत्वा ब्राह्मणबालकम् ॥ २५ ॥

जीवयामास शूद्रस्य ददौ स्वर्गमनुत्तमम् ।
लोकानामुपदेशार्थं परमात्मा रघूत्तमः ॥ २६ ॥

कोटिशः स्थापयामास शिवलिङ्गानि सर्वशः ।
सीतां च रमयामास सर्वभोगैरमानुषैः ॥ २७ ॥

या पृथ्वीवर त्यांनी पुष्कळ अमानवी लीला केल्या. एका ब्राह्मणाचा लहान पुत्र अकाली मरण पावला. तो ब्राह्मण फार शोक करीत आहे, हे जाणून महाबुद्धिमान रामांनी वनात तप करणाऱ्या शूद्राला ठार केले आणि त्या ब्राह्मण बालकाला जिवंत केले. त्या शूद्राला अतिशय उत्तम स्वर्ग दिला. लोकांना मार्गदर्शन करण्यासाठी परमात्मा रघूत्तमांनी सर्वत्र कोट्यवधी शिवलिंगांची स्थापना केली. तसेच सर्व अलौकिक भोगांनी ते सीतेला सर्व प्रकारे रमवीत असत. (२४-२७)

शशास रामो धर्मेण राज्यं परमधर्मवित् ।
कथां संस्थापयामास सर्वलोकमलापहाम् ॥ २८ ॥

श्रेष्ठ धर्म जाणणाऱ्या रामांनी धर्मानुसार शासन केले. सर्व लोकांचे पाप दूर करणारी आपली कथा त्यांनी जगात स्थापन केली. (२८)

दशवर्षसहस्राणि मायामानुषविग्रहः ।
चकार राज्यं विधिवल्लोकवन्द्यपदाम्बुजः ॥ २९ ॥

ज्यांच्या पदकमळांना तिन्ही लोक वंदन करीत होते, अशा त्या माया-मानव-रूप-धारी रामांनी दहा हजार वर्षे न्यायाने राज्य केले. (२९)

एकपत्नीव्रतो रामो राजर्षिः सर्वदा शुचिः ।
गृहमेधीयमखिलमाचरन् शिक्षयन् जनान् ॥ ३० ॥

सर्वदा शुद्ध असणारे राजर्षी व एकपत्नीव्रत पाळणारे श्रीराम हे लोकशिक्षणासाठी गृहस्थाश्रमातील सर्व धर्मांचे पालन करीत होते. (३०)

सीता प्रेम्णानुवृत्त्या च प्रश्रयेण दमेन च ।
भर्तुर्मनोहरा साध्वी भावज्ञा सा ह्रिया भिया ॥ ३१ ॥

पतीच्या मनाचा कल जाणणाऱ्या पतिव्रता सीतेने आपल्या प्रेमाने, आज्ञापालनाने, नम्रतेने, इंद्रियसंयमाने, लज्जेने आणि भीतीने पतीचे मन हरण करून घेतले होते. (३१)

एकदाक्रीडविपिने सर्वभोगसमन्विते ।
एकान्ते दिव्यभवने सुखासीनं रघूत्तमम् ॥ ३२ ॥

नीलमाणिक्यसंकाशं दिव्याभरणभूषितम् ।
प्रसन्नवदनं शान्तं विद्युत्पुञ्जनिभाम्बरम् ॥ ३३ ॥

सीता कमलपत्राक्षी सर्वाभरणभूषिता ।
राममाह कराभ्यां सा लालयन्ती पदाम्बुजे ॥ ३४ ॥

एकदा क्रीडावनातील एकांत स्थानी असणाऱ्या, सर्व भोग-साधनांनी संपन्न असणाऱ्या, दिव्य मंदिरात श्रीराम सुखाने बसलेले होते. त्यांची कांती नीलमण्याच्या वर्णाची होती. ते दिव्य अलंकारांनी विभूषित होते. त्यांचे मुख प्रसन्न होते. ते भाव गंभीर होते. विजेप्रमाणे त्यांचा पीतांबर तेजस्वी होता. त्या वेळी कमलपत्रनयना, सर्व अलंकारांनी विभूषित आणि आपल्या दोन्ही हातांनी श्रीरामांची चरणकमळे चेपणारी सीता श्रीरामांना म्हणाली. (३२-३४)

देवदेव जगन्नाथ परमात्मन्सनातन ।
चिदानन्दादिमध्यान्तरहिताशेषकारण ॥ ३५ ॥

देव देवाः समासाद्य मामेकान्तेऽब्रुवन्वचः ।
बहुशोऽर्थयमानास्ते वैकुण्ठागमनं प्रति ॥ ३६ ॥

"हे देवाधिदेवा, हे जगन्नाथा, हे सनातन परमात्मा, हे चिदानंद स्वरूपा, हे आदि-मध्य-अंत यांनी रहित असणाऱ्या, हे सर्वांचे कारण असणाऱ्या देवा, काही काळा पूर्वी देवांनी माझ्याजवळ येऊन, एकांतात पुष्कळ प्रकारे माझी प्रार्थना करून तुमच्या वैकुंठ-गमनाबाबत विचारले. (३५-३६)

त्वया समेतश्चिच्छक्त्या रामस्तिष्ठति भूतले ।
विसृज्यास्मान्स्वकं धाम वैकुण्ठं च सनातनम् ॥ ३७॥

ते म्हणाले, 'चित्- शक्ती असलेल्या तुमच्यासह राम आम्हांला सोडून आणि वैकुंठ हे स्वत:चे निवास- स्थान सोडून पृथ्वीतलावर राहात आहेत. (३७)

आस्ते त्वया जगद्धात्रि रामः कमललोचनः ।
अग्रतो याहि वैकुण्ठं तथा चेद्रघूत्तमः ॥ ३८॥

आगमिष्यति वैकुण्ठं त्व सनाथान्नः करिष्यति ।
इति विज्ञापिताहं तैर्मया विज्ञापितो भवान् ॥ ३९॥

हे जगद्-धात्री, तुमच्यामुळे कमललोचन राम भूतलावर राहात आहेत. तेव्हा जर तुम्ही प्रथम वैकुंठाला निघून याल तर रघूत्तम तुमच्याप्रमाणेच वैकुंठात परत येतील आणि आम्हांला सनाथ करतील.' अशा प्रकारे देवांनी माझी प्रार्थना केली. ते मी आत्ता तुम्हांला सांगत आहे. (३८-३९)

यद्युक्तं तत्कुरुष्वाद्य नाहमाज्ञापये प्रभो ।
सीतायास्तद्वचः श्रुत्वा रामो ध्यात्वाब्रवीत्क्षणम् ॥४०॥

हे प्रभो, मी काही आज्ञा करीत नाही. पण जे युक्त असेल ते तुम्ही आता करा." सीतेचे वचन ऐकल्यावर, क्षणभर विचार करून राम म्हणाले. (४०)

देवि जानामि सकलं तत्रोपायं वदामि ते ।
कल्पयित्वा मिषं देवि लोकवादं त्वदाश्रयम् ॥ ४१॥

त्यजामि त्वां वने लोकवादाद्भीत इवापरः ।
भविष्यतः कुमारौ द्वौ वाल्मीकेराश्रमान्तिके ॥ ४२॥

"हे देवी, मला हे सर्व माहीत आहे. त्या संदर्भात मी आता तुला एक उपाय सांगतो. हे देवी, तुझ्याविषयी लोकापवाद निर्माण झाला आहे असे निमित्त करून, लोकापवादाला भिणाऱ्या एकाद्या सामान्य माणसाप्रमाणे, मी तुला वनात वाल्मीकींच्या आश्रमाजवळ सोडतो. तेथे तुला दोन पुत्र होतील. (४१-४२)

इदानीं दृश्यते गर्भः पुनरागत्य मेऽन्तिकम् ।
लोकानां प्रत्ययार्थं त्वं कृत्वा शपथमादरात् ॥ ४३॥

भूमेर्विवरमात्रेण वैकुण्ठं यास्यसि द्रुतम् ।
पश्चादहं गमिष्यामि एष एव सुनिश्चयः ॥ ४४॥

आत्ता तुझ्या ठिकाणी गर्भावस्थेची लक्षणे दिसून येत आहेत. (मग पुत्र जन्माला आल्यानंतर) तू पुन: माझ्याजवळ ये आणि लोकांची खात्री पटावी म्हणून आदरपूर्वक शपथ घेऊन, मग दुभंगलेल्या धरणीच्या विवरातून तू लगेच वैकुंठाला जा. त्यानंतर मीसुद्धा वैकुंठात येईन. असे मी पक्के ठरविले आहे." (४३-४४)

इत्युक्त्वा तां विसृज्याथ रामो ज्ञानैकलक्षणः ।
मन्त्रिभिर्मन्त्रतत्त्वज्ञैर्बलमुख्यैश्च संवृतः ॥ ४५॥

तत्रोपविष्टं श्रीरामं सुहृदः पर्युपासत ।
हास्यप्रौढकथासुज्ञा हासयन्तः स्थिता हरिम् ॥ ४६॥

तिला असे सांगून, ज्ञान हेच स्वरूप असणाऱ्या श्रीरामांनी तिला अंत:पुरात पाठवून दिले. नीति-शास्त्राचे तत्त्व जाणणारे मंत्री आणि मुख्य सेनापतींच्या समवेत श्रीराम एकदा राजसभेत बसले होते. सुहृदगण त्यांची सेवा करीत होते. भरपूर हास्य निर्माण करणाऱ्या कथा जाणणारे विदूषक श्रीरामांना हसवीत होते. (४५-४६)

कथाप्रसङ्गात्पप्रच्छ रामो विजयनामकम् ।
पौरा जानपदा मे किं वदन्तीह शुभाशुभम् ॥ ४७॥

सीतां वा मातरं वा मे भ्रातृन्वा कैकयीमथ ।
न भेतव्यं त्वया ब्रूहि शापितोऽसि ममोपरि ॥ ४८॥

बोलता बोलता रामांनी विजय नावाच्या एका दूताला विचारले, "मी, सीता, माझी माता, माझे भाऊ तसेच कैकेयी यांच्या बाबतीत नगरवासी तसेच ग्रामवासी लोक बरे-वाईट काय बोलत असतात ? तुला माझी शपथ आहे. तू सत्य सांग. मुळीच घाबरू नकोस." (४७-४८)

इत्युक्तः प्राह विजयो देव सर्वे वदन्ति ते ।
कृतं सुदुष्करं सर्वं रामेण विदितात्मना ॥ ४९॥

रामांनी असे विचारल्यावर विजय म्हणाला, "महाराज, सर्व लोक असे म्हणतात की आत्मज्ञानसंपन्न अशा रामांनी अतिशय दुष्कर असे कार्य केले आहे. (४९)

किन्तु हत्वा दशग्रीवं सीतामाहृत्य राघवः ।
अमर्षं पृष्ठतः कृत्वा स्वं वेश्म प्रत्यपादयत् ॥ ५० ॥

तथापि रावणाला मारल्यावर, सीतेविषयी काही शंका न घेता तिला परत आणले व त्यांनी आपल्या घरी ठेवले (हे मात्र योग्य केले नाही). (५०)

कीदृशं हृदये तस्य सीतासम्भोगजं सुखम् ।
या हृता विजनेऽरण्ये रावणेन दुरात्मना ॥ ५१ ॥

निर्जन अरण्यात दुरात्म्या रावणाने जिचे अपहरण केले होते त्या सीतेच्या सहवासात रामांना कसले बरे सुख मिळत असणार ? (५१)

अस्माकमपि दुष्कर्म योषितां मर्षणं भवेत् ।
यादृग् भवति वै राजा तादृश्यो नियतं प्रजाः ॥ ५२ ॥

अशा स्थितीत आम्हांला आमच्या बायकांचे दुष्कर्म सहन करावे लागेल. कारण जसा राजा असतो, तशा प्रकारची प्रजा निश्चितपणे असते." (५२)

श्रुत्वा तद्वचनं रामः स्वजनान्पर्यपृच्छत ।
तेऽपि नत्वाब्रुवन् राममेवमेतन्न संशयः ॥ ५३ ॥

त्याचे ते वचन ऐकल्यावर रामांनी आपल्या स्वजनांकडे त्या बाबतीत पृच्छा केली. रामांना नमस्कार करून तेसुद्धा म्हणाले, "रामा, हे असेच आहे खरे, यात संशय नाही." (५३)

ततो विसृज्य सचिवान्विजयं सुहृदस्तथा ।
आहूय लक्ष्मणं रामो वचनं चेदमब्रवीत् ॥ ५४ ॥

तेव्हा सचिव, विजय आणि आपले सुहृद यांना श्रीरामांनी निरोप दिला आणि लक्ष्मणाला बोलावून घेऊन राम त्याला म्हणाले. (५४)

लोकापवादस्तु महान्सीतामाश्रित्य मेऽभवत् ।
सीतां प्रातः समानीय वाल्मीकेराश्रमान्तिके ॥ ५५ ॥

त्यक्त्वा शीघ्रं रथेन त्वं पुनरायाहि लक्ष्मण ।
वक्ष्यसे यदि वा किञ्चित्तदा मां हतवानसि ॥ ५६ ॥

"अरे लक्ष्मणा, सीतेमुळे माझ्यावर फार मोठा लोकापवाद आला आहे. तेव्हा उद्या सकाळी सीतेला रथात बसवून लगेच तिला वाल्मीकी-आश्रमाजवळ सोडून परत ये. या बाबतीत जर काही बोलशील तर मला मरणप्राय दुःख होईल." (५५-५६)

इत्युक्तो लक्ष्मणो भीत्या प्रातरुत्थाय जानकीम् ।
सुमन्त्रेण रथे कृत्वा जगाम सहसा वनम् ॥ ५७ ॥

श्रीरामांनी असे सांगितल्यावर, लक्ष्मणाला भीती वाटली. सकाळी उठल्यावर सुमंत्राने सज्ज केलेल्या रथात जानकीला बसवून लक्ष्मण त्वरित वनाकडे निघून गेला. (५७)

वाल्मीकेराश्रमस्यान्ते त्यक्त्वा सीतामुवाच सः ।
लोकापवादभीत्या त्वां त्यक्तवान् राघवो वने ॥ ५८ ॥

वाल्मीकींच्या आश्रमाजवळ सीतेला सोडून तो तिला म्हणाला, "लोकापवादाच्या भीतीमुळे राघवांनी तुला वनात सोडून दिले आहे. (५८)

दोषो न कश्चिन्मे मातर्गच्छाश्रमपदं मुनेः ।
इत्युक्त्वा लक्ष्मणः शीघ्रं गतवान् रामसन्निधिम् ॥ ५९ ॥

हे माते, यात माझा काही दोष नाही. तू वाल्मीकीच्या आश्रमस्थानी जा." असे सीतेला सांगून लक्ष्मण रामांजवळ शीघ्र परत आला. (५९)

सीतापि दुःखसन्तप्ता विललापातिमुग्धवत् ।
शिष्यैःश्रुत्वाच वाल्मीकिःसीतां ज्ञात्वा स दिव्यदृक् ॥ ६० ॥

अर्घ्यादिभिः पूजयित्वा समाश्वास्य च जानकीम् ।
ज्ञात्वा भविष्यं सकलामर्पयन्मुनियोषिताम् ॥ ६१ ॥

दुःखाने संत्रस्त होऊन सीतासुद्धा एखाद्या अतिशय भोळ्या स्त्रीप्रमाणे विलाप करू लागली. एक स्त्री रडत आहे, असे शिष्यांच्या कडून ऐकल्यावर, ती स्त्री सीता आहे असे वाल्मीकींनी दिव्य दृष्टीने जाणले. भविष्यात काय होणार आहे, हे सर्व त्यांना माहीत होते. त्यांनी अर्घ्य इत्यादींनी जानकीचा सत्कार केला आणि तिचे सांत्वन केले आणि त्यांनी तिला मुनि-पत्नींच्या स्वाधीन केले. (६०-६१)

तास्तां सम्पूजयन्ति स्म सीतां भक्त्या दिने दिने ।
ज्ञात्वा परात्मनो लक्ष्मीं मुनिवाक्येन योषित: ।
सेवां चक्रु: सदा तस्या विनयादिभिरादरात् ॥ ६२ ॥

वाल्मीकी मुनींच्या सांगण्यावरून सीता ही साक्षात परमात्म्याची लक्ष्मी आहे, असे कळल्यावर, त्या मुनिस्त्रिया दररोज भक्तीने सीतेची पूजा करीत. तसेच आदरपूर्वक विनय इत्यादी दाखवून सतत तिची सेवा करीत. (६२)

रामोऽपि सीतारहित: परात्मा
विज्ञानदृक्केवल आदिदेव: ।
सन्त्यज्य भोगानखिलान्विरक्तो
मुनिव्रतोऽभून्मुनिसेविताङ्घ्रि: ॥ ६३ ॥

खरे म्हणजे राम हे परमात्मा, विज्ञानदृष्टी असणारे, केवळ एकमेवाद्वितीय, आदिदेव होते. मुनिजन त्यांच्या चरणांची सेवा करीत. पण सीतारहित झालेल्या श्रीरामांनी सर्व भोग सोडून दिले. ते विरक्त झाले आणि मुनिव्रताचे आचरण करून राहू लागले. (६३)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकाण्डे चतुर्थ: सर्ग: ॥ ४ ॥

# पञ्चम सर्ग

## श्रीरामगीता

*श्रीमहादेव उवाच*

ततो जगन्मङ्गलमङ्गलात्मना
विधाय रामायणकीर्तिमुत्तमाम् ।
चचार पूर्वाचरितं रघूत्तमो
राजर्षिवर्यैरभिसेवितं यथा ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, सीतेच्या त्यागानंतर जगाच्या कल्याणासाठी धारण केलेल्या आपल्या मंगल देहाने रामायणरूपी उत्तम कीर्ती स्थापन करून, पूर्वीच्या श्रेष्ठ राजर्षींच्याप्रमाणे श्रीराम स्वत:चे आचरण करू लागले. (१)

सौमित्रिणा पृष्ट उदारबुद्धिना
राम: कथा: प्राह पुरातनी: शुभा: ।
राज्ञ: प्रमत्तस्य नृगस्य शापतो
द्विजस्य तिर्यक्त्वमथाह राघव: ॥ २ ॥

उदारबुद्धी लक्ष्मणाने कधी विचारले तर राम त्याला प्राचीन पुण्य- कथा सांगत असत. अपराध करणाऱ्या नृग राजाला एका ब्राह्मणाच्या शापाने तिर्यक् योनी प्राप्त झाली, ही कथा एकदा रामांनी सांगितली. (२)

कदाचिदेकान्त उपस्थितं प्रभुं
रामं रमालालितपादपङ्कजम् ।
सौमित्रिरासादितशुद्धभावन:
प्रणम्य भक्त्या विनयान्वितोऽब्रवीत् ॥ ३ ॥

ज्यांच्या चरण कमळांची सेवा लक्ष्मी करीत असे ते प्रभू राम एकदा एकांत स्थानी बसले होते. त्यावेळी शुद्ध मनाचा लक्ष्मण त्यांच्याजवळ आला, आणि प्रणाम करून, नम्रपणे भक्तिपूर्वक म्हणाला. (३)

त्वं शुद्धबोधोऽसि हि सर्वदेहिना-
मात्मास्यधीशोऽसि निराकृति: स्वयम् ।
प्रतीयसे ज्ञानदृशां महामते
पादाब्जभृङ्गाहितसङ्गसङ्गिनाम् ॥ ४ ॥

"हे महाबुद्धिमंता, तुम्ही ज्ञानस्वरूप आहात. सर्व देहधारी प्राण्यांचे आत्मा तुम्ही आहात. तुम्ही स्वत: निराकार असूनही सर्वांचे नियंते आहात. तुमच्या चरणकमळांच्या ठिकाणी असणाऱ्या व ज्ञानदृष्टी प्राप्त झालेल्या लोकांनाच तुम्ही प्रतीत होता. (४)

अहं प्रपन्नोऽस्मि पदाम्बुजं प्रभो
भवापवर्गं तव योगिभावितम् ।
यथाञ्जसाज्ञानमपारवारिधिं
सुखं तरिष्यामि तथानुशाधि माम् ॥ ५ ॥

हे प्रभो, तुमचे जे चरण संसाराची निवृत्ती करतात आणि योगी लोक ज्यांचे ध्यान करतात त्या तुमच्या चरणी मी शरण आलो आहे. मी अज्ञानरूपी अपार सागर सुखाने व सहजपणे तरून जाईन, असा उपदेश तुम्ही मला करा. (५)

श्रुत्वाथ सौमित्रिवचोऽखिलं तदा
प्राह प्रपन्नार्तिहरः प्रसन्नधीः ।
विज्ञानमज्ञानतमः प्रशान्तये
श्रुतिप्रपन्नं * क्षितिपालभूषणः ॥ ६ ॥

लक्ष्मणाचे म्हणणे ऐकल्यावर, शरणागतांचे दुःख दूर करणारे प्रभू राम हे मनामध्ये प्रसन्न झाले. मग अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करण्यासाठी, श्रुतीने सांगितलेले आत्मज्ञान त्या राजशिरोमणी श्रीरामांनी लक्ष्मणास सांगण्यास सुरुवात केली. (६)

आदौ स्ववर्णाश्रमवर्णिताः क्रियाः
कृत्वा समासादितशुद्धमानसः ।
समाप्य तत्पूर्वमुपात्तसाधनः
समाश्रयेत्सद्गुरुमात्मलब्धये ॥ ७ ॥

प्रभू राम म्हणाले की, "सर्वात प्रथम आपापला वर्ण आणि आश्रम यासाठी शास्त्राने वर्णन केलेली कर्मे यथायोग्यपणे केल्यावर चित्ताची शुद्धी होते. चित्त शुद्ध झाल्यावर ती कर्मे सोडून द्यावीत, तत्पूर्वी शम, दम इत्यादी साधनांनी संपन्न होऊन, आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी माणसाने सद्गुरूंचा आश्रय घ्यावा. (७)

क्रिया शरीरोद्भवहेतुरादृता
प्रियाप्रियौ तौ भवतः सुरागिणः ।
धर्मेतरौ तत्र पुनः शरीरकं
पुनः क्रिया चक्रवदीर्यते भवः ॥ ८ ॥

कर्म हेच पुनर्जन्माच्या प्राप्तीचे कारण आहे, असेच महात्म्याचे मत आहे. कारण कर्मांबद्दल फार आसक्ती बाळगणाऱ्या माणसाच्या बाबतीत इष्ट आणि अनिष्ट अशा क्रिया घडत असतात. त्या कर्मांमुळे धर्म व अधर्म घडतात, त्यामुळे पुनः शरीर प्राप्त होते; मग पुनः कर्मे घडतात, आणि अशा प्रकारे कर्मांपासून जन्म आणि जन्मामध्ये पुनः कर्म असा चक्राप्रमाणे हा संसार फिरत राहातो. (८)

अज्ञानमेवास्य हि मूलकारणं
तद्धानमेवात्र विधौ विधीयते ।
विद्यैव तन्नाशविधौ पटीयसी
न कर्म तज्जं सविरोधमीरितम् ॥ ९ ॥

अज्ञान हेच या संसाराचे मूळ कारण आहे. आणि त्या अज्ञानाचा नाश हाच संसारातून सुटण्याचा उपाय म्हणून शास्त्रात सांगितला आहे. अज्ञानाचा नाश करण्यास ज्ञान हेच समर्थ साधन आहे. त्या अज्ञानातून उत्पन्न होणारे कर्म अज्ञानाचा नाश करण्यास समर्थ नसते. (९)

नाज्ञानहानिर्न च रागसंक्षयो
भवेत्ततः कर्म सदोषमुद्भवेत् ।
ततः पुनः संसृतिरप्यवारिता
तस्माद्बुधो ज्ञानविचारवान्भवेत् ॥ १० ॥

सकाम कर्मामुळे अज्ञानाचा नाश होत नाही, तसेच आसक्तीचा नाश होत नाही. उलट त्या कर्मांपासून नवीन दोषयुक्त कर्म उत्पन्न होते आणि मग त्या नवीन कर्मांपासून संसाराची प्राप्ती होणे हे अनिवार्य ठरते. म्हणून शहाण्या माणसाने ज्ञान प्राप्त करून घेण्याचा विचार करावयास हवा. (१०)

ननु क्रिया वेदमुखेन चोदिता
तथैव विद्या पुरुषार्थसाधनम् ।
कर्तव्यता प्राणभृतः प्रचोदिता
विद्यासहायत्वमुपैति सा पुनः ॥ ११ ॥

काही लोक असेही म्हणतात की ज्या प्रमाणे वेदाने ज्ञान हे पुरुषार्थाचे साधन म्हणून सांगितले आहे, त्या प्रमाणेच माणसाला कर्म हे आवश्यक कर्तव्य आहे, असेही सांगितले आहे. म्हणून ते ज्ञानाला सहाय्यभूत ठरते. (११)

कर्माकृतौ दोषमपि श्रुतिर्जगौ
तस्मात्सदा कार्यमिदं मुमुक्षुणा ।
ननु स्वतन्त्रा ध्रुवकार्यकारिणी
विद्या न किञ्चिन्मनसाप्यपेक्षते ॥ १२ ॥

तसेच कर्म न केल्यास दोष उत्पन्न होतो, असे सुद्धा श्रुतीने सांगितले आहे. म्हणून मुमुक्षूने सदा कर्म करीत राहावयास हवे. आता जर कुणी असे म्हणेल की ज्ञान कर्मनिरपेक्ष आहे आणि निश्चितपणे आहे आणि म्हणून

१ श्रुतिप्रपन्न हे लक्ष्मणाचे विशेषण घेतल्यास, ऐकण्यास उत्सुक असणाऱ्या लक्ष्मणाला असा अर्थ होईल.

न सत्यकार्योऽपि हि यद्वदध्वरः
प्रकाङ्क्षतेऽन्यानपि कारकादिकान् ।
तथैव विद्या विधितः प्रकाशितै-
र्विशिष्यते कर्मभिरेव मुक्तये ॥ १३ ॥

मनानेसुद्धा मुमुक्षूला कर्माची अपेक्षा असत नाही. परंतु असे म्हणणे योग्य नाही. कारण वेदोक्त यज्ञ हा स्थिर कर्म असला तरीसुद्धा ज्या प्रमाणे त्याला अन्य कारक इत्यादींची अपेक्षा असते, त्या प्रमाणे वेदाने सांगितलेल्या कर्मांनी युक्त ज्ञानच मोक्षाला कारणीभूत होते.(म्हणून कर्मांचा त्याग करणे, हे मुळीच योग्य नव्हे. (१२- १३)

केचिद्वदन्तीति वितर्कवादिन-
स्तदप्यसद्दृष्टविरोधकारणात् ।
देहाभिमानादभिवर्धते क्रिया
विद्या गताहङ्कृतितः प्रसिद्ध्यति ॥ १४ ॥

तेव्हा ज्ञानासाठी कर्म आवश्यक आहे, असा चुकीचा अर्थ करणारे काही लोक जे म्हणतात, तेसुद्धा खोटे आहे. कारण तेथे प्रत्यक्ष विरोध येतो. म्हणजेच देहाचा अभिमान असेल तर कर्म घडते आणि अहंकाराचा नाश झाला तरच ज्ञान प्राप्त होते. (१४)

विशुद्धविज्ञानविरोचनाञ्चिता
विद्यात्मवृत्तिश्चरमेति भण्यते ।
उदेति कर्माखिलकारकादिभि-
र्निहन्ति विद्याखिलकारकादिकम् ॥ १५ ॥

(वेदांत वाक्यांच्या विचारामुळे) विशुद्ध विज्ञानाच्या प्रकाशाने युक्त अशी जी मनाची अंतिम वृत्ती, तीच विद्या. तिलाच आत्मज्ञान असे म्हटले जाते. उलट सर्व कारक इत्यादींच्या द्वारा कर्म होत असते. तर विद्या सर्व कारक इत्यादी अनित्य आहे, असे सांगून त्यांचा नाश करून टाकते. (१५)

तस्मात्त्यजेत्कार्यमशेषतः सुधी-
र्विद्याविरोधान्न समुच्चयो भवेत् ।
आत्मानुसन्धानपरायणः सदा
निवृत्तसर्वेन्द्रियवृत्तिगोचरः ॥ १६ ॥

म्हणून सर्व इंद्रियांच्या वृत्तींचे जे विषय त्या विषयांपासून निवृत्त होऊन आत्म्याच्या निरंतर अनुसंधानास लागलेल्या बुद्धिमान पुरुषाने सर्व कर्मे संपूर्णपणे टाकून द्यावीत. कारण कर्म हे विद्येला विरोधी असल्याने विद्या आणि कर्म यांचा समुच्चय कधीही होऊ शकत नाही. (१६)

यावच्छरीरादिषु माययात्मधी-
स्तावद्विधेयो विधिवादकर्मणाम् ।
नेतीति वाक्यैरखिलं निषिध्य त-
ज्ज्ञात्वा परात्मानमथ त्यजेत्क्रियाः ॥ १७ ॥

मायेने मोहित झालेला माणूस जोपर्यंत शरीर इत्यादी अनात्म गोष्टींना आत्मा आहेत अशी बुद्धी ठेवतो, तोपर्यंतच त्याला वेदांनी विहित केलेली कर्मे करावी लागतात. उपनिषदातील 'नेति नेति' इत्यादी वाक्यांनी त्या सर्व अनात्म वस्तूंचा निषेध करून आणि त्यांचेपेक्षा परमात्मा वेगळा आहे, असे त्या परमात्म्याचे स्वरूप जाणून घेतल्यावर, मुमुक्षूने सर्व कर्मांचा त्याग करावा हवा. (१७)

यदा परात्मात्मविभेदभेदकं
विज्ञानमात्मन्यवभाति भास्वरम् ।
तदैव माया प्रविलीयतेऽञ्जसा
सकारका कारणमात्मसंसृतेः ॥ १८ ॥

श्रुतिप्रमाणाभिविनाशिता च सा
कथं भविष्यत्यपि कार्यकारिणी ।
विज्ञानमात्रादमलाद्वितीयत-
स्तस्मादविद्या न पुनर्भविष्यति ॥ १९ ॥

परमात्मा आणि जीवात्मा यांमध्ये जो भेद मानला जातो त्याचा नाश करणारे प्रकाशमय विज्ञान जेव्हा अंत:करणात स्पष्टपणे विलसू लागते, तेव्हाच जीवात्म्याच्या संसाराला कारणरूप असणारी माया (अविद्या) सहजपणे आपल्या कारकांसह लयाला जाते. वेद-प्रमाणाने उत्पन्न झालेल्या ज्ञानाने पूर्णपणे नष्ट झालेली माया पुन: जीवासाठी संसार कसा निर्माण करील ? कारण शुद्ध आणि अद्वितीय अशा परमात्म्याचे विज्ञान झाल्यानंतर पुन: अविद्या उत्पन्न होऊ शकत नाही. (१८-१९)

यदि स्म नष्टा न पुनः प्रसूयते
कर्ताहमस्येति मतिः कथं भवेत् ।
तस्मात्स्वतन्त्रा न किमप्यपेक्षते
विद्या विमोक्षाय विभाति केवला ॥ २० ॥

आणि जर एकदा नष्ट होऊन गेलेली माया पुन: जन्माला येत नसेल, तर 'मी कर्माचा कर्ता आहे,' अशी बुद्धी त्या माणसाला कशी बरे होईल ? म्हणून विद्या ही स्वतंत्र आहे; तिला कर्म इत्यादी अन्य कशाचीही अपेक्षा असत नाही. ती एकटीच मोक्षासाठी स्वतंत्रपणे तळपत असते. (२०)

सा तैत्तिरीयश्रुतिराह सादरं
न्यासं प्रशस्ताखिलकर्मणां स्फुटम् ।
एतावदित्याह च वाजिनां श्रुति-
र्ज्ञानं विमोक्षाय न कर्म साधनम् ॥ २१ ॥

तसेच तैत्तिरीय शाखेची श्रुती आग्रहपूर्वक स्पष्टपणे [1] म्हणते की, सर्व कर्मांचा त्याग करणे हेच प्रशस्त आहे. खेरीज वाजसनेय शाखेची श्रुतीसुद्धा 'एतावत' इत्यादी वाक्याद्वारा सांगते [2] की ज्ञान हेच मोक्षाचे साधन आहे, कर्म हे मोक्षाचे साधन नाही. (२१)

विद्यासमत्वेन तु दर्शितस्त्वया
क्रतुर्न दृष्टान्त उदाहृतः समः ।
फलैः पृथक्त्वाद्बहुकारकैः क्रतुः
संसाध्यते ज्ञानमतो विपर्ययम् ॥ २२ ॥

सप्रत्यवायो ह्यहमित्यनात्मधी-
रज्ञप्रसिद्धा न तु तत्त्वदर्शिनः ।
तस्माद्बुधैस्त्याज्यमविक्रियात्मभि-
र्विधानतः कर्म विधिप्रकाशितम् ॥ २३ ॥

श्रद्धान्वितस्तत्त्वमसीति वाक्यतो
गुरोः प्रसादादपि शुद्धमानसः ।
विज्ञाय चैकात्म्यमथात्मजीवयोः
सुखी भवेन्मेरुरिवाप्रकम्पनः ॥ २४ ॥

आदौ पदार्थावगतिर्हि कारणं
वाक्यार्थविज्ञानविधौ विधानतः ।
तत्त्वम्पदार्थौ परमात्मजीवका-
वसीति चैकात्म्यमथानयोर्भवेत् ॥ २५ ॥

(हे ज्ञान-कर्म-समुच्चय-वादी पुरुषा ) तू विद्ये समान यज्ञ आहे, असे श्रुतीच्या आधारे दाखविले होतेस; परंतु तो यज्ञाचा दृष्टांत योग्य नाही. कारण त्या दोहोंची फळे वेगवेगळी आहेत. तसेच होता, ऋत्विक्, यजमान इत्यादी पुष्कळ कारकांच्या द्वारा यज्ञ सिद्ध होतो; त्या यज्ञापेक्षा ज्ञान वेगळे आहे. (म्हणजे ज्ञान हे कारक इत्यादींनी सिद्ध होणारे नाही). कर्मांचा त्याग केल्याने 'मी दोषी होईन' अशी अनात्म-बुद्धी अज्ञानी माणसांच्या ठिकाणी होते; परंतु तशी बुद्धी आत्म-तत्त्व जाणणाऱ्या ज्ञानी माणसाच्या बाबतीत होत नाही. म्हणून विकाररहित चित्त असणाऱ्या ज्ञानी माणसांनी वेदांनी विहित केलेल्या कर्मांचासुद्धा विधिपूर्वक त्याग करावयास हवा. तेव्हा श्रद्धेने संपन्न असणाऱ्या व चित्त शुद्ध असणाऱ्या माणसाने गुरूच्या कृपाप्रसादाने 'तत्त्वमसि' वाक्याच्या अर्थाने परमात्मा आणि जीवात्मा यांचे ऐक्य अनुभवून मेरुप्रमाणे निश्चल आणि सुखी व्हावे. कोणत्याही वाक्याचा अर्थ जाणून घेण्याच्या पद्धतीत असा नियम आहे की प्रथम त्या वाक्यातील प्रत्येक पदाचा अर्थ कळणे आवश्यक असते. (आता तत्त्वमसि या वाक्यात) 'तत्' आणि 'त्वं' ही पदे परमात्मा आणि जीव असा अर्थ सांगतात आणि 'असि' हे पद त्या दोहोंचे एकत्व सांगणारे आहे. (२२-२५)

प्रत्यक् परोक्षादिविरोधमात्मनो-
र्विहाय सङ्गृह्य तयोश्चिदात्मताम् ।
संशोधितां लक्षणया च लक्षितां
ज्ञात्वा स्वमात्मानमथाद्वयो भवेत् ॥ २६ ॥

(जीवात्मा आणि परमात्मा या) दोन आत्म्यांचे बाबतीत जीवात्मा हा प्रत्यक् म्हणजे अंत:करणाचा साक्षी आणि परमात्मा हा परोक्ष म्हणजे इंद्रियातीत आहे इत्यादी वाच्यार्थ रूप विरोध सोडून देऊन लक्षणेने लक्षित होणारे त्या दोघांचे चैतन्यस्वरूप लक्षात घेऊन, परमात्मा हाच आपला आत्मा आहे हे जाणून मुमुक्षूने एकीभावाने म्हणजे अद्वयरूपाने स्थिर व्हावे.* (२६)

१. 'न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः' (तै. आ. १०/१०) २. 'एतावदरे खल्वमृतत्वम्' (बृ.उ. ४/५/१५)

* जीवात्मा हा प्रत्यक् म्हणजे बुद्धीने कळणारा आहे.परमात्मा परोक्ष आहे; तो इंद्रियांना कळणारा नाही. परमात्मा हा सर्वज्ञ, सर्वशक्तिसंपन्न इत्यादी आहे. याउलट जीवात्मा हा अल्पज्ञ, अल्पशक्तियुक्त इत्यादी आहे. असा या दोन आत्म्यांत विरोध आहे.

एकात्मकत्वाज्जहती न सम्भवे-
तथाजहल्लक्षणता विरोधतः ।
सोऽयम्पदार्थाविव भागलक्षणा
युज्येत तत्त्वम्पदयोरदोषतः ॥ २७॥

तत् आणि त्वम् या पदांचे म्हणजे जीवात्मा आणि परमात्मा यांचे स्वरूप एकच असल्यामुळे (तत्त्वमसि वाक्यात) जहती लक्षणा घेऊन अर्थ करणे शक्य नाही. तसेच त्या दोहोंचा विरोध असल्यामुळे अजल्लक्षणेने अर्थ करणे शक्य होत नाही. म्हणून 'सः अयम्'(तो हा आहे) या वाक्यात ज्या प्रमाणे 'सः' आणि 'अयम्' या पदार्थांची भागलक्षणा घेतली जाते, त्याप्रमाणे 'तत्' आणि 'त्वम्' या पदांच्या बाबतीत निर्दोष भागलक्षणा घेऊन अर्थ करणे योग्य ठरते. * (२७)

रसादिपञ्चीकृतभूतसम्भवं
भोगालयं दुःखसुखादिकर्मणाम् ।
शरीरमाद्यन्तवदादिकर्मजं
मायामयं स्थूलमुपाधिमात्मनः ॥ २८॥

सूक्ष्मं मनोबुद्धिदशेन्द्रियैर्युतं
प्राणैरपञ्चीकृतभूतसम्भवम् ।
भोक्तुः सुखादेरनुसाधनं भवे-
च्छरीरमन्यद्विदुरात्मनो बुधाः ॥ २९॥

पंचीकरणाने बनलेल्या पृथ्वी इत्यादी पाच भूतांपासून उत्पन्न होणारे, सुख-दुःख इत्यादी कर्मांच्या भोगांचा आश्रय असणारे, उत्पत्ती आणि नाश असणारे, पूर्व जन्मातील कर्मांनी निर्माण होणारे व मायेचे कार्य असणारे हे स्थूल शरीर ही आत्म्याची स्थूल उपाधी आहे, असे मानले जाते. तसेच मन, बुद्धी, दहा इंद्रिये आणि पंच प्राण यांनी युक्त, पाच अपंचीकृत भूतांपासून उत्पन्न होणारे, आणि भोक्त्या जीवाच्या सुख- दुःख इत्यादी भोगांचे साधन असणारे जे सूक्ष्म शरीर आहे, ते जीवात्म्याचे दुसरे शरीर आहे, असे विद्वान लोक जाणतात. (हे सूक्ष्म शरीर ही आत्म्याची आणखी एक उपाधी आहे.) (२८-२९)

अनाद्यनिर्वाच्यमपीह कारणं
मायाप्रधानं तु परं शरीरकम् ।
उपाधिभेदात्तु यतः पृथक् स्थितं
स्वात्मानमात्मन्यवधारयेत्क्रमात् ॥ ३०॥

या दोन शरीरांखेरीज अनादी, अनिर्वचनीय माया ही प्रधान असणारे असे आणखी एक कारण नावाचे तिसरे शरीर आहे. तेही आत्म्याची आणखी एक उपाधी आहे. अशा प्रकारे या तीन शरीरांच्या उपाधींपेक्षा संपूर्णपणे वेगळेपणाने असणारा आपला आत्मा आहे, असा क्रमाने उपाधीचा निरास करीत आपल्या मनात आत्मनिश्चय करावा. (३०)

* जेव्हा वाक्यात पदांचा वाच्यार्थ हा सुसंगत ठरत नाही, तेव्हा तेथे लक्षणा वृत्तीने लक्ष्यार्थ घ्यावा लागतो. 'तत्त्वमसि' वाक्यात 'तत्' व 'त्वं' पदांचा वाच्यार्थ विरोधामुळे सुसंगत ठरत नाही. म्हणून लक्षणा घेऊन त्यांचा अर्थ करावा लागतो. आणि भाग लक्षणेने दोन्ही पदांचा लक्ष्यार्थ 'चैतन्य' असा आहे, असे कळते. या भाग लक्षणेचा उल्लेख या श्लोकात आहे.

जेथे शब्दांचे वाच्यार्थ (म्हणजे त्या शब्दांच्या अभिधा शक्तीने कळणारे अर्थ) सोडून, दुसरा अर्थ घेतला जातो, तेथे तो लक्षणा वृत्तीने घेतला जातो. ती लक्षणा जहती, अजहती आणि जहत्यजहती या नावाची तीन प्रकारची आहे. जहती लक्षणेमध्ये शब्दांचे वाच्यार्थ संपूर्णपणे सोडून देऊन एकदम एक दुसरा अर्थ लक्ष्यार्थ घेतला जातो. जसे 'गंगायां घोषः' (म्हणजे गंगेवर पशुशाला आहे) या वाक्यात वाच्यार्थाने गंगेच्या प्रवाहावर पशुशाला आहे, असा अर्थ होतो. परंतु हा वाच्यार्थ संपूर्णपणे असंभवनीय आहे. म्हणून येथे गंगा शब्दाचा अर्थ गंगाप्रवाह असा न घेता गंगातीर असा घेतला जातो. 'तत्त्वमसि' वाक्यात अशी जहती लक्षणा घेतली तर 'तत्' आणि 'त्वं 'पदाचे वाच्यार्थ (ईश्वर आणि जीव) हे संपूर्णपणे सोडून द्यावे लागतील; तसे केल्यावर त्या दोघांच्या वाच्यार्थातील चैतन्य हा अर्थसुद्धा सोडून दिला असे होते. परंतु या वाक्यात तर चैतन्याचे एकत्व हा अर्थ इष्ट आहे. म्हणून जहती लक्षणेने या दोन पदांच्या अर्थाची एकता सिद्ध होऊ शकत नाही. अजहती (अजल्लक्षणा) या लक्षणेत वाच्यार्थाचा त्याग न करता, त्या वाच्यार्थासह दुसरा एक अर्थ लक्ष्यार्थ म्हणून ग्रहण केला जातो. 'काकेभ्यो दधि रक्ष्यताम्' कावळ्यापासून दह्याचे रक्षण कर या वाक्याचा अभिप्राय केवळ कावळ्यापासून दह्याचे रक्षण करावे असा नाही, तर कावळ्याचे बरोबरच कुत्रा, मांजर इत्यादी अन्य प्राण्यांपासून दह्याचे रक्षण करावे, असा आहे. 'तत्त्वमसि' वाक्यात अजहती लक्षणा घेतली तर 'तत्' 'त्वं' पदाच्या वाच्यार्थाच्या जोडीने अन्य अर्थ वाच्यार्थ म्हणून घ्यावा लागेल. तरीसुद्धा 'तत्' व 'त्वं' पदाच्या वाच्यार्थात जो विरोध आहे, तो दूर होतच नाही. म्हणून अजहती लक्षणेने सुद्धा त्यांची एकता ही सिद्ध होत नाही, या दोन लक्षणांखेरीज तिसरी एक जहत्यजहती (भाग लक्षणा) आहे; तिच्यामध्ये काही वाच्यार्थ सोडला जातो आणि काही वाच्यार्थ ठेवला जातो. जसे 'सोऽयम्'(तो हा आहे) या वाक्यात 'अयम्' पदाने कळून येणाऱ्या पदार्थाची अपरोक्षता आणि 'सः' पदाच्या अर्थाने कळणाऱ्या पदार्थाची परोक्षता या दोहोंचाही त्याग करून, त्या दोन्ही अर्थांनी रहित असा जो निर्विशेष पदार्थ आहे, त्याची एकता सांगितली जाते. याच प्रकाराने 'तत्त्वमसि' वाक्यात 'तत्' पदाने वाच्य असणाऱ्या ईश्वराचे सर्वज्ञता, परोक्षता इत्यादी गुण आणि 'त्वं' पदाचा वाच्यार्थ असणाऱ्या जीवाचे अल्पज्ञता, प्रत्यक्ता इत्यादी गुण या दोहोंचा त्याग करून केवळ चेतन अंशाचे एकत्व घेणे हे योग्य ठरते. म्हणून 'तत्त्वमसि' वाक्यातून इष्ट अर्थ प्राप्त होण्यासाठी भाग लक्षणा घेणे आवश्यक ठरते.

कोशेष्वयं तेषु तु तत्तदाकृति-
विभाति सङ्गात्स्फटिकोपलो यथा ।
असङ्गरूपोऽयमजो यतोऽद्वयो
विज्ञायतेऽस्मिन्परितो विचारिते ॥ ३१ ॥

ज्या प्रमाणे स्फटिकाला जवळ असणाऱ्या पदार्थाचा रंग येतो, त्या प्रमाणे त्या अन्नमयादी कोशांच्या संगामुळे हा आत्मा त्या त्या कोशाच्या आकाराचा भासू लागतो.परंतु आत्मस्वरूपाचा नीट विचार केला असता, हा आत्मा अद्वितीय असल्यामुळे तो असंग आणि अजन्मा आहे, हे निश्चितपणे कळून येते. (३१)

बुद्धेस्त्रिधा वृत्तिरपीह दृश्यते
स्वप्नादिभेदेन गुणत्रयात्मनः ।
अन्योन्यतोऽस्मिन्व्यभिचारतो मृषा
नित्ये परे ब्रह्मणि केवले शिवे ॥ ३२ ॥

(सत्त्व, रज आणि तम हे) तीन गुण असणाऱ्या त्रिगुणात्मक बुद्धीच्या स्वप्न, जागृती आणि निद्रा या भेदांनी तीन वृत्तीसुद्धा मानवी जीवनात दिसून येतात. परंतु या तीन वृत्तींतील प्रत्येकीचा दुसऱ्या वृत्तीत अभाव होतो. यामुळे या तिन्ही अवस्था एकमात्र, कल्याणस्वरूप नित्य अशा परब्रह्माच्या दृष्टीने मिथ्या ठरतात. (३२)

देहेन्द्रियप्राणमनश्चिदात्मनां
सङ्गादजस्त्रं परिवर्तते धियः ।
वृत्तिस्तमोमूलतयाज्ञलक्षणा
यावद्भवेत्तावदसौ भवोद्भवः ॥ ३३ ॥

देह, इंद्रिये, प्राण, मन व चेतन आत्मा हे एकत्र आल्यामुळे बुद्धीची वृत्ती सतत बदलत राहाते. ही वृत्ती तमोगुणापासून उत्पन्न झालेली असल्यामुळे ती अज्ञान-रूप असते; आणि जोपर्यंत ही बुद्धी चालू राहाते, तोपर्यंत संसार चालूच राहातो. (३३)

नेतिप्रमाणेन निराकृताखिलो
हृदा समास्वादितचिद्घनामृतः ।
त्यजेदशेषं जगदात्तसद्रसं
पीत्वा यथाम्भः प्रजहाति तत्फलम् ॥ ३४ ॥

'न इति न इति' या वाक्यातील वेदप्रमाणाने संपूर्ण संसाराचे निराकरण करून आणि हृदयामध्ये चिद्घनामृताचा आस्वाद घेऊन, नंतर, ज्या प्रमाणे एखादा माणूस नारळातील पाणी पिऊन झाल्यावर त्याचे वरील कवच फेकून देतो, त्या प्रमाणे जगाचे सार असणारे सत् असे ब्रह्म प्राप्त करून घेऊन, साधक मुमुक्षूने संपूर्ण जगाचा त्याग करावा. (३४)

कदाचिदात्मा न मृतो न जायते
न क्षीयते नापि विवर्धतेऽनवः ।
निरस्तसर्वातिशयः सुखात्मकः
स्वयम्प्रभः सर्वगतोऽयमद्वयः ॥ ३५ ॥

आत्मा हा कधीही जन्माला येत नाही आणि तो कधीही मरत नाही. तो कधीही क्षीण होत नाही आणि तो कधीही वाढत नाही. तो पुरातन आत्मा सर्व विशेषणांनी रहित आहे. तो सुख- स्वरूप आहे. तो आत्मा स्वयंप्रकाशी, सर्वव्यापक आणि द्वैतरहित आहे. (३५)

एवंविधे ज्ञानमये सुखात्मके
कथं भवो दुःखमयः प्रतीयते ।
अज्ञानतोऽध्यासवशात्प्रकाशते
ज्ञाने विलीयेत विरोधतः क्षणात् ॥ ३६ ॥

येथे कुणी प्रश्न करील की अशा प्रकारच्या त्या ज्ञानस्वरूप आणि सुख-स्वरूप असणाऱ्या आत्म्यावर हा दुःखाने भरलेला संसार कसा बरे प्रचीतीला येतो ? तर या प्रश्नाचे उत्तर असे आहे की अज्ञानाच्या योगे आत्म्यावर अध्यास होऊन हा संसार अनुभवास येतो. परंतु आत्म्याचे ज्ञान होताच, संसार क्षणात लयाला जातो. कारण ज्ञान आणि अज्ञान हे संपूर्णपणे परस्पर विरोधी आहेत. (३६)

यदन्यदन्यत्र विभाव्यते भ्रमा-
दध्यासमित्याहुरमुं विपश्चितः ।
असर्पभूतेऽहिविभावनं यथा
रज्ज्वादिके तद्वदपीश्वरे जगत् ॥ ३७ ॥

(हा अध्यास म्हणजे काय, या प्रश्नाचे उत्तर असे की) भ्रमामुळे एखाद्या ठिकाणी दुसराच पदार्थ भासतो, त्या गोष्टीला अध्यास असे विद्वान म्हणतात. ज्या प्रमाणे सर्प नसणाऱ्या रज्जू इत्यादींवर सर्प भासतो, त्या प्रमाणे ईश्वरावर जग भासते. (३७)

विकल्पमायारहिते चिदात्मके-
ऽहङ्कार एष प्रथमः प्रकल्पितः ।
अध्यास एवात्मनि सर्वकारणे
निरामये ब्रह्मणि केवले परे ॥ ३८ ॥

विकल्प आणि माया यांनी रहित, चित्स्वरूप, सर्वांचे कारण, निरामय विकाररहित, अद्वितीय असणाऱ्या अशा परब्रह्मावर सर्वप्रथम अहंकार कल्पिला गेला. हा अध्यासच आहे. (३८)

इच्छादिरागादिसुखादिधर्मिकाः
सदा धियः संसृतिहेतवः परे ।
यस्मात्प्रसुप्तौ तदभावतः परः
सुखस्वरूपेण विभाव्यते हि नः ॥ ३९ ॥

इच्छा व अनिच्छा, राग आणि द्वेष, सुख व दुःख हे नेहमीचे धर्म असणाऱ्या बुद्धीच्या वृत्ती या संसाराचे कारण आहेत आणि त्या परमात्म्यावर आरोपित केल्या जातात. कारण निद्रा या अवस्थेत त्यांचा अभाव झाला असताना, सुखस्वरूप असा परमात्मा आपल्या अनुभवास येत असतो. (३९)

अनाद्यविद्योद्भवबुद्धिबिम्बितो
जीवः प्रकाशोऽयमितीर्यते चितः ।
आत्मा धियः साक्षितया पृथक् स्थितो
बुद्ध्यापरिच्छिन्नपरः स एव हि ॥ ४० ॥

अनादी अविद्येपासून उत्पन्न झालेल्या बुद्धीत प्रतिबिंबित झालेला चैतन्याचा प्रकाश हा जीव आहे, असे म्हटले जाते. बुद्धीचा साक्षी या स्वरूपात आत्मा हा वेगळाच राहात असतो. बुद्धीमुळे मर्यादित होत नाही. कारण तो आत्मा हा पर म्हणजे सर्वव्यापक आहे. (४०)

चिद्बिम्बसाक्ष्यात्मधियां प्रसङ्गत-
स्त्वेकत्र वासादनलाक्तलोहवत् ।
अन्योन्यमध्यासवशात्प्रतीयते
जडाजडत्वं च चिदात्मचेतसोः ॥ ४१ ॥

अग्नीने तप्त झालेल्या लोखंडाप्रमाणे प्रतिबिंब म्हणजे चिदाभास, साक्षी असणारा आत्मा आणि बुद्धी यांच्या एकत्र राहाण्यामुळे, त्यांचा परस्पर अध्यास होतो; त्यामुळे चिदात्म्याचे चेतनत्व हे मनावर आणि मनाचे जडत्व हे चिदात्म्यावर भासू लागते . (४१)

गुरोः सकाशादपि वेदवाक्यतः
सञ्जातविद्यानुभवो निरीक्ष्य तम् ।
स्वात्मानमात्मस्थमुपाधिवर्जितं
त्यजेदशेषं जडमात्मगोचरम् ॥ ४२ ॥

गुरुजवळून किंवा वेदवाक्यावरून, आत्मज्ञानाचा अनुभव आल्यावर, आपल्या शरीरात असणाऱ्या उपाधिरहित अशा स्वतःच्या आत्म्याचा साक्षात्कार करून घेऊन, आत्म्यावर प्रतीत होणाऱ्या सर्व अनात्म गोष्टींचा त्याग करावा. (४२)

प्रकाशरूपोऽहमजोऽहमद्वयो-
ऽसकृद्विभातोऽहमतीव निर्मलः ।
विशुद्धविज्ञानघनो निरामयः
सम्पूर्ण आनन्दमयोऽहमक्रियः ॥ ४३ ॥

सदैव मुक्तोऽहमचिन्त्यशक्तिमा-
नतीन्द्रियज्ञानमविक्रियात्मकः ।
अनन्तपारोऽहमहर्निशं बुधै-
र्विभावितोऽहं हृदि वेदवादिभिः ॥ ४४ ॥

'मी प्रकाशरूप, अजन्मा, अद्वितीय, नित्य प्रकाशमान, अतिशय निर्मळ, शुद्ध विज्ञानघन, निरामय क्रियारहित आणि पूर्णपणे आनंदस्वरूप आहे. विकाररहित असणे हे माझे स्वरूप आहे. मी नेहमी मुक्त आहे. माझ्याजवळ अचिंत्य शक्ती आहे. मी अतींद्रिय, ज्ञानस्वरूप, अविकृतस्वरूप असणारा आहे. मी अनंत व अपार आहे. वेदांचा अभ्यास करणारे वेदवेत्ते रात्रंदिवस आपल्या हृदयात माझेच चिंतन करीत असतात.' (४३-४४)

एवं सदात्मानमखण्डितात्मना
विचारमाणस्य विशुद्धभावना ।
हन्यादविद्यामचिरेण कारकै
रसायनं यद्वदुपासितं रुजः ॥ ४५ ॥

अशा प्रकारे अखंड मनोवृत्तीने नेहमी आत्म्याचे चिंतन करणाऱ्याच्या मनात उत्पन्न होणारी विशुद्ध भावनाही त्वरित कारकांसह अविद्येचा नाश करून टाकते. जसे, योग्यप्रकारे सेवन केल्याने रसायन किंवा औषध हे रोगाचा नाश करते. (४५)

विविक्त आसीन उपारतेन्द्रियो
विनिर्जितात्मा विमलान्तराशयः ।
विभावयेदेकमनन्यसाधनो
विज्ञानदृक्केवल आत्मसंस्थितः ॥ ४६ ॥

इंद्रियांना आपल्या विषयांपासून दूर करून अंत:करण जिंकून घ्यावे आणि आत्म्यामध्ये स्थित होऊन इतर कोणत्याही साधनाचा आधार न घेता शुद्ध चित्त होऊन विज्ञानदृष्टीने फक्त आत्म्याचे चिंतन करावे. (४६)

विश्वं यदेतत्परमात्मदर्शनं
विलापयेदात्मनि सर्वकारणे ।
पूर्णश्चिदानन्दमयोऽवतिष्ठते
न वेद बाह्यं न च किञ्चिदान्तरम् ॥ ४७ ॥

हे जे विश्व दिसते ते परमात्म्याचे स्वरूप आहे, असे जाणून, सर्वांचे कारण असणाऱ्या परमात्म्यामध्ये विश्वाचा लय करावा. असे केल्यावर, जो माणूस संपूर्णपणे आनंदस्वरूप होऊन जातो, त्याला बाहेरील अथवा आतील कोणतीच गोष्ट कळून येत नाही. (४७)

पूर्वं समाधेरखिलं विचिन्तये-
दोङ्कारमात्रं सचराचरं जगत् ।
तदेव वाच्यं प्रणवो हि वाचको
विभाव्यतेऽज्ञानवशान्न बोधतः ॥ ४८ ॥

समाधी प्राप्त होण्यापूर्वी, संपूर्ण चराचर जग हे केवळ ओंकारमात्र आहे, असा साधकाने विचार करावा. ते जगच ओंकाराने वाच्य होते आणि ओंकार हा जगाचा वाचक आहे. अज्ञानी अवस्थेतच जग हे ॐ काररूप आहे, अशी वाच्यवाचक भावाची प्रचीती येते. परंतु ज्ञान झाल्यावर फक्त एक ब्रह्मच उरते. (४८)

अकारसंज्ञः पुरुषो हि विश्वको
ह्युकारकस्तैजस ईर्यते क्रमात् ।
प्राज्ञो मकारः परिपठ्यतेऽखिलैः
समाधिपूर्वं न तु तत्त्वतो भवेत् ॥ ४९ ॥

ॐकारात अ, उ,म हे तीन वर्ण आहेत. यांतील अकार, विश्व म्हणजे जागृतीचा अभिमानी, असलेल्याचा वाचक आहे. उकार, तेजस म्हणजे स्वप्नाचा अभिमानी, असलेल्याचा वाचक आहे आणि मकार प्राज्ञ म्हणजे सुषुप्तीचा अभिमानी, असलेल्याचा वाचक आहे. (४९)

विश्वं त्वकारं पुरुषं विलापये-
दुकारमध्ये बहुधा व्यवस्थितम् ।
ततो मकारे प्रविलाप्य तैजसं
द्वितीयवर्णं प्रणवस्य चान्तिमे ॥ ५० ॥

नाना प्रकाराने स्थित असणाऱ्या अकाररूपी विश्व पुरुषाचा लय उकाराच्या मध्ये करावा. त्यानंतर ओंकाराच्या उकाररूपी द्वितीय वर्णस्वरूप असणाऱ्या तैजस पुरुषाला शेवटच्या मकाररूप वर्णात लीन करावे. (५०)

मकारमप्यात्मनि चिद्घने परे
विलापयेत्प्राज्ञमपीह कारणम् ।
सोऽहं परं ब्रह्म सदा विमुक्तिमद्-
विज्ञानदृङ्मुक्त उपाधितोऽमलः ॥ ५१ ॥

त्यानंतर येथे कारणरूप तसेच मकाररूप असणाऱ्या प्राज्ञ पुरुषालासुद्धा चिद्घन अशा परमात्म्यात लीन करावे. मग विज्ञान-दृष्टी असणाऱ्या, उपाधींपासून मुक्त झालेल्या अशा निर्मळ साधकाने नित्य मुक्त असणारे परब्रह्म म्हणजे मी आहे, अशी भावना करावी. (५१)

एवं सदा जातपरात्मभावनः
स्वानन्दतुष्टः परिविस्मृताखिलः ।
आस्ते स नित्यात्मसुखप्रकाशकः
साक्षाद्विमुक्तोऽचलवारिसिन्धुवत् ॥५२॥

अशा प्रकारे मी परमात्मा आहे, अशी भावना ज्याच्या ठिकाणी सतत निर्माण झाली आहे, जो स्वतःच्या म्हणजे आत्म्याच्या आनंदात मग्न झाला आहे, जो संपूर्ण संसार पूर्णपणे विसरून गेला आहे आणि नित्य आत्मसुखाचा प्रकाश हेच ज्याचे स्वरूप झाले आहे, असा तो साक्षात मुक्त पुरुष हा निश्चल जळाने भरलेल्या सागरासारखा स्थिर राहातो. (५२)

एवं सदाभ्यस्तसमाधियोगिनो
निवृत्तसर्वेन्द्रियगोचरस्य हि ।
विनिर्जिताशेषरिपोरहं सदा
दृश्यो भवेयं जितषड्गुणात्मनः ॥५३॥

अशा प्रकारे जो पुरुष समाधियोगाचा नित्य अभ्यास करतो, सर्व इंद्रियांना गोचर असणारे विषय हे ज्याच्यापासून निवृत्त झाले आहेत, ज्याने काम, क्रोध इत्यादी सर्व शत्रू जिंकलेले आहेत, ज्याने सहा इंद्रियांना जिंकले आहे, अशा महात्म्या पुरुषाला माझा साक्षात्कार नेहमी होतो. (५३)

ध्यात्वैवमात्मानमहर्निशं मुनि-
स्तिष्ठेत्सदा मुक्तसमस्तबन्धनः ।
प्रारब्धमश्नन्नभिमानवर्जितो
मय्येव साक्षात्प्रविलीयते ततः ॥५४॥

अशा प्रकारे रात्रंदिवस आत्म्याचे ध्यान करून, मुनीने नेहमी सर्व बंधनांतून मुक्त होऊन राहावे. मी कर्ता, मी भोक्ता या अभिमानाने रहित होऊन, प्रारब्ध भोगत राहाणारा माणूस नंतर साक्षात माझ्यामध्येच लीन होऊन जातो. (५४)

आदौ च मध्ये च तथैव चान्ततो
भवं विदित्वा भयशोककारणम् ।
हित्वा समस्तं विधिवादचोदितं
भजेत्स्वमात्मानमथाखिलात्मनाम् ॥५५॥

हा संसार आदी, मध्य आणि अंत या सर्व ठिकाणी भय व शोक यांचे कारण आहे, हे जाणून, आणि विधि-वाक्यांनी विहित केलेली सर्व कर्मे टाकून देऊन, मग सर्वांचा आत्मा असणारा असा जो आपला स्वतःचाही आत्मा आहे, त्याचा आश्रय घ्यावा. (५५)

आत्मन्यभेदेन विभावयन्निदं
भवत्यभेदेन मयात्मना तदा ।
यथा जलं वारिनिधौ यथा पयः
क्षीरे वियद्व्योम्न्यनिले यथानिलः ॥५६॥

ज्या प्रमाणे समुद्रात जल, दुधात दूध, महाकाशात घटाकाश इत्यादी आणि वायूमध्ये वायू मिसळून एक होतात, त्या प्रमाणे हा संपूर्ण संसार आत्म्याशी अभिन्न आहे, असे चिंतन केल्यास जीव हा मज परमात्म्याबरोबर अभिन्न भावनेने स्थित होतो. (५६)

इत्थं यदीक्षेत हि लोकसंस्थितो
जगन्मृषैवेति विभावयन्मुनिः ।
निराकृतत्वाच्छ्रुतियुक्तिमानतो
यथेन्दुभेदो दिशि दिग्भ्रमादयः ॥५७॥

हे जे जग आहे ते श्रुती व युक्ती आणि प्रमाण यांचे द्वारा निराकृत होत असल्याकारणाने, ते एका चंद्राऐवजी अनेक चंद्र, किंवा एका दिशेमध्ये होणारा दुसऱ्या दिशेचा भ्रम, या प्रमाणे मिथ्याच आहे, असा विचार करीत, लोकव्यवहारात राहून, मुनी जर ऐक्यच पाहात राहील तर त्याला जीव, जग आणि परमात्मा यांच्या ऐक्याचे ज्ञान होईल. (५७)

यावन्न पश्येदखिलं मदात्मकं
तावन्मदाराधनतत्परो भवेत् ।
श्रद्धालुरत्यूर्जितभक्तिलक्षणो
यस्तस्य दृश्योऽहमहर्निशं हृदि ॥५८॥

जोपर्यंत सर्व विश्व हे माझे स्वरूप आहे, हे माणसाला पाहाता येत नाही, तोपर्यंत त्याने माझी आराधना करण्यात तत्पर राहावे. जो पुरुष श्रद्धेने युक्त आणि उत्कट भक्तीने संपन्न आहे, त्यालाच स्वतःच्या हृदयात रात्रंदिवस माझाच साक्षात्कार होतो. (५८)

रहस्यमेतच्छ्रुतिसारसङ्ग्रहं
मया विनिश्चित्य तवोदितं प्रिय ।
यस्त्वेतदालोचयतीह बुद्धिमान्
स मुच्यते पातकराशिभिः क्षणात् ॥ ५९ ॥

हे प्रिय लक्ष्मणा, सर्व श्रुतींचे सारसंग्रहरूप असे हे रहस्य मी निश्चित करून तुला सांगितले आहे. येथे या जगात जो बुद्धिमान् पुरुष याचे मनन करील, तो एका क्षणात सर्व पातकांतून मुक्त होईल. (५९)

भ्रातर्यदीदं परिदृश्यते जग-
न्मायैव सर्वं परिहृत्य चेतसा ।
मद्भावनाभावितशुद्धमानसः
सुखी भवानन्दमयो निरामयः ॥ ६० ॥

हे बंधू लक्ष्मणा, हे जे जग दिसत आहे ते सर्व माया आहे, हे जाणून तू ते आपल्या मनातून काढून टाक. माझ्या चिंतनाने चित्त शुद्ध करून तू सुखी, आनंदमय आणि क्लेशरहित हो. (६०)

यः सेवते मामगुणं गुणात्परं
हृदा कदा वा यदि वा गुणात्मकम् ।
सोऽहं स्वपादाश्रितरेणुभिः स्पृशन्
पुनाति लोकत्रितयं यथा रविः ॥ ६१ ॥

जो पुरुष आपल्या मनाने गुणांच्या पलीकडील, गुणरहित अशा माझे चिंतन करतो किंवा कधी माझ्या सगुण रूपाचे सेवन करतो, तो व मी एकरूप आहोत. ज्या प्रमाणे सूर्य आपल्या किरणांनी तिन्ही जगांना प्रकाशित करतो, त्या प्रमाणे हा महापुरुष आपल्या पायाच्या रजःकणाच्या स्पर्शाने तिन्ही लोकांना पवित्र करतो. (६१)

विज्ञानमेतदखिलं श्रुतिसारमेकं
वेदान्तवेद्यचरणेन मयैव गीतम् ।
यः श्रद्धया परिपठेद् गुरुभक्तियुक्तो
मद्रूपमेति यदि मद्वचनेषु भक्तिः ॥ ६२ ॥

हे एकमेवद्वितीय व संपूर्ण असे श्रुतींचे सार विज्ञान आहे. वेदांतावरूनच ज्याच्या चरणांचे ज्ञान होते, अशा मीच तुला हे सांगितले आहे. गुरूवरील भक्तीने युक्त होऊन जो कोणी पुरुष श्रद्धापूर्वक हे पठण करील, त्याची जर माझ्या वचनांवर भक्ती असेल, तर तो पुरुष मद्रूप होऊन जातो.” (६२)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकाण्डे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

# षष्ट सर्ग

## लवणाचा वध, भगवान रामांच्या यज्ञात कुश-लव यांच्यासह महर्षी वाल्मीकींचे आगमन आणि कुशाला परमार्थाचा उपदेश

*श्रीमहादेव उवाच*

एकदा मुनयः सर्वे यमुनातीरवासिनः ।
आजग्मू राघवं द्रष्टुं भयाल्लवणरक्षसः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**— हे पार्वती, यमुनानदीच्या तीरावर राहाणारे सर्व मुनी एकदा लवण राक्षसाच्या भीतीमुळे राघवांना भेटण्यास आले. (१)

कृत्वाग्रे तु मुनिश्रेष्ठं भार्गवं च्यवनं द्विजाः ।
असङ्ख्याताः समायाता रामादभयकाङ्क्षिणः ॥ २ ॥

श्रीरामांकडून अभय मिळविण्याची इच्छा असणारे ते असंख्य ब्राह्मण भृगु-पुत्र च्यवन या मुनिश्रेष्ठांना पुढे करून आले होते. (२)

तान्पूजयित्वा परया भक्त्या रघुकुलोत्तमः ।
उवाच मधुरं वाक्यं हर्षयन्मुनिमण्डलम् ॥ ३ ॥

अतिशय भक्तीने त्यांचा सत्कार करून, त्या मुनिसमुदायाला आनंद देत, रघुकुलश्रेष्ठ श्रीराम मधुर शब्दांत बोलले. (३)

करवाणि मुनिश्रेष्ठाः किमागमनकारणम् ।
धन्योऽस्मि यदि यूयं मां प्रीत्या द्रष्टुमिहागताः ॥ ४ ॥

“हे मुनिश्रेष्ठांनो, तुमच्या आगमनाचे काय कारण आहे ? तुम्ही मला जशी आज्ञा कराल तसे मी करीन. जर तुम्ही प्रेमाने मला भेटण्यास आला असाल तर मी धन्य आहे. (४)

दुष्करं चापि यत्कार्यं भवतां तत्करोम्यहम् ।
आज्ञापयन्तु मां भृत्यं ब्राह्मणा दैवतं हि मे ॥ ५ ॥

आपले जे काही दुष्कर कार्य असेल, तेसुद्धा मी करीन. मज सेवकाला तुम्ही आज्ञा द्या. कारण ब्राह्मण हेच माझे इष्ट दैवत आहे." (५)

तच्छ्रुत्वा सहसा हृष्टश्च्यवनो वाक्यमब्रवीत् ।
मधुनामा महादैत्यः पुरा कृतयुगे प्रभो ॥ ६ ॥

आसीदतीव धर्मात्मा देवब्राह्मणपूजकः ।
तस्य तुष्टो महादेवो ददौ शूलमनुत्तमम् ॥ ७ ॥

प्राह चानेन यं हंसि स तु भस्मीभविष्यति ।
रावणस्यानुजा भार्या तस्य कुम्भीनसी श्रुता ॥ ८ ॥

ते श्रीरामांचे वचन ऐकल्यावर च्यवन आनंदित झाले आणि म्हणाले, "हे प्रभो, पूर्वी कृतयुगामध्ये मधू नावाचा एक महादैत्य अतिशय धर्मात्मा आणि देव व ब्राह्मण यांची पूजा करणारा होता. त्याच्यावर प्रसन्न झालेल्या भगवान महादेवांनी त्याला एक अतिशय उत्तम शूल दिला आणि त्याला सांगितले, 'या शूलाने तू ज्याला तडाखा देशील तो भस्मीभूत होऊन जाईल.' असे म्हणतात की रावणाची धाकटी बहीण कुंभीनसी ही त्याची भार्या होती. (६-८)

तस्यां तु लवणो नाम राक्षसो भीमविक्रमः ।
आसीद्दुरात्मा दुर्धर्षो देवब्राह्मणहिंसकः ॥ ९ ॥

तिच्यापासून लवण नावाचा भयंकर पराक्रमी, दुष्ट मनाचा, दुर्जय आणि देव व ब्राह्मण यांची हिंसा करणारा राक्षस उत्पन्न झाला होता. (९)

पीडितास्तेन राजेन्द्र वयं त्वां शरणं गताः ।
तच्छ्रुत्वा राघवोऽप्याह मा भीर्वो मुनिपुङ्गवाः ॥ १० ॥

हे राजेंद्रा, त्याच्याकडून त्रस्त होऊन आम्ही तुम्हांला शरण आलो आहोत. " ते ऐकल्यावर राघवसुद्धा म्हणाले, "हे मुनिश्रेष्ठांनो, तुम्ही कोणतीही भीती बाळगू नका. (१०)

लवणं नाशयिष्यामि गच्छन्तु विगतज्वराः ।
इत्युक्त्वा प्राह रामोऽपि भ्रातॄन् को वा हनिष्यति ॥ ११ ॥

लवणं राक्षसं दद्याद् ब्राह्मणेभ्योऽभयं महत् ।
तच्छ्रुत्वा प्राञ्जलिः प्राह भरतो राघवाय वै ॥ १२॥

मी लवणाचा नाश करतो. तुम्ही चिंता न करता जा. " असे सांगून श्रीराम आपल्या भावांना म्हणाले, "तुमच्यापैकी लवण राक्षसाचा वध कोण करील ? आणि ब्राह्मणांना मोठे अभय देईल ?" ते ऐकून हात जोडून भरत राघवांना म्हणाला. (११-१२)

अहमेव हनिष्यामि देवाज्ञापय मां प्रभो ।
ततो रामं नमस्कृत्य शत्रुघ्नो वाक्यमब्रवीत् ॥ १३ ॥

"महाराज, मीच लवणाचा वध करीन. हे प्रभो, मला आज्ञा द्या." तेव्हा श्रीरामांना नमस्कार करून शत्रुघ्न म्हणाला . (१३)

लक्ष्मणेन महत्कार्यं कृतं राघव संयुगे ।
नन्दिग्रामे महाबुद्धिर्भरतो दुःखमन्वभूत् ॥ १४ ॥

"हे राघवा, युद्धामध्ये लक्ष्मणाने फार मोठे कार्य केले आहे. महाबुद्धिमान भरताने नंदिग्रामात राहून दुःख अनुभवले आहे. (१४)

अहमेव गमिष्यामि लवणस्य वधाय च ।
त्वत्प्रसादाद्रघुश्रेष्ठ हन्यां तं राक्षसं युधि ॥ १५ ॥

तेव्हा आता लवणाचा वध करण्यास मीच जातो. हे रघुश्रेष्ठा, तुमच्या प्रसादाने मी त्या राक्षसाला युद्धामध्ये ठार करतो." (१५)

तच्छ्रुत्वा स्वाङ्कमारोप्य शत्रुघ्नं शत्रुसूदनः ।
प्राहाद्यैवाभिषेक्ष्यामि मथुराराज्यकारणात् ॥ १६ ॥

ते ऐकल्यावर शत्रुघातक श्रीरामांनी शत्रुघ्नाला आपल्याजवळ बसविले आणि म्हटले, "आजच मी तुला लवणाच्या मथुरा नगरीच्या राज्यावर अभिषेक करतो." (१६)

आनाय्य च सुसम्भाराँल्लक्ष्मणेनाभिषेचने ।
अनिच्छन्तमपि स्नेहादभिषेकमकारयत् ॥ १७ ॥

मग लक्ष्मणाकडून राज्याभिषेकाचे सर्व साहित्य आणवून घेऊन, शत्रुघ्नाची इच्छा नसतानाही, रामांनी प्रेमपूर्वक शत्रुघ्नावर अभिषेक करविला. (१७)

दत्त्वा तस्मै शरं दिव्यं रामः शत्रुघ्नमब्रवीत् ।
अनेन जहि बाणेन लवणं लोककण्टकम् ॥ १८ ॥

नंतर त्या शत्रुघ्नाला एक दिव्य बाण देऊन श्रीराम त्याला म्हणाले, "लोकांना काट्याप्रमाणे सलणाऱ्या त्या लवणाला तू या बाणाने ठार कर. (१८)

स तु सम्पूज्य तच्छूलं गेहे गच्छति काननम् ।
भक्षणार्थं तु जन्तूनां नानाप्राणिवधाय च ॥ १९ ॥

तो शंकरांनी दिलेल्या शूलाची पूजा घरातच करतो व जीवजंतूंना खाण्यासाठी आणि नाना प्रकारच्या प्राण्यांचा वध करण्यासाठी अरण्यात जात असतो. (१९)

स तु नायाति सदनं यावद्वनचरो भवेत् ।
तावदेव पुरद्वारि तिष्ठ त्वं धृतकार्मुकः ॥ २० ॥

तेव्हा जोपर्यंत तो घरी परत येत नाही आणि वनातच फिरत असतो, तोपर्यंत तू हातात धनुष्य घेऊन, त्याच्या नगराच्या द्वारात उभा रहा. (२०)

योत्स्यते स त्वया क्रुद्धस्तदा वध्यो भविष्यति ।
तं हत्वा लवणं क्रूरं तद्वनं मधुसंज्ञितम् ॥ २१ ॥

निवेश्य नगरं तत्र तिष्ठ त्वं मेऽनुशासनात् ।
अश्वानां पञ्चसाहस्त्रं रथानां च तदर्धकम् ॥ २२ ॥

गजानां षट् शतानीह पत्तीनामयुतत्रयम् ।
आगमिष्यति पश्चात्त्वमग्रे साधय राक्षसम् ॥ २३ ॥

तो परत आल्यावर रागाने तो त्रिशूळाशिवाय तुझ्याशी युद्ध करील आणि त्याचवेळी त्याचा वध करणे योग्य होईल. त्या क्रूर लवणाला ठार केल्यावर, तू त्याच्या मधू नावाच्या वनात एक नगर वसव आणि माझ्या आज्ञेनुसार तू तेथेच राहू लाग. तू प्रथम पुढे जाऊन त्या राक्षसाचा वध कर. त्यानंतर तुझ्या मागोमाग पाच हजार घोडे, अडीच हजार रथ, सहाशे हत्ती आणि तीस हजार पायदळ सैन्य तेथे येईल." (२१-२३)

इत्युक्त्वा मूर्ध्न्यवघ्राय प्रेषयामास राघवः ।
शत्रुघ्नं मुनिभिः सार्धमाशीर्भिरभिनन्द्य च ॥ २४ ॥

श्रीरामांनी असे सांगून त्याच्या मस्तकाचे अवघ्राण केले व अनेक आशीर्वाद देऊन त्याचे अभिनंदन केले आणि मुनींच्याबरोबर शत्रुघ्नाला पाठवून दिले. (२४)

शत्रुघ्नोऽपि तथा चक्रे यथा रामेण चोदितः ।
हत्वा मधुसुतं युद्धे मथुरामकरोत्पुरीम् ॥ २५ ॥

श्रीरामांनी आज्ञा केली होती त्या प्रमाणे शत्रुघ्नाने केले. युद्धामध्ये मधुपुत्र लवणाचा वध करून त्याने मथुरा नगरी वसविली. (२५)

स्फीतां जनपदां चक्रे मथुरां दानमानतः ।
सीतापि सुषुवे पुत्रौ द्वौ वाल्मीकेरथाश्रमे ॥ २६ ॥

नंतर लोकांना दान आणि मान देऊन शत्रुघ्नानेसुद्धा मथुरा नगरीला एक समृद्धशाली नगर बनविले. त्या सुमारास वाल्मीकीच्या आश्रमात सीतेने दोन पुत्रांना जन्म दिला. (२६)

मुनिस्तयोर्नाम चक्रे कुशो ज्येष्ठोऽनुजो लवः ।
क्रमेण विद्यासम्पन्नौ सीतापुत्रौ बभूवतुः ॥ २७ ॥

ज्येष्ठ पुत्राला कुश आणि धाकट्याला लव अशी नावे वाल्मीकी मुनींनी ठेवली. ते सीतेचे पुत्र क्रमाने विद्यासंपन्न झाले. (२७)

उपनीतौ च मुनिना वेदाध्ययनतत्परौ ।
कृत्स्नं रामायणं प्राह काव्यं बालकयोर्मुनिः ॥ २८ ॥

वाल्मीकी मुनींनी त्यांचे उपनयन केले. मग ते वेदाच्या अध्ययनात तत्पर झाले. त्या दोन बालकांना वाल्मीकी मुनींनी संपूर्ण रामायण काव्य शिकविले. (२८)

शङ्करेण पुरा प्रोक्तं पार्वत्यै पुरहारिणा ।
वेदोपबृंहणार्थाय तावग्राहयत प्रभुः ॥ २९ ॥

जे रामायण पूर्वी त्रिपुरनाशक शंकराने पार्वतीला कथन केले होते, तेच रामायण वेदाचा अर्थ विस्तृतपणे तपशीलवार कळावा म्हणून वाल्मीकी ऋषींनी त्या दोघांना शिकविले. (२९)

कुमारौ स्वरसम्पन्नौ सुन्दरावश्विनाविव ।
तन्त्रीतालसमायुक्तौ गायन्तौ चेरतुर्वने ॥ ३० ॥

अश्विनीकुमाराप्रमाणे सुंदर आणि गोड आवाजाने ते दोघे कुमार वीणेच्या तालावर रामायण गात वनात फिरत असत. (३०)

तत्र तत्र मुनीनां तौ समाजे सुररूपिणौ ।
गायन्तावभितो दृष्ट्वा विस्मिता मुनयोऽब्रुवन् ॥ ३१ ॥

जागोजाग मुनींच्या समाजात देवांप्रमाणे सुंदर रूप असणाऱ्या त्या दोघांना सर्वत्र रामायण गात असताना पाहून विस्मित झालेले मुनी म्हणत की, (३१)

गन्धर्वेष्विव किन्नरेषु भुवि वा देवेषु देवालये
पातालेष्वथवा चतुर्मुखगृहे लोकेषु सर्वेषु च ।
अस्माभिश्चिरजीविभिश्चिरतरं दृष्टा दिशः सर्वतो
नाज्ञायीदृशगीतवाद्यगरिमा नादर्शि नाश्रावि च ॥ ३२ ॥

"आम्ही पुष्कळ काळ जगलो. पुष्कळ काळपर्यंत आम्ही सर्व दिशा पाहिल्या. तथापि अनेक गंधर्व व किन्नर, पृथ्वी, स्वर्ग, अनेक पाताळे, नागलोक अथवा ब्रह्मलोक इत्यादी ठिकाणी अशा प्रकारचे गायन व वादन यांतील कौशल्य आम्हांला कुठेच पाहाण्यास अथवा ऐकण्यास मिळाले नाही." (३२)

एवं स्तुवद्भिरखिलैर्मुनिभिः प्रतिवासरम् ।
आसाते सुखमेकान्ते वाल्मीकेराश्रमे चिरम् ॥ ३३ ॥

अशा प्रकारे दररोज सर्व मुनी त्यांची स्तुती करीत असताना, ते दोघे वाल्मीकीच्या एकांत आश्रमात सुखाने राहात होते. (३३)

अथ रामोऽश्वमेधादींश्चकार बहुदक्षिणान् ।
यज्ञान् स्वर्णमयीं सीतां विधाय विपुलद्युतिः ॥ ३४ ॥

इकडे सुवर्णमय सीता तयार करवून घेऊन, अत्यंत तेजस्वी रामांनी पुष्कळ दक्षिणेने युक्त असे अश्वमेध इत्यादी यज्ञ केले. (३४)

तस्मिन्विताने ऋषयः सर्वे राजर्षयस्तथा ।
ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः समाजग्मुर्दिदृक्षवः ॥ ३५ ॥

त्या वेळी सर्व ऋषी, राजर्षी, ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हा यज्ञोत्सव पाहाण्याच्या इच्छेने यज्ञमंडपात आले होते. (३५)

वाल्मीकिरपि सङ्गृह्य गायन्तौ तौ कुशीलवौ ।
जगाम ऋषिवाटस्य समीपं मुनिपुङ्गवः ॥ ३६ ॥

मुनिश्रेष्ठ वाल्मीकीसुद्धा गायन करणाऱ्या कुश-लवांना घेऊन तेथे आले आणि ऋषींच्यासाठी तयार केलेल्या निवास-स्थानी उतरले. (३६)

तत्रैकान्ते स्थितं शान्तं समाधिविरमे मुनिम् ।
कुशः पप्रच्छ वाल्मीकिं ज्ञानशास्त्रं कथान्तरे ॥ ३७ ॥

एके दिवशी तेथे एकांतस्थानी शांतपणे बसलेल्या वाल्मीकी मुनींना त्यांची समाधी उतरल्यावर, बोलता बोलता, कुशाने ज्ञानशास्त्राविषयी पृच्छा केली. (३७)

भगवञ्छ्रोतुमिच्छामि सङ्क्षेपाद्भवतोऽखिलम् ।
देहिनः संसृतिर्बन्धः कथमुत्पद्यते दृढः ॥ ३८ ॥

कथं विमुच्यते देही दृढबन्धाद्भवाभिधात् ।
वक्तुमर्हसि सर्वज्ञ मह्यं शिष्याय ते मुने ॥ ३९ ॥

तो म्हणाला, "हे भगवन, तुमच्याकडून सर्व काही मी संक्षेपाने ऐकू इच्छितो. देहधारी जीवाच्या बाबतीत संसाराचा हा दृढ बंध कसा बरे उत्पन्न होतो ? आणि संसार हे नाव असणाऱ्या या दृढ बंधनापासून तो देहधारी जीव कसा बरे सुटतो ? हे मुनी, तुम्ही सर्वज्ञ आहात. तुमचा शिष्य म्हणून मला तुम्ही हे सर्व सांगा." (३८-३९)

*वाल्मीकिरुवाच*

श्रृणु वक्ष्यामि ते सर्वं सङ्क्षेपाद्बन्धमोक्षयोः ।
स्वरूपं साधनं चापि मत्तः श्रुत्वा यथोदितम् ॥ ४० ॥

तथैवाचर भद्रं ते जीवन्मुक्तो भविष्यसि ।
देह एव महागेहमदेहस्य चिदात्मनः ॥ ४१ ॥

**वाल्मीकी म्हणाले–** "ऐक. बंध आणि मोक्ष यांचे स्वरूप तसेच बंधनातून सुटण्याचे साधन हे सर्व मी तुला संक्षेपाने सांगतो. ते माझ्याकडून ऐकल्यावर, मी जसे सांगेन त्या प्रमाणे तू आचार कर. त्यामुळे तुझे कल्याण होईल. तू जीवन्मुक्त होशील. मूलतः देहहीन असणाऱ्या चेतन आत्म्याचे हा देह हेच एक मोठे घर आहे. (४०-४१)

तस्याहङ्कार एवास्मिन्मन्त्री तेनैव कल्पितः ।
देहगेहाभिमानं स्वं समारोप्य चिदात्मनि ॥ ४२ ॥

या देहामध्ये जीवाने अहंकारालाच आपला मंत्री केले आहे. हा अहंकार त्यानेच कल्पिलेला आहे. देह आणि घर यांवरील स्वतःचा अहंकार तो चिदात्म्यावर आरोपित

तेन तादात्म्यमापन्नः स्वचेष्टितमशेषतः ।
विदधाति चिदानन्दे तद्वासितवपुः स्वयम् ॥ ४३ ॥

तेन सङ्कल्पितो देही सङ्कल्पनिगडावृतः ।
पुत्रदारगृहादीनि सङ्कल्पयति चानिशम् ॥ ४४ ॥

करतो; मग त्याच्याशी तादात्म्य होऊन, तो आपल्या सर्व क्रिया चिदानंद आत्म्यावर आरोपित करतो. त्या अहंकारामुळे व्याप्त झालेला देहधारी जीव हा त्या अहंकाराने प्रेरित होऊन, संकल्परूपी बेडीने बद्ध होतो आणि तो रात्रंदिवस पुत्र, पत्नी, घर इत्यादींचा संकल्प करीत राहातो. (४२-४४)

सङ्कल्पयन्स्वयं देही परिशोचति सर्वदा ।
त्रयस्तस्याहमो देहा अधमोत्तममध्यमाः ॥ ४५ ॥

तमः सत्त्वरजःसंज्ञा जगतः कारणं स्थितेः ।
तमोरूपाद्धि सङ्कल्पान्नित्यं तामसचेष्टया ॥ ४६ ॥

अत्यन्तं तामसो भूत्वा कृमिकीटत्वमाप्नुयात् ।
सत्त्वरूपो हि सङ्कल्पो धर्मज्ञानपरायणः ॥ ४७ ॥

अदूरमोक्षसाम्राज्यः सुखरूपो हि तिष्ठति ।
रजोरूपो हि सङ्कल्पो लोके स व्यवहारवान् ॥ ४८ ॥

परितिष्ठति संसारे पुत्रदारानुरञ्जितः ।
त्रिविधं तु परित्यज्य रूपमेतन्महामते ॥ ४९ ॥

सङ्कल्पं परमाप्नोति पदमात्मपरिक्षये ।
दृष्टीः सर्वाः परित्यज्य नियम्य मनसा मनः ॥ ५० ॥

सबाह्याभ्यन्तरार्थस्य सङ्कल्पस्य क्षयं कुरु ।
यदि वर्षसहस्राणि तपश्चरसि दारुणम् ॥ ५१ ॥

पातालस्थस्य भूस्थस्य स्वर्गस्थस्यापि तेऽनघ ।
नान्यः कश्चिदुपायोऽस्ति सङ्कल्पोपशमादृते ॥ ५२ ॥

असा संकल्प करणारा देहधारी जीव स्वतःच सर्वदा शोक करीत राहातो. त्या अहंकाराचे उत्तम, मध्यम आणि अधम असे तीन प्रकारचे देह आहेत. त्यांना अनुक्रमाने सत्त्व, रज आणि तम अशी नावे आहेत. हे तिन्ही देह जगाच्या स्थितीचे कारण आहेत. तामस संपल्पामुळे तामस क्रिया केल्याने तमोगुणी जीव कृमी, किडे इत्यादी योनींमध्ये पडतो. सात्त्विक संकल्पाचा जीव हा धर्म व ज्ञान यांमध्ये तत्पर असल्यामुळे सहजपणे मोक्ष-साम्राज्याजवळ राहतो आणि राजस संकल्प असलेला जीव लोकव्यवहार सांभाळत पुत्र व स्त्री यांचेमध्ये अनुरक्त असतो. हे महान बुद्धिमंता, जेव्हा पुरुष संकलपाच्या त्रिविध रूपांचा त्याग करतो, त्या वेळी चित्ताचा लय झाल्यावर त्याला परमपद प्राप्त होते. म्हणून विषयासंबंधीचे सर्व विचार टाकून आणि मनानेच मनाचे नियमन करून, तू बाह्य व अंतर अशा विषयांबद्दलच्या संकल्पांचा नाश कर. हे वत्सा, पाताळ, पृथ्वी आणि स्वर्ग येथे राहून जरी तू हजारो वर्षे कठोर तप केलेस तरी संसाराच्या बंधनातून सुटण्यास संकल्पाच्या नाशाखेरीज अन्य कोणताही उपाय तुला सापडणार नाही. (४५-५२)

अनाबाधेऽविकारे स्वे सुखे परमपावने ।
सङ्कल्पोपशमे यत्नं पौरुषेण परं कुरु ॥ ५३ ॥

म्हणून बाधारहित, स्वानंद-स्वरूप आणि परम पावन अशा संकल्प-नाशासाठी तू धैर्यपूर्वक खूप प्रयत्न कर. (५३)

सङ्कल्पतन्तौ निखिला भावाः प्रोताः किलानघ ।
छिन्ने तन्तौ न जानीमः क्व यान्ति विभवाः पराः ॥ ५४ ॥

हे तात, सर्व भाव हे संकलपरूपी तंतूने विणलेले असतात, असे म्हटले जाते. हा तंतू तुटताच संसारातील अन्य भौतिक ऐश्वर्य कुठे जाते, हे आपणास कळत नाही. (५४)

निःसङ्कल्पो यथाप्राप्तव्यवहारपरो भव ।
क्षये सङ्कल्पजालस्य जीवो ब्रह्मत्वमाप्नुयात् ॥ ५५ ॥

म्हणून संकल्परहित होऊन, प्रारब्धाने जसा प्राप्त झाला आहे, तसा व्यवहार करण्यात तू तत्पर राहा. संकल्पाचे जाळे नष्ट झाल्यावर, जीव हा ब्रह्मत्व प्राप्त करून घेतो. (५५)

अधिगतपरमार्थतामुपेत्य
प्रसभमपास्य विकल्पजालमुच्चैः ।
अधिगमय पदं तदद्वितीयं
विततसुखाय सुषुप्तचित्तवृत्तिः ॥ ५६ ॥

परमार्थाचे ज्ञान प्राप्त करून घेऊन, फार मोठे असे विकल्पाचे जाळे तू बळजबरीने दूर सार आणि सतत आनंद मिळविण्यासाठी, चित्तवृत्ती संपूर्णपणे लीन करून, तू ते अद्वितीय पद प्राप्त करून घे." (५६)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

# सप्तम सर्ग

## भगवान रामांच्या यज्ञात कुश-लवाचे आगमन, सीतेचा पृथ्वीमध्ये प्रवेश, रामचंद्रांचा मातेला उपदेश

*श्रीमहादेव उवाच*

वाल्मीकिना बोधितोऽसौ कुशः सद्यो गतभ्रमः ।
अन्तर्मुक्तो बहिः सर्वमनुकुर्वंश्चचार सः ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले** – हे पार्वती, वाल्मीकींनी असा उपदेश करताच, कुशाची भ्रांती तत्काळ दूर झाली आणि अंतःकरणातील संकल्पांपासून मुक्त होऊन, तो बाहेरील सर्व व्यवहार करीत वावरू लागला. (१)

वाल्मीकिरपि तौ प्राह सीतापुत्रौ महाधियौ ।
तत्र तत्र च गायन्तौ पुरे वीथिषु सर्वतः ॥ २ ॥

रामस्याग्रे प्रगायेतां शुश्रूषुर्यदि राघवः ।
न ग्राह्यं वै युवाभ्यां तद्यदि किञ्चित्प्रदास्यति ॥ ३ ॥

एकदा त्या दोघा महाबुद्धिमान सीतापुत्रांना वाल्मीकींनी असे सांगितले की, "या नगरीत जेथे तेथे रस्त्यांवर, सर्वत्र रामकथेचे गायन करीत तुम्ही फिरा. जर राघवांना ते ऐकावयाची इच्छा असेल तर तुम्ही त्यांच्याही पुढे गायन करा. पण ते जर तुम्हाला काही देऊ लागले, तर तुम्ही घेऊ नका." (२-३)

इति तौ चोदितौ तत्र गायमानौ विचेरतुः ।
यथोक्तमृषिणा पूर्वं तत्र तत्राभ्यगायताम् ॥ ४ ॥

अशा प्रकारे मुनींची आज्ञा मिळाल्यावर ते दोघे गायन करीत करीत फिरू लागले. ज्या प्रमाणे ऋषींनी पूर्वी शिकविले होते त्या प्रमाणे ते दोघे जागोजागी गायन करू लागले. (४)

तां स शुश्राव काकुत्स्थः पूर्वचर्यां ततस्ततः ।
अपूर्वपाठजातिं च गेयेन समभिप्लुताम् ॥ ५ ॥

बालयो राघवः श्रुत्वा कौतूहलमुपेयिवान् ।
अथ कर्मान्तरे राजा समाहूय महामुनीन् ॥ ६ ॥

राज्ञश्चैव नरव्याघ्रः पण्डितांश्चैव नैगमान् ।
पौराणिकान् शब्दविदो ये च वृद्धा द्विजातयः ॥ ७ ॥

एतान्सर्वान्समाहूय गायकौ समवेशयत् ।
ते सर्वे हृष्टमनसो राजानो ब्राह्मणादयः ॥ ८ ॥

रामं तौ दारकौ दृष्ट्वा विस्मिता ह्यनिमेषणाः ।
अवोचन् सर्व एवैते परस्परमथागताः ॥ ९ ॥

आपले पूर्व चरित्र गाईले जात आहे, असे प्रभू रामांनी ऐकले. तसेच ते गाणाऱ्या दोन मुलांची गायन करण्याची पद्धत अपूर्व आहे आणि ती स्वर-तालाने युक्त आहे, हे कानी येताच, राघवांना कुतूहल वाटले. तेव्हा यज्ञकर्माच्या मधल्या विश्रांतीच्या वेळी, नरशार्दूल राजा रामांनी महामुनी, राजे लोक, पंडित, वेदशास्त्र जाणणारे, पौराणिक, शब्दवेत्ते आणि ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य जातीतील वृद्ध लोक या सर्वांना एकत्र बोलावले व त्या दोन गायक बालकांनाही बोलावून घेतले. ब्राह्मण इत्यादी सर्व लोक मनात आनंदित झाले. राम आणि ते दोन बालक यांना पाहिल्यावर सर्वजण विस्मित झाले. त्यांची पापणीही हलेनाशी झाली. ते सर्व जण परस्परांत बोलू लागले की,

इमौ रामस्य सदृशौ बिम्बाद्बिम्बमिवोदितौ ।
जटिलौ यदि न स्यातां न च वल्कलधारिणौ ॥ १० ॥

विशेषं नाधिगच्छामो राघवस्यानयोस्तदा ।
एवं संवदतां तेषां विस्मितानां परस्परम् ॥ ११ ॥

उपचक्रमतुर्गातुं तावुभौ मुनिदारकौ ।
ततः प्रवृत्तं मधुरं गान्धर्वमतिमानुषम् ॥ १२ ॥

'बिंबापासून प्रतिबिंब निर्माण व्हावे, त्या प्रमाणे हे दोन बालक अगदी श्रीरामांसारखेच आहेत. जर या दोघा बालकांना जटा नसत्या आणि जर त्या दोघांनी वल्कले धारण केली नसती तर ते दोघे आणि राघव यातील काहीच फरक आपणास कळला नसता.' आश्चर्यचकित झालेले लोक अशा प्रकारे परस्परांशी बोलत असतानाच, त्या दोन मुनिकुमारांनी गाण्यास प्रारंभ केला आणि तेथे एक अलौकिक मधुर गीत सुरू झाले. (५-१२)

श्रुत्वा तन्मधुरं गीतमपराह्णे रघूत्तमः ।
उवाच भरतं चाभ्यां दीयतामयुतं वसु ॥ १३ ॥

ते मधुर गीत ऐकल्यावर अपरान्ह काळी रघूत्तम भरताला म्हणाले, "या दोघांना दहा हजार सुवर्ण मुद्रा दे." (१३)

दीयमानं सुवर्णं तु न तज्जगृहतुस्तदा ।
किमनेन सुवर्णेन राजन्नौ वन्यभोजनौ ॥ १४ ॥

त्या दोघांनी त्या घेतल्या नाहीत. ते म्हणाले, "हे राजा, आम्ही दोघे वनातील फळे-मुळे खाणारे आहोत. आम्हांला या सुवर्णाचा काय उपयोग ?" (१४)

इति सन्त्यज्य सन्दत्तं जग्मतुर्मुनिसन्निधिम् ।
एवं श्रुत्वा तु चरितं रामः स्वस्यैव विस्मितः ॥ १५ ॥

असे म्हणून दिलेले धन न घेता ते दोघे वाल्मीकी मुनींच्याजवळ गेले. स्वतःचेच चरित्र गाईले गेलेले ऐकून श्रीराम विस्मयचकित झाले. (१५)

ज्ञात्वा सीताकुमारौ तौ शत्रुघ्नं चेदमब्रवीत् ।
हनूमन्तं सुषेणं च बिभीषणमथाङ्गदम् ॥ १६ ॥

भगवन्तं महात्मानं वाल्मीकिं मुनिसत्तमम् ।
आनयध्वं मुनिवरं ससीतं देवसम्मितम् ॥ १७ ॥

ते दोघे बालक सीतेचे पुत्र आहेत, हे कळल्यावर राम हे शत्रुघ्न, हनुमंत, सुषेण, बिभीषण आणि अंगद यांना म्हणाले. "देवासमान असणाऱ्या महात्मा, भगवान मुनिश्रेष्ठ वाल्मीकी मुनींना सीतेसह इकडे घेऊन या. (१६-१७)

अस्यास्तु पर्षदो मध्ये प्रत्ययं जनकात्मजा ।
करोतु शपथं सर्वे जानन्तु गतकल्मषाम् ॥ १८ ॥

सीतां तद्वचनं श्रुत्वा गताः सर्वेऽतिविस्मिताः ।
ऊचुर्यथोक्तं रामेण वाल्मीकिं रामपार्षदाः ॥ १९ ॥

या सभेमध्ये सर्व सभासदांचा विश्वास बसावा म्हणून जनककन्या सीतेने शपथ घ्यावी. त्यामुळे सीता ही निष्कलंक आहे, हे सर्व लोकांना कळून येईल." ते वचन ऐकून सर्वजण अतिशय विस्मित झाले. रामांचे दूत मग वाल्मीकींकडे गेले आणि श्रीरामांनी जसे सांगितले होते तसे त्यांनी वाल्मीकींना सांगितले. (१८-१९)

रामस्य हृद्गतं सर्वं ज्ञात्वा वाल्मीकिरब्रवीत् ।
श्वः करिष्यति वै सीता शपथं जनसंसदि ॥ २० ॥

योषितां परमं दैवं पतिरेव न संशयः ।
तच्छ्रुत्वा सहसा गत्वा सर्वे प्रोचुर्मुनेर्वचः ॥ २१ ॥

राघवस्यापि रामोऽपि श्रुत्वा मुनिवचस्तथा ।
राजानो मनयः सर्वे श्रृणुध्वमिति चाब्रवीत् ॥ २२ ॥

श्रीरामांचे सर्व हृद्गत जाणून वाल्मीकी म्हणाले, "उद्या लोकांच्या सभेत सीता शपथ घेईल. स्त्रियांच्या बाबतीत पती हाच श्रेष्ठ देव असतो, यात संशय नाही." ते ऐकून सेवक परत आले आणि त्यांनी मुनींचे वचन राघवाला सांगितले. ते ऐकल्यावर श्रीरामसुद्धा म्हणाले, "हे राजे लोकहो आणि मुनिहो, तुम्ही सर्व लोकांनी सीतेची शपथ ऐका आणि त्यावरून ती शुद्ध आहे किंवा अशुद्ध

सीतायाः शपथं लोका विजानन्तु शुभाशुभम् ।
इत्युक्ता राघवेणाथ लोकाः सर्वे दिदृक्षवः ॥ २३ ॥

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्राश्चैव महर्षयः ।
वानराश्च समाजग्मुः कौतूहलसमन्विताः ॥ २४ ॥

ततो मुनिवरस्तूर्णं ससीतः समुपागमत् ।
अग्रतस्तमृषिं कृत्वायान्ती किञ्चिदवाङ्मुखी ॥ २५ ॥

कृताञ्जलिर्बाष्पकण्ठा सीता यज्ञं विवेश तम् ।
दृष्ट्वा लक्ष्मीमिवायान्तीं ब्रह्माणमनुयायिनीम् ॥ २६ ॥

वाल्मीकेः पृष्ठतः सीतां साधुवादो महानभूत् ।
तदा मध्ये जनौघस्य प्रविश्य मुनिपुङ्गवः ॥ २७ ॥

सीतासहायो वाल्मीकिरिति प्राह च राघवम् ।
इयं दाशरथे सीता सुव्रता धर्मचारिणी ॥ २८ ॥

अपापा ते पुरा त्यक्ता ममाश्रमसमीपतः ।
लोकापवादभीतेन त्वया राम महावने ॥ २९ ॥

प्रत्ययं दास्यते सीता तदनुज्ञातुमर्हसि ।
इमौ तु सीतातनयाविमौ यमलजातकौ ॥ ३० ॥

सुतौ तु तव दुर्धर्षौ तथ्यमेतद्ब्रवीमि ते ।
प्रचेतसोऽहं दशमः पुत्रो रघुकुलोद्वह ॥ ३१ ॥

अनृतं न स्मराम्युक्तं तथेमौ तव पुत्रकौ ।
बहून्वर्षगणान् सम्यक्तपश्चर्या मया कृता ॥ ३२ ॥

नोपाश्नीयां फलं तस्या दुष्टेयं यदि मैथिली ।
वाल्मीकिनैवमुक्तस्तु राघवः प्रत्यभाषत ॥ ३३ ॥

एवमेतन्महाप्राज्ञ यथा वदसि सुव्रत ।
प्रत्ययो जनितो मह्यं तव वाक्यैरकिल्बिषैः ॥ ३४ ॥

लङ्कायामपि दत्तो मे वैदेह्या प्रत्ययो महान् ।
देवानां पुरतस्तेन मन्दिरे सम्प्रवेशिता ॥ ३५ ॥

आहे, हे जाणून घ्या." असे राघवांनी म्हटल्यावर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य तसेच शूद्र, महर्षी आणि वानर हे सर्व जण कुतूहलाने पाहाण्यासाठी सभेला आले. (२०-२४)

त्यानंतर मुनिश्रेष्ठ वाल्मीकी सीतेला घेऊन त्वरित तेथे आले. त्या ऋषींच्या मागोमाग येणाऱ्या किंचित खाली पाहात असलेल्या, हात जोडलेल्या, गद्‌गद कंठ झालेल्या सीतेने यज्ञमंडपात प्रवेश केला. ब्रह्मदेवांच्या मागोमाग येणाऱ्या लक्ष्मीप्रमाणे, वाल्मीकीच्या मागोमाग येणाऱ्या सीतेला पाहून लोक 'धन्य, धन्य' असे म्हणू लागले. तेव्हा सीतेला बरोबर घेऊन मुनिश्रेष्ठ वाल्मीकी लोकांच्या समुदायात शिरले आणि राघवांना म्हणाले, "हे दशरथपुत्र रामा, ही सीता पतिव्रता, धर्माचे आचरण करणारी, निष्पाप अशी असूनसुद्धा, हे रामा, लोकापवादाला भिऊन तुम्ही तिला भयंकर अरण्यात माझ्या आश्रमाच्याजवळ सोडून दिले होते. (२५-२९)

आता ही आपल्या शुद्धतेची खात्री देईल. त्यास तुम्ही अनुज्ञा द्या. हे दोन सीतेचे पुत्र असून दोघे जुळे जन्मलेले होते. (३०)

हे दोघे दुर्जय वीर तुमचे पुत्र आहेत, हे सत्य आहे, तेच मी सांगतो. हे रघुकुलश्रेष्ठा, मी प्रजापतीचा दहावा पुत्र आहे. (३१)

मी कधी खोटे बोललो आहे, असे मला आठवत नाही. हे दोघे तुमचेच दोन पुत्र आहेत, हे सत्यच मी तुम्हाला सांगितले आहे. मी अनेक वर्षे खूप तपश्चर्या केलेली आहे. (३२)

ही मैथिली जर अपवित्र आचरणाची असेल तर मला माझ्या त्या तपश्चर्येचे कोणतेही फळ मिळणार नाही." वाल्मीकींनी अशा प्रकारे सांगितल्यावर राघवांनी प्रत्युत्तर दिले. (३३)

"हे महाज्ञानी सुव्रता, तुम्ही सांगितले ते तसेच आहे. तुमच्या सत्य वाक्यांनी मला सीतेविषयी विश्वास निर्माण झाला आहे. (३४)

लंकेमध्येसुद्धा सर्व देवांच्या समोर वैदेहीने अग्निप्रवेश करून शुद्धतेची खात्री दिली होती. म्हणूनच मी तिला माझ्या घरात प्रवेश दिला होता. (३५)

लोकभयाद् ब्रह्मन्नपापापि सती पुरा ।
मया परित्यक्ता भवांस्तत्क्षन्तुमर्हति ॥ ३६ ॥

जातौ जानामि पुत्रावेतौ कुशीलवौ ।
ां जगतीमध्ये सीतायां प्रीतिरस्तु मे ॥ ३७ ॥

पर्वे परिज्ञाय रामाभिप्रायमुत्सुकाः ।
मग्रतः कृत्वा समाजग्मुः सहस्रशः ॥ ३८ ॥

समागमन्हृष्टाः सीता कौशेयवासिनी ।
खी ह्यधोदृष्टिः प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् ॥ ३९ ॥

यं यथाहं वै मनसापि न चिन्तये ।
। धरणी देवी विवरं दातुमर्हति ॥ ४० ॥

पन्त्याः सीतायाः प्रादुरासीन्महाद्भुतम् ।
देव्यमत्यर्थं सिंहासनमनुत्तमम् ॥ ४१ ॥

ध्रियमाणं च दिव्यदेहै रविप्रभम् ।
जानकीं दोर्भ्यां गृहीत्वा स्नेहसंयुता ॥ ४२ ॥

तामुवाचैनामासने संन्यवेशयत् ।
नस्थां वैदेहीं प्रविशन्तीं रसातलम् ॥ ४३ ॥

पुष्पवृष्टिर्दिव्या सीतामवाकिरत् ।
दश्च सुमहान् देवानां परमाद्भुतः ॥ ४४ ॥

बहुधा वाचो ह्यन्तरिक्षगताः सुराः ।
शे च भूमौ च सर्वे स्थावरजङ्गमाः ॥ ४५ ॥

महाकायाः सीताशपथकारणात् ।
न्तापरास्तस्य केचिद्ध्यानपरायणाः ॥ ४६ ॥

नं निरीक्षन्तः केचित्सीतामचेतसः ।
त्रं तत्सर्वं तूष्णीभूतमचेतनम् ॥ ४७ ॥

शनं दृष्ट्वा सर्वं सम्मोहितं जगत् ।
सर्वं ज्ञात्वैव भविष्यत्कार्यगौरवम् ॥ ४८ ॥

तथापि, हे ब्रह्मन्, लोकापवादामुळे सती सीता निर्दोष असूनसुद्धा मी पूर्वी तिचा त्याग केला होता. तुम्ही माझ्या या अपराधाची मला क्षमा करा. (३६)

हे कुश आणि लव हे दोन पुत्र सीतेला माझ्यापासून झाले आहेत, हेही मला माहीत आहे. येथे सभेमध्ये शुद्धी सिद्ध झाल्यावर या सीतेवर माझी प्रीती राहीलच." (३७)

त्या वेळी श्रीरामांचा अभिप्राय जाणून सर्व देव अतिशय उत्सुक होऊन, ब्रह्मदेवांना पुढे करून, हजारोंच्या संख्येने तेथे एकत्र आले. तसेच हजारो प्रजाननसुद्धा आनंदित मनाने तेथे एकत्र जमले. त्या वेळी रेशमी वस्त्र धारण केलेल्या, उत्तरेकडे तोंड करून परंतु दृष्टी खाली केलेल्या सीतेने हात जोडले आणि ती म्हणाली. (३८-३९)

"जर मी मनानेसुद्धा रामाखेरीज अन्य पुरुषाचा विचार केलेला नसेल तर, पृथ्वी देवी आपल्या पोटात मला आश्रय देवो." (४०)

सीतेने अशी शपथ घेताच, तेथे भूमीच्या आतून एक अतिशय अद्‌भुत, दिव्य आणि उत्तम असे सिंहासन प्रकट झाले. (४१)

सूर्याप्रमाणे तेजस्वी असणारे ते सिंहासन दिव्य शरीर धारण करणाऱ्या नागराजांनी उचलून धरलेले होते. (त्या सिंहासनावर बसलेल्या) भूदेवीने आपल्या दोन्ही हातांनी जानकीला मोठ्या प्रेमाने धरले, तिचे स्वागत केले आणि शेजारी आसनावर बसविले. नंतर सिंहासनावर बसलेली सीता जेव्हा रसातळात प्रवेश करू लागली, तेव्हा तिच्यावर सतत दिव्य फुलांची वृष्टी होऊ लागली आणि देवांच्या मुखांतून अतिशय अद्‌भुत आणि फार मोठे 'धन्य, धन्य' असा शब्द बाहेर पडू लागला. (४२-४४)

सीतेने शपथ घेतल्यामुळे प्रचंड देह असणारे काही वानर चिंताग्रस्त झाले. आकाशात असलेले देव, अंतरिक्ष आणि पृथ्वी यांवरील सर्व स्थावर-जंगम प्राणी, नाना प्रकारचे शब्द उच्चारू लागले. त्या शपथेमुळे काही जण चिंताग्रस्त झाले, तर काही जण ध्यान-परायण झाले. काही जण श्रीरामांकडे पाहात राहिले, तर काही जण सीतेकडे पाहून गोंधळून गेले. काही काळपर्यंत सर्व लोक स्तब्ध आणि निश्चेष्ट होऊन गेले. (४५-४७)

सीतेने भूमीमध्ये प्रवेश केलेला पाहून सर्व जग संभ्रमित झाले. भविष्यात घडणाऱ्या घटनांचे सर्व महत्त्व जरी श्रीरामांना माहीत होते, तरी ते माहीत नसल्याप्रमाणे

अजानन्निव दुःखेन शुशोच जनकात्मजाम् ।
ब्रह्मणा ऋषिभिः सार्धं बोधितो रघुनन्दनः ॥ ४९ ॥

प्रतिबुद्ध इव स्वप्नाच्चकारानन्तराः क्रियाः ।
विससर्ज ऋषीन् सर्वानृत्विजो ये समागताः ॥ ५० ॥

तान् सर्वान् धनरत्नाद्यैस्तोषयामास भूरिशः ।
उपादाय कुमारौ तावयोध्यामगमत्प्रभुः ॥ ५१ ॥

तदादि निःस्पृहो रामः सर्वभोगेषु सर्वदा ।
आत्मचिन्तापरो नित्यमेकान्ते समुपस्थितः ॥ ५२ ॥

एकान्ते ध्याननिरते एकदा राघवे सति ।
ज्ञात्वा नारायणं साक्षात्कौसल्या प्रियवादिनी ॥ ५३ ॥

भक्त्यागत्य प्रसन्नं तं प्रणता प्राह हृष्टधीः ।
राम त्वं जगतामादिरादिमध्यान्तवर्जितः ॥ ५४ ॥

परमात्मा परानन्दः पूर्णः पुरुष ईश्वरः ।
जातोऽसि मे गर्भगृहे मम पुण्यातिरेकतः ॥ ५५ ॥

अवसाने ममाप्यद्य समयोऽभूद्रघूत्तम ।
नाद्याप्यबोधजः कृत्स्नो भवबन्धो निवर्तते ॥ ५६ ॥

इदानीमपि मे ज्ञानं भवबन्धनिवर्तकम् ।
यथा सङ्क्षेपतो भूयात्तथा बोधय मां विभो ॥ ५७ ॥

निर्वेदवादिनीमेवं मातरं मातृवत्सलः ।
दयालुः प्राह धर्मात्मा जराजर्जरितां शुभाम् ॥ ५८ ॥

मार्गास्त्रयो मया प्रोक्ताः पुरा मोक्षाप्तिसाधकाः ।
कर्मयोगो ज्ञानयोगो भक्तियोगश्च शाश्वतः ॥ ५९ ॥

भक्तिर्विभिद्यते मातस्त्रिविधा गुणभेदतः ।
स्वभावो यस्य यस्तेन तस्य भक्तिर्विभिद्यते ॥ ६० ॥

यस्तु हिंसां समुद्दिश्य दम्भं मात्सर्यमेव वा ।
भेददृष्टिश्च संरम्भी भक्तो मे तामसः स्मृतः ॥ ६१ ॥

दुःखाने सीतेविषयी शोक करू लागले. त्या वेळी ऋषींसहित ब्रह्मदेवांनी रघुनंदनांना बोध केला. (४८-४९)

स्वप्नातून जागे झालेल्या माणसाप्रमाणे, भानावर आलेल्या श्रीरामांनी यज्ञाच्या उरलेल्या क्रिया समाप्त केल्या. नंतर एकत्र आलेल्या सर्व ऋषींना आणि ऋत्विजांना त्यांनी निरोप दिला. (५०)

त्या सर्वांना पुष्कळ धन, रत्ने इत्यादी देऊन श्रीरामांनी संतुष्ट केले. नंतर लव आणि कुश या दोघा कुमारांना बरोबर घेऊन, प्रभू राम अयोध्येत आले. (५१)

तेव्हापासून श्रीराम सर्व भोगांपासून विरक्त होऊन, सतत आत्मचिंतन करीत एकांतात राहू लागले. (५२)

एकदा एकांतात प्रभू राम ध्यानामध्ये निमग्न असताना, राम हे साक्षात नारायण आहेत हे जाणून, मधुर भाषिणी कौसल्या भक्तीने रामांजवळ आली आणि आनंदित मनाने नमस्कार करून, प्रसन्न असणाऱ्या रामांना ती म्हणाली, "हे रामा, तू सर्व जगांचे आदिकारण आहेस. तू आदि, मध्य आणि अंत यांनी रहित आहेस. (५३-५४)

तू परमात्मा, परमानंद, पूर्ण व जीव रूपाने शरीररूपी नगरीत शयन करणारा आणि सर्वांचा ईश्वर आहेस. तरीसुद्धा माझ्या प्रबल पुण्यामुळे तू माझ्या गर्भात जन्माला आला आहेस. (५५)

हे रघूत्तमा, आता माझ्या वृद्धापकाळी तुला काही विचारण्यास संधी मिळाली आहे. अजूनसुद्धा माझा अज्ञानजन्य संसारबंध संपूर्णपणे तुटलेला नाही. (५६)

तेव्हा हे विभो, ज्यामुळे या स्थितीत माझ्या संसार बंधनाचा नाश करणारे ज्ञान मला प्राप्त होईल त्याचा तू मला संक्षेपाने बोध कर." (५७)

अशा प्रकारे वैराग्यपूर्ण वचन बोलणाऱ्या शुभलक्षणसंपन्न वृद्ध मातेला मातृभक्त, दयाळू आणि धर्मात्मा श्रीराम म्हणाले. "मोक्षाच्या प्राप्तीला साधनभूत होणारे तीन सनातन मार्ग मी पूर्वी सांगितले होते, ते म्हणजे कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग. हे माते, सत्त्व इत्यादी गुणांच्या भेदामुळे भक्तीचे तीन प्रकार होतात. ज्याचा जसा स्वभाव असेल, त्या प्रमाणे त्या प्रकाराची त्याची भक्ती वेगळी असते. जो माणूस हिंसा, दंभ आणि मत्सर यांचा उद्देश मनात धरून भक्ती करतो, तसेच ज्याची भेद- दृष्टी असते आणि जो क्रोधी किंवा आग्रही असतो, अशा माझ्या भक्ताला तामस भक्त म्हणतात. (५८-६१)

फलाभिसन्धिर्भोगार्थी धनकामो यशस्तथा ।
अर्चादौ भेदबुद्ध्या मां पूजयेत्स तु राजसः ॥ ६२ ॥

परस्मिन्नर्पितं यस्तु कर्म निर्हरणाय वा ।
कर्तव्यमिति वा कुर्याद्भेदबुद्ध्या स सात्त्विकः ॥ ६३ ॥

मद्गुणाश्रयणादेव मय्यनन्तगुणालये ।
अविच्छिन्ना मनोवृत्तिर्यथा गङ्गाम्बुनोऽम्बुधौ ॥ ६४ ॥

तदेव भक्तियोगस्य लक्षणं निर्गुणस्य हि ।
अहैतुक्यव्यवहिता या भक्तिर्मयि जायते ॥ ६५ ॥

सा मे सालोक्यसामीप्यसार्ष्टिसायुज्यमेव वा ।
ददात्यपि न गृह्णन्ति भक्ता मत्सेवनं विना ॥ ६६ ॥

स एवात्यन्तिको योगो भक्तिमार्गस्य भामिनि ।
मद्भावं प्राप्नुयात्तेन अतिक्रम्य गुणत्रयम् ॥ ६७ ॥

महता कामहीनेन स्वधर्माचरणेन च ।
कर्मयोगेन शस्तेन वर्जितेन विहिंसनात् ॥ ६८ ॥

मद्दर्शनस्तुतिमहापूजाभिः स्मृतिवन्दनैः ।
भूतेषु मद्भावनया सङ्गेनासत्यवर्जनैः ॥ ६९ ॥

बहुमानेन महतां दुःखिनामनुकम्पया ।
स्वसमानेषु मैत्र्या च यमादीनां निषेवया ॥ ७० ॥

वेदान्तवाक्यश्रवणान्मम नामानुकीर्तनात् ।
सत्सङ्गेनार्जवेनैव ह्यहमः परिवर्जनात् ॥ ७१ ॥

काङ्क्षया मम धर्मस्य परिशुद्धान्तरो जनः ।
मद्गुणश्रवणादेव याति मामञ्जसा जनः ॥ ७२ ॥

यथा वायुवशाद्गन्धः स्वाश्रयाद्घ्राणमाविशेत् ।
योगाभ्यासरतं चित्तमेवमात्मानमाविशेत् ॥ ७३ ॥

जो पुरुष फळाची इच्छा बाळगतो, जो भोगांची इच्छा करतो, तसेच जो द्रव्य आणि कीर्ती यांची इच्छा धरतो, आणि भेद-बुद्धीने स्वतःला व मला वेगळा समजून माझी पूजा करतो, तो राजस भक्त होय. (६२)

जो पुरुष परमात्म्याला समर्पण करण्याच्या भावनेने कर्म करतो, अथवा कर्मांचा क्षय करण्यासाठी निष्काम भावनेने किंवा हे माझे कर्तव्य आहे, या भावनेने सगुण भगवंताची उपासना मानून भेदबुद्धीने कर्म करतो, तो सात्त्विक भक्त होय. (६३)

ज्या प्रमाणे गंगेचे पाणी हे अखंडपणे समुद्रात लीन होत असते, त्याप्रमाणे माणसाची मनोवृत्ती माझ्या गुणांच्या आश्रयानेच अनंत गुणांचे घर असणाऱ्या माझ्या ठिकाणी अविच्छिन्नपणे लागून राहाते, तेच माझ्या निर्गुण भक्तियोगाचे लक्षण आहे. तेव्हा माझ्या ठिकाणी निष्कामपणाने आणि सातत्याने जी भक्ती उत्पन्न होते, ती भक्ती भक्ताला माझी सालोक्य, सामीप्य, सार्ष्टी आणि सायुज्य* अशी चार प्रकारची मुक्ती मिळवून देते. तथापि माझे भक्त माझ्या सेवेऐवजी अन्य काहीही ग्रहण करीत नाहीत. हे माते, भक्तिमार्गाचा हाच आत्यंतिक योग आहे. भक्तियोगाने माझा भक्त तीन गुणांचे पलीकडे जाऊन, माझे स्वरूप प्राप्त करून घेतो. (६४-६७)

ज्याला कोणतीही इच्छा नसते, जो हिंसेने रहित आहे, जो स्वधर्माचे आचरण करतो, अशा प्रशस्त कर्मयोगाच्याद्वारा माझे दर्शन, माझी स्तुती, माझी महापूजा करून, माझे स्मरण आणि मला वंदन करून, भूतांचे ठिकाणी मी म्हणजे ईश्वर आहे अशी भावना धरतो, आसक्ती सोडून, असत्याचा त्याग करतो, महापुरुषांना अथवा वडीलधाऱ्या माणसांना बहुमान देतो, दुःखी लोकांवर दया दाखवितो, स्वतःशी समान असणाऱ्या माणसाशी मैत्री करून, यम-नियम इत्यादींचे पालन करतो, वेदांत वाक्यांचे श्रवण करतो, माझ्या नावाचे गुणगान करतो, सत्संग करतो, सर्वांशी सरळपणाने वागतो, अहंकाराचा त्याग करतो, माझ्या भागवत धर्माची इच्छा धरतो आणि ज्याचे चित्त शुद्ध झाले आहे, असा माणूस माझ्या गुणांचे श्रवण करूनच अनायासे माझ्याप्रत येतो. (६८-७२)

ज्या प्रमाणे वायूच्या मार्फत गंध आपला आश्रय सोडून घ्राणेंद्रियात प्रवेश करतो, त्याप्रमाणे योगाच्या अभ्यासात निमग्न झालेले चित्त आत्म्यामध्येच लीन होऊन जाते. (७३)

* भगवंताचे वैकुंठ इत्यादी लोक प्राप्त करून घेणे ही सालोक्य मुक्ती आहे. सतत भगवंताचेच समीप राहाणे म्हणजे सामीप्य मुक्ती. भगवंताप्रमाणे ऐश्वर्य प्राप्त करून घेणे म्हणजे सार्ष्टी आणि भगवंतात लीन होणे ही सायुज्य मुक्ती होय.

सर्वेषु प्राणिजातेषु ह्यहमात्मा व्यवस्थितः ।
तमज्ञात्वा विमूढात्मा कुरुते केवलं बहिः ॥ ७४ ॥

सर्व प्राणिजातामध्ये आत्म्याच्या रूपाने मीच आहे, हे त्या (आत्म्या)ला न जाणता मूढ मनाचा माणूस केवळ बाह्य गोष्टींत रमून जातो. (७४)

क्रियोत्पन्नैर्नैकभेदैर्द्रव्यैर्मे नाम्ब तोषणम् ।
भूतावमानिनार्चायामर्चितोऽहं न पूजितः ॥ ७५ ॥

हे माते, कर्मांनी उत्पन्न होणाऱ्या अनेक प्रकारच्या पदार्थांनी मला संतोष होत नाही. प्राण्यांचा अपमान करणाऱ्या माणसाने जरी माझी पूजा केली, तरी त्याने मी पूजिला जातो, असे मात्र होत नाही. (७५)

तावन्मामर्चयेद्देवं प्रतिमादौ स्वकर्मभिः ।
यावत्सर्वेषु भूतेषु स्थितं चात्मनि न स्मरेत् ॥ ७६ ॥

जोपर्यंत सर्व भूतांमध्ये तसेच स्वतःच्या देहात मी ईश्वर आहे, ही गोष्ट लक्षात येत नाही, तोपर्यंत माणसाने स्वतःच्या कर्मांनी प्रतिमा इत्यादींमध्ये देव म्हणून माझी पूजा करावी. (७६)

यस्तु भेदं प्रकुरुते स्वात्मनश्च परस्य च ।
भिन्नदृष्टेर्भयं मृत्युस्तस्य कुर्यान्न संशयः ॥ ७७ ॥

जे कोणी स्वतःचा जीवात्मा आणि परमात्मा यांमध्ये भेद करतात, त्या भेदबुद्धीच्या सर्व माणसांना मृत्यू हा भय दाखवितो, यांत संशय नाही. (७७)

मामतः सर्वभूतेषु परिच्छिन्नेषु संस्थितम् ।
एकं ज्ञानेन मानेन मैत्र्या चार्चेदभिन्नधीः ॥ ७८ ॥

म्हणून देहधारी सर्व भूतांमध्ये मी एकटाच वास करीत असतो, असे जाणून अभेद-बुद्धी बाळगून माणसाने ज्ञान, मान आणि मैत्री या रूपांनी माझी पूजा करावी. (७८)

चेतसैवानिशं सर्वभूतानि प्रणमेत्सुधीः ।
ज्ञात्वा मां चेतनं शुद्धं जीवरूपेण संस्थितम् ॥ ७९ ॥

तस्मात्कदाचिन्नेक्षेत भेदमीश्वरजीवयोः ।
भक्तियोगो ज्ञानयोगो मया मातरुदीरितः ॥ ८० ॥

आलम्ब्यैकतरं वापि पुरुषः शुभमृच्छति ।
ततो मां भक्तियोगेन मातः सर्वहृदि स्थितम् ॥ ८१ ॥

पुत्ररूपेण वा नित्यं स्मृत्वा शान्तिमवाप्स्यसि ।
श्रुत्वा रामस्य वचनं कौसल्यानन्दसंयुता ॥ ८२ ॥

रामं सदा हृदि ध्यात्वा छित्त्वा संसारबन्धनम् ।
अतिक्रम्य गतीस्तिस्त्रोऽप्यवाप परमां गतिम् ॥ ८३ ॥

कैकेयी चापि योगं रघुपतिगदितं
पूर्वमेवाधिगम्य
श्रद्धाभक्तिप्रशान्ता हृदि रघुतिलकं
भावयन्ती गतासुः ।
गत्वा स्वर्गं स्फुरन्ती दशरथसहिता
मोदमानावतस्थे
माता श्रीलक्ष्मणस्याप्यतिविमलमतिः
प्राप भर्तुः समीपम् ॥ ८४ ॥

अशा प्रकारे चेतन, शुद्ध असा मीच सर्व प्राण्यांचे ठायी जीवरूपाने राहात असतो, हे जाणून बुद्धिमान पुरुषाने अंतःकरणपूर्वक सर्व भूतांना सतत प्रणाम करावा. म्हणून जीव आणि ईश्वर यांत भेद आहे, असे कधीही मानू नये. हे माते, भक्तियोग आणि ज्ञानयोग मी तुला सांगितला. यां पैकी कोणत्याही एकाचा अवलंब करून, माणूस आत्यंतिक कल्याण प्राप्त करून घेतो. म्हणून हे माते सर्वांच्या हृदयात मीच राहातो किंवा मी तुझा पुत्र आहे, हे लक्षात घेऊन, भक्तियोगाचेद्वारा जर तू सतत माझे स्मरण करशील, तर तुला शांती प्राप्त होईल." श्रीरामांचे हे असे वचन ऐकल्यावर कौसल्या आनंदित झाली. हृदयात श्रीरामांचे सदा ध्यान केल्याने, संसाराचे बंधन तोडून आणि तिन्ही प्रकारच्या गतींचे उल्लंघन करून, ती परम गतीला गेली. रघुपतींनी सांगितलेला योग कैकेयीला अगोदरच चित्रकूट पर्वतावर प्राप्त झालेला होता. श्रद्धा आणि भक्ती यांनी अत्यंत शांत झालेली कैकेयी रघुतिलक श्रीरामांचे चिंतन करीत असे. पुढे मृत्यूनंतर स्वर्गात गेल्यावर तिला दिव्य कांती प्राप्त झाली व तेथे ती दशरथांसह आनंदाने राहू लागली. याच प्रमाणे अतिशय निर्मळ मन असणारी, लक्ष्मणाची माता सुमित्रासुद्धा आपल्या पतीच्याजवळ पोचली. (७९-८४)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकाण्डे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

# अष्टम सर्ग

## कालाचे आगमन, लक्ष्मणाचा त्याग आणि त्याचे स्वर्गगमन

*श्रीमहादेव उवाच*

अथ काले गते कस्मिन् भरतो भीमविक्रमः ।
युधाजिता मातुलेन ह्याहूतोऽगात्ससैनिकः ॥ १ ॥

रामाज्ञया गतस्तत्र हत्वा गन्धर्वनायकान् ।
तिस्रः कोटीः पुरे द्वे तु निवेश्य रघुनन्दनः ॥ २ ॥

पुष्करं पुष्करावत्यां तक्षं तक्षशिलाह्वये ।
अभिषिच्य सुतौ तत्र धनधान्यसुहृद्वृतौ ॥ ३ ॥

पुनरागत्य भरतो रामसेवापरोऽभवत् ।
ततः प्रीतो रघुश्रेष्ठो लक्ष्मणं प्राह सादरम् ॥ ४ ॥

उभौ कुमारौ सौमित्रे गृहीत्वा पश्चिमां दिशम् ।
तत्र भिल्लान्विनिर्जित्य दुष्टान् सर्वापकारिणः ॥ ५ ॥

अङ्गदश्चित्रकेतुश्च महासत्त्वपराक्रमौ ।
द्वयोर्द्वे नगरे कृत्वा गजाश्वधनरत्नकैः ॥ ६ ॥

अभिषिच्य सुतौ तत्र शीघ्रमागच्छ मां पुनः ।
रामस्याज्ञां पुरस्कृत्य गजाश्वबलवाहनः ॥ ७ ॥

गत्वा हत्वा रिपून् सर्वान् स्थापयित्वा कुमारकौ ।
सौमित्रिः पुनरागत्य रामसेवापरोऽभवत् ॥ ८ ॥

ततस्तु काले महति प्रयाते
रामं सदा धर्मपथे स्थितं हरिम् ।
द्रष्टुं समागादृषिवेषधारी
कालस्ततो लक्ष्मणमित्युवाच ॥ ९ ॥

निवेदयस्वातिबलस्य दूतं
मां द्रष्टुकामं पुरुषोत्तमाय ।
रामाय विज्ञापनमस्ति तस्य
महर्षिमुख्यस्य चिराय धीमन् ॥ १० ॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा सौमित्रिस्त्वरयान्वितः ।
आचचक्षेऽथ रामाय स सम्प्राप्तं तपोधनम् ॥ ११ ॥

**श्रीमहादेव म्हणाले–** हे पार्वती, नंतर काही काळ गेला असता प्रचंड पराक्रम असणाऱ्या भरताला त्याच्या युधाजित मामाकडून बोलावणे आले. श्रीरामांच्या आज्ञेने सैनिकांसह भरत तिकडे गेला. तेथे गेल्यावर रघुनंदन भरताने तीन कोटी गंधर्व- नायकांचा वध केला आणि तेथेच त्याने दोन नगरे वसविली. (१-२)

त्या दोन नगरीपैकी पुष्करावती नगरीत पुष्कर आणि तक्षशिला नावाच्या नगरात तक्ष अशा आपल्या दोन पुत्रांना भरताने राज्याभिषेक केला. तेथे ते धन- धान्यसंपन्न होऊन मित्रांसह राहू लागले. भरत परत आला आणि श्रीरामांच्या सेवेत तत्पर झाला. नंतर आनंदित झालेले रघुश्रेष्ठ श्रीराम आदरपूर्वक लक्ष्मणाला म्हणाले. (३-४)

" हे लक्ष्मणा, तू तुझ्या दोन कुमारांना घेऊन पश्चिम दिशेला जा. तेथे सर्वांवर अपकार करणाऱ्या दुष्ट भिल्लांचा पराभव कर. नंतर तुझे महाबलवान आणि महापराक्रमी अंगद आणि चित्रकेतू हे पुत्र आहेत, त्या दोघांसाठी दोन नगरे वसव. मग हत्ती, घोडे, द्रव्य, रत्ने या साधनांनी त्या दोन पुत्रांचा तेथे राज्याभिषेक करून, तू सत्वर परत ये." श्रीरामांची आज्ञा शिरोधार्थ मानून हत्ती, घोडे, सैन्य व वाहने यांच्यासह लक्ष्मण गेला आणि सर्व शत्रूंचा वध करून, त्याने दोन्ही कुमारांना राज्यावर बसविले आणि मग परत येऊन लक्ष्मण श्रीरामांची सेवा करण्यात तत्पर झाला. (५-८)

त्यानंतर पुष्कळ काळ निघून गेला. धर्माच्या मार्गाचा अवलंब करणाऱ्या हरिरूपी रामांना भेटण्यासाठी, ऋषीचा वेष धारण केलेला काळ आला. तो काळ लक्ष्मणाला म्हणाला. (९)

"हे बुद्धिमान लक्ष्मणा, अतिबल ऋषींचा दूत म्हणून मी श्रीरामांना भेटण्यास आलो आहे. त्या श्रेष्ठ महर्षींचा निरोप प्रभू रामचंद्रांना सांगण्यास मला बराच वेळ लागणार आहे. ही गोष्ट तू पुरुषोत्तम रामांना जाऊन निवेदन कर." (१०)

त्याचे ते वचन ऐकल्यावर, लक्ष्मण त्वरेने श्रीरामांकडे गेला आणि तपस्वी ऋषी आले आहेत, असे त्याने सांगितले. (११)

एवं ब्रुवन्तं प्रोवाच लक्ष्मणं राघवो वचः ।
शीघ्रं प्रवेश्यतां तात मुनिः सत्कारपूर्वकम् ॥ १२ ॥

लक्ष्मणस्तु तथेत्युक्त्वा प्रावेशयत तापसम् ।
स्वतेजसा ज्वलन्तं तं घृतसिक्तं यथानलम् ॥ १३ ॥

सोऽभिगम्य रघुश्रेष्ठं दीप्यमानः स्वतेजसा ।
मुनिर्मधुरवाक्येन वर्धस्वेत्याह राघवम् ॥ १४ ॥

तस्मै स मुनये रामः पूजां कृत्वा यथाविधि ।
पृष्ट्वानामयमव्यग्रो रामः पृष्टोऽथ तेन सः ॥ १५ ॥

दिव्यासने समासीनो रामः प्रोवाच तापसम् ।
यदर्थमागतोऽसि त्वमिह तत्प्रापयस्व मे ॥ १६ ॥

वाक्येन चोदितस्तेन रामेणाह मुनिर्वचः ।
द्वन्द्वमेव प्रयोक्तव्यमनालक्ष्यं तु तद्वचः ॥ १७ ॥

नान्येन चैतच्छ्रोतव्यं नाख्यातव्यं च कस्यचित् ।
शृणुयाद्वा निरीक्षेद्वा यः स वध्यस्त्वया प्रभो ॥ १८ ॥

तथेति च प्रतिज्ञाय रामो लक्ष्मणमब्रवीत् ।
तिष्ठ त्वं द्वारि सौमित्रे नायात्वत्र जनो रहः ॥ १९ ॥

यथागच्छति को वापि स वध्यो मे न संशयः ।
ततः प्राह मुनिं रामो येन वा त्वं विसर्जितः ॥ २० ॥

यत्ते मनीषितं वाक्यं तद्वदस्व ममाग्रतः ।
ततः प्राह मुनिर्वाक्यं शृणु राम यथातथम् ॥ २१ ॥

ब्रह्मणा प्रेषितोऽस्मीश कार्यार्थे तेऽन्तिकं प्रभो ।
अहं हि पूर्वजो देव तव पुत्रः परन्तप ॥ २२ ॥

मायासङ्गमजो वीर कालः सर्वहरः स्मृतः ।
ब्रह्मा त्वामाह भगवान् सर्वदेवर्षिपूजितः ॥ २३ ॥

रक्षितुं स्वर्गलोकस्य समयस्ते महामते ।
पुरा त्वमेक एवासीर्लोकान् संहृत्य मायया ॥ २४ ॥

असे कथन करणाऱ्या लक्ष्मणाला राघव म्हणाले की, "बंधो, सत्कारपूर्वक त्या मुनींना लवकर आत घेऊन ये." "ठीक आहे" असे म्हणून लक्ष्मणाने त्या तापसाला आत नेले. तुपाचा शिडकाव केलेला अग्नी ज्या प्रमाणे प्रज्वलित झालेला असतो, त्या प्रमाणे तो तापस स्वतःच्या तेजाने देदीप्यमान होता. स्वतःच्या तेजाने दीप्तिमान असणारे ते मुनी रघुश्रेष्ठांजवळ गेले आणि मधुर शब्दांनी म्हणाले, "तुमचा उत्कर्ष होवो." (१२-१४)

त्या मुनींची विधिवत पूजा करून श्रीरामांनी शांतपणे त्या मुनींना त्यांचे क्षेमकुशल विचारले. मग मुनींनीही त्यांचे कुशल विचारले. (१५)

दिव्य आसनावर बसलेल्या श्रीरामांनी त्या तपस्व्यांना म्हटले, "ज्यासाठी तुम्ही येथे आला आहात तो निरोप सांगा." (१६)

रामांकडून अनुज्ञा मिळाल्यावर मुनी रामांना म्हणाले, "मी सांगतो ते अन्य कुणालाही कळू नये, ते आपणा दोघांमध्येच राहावयास हवे. (१७)

हे वचन दुसऱ्या कोणी ऐकावयाचे नाही, तसेच ते दुसऱ्या कुणालाही सांगावयाचे नाही. हे प्रभो, जर कुणी ऐकले किंवा बोलताना आपणास पाहिले, तर प्रभू, तुम्ही त्याचा वध करावयास हवा." (१८)

"ठीक आहे" असे प्रतिज्ञापूर्वक सांगून श्रीराम लक्ष्मणाला म्हणाले, "अरे लक्ष्मणा, तू येथे दाराशी उभा राहा. येथे एकांत स्थानी कुणाही माणसाला येऊ देऊ नकोस. जर कोणी येथे आला तर मी त्याला ठार मारीन, यात संशय नाही." नंतर राम त्या मुनींना म्हणाले, "ज्या कुणी तुम्हांला येथे पाठविले आहे, तसेच तुमच्या मनात जे काही सांगावयाचे आहे, ते आता मला सांगा." तेव्हा मुनी म्हणाले, "हे रामा, मी तुम्हांला खरी गोष्ट आता सांगतो. (१९-२१)

हे प्रभू ईश्वरा, विशिष्ट कार्यासाठी ब्रह्मदेवाने मला तुमच्याकडे पाठविले आहे. हे शत्रुदमना देवा, खरोखर मी तुमचा ज्येष्ठ पुत्र आहे. (२२)

हे वीरा, मायेशी झालेल्या तुमच्या संयोगातून मी उत्पन्न झालो आहे. मी तुमचा पुत्र काल या नावाने प्रसिद्ध आहे. सर्वांचा नाश करणारा म्हणून मी प्रख्यात आहे. सर्व देवर्षींकडून पूजिले गेलेले भगवान ब्रह्मदेव, त्यांनी तुम्हाला सांगितले आहे, (२३)

"हे महाबुद्धिमंता, स्वर्गलोकाचे रक्षण करण्यासाठी तुम्ही परत येण्याची वेळ आली आहे. पूर्वी

भार्यया सहितस्त्वं मामादौ पुत्रमजीजनः ।
तथा भोगवतं नागमनन्तमुदकेशयम् ॥ २५ ॥

मायया जनयित्वा त्वं द्वौ ससत्त्वौ महाबलौ ।
मधुकैटभकौ दैत्यौ हत्वा मेदोऽस्थिसञ्चयम् ॥ २६ ॥

इमां पर्वतसम्बद्धां मेदिनीं पुरुषर्षभ ।
पद्मे दिव्यार्कसङ्काशे नाभ्यामुत्पाद्य मामपि ॥ २७ ॥

मां विधाय प्रजाध्यक्षं मयि सर्वं न्यवेदयत् ।
सोऽहं संयुक्तसम्भारस्त्वामवोचं जगत्पते ॥ २८ ॥

रक्षां विधत्स्व भूतेभ्यो ये मे वीर्यापहारिणः ।
ततस्त्वं कश्यपाज्जातो विष्णुर्वामनरूपधृक् ॥ २९ ॥

हृतवानसि भूभारं वधाद्रक्षोगणस्य च ।
सर्वासूत्सार्यमाणासु प्रजासु धरणीधर ॥ ३० ॥

रावणस्य वधाकाङ्क्षी मर्त्यलोकमुपागतः ।
दशवर्षसहस्राणि दशवर्षशतानि च ॥ ३१ ॥

कृत्वा वासस्य समयं त्रिदशेष्वात्मनः पुरा ।
स ते मनोरथः पूर्णः पूर्णे चायुषि ते नृषु ॥ ३२ ॥

कालस्तापसरूपेण त्वत्समीपमुपागमत् ।
ततो भूयश्च ते बुद्धिर्यदि राज्यमुपासितुम् ॥ ३३ ॥

तत्तथा भव भद्रं ते एवमाह पितामहः ।
यदि ते गमने बुद्धिर्देवलोकं जितेन्द्रिय ॥ ३४ ॥

सनाथा विष्णुना देवा भवन्तु विगतज्वराः ।
चतुर्मुखस्य तद्वाक्यं श्रुत्वा कालेन भाषितम् ॥ ३५ ॥

हसन् रामस्तदा वाक्यं कृत्स्नस्यान्तकमब्रवीत् ।
श्रुतं तव वचो मेऽद्य ममापीष्टतरं तु तत् ॥ ३६ ॥

सन्तोषः परमो ज्ञेयस्त्वदागमनकारणात् ।
त्रयाणामपि लोकानां कार्यार्थं मम सम्भवः ॥ ३७ ॥

सर्व लोकांचा संहार करून तुम्ही एकटेच राहिला होता. नंतर आपली पत्नी माया हिच्याशी संयोग पावून तुम्ही प्रथम मला ब्रह्मदेवास पुत्र म्हणून जन्माला घातले. तसेच पाण्यात शयन करणाऱ्या फणाधारी अनंत नावाच्या शेष नागाला तुम्ही निर्माण केले. (२४-२५)

अशा प्रकारे मायेच्याद्वारा आम्हाला उत्पन्न करून तुम्ही पराक्रमी आणि अतिशय बलवान अशा मधू व कैटभ नावाच्या दोन दैत्यांचा वध करून, त्या दोघांच्या मेद व अस्थि-समूह यांच्यापासून पर्वतांनी युक्त अशी पृथ्वी निर्माण केली. हे पुरुषश्रेष्ठा, नंतर तुमच्या नाभीतील दिव्य सूर्याप्रमाणे तेजस्वी असणाऱ्या अशा कमलात तुम्ही मलासुद्धा उत्पन्न केले आणि मला प्रजापती बनवून तुम्ही विश्वोत्पत्ती करण्याचा सर्व भार माझ्यावर सोपवलात. तेव्हा जगत्पते, तो सर्व भार स्वीकारून मी तुम्हाला म्हणालो. (२६-२८)

माझ्या वीर्याचा म्हणजे प्रजेचा नाश करणारे जे कोणी असतील त्या प्राण्यांपासून तुम्ही माझ्या प्रजेचे रक्षण करा. तेव्हा तुम्ही विष्णू-वामनाचे रूप धारण करून कश्यपापासून जन्माला आलात. (२९)

आणि राक्षस समुदायाचा नाश करून तुम्ही पृथ्वीचा भार हरण केला. हे धरणी धारण करणाऱ्या विष्णो, या काळी सर्व प्रजांचा नाश होत असताना, रावणाचा वध करण्याच्या इच्छेने तुम्ही मर्त्य लोकात गेला होता. पूर्वी देवांजवळ अकरा हजार वर्षे पृथ्वीवर राहाण्याचा स्वतःचा कालावधी तुम्ही निश्चित केला होता. आता तुमचे मनोरथ पूर्ण झाले आहेत आणि मृत्युलोकातील माणसांमध्ये राहाण्याचा तुमचा समयही आता संपला आहे. (३०-३२)

आता तापसरूपाने काल हा तुमच्याजवळ आलेला आहे. जर आणखी काही काळ राज्याचा उपभोग घेण्याची तुमची इच्छा असेल तर तुम्ही तसे ठरवा. तुमचे कल्याण असो.' असे ब्रह्मदेवांनी तुम्हांला सांगितले आहे. या उलट हे जितेंद्रिया, जर देवलोकी परत जाण्याचा तुमचा विचार असेल, तर विष्णूंकडून सनाथ होऊन देव निश्चिंत होऊ देत." कालाने सांगितलेले ते ब्रह्मदेवाचे वचन ऐकल्यावर, त्या वेळी सर्वांचा अंत करणाऱ्या त्या कालाला हसत हसत राम म्हणाले, "आता मी तुझे वचन ऐकले आहे. मलासुद्धा हेच अधिक इष्ट वाटत आहे. (३३-३६)

तुझे आगमन येथे झाले यामुळे मला संतोष झाला आहे. कारण तिन्ही लोकांचे कार्य करण्यासाठी माझा अवतार असतो. (३७)

भद्रं तेऽस्त्वागमिष्यामि यत एवाहमागतः ।
मनोरथस्तु सम्प्राप्तो न मेऽत्रास्ति विचारणा ॥ ३८ ॥

तुझे कल्याण होवो. आता परत येईन. माझे मनोरथ पूर्ण झाले आहेत. आता या बाबतीत मला आणखी विचार करण्याचे काहीच कारण नाही. (३८)

मत्सेवकानां देवानां सर्वकार्येषु वै मया ।
स्थातव्यं मायया पुत्र यथा चाह प्रजापतिः ॥ ३९ ॥

हे पुत्रा, प्रजापती ब्रह्मदेवाने म्हटले आहे, त्या प्रमाणे माझे सेवक असणाऱ्या देवांच्या सर्व कार्यांत सहाय्य करण्यास मी मायेच्या द्वारे उपस्थित राहाणे, हे योग्यच आहे." (३९)

एवं तयोः कथयतोर्दुर्वासा मुनिरभ्यगात् ।
राजद्वारं राघवस्य दर्शनापेक्षया द्रुतम् ॥ ४० ॥

अशा प्रकारे ते श्रीराम व काल दोघे बोलत असताना, राघवांचे दर्शन घेण्याच्या इच्छेने दुर्वास मुनी लगबगीने राजद्वारी आले. (४०)

मुनिर्लक्ष्मणमासाद्य दुर्वासा वाक्यमब्रवीत् ।
शीघ्रं दर्शय रामं मे कार्यं मेऽत्यन्तमाहितम् ॥ ४१ ॥

तच्छ्रुत्वा प्राह सौमित्रिर्मुनिं ज्वलनतेजसम् ।
रामेण कार्यं किं तेऽद्य किं तेऽभीष्टं करोम्यहम् ॥ ४२ ॥

राजा कार्यान्तरे व्यग्रो मुहूर्तं सम्प्रतीक्ष्यताम् ।
तच्छ्रुत्वा क्रोधसन्तप्तो मुनिः सौमित्रिमब्रवीत् ॥ ४३ ॥

अस्मिन् क्षणे तु सौमित्रे न दर्शयसि चेद्विभुम् ।
रामं सविषयं वंशं भस्मीकुर्यां न संशयः ॥ ४४ ॥

लक्ष्मणाजवळ येऊन दुर्वास मुनी म्हणाले, "माझी रामांशी त्वरित भेट करवून दे. त्यांच्याकडे माझे एक अतिशय महत्त्वाचे काम आहे." ते ऐकल्यावर अग्नीप्रमाणे तेजस्वी असणाऱ्या मुनींना लक्ष्मण म्हणाला, "श्रीरामांबरोबर आत्ताच तुमचे काय काम आहे? तुमचे काय अभीष्ट आहे ? मी ते पूर्ण करतो. राजाराम हे दुसऱ्या एका कार्यात व्यग्र आहेत. तेव्हा थोडा वेळ तुम्ही वाट पाहावी. "ते ऐकताच क्रोधाने संतप्त झालेले मुनी लक्ष्मणाला म्हणाले. "अरे लक्ष्मणा, जर तू याच क्षणी माझी प्रभू रामचंद्रांशी भेट घडवून आणली नाहीस, तर संपूर्ण देशासह तुमचा वंश मी भस्म करून टाकीन, हे नक्की समज." (४१-४४)

श्रुत्वा तद्वचनं घोरमृषेर्दुर्वाससो भृशम् ।
स्वरूपं तस्य वाक्यस्य चिन्तयित्वा स लक्ष्मणः ॥ ४५ ॥

सर्वनाशाद्वरं मेऽद्य नाशो ह्येकस्य कारणात् ।
निश्चित्यैवं ततो गत्वा रामाय प्राह लक्ष्मणः ॥ ४६ ॥

दुर्वास ऋषींचे ते भयंकर वाक्य ऐकल्यावर, त्याच्या परिणामाचा लक्ष्मणाने विचार केला. आणि मग एकामुळे सर्वांचा नाश होण्यापेक्षा, आत्ता माझ्या एकट्याचाच नाश होणे हे अधिक श्रेयस्कर आहे, असा निश्चय करून, लक्ष्मण श्रीरामांजवळ गेला आणि श्रीरामांना त्याने सर्व वृत्तांत सांगितला. (४५-४६)

सौमित्रेर्वचनं श्रुत्वा रामः कालं व्यसर्जयत् ।
शीघ्रं निर्गम्य रामोऽपि ददर्शात्रेः सुतं मुनिम् ॥ ४७ ॥

रामोऽभिवाद्य सम्प्रीतो मुनिं पप्रच्छ सादरम् ।
किं कार्यं ते करोमीति मुनिमाह रघूत्तमः ॥ ४८ ॥

तच्छ्रुत्वा रामवचनं दुर्वासा राममब्रवीत् ।
अद्य वर्ष सहस्त्राणामुपवाससमापनम् ॥ ४९ ॥

अतो भोजनमिच्छामि सिद्धं यत्ते रघूत्तम ।
रामो मुनिवचः श्रुत्वा सन्तोषेण समन्वितः ॥ ५० ॥

स सिद्धमन्नं मुनये यथावत्समुपाहरत् ।
मुनिर्भुक्त्वान्नममृतं सन्तुष्टः पुनरभ्यगात् ॥ ५१ ॥

लक्ष्मणाचे वचन ऐकल्यावर, रामांनी कालाला निरोप दिला आणि चट्दिशी बाहेर येऊन रामांनीसुद्धा त्या अत्रि- पुत्र दुर्वास मुनींची भेट घेतली. संतुष्ट मनाने मुनींना अभिवादन करून रामांनी आदरपूर्वक मुनींना प्रश्न केला, "मी तुमचे कोणते कार्य करू?" ते रामांचे वचन ऐकून दुर्वास मुनी रामांना म्हणाले, "हजारो वर्षे केलेल्या माझ्या उपवासाची आज समाप्ती आहे. म्हणून हे रघूत्तमा, तुमच्याकडे जे काही तयार असेल ते भोजन करण्याची माझी इच्छा आहे." मुनींचे वचन ऐकल्यावर रामांना संतोष वाटला. तयार असलेले अन्न श्रीरामांनी मुनींना यथायोग्यपणे खाऊ घातले. ते अमृततुल्य अन्न खाऊन संतुष्ट झालेले मुनी तेथून परत निघून गेले. (४७-५१)

स्वमाश्रमं गते तस्मिन् रामः सस्मार भाषितम् ।
कालेन शोकदुःखार्तो विमनाश्चातिविह्वलः ॥ ५२ ॥

मुनी गेल्यावर, कालाशी झालेले भाषण रामांना आठवले. ते शोक व दुःख यांमुळे खिन्न, विमनस्क, उदास आणि अतिशय व्याकूळ झाले. (५२)

अवाङ्मुखो दीनमना न शशाकाभिभाषितुम् ।
मनसा लक्ष्मणं ज्ञात्वा हतप्रायं रघूद्वहः ॥ ५३ ॥

आता लक्ष्मण मेल्यातच जमा आहे, हे मनाने कळल्यावर, रघुश्रेष्ठ श्रीराम लक्ष्मणाला काही बोलू शकले नाहीत. (५३)

अवाङ्मुखो बभूवाथ तूष्णीमेवाखिलेश्वरः ।
ततो रामं विलोक्याह सौमित्रिर्दुःखसम्प्लुतम् ॥ ५४ ॥

तूष्णीम्भूतं चिन्तयन्तं गर्हन्तं स्नेहबन्धनम् ।
मत्कृते त्यज सन्तापं जहि मां रघुनन्दन ॥५५॥

त्यानंतर सर्वांचे ईश्वर राम खाली मान घालून गप्प बसून राहिले. दुःखाने मौन, चिंतित आणि स्नेहबंधनाची निंदा करणाऱ्या श्रीरामांना पाहून लक्ष्मण म्हणाला, "हे रघुनंदना, माझ्यासाठी तुम्ही त्रास करून घेऊ नका. माझा खुशाल वध करा. (५४-५५)

गतिः कालस्य कलिता पूर्वमेवेदृशी प्रभो ।
त्वयि हीनप्रतिज्ञे तु नरको मे ध्रुवं भवेत् ॥ ५६ ॥

हे प्रभो, मला पूर्वीच असे वाटले होते की कालाची गती अशीच आहे. तुमच्या प्रतिज्ञेचा भंग झाला तर मला निश्चितपणे नरक मिळेल. (५६)

मयि प्रीतिर्यदि भवेद्यद्यनुग्राह्यता तव ।
त्यक्त्वा शङ्कां जहि प्राज्ञ मा मा धर्मं त्यज प्रभो ॥ ५७ ॥

हे प्रभो, जर तुमचे माझ्यावर प्रेम असेल, जर मी तुमच्या अनुग्रहास पात्र असेन, तर तुम्ही शंका सोडून माझा वध करा. हे प्रभो, तुम्ही धर्माचा त्याग करू नका." (५७)

सौमित्रिणोक्तं तच्छ्रुत्वा रामश्चलितमानसः ।
आहूय मन्त्रिणः सर्वान् वसिष्ठं चेदमब्रवीत् ॥ ५८ ॥

लक्ष्मणाने उच्चारलेले वचन ऐकल्यावर रामांचे मन चंचल झाले आणि त्यांनी सर्व मंत्र्यांना आणि वसिष्ठांना बोलावून घेतले आणि (५८)

मुनेरागमनं यत्तु कालस्यापि हि भाषितम् ।
प्रतिज्ञामात्मनश्चैव सर्वमावेदयत्प्रभुः ॥ ५९ ॥

दुर्वास मुनींचे आगमन, कालाचे भाषण आणि स्वतः केलेली प्रतिज्ञा हे सर्व प्रभू रामांनी त्यांना सांगितले. (५९)

श्रुत्वा रामस्य वचनं मन्त्रिणः सपुरोहिताः ।
ऊचुः प्राञ्जलयः सर्वे राममक्लिष्टकारिणम् ॥ ६० ॥

श्रीरामांचे वचन ऐकल्यावर वसिष्ठांच्यासह सर्व मंत्र्यांनी हात जोडले आणि अनायास कोणतेही कार्य करणाऱ्या श्रीरामांना ते म्हणाले. (६०)

पूर्वमेव हि निर्दिष्टं तव भूभारहारिणः ।
लक्ष्मणेन वियोगस्ते ज्ञातो विज्ञानचक्षुषा ॥ ६१ ॥

"पृथ्वीचा भार हरण करणारे तुम्ही. तुमचा लक्ष्मणाशी वियोग होणार हे पूर्वीच ठरले होते. ही गोष्ट अंतर्ज्ञानाने आम्हांला कळलेली आहे. (६१)

त्यजाशु लक्ष्मणं राम मा प्रतिज्ञां त्यज प्रभो ।
प्रतिज्ञाते परित्यक्ते धर्मो भवति निष्फलः ॥ ६२ ॥

तेव्हा हे रामा, आता तुम्ही त्वरित लक्ष्मणाचा त्याग करा. हे प्रभो, तुम्ही आपल्या प्रतिज्ञेचा भंग करू नका. प्रतिज्ञेचा भंग केला असता, धर्म निष्फळ होऊन जातो. (६२)

धर्मे नष्टेऽखिले राम त्रैलोक्यं नश्यति ध्रुवम् ।
त्वं तु सर्वस्य लोकस्य पालकोऽसि रघूत्तम ॥ ६३ ॥

आणि हे रामा, संपूर्ण धर्म नष्ट झाला तर, त्रैलोक्याचा नाश नक्कीच होईल. हे रघूत्तमा, तुम्ही तर सर्व लोकांचे रक्षक आहात. (६३)

त्यक्त्वा लक्ष्मणमेवैकं त्रैलोक्यं त्रातुमर्हसि ।
रामो धर्मार्थसहितं वाक्यं तेषामनिन्दितम् ॥ ६४ ॥

तेव्हा एकट्या लक्ष्मणाचा त्याग करून तुम्ही त्रैलोक्याचे रक्षण करावे." सभेमध्ये त्या लोकांनी उच्चारलेले, धर्म व अर्थ यांनी युक्त असणारे आणि निर्विवाद

सभामध्ये समाश्रुत्य प्राह सौमित्रिमञ्जसा ।
यथेष्टं गच्छ सौमित्रे मा भूद्धर्मस्य संशयः ॥ ६५ ॥

असे ते शब्द ऐकून श्रीराम लगेच लक्ष्मणाला म्हणाले, "हे लक्ष्मणा, जिकडे जायची इच्छा असेल, तिकडे तू जा. म्हणजे धर्माचा लोप होण्याची शंका येणार नाही. (६४-६५)

परित्यागो वधो वापि सतामेवोभयं समम् ।
एवमुक्ते रघुश्रेष्ठे दुःखव्याकुलितेक्षणः ॥ ६६ ॥

त्याग आणि वध हे दोन्हीही सत्पुरुषांचे बाबतीत समान असतात." रघुश्रेष्ठांनी असे म्हटल्यावर लक्ष्मणाचे डोळे दुःखाश्रूंनी डबडबून गेले. (६६)

रामं प्रणम्य सौमित्रिः शीघ्रं गृहमगात्स्वकम् ।
ततोऽगात्सरयूतीरमाचम्य स कृताञ्जलिः ॥ ६७ ॥

नव द्वाराणि संयम्य मूर्ध्नि प्राणमधारयत् ।
यदक्षरं परं ब्रह्म वासुदेवाख्यमव्ययम् ॥ ६८ ॥

पदं तत्परमं धाम चेतसा सोऽभ्यचिन्तयत् ।
वायुरोधेन संयुक्तं सर्वे देवाः सहर्षयः ॥ ६९ ॥

साग्नयो लक्ष्मणं पुष्पैस्तुष्टुवुश्च समाकिरन् ।
अदृश्यं विबुधैः कैश्चित्सशरीरं च वासवः ॥ ७० ॥

गृहीत्वा लक्ष्मणं शक्रः स्वर्गलोकमथागमत् ।
ततो विष्णोश्चतुर्भागं तं देवं सुरसत्तमाः ।
सर्वे देवर्षयो दृष्ट्वा लक्ष्मणं समपूजयन् ॥ ७१ ॥

मग श्रीरामांना प्रणाम करून लक्ष्मण त्वरित आपल्या घरी गेला. तेथून तो सरयूच्या तीरावर गेला. मग आचमन करून, त्याने दोन्ही हात जोडले आणि आपल्या शरीरातील नवद्वारांचा संयम करून, आपला प्राण मस्तकात धारण केला. नंतर वासुदेव हे नाव असणारे जे अव्यय आणि अविनाशी असे परब्रह्म पद आहे, त्या परमधामाचे त्याने मनाने ध्यान सुरू केले. अशा प्रकारे प्राणनिरोध करणाऱ्या लक्ष्मणावर ऋषी व अग्नी यांच्यासह सर्व देवांनी पुष्प-वृष्टी केली आणि त्याची स्तुती केली. त्या वेळी कोणत्याही देवाला दिसणार नाही, अशा पद्धतीने इंद्राने लक्ष्मणाला स्वर्गात सदेह घेतले आणि इंद्र स्वर्गलोकी निघून गेला. नंतर विष्णूचा चतुर्थ भागरूप असणाऱ्या लक्ष्मणाला पाहून सर्व देवश्रेष्ठ आणि सर्व देवर्षी यांनी लक्ष्मणाचे पूजन केले. (६७-७१)

लक्ष्मणे हि दिवमागते हरौ
सिद्धलोकगतयोगिनस्तदा ।
ब्रह्मणा सह समागमन्मुदा
द्रष्टुमाहितमहाहिरूपकम् ॥ ७२ ॥

लक्ष्मणरूपी हरी स्वर्गाला गेल्यावर, सिद्धलोकात राहाणारे योगीजन ब्रह्मदेवांसह महासर्प (शेष) रूपधारी लक्ष्मणाला पाहाण्यास आनंदाने आले. (७२)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकाण्डे ऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

# नवम सर्ग

## महाप्रयाण

*श्रीमहादेव उवाच*

लक्ष्मणं तु परित्यज्य रामो दुःखसमन्वितः ।
मन्त्रिणो नैगमांश्चैव वसिष्ठं चेदमब्रवीत् ॥ १ ॥

**श्रीमहादेव म्हणाले**– हे पार्वती, लक्ष्मणाचा त्याग केल्यावर दुःखी झालेले श्रीराम मंत्री, वेदवेत्ते लोक आणि वसिष्ठ यांना म्हणाले. (१)

अभिषेक्ष्यामि भरतमधिराज्ये महामतिम् ।
अद्य चाहं गमिष्यामि लक्ष्मणस्य पदानुगः ॥ २ ॥

"आजच महाबुद्धिमान भरताला राज्यावर अभिषेक करून, मी लक्ष्मणाच्या पाठोपाठ जातो." (२)

एवमुक्ते रघुश्रेष्ठे पौरजानपदास्तदा ।
द्रुमा इव च्छिन्नमूला दुःखार्ताः पतिता भुवि ॥ ३ ॥

रघुश्रेष्ठांनी असे म्हटल्यावर, नगरवासी व देशवासी लोक दुःखाने कळवळले, आणि मुळे तुटलेले वृक्ष ज्या प्रमाणे जमिनीवर पडतात, त्या प्रमाणे ते उन्मळून पडले. (३)

मूर्च्छितो भरतो वापि श्रुत्वा रामाभिभाषितम् ।
गर्हयामास राज्यं स प्राहेदं रामसन्निधौ ॥ ४ ॥

श्रीरामांचे भाषण ऐकून भरतसुद्धा मूर्च्छित पडला. श्रीरामांच्यापुढे राज्याची घृणा वाटून तो असे म्हणाला. (४)

सत्येन च शपे नाहं त्वां विना दिवि वा भुवि ।
काङ्क्षे राज्यं रघुश्रेष्ठ शपे त्वत्पादयोः प्रभो ॥ ५ ॥

"हे रघुश्रेष्ठा, सत्याची शपथ घेऊन आणि तुमच्या पायांची शपथ घेऊन सांगतो की तुमच्याविना स्वर्गलोकातील किंवा पृथ्वीलोकातील राज्याची मला मुळीच इच्छा नाही. (५)

इमौ कुशलवौ राजन्नभिषिञ्चस्व राघव ।
कोशलेषु कुशं वीरमुत्तरेषु लवं तथा ॥ ६ ॥

हे महाराज, या कुश व लव यांना राज्याचा अभिषेक करा. वीर कुशाला कोशल देशावर आणि वीर लवाला उत्तरेमध्ये अभिषेक करा. (६)

गच्छन्तु दूतास्त्वरितं शत्रुघ्नानयनाय हि ।
अस्माकमेतद्गमनं स्वर्वासाय शृणोतु सः ॥ ७ ॥

शत्रुघ्नाला आणण्यासाठी दूत त्वरेने जाऊ देत. आपले हे स्वर्गगमन त्यालाही कळू दे." (७)

भरतेनोदितं श्रुत्वा पतितास्ताः समीक्ष्य तम् ।
प्रजाश्च भयसंविग्ना रामविश्लेषकातराः ॥ ८ ॥

भरताने उच्चारलेले वचन ऐकल्यावर, त्याच्याकडे पाहून समस्त प्रजाजन भयाने उद्विग्न झाले आणि श्रीरामांच्या वियोगाने व्याकूळ होऊन पडले. (८)

वसिष्ठो भगवान् राममुवाच सदयं वचः ।
पश्य तातादरात्सर्वाः पतिता भूतले प्रजाः ॥ ९ ॥

तेव्हा भगवान वसिष्ठांनी प्रभू रामांना उद्देशून कारुण्यपूर्ण शब्द उच्चारले, "सारी प्रजा पृथ्वीवर पडली आहे, तिच्याकडे कृपादृष्टीने पाहा. (९)

तासां भावानुगं राम प्रसादं कर्तुमर्हसि ।
श्रुत्वा वसिष्ठवचनं ताः समुत्थाप्य पूज्य च ॥ १० ॥

सस्नेहो रघुनाथस्ताः किं करोमीति चाब्रवीत् ।
ततः प्राञ्जलयः प्रोचुः प्रजा भक्त्या रघूद्वहम् ॥ ११ ॥

प्रभू रामचंद्रा, लोकांच्या प्रेमभावानुसार तुम्ही यांच्यावर कृपाप्रसाद करावयास हवा." वसिष्ठांचे वचन ऐकल्यावर, श्रीरामांनी त्या सर्व प्रजाजनांना उठवले, त्यांचा सत्कार केला, मग स्नेहपूर्वक त्यांना विचारले, "मी तुमच्यासाठी काय करू ?" तेव्हा सर्व प्रजाजन हात जोडून भक्तीने रघुश्रेष्ठांना म्हणाले. (१०-११)

गन्तुमिच्छसि यत्र त्वमनुगच्छामहे वयम् ।
अस्माकमेषा परमा प्रीतिर्धर्मोऽयमक्षयः ॥ १२ ॥

"तुम्ही जेथे जाऊ इच्छिता तेथे आम्ही मागोमाग येऊ. यातच आम्हांला आनंद आहे आणि यातच आमचा अक्षय धर्म आहे. (१२)

तवानुगमने राम हृद्गता नो दृढा मतिः ।
पुत्रदारादिभिः सार्धमनुयामोऽद्य सर्वथा ॥ १३ ॥

तपोवनं वा स्वर्गं वा पुरं वा रघुनन्दन ।
ज्ञात्वा तेषां मनोदार्ढ्यं कालस्य वचनं तथा ॥ १४ ॥

भक्तं पौरजनं चैव बाढमित्याह राघवः ।
कृत्वैवं निश्चयं रामस्तस्मिन्नेवाहनि प्रभुः ॥ १५ ॥

प्रस्थापयामास च तौ रामभद्रः कुशीलवौ ।
अष्टौ रथसहस्राणि सहस्रं चैव दन्तिनाम् ॥ १६ ॥

षष्टिं चाश्वसहस्राणामेकैकस्मै ददौ बलम् ।
बहुरत्नौ बहुधनौ हृष्टपुष्टजनावृतौ ॥ १७ ॥

हे प्रभू रामा, तुमच्या मागोमाग येण्याचा आमच्या मनातील विचार अगदी पक्का आहे. हे रघुनंदना, तुम्ही तपोवन, नगर अथवा स्वर्ग येथे कुठेही जा. आम्ही आमचे पुत्र, पत्नी इत्यादींसह आज तुमच्या मागोमाग येणार." त्यांच्या मनाचा तो दृढ निश्चय, तसेच कालाचे वचन लक्षात घेऊन "ठीक आहे" असे राघव त्या भक्तियुक्त नागरिकांना म्हणाले. मग प्रभू रामांनी तसा निश्चय केला आणि त्याच दिवशी त्यांनी कुश व लवाची रवानगी त्यांच्या राज्यांत केली. प्रत्येकाला त्यांनी आठ हजार रथ, एक हजार हत्ती, साठ हजार घोडे आणि बलवान सैन्य दिले, तसेच पुष्कळ रत्ने , पुष्कळ द्रव्य आणि आनंदी व बलसंपन्न सेवक त्यांना प्रदान केले. मग श्रीरामांना अभिवादन करून कुश आणि

अभिवाद्य गतौ रामं कृच्छ्रेण तु कुशीलवौ ।
शत्रुघ्नानयने दूतान्प्रेषयामास राघवः ॥ १८ ॥

लव मोठ्या कष्टाने निघून गेले. शत्रुघ्नाला आणण्यासाठी राघवांनी दूत पाठविले. (१३-१८)

ते दूतास्त्वरितं गत्वा शत्रुघ्नाय न्यवेदयन् ।
कालस्यागमनं पश्चादत्रिपुत्रस्य चेष्टितम् ॥ १९ ॥

लक्ष्मणस्य च निर्याणं प्रतिज्ञां राघवस्य च ।
पुत्राभिषेचनं चैव सर्वं रामचिकीर्षितम् ॥ २० ॥

दूत त्वरित गेले आणि त्यांनी शत्रुघ्नाला कालाचे आगमन, नंतर अत्रिपुत्र दुर्वासाचे कृत्य, लक्ष्मणाचे महानिर्वाण, श्रीरामांची प्रतिज्ञा, कुश व लव या पुत्रांचा राज्याभिषेक आणि आता श्रीराम काय करू इच्छितात, हे सर्व निवेदन केले. (१९-२०)

श्रुत्वा तद् दूतवचनं शत्रुघ्नः कुलनाशनम् ।
व्यथितोऽपि धृतिं लब्ध्वा पुत्रावाहूय सत्वरः ।
अभिषिच्य सुबाहुं वै मथुरायां महाबलः ॥ २१ ॥

यूपकेतुं च विदिशानगरे शत्रुसूदनः ।
अयोध्यां त्वरितं प्रागात्स्वयं रामदिदृक्षया ॥ २२ ॥

कुळाच्या नाशाविषयीचे ते दूतांचे वचन ऐकल्यावर शत्रुघ्न अतिशय व्यथित झाला. तथापि त्याने धैर्य धारण केले आणि सत्वर आपल्या दोन पुत्रांना बोलावून घेतले. मग त्या महाबलवान शत्रुघ्नाने सुबाहूला मथुरा नगरीत अभिषेक केला, तसेच त्याने यूपकेतूला विदिशा नगरीत अभिषेक केला आणि रामांना भेटण्यासाठी तो स्वतः त्वरेने अयोध्येकडे निघाला. (२१-२२)

ददर्श च महात्मानं तेजसा ज्वलनप्रभम् ।
दुकूलयुगसंवीतं ऋषिभिश्चाक्षयैर्वृतम् ॥ २३ ॥

स्वतःच्या तेजाने अग्नीप्रमाणे प्रभा असणाऱ्या व दोन रेशमी वस्त्रे परिधान केलेल्या आणि चिरंजीव अशा ऋषींसमवेत महात्म्या श्रीरामांना शत्रुघ्नाने पाहिले.(२३)

अभिवाद्य रमानाथं शत्रुघ्नो रघुपुङ्गवम् ।
प्राञ्जलिर्धर्मसहितं वाक्यं प्राह महामतिः ॥ २४ ॥

नंतर लक्ष्मीपती रघुश्रेष्ठाला अभिवादन करून, महाबुद्धिमान शत्रुघ्न हात जोडून धर्माने युक्त असे वचन बोलला. (२४)

अभिषिच्य सुतौ तत्र राज्ये राजीवलोचन ।
तवानुगमने राजन्विद्धि मां कृतनिश्चयम् ॥ २५ ॥

"हे कमलनयन श्रीरामा, तेथे राज्यावर माझ्या दोन पुत्रांना अभिषेक करून मी आलो आहे. हे राजन्, तुमच्या मागोमाग येण्याचा मीसुद्धा निश्चय केला आहे, हे लक्षात घ्या. (२५)

त्यक्तुं नार्हसि मां वीर भक्तं तव विशेषतः ।
शत्रुघ्नस्य दृढां बुद्धिं विज्ञाय रघुनन्दनः ॥ २६ ॥

सज्जीभवतु मध्याह्ने भवानित्यब्रवीद्वचः ।
अथ क्षणात्समुत्पेतुर्वानराः कामरूपिणः ॥ २७ ॥

ऋक्षाश्च राक्षसाश्चैव गोपुच्छाश्च सहस्रशः ।
ऋषीणां देवतानां च पुत्रा रामस्य निर्गमम् ॥ २८ ॥

श्रुत्वा प्रोचू रघुश्रेष्ठं सर्वे वानरराक्षसाः ।
तवानुगमने विद्धि निश्चितार्थान्हि नः प्रभो ॥ २९ ॥

हे वीर रामा, मी तुमचा भक्त आहे. विशेषतः माझा त्याग करणे तुम्हांला शोभणार नाही." शत्रुघ्नाचा दृढ निश्चय कळल्यावर, श्रीराम बोलले, "आज दुपारी तू तयार हो." त्याच वेळी एका क्षणात इच्छेप्रमाणे रूप धारण करणारे वानर, अस्वले, राक्षस आणि गोपुच्छ जातीचे वानर हजारोंच्या संख्येने उड्या मारत तेथे आले. ऋषी तसेच देवतांचे अंशभूत पुत्र-रूप असे सर्व वानर आणि राक्षसांचे समूह हे सर्वजण श्रीरामांचे निर्याणाविषयी ऐकल्यावर रघुश्रेष्ठ श्रीरामांना म्हणाले, "हे प्रभो, तुमच्या मागोमाग येण्याचा आम्हीसुद्धा निश्चय केला आहे, असे समजा." (२६-२९)

एतस्मिन्नन्तरे रामं सुग्रीवोऽपि महाबलः ।
यथावदभिवाद्याह राघवं भक्तवत्सलम् ॥ ३० ॥

दरम्यानच्या काळात महाबलवान सुग्रीवसुद्धा तेथे आला आणि अभिवादन करून, तो भक्तवत्सल राघवांना म्हणाला. (३०)

अभिषिच्याङ्गदं राज्ये आगतोऽस्मि महाबलम् ।
तवानुगमने राम विद्धि मां कृतनिश्चयम् ॥ ३१ ॥

"महाबलवान अंगदाचा राज्यावर अभिषेक करून मी आलो आहे. तुमच्या मागोमाग येण्याचा माझासुद्धा निश्चय आहे, हे लक्षात असू द्या." (३१)

श्रुत्वा तेषां दृढं वाक्यं ऋक्षवानररक्षसाम् ।
बिभीषणमुवाचेदं वचनं मृदु सादरम् ॥ ३२ ॥

त्या वेळी ती अस्वले, वानर आणि राक्षस यांचा दृढ निश्चय ऐकल्यावर, श्रीरामांनी आदरपूर्वक बिभीषणाला उद्देशून मृदू भाषेत सांगितले. (३२)

धरिष्यति धरा यावत्प्रजास्तावत्प्रशाधि मे ।
वचनाद्राक्षसं राज्यं शापितोऽसि ममोपरि ॥ ३३ ॥

"अरे बिभीषणा, जोपर्यंत धरतीवर प्रजा असेल तोपर्यंत माझ्या सांगण्याप्रमाणे तू राक्षस-राज्याचे शासन कर. माझी तुला शपथ आहे. (३३)

न किञ्चिदुत्तरं वाच्यं त्वया मत्कृतकारणात् ।
एवं बिभीषणं तूक्त्वा हनूमन्तमथाब्रवीत् ॥ ३४ ॥

मी केलेल्या या योजनेवर तू आता मला कोणतीही सबब सांगू नकोस." अशा प्रकारे बिभीषणाला सांगिल्यावर, मग श्रीराम हनुमंताला म्हणाले. (३४)

मारुते त्वं चिरञ्जीव ममाज्ञां मा मृषा कृथाः ।
जाम्बवन्तमथ प्राह तिष्ठ त्वं द्वापरान्तरे ॥ ३५ ॥

मया सार्धं भवेद्युद्धं यत्किञ्चित्कारणान्तरे ।
ततस्तान् राघवः प्राह ऋक्षराक्षसवानरान् ।
सर्वानेव मया सार्धं प्रयातेति दयान्वितः ॥ ३६ ॥

"हे मारुती, तू चिरकाल जिवंत राहा. माझी आज्ञा मोडू नकोस." नंतर ते जांबवंताला म्हणाले "तू द्वापर युगाच्या शेवटपर्यंत राहा. त्या वेळी काही तरी कारणाने तुझे माझ्याशी युद्ध होईल." त्यानंतर सर्व अस्वले, राक्षस आणि वानर यांना राघव दयावंत होऊन म्हणाले, "तुम्ही सर्व जण माझ्याबरोबरच चला." (३५-३६)

ततः प्रभाते रघुवंशनाथो
विशालवक्षाः सितकञ्जनेत्रः ।
पुरोधसं प्राह वसिष्ठमार्यं
यान्त्वग्निहोत्राणि पुरो गुरो मे ॥ ३७ ॥

दुसरे दिवशी प्रभात काळी, विशाल वक्षःस्थळाच्या आणि श्वेत कमळाप्रमाणे नेत्र असलेल्या रघुवंशनाथांनी पूज्य पुरोहित वसिष्ठांना म्हटले, "हे गुरो, अग्निहोत्राचे आहवनीय इत्यादी अग्नी माझ्यापुढे असू देत." (३७)

ततो वसिष्ठोऽपि चकार सर्वं
प्रास्थानिकं कर्म महद्विधानात् ।
क्षौमाम्बरो दर्भपवित्रपाणि-
र्महाप्रयाणाय गृहीतबुद्धिः ॥ ३८ ॥

निष्क्रम्य रामो नगरात्सिताभ्रा-
च्छशीव यातः शशिकोटिकान्तिः ।
रामस्य सव्ये सितपद्महस्ता
पद्मा गता पद्मविशालनेत्रा ॥ ३९ ॥

पार्श्वेऽथ दक्षेऽरुणकञ्जहस्ता
श्यामा ययौ भूरपि दीप्यमाना ।
शास्त्राणि शस्त्राणि धनुश्च बाणा
जग्मुः पुरस्ताद् धृतविग्रहास्ते ॥ ४० ॥

तेव्हा वसिष्ठांनीसुद्धा मोठ्या शास्त्रविधीने प्रस्थानाला योग्य असणारी सर्व धर्म-कर्मे केली. ज्या प्रमाणे पांढऱ्या ढगातून चंद्र बाहेर पडतो, त्याप्रमाणे रेशमी वस्त्रे परिधान केलेले, हातात दर्भाचे पवित्रक असणारे कोट्यवधी चंद्राप्रमाणे कांती असणारे आणि महाप्रयाणाचे बाबतीत निश्चय केलेले श्रीराम नगरातून बाहेर पडले. रामांच्या डाव्या बाजूने, हातात श्वेत कमळ घेतलेली आणि कमळाप्रमाणे विशाल नेत्र असणारी लक्ष्मी चालत होती. त्याच वेळी त्यांच्या उजव्या बाजूला, हातात लाल कमळ घेतलेली देदीप्यमान श्याम वर्णाची पृथ्वीदेवीसुद्धा चालली होती, शास्त्रे, शस्त्रे, धनुष्य आणि बाण हे देह धारण करून रामांच्या पुढे चालत होते. (३९-४०)

वेदाश्च सर्वे धृतविग्रहाश्च
ययुश्च सर्वे मुनयश्च दिव्याः ।
माता श्रुतीनां प्रणवेन साध्वी
ययौ हरिं व्याहृतिभिः समेता ॥ ४१ ॥

याचप्रमाणे शरीर धारण करून सर्व वेद आणि सर्व दिव्य मुनी रामांबरोबर निघाले होते. तसेच वेदांची साध्वी माता गायत्री देवीही प्रणव आणि व्याहृती यांच्यासह रामांबरोबर निघाली होती. (४१)

गच्छन्तमेवानुगता जनास्ते
सपुत्रदाराः सह बन्धुवर्गैः ।
अनावृतद्वारमिवापवर्गं
रामं व्रजन्तं ययुरात्मकामाः ।
सान्तःपुरः सानुचरः सभार्यः
शत्रुघ्नयुक्तो भरतोऽनुयातः ॥ ४२॥

अशा प्रकारे राम जात असताना, ते सर्व प्रजाजन आपले पुत्र, पत्नी आणि बंधु- बांधवांचा समाज यांचेसह श्रीरामांच्या मागोमाग निघाले. इच्छा नष्ट झालेले लोक ज्या प्रमाणे दार उघडलेल्या मोक्षाकडे जातात, त्या प्रमाणे ते लोक श्रीरामांच्या मागोमाग जात होते. तसेच अंत:पुरातील स्त्रिया, सेवक, पत्नी आणि शत्रुघ्न यांच्यासह भरतसुद्धा मागे चालला होता. (४२)

गच्छन्तमालोक्य रमासमेतं
श्रीराघवं पौरजनाः समस्ताः ।
सबालवृद्धाश्च ययुर्द्विजाग्र्याः
सामात्यवर्गाश्च समन्त्रिणो ययुः ॥ ४३ ॥

लक्ष्मीसह जाणाऱ्या श्रीराघवांना पाहून, बालक आणि वृद्ध यांचेसह सर्व नगरवासी लोक निघाले होते. तसेच अमात्यांचा समूह आणि मंत्री यांच्यासह श्रेष्ठ ब्राह्मणही मागोमाग निघाले होते. (४३)

सर्वे गताः क्षत्रमुखाः प्रहृष्टा
वैश्याश्च शूद्राश्च तथा परे च ।
सुग्रीवमुख्या हरिपुङ्गवाश्च
स्नाता विशुद्धाः शुभशब्दयुक्ताः ॥ ४४ ॥

प्रमुख क्षत्रिय, वैश्य, शूद्र तसेच इतर सर्व लोक मोठ्या आनंदाने चालले होते. खेरीज सुग्रीवादी श्रेष्ठ वानर स्नान करून, शुद्ध होऊन 'श्रीरामांचा जय असो' असे शुभ शब्द उच्चारीत मागोमाग चालले होते. (४४)

न कश्चिदासीद्भवदुःखयुक्तो
दीनोऽथवा बाह्यसुखेषु सक्तः ।
आनन्दरूपानुगता विरक्ता
ययुश्च रामं पशुभृत्यवर्गैः ॥ ४५ ॥

संसारदु:खाने दु:खी, दीन किंवा बाह्य विषयांच्या सुखांमध्ये आसक्त असा कोणीही त्यांमध्ये नव्हता. उलट संसारातून विरक्त झालेले ते सर्व जण आपापले पशू व सेवक वर्ग यांच्यासह आनंदरूप असणाऱ्या श्रीरामांच्या मागे निघाले होते. (४५)

भूतान्यदृश्यानि च यानि तत्र
ये प्राणिनः स्थावरजङ्गमाश्च ।
साक्षात्परात्मानमनन्तशक्तिं
जग्मुर्विरक्ताः परमेकमीशम् ॥ ४६ ॥

तेथे जे भूत-प्रेतादी अदृश्य प्राणी होते, तसेच जे स्थावर जंगम प्राणी होते ते सर्व विरक्त होऊन त्या एकमेवाद्वितीय परम ईश्वर, अनंत शक्ति-संपन्न अशा साक्षात परमात्म्याचे मागे निघाले होते. (४६)

नासीदयोध्यानगरे तु जन्तुः
कश्चित्तदा राममना न यातः ।
शून्यं बभूवाखिलमेव तत्र
पुरं गते राजनि रामचन्द्रे ॥ ४७ ॥

त्या वेळी अयोध्या नगरीत श्रीरामांच्याबरोबर मन:पूर्वक निघाला नव्हता, असा एकही प्राणी नव्हता. महाराज रामचंद्र बाहेर पडल्यावर, ते संपूर्ण नगर सुनेसुने झाले. (४७)

ततोऽतिदूरं नगरात्स गत्वा
दृष्ट्वा नदीं तां हरिनेत्रजाताम् ।
ननन्द रामः स्मृतपावनोऽतो
ददर्श चाशेषमिदं हृदिस्थम् ॥ ४८ ॥

त्यानंतर नगरातून बरेच दूर गेल्यावर, विष्णूंच्या नेत्रांपासून उत्पन्न झालेली सरयू नदी श्रीरामांनी पाहिली. स्मरण करताच पावन करणारे श्रीराम त्या नदीस पाहून आनंदित झाले आणि हे संपूर्ण जग आपल्या हृदयातच सामावलेले आहे, असे त्यांना दिसले. (४८)

अथागतस्तत्र पितामहो महान्
देवाश्च सर्वे ऋषयश्च सिद्धाः ।
विमानकोटीभिरपारपारं
समावृतं खं सुरसेविताभिः ॥ ४९ ॥
रविप्रकाशाभिरभिस्फुरत्स्वं
ज्योतिर्मयं तत्र नभो बभूव ।
स्वयम्प्रकाशैर्महतां महद्भिः
समावृतं पुण्यकृतां वरिष्ठैः ॥ ५० ॥
ववुश्च वाताश्च सुगन्धवन्तो
ववर्ष वृष्टिः कुसुमावलीनाम् ।
उपस्थिते देवमृदङ्गनादे
गायत्सु विद्याधरकिन्नरेषु ॥ ५१ ॥
रामस्तु पद्भ्यां सरयूजलं सकृत्
स्पृष्ट्वा परिक्रामदनन्तशक्तिः ।
ब्रह्मा तदा प्राह कृताञ्जलिस्तं
रामं परात्मन् परमेश्वरस्त्वम् ॥ ५२ ॥
विष्णुः सदानन्दमयोऽसि पूर्णो
जानासि तत्त्वं निजमैशमेकम् ।
तथापि दासस्य ममाखिलेश
कृतं वचो भक्तपरोऽसि विद्वन् ॥ ५३ ॥
त्वं भ्रातृभिर्वैष्णवमेकमाद्यं
प्रविश्य देहं परिपाहि देवान् ।
यद्वा परो वा यदि रोचते तं
प्रविश्य देहं परिपाहि नस्त्वम् ॥ ५४ ॥
त्वमेव देवाधिपतिश्च विष्णु-
र्जानन्ति न त्वां पुरुषा विना माम् ।
सहस्त्रकृत्वस्तु नमो नमस्ते
प्रसीद देवेश पुनर्नमस्ते ॥ ५५ ॥
पितामहप्रार्थनया स रामः
पश्यत्सु देवेषु महाप्रकाशः ।
मुष्णंश्च चक्षूंषि दिवौकसां तदा
बभूव चक्रादियुतश्चतुर्भुजः ॥ ५६ ॥
शेषो बभूवेश्वरतल्पभूतः
सौमित्रिरत्यद्भुतभोगधारी ।
बभूवतुश्चक्रदरौ च दिव्यौ
कैकेयिसूनूर्लवणान्तकश्च ॥ ५७ ॥
सीता च लक्ष्मीरभवत्पुरेव
रामो हि विष्णुः पुरुषः पुराणः ।
सहानुजः पूर्वशरीरकेण
बभूव तेजोमयदिव्यमूर्तिः ॥ ५८ ॥

तितक्यात तेथे श्रेष्ठ पितामह ब्रह्मदेव, सर्व देव, ऋषी आणि सिद्ध हेही आले. त्या वेळी देव विराजमान असलेल्या कोट्यवधी विमानांनी अपरंपार आकाश गच्च भरून गेले होते. सूर्याप्रमाणे असणाऱ्या त्या विमानांच्या प्रकाशांनी ते प्रकाशमान झाले. पुण्यवानांतील श्रेष्ठ, महात्म्यांमधील महान अशा स्वयंप्रकाशी पुरुषांमुळे आकाश भरून गेले होते. (४९-५०)

त्या वेळी सुगंधी वारे वाहू लागले. कुसुम-समूहाची सतत वृष्टी होऊ लागली आणि देवांच्या मृदंगाचा नाद कानी पडत असताना आणि विद्याधर व किन्नर गात असताना, अनंतशक्ती असणाऱ्या श्रीरामांनी सरयूच्या जलाचे एकदा आचमन केले. मग सरयू जलाला पायांनी स्पर्श करून ते त्या पाण्यातून चालू लागले. त्या वेळी हात जोडून ब्रह्मदेव श्रीरामांना म्हणाले, "हे परमात्मन्, तुम्ही परमेश्वर आहात, नित्य आनंदमय आणि सर्वांशी पूर्ण असे साक्षात विष्णू आहात. आपले स्वतःचे एकमेव ईश्वरी तत्त्व तुम्हीच जाणता, तथापि हे सर्वांच्या स्वामी असलेल्या तुमचा मी दास आहे. माझी प्रार्थना तुम्ही पूर्ण केली आहे. हे विद्वाना, तुम्ही भक्तवत्सल आहात. (५१-५३)

आता आपल्या भावांसह तुम्ही आद्य विष्णूंच्या शरीरातच प्रवेश करा आणि देवांचे रक्षण करा, किंवा जर तुम्हाला दुसरा एकादा देह पसंत असेल, तर त्या देहात प्रवेश करून तुम्ही आम्हा सर्वांचे पालन करा. (५४)

तुम्हीच देवांचे अधिपती विष्णू आहात. ही गोष्ट माझ्याखेरीज इतर कोणी पुरुष जाणत नाहीत. हे देवेश्वरा, तुम्हांला हजार वेळा माझा नमस्कार असो. तुम्ही प्रसन्न व्हा. पुनः तुम्हांला माझा नमस्कार असो." (५५)

पितामह ब्रह्मदेवाने अशी प्रार्थना केली असता आणि सर्व देव पाहात असताना, स्वर्गात राहाणाऱ्या सर्व देवांची दृष्टी दिपवीत, महातेजस्वी प्रभू रामचंद्रांनी चक्र इत्यादींनी युक्त चतुर्भुज रूप धारण केले. (५६)

लक्ष्मण अतिशय अद्भुत फणा धारण करून विष्णूची शय्या असणारा शेष नाग झाला. तसेच कैकेयीचा पुत्र भरत आणि लवणाचा वध करणारा शत्रुघ्न हे अनुकमे दिव्य असे चक्र आणि शंख झाले. (५७)

सीता ही तर अगोदरच लक्ष्मी झाली होती. राम हे साक्षात पुराण पुरुष विष्णूच. आपल्या कनिष्ठ बंधूंसह आपले पूर्वीचे शरीर धारण करून श्रीरामचंद्र तेजोमय दिव्य स्वरूपी विष्णू बनून शोभू लागले. (५८)

विष्णुं समासाद्य सुरेन्द्रमुख्या
देवाश्च सिद्धा मुनयश्च यक्षा: ।
पितामहाद्या: परित: परेशं
स्तवैर्गृणन्त: परिपूजयन्त: ॥ ५९ ॥
आनन्दसम्प्लावितपूर्णचित्ता
बभूविरे प्राप्तमनोरथास्ते ।
तदाह विष्णुर्द्रुहिणं महात्मा
एते हि भक्ता मयि चानुरक्ता: ॥ ६० ॥
यान्तं दिवं मामनुयान्ति सर्वे
तिर्यक्शरीरा अपि पुण्ययुक्ता: ।
वैकुण्ठसाम्यं परमं प्रयान्तु
समाविशस्वाशु ममाज्ञया त्वम् ॥ ६१ ॥
श्रुत्वा हरेर्वाक्यमथाब्रवीत्क:
सान्तानिकान्यान्तु विचित्रभोगान् ।
लोकान्मदीयोपरि दीप्यमानां-
स्त्वद्भावयुक्ता: कृतपुण्यपुञ्जा: ॥ ६२ ॥
ये चापि ते राम पवित्रनाम
गृणन्ति मर्त्या लयकाल एव ।
अज्ञानतो वापि भजन्तु लोकां-
स्तानेव योगैरपि चाधिगम्यान् ॥ ६३ ॥
ततोऽतिहृष्टा हरिराक्षसाद्या:
स्पृष्ट्वा जलं त्यक्तकलेवरास्ते ।
प्रपेदिरे प्राक्तनमेव रूपं
यदंशजा ऋक्षहरीश्वरास्ते ॥ ६४ ॥
प्रभाकरं प्राप हरिप्रवीर:
सुग्रीव आदित्यजवीर्यवत्त्वात् ।
ततो विमग्ना: सरयूजलेषु
नरा: परित्यज्य मनुष्यदेहम् ॥ ६५ ॥
आरुह्य दिव्याभरणा विमानं
प्रापुश्च ते सान्तनिकाख्यलोकान् ।
तिर्यक्प्रजाता अपि रामदृष्टा
जलं प्रविष्टा दिवमेव याता: ॥ ६६ ॥
दिदृक्षवो जानपदाश्च लोका
रामं समालोक्य विमुक्तसङ्गा: ।
स्मृत्वा हरिं लोकगुरुं परेशं
स्पृष्ट्वा जलं स्वर्गमवापुरुज्ज: ॥ ६७ ॥

त्या वेळी इंद्रादी देव, सिद्ध, मुनी, यक्ष, ब्रह्मदेव इत्यादी परमेश्वर विष्णूजवळ येऊन, सर्व प्रकारे स्तोत्रांनी त्यांची स्तुती करू लागले आणि त्यांनी त्यांची पूजा केली. आपला मनोरथ पूर्ण झाल्यामुळे त्या सर्वांची मने आनंदाने संपूर्णपणे भरून गेली. त्या वेळी भगवान विष्णू ब्रह्मदेवांना म्हणाले, "हे सर्व जण माझे भक्त आहेत आणि ते माझ्यावर प्रेम करणारे आहेत. (५९-६०)

मी स्वर्गाला येण्यास निघालो असताना, हे सर्व जण माझ्या मागोमाग येथे आले आहेत. यांमध्ये जे तिर्यक् शरीरधारी आहेत, तेसुद्धा फार पुण्यवंत आहेत. हे सर्वजण वैकुंठसदृश उत्तम लोकांप्रत जाऊ देत. तेव्हा माझ्या आज्ञेने तुम्ही यांना ताबडतोब प्रवेश द्या." (६१)

हरींचे वचन ऐकल्यावर ब्रह्मदेव म्हणाले, "माझ्या ब्रह्मलोकाच्याही वर असणारे, देदीप्यमान, विचित्र भोग साधनांनी संपन्न असे जे सांतानिक लोक आहेत, त्या लोकांप्रत तुमच्या भक्तीने युक्त असणारे आणि ज्यांनी पुण्याचा संचय केला आहे, असे हे लोक जाऊ देत. (६२)

आणि हे श्रीरामा, आणखी सांगतो की मरणकाळी जे मानव 'राम' हे तुमचे पवित्र नाम उच्चारतील, तसेच अजाणता का होईना जे कोणी तुम्हांला भजतील, त्या लोकांनासुद्धा, योगीजनांना प्राप्त होण्यास योग्य असे ते सांतानिक लोक प्राप्त होतील." (६३)

त्या वेळी वानर, राक्षस इत्यादी अतिशय आनंदित झाले. सरयूच्या जलाला स्पर्श करून त्यांनी आपल्या शरीराचा त्याग केला. त्यानंतर ती अस्वले व वानरश्रेष्ठ ज्या अंशापासून उत्पन्न झाले होते, त्या देवांची पूर्वीची रूपे त्यांना प्राप्त झाली. (६४)

वानरांतील श्रेष्ठ वीर सुग्रीव हा आदित्याच्या वीर्यापासून उत्पन्न झाला असल्यामुळे तो सूर्यात विलीन होऊन गेला. त्यानंतर इतर माणसांनी सरयूच्या पाण्यात बुडी मारली; त्यांनी आपल्या मनुष्य-देहांचा त्याग केला; मग दिव्य अलंकारांनी विभूषित होऊन ते विमानात चढले आणि त्यांनी सांतानिक नावाचे लोक प्राप्त करून घेतले. तिर्यक् योनीत जन्मलेले प्राणीसुद्धा श्रीरामांची दृष्टी पडल्यावर सरयूच्या पाण्यात शिरले आणि तेही स्वर्गलोकीच गेले . (६५-६६)

जे देशवासी लोक हा प्रसंग पाहाण्याच्या इच्छेने आलेले होते, तेसुद्धा श्रीरामांचे दर्शन झाल्यावर, संसाराच्या आसक्तीतून मुक्त झाले आणि लोकगुरू व परमेश्वर अशा श्रीहरींचे स्मरण करून, त्यांनी सरयूच्या जलाला स्पर्श करताच, त्यांनासुद्धा अनायासे स्वर्गाची प्राप्ती झाली.(६७)

एतावदेवोत्तरमाह शम्भुः
श्रीरामचन्द्रस्य कथावशेषम् ।
यः पादमप्यत्र पठेत्स पापा-
द्विमुच्यते जन्मसहस्त्रजातात् ॥ ६८ ॥

श्रीरामचंद्रांच्या कथेचा उरलेला इतकाच भाग शंकरांनी पार्वतीला उत्तरकांड रूपात सांगितला. जो कुणी माणूस यातील एक पाद (चौथा भाग) सुद्धा पठण करील, तो हजारो जन्मात झालेल्या पापांतून मुक्त होऊन जाईल. (६८)

दिने दिने पापचयं प्रकुर्वन्
पठेन्नरः श्लोकमपीह भक्त्या ।
विमुक्तसर्वाघचयः प्रयाति
रामस्य सालोक्यमनन्यलभ्यम् ॥ ६९ ॥

दररोज पापाचा संचय करणारा पुरुष जर भक्तीने या अध्यात्मरामायणातील एक तरी श्लोक पठण करील, तो पापांच्या सर्व संचयातून मुक्त होऊन, इतरांना अलभ्य अशा रामाच्या सालोक्यपदाप्रत जाईल. (६९)

आख्यानमेतद्रघुनायकस्य
कृतं पुरा राघवचोदितेन ।
महेश्वरेणाप्तभविष्यदर्थं
श्रुत्वा तु रामः परितोषमेति ॥ ७० ॥

ज्यामध्ये भविष्यकालीन गोष्टी वर्णिल्या आहेत, असे हे रघुनायकांचे आख्यान, त्यांच्या प्रेरणेनेच महेश्वराने पूर्वी रचले. ते ऐकून श्रीराम अतिशय संतुष्ट होतात. (७०)

रामायणं काव्यमनन्तपुण्यं
श्रीशङ्करेणाभिहितं भवान्यै ।
भक्त्या पठेद्यः शृणुयात्स पापै-
र्विमुच्यते जन्मशतोद्भवैश्च ॥ ७१ ॥

अनंत पुण्य देणारे हे अध्यात्म रामायण नावाचे काव्य पूर्वी श्रीशंकरांनी पार्वतीला सांगितले. जो पुरुष हे भक्तीने पठण करील अथवा श्रवण करील, तो शेकडो जन्मांत निर्माण झालेल्या पापांतून मुक्त होऊन जातो. (७१)

अध्यात्मरामं पठतश्च नित्यं
श्रोतुश्च भक्त्या लिखितुश्च रामः ।
अतिप्रसन्नश्च सदा समीपे
सीतासमेतः श्रियमातनोति ॥ ७२ ॥

या अध्यात्मरामायणाचे नित्य पठण जो पुरुष भक्तीने करतो, वा श्रवण करतो अथवा त्याचे लेखन करतो, त्याच्यावर श्रीराम अतिशय प्रसन्न होतात आणि सीतेसह सदा त्याच्या समीप राहून त्याला भोगमोक्ष देतात. (७२)

रामायणं जनमनोहरमादिकाव्यं
ब्रह्मादिभिः सुरवरैरपि संस्तुतं च ।
श्रद्धान्वितः पठति यः शृणुयात्तु नित्यं
विष्णोः प्रयाति सदनं स विशुद्धदेहः ॥ ७३ ॥

ब्रह्मदेव इत्यादी श्रेष्ठ देवांनी प्रशंसा केलेले आणि माणसांच्या मनाचे हरण करणारे हे आदिकाव्य असे अध्यात्म रामायण जो कोणी भक्तिसंपन्न होऊन नित्य पठण करतो किंवा नित्य श्रवण करतो, त्याचे शरीर शुद्ध होते (व मन निर्मळ होते) आणि तो विष्णूच्या परमधामास जातो. (७३)

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

## समाप्तमिदमुत्तरकाण्डम्

पार्वत्यै परमेश्वरेण गदिते ह्यध्यात्मरामायणे
काण्डैः सप्तभिरन्वितेऽतिशुभदे सर्गाश्चतुःषष्टिकाः ।
श्लोकानां तु शतद्वयेन सहितान्युक्तानि चत्वारि वै
साहस्राणि समाप्तितः श्रुतिशतान्युक्तानि तत्त्वार्थतः ॥

श्रीशंकरांनी पार्वतीला सांगितलेल्या, आणि सात कांडांनी युक्त असणाऱ्या या अतिशय शुभप्रद अध्यात्मरामायणात चौसष्ट सर्ग आहेत. याच्या अंतापर्यंत एकूण चार हजार दोनशे श्लोक सांगितलेले आहेत. तसेच तत्त्वार्थाचे विवेचन करणाऱ्या शेकडो श्रुतींची वचने सांगितली आहेत.

# श्रीजानकीजीवनाष्टकम्

आलोक्य यस्यातिललामलीलां सद्भाग्यभाजौ पितरौ कृतार्थौ ।
तमर्भकं दर्पकदर्पचौरं श्रीजानकीजीवनमानतोऽस्मि ॥ १ ॥
श्रुत्वैव यो भूपतिमात्तवाचं वनं गतस्तेन न नोदितोऽपि ।
तं लीलयाह्लादविषादशून्यं श्रीजानकीजीवनमानतोऽस्मि ॥ २ ॥
जटायुषो दीनदशां विलोक्य प्रियावियोगप्रभवं च शोकम् ।
यो वै विसस्मार तमार्द्रचित्तं श्रीजानकीजीवनमानतोऽस्मि ॥ ३ ॥
यो वालिना ध्वस्तबलं सुकण्ठं न्ययोजयद्राजपदे कपीनाम् ।
तं स्वीयसन्तापसुतप्तचित्तं श्रीजानकीजीवनमानतोऽस्मि ॥ ४ ॥
यद्ध्याननिर्धूतवियोगवह्निर्विदेहबाला विबुधारिवन्याम् ।
प्राणान्दधे प्राणमयं प्रभुं तं श्रीजानकीजीवनमानतोऽस्मि ॥ ५ ॥
यस्यातिवीर्याम्बुधिवीचिराजौ वंश्यैरहो वैश्रवणो विलीनः ।
तं वैरिविध्वंसनशीललीलं श्रीजानकीजीवनमानतोऽस्मि ॥ ६ ॥
यद्रूपराकेशमयूखमालानुरञ्जिता राजरमापि रेजे ।
तं राघवेन्द्रं विबुधेन्द्रवन्द्यं श्रीजानकीजीवनमानतोऽस्मि ॥ ७ ॥
एवं कृता येन विचित्रलीला मायामनुष्येण नृपच्छलेन ।
तं वै मरालं मुनिमानसानां श्रीजानकीजीवनमानतोऽस्मि ॥ ८ ॥

ज्यांच्या अतिशय ललामभूत बाललीला पाहून भाग्यशाली माता-पिता कृतार्थ झाले आणि ज्यांनी आपल्या सौंदर्याने मदनाचा अभिमान हरण केला त्या श्रीजानकीजीवनरूप श्रीरामांना मी नमस्कार करतो. (१)

दशरथ राजांचे वचन ऐकताच, त्यांचे वचन मान्य करून, त्यांनी प्रेरणा दिली नसतानाही जे लीलेने वनामध्ये गेले त्या आनंद व विषाद यांनी रहित अशा श्रीजानकीजीवनरूप रामांना मी नमस्कार करतो. (२)

जटायूची दीन अवस्था पाहिल्यावर आपल्या प्रिया सीतेच्या वियोगामुळे निर्माण झालेला शोक जे विसरून गेले, अशा आर्द्रचित्त असणाऱ्या त्या श्रीजानकीजीवनरूप रामांना मी नमस्कार करतो. (३)

वालीने पराभूत केलेल्या आपल्या प्रिय मित्र सुग्रीवाला त्याचे दुःख दूर करून त्याला वानरांच्या राज्यपदावर बसविले. अशा श्रीजानकीजीवनरूप श्रीरामांना मी नमस्कार करतो. (४)

श्रीरामांचे ध्यान केल्यामुळे सीतेचा विरहरूपी अग्नी विझून गेला, ती विदेहकन्या सीता देवांचा शत्रू असलेल्या रावणाच्या अशोकवनांत प्राण धारण करून राहिली. अशा त्या सीतेचा प्राण असणाऱ्या श्रीजानकीजीवनरूप प्रभू श्रीरामांना मी नमस्कार करतो. (५)

काय आश्चर्य! ज्यांच्या अतिशय सामर्थ्यरूपी सागराच्या तरंगांमध्ये रावण आपल्या वंशासह विलीन झाला, आणि वैऱ्यांचा नाश करणे हा ज्यांची लीला होती, अशा त्या श्रीजानकीजीवनरूप श्रीरामांना मी नमस्कार करतो. (६)

ज्यांच्या रूपाच्या चंद्रकिरणांनी रंगलेली राजलक्ष्मी हीसुद्धा शोभू लागली, जे रघुकुळातील पुरुषांमध्ये श्रेष्ठ होते, जे ब्रह्मादिकांना वंद्य होते, अशा श्रीजानकीजीवनरूप श्रीरामांना मी नमस्कार करतो. (७)

अशा प्रकारे मायेने मनुष्यरूप धारण केलेल्या श्रीरामांनी राजा बनून विचित्र लीला केल्या आणि जे मुनींच्या मानसरूपी मानस सरोवरातील हंस आहेत, अशा त्या श्रीजानकीजीवनरूप श्रीरामांना नमस्कार करतो. (८)

*******

# पारायणानंतरचे श्लोक

ॐ स्वस्ति प्रजाभ्यः परिपालयन्तां
न्याय्येन मार्गेण महीं महीशाः।
गो ब्राह्मणेभ्यः शुभमस्तु नित्यं
लोकाः समस्ताः सुखिनो भवन्तु॥
काले वर्षतु पर्जन्यः पृथिवी सस्यशालिनी।
देशोऽयं क्षोभरहितो ब्राह्मणाः सन्तु निर्भयाः॥
मङ्गलं कोसलेन्द्राय महनीयगुणात्मने।
चक्रवर्तितनूजाय सार्वभौमाय मङ्गलम्॥
कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा
बुद्ध्याऽऽत्मना वा प्रकृतिस्वभावात्।
करोमि यद् यत् सकलं परस्मै
नारायणायेति समर्पयामि॥
ॐ सर्वेषां स्वस्तिर्भवतु सर्वेषां शान्तिर्भवतु
सर्वेषां पूर्णं भवतु सर्वेषां मंगलं भवतु
सर्वे भवन्तु सुखिनः सर्वे सन्तु निरामयाः।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दुःखभाग्भवेत्॥
ॐ असतो मा सद्गमय
तमसो मा ज्योतिर्गमय
मृत्योर्मा अमृतं गमय॥
ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते॥

# श्रीभगवंतांची प्रार्थना

श्री अनंता मधुसूदना। पद्मनाभा नारायणा।
जगव्यापका जनार्दना। आनंदघना अविनाशा॥ १॥
सकळदेवाधिदेवा। कृपाळुवाजी केशवा।
महानंदा महानुभवा। सदाशिवा सहजरूपा॥ २॥
चक्रधरा विश्वंभरा। गरुडध्वजा करुणाकरा।
सहस्त्रपादा सहस्त्रकरा। क्षीरसागरा शेषशयना॥ ३॥
कमलनयना कमलापति। कामिनि मोहना मदनमूर्ति।
भवतारका धारित्या क्षिती। वामनमूर्ती त्रिविक्रमा॥ ४॥
अगा ये सगुणा निर्गुणा। जगज्जनित्या जगज्जीवना।
वसुदेव देवकी नंदना। बाळरांगणा बाळकृष्णा॥ ५॥
तुका आला लोटांगणी। मज ठाव द्यावा जी चरणी।
हेचि करीतसे विनवणी। भवबंधनी सोडवावे॥ ६॥